# वैद्यांचे ऐतिहासिक निबंध.



खण्ड १–शिवाजीमहाराज.
,, २–प्राचीन इतिहास.
,, ३–अर्वाचीन इतिहास.

........................

पुणें आर्यभूषण छापखान्यांत, घ. नं. ९३६।२ पेठ भांबुर्डा येथें
**अनंत विनायक पटवर्धन** बी. ए. यांनीं छापिलें व
रा. **चिंतामण विनायक वैद्य** यांनीं
पुणें येथें प्रसिद्ध केलें.

सन १९३१

...........

किंमत २। रुपये.

# अनुक्रमणिका.



## खंड पहिला.

### शिवाजी महाराज.



## खंड दुसरा.

### प्राचीन इतिहास.

लेखाचें नांव. पृष्ठ.

## खंड तिसरा.

### अर्वाचीन इतिहास.



एकंदर पृष्ठ संख्या ११६+२२९+२२४=५६९.

# भोसले घराण्याची पूर्वपीठिका.

( त्रिशत सांवत्सरिक उत्सव पुणें १९३० )

शिवाजीमहाराज हे भोसल्यांचे कुळांत जन्मले असून भोसले कुळ क्षत्रिय शिसोदे कुळ आहे याबद्दल हल्लीं वाद नाहीं. गागाभट्टानें शिवाजीमहाराजांस वैदिक विधीनें राज्याभिषेक केला त्यावेळेसच त्यानें आपली या कुळाच्या क्षत्रियत्वाबद्दल खात्री करून घेतली. कारण त्यावेळीं हल्लींप्रमाणें कलियुगांत दोनच वर्ण, ब्राह्मण व शूद्र, आहेत असें कित्येक लोक प्रतिपादित होते. राजपुतान्यांतील रजपूत राजघराण्यांत वैदिक आचार व उपनयनादि संस्कार चालू होते, त्यामुळें तिकडे फारसा वाद होत नव्हता; पण महाराष्ट्रांत मराठ्यांसंबंधानें वाद चालू होता. त्यांच्यांत कर्मलोप बहुतेक झाला होता व शिवाजीमहाराजांचीही मुंज झालेली नव्हती. पण गागाभट्टानें धर्मशास्त्रानुसार असा विचार केला कीं कर्मलोपानें वर्णलोप होत नाहीं, कुविवाहानें शूद्र स्त्रिया केल्या असल्या तरच वर्णलोप होईल. तेव्हां भोसल्यांची कुळपरंपरा कशी आहे याचा त्यानें शोध करविला आणि भोसले कुळाचा संबंध उदेपूरच्या राणा लक्ष्मणसिंहाच्या वंशांत उत्पन्न झालेल्या दिलीपसिंगाशीं पोहोंचतो याची त्यानें सिद्धता करून घेतली. त्यावेळीं जी वंशावळ चिटणिसांनीं ( बाळाजी आवजींनीं ) उदेपुराहून आणली ती व हल्लीं ज्या कित्येक वंशावळी साताराच्या प्रतापसिंहमहाराजांनीं वगैरे तयार करविल्या आहेत त्या मी पुढें देत आहें. त्यांवरून दिलीपसिंहाच्या कुळांत शिवाजीमहाराज उत्पन्न झाले हें निःसंशय सिद्ध होतें.

बाळाजी आवजींनें ही वंशावळ कृत्रिम जोडली असा कित्येकांचा संशय होता. परंतु कै. राजवाड्यांनीं राधामाधवचंपू काव्य छापिलें त्यावेळीं हा संशय निवृत्त झाला. शहाजीमहाराजांच्या वेळीच हा संबंध प्रसिद्ध होता असें स्पष्ट आहे. जयराम कवीनें म्हटलें आहे "महीच्या महेंद्रामध्यें मुख्य राणा । बळीपाम

सदरहू वंशावळींतील एक एक पूर्वजांचा काय इतिहास मिळतो तें आपण पाहूं. शिवाजीमहाराजांचा आजा मालोजी याविषयीं शिवभारतांत असें म्हटलें आहे कीं तो महाराष्ट्रांत राज्य करीत होता आणि पुणें गावीं रहात असे. ( १–४५ स पुण्यदेशे धर्मात्मा निवासमकल्पयत् ). पुण्याचा मोकासा त्याकडे असावा. निजामशाहीकडून हा मोकासा होता, याचें कित्येकांस नवल वाटेल. पण पुणें प्रांत निजामशाहींत मोडत होता. निजामशाही व आदिलशाही यांची सरहद्द मुख्यत: भीमा होती, परंतु पुण्याजवळ नीरेपर्यंत निजामशाहीची हद्द होती निजामशाही मोंगलांनीं व विजापूरकरांनीं बुडविली तेव्हां पुणें प्रांत विजापुराला मिळाला आणि तो शहाजीला पुन्हां मोकासा दिला गेला. सरहद्दीवरील डोंगराळ प्रांत बहुधा मराठे सरदारांकडे दिले जात. मात्र मुख्य किल्ला बादशाहीकडे रहात. या न्यायानें कोंढाणा आणि पुरंदर हे पुणें प्रांतीचे किल्ले बादशहांच्या ताब्यांत असत. 'त्यावेळीं देवगिरी किल्ल्याचा आश्रय करून निजामशहा पृथ्वीचें राज्य करीत होता' असें शिवभारत म्हणतें (१–५९) व त्याच्या पदरीं जाधव वगैरे अनेक मराठे मांडलिक सरदार होते ( १–६० ). मालोजीपासून शिवभारतांत हकीकत आहे हें ठीकच आहे. हा मोठा सरदार फौजबंद असून यानें शंभु महादेवाजवळ तळें बांधलें आणि वेरूळच्या घृष्णेश्वराचें देऊळहि बांधलें. हल्लींचें देऊळ मात्र अहिल्याबाईनें बांधलेलें आहे. शिसोदे वंशांत कुळदेवत महादेव आहे, कारण शिसोदे ऊर्फ गुहिलोत वंशाचा संस्थापक बापा रावळ उदेपूर राज्यांतील एकलिंग महादेवाच्या प्रसादानें उत्कर्ष पावला असा वंशेतिहास आहे ( मध्य.भा. भा. २ पृ. ११३ ). एकलिंगाचें फार मोठें संस्थान उदेपूर राज्यांत अजूनहि आहे.

भोंसल्यांच्या कुळांत राजे ही संज्ञा बहुधा सर्वांस लागते. मालोजी राजे भोसले असा नेहमीं उल्लेख येतो. शहाजीला जास्त वैभव व अधिकार मिळाला तेव्हां महाराज म्हणूं लागले. मराठ्यांतील क्षत्रिय कुळांत राजे हें उपपद लावण्याचा प्रघात फार जुना दिसतो. कारण शबरभाष्यांत सुद्धां ( इ. स. ४०० ) 'आन्ध्रेषु पुररक्षणमकुर्वत्यपि राजशब्दो व्यवह्रियते' असा शेरा आहे आणि त्याप्रमाणें आन्ध्र देशांत राजु उपपद अजून लावतात. आंध्र आणि महाराष्ट्र एक असें समजून हा आन्ध्र शब्द भाष्यकार उपयोजितो असें कुमारिलाचें वार्तिक यावर आहे, आणि यावरून महाराष्ट्रांत हाच प्रचार इ. स. ७०० पासून चालू आहे. राजे भोसले, राजे महाडिक वगैरे प्रयोग महाराष्ट्रांत दृष्टीस पडतात. ही पदवी कोणी बादशहानें मालोजीला दिली होती असें मानण्याचें प्रयोजन नाहीं

आणि याच कारणानें मालोजीचा बाप बाबाजी याचा उल्लेख कागदपत्रांत बाबाजी राजे असा येतो.

मालोजीच्या बायकोचें नांव उमाबाई असें कागदपत्रांतून आढळतें (ले. ४९८). वरील वंशावळींतही तेंच नांव दिलेलें आहे. हें नांव दोनतीनदां आलें आहे. दीपाबाई हें दुसरें नांव माहेरचें असावें; ती निंबाळकरांची लेक होती हें वर सांगितलेंच आहे.

मालोजी श. १५२८ च्या सुमारें वारला असें उपलब्ध कागदावरून (ले. ३७० ग. खं. १५) निश्चित ठरतें. तो ५० वर्षांच्या वयाचा असतां वारला असें धरलें तर त्याचा जन्म श. १४७८ त येतो. मल्हाररामरावकृत बखरींत जन्म श. १४७२ व मृत्यु १५४२ (शेडगावकर बखर) दिला आहे म्हणजे तो ७० वर्षांचा असतां मेला. हें असंभाव्य बखरीस योग्य असें आहे. त्याचा बाप बाबाजी याचा जन्म यापूर्वीं वीस वर्षें धरला तर तो श. १४५८ त ठरतो. बाबाजी राजे भोसले यास पांडे पेडगांवची जहागीर होती हें ले. ३६७ वरून सिद्ध आहे. हें पेडगांव भीमा नदीच्या उत्तर तीरीं असून विजापूरची हद्द पलीकडे लागते. सरहद्दीवर जोरदार सरदार पाहिजे या कारणानें हा गांव त्यास मिळाला असावा. हा गाव मी पाहिला आहे. तो फारच मोठा असून हल्लीं अगदीं वैराण निवडुंगांनीं भरलेला आहे. येथें औरंगजेबाचा पुढें मोठा तळ पडलेला होता. त्यानें एक किल्ला येथें बांधलेला आहे. येथें एक प्राचीन सुंदर देऊळ आहे.

मालोजीला पुष्कळ वर्षें पुत्र नव्हता यावरून बखरकार त्यास ७० वर्षांचा मानतात. पण उशिरां म्हणजे ६०।६५ वर्षीं नव्हे. शिवाय श. १५२८ त तो वारला होता हें निश्चित आहे तेव्हां त्याचा जन्म या वयानुसार १४५८ श. म्हणजे १५३६ वर्षीं येतो. बाबाजीचा उपरोक्त लेख १५१९ श. चा आहे. ग्रँटडफ इ. स. १५७७ (श. १४९९) तो २५ वर्षांचा असतां जाधवाच्या शिफारशीनें नोकर झाला असें लिहितो तें अर्थात् चुकीचें आहे. त्यापूर्वींच बाबाजी मोठा सरदार होता, हें निश्चित आहे.

चारी वंशावळींत बाबाजीचें नांव आहे. यापूर्वींचे पुरुष मात्र त्यांत भिन्न भिन्न दाखविले आहेत. बाबाजीच्या बायकोचें नांव रेवाऊ. आऊ हा प्रत्यय कर्नाटकी आहे. तो बाईच्या ऐवजीं आहे (बाई शब्द संस्कृतोत्पन्न वई—वती अशा परम्परेनें निघालेला दिसतो). बाबाजीच्या बापाचें नांव व. १ व. २

मध्यें संभाजी असें दिलें आहे. नं. ३ मध्यें परसोजी आणि नं. ४ मध्यें व्यंकोजी असें आहे. बाबाजीपर्यंत म्हणजे श. १४५८ ( इ. १५३६ ) पर्यंत वंशलेखकांची माहिती साधार आहे. यापुढें कल्पना बऱ्याच चालल्या असें दिसतें. पण लक्ष्मणसिंहापासन तिन्ही वंशावळींत पिढ्या सारख्याच दिसतात म्हणजे पहिलींतील १२ वा बाबाजी दुसऱ्या तिसऱ्यांत १४ वाच आहे. दर पिढी २० वर्षांची धरली तर बाबाजीस सोडून ११ पुरुष किंवा १३ धरले तर २२० अगर २६० वर्षांपूर्वी लक्ष्मणसिंह येतो; म्हणजे श. १२३८ किंवा १२०८ हें वर्ष लक्ष्मणसिंहाचें येतें. पहिल्या वंशावळींत त्याचा काळ इ. १३०३ म्हणजे श.१२२५ दिला आहे.अर्थात् या तिन्ही वंशावळी स्थूलमानानें इतिहासांत मानण्या-लायक आहेत. लक्ष्मणसिंहाचा मेवाडच्या राज्यावरील काळ रा. ब. गौरीशंकर यांनीं १३०३ हाच दिला आहे. प्रत्येक पिढीच्या नांवाचा विश्वसनीय पुरावा मिळावा म्हणून मीं भोसल्यांचे वेरूळचे उपाध्ये यांजकडची माहिती मिळवि-ण्यांचा प्रयत्न केला पण तो सिद्धीस गेला नाहीं. रा. शंकर श्रीकृष्ण देव यांना या विषयाबद्दल जी माहिती मिळाली त्यांनीं ती रामदास–रामदासी व. ६ अं. ६१–६२ यांत छापिली आहे. त्यांतहि बाबाजीपासून पुढें बरोबर वंशावळ दिली आहे. बाबाजीपूर्वी १५।२० नांवें दिलीं आहेत; पण त्यांचा संबंध बाबाजीशीं काय होता हें दाखविलें नाहीं. ती कदाचित् एखाद्या स्वतंत्र शाखेची मंडळी असेल. हें गूढ अद्याप उकललें नाहीं, तेव्हां बाबाजीच्या पूर्वी-च्या नांवांची चर्चा ज्यास्त करणें अशक्य आहे.

तंजावरच्या शिलालेखांत बाबाजीच्या पूर्वजांचीं नांवें देतांना प्रारंभच एको-जीपासून केला आहे. या शिलालेख–लेखकास पूर्वीची निश्चित माहिती नव्हती असें दिसतें. तंजावरचा वंश एकोजीपासून फिरतो. हा शहाजीचा धाकटा पुत्र असून शिवाजी महाराजांचा धाकटा भाऊ होता. शिवाजीचा आणि याचा भाऊबंदकीचा तंटा झाला होता हें प्रसिद्ध आहे. लेखकानें एकोजी वंशावळींत पूर्वीचे तीन घातले आहेत; आणि एकोजी पहिला हाच वंशस्थापक लक्ष्मण सिंह याच्या जागीं दिला आहे. महाराष्ट्रांतील कित्येक मंडळी कोठेंच अडत नाहींत हा त्यांचा गुण आहे; पण इतर वंशावळींच्या तुलनेनें ही वंशावळ ध्यानांत घेण्यासारखी नाहीं, एवढी गोष्ट नमूद करून आपण दुसऱ्या वंशावळींचा यापुढें विचार करूं.

वं. १ व २ यांचा प्रारंभ लक्ष्मणसिंह राणा यांजपासून झाला आहे. त्याचा धाकटा मुलगा सजनसिंह हा अधिकारी नसल्यानें इ. १३१० मध्यें सोंदवाड्यांत

आला असा उल्लेख आहे. अनधिकारी रजपुत्र देशान्तर करून राज्य स्थापीत, त्याप्रमाणें सोंदवाडा म्हणजे माळव्याचा एक भाग ज्यांत सोंदिये नांवाची लुटारू जात राहते तेथें तो गेला. त्याचा पुत्र दिलीप दोहोंतहि एकच आहे. याचा नातू भोसाजी दोहोंत असून त्याचा पुत्र देवराजजी इ. स. १४१५ त दक्षिणेंत आला असा शेरा दिलेला आहे. ही गोष्ट संभवनीय दिसते. दुर्गादेवीकृत दुष्काळ महाराष्ट्रांत इ. स. १३९६ ते १४०८ पर्यंत होता. त्यावेळीं नर्मदेपासून दक्षिणेस कृष्णेपर्यंत बहामनी राज्याचा अम्मल असून बेदर ही राजधानी होती. हजारो गांव उजाड होऊन पाटिलक्या नष्ट झालेल्या होत्या, अशा वेळीं पाटिलकी राज्य संपादन करून कित्येक रजपूत कुळें महाराष्ट्रांत येऊन राहिलीं असावीं. उत्तरेकडील प्रांताचें मुख्य ठिकाण दौलताबाद—देवगिरी हें होतें, याच्याच आसपास देवराज व त्यांचे वंशज येऊन राहिले आणि म्हणूनच भोसल्यांची प्रथम वसति वेरूळ प्रांतांत झाली, असा निश्चय होतो.

येथें भोसले या उपनांवाच्या व्युत्पत्तीचा विचार करूं. मराठींत 'ला' प्रत्यय 'चा' या अर्थी कित्येक शब्दांत दिसतो. 'देसला' शब्द देशाचा अधिकारी या अर्थानें प्राचीन लेखांत आढळतो. गोखला म्हणजे गोखचा राहणार असा अर्थ होईल. तेव्हां सन्मानार्थानें देसले, गोखले असें उपनांव अनेकवचनीं आढळतें. देवराजजी जेव्हां दक्षिणेंत आला तेव्हां त्याच्या कुळाला भोसले हें उपनांव चालू होणें शक्य आहे. पण भोसला म्हणजे 'भोसाजीचा' पुत्र अगर वंशज असा अर्थ घ्यावयाचा किंवा स्थलवाची भोस शब्द घ्यावयाचा? के. राजवाडे यांनीं भोसगांवचा अशा अर्थानें हा शब्द व्युत्पादिला आहे. हैदराबादेंत पैठण प्रांतांत भोस, भोसें, भोसगांव अशीं तीन गांवें आहेत. पण जोंपर्यंत त्या गांवांची पाटलकी भोसल्यांकडे आहे किंवा होती हें सिद्ध झालें नाहीं तोंपर्यंत ही ग्राममूलक व्युत्पत्ति निश्चयात्मक ठरत नाहीं. याबद्दलहि मीं शोध चालविला आहे. भोसल्यांच्या कुळाची जास्त माहिती वेरूळ प्रांतांत पुष्कळ चौकशी केल्याशिवाय लागावयाची नाहीं. या प्रान्तीं मुसलमान झालेले कित्येक भोसले आहेत असें एक टिपण न्यायमूर्ति केशवराव जज्ज हैद्राबाद, यांनीं इतिहास-मंडळासमोर वाचलें होतें. असो; भोसगांवची ही व्युत्पत्ति सिद्ध न झाली तरी भोसाजीचे वंशज अशी व्युत्पत्ति लागेल. पण भोसाजी हें नांव काल्पनिक भोसले शब्दावरून बनविलें आहे किंवा हें नांव खरोखरच रजपूत लोकांत आहे हेंहि पाहिलें पाहिजे. या विषयींहि मीं चौकशी सुरू केली आहे, परंतु अद्याप उत्तर मिळालेलें नाहीं.

देवराजजीनंतरच्या चारपांच पिढ्यांच्या नांवांत बराच फेरबदल दिसतो. पण वरवटजी किंवा बरडजी हें नांव तिन्ही वंशावळींत दिसतें. याचेंच नांव खेळकर्ण अथवा खेलोजी असें दिलेलें आहे. वरवटजीचा पुत्र नागोजी जिंतीकर वंशावळींत दिलेला आहे आणि इतर वंशावळींत जनकोजी व जयकर्ण असा दिला आहे. माझ्या समजुतीनें नागोजी हे नांव जास्त संभवनीय दिसतें. कारण हें नांव वेरूळच्या उपध्यायापासून मिळविलेल्या यादींत आलें आहे ( रामदास–रामदासी सदर ). नागोजी हें नांव इतर कोणत्याहि भोसल्यांच्या वंशावळींत नाहीं हें खरें; याचा उलगडा आपल्यास आणखी पुराव्या-नंतर होईल. नागोजीचा पुत्र व्यंकोजी हाच बाबाजीचा बाप आहे पण इतर वंशावळींत संभाजी ( १ व २, ) आणि तंजावर वंशावळींत परसोजी दिला आहे. तेव्हां बाबाजीच्या बापाचें नांव काय हा महत्त्वाचा प्रश्न आपल्यापुढें आहे. बाबाजीच्या बापाचें नांव मालजी ( मालोजीचें पूर्वरूप ) असावें असा संशय एक नक्कल खरीदपत्र जिंतीकर भोसले यांनीं मला दिलें (तें पुढें उल्लिखित होणार आहे) यावरून वाटतो. हें खरेदीपत्र श. १४७१ चें असून विश्वसनीय दिसतें. बाबाजी राजे भोसले यांचा एक कागद ले. नं. ३६७ राजवाडे खंड १५ मध्यें शके १५१९ चा प्रसिद्ध झाला आहे. तेव्हां श. १४७१ त खरेदी घेणार मालजी हा बाबाजीपुत्र मालोजी नव्हे. बाबाजीच्या पूर्वजांच्या वंशवृक्षांत मालोजीचें नांव आढळत नाहीं. शिवाय दुसऱ्या शाखेंतहि असें नांव असणें शक्य आहे. एकंदरींत बाबाजीच्या बापाचें नांव संभाजी, परसोजी, व्यंकोजी, व मालजी (दिवांनीं वेरूळच्या उपाध्याकडून मिळविलेल्या नांवांत मालजी नांव बाबाजीपूर्वींच आढळतें ) असें चार प्रकारें दिलेलें आढळतें. तेव्हां निश्चित माहिती वंशावळीकारांस नाहीं असेंच म्हणावें लागतें. बाबाजीपासून वंश प्रसिद्ध व ज्ञात आहे. (अर्थात् श. १५१९ इ. स. १६०० पासून.)

यानंतर या कुळाविषयींची इतर माहिती नमूद करूं. ही माहिती नवीन सांपडलेल्या ९६ कुळींच्या यादीवरून व इतर पुराव्यावरून देतां येते. भोसल्यांचें कुळ सूर्यवंशी आहे. शिसोदेहि सूर्यवंशी म्हणून प्रसिद्ध आहेत. अलीकडच्या यादींत कोठें ब्रह्मवंश किंवा सोमवंश ( जिंतीकर वंशवृक्ष ) दिलेला आहे, तो केवळ चुकीचा होय. या कुळाचा वेद सामवेद दिला आहे. भोसल्यांची गादी ( वं. १ व २ मध्यें ) चितोड दिली आहे तीच योग्य आहे. अलीकडील (३ व ४) यादींत उदेपूर दिलेली असते ती अर्वाचीन आहे. मूळ

शिसोद्यांची गादी चितोडगडच होय. पूर्वीच्या दोन याद्यांत यांचें गोत्र कौशिक दिलें आहे. हें गोत्र मूळ शिसोद्यांचें नव्हे. महाराष्ट्रांत विज्ञानेश्वराच्या मिताक्षरे-प्रमाणें ( इ. ११०० सु. ) क्षत्रियांना गोत्र नाहीं, त्यांनीं पुरोहितांचें गोत्र घ्यावें असा सिद्धांत चुकीचा प्रचलित झाला. त्यामुळें भोसले महाराष्ट्रांत येऊन राहिले, तेव्हां त्यांचे प्रथम पुरोहित कौशिक गोत्राचे असावे आणि म्हणून हें गोत्र चालू झालें. तें शाहूमहाराजांच्या लेखांतहि नमूद आहे. भोसल्यांचे पुरोहित राजोपाध्ये हे मागूनच ठरतात, कारण त्यांचे गोत्र कौशिक नाहीं. भीमथडी प्रांतांत भोसल्यांची वस्ती झाली त्यावेळचे हे उपाध्ये असावेत. कारण पेडगांवा-जवळच अरवी हा राजोपाध्यांचा मूळ गांव भीमातीरीं आहे. तेथें मुद्गलेश्वराचें प्रसिद्ध स्थान आहे हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे.

भोसल्यांच्या ज्या उपकुळी जुन्या दोन याद्यांत दिल्या आहेत त्यांत शिर-साट हें नांव आलें आहे. रुक्मिणी—स्वयंवरांत ' शिरसाट मोरे ' वगैरे नांवें मराठ्यांच्या राजनामावळींत आलीं आहेत, परंतु तेथें भोसल्याचें नाव आलेलें नाहीं, यावरून पूर्वी मला अशी शंका उत्पन्न झाली होती कीं श. १४०० पर्यंत भोसले दक्षिणेंत आलेले नव्हते. परंतु शिरसाट हे भोसलेच असल्यानें ही शंका राहत नाहीं. शिरसाटांचें उपकुळ त्यावेळीं विशेष प्रसिद्ध असावें इतकेंच सिद्ध होतें.

भोसल्यांचा दक्षिणेंत कसा प्रसार झाला हें पाहूं. मूळ वसति त्यांची इ. स. १४०८ सुमारें दौलताबाद ( देवगिरी ) प्रान्तांत झाली असें वर दाखविलें आहे. यावेळीं बेदरास बादशाही होती आणि देवगिरीस सुभेदारी होती. पुढें महंमद गावान एक कर्तृत्ववान् कारभारी झाला. त्यानें केलेले प्रान्ताचे सुभेदार स्वतंत्र होऊन देवगिरी येथें उत्तरमहाराष्ट्रांत निजामशाही इ. स. १४९८ ( श. १४२० ) चे सुमारें स्थापन झाली. या निजामशाहीच्या अमलांत भोसले सरदार पुढें आले व विशेषतः भीमथडीच्या प्रान्तांत म्हणजे आदिलशाहीच्या सरहद्दीवर हे भोसले अनेक ठिकाणचे मोकादम ( पाटील ) झाले. जिंतीकर भोसल्यांनीं ( जिंती भीमाकांठींच आहे ) जी खरेदीपत्राची नक्कल दिली आहे, ती या सोबत छापली आहे; तीवरून असें दिसतें कीं **मालजी** राजे भोसले हे जिंतीचे मुकादम पूर्वीच होते. त्यांनीं मुकादमी काकडे याजपासून अर्धी खरेदी घेतली होती. पुढें काकड्यांच्या भाउबंदांनीं तक्रार करून एका काकड्यास ठारहि मारलें, तेव्हां बाकीची सर्व मोकादमी १२०० होनांस विकून त्याचा लोक गांव सोडून निघून

गेला. यावरून मराठे लोक गांवच्या पाटिलकीबद्दल कसे प्राण देत हें दिसतें. भोसल्यांना वेरूळ प्रान्तीं पाटिलक्या दुर्गादेवी दुष्काळानंतर सहज मिळाल्या पण भिमथडी प्रांतांत त्यांनीं पैशाच्या आणि फौजबंदीच्या जोरावर निजामशाही आमदानींत मिळविल्या. कित्येक मुकास सरकारांतून फौजेच्या खर्चास मिळालेले दिसतात. राजवाडे खण्ड १५ ले. ३६८ मध्यें मालोजी व विठोजी यांस सरगुऱ्हो म्हटलें असून कित्येक गांव 'दरबजे मुकासा' दिले असल्याचा दाखला आहे. सरगुऱ्हो हा शब्द "गिरोह" म्हणजे जमाव त्याचा मुख्य अशा अर्थाचा असून सरकारी फौजेचा अधिकारी अशा अर्थाचा वाचक नाहीं. पाश्चात्य देशांतील Feudal System किंवा इकडील सरंजामी व्यवस्थेनुरूप आपली फौज ठेवून सरकारी नोकरी करणाऱ्या लोकांपैकीं मालोजी भोसले होता व तिच्या खर्चाकरितां हे गांव तैनात केले होते. हीं गांवें नगर जिल्ह्यांतील व हल्लींच्या मोगलाईंतील म्हणजे पूर्वीच्या निजामशाहींतीलच आहेत. ले. ३६८, ३६९, ३७०, ३७१ खंड १५ यांत दिलेलीं पेठण तालुक्यांतील व अहमदाबाद कसबे आधारसूल परगने कन्नरड देखील जातेगांव (किल्ले व कोट सुद्धां) गोडगांव (गाऊ) वगैरे आहेत. यावरून निजामशाहींत मराठे सरदारांचा किती मान होता व त्यांतहि मालोजी भोसले याचा किती होता ही गोष्ट व्यक्त होते. हल्लींहि भोसल्यांचीं कित्येक गांवें जिंती, शेंडगांव वगैरे या प्रांतांत आहेत.

मुकादमी खरीदपत्राची नक्कल.

| श. १४७१ आश्विन शु. १०
| इ. १५४९ आक्टो. १०

श्री नक्कल ता.

खरीदपत श्री सके १४७१ सोम नाम संवछर अस्वीन शुा विजया दसमी वार मंगळवार ते दिवसी राजश्री मालजी राजे भोसले मोकदम कसबे जिंती यांसी कमाजी काकडे बिन माव पाा काकडे मोकदम कसबे मार पाा कदवली ता सुा खमसईन तिसा मया कारणे खरीदपत लेहून दिलें येसी जे आपले वडील माव पाटील याणी तुम्हास निमी मोकदमी नाव नागर मोहरप दिधली होती त्यावर खेलोजी काकडे याचे (लेक) कान्होजी काकडे व पाच सात काकडे यानी उत्पाद करून बदमारतीनें आपले वडील माव पाटील मारिले त्यावरी आपणासी दिसोन आले की हे आपणास वाचों देत नाहींत. याकरितां जरूर जाणोन आपण तम्हापासीं येऊन आपले खुशीनें रजावंदीनें

खशखरिदी पेशजी निमे व हली (आपण दिधली नि) मी यसी दरोबस्त मोकदमी नाव नांगर व कुल बाब हक दक मान मानूक कस्बे मारीची तुम्हास दिली असे त्यास तुम्हापासोन आपण खुशरजा होन १२०० बारशें रास घेतले व घोडी एक घेतली आणि सदरहू खरीदपत तुम्हास लेहून दिल्ही असे तुझी कस्बे मारी घर वाडा बाधोन मोकदमी लेकराचे लेकरी खाणे आपण खुशरजा वतन दिल्हे असे त्यास कोणी आपले भाऊबंद काकेले नोदीगर गोष्टी सांगेल तरी ती बातिल असे त्यास कुलस्वामीची व पेशजाची अणिगा असे व बारागसीस गोहत्या व ब्रह्महत्या केल्याची आण असे हे खरीदपत लिहून दिले सई दरमाल × × लती वली आसलल्या यकनतीरा

नि॥ गणेश विनायक कुलकर्णी

साक्ष बाई काकटी कसबे मार महादजी शटी बिन दग शट भोसले को मार
नरसोजी सोवजी ... चोगले लखमोजी बिन रामजी सर्जेराव चोगुले
को मार

आने भतजी काकडे चोगुले लखम नाक बिन क...नाक महार
को मार को मार

— —

# शिवाजी महाराजांचा जन्म व बालपण

[ विविधवृत्त, दिवाळीचा अंक १९२६ ]

निरनिराळ्या साधनांवरून मिळालेल्या माहितीवरून शिवाजी महाराजांच्या जन्माची व त्यांच्या बालपणाची जी हकीकत लोकांत प्रसिद्ध आहे, ती सर्व चुकीची आहे असें नवीन सापडलेल्या शिवभारत ग्रंथावरून, सुदैवानें किंवा दुर्दैवानें, निश्चित झाल्यासारखें दिसतें. हा ग्रंथ कल्याणचे संशोधक रा. रा. सदाशिव महादेव दिवेकर यांनी तंजावरच्या संस्कृत लायब्ररीच्या प्रसिद्ध झालेल्या कॅटलॉगावरून पाहून तंजावराहून नक्कल करून आणला असून, तो मराठी अर्थासह छापून प्रसिद्ध केला आहे. हा ग्रंथ शिवाजी महाराजांनीं आज्ञा केल्यावरून त्यांच्या दरबारांतील कवि परमानंद यानें त्यांच्याच हयातींत तयार केला, व तो काशींतील पंडितांसमोर प्रथम वाचला गेला, असें त्यांत प्रारंभीं म्हटलें आहे. याशिवाय तंजावर येथील बृहदीश्वराच्या देवळांतील शिलालेख आणि जेधे शकावली या दोन लेखांतील हकीगतीशीं या शिवभारतांतील हकीगतीचा चांगलाच मेळ बसत असल्यानें ही नवीन समकालीन हकीगत बखरींतील हकीगतीपेक्षां अधिक विश्वसनीय आहे, किंबहुना मुसलमानांनीं लिहिलेल्या समकालीन ग्रंथांतील हकीगतीशी तिचा पूर्ण मेळ बसत असल्यानें या बाबतींत प्रचलित असलेल्या समजुती पार बदलून टाकल्या पाहिजेत, असें आम्हांस वाटतें. ही नवीन हकीकत काय आहे आणि ती अधिक विश्वासार्ह कां आहे, याचें सविस्तर विवेचन या लेखांत करण्याचें आम्ही योजलें आहे.

हे तीन लेख निरनिराळ्या ठिकाणीं, निरनिराळ्या व्यक्तींनीं पुढें आणलेले असून त्यांच्या खरेपणाविषयीं यत्किंचितहि शंकेस जागा नाहीं. आणि ते समकालीन असल्यानें त्यांजविषयीं ज्यास्त आदर ऐतिहासिक दृष्टीनें साहजिकच दाखविला पाहिजे. यांतील सर्वांत जुना लेख म्हणजे शिवभारत. याच्या नांवाप्रमाणेंच यांत कवीनें महाभारताच्या तऱ्हेवर विस्तृत काव्यमय वर्णन केलें आहे. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाच्या पूर्वीं हा ग्रंथ तयार झाला असावा. कारण त्याची हकीगत ह्यांत नाहीं. हा कवि उत्तम संस्कृतज्ञ असून विशाल प्रतिभेचा दिसतो. यातील वर्णनें व भाषणें काल्पनिक असलीं, तरी त्यांत इतका

तपशील भरला आहे कीं, कोणताहि आधुनिक कवि असली बनावट हकीकत लिहून, शिवाजी महाराजांच्या वेळीं व त्यांच्या आज्ञेनें हें लिहिलें, असें भासवूं शकणार नाहीं. उदाहरणार्थ, लढायांतील वीरांच्या युद्धाचीं वर्णनें अनैतिहासिक महाभारताच्या धर्तीवर कोणीहि देऊं शकेल; पण दोन्ही बाजूंकडील योद्धयांचीं नांवें मागाहून बनावट करणाऱ्या मनुष्यास खरीं देतां येणार नाहींत. निरनिराळी भाषणें किंवा राजनीतीवरील व्याख्यानें बनावट करितां येतील, पण वृत्तांची खरी माहिती असल्याशिवाय त्यांचे उल्लेख करितां येणार नाहींत. तेव्हां हा लेख काव्यमय असला, तरी समकालीन लेखकांनें लिहिलेल्या वृत्तांताइतकी ऐतिहासिक किंमत त्यास निःसंशय दिली पाहिजे. शिवाजी महाराजाच्या दरबारांत कवींद्र परमानंद हा राजकवि होता असा उल्लेख, राजापूर येथें सांपडलेला व इतिहास–मंडळाचा सातवा वृत्तांत, पान २९५ वर छापलेला एक संस्कृत लेख आहे त्यांत आला आहे. ज्याप्रमाणें शहाजी राजाच्या दरबारांत जयराम कवि होता व त्यानें शहाजीच्या चरित्रावर लिहिलेलें 'राधामाधवचंपू काव्य' प्रसिद्ध झालें आहे, त्याच प्रमाणें शिवाजी महाराजाच्या दरबारांतील कवींद्र परमानंदानें लिहिलेलें शिवभारत काव्य मिळणें असंभवनीय नाहीं; आणि शिवाजी महाराजांचे बंधु व्यंकोजी यांनीं तंजावर येथें स्थापिलेल्या राजकुळाच्या संग्रहीं तें काव्य असणेंहि साहजिक आहे. या काव्याचा उल्लेख तंजावरच्या लायब्ररीच्या कॅटलॉगमध्यें पुर्वीपासून आहे हे प्रारंभीं सांगितलेंच आहे.

हें काव्य सुमारें इ. स. १६७० त लिहिलेलें आम्ही मानतों. याचा पुढचा लेख म्हणजे जेधे शकावली. शिवाजीच्या व राजारामाच्या चरित्रांशीं अत्यन्त संबद्ध असलेल्या, पुण्याजवळील मावळांत 'कारी' येथें राहाणाऱ्या जेधे नामक मराठा कुळांत लिहिलेली ही शकावली अत्यंत विश्वसनीय आहे हें सांगावयास नको. यांत निरनिराळ्या मितींवर झालेल्या वृत्तांची नोंद केलेली आहे व या नोंदीचा प्रारंभ शके १५४० ( इ. स. १६१८ ) औरंगजेबाचा जन्म या वृत्तापासून केला असून, तिचा शेवट शके १६१९ ( इ. स. १६९७ ) मध्यें मोंगलांनीं राजारामानें आश्रय केलेल्या जिंजीच्या किल्ल्यास वेढा दिला या वृत्तानें झाला आहे. या नोंदी वेळोवेळी रीतसर केल्या असून जहागिरीतील सरकारी कागदांवरून त्या केल्या असाव्या. यांत शिवाजीच्या जन्माचा उल्लेख " फाल्गुन वद्य ३ शुक्रवार हस्तनक्षत्र घटि १८ पळे ३१ गंडयोग घटि ५ पळें

७, राजेश्री शिवाजी राजे शिवनेरी किल्ल्यावर जन्मले " अशा तपशिलानें केला आहे. या तपशिलावरून त्या काळीं प्रसिद्ध असलेली किंवा सरकारी रीतीनें मिळविलेली शिवाजी महाराजाची पत्रिका लेखकासमोर असावी असें दिसतें. या शकावलींतील मित्या ( जन्माच्या पांच मित्या यांत आहेत ) ऐतिहासिक पुराव्यावरून खऱ्या ठरल्या आहेत. तात्पर्य या लेखास समकालीन आणि सरकारी लेखाची किंमत आहे असें म्हणण्यास हरकत नाही. ही शकावली प्रथम के. टिळक यांनी जगापुढें आणली. याहीपेक्षां सरकारी लेख या नात्यानें बृहदीश्वर शिलालेखाची किंमत जास्त आहे. हा लेख प्रथम वि. का. राजवाडे यांनी लोकांच्या नजरेस आणिला आणि तंजावरचे वकील रा. सांबमूर्तिराव बी. एल्., यांनीं १९०७ इसवीमध्यें तो तंजावर येथें प्रसिद्ध केला. हा शिलालेख १८०३ इसवीमध्यें तंजावरच्या भोसले राजघराण्यांतील त्या वेळचे राजे शरीफजी यांच्या आज्ञेनें खोदविला गेला. तो महाराजांचे सेक्रेटरी यांनीं तयार केला असल्याचें लेखाच्या शेवटीं नमूद आहे. तंजावर दरबारांतील सरकारी कागदपत्रावरून तो तयार केला असला पाहिजे. या शिलालेखांतील प्रारंभीचा मजकूर शिवभारतात दिलेल्या हकीगतीशीं ततोतंत जुळतो हें पाहून आम्हांस आश्चर्य वाटलें. दोन्ही लेख एकाच आधारभूत कागदपत्रांवरून तयार केले असतील. बहुधा शिवाजी महाराजांच्या संबंधाचा मजकूर हा शिलालेख लिहिणाऱ्यानें खुद्द शिवभारतावरूनच घतला असेल, तरी सुद्धां या शिलालेखांत आणखी पुष्कळ मजकूर अनेक बाबींसंबंधानें असल्यानें शिवभारताशिवाय अन्य लेखहि या लेखकासमोर असले पाहिजेत. उदाहरणार्थ मालोजीच्या पूर्वीच्या बारा पिढ्यांचीं नांवें या शिलालेखांत दिलीं आहेत. शिवभारतांत फक्त मालोजीपासूनच सुरवात आहे. दुसरें, शिवभारतांत इंदापूर येथें आदिलशहाशीं झालेल्या लढाईंत मालोजी मारला गेला इतकेंच वर्णन आहे; पण शिलालेखांत मालोजीच्या विरुद्ध सैन्यांत कोल्हापूरचा राजा नेता होता अशी आणखी माहिती दिली आहे. या व इतर शिवभारताहून अधिक दिलेल्या माहितीच्या बाबी पाहिल्या असतां, शिलालेख लिहिणाराच्या समोर अन्य कागदपत्रहि असावेत असें निःसंशय ठरतें.

याशिवाय अजमीरचे सरकारी म्युझियमचे क्युरेटर रावबहादूर गौरीशंकर ओझा यांस सांपडलेली जोधपूर राज्यांतील प्रसिद्ध चंडू ज्योतिषी घराण्याच्या संग्रहांत असलेली शिवाजी महाराजांची पत्रिकाहि वरील लेखास अत्यंत मज-

चुती आणणारी आहे, हें सांगितलें पाहिजे. हा पत्रिका-संग्रह फार जुना म्हणजे संवत् १७७७ ( १७२० इ. ) इतका जुना, संग्रहकर्ता शिवराम याच्या मृत्यूपर्यंतचा असल्याचें ओझा यांनी ७ मार्च १९२६ च्या 'मराठ्यांत प्रसिद्ध केलें आहे. शिवरामाचा जन्म शिवाजी महाराजांच्या जन्मानंतर पांच वर्षांनींच झाला असून, शिवाजी महाराजांनंतर तो ४० वर्षांनी मरण पावला. अर्थात् तो त्यांचा समकालीन होता हें नमूद करण्यासारखें आहे.

या चार लेखांच्या वर दिलेल्या वर्णनांवरून व त्यांच्या सरकारी स्वरूपावरून असें साहजिक अनुमान निघतें कीं, त्यांत दिलेली शिवजन्माची मिति व हकीगत बखरीत दिलेल्या मिति व हकीगतीपेक्षां अधिक विश्वसनीय आहे' याशिवाय शिवभारत हा लेख सर्वांत जुना इ. स. १६७० चा आहे. तर सर्व बखरीत जुनी बखर सभासदाची असून ती इ. स. १६९४ मधील आहे, व तीत शिवजन्माची मिति व हकीगत मुळीच दिलेली नाही. पुढील बखरी याच्यानंतर शंभर दीडशें वर्षांनी लिहिलेल्या आहेत. तेव्हा लेखांच्या कालाच्या दृष्टीनें पाहतां शिवभारत व जेधे शकावली यांत दिलेली मिति व हकीगत जास्तच विश्वसनीय ठरते. यामुळें प्रश्न एवढाच उरतो की, शिवाजी महाराज व शहाजी राजे यांच्या चरित्रांच्या ऐतिहासिक स्वरूपाशी शिवभारताची हकीगत असंबद्ध आहे की काय ? या प्रश्नाचा विचार करणे म्हणजे शिवभारतांत दिलेलें व मुसलमानांनी लिहून ठेवलेल्या तवारिखांत आलेलें या कालचें ऐतिहासिक वृत्त निश्चित करणें होय. या वृत्ताला धरून ही नवी हकीगत आहे इतकेंच नव्हे, तर बखरीत दिलेल्या हकीगतीपेक्षां ती अधिक संभवनीय आहे असें आपल्यास पुढील विवेचनावरून दिसून येईल. यामुळें हल्लीं लोकांत मानलेली शिवजन्माची मिति व शिवाजी महाराजांच्या बालपणांतील पुष्कळ हकीगत खोटी ठरून त्या आपल्यास सोडून द्याव्या लागतील असें दुर्दैवानें प्राप्त होतें; पण त्यास नाइलाज आहे. बखरींतील पुष्कळ गोष्टी बखरकारांच्या कल्पनेंत नवीन उत्पन्न केलेल्या व अतिशयोक्तीच्या प्रेमानें बखरकारांनी नवीन बनविलेल्या असतात हे प्रत्येकास पटण्यासारखें आहे, यामुळें अशा गोष्टी त्याज्य ठरल्या तर कांही आश्चर्य नाही.

## शहाजी व जिजाबाई यांचें लग्न.

अशा काल्पनिक गोष्टींपैकी पहिली गोष्ट शहाजी व जिजाबाई यांच्या लग्नाची आहे. शहाजीची पहिली बायको जिजाबाई होती एवढेंच सभासदानें

लिहिलें आहे. पण शिवदिग्विजय बखरीत पुष्कळ काल्पनिक गोष्टी व अनवश्यक संस्कृत श्लोकांचे उतारे देऊन असें वर्णन केलें आहे कीं, शहाजीचा बाप मालोजी आणि जिजाबाईचा बाप जाधवराव यांच्यांत या लग्नासंबंधानें मोठा तंटा झाला. रंगपंचमीच्या दिवशी या दोघां मुलांस रंग खेळतांना पाहून ' हा जोडा चांगला शोभतो ' असें जाधवराव म्हणाला, तेव्हां हें लग्न ठरलें. पण जाधवरावांच्या बायकोनें मालोजी आपल्या बरोबरीचा नाहीं असा विरोध केल्यावरून जाधवराव मुलगी देईना. यामुळें हा तंटा निजामशहापर्यंत गेला, व त्यानें मालोजीस पंचहजारी सरदार बनवून कित्येक परगणे जाहगीर दिले आणि हें लग्न घडवून आणलें असें वर्णन आहे. पुढील बखरींत या गोष्टींत आणखी भर पडली. आणि निजामशहाचें लक्ष वेधण्यासाठीं मालोजीनें धरणें--स्वरूपाचे कित्येक अत्याचार केले, असें वर्णन आढळतें. शिवभारतांतील या संबंधाची हकीगत अगदींच निराळी आहे. आणि ती सरळ व साधी आहे. शहाजी पांच वर्षांचा असतां मालोजी वारला व पुढें कित्येक वर्षांनी शहाजी मोठा झाल्यावर जाधवरावानें त्यास योग्य वर समजून आपली मुलगी आनंदानें दिली, अशी शिवभारतांतील हकीगत आहे. ती अर्थात् जास्त विश्वसनीय आहे. संभाव्यतेचा विचार करितांहि शिवदिग्विजयांतील हकीगत असंभाव्य दिसते. मालोजी जरी जाधवरावाच्या बरोबरीचा सरदार नव्हता तरी तो विवाहसंबंधास योग्य असा मराठा सरदार होता यांत संशय नाहीं. त्याची बायको दीपाबाई ही फलटणच्या निंबाळकराची लेक होती, आणि निंबाळकर जाधवरावाइतकेच मोठे सरदार होते. तेव्हां जाधवरावाच्या बायकोस आपल्या मुलीस दीपाबाईच्या मुलास देण्यास हरकत वाटावी हें शक्य नाहीं. दुसरें मालोजी यास ' राजा ' ही पदवी होती, किंबहुना भोंसल्यांच्या घराण्यांत ही पदवी पूर्वींपासून असल्याचें दिसतें. मालोजी याचा बाप बाबाजी यास राजे ही पदवी असल्याचा दाखला मिळतो. ( राजवाडे खं. १५ यांतील लेखांक नंबर ३६७, शके १५१९ मार्गशीर्ष पाहा ). या दाखल्यांत असें वर्णन आहे कीं, बाबाजी यास नगर जिल्ह्यांतील परगणा पांडे—पेडगांव यांतील कसबा पेडगांव हा जाहगिरींत होता. ( भोसल्यांच्या ) राजोपाध्यायांच्या इतर लेखांवरूनहि ( खंड सदर--लेखांक ३७१; शके १५२८, व लेखांक ३७० पाहा ) मालोजीला चांभारगोंदे वगैरे आणखी जहागिऱ्या होत्या असें स्पष्ट आहे. तेव्हां मालोजी राजे या वेळीं सरदार होते यांत शंका नाहीं. तिसरें, मालोजी धनवान् होता

हेंही निर्विवाद आहे. कारण त्यानें शंभुमहादेव टेकडीवर एक मोठा तलाव बांधला; तसेंच वेरूळ येथील घृष्णेश्वराचें प्रचंड शिवालय बांधलें ही गोष्ट प्रसिद्ध आहे. तेव्हां कुलीन, श्रीमंत व सरदार अशा घराण्यांतील मुलास मुलगी देण्यास जाधव रावाच्या बायकोनें हरकत घेतली ही गोष्ट संभवनीय दिसत नाही.

## शिवाजी महाराजांचा जन्म

दुसरी कल्पित गोष्ट शिवाजी महाराजांच्या जन्माचीच आहे. या बाबी-संबंधानें शिवभारतांत दिलेली हकीकत बखरींत दिलेल्या हकीकतीपेक्षां अधिक साधी, संभवनीय आणि तत्कालीन इतिहासाला धरून आहे. सभासदांत या वृत्ताची मिति किंवा स्थळ दिलेलें नाहीं. त्यांत फक्त असें म्हटलें आहे कीं, जिजाबाईच्या पोटीं शिवाजी जन्मास आला, तेव्हां शहाजीस स्वप्नांत येऊन श्री शंभु म्हणाले, "मीच जन्मास आलों आहे. प्रख्यात कृत्यें करावयाचीं आहेत. बारा वर्षे मुलास जवळ ठेवणें, पुढें जाईल तिकडे जाऊं देणें. आटोप न करणें." पण ही साधी हकीकत पुढें अतिशयोक्तीनें वाढून शिवदिग्विजयांत तपशीलवार हकीकत दिली आहे. ती अशी:—"मोंगलांशी युद्धांत हार येऊन तोतया सुलतान व बेगम यांस त्यांच्या स्वाधीन करून शहाजी विजापूरच्या नोकरींत शिरला तेव्हां त्यास पूर्वीची जहागीर व आणखी कित्येक गांवें मिळालीं. या वेळीं ( म्हणजे शके १५४८ त ) जिजाबाईस बरोबर नेतां येईना. ती गर्भार असल्यामुळें तिला शिवनेरीच्या किल्ल्यावर दादोजी कोंडदेवापाशीं ठेवलें. त्याच्या मदतीस आणखी तीन विश्वासू कारकून बाळकृष्ण हणमंते, शंकराजी नीळकंठ आणि रघुनाथ बल्लाळ यांस पाठविलें." जिजाबाई शिवाजीच्या जन्माच्या वेळीं शिवनेरी किल्ल्यावर कशी होती हें दाखविण्याची मुख्य अडचण आहे. ती या बखरकारानें अशा अनैतिहासिक रीतीनें दूर केली. त्याच्या मतें शिवनेरीचा किल्ला या वेळीं शहाजीच्या ताब्यांत होता. तेथें दादाजी कोंडदेव त्याच्यातर्फे किल्लेदार होता; आणि हें वृत्त निजामशाही वांचविण्याकरितां मोंगलाशीं शहाजीनें शेवटचें युद्ध केलें त्यानंतर घडलें. पण हें म्हणणें इतिहासाला व्युत्क्रमरीतीनें मांडणें आहे. कारण त्याच्या मतें शिवाजीचा जन्म १६२७ इसवींत झाला असल्यानें त्याच्यापूर्वीं हें युद्ध न होतां वास्तविक शिवजन्मानंतर कित्येक वर्षांनीं म्हणजे १६३६ त झालें. १६३६ त शिवनेरीचा किल्ला शहाजीच्या ताब्यांत होता हें खरें. कारण मोंगल व आदिलशहा यांमध्यें जो तह झाला त्यांत एक

कलम असें आहे की, जोंपर्यंत शहाजी जुन्नर, त्रिंबक व इतर किल्ले त्याच्या ताब्यांत असलेले मोंगलाच्या स्वाधीन करणार नाही, तोंपर्यंत शहाजीस विजापूरच्या नोकरीत घेऊं नये ( किन्केड व पारसनीस भा. १ पा. १२२ वर हा तह दिला आहे ). पण शिवाजीचा जन्म जेव्हां झाला—मग तो १६२७ त असो किंवा १६३० त असो, तेव्हा जुन्नर व तेथील किल्ला शिवनेरी शहाजीच्या ताब्यांत नव्हता, आणि निजामशाहीचें राज्य त्या वेळीं शाबूत होतें.

यानंतरच्या सर्व बखरी या व्यत्यस्त केलेल्या वृत्ताचीच री ओढतात. ९१ कलमी बखर शके १७०२ म्हणजे इ. स. १७८० त लिहिलेली असून त्यांत हीच हकिकत आणखी वेडसर भर घालून दिलेली आहे. त्याचा सारांश असा कीं, शहाजी माहुलीहून रात्री जाधवरावांच्या फौजेची फळी फाडून पळाला, आणि विजापुराकडे आपली गर्भवती स्त्री जिजाबाई आणि पुत्र संभाजी यासह चालला. त्या वेळीं जाधवरावानें पाठलाग केला. जिजाबाई गर्भार अधिक दिवसांची असल्यानें पळाबरोबर चालेना, तेव्हां शहाजीनें 'तुझा बाप माझ्या पाठीस लागला आहे, असें म्हणून तिला निर्दयतेनें टाकून दिलें. लखुजी जाधवाच्या ती हातीं पडली तेव्हां मुसलमानांपासून तिचा बचाव करा असें लोकांनी त्यास समजाविल्यानें शहाजीच्या ताब्यांत असलेल्या शिवनेरी किल्ल्यावर तिला जाधवानें पोहोंचविलें. " तेथें शके १५४९ क्षयसंवत्सर वैशाख शुद्ध ५ सोमवार या दिवशीं शिवाजी महाराज जन्मास आले. "

राजवाडे बखर ( श. १७०४ स. १७८२ मध्यें सवाई माधवरावांकरितां लिहिलेली ) हीच वेडसर हकीकत देते. मल्हारराव चिटणीस यानें लिहिलेल्या सप्तप्रकरणात्मक शिवचरित्रांतहि हीच चुकीची हकीकत असून शहाजी विजापुराकडे माहुली सोडून पळत जात असता जाधवरावानें पाठलाग केला असें म्हणून हें वृत्त १५४८ शके ( १६२६ इसवी ). मध्यें घातलें आहे; पण यांत शहाजीस भर्त्याच्या नात्याच्या कर्तव्यास जागृत ठेऊन अधिक सदय दाखविलें आहे. कारण त्यानें स्वतःच आपल्या गर्भार बायकोस शिवनेरी किल्ल्यावर चार मंत्री बरोबर देऊन ( बाळकृष्णपंत हणमंते, शंकराजी नीलकंठ, सोनाजीपंत आणि रघुनाथ बल्लाळ कोरडे ) सुरक्षिततेसाठीं ठेविलें असें वर्णन करून, शिवनेरी किल्ल्यावर **शके १५४९ प्रभव संवत्सर वैशाख शुद्ध २ गुरुवार** या

दिवशी शिवाजीचा जन्म झाला असें सांगितलें आहे. मराठी साम्राज्याची छोटी बखर शके १७३९ (इ. १८१७) यांत लिहिलेली, जिजाबाईस नवऱ्यानें निर्दयतेनें टाकलें हीच हकीकत देत, व प्रतिनिधि बखर श. १७६५ इ. स. १८४४ यांत लिहिलेली असून तिचेंहि तेंच सांगणें आहे.

शिवाजीप्रताप श. १७७१ म्हणजे इ. स. १८२९ मध्यें लिहिलेला याहूनहि अधिक असंभवनीय पण काव्ययुक्त वृत्तांत देतो. त्यांत शहाजी माहुलीहून पळाल्याचा वृत्तांत नाहीं. पण जाधवराव व मलिकंबर (हा यापूर्वींच मेला होता) यांत युद्ध झालें अशी सुरुवात करून मलिकंबराचा पराभव झाला, त्याचा साथीदार शहाजी याचा जाधवरावानें पाठलाग केला. जिजाबाई गर्भार असून पळाबरोबर आहे असें जाधवरावास माहित झाल्यानें त्यानें फक्त शहाजीचाच पाठलाग करण्याचा हुकूम दिला. पुढें बापलेकींची गांठ पडली तेव्हां आपण दोघ असे शत्रु झालों या दुर्दैवाबद्दल दोघांनीं शोक केला, व जिजाबाईच्या विनंतीवरून जाधवरावानें तिला शिवनेरी किल्ल्यावर पोहोंचवलें. अशी ही चमत्कारिक हकीकत आहे. शेवटची बखर म्हणजे शेडगांवकराची ती शके १७७६ इसवी १८५४ यांत लिहिलेली असून तींत वेळ व वृत्त यांची केवळ गल्लत केलेली आहे. जाधवरावानें बादशाही बेगम व तिचा मुलगा यांस आपल्या कबजांत घेऊन दौलताबादेस येऊन त्यांच्या नांवानें राज्य चालविलें. पण शेवटीं त्यानें व इतर प्रधानांनीं निजामशाहीचा नाश करण्याची मसलत करून औरंगजेबास बोलाविलें आणि त्याच्या स्वाधीन राज्य केलें. शहाजीवर महमदशहाची मर्जी होती. तो १५४९ त त्याच्याकडे होता. त्याची बायको शिवनेरी किल्ल्यावर होती. तेथें शिवाजी **शके १५४९ प्रभव संवत्सर वैशाख शु. ३ शनिवार रोहिणी नक्षत्र व कर्क लग्न** या समयावर जन्मला. शिवाजी सातव्या महिन्यांत जन्मला "कारण खुद्द शंभु जन्मास आल्यानें ते फार दिवस उदरांत राहिले नाहींत."

वर निरनिराळ्या बखरींतून जे उतारे दिले आहेत त्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं त्यांत दिलेलीं वृत्तें व त्यांच्या मित्या ह्यांत अत्यंत गोंधळ केलेला आहे. जिजाबाई शिवनेरीवर कशी होती याचें खरें कारण बखरकारांस दाखवितां आलें नाही. शिवभारतांत या वृत्ताची जी हकीकत दिली आहे ती त्या कालाच्या इतिहासास धरून आहे, व ती सरळ व संभवनीय आहे. ती अशी:—

"अंबराचा पुत्र फतेखां याशीं कांहीं बेबनांव होऊन शहाजीनें निजाम शहाची नोकरी सोडली आणि तो आदिलशहाकडे गेला. पण निजामशाहीवर मोंगलांनी हल्ला केल्यामुळें त्यास फत्तेखानानें परत बोलाविलें. या वेळीं शिवनेरी किल्ल्यावर निजामशाहीचा एक विश्वासु नोकर विश्वासराव अधिकारी होता. त्यानें आपली मुलगी शहाजीचा पुत्र संभाजी यास दिली. हें लग्न किल्ल्यावर झालें. नंतर आपली गर्भार बायको किल्ल्यावर ठेऊन मोंगलातर्फे लढणाऱ्या दर्याखानावर स्वारी करण्यास शहाजी गेला. ही गोष्ट शके १५५१ फाल्गुन किंवा माघ ( इ. स. १६३० फेब्रुआरी ) यांत घडली. शहाजी गेल्यानंतर शिवनेरी किल्ल्यांत शिवाजीचा जन्म फाल्गुन वद्य तृतीयेस झाला. निजामशाहीचा अन्त यानंतर बऱ्याच कालानें झाला. तेव्हां शहाजीनें जुन्नर शिवनेरीसह आपल्या ताब्यांत घेऊन स्वतःकरितां पण वरकरणी निजामशाहीच्या एका अल्पवयी वारसाच्या नांवानें पुनः राज्याची स्थापना केली. या वेळीं ९६ कुळींचे मराठे सरदार त्यास मिळाले (निजामशाहीकरितां). या राज्यासाठीं शहाजी मोंगलाशीं तीन वर्षे लढला. पण शेवटीं श्रीशंभूनें स्वप्नांत आज्ञा केल्यावरून त्यानें हा प्रयत्न सोडून दिला. सन १८०३ मध्यें खोदलेल्या बृहदीश्वरशिलालेखांतहि अशीच हकीगत दिली आहे. अर्थात् ही एक नवीन बनविलेली गोष्ट नाहीं हें निःसंशय आहे; सन १८०३ इतकी ती खात्रीनें जुनी आहे, आणि इ. स. १६७० शिवभारताचा लेखनकाल इतकीहि ती जुनी असावी. मुसलमानी इतिहासकारांनीं समकालीन लेखांत लिहून ठेवलेल्या एकंदर वृत्तांताशीं ती कशी जुळते हें आतां आपण पाहूं.

मराठी व मुसलमानी सर्व लेखकाच्या लिहिण्यावरून शहाजी शेवटचा व कायमचा विजापूरचा नोकर शके १५५८ (स. १६३६) यांत झाला. ( सरकार—मॉडर्न रिव्ह्यू , १९१७ पान २१७ ). शहाजी स्वतंत्रतेकरितां तीन वर्षें लढत होता असें शिवभारतांत म्हटलें आहे, आणि सरकारनेंहि वरील लेखांत शहाजीनें मूर्तिजा निजामशहा गादीवर बसविला याचा काळ हाच म्हणजे सप्टेंबर १६३३ दिला आहे. शहाजीनें शेवटीं इ. स. १६३६ त या मूर्तिजास माहुली येथें मोंगलांच्या स्वाधीन केलें. ( स्वप्नांत शंभूनें सांगितल्यावरून नव्हे तर ) माहुलीच्या किल्ल्यास मोंगलांच्या वेढ्याचा जोर झाला आणि निजामशाही बेगम— मूर्तिजाची आई— इनें त्यास सोडलें म्हणून मूर्तिजास स्वाधीन केलें हें प्रसिद्ध आहे. हा शहाजीचा लढा ( १६३३पासून

१६३६ पर्यंत चाललेला ) शिवाजीच्या जन्मापूर्वी झाला असें बखरकार सांगतात, आणि शिवाजीच्या जन्माची मिति १६२७ इ. स. देतात. अर्थात् सर्व वृत्तांताचा ते गोंधळ करितात. याशिवाय १६३६ त झालेल्या वेढयाच्या वेळीं ते चुकीनें जाधवरावाचें नांव आणितात. पण जाधवराव यापूर्वीच म्हणजे १६३० इसवीच्या मध्यास मारला गेला होता ( सरकार ). शिवभारतामध्यें जाधवरावाचा खुन योग्य वेळीं म्हणजे शिवाजीच्या जन्मानंतर सांगितलेला आहे. या वेळीं शहाजी आणि जाधवराव दोघेहि निजामशाहीच्या नोकरीत तिच्या बचावासाठी आले होते. जेधे शकावलींत जाधवरावाचा खून शके १५५१ तील शिवाजीच्या जन्माच्या पूर्वी सांगितलेला दिसतो. पण ही नोंद श. १५५१ फाल्गुनांतील शिवाजीच्या जन्माच्या नोंदीनंतर केलेली आहे. अर्थात् तिची मिति श्रावण असल्यानें ती पुढील म्हणजे १५५२ शकांतली मानली पाहिजे. म्हणजे हा खुन मुसलमानी आधारावरून सरकारनें ठरविल्याप्रमाणें इ. स. १६३० च्या मध्यावर पडतो. या वर्षीचा ( म्हणजे श. १५५२ चा ) दुष्काळ जेधे शकावली आणि शिवभारत या दोहोंतहि सांगितला आहे.

आतां १६३० च्या मध्याच्या पूर्वीचा म्हणजे शिवजन्माच्या अगोदरचा वृत्तांताचा क्रम शिवभारतांत योग्य रीतीनें कसा वर्णिला आहे हें आपण पाहूं. यांत प्रथम मलिकंबरचा मृत्यु सांगितला आहे. नंतर इब्राहिम अदिलशहा याचा मृत्यु व त्याचा पुत्र महंमद आदिलशहा याचें राज्यारोहण सांगितलें आहे. आपल्यास निश्चय आहे की, या गोष्टी इ. स. १६२६ व १६२७ त घडल्या. ( ग्रँन्टडफची नवीन आवृत्ति भाग १ पान ७९ वरील टिप्पणीत आदिलशहांचा मृत्यु विजापूर येथील एका शिलालेखावरून १६२७ इ. निश्चित होतो ). १६२७ पासून १६३३ त निजामशाही पडली तेथपर्यंत, जाधवराव व शहाजी दोघेहि दोनतीनदां निजामशाहीच्या नोकरीतून गेले व परत आले. पण जाधवराव मोंगलांतर्फे लढत असतां १६२७ इसवींत शहाजीवर हल्ला करील असा प्रसंग दिसत नाहीं. शहाजीनें या दरम्यान निजामशाहीची नोकरी सोडली; पण मोंगलांनीं तिच्यावर हल्ला केला तेव्हां तो परत आला असें शिवभारत म्हणतें. मुसलमानी हकीगतीवरूनहि १६२७ आणि १६३० च्या दरम्यान मोंगलांनी दौलताबादेवर हल्ला केला हें स्पष्ट आहे, पण या वेळीसुद्धां जाधवराव आणि शहाजी यांची लढाई झाल्याचा प्रसंग दिसत नाही. शिवाजीच्या जन्माच्या वेळीं शहाजी मोंगलांच्या दुर्याखानावर चालून गेला होता असें शिवभारतांत

म्हटलें आहे. मोंगली सरदाराचें हेंच नांव मुसलमानी तवारिखांत दिलेलें असून याचें नांव शिवभारतांत बरोबर दिलेलें आहे, यावरून शिवभारतांतील हकीगत खरी असल्याबद्दल खात्री पटते. मुसलमानी आधारांवरून सरकार म्हणतो, " १६२८ इसवींत अंबरपुत्र फत्तेखान यानें विश्वासघात करून, शहाजीस एक शिलेदारांचें पथक बरोबर देऊन पूर्व खानदेशामध्यें हल्ला करण्यास पाठविलें आणि दौलताबादेवर स्वारी करणाऱ्या मोंगलांच्या पिछाडीस दंगल उठविण्यास सांगितलें. पण तेथील बादशाही सरदार दर्याखान रुहेला याची तेथें एक मोठी जहागीर होती; त्यानें या लुटारूंवर हल्ला केला आणि तापी आणि पूर्णा या नद्यांच्या दुआबांतून या सर्व पथकास हांकलून दिलें " ( मॉडर्न रिव्ह्यू, १९१७ सप्टेंबर, पा. २४८). याच दर्याखानावर शहाजीनें पुन: यशस्वी रीतीनें १६२९ च्या अखेरीस शिवभारतांत म्हटल्याप्रमाणें हल्ला करणें असंभवनीय नाही. कारण मोंगलाच्या कारस्थानांत सामील असलेला हमीदखां याच्या चिथावणीवरून निजामशहानें विश्वासघातानें फत्तेखान यास कैद केलें ही हकीगत यानंतर झाली म्हणजे १६३० च्या प्रारंभी झाली असें आपल्यास माहीत पडतें. ( सदर—सरकार ).

यानंतर हमीदखानानें लुकजी जाधवरावाचा खून केला आणि त्यामुळें शहाजीस अविश्वास उत्पन्न होऊन तो आपल्या पुण्याच्या जहागिरीस, रस्त्यांत लूट करीत व आदिलशहाचा कांही मुलूख ताब्यांत घेत, निघून गेला. ( सदर-सरकार आणि बुसीर सलातीन ). शहाजीनें कांहीं वेळ जुन्नरचा अधिकारी विश्वासराव याचा आश्रय घेतला आणि मग जुन्नर व संगमनेरपासून अहमदनगरपर्यंतचा मुलूख आपल्या स्वत:करितां ताब्यांत घेण्याचा प्रयत्न केला. ( बु. स ). यानंतर निजामशहानें १६३१ त फत्तेखानास कैदेंतून मुक्त केलें. या दरम्यान शहाजीनें मोंगलांकडे जाऊन त्यांची नोकरी धरली. ( सप्टेंबर १६३०-सरकार ). मोंगलांनीं त्यास जुन्नर जिंकून नाशिकास ठाणें देण्याविषयीं सांगितलें. त्यास त्यांनीं आणखी फत्तेखानाची जाहगीर दिली. परंतु बादशहानें ती फत्तेखानास परत देण्याविषयीं हुकूम केला, तेव्हां शहाजीनें मोंगलांस पुन: सोडून दिलें. फत्तेखानानें यानंतर निजामशहाचा खून केला आणि एक नामधारी मूल गादीवर बसविलें. शहाजीनें तेव्हां नाशिक, जुन्नर आणि संगमनेर व कोंकणचा कांहीं हिस्सा दुसऱ्या एका नामधारी सुलतानाच्या नांवानें कबजांत घेतला व दौलताबादेवर तो चालून गेला. विजापुरी सैन्यहि फत्तेखानावर चालून

आलें होतें. शेवटीं मोंगलांनीं दौलताबादेवर उत्तरेकडून हल्ला करून तें कबजांत घेतलें आणि नामधारी निजामशहास कैद करून दिल्लीस पाठविलें व फत्तेखानास एक जहागीर देऊन निजामशाहीचा मुलूख आपल्या व विजापूरकरांच्या दरम्यान वांटून घेतला. याप्रमाणें निजामशाही राज्य १६३३ इसवींत नष्ट झालें. या राज्याच्या नाशाबद्दल शिवभारतांत दुःखोद्गार काढलेले आहेत आणि त्याचीं कारणेंहि तपशीवार दिलीं आहेत.

## फेब्रुअरी १६३०

मुसलमानी लेखांवरून सरकारनें दिलेला वरील संक्षिप्त इतिहास ध्यानांत घेतां शिवाजीचा जन्म फेब्रुअरी १६३० मध्यें शिवनेरीवर झाला ही गोष्ट असंबद्ध दिसत नाहीं. किंबहुना त्या इतिहासाशीं ती पूर्ण जुळती आहे. आतां ही गोष्ट व बखरकारांची गोष्ट संभवनीयतेच्या मुशींत सुलाखून पाहूं. इतिहासाच्या वृत्तांतील बखरकारांनीं केलेला घोटाळा बाजूस ठेवला तरी आणि माहुली सन १६३६ त पडली त्यानंतर, सन १६२७ त शिवाजीचा जन्म झाला हा घोटाळा, किंवा जाधवराव १६२६ पासून म्हणजे अंबरच्या मरणापासून मोंगलांकडे गेला तेव्हां शहाजीशीं त्याचें युद्ध झालें हीहि कथा मान्य करून- आपण संभवनीयतेचा विचार करूं. प्रथम गोष्ट असंभवनीय ही कीं, शहाजी-बरोबर लढाऊ स्वारींत त्याची गर्भार बायको होती. त्याचें राहण्याचें ठिकाण पुणें, वेरूळ, दौलताबाद किंवा पेडगांव मानतां येईल. शहाजीच्या किंवा शिवाजीच्या वेळीं मराठे आपल्या बायका लढाईच्या स्वाऱ्यावर नेत नसत. ही चाल सदाशिवराव भाऊ व नानासाहेब पेशवे यांनीं मोंगल बादशाही डौलाचें अनुकरण करून प्रथम सुरू केली. शिवनेरीच्याहि उत्तरेकडील प्रांतांत—पुण्यापासून दूर असलेल्या देशांत स्वारी करतांना शहाजीची बायको त्याच्याबरोबर असणें संभवनीय नाहीं; आणि गर्भार बायको जास्त दिवस गेलेले असतां बरोबर असणें मुळींच संभवनीय नाहीं. दुसरें, यदाकदाचित् होती असें जरी मानलें, तरी तिला तो निर्दयतेनें टाकून देईल हें संभवनीय नाहीं. शहाजी-जिजाबाईचा संबंध प्रेमाचा होता असें शिवभारतांत सांगितलें आहे. हल्लीं साधारण समजूत आहे त्याप्रमाणें त्यांच्यांत वितुष्ट नव्हतें. तेव्हां १६२७ त जुन्नरच्या उत्तरेकडील एका स्वारींत शहाजीबरोबर त्याची गर्भार बायको असणें किंवा त्यानें तीस टाकून देणें संभवनीय नाहीं. शिवाय त्यास तिच्या सुरक्षिततेचा स्वतः बंदोबस्त करितां आला असता. बख-

रींतील शिवजन्माच्या या हकीगतीपेक्षां शिवभारतांतील हकीकत ज्यास्त संभव-नीय आहे. १६२९ त निझामशाहीच्या नोकरींत शहाजी परत आला तेव्हां निजामशाहीतर्फे शिवनेरी किल्ल्याचा अधिकारी विश्वासराव यानें आपली मुलगी शहाजीच्या मुलास देऊं केली. या दोन घराण्यांचे विवाहसंबंध जुने होते. शहाजीचा भाऊ शरीफजी याची बायको विश्वासराव घराण्यांतील होती. शहाजीचा मुलगा संभाजी याचें लग्न शिवनेरी किल्ल्यावर मार्गशीर्ष म्हणजे डिसेंबर १६२९ किंवा माघ, जानेवारी १६३० त झालें. शहाजीची बायको गर्भार होती तरी या लग्नासाठीं येणें योग्यच होतें. लग्न झाल्यावर बायकोला बाळंतपणासाठीं तेथेंच ठेऊन शहाजी दर्याखानावर स्वारी करण्यास गेला, ही हकीकत सरळ व अधिक संभवनीय आहे.

संभाजीचें वय या वेळीं लहान होतें अशी शंका कदाचित् उपस्थित होईल. बृहदीश्वर शिलालेखांत संभाजीचा जन्म शके १६४७चा दिला आहे. शिवभारतांत कोणता तें दिलें नाहीं. या वेळी शहाजी विजापूरच्या नोकरीत होता, कारण संभाजीच्या जन्माचे ठिकाण विजापुर बृहदीश्वरलेखांत दिलें आहे. बृहदीश्वरलेखाची माहिती चुकीची नाही. कारण श. १५४७ म्हणजे इ. १६२६ त शहाजी विजापूरच्या नोकरीत होता. सरकारनें बहुधा बखरीवरून संभाजचा जन्मकाळ इ. १६२३ दिला आहे. शिवभारतांत असें सांगितलें आहे कीं, शहाजीस जिजाईपासून सहा पुत्र झाले, पैकीं संभाजी व शिवाजी हे मोठे होऊन वंशधर झाले; पण शिवाजी शेवटचा होता असें येथें म्हटलेलें नाहीं. बृहदीश्वर-लेखांत मात्र तसें म्हटलें आहे; पण तें चूक दिसतें. संभाजीचा जन्म शके १५४७ आणि शिवाजीचा फाल्गुन १५५१, यांत ४ वर्षांचें अन्तर आहे. अर्थात् संभाजीनंतरचा पांचवा मुलगा ४ वर्षांनीं झाला असें म्हणावें लागतें. साधारणं-पणें दोन वर्षें दोन मुलांच्या जन्मांमध्यें जातात. मूल मेलें तर एक वर्षानेंहि दुसरें मूल होतें हें खरें आहे; पण सर्वच मुलें दोन तीन महिन्यांनींच मेली असें मानावें लागतें. तेव्हां निदान पांच वर्षें दोघांच्या जन्मांत गेलीं असली पाहिजेत. यासाठीं शिवाजीस आम्ही चौथा मुलगा समजतों, आणि त्यानंतर शहाजीस आणखी दोन मुलगे झाले असावे. अशा दृष्टीनें पाहातां व शिवभारतास मुख्य मानतां शिवाजीच्या पूर्वी सहा वर्षें संभाजी जन्मला असें धरलें, तर त्याचा जन्मशक १५४५ म्हणजे इ. १६२३ मानतां येईल. अर्थात् शिवाजी–जन्मसमयीं संभा-

जीचें वय ६ वर्षांचें असावें. तुळजीस्वरातील मिति मानली, तर तो ४ वर्षांचा असावा. तेव्हां इतक्या लौकर त्याचें लग्न कसें झालें हा एक प्रश्न उपस्थित होतें. पण मराठ्यांत पूर्वी व अलीकडे किती लौकर लग्नें होत व होतात याचा विचार केला असता, गर्भातीच लग्न चाल्यापासून मानल्या वर्षापर्यंत झालें यांत आश्चर्य मुळींच नाहीं.

## बाराव्या वर्षी पुणें

यानंतर आपण निमच्या पुढील मुद्याकडे वळून शिवभारतांतील हकीगत तत्कालीन लेखांशी जुळती आहे किंवा नाही याचा विचार करूं. बंगलोराहून शिवाजीस बाराव्या वर्षी शहाजीनें पुण्याच्या जहागिरीचा स्वतंत्र मालक करून पाठविलें, असें शिवभारतांत वर्णन आहे. सर्व बखरकारांनीहि तेंच म्हणणें आहे. शंभूनें शहाजीस स्वप्नांत सांगितलें की, " बारा वर्षे शिवाजीस आपले जवळ ठेवणें, पुढें जाईल तिकडे जाऊं देणे. " असें सभासदानें म्हटलें आहे. शके १५५१ त शिवाजीचा जन्म मानला, तर ही गोष्ट १५६३ शकांत पडते, आणि १५४९ त जन्म धरला, तर शके १५६१ त शिवाजीस पुण्यास पाठविलें असें होतें. तत्कालीन लेखांत किंवा बखरीत शिवाजीस दादोजी कोंडदेवाबरोबर पुण्यास पाठविल्याचा शक दिलेला नाही. पण दोन गोष्टी समकालीन लेखांत मिळतात, त्या अशा—राजवाडे खंड १५ यांत लेखांक ४३७ वर एक मल्लांची सनद आहे, ती आश्विन शके १५६१ ची आहे आणि तीवर शिवाजीची प्रसिद्ध मुद्रा जी शेवटपर्यंत त्यानें वापरली तीच म्हणजे " प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णुर्विश्ववन्दिता । शाहसुनोः शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥ " आहे. अर्थात् या वेळी पुण्याच्या जहागिरीचा मालक शिवाजी झाला होता हे स्पष्ट आहे. तेव्हां आश्विनापूर्वी शिवाजी श. १५६१ त पुण्यास पाठविला गेला असावा असे ठरतें. पण नव्या जन्मभितीप्रमाणें या शकांत तो दहा वर्षांचा होता. तेव्हां १२ वर्षांचा असता शिवाजीस पुण्यास पाठविलें असें शिवभारतांत म्हटलें आहे तें कसें ?

या प्रश्नाचें उत्तर दोन तऱ्हेनें देतां येईल. शिवभारतांत " यदा वर्षे द्वादशे प्रत्यपद्यत " असें जे म्हटलें आहे तें सामान्य जनरूढीप्रमाणें म्हटलें आहे. आपल्यांत मुलगा वयांत येण्याची मर्यादा पाश्चात्यापेक्षां पुष्कळ कमी वयाची आहे. पाश्चात्य देशांत २१ वर्षे मानतात. हिंदुस्थानांत कायद्यानें १८

अज्ञग्याच्या सनदेवरून श. १५६१ त शिवाजी पुण्याचा स्वतंत्र जाहगीरदार झाला हें निर्विवाद होतें, तरी त्यावेळींच त्यास पुण्यास पाठविलें असें निश्चित होत नाहीं. दोन वर्षांनीं पुढें १२ वर्षांचा तो झाला तेव्हां तो काम आटोपण्यास योग्य आहे असें पाहून त्यास श. १५६३ ( इ. १६४१ ) त शहाजीनें जें स्वराज्यस्थापनेचें कार्य आपण करणार होतों परंतु करूं शकलों नाहीं तें करण्यास समर्थ समजून, त्याचा आपल्यास दोष न यावा अशा हेतूनें त्यास पुण्यास पाठवून दिलें असें म्हणतां येतें. तात्पर्य, शिवभारताची जन्ममिति व हकीगत इतिहासाशीं संगत व संभवनीय असून त्यास अद्याप सांपडलेल्या कोणत्याहि तत्कालीन लेखाचा विरोध येत नाहीं.

आतां असें कोणी म्हणेल कीं, ही नवीन शिवजन्माची मिति उच्च ग्रह येतील अशी मुद्दाम मागाहून बनविली असावी, तर तेंहि म्हणणें टिकत नाहीं. कारण "ततो ग्रहैः पञ्चभिरुच्चसंस्थैः" या कालिदासानें रघूविषयीं वर्णिलेल्या मोठ्या विभूतीच्या जन्माच्या ठराविक पांच ग्रह उच्च असल्याच्या कल्पनेचा बाणावरहि परिणाम झालेला दिसतो, आणि 'सर्वेषूच्चस्थानस्थितेषु भेजे जन्म' असें हर्षचरितांत त्यानें हर्षाविषयीं म्हटलें आहे. शिवभारतांतहि तसेंच कवींनें म्हटलेलें आहे. कवींचा हा साम्प्रदायच पडलेला दिसतो. पण हर्षाच्या कुण्डलीत एकच उच्च ग्रह आहे हें बाणानेंच दिलेल्या हर्षाच्या जन्माच्या मितीवरून आम्ही कुण्डली तयार करवून निश्चित केलें आहे (मध्ययुगीन भारत भा. १ पा. २९ ). आणि शिवभारताच्या मितीवरून म्हणजे जेधे शकावलीच्या मितीवरून तयार केलेली व जोधपूरच्या चण्डू ज्योतिष्याच्या संग्रहांत सांपडलेली शिवाजीची कुण्डली एकच असून त्यांतहि एकच उच्च ग्रह आहे. कित्येकांस अशीहि शंका येते कीं, अनुष्ठान वगैरे आपत्ति टाळण्याकरितां मोठ्या लोकांच्या जन्ममित्या खोट्या प्रचलित करण्याचा प्रघात असे. पण हा आक्षेप घेणार लोक हें विसरतात कीं, अनुष्ठानशास्त्राचा ( जारणमारणादिकाचा ) असा सिद्धान्त आहे कीं, हे प्रयोग राजावर चालत नाहींत. असें नसतें तर ते इंग्रजांवरहि चालते व चालविले जाते. तेव्हां अशा भीतीनें शिवाजी महाराजांच्या अनुज्ञेनें तयार झालेल्या शिवभारतांत खोटी जन्मतिथि प्रसिद्ध केली असेल असें संभवत नाहीं. किंबहुना याच समजुतीमुळें राजे लोकांच्या जन्मगांठीचे उत्सव व दरबार बिनधोक खऱ्या जन्ममितीवर पूर्वीं होत असत व हल्लीं होतात. शिवाजीमहाराजांच्या जन्मगांठीच्या दरबाराचा उल्लेख एखाद्या तत्कालीन

तो खासगी स्वरूपाहून निराळया तत्त्वाखालीं येतो, त्याचप्रमाणें कोणतीहि गोष्ट युध्यमान राष्ट्रांमध्यें युद्ध सुरू झाल्यास त्याजकडे पाहण्याची दृष्टि निराळी असते. पण 'Every thing is fair in war' हें तत्त्व लागू होण्यासाठीं war अथवा युद्ध सुरू असलें पाहिजे. अन्यशब्दांनीं बोलावयाचें तर त्या राष्ट्रांमध्यें State of war असेल तरच पाहिजेल तें कृत्य त्यावेळीं न्याय्य समजलें जाईल. हल्लीं पाश्चात्य देशांत State of war केव्हां व कशी समजली जाईल याबद्दल पुष्कळ तात्त्विक विचार केला गेला आहे. लढाई सुरू आहे, अशी परिस्थिति तिकडे बहुधा Declaration of war नें म्हणजे लढाई पुकारल्यानें अस्तित्वांत येते. परंतु एक बारीक तत्त्व असेंहि ठरलें आहे कीं Formal declaration of war म्हणजे प्रसिद्धपणें लढाई पुकारल्याची जाहीर खबर अन्य राष्ट्रास देण्याची अवश्यकताच आहे असें नाहीं. An act of war म्हणजे लढाईचें एखादें कृत्य एकदम करण्यानेंहि लढाई सुरू करतां येते असा नियम हल्लीं पाश्चात्य अन्तरराष्ट्रीय व्यवहारांत मान्य झाला आहे. हीं तत्त्वें सदसद्विवेकास धरून असल्यानें चोहींकडे अमलांत आहेत. प्रत्यक्ष लेखांत आलीं नसलीं तरी राजनीतींत इकडेहि तींच अमलांत आहेत, हें लक्षांत घेतलें पाहिजे. या तत्त्वांचा प्रस्तुत प्रकरणांत उपयोग करतां असें स्पष्ट दिसून येतें कीं शिवाजीनें चंद्रराव मोरे यास जो निरोप पाठविला तो Declaration of war च्या स्वरूपाचा होता. त्याजकडे पाठविलेला हेजिब म्हणजे दूत हा राजकीय संदेश घेऊन गेला होता. आणि चंद्रराव मोऱ्यानें हा संदेश अमान्य केला व वकील निघून आला तेव्हांच लढाई सुरू झाली आणि State of war अमलांत आली. असें नसलें तरी सुद्धां शिवाजीनें जावळीवर एकदम हल्ला केला, हीच लढाईची सुरवात होती; आणि मग लढाईंत यश येण्याकरितां वाटेल ती युक्ति योजणें न्याय्य होतें. किंबहुना प्रत्येक युद्धांत छळ म्हणजे फसविणें हें असतेंच. हजारों युद्ध-प्रसंगाचे इतिहास वाचले असतां ही गोष्ट लक्षांत येईल. वाघ सुद्धां दबा धरून निर्बळ हरिणावर उडी घालतो. बैलाच्या शिंगास जळत्या मशाली बांधून हानिबालनें रोमन फौजेस चकवून भलत्याच बाजूला दवडलें आणि मग त्यांच्यावर पिछाडीनें हल्ला केला, या युद्धच्छलापासून तो नुकतेंच आयर्लंदमध्यें अनेक छल करून डी व्हालेराच्या लोकांनीं इंग्रज व विरोधी आयरिश आफिसर व शिपाई कसे

ठार मारले या वृत्तापर्यंत सर्व देशांत हजारों युद्धांत छलाचा उपयोग केला गेला आहे; आणि म्हणूनच 'Everything is fair in war' हें तत्त्व मान्य झालें आहे. चंद्रराव मोऱ्याचा खून छलानें केला नाहीं ही गोष्ट आम्हीं वर ठरविलेली आहे. तरी हणमंतराव मोरे चतुर्बेट येथें जमाव धरून बसला होता त्यास शंभूजी कावजी यानें छळानें मारलें ही गोष्ट आम्हांस मान्य आहे. पण हा छल युद्ध सुरू झाल्यावरचा असल्यानें क्षम्य असून तो खून या वर्णनाखालीं येऊं शकत नाहीं. शंभुजीनें सोयरिकीचें बोलणें लावून आंत घुसून हा वध केला असें सभासद म्हणतो. येथें सोयरिकी कोणती हा खुलासा नाहीं. याजबद्दल पुढें विवेचन करूं. पण तें चंद्रराव मोऱ्याच्या मुलींच्या मागणीसंबंधें असलें तरी सुद्धां आणि शिवाजीच्या सल्ल्यावरूनहि मानलें तरी युध्यमानस्थितींतील असल्यानें निंद्य ठरत नाहीं. शिवाजीनें याच न्यायानें कित्येक किल्ले छलानें घेतले. किंबहुना कित्येक शहरां-वर अचानक छापे घालून तीं शहरें लुटलीं. ह्या सर्व ठळक गोष्टी युध्यमान स्थितींतल्या असल्यामुळें निंद्य किंवा दूषणार्ह ठरत नाहींत. रॅले वगैरे इंग्रजी जहाजाच्या कप्तानांनीं अमेरिकेहून येणाऱ्या स्पॅ-निश जहाजावर अचानक हल्ले करून त्यांतलें खंडोगणती सोनें लुटलें आणि फ्रेंचांनीं मद्रासवर अचानक हल्ले केले हें प्रसिद्ध आहे. पण या गोष्टी युध्यमान स्थितींतल्या असल्यानें आन्तरराष्ट्रीयनीतीनें मान्य झालेल्या आहेत. मग शिवाजीला तेवढे पाश्चात्य इतिहासकारांनीं लुटारु म्हणावें, महंमद गझनीला किंवा रॅले वगैरे इंग्लिश जहाजांच्या कप्तानांना म्हणूं नये हा केवळ विरोधी भक्तीचा परिणाम आहे. महंमद गझनीनें अशा-प्रकारें अचानक हल्ले करून कनोज वगैरे शेंकडों श्रीमंत शहरें लुटलीं, पण मुसलमानी इतिहासकारांनीं किंवा इंग्रजी इतिहासकारांनीं त्यांस लुटारु म्हटलें नाहीं. तात्पर्य, शत्रूस युद्ध पुकारलें असतां किंवा न पुकारतांहि छलानें किंवा अचानक हल्ल्यानें लुटावें किंवा मारावें ही राजनीति मान्य झाली आहे; आणि याच कारणानें युद्ध सुरू झाल्यावर हणमंतराव मोरे यास छलानें मारलें ही गोष्ट गैरवाजवी किंवा निंद्य ठरत नाहीं.

युध्यमान स्थितींत सर्वत्र छल क्षम्य आहे. पण अन्यत्र क्षम्य नाहीं, असें मान्य झालेलें दिसतें किंवा करावें लागेल. आम्ही शरण आलों किंवा आम्ही तह करतों असा बहाणा करून युद्ध थांबवून एकाएकीं हल्ला करणें

क्षम्य होणार नाहीं. पाश्चात्य देशांत शरण आल्याची खूण white flag, पांढरें निशाण फडकावणें ही ठरली आहे. पांढरें निशाण फडकाविलें असतां मग गोळी टाकणें किंवा शस्त्र चालविणें प्रशस्त मानलें जात नाहीं. आणि असें झाल्यावर मनुष्यें मारलीं गेलीं तर तो खून Murder समजला जाईल. गेल्या जर्मन युद्धांत खोट्या रीतीनें पांढरें निशाण उभारून जर्मनांनीं छल केला असा रिपोर्ट प्रसिद्ध झालेला आपण वाचला आहे आणि ही गोष्ट खरी असली तर अक्षम्य आहे हें उघड आहे. तहाचें बोलणें सुरू करून धोक्यानें व दग्यानें सेनापतीस किंवा सरदारांस ठार मारल्याचे दाखले इतिहासांत सांपडतील. पण असें करणें निंद्य. अफझलखानानें शिवाजीस सामोपचाराचें बोलणें सुरू करून पकडण्याचा प्रयत्न केला ही गोष्ट निंद्यच मानली जाईल आणि शिवाजीनें हा डाव ओळखून अंगांत गुप्त चिलखत घालून बिचव्यानें हा डाव अफझलखानावर उलटवून त्याचा वध केला. हा खून नसून योग्य व न्याय्य वध झाला असेंच इतिहासकार ठरवितात व ठरवितील. असो तर, युद्ध थांबवून तह करतों म्हणून तहास बोलावणें व दगा करणें निंद्य आहे. हा अपवाद सोडून, युद्ध चालू असतां इतर रीतीचा दगा करणें किंवा surprise ची एखादी फसवणूक करणें क्षम्य आहे आणि म्हणूनच शंभूजी कावजी यानें केलेला हणमंतरावाचा वध क्षम्य आहे असें ठरतें. शंभूजी कावजी यानें तहाचें बोलणें लावून युद्ध थांबवलें असें सभासदानें म्हटलें नाहीं. फक्त सोयरिकीचें नातें लावून त्यानें एकान्तांत त्याजवर कट्यार चालविली असें लिहिलें आहे. हें सोयरिकीचें नातें अर्थात त्याचेंच असावें. कारण, ‘लावून’ ह्या शब्दांत पुढील होणाऱ्या दुसऱ्याच्या संबंधाचा अन्तर्भाव होत नाहीं. या संदिग्ध शब्दावरून पुढील बखरकारांनीं शिवाजीनें चंद्रराव मोऱ्याची मुलगी लग्नांत मागितली असा तर्क काढलेला आहे. शिवाजीमहाराजांचें उदात्त चरित्र पाहतां किंवा त्यांच्या कुशल राजनीतीच्या व्यवहाराकडे पाहतां हें संभवनीय दिसत नाहीं. चंद्रराव मोऱ्याची मुलगी फार सुंदर होती असें कोठें लिहिलेलें आढळतें. पण सुंदर मुलीचाहि मोह शिवाजीस कधींच झाला नाहीं. मोऱ्याचें राज्य स्वतंत्र असून त्यास मुलगे नव्हते अशी परिस्थिति होती तरी, त्याच्या मुलीशीं लग्न करणें राजनीतीच्या व्यवहारांत युक्त वाटलें गेलें नसतें. त्यांचें राज्य परतंत्रतेचें असून तें मारणें कठिण नव्हतें आणि चंद्रराव

मोऱ्याचा जांवई या नात्यानें शिवाजीस मुळींच मोठेपणा आला नसता. या दृष्टीनेंहि ही गोष्ट असंभवनीय दिसते. शिवाजीस लग्न करावयाची इच्छा कोणत्याहि कारणानें आली असती तर जय मिळाल्यावर व राज्य खालसा झाल्यावर आणि मोऱ्याचे कबिले हातीं आल्यावर ही गोष्ट शिवाजीनें घडवूनहि आणली असती. तात्पर्य, शिवाजीनें मोऱ्याची मुलगी लग्नांत मागितली ही गोष्ट असंभवनीय होय आणि या गोष्टीचा बहाणा करून शिवाजीनें रघुनाथ बल्लाळ यास चंद्रराव मोऱ्याकडे पाठविलें ही त्याहून चुकीची कल्पना. कारण यास सभासदाचाहि आधार नाहीं. रघुनाथ बल्लाळ यास राजकीय वकील या नात्यानें राजकीय बोलणें करण्यास व आपलें स्वामित्व तुम्ही मानलें पाहिजे हें सांगण्यास हेजिब पाठविला होता असें सभासद स्पष्ट लिहितो. अर्थात शिवाजीनें मोऱ्याच्या सुंदर मुलीची मागणी केली ही कविकल्पना होय.

येथवर आपण सभासदाच्या बखरीची छाननी व त्यावरून दिसून येणाऱ्या हकीकतीचें तत्कालीन व हल्लींच्या राजनीतीच्या दृष्टीनें परीक्षण करून शिवाजीचें कृत्य अन्याय्य कीं न्याय्य याची चिकित्सा केली; आणि असें ठरविलें कीं चंद्रराव हा विजापुरकरांचा मांडलिक, त्यांच्या वतीनें शिवाजीच्या राज्यस्थापनेस किंबहुना स्वराज्य-स्थापनेस तो प्रतिकूळ होता यासाठीं, त्याला विजापूरकरांचें दास्य सोडून आम्हांस राजा मान्य करून, स्वराज्यसाधनेस अनुकूळ हो, नाहीं तर मारला जाशील असा राजकीय संदेश रघुनाथ बल्लाळ यास हेजिब नेमून त्याजकडून कळविला. त्यानें तो मान्य केला नाहीं, आणि जावळीस उद्यां येत असाल तर आजच या, असा स्पष्ट जबाब दिला. या वकिली बोलण्यांत कांहीं तरी बाचाबाची झाली. चंद्रराव मोरे केफी दारुबाज होता. काय बाचाबाची झाली तें सांगतां येत नाहीं, असें जें किन्केड व पारसनीस यांनीं आपल्या इतिहासांत लिहिलें आहे तेंच योग्य दिसतें. कदाचित गोष्ट तकारीवर येऊन राघो बल्लाळावर सूर्यरावानेंच हात उचलला. तो निघून जात असतांना मागून त्याच्यावर लाग केला असेल. ( हें करणें अर्थात गैर होतें. कारण दूत कांहीं बोलला तरी तो क्षम्य आहे, दंड्य नाहीं असें रामायणकाळांतहि मान्य होतें आणि मारुति किंवा अंगद यास दूत असल्यानें शिक्षा करणें अन्यायाचें होईल असें स्पष्ट बिभीषणानें बजाविलें आहे. ) या दंग्यांत

राघोबल्लाळचे लोक शूर असल्यानें कचरले नाहींत. सूर्याजीराव यास मारून दरवाजाबाहेर पडले. सूर्याजीराव मालक पडल्यानें पुढें लाग झाला नाहीं. रघुनाथ बल्लाळानें शिवाजीस खबर दिली आणि त्यानें ताबडतोब जावळी-वर स्वारी केली. यावेळीं चंद्रराव मोरे बाहेर येऊन शिवाजीशीं लढला आणि लढाईत मारला गेला. जावळी स्वाधीन झाली. चतुर्बेट येथें कार-भारी हणमंतराव मोरे जमाव धरून लढूं लागला. मग त्यास शंभूजी कावजी यानें छल करून मारला व जावळीचें राज्य निष्कंटक खालसा केलें अशी ही हकीकत दिसते. राज्यसाधन, आत्मसंरक्षण, स्वराज्यसाधन या तिन्ही कारणांसाठीं शिवाजीमहाराजांनीं आम्ही राजे आहों, स्वतंत्र राजे आहों हें जाहीर केल्यानंतर चंद्ररावास प्रथम स्वराज्यांत सामील होण्याची संधि देऊन ती फुकट गेल्यावर त्याजवर हल्ला केला व युद्ध करून जावळी घेतली, यांत कोणतीच गोष्ट राजनीतीच्या दृष्टीनें निंद्य नाहीं. युद्ध सुरू झाल्यावर छलानें हणमंतराव यास शंभूजीनें मारलें तें 'Everything is fair in war' या नात्यानें क्षम्य आहे असेंच प्रत्येकास वाटेल. जदुनाथ सरकार या कृत्यांस murder खून म्हणतात किंवा हें स्वराज्यसाधनासाठीं नव्हतें असें म्हणतात तें सपशेल चुकीचें आहे.*

ही अशी मूळ हकीकत असून तिचा थोडासा विपर्यास तिखटमीठ लावण्याच्या साहजिक मोहानें बखरकारांनीं कसा केला हें दाखविण्यास त्यांतील उतारे देणें पुरें आहे. हे सर्व बखरकार ऐकिव किंवा सभासदावरून थोडासा फेरफार करून हकीकत सांगतात. सभासदाची बखर शिवाजीच्या मृत्यूनंतर ( १६८० ) १७।१८ वर्षांनीं लिहिलेली म्हणजे १६९७।९८ ची सर्वांत जुनी. त्यानंतर शिवदिग्विजय ही बखर शके १६४० सन १७१८

*जदुनाथांनी याही पुढें थोडीशी चर्चा करून पारसनीस यांच्या 'महाबळेश्वर' या इंग्रजी लेखांत दिलेल्या हकीकतीवर दुलत्ती झाडली आहे, आणि चंद्रराव मोऱ्यानें दग्यानें शिवाजीस पकडून देण्याचा प्रयत्न केला म्हणून शिवाजीनें त्याचा दग्यानें खून करविला असें विसाव्या शतकांतले लुच्चे महाराष्ट्रांतील संशोधक कोठली तरी रावण-कुंभकर्णी बखर दाखवून शिवाजीच्या दुष्ट कृत्यावर पांघरूण घालूं पहात आहेत असें म्हटलें आहे. ( पान ५४ ). याचें उत्तर येथे अनवश्यक आहे हें उघड आहे. वरील विवेचनावरून त्याची जरूरी नाहीं; आणि ही नवी बखर विश्वसनीय आहे की नाही याची माहिती पारसनीस देतीलच.

म्हणजे सगासरी सभासदा नंतर २० वर्षानीं पण बहुतेक स्वतंत्र माहितीनें लिहिली आहे. तींत चंद्रराव मोरे लढाईत मारला गेला असें स्पष्ट सभासदाच्या विरुद्ध वर्णन असून त्यांतील हकीकत प्रथम देऊं. " त्यानंतर जावळी येथें चंद्रराव मोरे विजापुराचे **चाकर** जहागीर खाऊन होते... त्यांजला महाराजांनीं सांगून पाठविलें कीं तुम्ही पातशहास करभार देतां तो आम्हांस द्यावा. आमचे म्हणोन व्हावें......म्हणोन सांगोन पाठविलें. महाराजांनीं विचार केला, मऱ्हाटी सरदारी बहुत दिवसाची जमली आहे. प्रथम साम करोन पहावें. आपल्या विचारांत आला तर राखावा, नाहींतर पारिपत्यास उशीर काय आहे? वकील पाठवला. तो जाऊन चंद्रराव मोऱ्याशीं बोलतां मोरे यांनीं महाराजांची खातर मनांत न आणिली...... कांहीं बोलोन निरोप घेऊन येऊन त्यानीं महाराजांस निवेदन केलें. महाराज राजगडास बंदोबस्तास गेले. तेथोन तीनचारशें पराक्रमी माणसें रघुनाथ बल्लाळ यास देऊन हणमंतराव मोरे, चंद्रराव यांचे भाऊ कुलकारभारी जोहारखोर येथें होते त्यांकडे शरीर-संबंधाचे बोलणें करण्याकरितां पाठविलें. रघुनाथपंतीं मोरे यांस सांगून पाठविलें कीं तुमच्या घरीं मुली आहेत. त्यांच्या बोलण्याकरितां आलों. ते समयीं मोरे बेफाम होते, कारण शरीरसंबंधाचे बोलण्याकरितां आले; संधीकरितां नाहीं. रघुनाथपंत जाऊन प्रथम भेटींत बेसरंजाम पाहून मोरे यास मारून दरवाजांवरील लोकांस मारामार करून ... वाई मुक्कामीं महाराजांस वर्तमान विदित केलें ... ... महाराजांनीं विचार केला. हणमंतराव कर्ता मनुष्य होता तो मारला. आतां त्याचे योग्यतेचा माणूस त्यांचे जवळ नाहीं, याच समयीं चंद्रराव मोरे याशीं गांठ घालावी... तात्काळ तयारी करून निघाले. महाबळेश्वरीं सांबाचें दर्शन घेतलें. ध्यान ... करोन त्याच घाटानें खालीं उतरले. रघुनाथ बल्लाळ अत्रे याजबरोबर पांच सात हजार मावळे व पाचशें स्वार देऊन रडतोंडीचे घाटानें यावें असा संकेत करून एकसमयावच्छेदें उभय सैन्यें जावळीस सुर्योदयीं लागलीं. तेथें सरंजाम बहुत चंद्रराव मोरे दोन प्रहरपर्यंत युद्ध करून जवान मर्दानीनें लढाई दिली.... मोरे यांचे सैन्याचा पराभव झाला. चंद्रराव मोरे **लढाईत मारले गेले**. त्यांचे पुत्र बाजीराव मोरे व कृष्णराव मोरे कबिले सहित कैद झाले. मोरे यांनीं अमोल वस्तुसंग्रह केला होता ती सर्व हरण केली. त्या संधींत मुलांनीं विजापुरकराकडे कारण

करून पळून जावें असा विचार केला. त्याचे कागदपत्र मुद्देदस्त केले आणि रुजुवात करून शके १५३४ चित्रभानु संवत्सरीं उभयतांचा शिरच्छेद केला. बायका व लेकी सोडून दिल्या. मोरे यांनीं पहाडावर मेढा बांधून पूर्वी वस्ती केली होती. अशी बाकी जागा महाराजांचे अन्तःकरणांत वाटून पक्की इमारत करवून किल्ला केला. त्याचें नांव प्रतापगड ठेविलें." ही हकी-कत बरीच विस्तृत असून सभासदाहून अत्यंत भिन्न आहे. या बखरीचा लिहिणारा खंडो बल्लाळ शिवाजीमहाराजांचा चिटणीस आवजी बाळाजी याचा पुत्र हा होता असें प्रस्तावनेंत म्हटलें आहे. तो माहितगार असावा आणि त्यानें किंवा दुसऱ्या कोणी शिवाजीच्या मृत्यूनंतर ३८ वर्षांनीच ती लिहिली असल्यानें सभासदाच्या जोडीला ठेवण्यासारखी आहे. यांत हणमंत मोऱ्याचा खून अगोदर झाला आणि रघुनाथानें केला असें जरी म्हटलें आहे तरी चंद्रराव मोरे लढाईत मारला गेला असें स्पष्ट म्हटलें आहे. त्यांत कांहीं विपर्यासाचा जरी दोष असला तरी हेंच विधान मान्य करण्यासारखें आहे हें पूर्वी विस्तारपूर्वक दर्शविलेंच आहे.

जदुनाथ सरकारनें उल्लेखिलेल्या बखरी पैकीं तिहींचा येथवर विचार झाला. सभासद, शेडगांवकर (सभासदाप्रमाणें) आणि शिवदिग्विजय. यांच्यां-तील विरुद्ध हकीकतीचा त्यानें मुळींच विचार केला नाहीं. त्यानें उल्लेखिले-ल्या चौथ्या बखरीचें काय म्हणणें तें पाहूं. चिटणीसाची बखर ही बरीच अली-कडची म्हणजे राज्याभिषेक १३७ इ. स. १८०७ ची आहे. अर्थात ती केवळ ऐकीव व पूर्व बखरीस धरून व कांहीं अधिक अतिशयोक्तियुक्त मात्र आहे. त्यांतील हकीकत येणेंप्रमाणें. "चंद्रराव मोरे जावळीवर दहाहजार लोकांसह किल्ले वगैरे बळावून होते. त्यासी सलुख लावून तुम्ही आमचे म्हणावें आज्ञेंत वागावें असें राजकारण लाविलें असतां मुद्दाईनें (खुदाईनें,)? महाराजांस खातरेंत न आणतां वागूं लागलें याबद्दल विचार केला. मावळे लोकांचा सरदार हातीं न लागे. कावबाजीनें हातीं घ्यावा म्हणून त्याजकडे बोलण्यास राघो बल्लाळ सबनीस यास पाठविलें...त्यानें जाऊन शरीरसंबंधाचें बोलणें लाविलें आणि राहिले. विचार पाहिला, चंद्रराव कैफी, लोकांचीहि फूट पाहून महा-राजांकडे लिहून पाठविलें. काम करितों तुम्ही यावें. त्या अवसरांत रघुनाथ-पंतानें चंद्रराव याचा भाऊ सूर्यराव या दोघांस खलबतास म्हणून नेलें तेथेंच मारलें आणि दरवाजास आले. तों लोक कांहीं सावध झाले, थोडे होते

त्यास मारामार करून सांभाळून आपले लोकांत आले. तेथोन निघोन संभाजी कावजी यानें मोरे याचे कारभारी हनूमंतराव म्हणून नामी सरदार होते त्यास मारले. महाराज महाबळेश्वरीं होतेच त्यांनीं येऊन दोन प्रहरपर्यंत युद्ध केलें; ठाणें घेतलें; चंद्रराव याचे लेक बाजीराव व कृष्णराव धरले. आणि कबिले पुरंदर येथें कैदेंत ठेविलें. आणि लेक फक्त पुण्यास नेऊन दक्षिणेकडे ( निमाज गाह ? ) आहे तेथें मारले. कांहीं दिवसांनीं कबिले सोडले. जावळी घेतली शके १५७७–" या वर्णनांत मुख्य गोष्टी त्याच आहेत. पण तपशिलाच्या गोष्टींत बऱ्याच चुका स्पष्ट दिसतात. चंद्रराव मोरे यांशी प्रथम राजकारण लावून तुम्ही आमच्या स्वराज्य–स्थापनेला अनुकूल व्हा असें शिवाजीनें सांगून पाठविलें हें यांतहि आहे. मग त्याजकडे जदुनाथ दुर्लक्ष करितात हें अश्चर्य नव्हे काय? रघुनाथ बल्लाळ शरीरसंबंधाच्या गोष्टी करण्याकरितां गेला नव्हता असें सभासद स्पष्ट म्हणतो. तें बोलणें शंभूजी कावजी यानें हणमंतरावाशीं केलें असें लिहितो. येथें त्याचा विपर्यास केला आहे आणि शंभुजी यानें हणमंतराव यास कसें मारलें हें यांत मुळींच सांगितलें नाहीं. तात्पर्य एकंदर तपाशिलाचा विचार करतां चंद्रराव मोऱ्यास शिवाजीनें लग्नाचें बोलणें लावून दग्यानें मारला नाहीं. तो लढाईत मारला गेला हाच इत्यर्थ ठरतो. बहुधा शंभूजीनें लढाई सुरू झाल्यावर आपल्या सोयरीकेच्या नात्यानें हणमंतरावास एकांतीं गांठून दग्यानें मारलें असा प्रकार असून याचा अतिदेश पूर्व कृत्यावर अतिशयोक्तीनें चंद्रराव मोऱ्याच्या मृत्यूवर अलीकडचे बखरकार करतात. चंद्रराव मोऱ्याचा खून लग्नाच्या गोष्टीचा बहाणा करून शिवाजीनें करविला असता तर शंभूजी कावजीच्या त्याच ठकबाजीस हणमंतराव बळी पडला नसता हें पूर्वीं सांगितलेंच आहे. इतकेंच नव्हे तर ह्या दग्याच्या बातम्या त्यावेळीं प्रसिद्ध झाल्याच असत्या; आणि या वृत्तानंतर लवकरच अफझलखान शिवाजीवर चालून आला, त्यावेळीं ह्या शिवाजीच्या वर्तणुकीचा गोंगाट त्याच्या कानावर गेलाच असता आणि तो शिवाजीच्या विनंतीप्रमाणें त्याची एकान्तीं भेट घेण्यास कधींच प्रवृत्त झाला नसता. कदाचित् ठकास सवाठक अशा भावनेनें व स्वतःच्या प्रचण्डशक्तीच्या धमेंडीनें तो गेलाच असता तर अंगांत चिलखत घालून तरी गेला असता हें उघड आहे. यावरून असें स्पष्ट दिसतें कीं शिवाजीनें चंद्रराव मोऱ्याचा खून दग्यानें करविला असा प्रवाद अफझल-

खानाच्या वधापर्यंत खचित प्रचलित नव्हता. हा प्रवाद शिवाजीच्या मरणोत्तर कित्येक वर्षांनीं म्हणजे ६०।७० वर्षांनंतर बखरकारांनीं अतिशयोक्तीच्या मोहास बळी पडून चालू केला असें दिसतें. आणि तो जदुनाथ सरकार सारख्या विरोधी भक्तांनीं छाननी केल्याशिवाय घेतला असें स्पष्ट दिसतें. वास्तविकरीत्या चंद्ररावाचा खून झाला नसून तो लढाईंत मारला गेला हें शिवदिग्विजयांत लिहिलेलें इतिवृत्त खरें आहे.

वरील विवेचन बखरीच्या हकीकतेप्रमाणें केलें आहे. नवीन सांपडलेल्या लेखांवरून ही हकीकत अगदी चुकीची ठरली आहे. अफझलखान सुबेदार वाई, याचें जेध्यांस असें पत्र आलेलें मिळालें आहे कीं 'चंद्रराव कदीम मयत झाला त्याच्या जहागिरीवर दुसऱ्यांनीं कबजा केला आहे तेव्हां त्याच्या बंदोबस्तास आम्ही जात आहो तुम्ही मदतीस यावें' यावरून आणि मोऱ्यांच्या कैफियतीवरून असें ठरतें की हा वृद्ध चंद्रराव निपुत्रिक मेला. तेव्हां भलत्याच भावाबंदांनीं त्याच्या गादीवर कबजा केला. विजापुरतर्फे अफझलखानानें तेथें जाऊन एक मुलगा चंद्ररावाच्या बायकोस दत्तक दिला; व त्याचा जनक बाप तेथें कारभारावर नेमला. जुना चंद्रराव शिवाजीस अनुकूल होता. पण हा नवीन दत्तक चन्द्रराव व त्याचा जनक विजापुर दरबारातर्फे कायम झाल्यानें साहजिकच विजापुरास अनुकूल व शिवाजीस प्रतिकूल होते. बखरींतील हकीकतींत एवढा फरक करावयास पाहिजे कीं शिवाजीचें बोलणें या जनक चंद्ररावाशीं झालें, आणि जावळीच्या लढाईंत हाच मारला गेला. दत्तक चंद्रराव व त्याचा एक भाऊ युद्धांतून सुटून रायरीकिल्ल्यावर गेले. तेथें शिवाजीनें त्यांस वेढ्यांत कोंडिलें तेव्हां ते जेध्याच्या मार्फत शरण आले आणि शिवाजीचें अंकितत्व कबूल करून त्यापाशीं राहिले. पण त्यांनीं विजापुराशीं गुप्त फंदफितूर केला तेव्हां त्याजवर गुन्हा लागू करून शिवाजीनें त्यांस देहान्त शिक्षा दिली. जेधे शकावली आणि शिवभारत यांतहि हीच हकीकत आहे. असो, दत्तक चंद्ररावाचा जनक बाप चंद्रराव यांशी बोलणें झालें असलें तरी वरील लेखांतील गोष्टीनें राष्ट्रीय दृष्टीच्या विवेचनास कोणत्याहि रीतीनें बाध येत नाहीं.

या विषयाची येथें परिसमाप्ति झाली. अन्य लहान बखरींची चर्चा करण्याची अवश्यकता नाहीं. पण समाप्ति करण्यापूर्वी एका प्रश्नाची सवि-

स्तर चर्चा करणें जरूर आहे. चंद्रराव मोरे यांचे दोन पुत्र लढाईंत कैद आले. त्यांचा शिरच्छेद पुण्यास नेऊन शिवाजीमहाराजांनीं करविला असें सर्व बखरकार सांगतात. हें कृत्य न्याय्य होतें काय ? ठाण्याच्या भाव्यांनीं याची हकीकत भलतीच आपल्या 'अफझलखानाचा वध' या पुस्तकांत पहिल्याच पानावर दिली आहे आणि या कृत्याचा नीतिदृष्ट्या निषेध केला आहे. ते लिहितात " पुढें बाजीराव मोरे व या चंद्ररावाच्या **भावास** ( ? ) **बोलावून आणून** ( ? ) त्यांचा शिरच्छेद केला. या घराण्यांतील लहान लहान मुलें जीं जीं महाराजांच्या हातीं लागलीं त्या सर्वांस त्यांनीं ठार मारलें. बापाच्या अपराधाकरितां अजाण पुरुषांस व अजाण लेकरांस मारून त्यांचे प्राण हरण करावे हें हल्लींच्या मनूंत कोणास रुचणार नाहीं. त्यांतून बापाचे अपराध किती घोर होते हें बखरीवरून दिसतेंच आहे. शिवाजीची सत्ता चंद्रराव मोऱ्यानें मान्य केली नाहीं हाच त्याचा मोठा अपराध. " या अनेक विधानांस आधार काय ? आणि असें शिवाजी महाराजांच्या न्याय्य कृत्याचें क्रौर्य दर्शविणारें भलतेंच भेसुर चित्र भ्रमानें भाव्यासारख्या आमच्याच प्रिय इतिहासलेखकांनीं काढावें हें आश्चर्य नाहीं काय ? जदुनाथ सरकार सुद्धां या मोऱ्याच्या वधास Murder हा शब्द लावीत नाहींत. The two sons of More were put to death असें म्हणतात. 'तीन मोऱ्यांचे खून' हे शब्द चंद्रराव, सूर्याजीराव व हणमंतराव यांच्या वधाबद्दल लावतात. भावे या मुलांस बोलावून मारलें असें लिहितात हें कोठून ? ते भाऊ होते हेंहि चुकीचें दिसतें. हीं मुलें लहान होतीं अशीहि ते कल्पना करतात. पण ते १५।१६ वर्षांचे होते, असें वर्णन ९१ कलमी शिवाजी बखरींत स्पष्ट आहे. आणि या मुलांनीं विजापुरच्या दरबारशीं राजकारण सुरू केलें होतें व या गोष्टींचा कागदोपत्रीं पुरावा शिवाजी महाराजांनीं त्यांस दाखविला आणि मग त्यांचा शिरच्छेद करविला असें वर्णन चिटणीस-बखरींत असलेलें वर उद्धृत केलेंच आहे. त्याचा उल्लेख भावे करीत नाहींत ! !

हल्लींच्या मनूंत असलें कृत्य कोणास रुचणार नाहीं असें भावे लिहितात, पण तेंहि सपशेल चुकीचें आहे. हल्लीं हिंदुस्तानांत प्रचलित असलेल्या सामान्य व्यवहारास लागू असणारा पीनलकोड पाहिला तर राजाच्या विरुद्ध लढाईचा प्रयत्न करणाऱ्यास देहान्त शिक्षा सांगितली

आहे. शिवाजीनें जावळीचें राज्य खालसा केल्यानें हे चंद्ररावाचे पुत्र शिवाजीच्या राज्यांतील प्रजेच्या स्थितींत होते; तेव्हां त्यांनीं विजापुरकराशीं फितुरीचा प्रयत्न करणें देहान्त शिक्षेच्या योग्य होतें. बरें ते चौदावर्षांच्यावर असल्यानें पीनलकोडाप्रमाणें गुन्हेगार ठरण्यासहि योग्य होते. लहान मुलें असा शब्द मोघम भावे वापरतात. पण हे पुत्र १५।१६ वर्षांचे होते आणि राजाचे मुलगे या वयांत किती प्रौढ असतात, इतर स्थितींतल्या मुलांहून किती जास्त वाढलेले असतात हें हजारों उदाहरणांवरून सिद्ध होईल. शिवाजीनं सुद्धां तेराव्या वर्षापासून राज्य आटोपण्यास आरंभ केला. तात्पर्य १५।१६ वर्षांचे हे चंद्ररावाचे पुत्र पूर्ण जाणते असून कारस्थान करूं लागले तेव्हां मृत्यूची शिक्षा पावले हें न्याय्यच झालें.

आतां या कृत्याकडे राजकीय दृष्ट्या पाहूं. युद्धांत शत्रूस जिंकल्यानंतर जे लोक विशेषतः अधिकारी पाडाव होतील त्यांस जेत्यानें ठार मारावें; कैदेंत ठेवावें किंवा इच्छेस येईल तर मुक्त करावें असाच आजपर्यंतच्या इतिहासावरून राजनीतीचा नियम निघतो. किंबहुना प्राचीन, प्राच्य व पाश्चात्य, इतिहासाकडे पाहिलें तर जय झाल्यावर युद्धांत पाडाव झालेलेच नव्हे तर सामान्य शस्त्रधारी क्षत्रिय किंबहुना निःशस्त्र व न लढणारीं माणसें हजारों कत्तल केलीं गेलीं आहेत असें दिसतें. एक प्राचीन भारती आर्यांनीं मात्र जगाच्या आतिशय पुढें जाऊन अयुध्यमान, शस्त्रहीन, पलायमान यांजवर शस्त्र चालवूं नये असा धर्म–युद्धाचा उदात्त नियम घालून दिला होता. तो आतां कोठें पाश्चात्य राष्ट्रांत मान्य होऊं लागला आहे. पण इतर प्रसंगीं व ठिकाणीं पहावें तों पाश्चात्यांनीं हजारों लोकांच्या कत्तली युद्ध–जयानंतर केलेल्या आहेत. रोम व ग्रीस या राष्ट्रांच्या इतिहासांत तर कत्तली शिवाय जिंकलेल्या लोकांस गुलामगिरींत खेंचून नेण्याचा सर्वत्र प्रघात जारी होता. अलेक्झांडरनें हिंदुस्तानांत शहरें जिंकल्यानंतर हजारों अयुध्यमान क्षत्रियांच्या कत्तली केल्या. एके ठिकाणीं राजास ब्राह्मणांनीं युद्धास प्रवृत्त केलें या आरोपावरून हजारों ब्राह्मण त्यानें मारले. हा हिंदुस्थानचा इतिहास पाश्चात्यांनींच लिहिलेला आहे. महंमद गजनी, तैमुरलंग वगैरे मुसलमान जेत्यांनीं उत्तर हिंदुस्थानांत हजारों लोकांच्या कत्तली करून

मुंडक्यांचे पिरामिड रचले. दक्षिण हिंदुस्थानांतहि मुसलमानी बादशहांनीं अशाच भयंकर कत्तली केल्या आहेत. तालीकोटच्या विजयानंतर एक लाख हिंदु निरपराध अयुध्यमान मारण्याचा संकल्प एका बादशहानें करून पार पाडला. मुसलमान लोक क्रूर आणि हीन संस्कृतीचे; सुधारलेल्या इंग्रजांनीं सुद्धां हल्लींच्या मनूंत १८५८ सालाच्या बंडांत विजय झाल्यावर काय केलें? झांशी शहर घेतल्यावर निरपराध बिन लढवाई प्रजेचें बिजन केलें, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. पाश्चात्य देशांच्या इतिहासांत वेढ्यानंतर शहर काबिज झालें म्हणजे बहुधा आंतील लोकांचें बिजन झाल्याशिवाय राहिलें नाहीं. या दहशतीकरितां केलेल्या कतलीस खून ही संज्ञा देतां येत नाहीं हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे. हीं कृत्यें क्रूर होत पण अन्यायाचीं किंवा अक्षम्य नाहींत हें मान्य करावें लागेल, Everything is fair in war या तत्त्वानें तीं क्षम्य मानलीं जातात, हें खरें. असल्या क्षम्य पण क्रूर कत्तलीसुद्धां शिवाजी महाराजांनीं कधीहि केल्या नाहींत ही गोष्ट त्यांच्या इतिहासांत स्पष्ट दिसते. अयुध्यमान प्रजेच्या कत्तली युद्धांतील विजयानंतर त्यांनीं केल्या नाहींत हें त्यांस अत्यंत भूषणावह आहे. किंबहुना वर सांगितल्याप्रमाणें लढाईंत पाडाव झालेले फौजी सरदार सुद्धां त्यांनीं मारले नाहींत, कैदेंत ठेविले नाहींत, तर गौरवून वस्त्रालंकार देऊन मोंगलाकडे किंवा विजापूरवाल्याकडे वारंवार परत पाठविले आहेत हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

लढाईंत पाडाव झालेल्या राजासंबंधें किंवा युद्धनेत्यासंबंधें आणखी निराळी दृष्टि राजनीतींत आहे. अशा मनुष्यास मारून टाकणें हेंच पुष्कळप्रसंगीं क्षम्यच नव्हे तर युक्त दिसतें. राज्य खालसा केल्यावर राजास जिवंत ठेवणें म्हणजे लढाईचें मूळ आणि हजारों लोकांच्या मृत्यूचें कारण बाकी ठेवणें होय. यामुळें अशा प्रसंगीं त्यास मारून टाकण्याचा जेत्याचा अधिकार आहे. पण कैदेंत ठेवण्याचा अधिकार हल्लींच्या मनूंत सुद्धां सर्वत्र मान्य आहे. दत्ताजी शिंद्यास लढाईंत पाडाव झाल्यानंतर याच न्यायानें नजीबखानानें मारलें आणि नजीबखानाचा शिरच्छेद याच न्यायानें सदाशिवभाऊनीं करविला. शाबुद्दीन गोरीनें याच न्यायानें पृथ्वीराजास ठार मारविलें; व तैलपानें मुंज राजास सुळावर चढविलें. शेवटच्यास तैलपानें प्रथम कैदेंत ठेविलें होतें पण त्यानें कैदेंतून सुटून जाण्याचा प्रयत्न

केला तेव्हां त्यास देहान्त शिक्षा दिली. नेपोलियनास इंग्रजांनीं याच न्यायानें जन्मभर कैदेंत ठेविलें तें हल्लींच्याच मनूंत. यासाठीं कीं, यानें पुन्हां उठून हजारों लोकांच्या लढाईंत मृत्यूस कारणीभूत होऊं नये. तात्पर्य या राजनीतीचा विचार करतां शिवाजी महाराजांनीं चंद्रराव मोऱ्याच्या दोघां पुत्रांस प्रथम कैदेंत ठेविलें हें अन्यायाचें किंवा गैर कृत्य नव्हतें. आणि त्यांनीं जेव्हां विजापूरकरांशीं मिळून पुन्हां स्वराज्य स्थापनेच्या कार्यास विघ्न केलें तेव्हां मुद्दा पुरावा मिळाल्यावर तो दाखवून त्यांचा शिरच्छेद करविला हें न्याय्यच झालें.

शिरच्छेद करणें, मारणें, खून करणें या शब्दांत, जरी वध हाच मुख्यार्थ असला तरी, इंग्रजी Behead, Kill, Murder या शब्दांतल्या प्रमाणें-च निंद्यानिंद्यत्वाचा व्यङ्ग्यार्थ नेहमीं प्रतीत होतो हें लेखकांनीं व वाचकांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. खून अथवा Murder या शब्दांत हें कृत्य निंद्य आहे असा ध्वनि नेहमीं असतो व म्हणूनच याला Culpable homicide असा कायद्यांत शब्द असून Murder ही त्याची शेवटची पायरी आहे. मारणें, वध करणें अथवा Kill यांत निंद्यानिंद्यत्वाचा बोध होत नाहीं. आणि Behead अथवा शिरच्छेद करणें या शब्दांत नेहमीं कांहीं तरी अपराध लावून ज्यास अपराधाबद्दल शिक्षा करण्याचा ज्यास अधिकार आहे अशा मनुष्यानें शिक्षा दिल्यानंतरचा वध असा अर्थ ध्वनित होतो. चंद्रराव मोऱ्याच्या पुत्राचा शिरच्छेद केला असाच शब्द सर्व बखरींत आहे आणि एका बखरींत त्यांनीं कोणता गुन्हा केला आणि त्याच्या अंगीं तो कसा लावून दिला हेंहि स्पष्ट केलेलें आहे. अर्थात् या पुत्रांचा वध न्याय्य होता असेंच सर्व बखरकार म्हणतात आणि राजनीतीच्या व कायद्याचा हल्लींच्या दृष्टीनेंहि विचार करतां शिवाजीनें केलेलें हें कृत्य न्याय्य होतें असेंच ठरतें.

किंबहुना हा शिरच्छेद शिवाजीमहाराजांनीं अतिशय नाखुषीनें केवळ नाइलाजास्तव केला असला पाहिजे. मराठे शूरवीरांस एकत्र करून आपल्या स्वराज्य–स्थापनेच्या पवित्र कृत्यांत मदतीस घेणें हें तर त्यांना इष्ट होतें आणि असा प्रयत्न त्यांनीं सतत चालविला होता. ‘ मराठा

तितुका मेळवावा ' ही शिकवणूक त्यांस उपजत राजनीतीनें व नंतर गुरूनें दिलेली होती. हीं मुलें जर शिवाजीमहाजांच्या पवित्र कार्यास अनुकूल झालीं असतीं आणि विजापुरकरांचें दास्य पतकरून शिवाजीच्या कार्यास विघातक होण्याच्या प्रयत्नास लागलीं नसतीं तर शिवाजीमहाराजांनीं खातरीनें त्यांस जावळीसच नव्हे तर इतरत्र जाहगीर देऊन त्यांस नांवारूपास चढविलें असतें. चंद्रराव मोऱ्याचा अपराध तरी हाच आणि त्याच्या तरी पुत्राचा हाच. स्वराज्य—स्थापनेच्या उदात्त कार्यास प्रतिरोध कारणारे साप किंवा सापांचीं पोरें मारून टाकणें हेंच न्याय्य होतें आणि तें कृत्य करणाऱ्यास लागणारा मनाचा क्रूरपणा शिवाजीनें दाखविलाच पाहिजे होता. तसा दाखविला नसता तर स्वराज्य—साधन कधींच झालें नसतें. पण रा. भावे यांनीं या पुत्रांस उगीच्या उगीच मारलें असें भासविण्याचा जो प्रयत्न केला आहे तो केवळ चुकीचा आहे. शिवाजीच्या हृदयांत निरर्थक क्रूरता नव्हती ही गोष्ट त्याच्या अनेक कृत्यांवरून दिसते. त्यानें शेंकडों लढाईंत पाडाव केलेल्यांस जीवदान देऊन सोडलें. त्यानें तैमूर किंवा महमुदाप्रमाणें दहशत बसण्यासाठीं सुद्धां कधीं कत्तली केल्या नाहींत. हें इतिहासावरून सिद्ध होत असतां शिवाजीमहाराजांच्या उदात्त चरित्रास असा कलंक लावणें चुकीचें आहे. शिवाजीमहाराज कोणाच्या कत्तली करतील ? रयतेच्या ? लोकांच्या ? परकीय राजांना हें युक्त असेल पण शिवाजीच्या स्वराज्य—स्थापनेच्या महत्कार्यास ते विघातकहि होतें. तेव्हां स्वार्थ—दृष्टीनें सुद्धां असा वध करणें युक्त नाहीं हें शिवाजी महाराज जाणून होते. पण आडवें आलें म्हणजे पोटचें सुद्धां कापून काढावें लागतें या न्यायानें या दोघे मराठे वीरांस शिवाजीस शिरच्छेदाची शिक्षा देणें भाग पडलें असेंच दिसतें. असो, शिवाजी लुटारू; शिवाजी खुनी, असा भ्रम मागच्या पिढींत तीस वर्षांपूर्वी मुसलमानी इतिहासाचें सहेतुक अनुकरण करणाऱ्या इंग्रजी इतिहासावरून महाराष्ट्रांत झाला होता आणि मोंगलांच्या विरोधी इतिहासाचें पूर्वावलोकन झाल्यानें प्रथम नासकें तूप भरलेल्या भांड्यांत मागून चांगलें भरलें तरी जशी घाण जात नाहीं त्याप्रमाणें जदुनाथ सरकार सारख्या बंगाली इतिहासकारांच्या लेखांत अजूनहि आहे. पण या पिढींत महाराष्ट्रांत शिवाजीमहारजांच्या चरित्राच्या

उदात्तत्वाविषयीं निःशंकपणा वावरत असतां भाव्यांसारख्या महाराष्ट्रभक्त लेखकाच्या विचारसरणींत हा भ्रम पुनः उत्थित व्हावा, किंबहुना राजनीति व इतिहास यांच्या हल्लींच्या दृष्टीनें जे उत्तम विचार भाव्यांनीं आपल्या पुस्तकांत अफझलखानाचा वध दूष्य किंवा प्रशस्य याची चर्चा करतांना नमुद केले आहेत, तेच विचार पुस्तकाच्या प्रारंभीं चंद्रराव मोऱ्याच्या प्रकरणांत त्यानीं साफ विसरावे याचें राहूनराहून सखेद आश्चर्य वाटतें. या निबंधांत भिन्न दृष्टीनें केलेलें चंद्रराव मोऱ्याच्या या प्रकरणाचें विवेचन भावे व इतर वाचक सप्रेमसहानुभूतीनें वाचतील अशी आशा प्रदर्शित करून हा लेख पुरा करतों.

चिंतामण विनायक वैद्य

# मध्ययुगीन राज्यपद्धति.

## आणि

# शिवाजीचे अष्ट प्रधान.



मध्ययुगीनकालाचा, म्हणजे इ. स. ६०० पासून इ. स. १२०० शें पर्यंत जीं हिंदुस्थानांत हिंदु राज्यें झालीं त्यांचा, इतिहास आम्हीं कोरीव लेखांवरून जुळवून विस्तृत रीतीनें मराठी वाचकांपुढें मांडला आहे. या हिंदु–राज्यांत राज्यव्यवस्था कशी होती याचा विचार कोरीव लेखां-वरूनच करतां जी परिस्थिति आमच्या नजरेस आली ती शिवाजीमहाराजांनीं अमलांत आणलेल्या राज्यपद्धतीहून अगदीं भिन्न आहे हें पाहून आम्हांस आश्चर्य वाटलें. ती पद्धति मुसलमानी काळांतच अगदीं संपूर्णपणें नष्ट झाली होती, हेंहि थोडेसें आश्चर्य करण्यासारखें आहे. कारण, परकी राज्य कितीहि जोरदार व सुधारलेलें असलें तरी स्थानिक तद्देशीय राज्यांतील कांहीं कांहीं गोष्टी बाकी राहतातच. उदाहरणार्थ हल्लीं ब्रिटिश राज्यांत पूर्वी असलेल्या मराठी किंवा मोंगली राज्यांतील शब्द व अधिकारपद्धति अवशिष्ट आहे. मामलेदार, तहशीलदार, कारकून, फडणीस, अव्वल कारकून वगैरे शब्द, तसेंच त्यांचे अधिकार कायम ठेवले गेले आहेत. किंबहुना ब्रिटिश राज्यांत पूर्वीची प्रांतांतील ठिकठिकाणची जमीनमहसुलाची पद्धति कायम आहे. परंतु प्राचीन हिंदुराज्यें कबजांत घेऊन मुसलमानांनीं जी राज्यपद्धति अमलांत आणली त्यांत मागचें कांहीं एक ठेवलेलें दिसत नाहीं. यांत मुसलमानी राज्य-व्यवस्थापकांची जशी बुद्धिमत्ता दिसते त्याचप्रमाणें त्यांची असहिष्णुताहि दिसते. असो, मध्ययुगीन कालाच्या हिंदुराज्यांतील १३ व्या शतकांपर्यं-तची राज्यव्यवस्था दोनतीनशें वर्षें बिलकूल नाहींशी झाल्यानें, शिवाजी महाराजांनीं १७ व्या शतकांत जेव्हां हिंदुराज्याची पुनः स्थापना करून नवीन राज्यपद्धति अमलांत आणली त्या वेळेस मध्ययुगीन काळांतील कांहींच गोष्टी त्यांस घेतां येतां आल्या नाहींत यांत आश्चर्य नाहीं.

तर मग शिवाजीमहाराजांनीं आपली अष्टप्रधानांची व्यवस्था व नांवें कोठून घेतलीं हा महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. या प्रश्नाचा उलगडा रा. शेजवलकर यांनीं भारतेतिहाससंशोधकमंडळाच्या त्रैमासिकांत ( एप्रिल १९२३ ) निबंध प्रसिद्ध केला आहे त्यांत बऱ्याच चांगल्या रीतीनें केला आहे. किंबहुना शिवाजी महाराजांच्या पद्धतीचें मूळ शुक्रनीतिसारांत असल्याचें जें त्यांनीं दाखविलें आहे त्याचें श्रेय त्यांसच खरोखर देण्यासारखें आहे. पण शुक्रनीतींत दिलेलीं नांवें सुद्धां मध्ययुगीन कालांतील नांवें नव्हत. तेव्हां शुक्रनीतिसारांतील नांवें प्रत्यक्ष कोठें अमलांत होतीं कीं नाहीं याची शंका वाटते; आणि शुक्रनीतिसार हा ग्रंथ मुसलमानी काळांत कोणी कल्पक मनुष्यानें लिहिला असावा असें ठरतें. या ग्रंथाच्या आधारें शिवाजीमहाराजांच्या दरबारांतील पंडितांनीं प्रधानांचीं संस्कृत नांवें महाराजांच्या पुढें ठेवलीं असावीं आणि महाराजांनीं आपल्या सोई व कल्पनेप्रमाणें त्यांत कमीजास्त करून आपली राज्यपद्धति बनविली. ती कशी हें आपण विस्तारानें पाहूं.

“ सुमंत्रः पंडितो मंत्री प्रधानः सचिवस्तथा । अमात्यः प्राड्विवाकश्च तथा प्रतिनिधिः स्मृतः । ” हा श्लोक शुक्रनीतिसारांतून रा. शेजवलकर यांनीं उध्दृत केला आहे, त्यांतील एकेक शब्द आपण घेऊं. प्रतिनिधि याच्या ऐवजीं महाराजांनीं सेनापति अष्टप्रधानांत घातला हें युक्तच केलें. शुक्रनीतिसारांत प्रधानांत सेनापति नाहीं ही मोठी उणीव होती. मध्ययुगीन कालांतील राज्यांत कोरीव लेखांत सेनापति हा प्रधानांपैकीं असे. प्राड्विवाक् म्हणजे न्यायाधीश; हा कठिण संस्कृत शब्द बदलून सहज समजणारा त्या ऐवजीं हा दुसरा घातला, यांत महाराजांचें चातुर्यच दिसून येतें. मध्ययुगीनकालांतील राज्यव्यवस्थेंत प्राड्विवाक् अथवा न्यायाधीश नाहीं, याचें वाचकांस आश्चर्य वाटेल. पण मध्ययुगीनकालांतील न्यायपद्धति अगदीं निराळी असे. गांवांतील तंटे बहुतेक गांवपंचायतींत तोडले जाऊन पुढें वाढतच नसत. महत्त्वाचे खटले जे थोडे बहुत उत्पन्न होत ते प्रत्यक्ष राजाच्या दरबारांत राजापुढें चालत आणि त्यांचा निकाल सभ्यांच्या मदतीनें व प्रधानांच्या सल्ल्यानें राजा स्वतः करीत असे. राज्यें साधारणपणें लहान असल्यानें ही गोष्ट शक्य असे. मन्वादि स्मृत्यांचाहि हाच आदेश आहे; आणि राजास फुरसत नसल तर त्यानें प्राड्विवाक् नेमावा असा स्मृत्यांचा

नियम आहे. पण प्राड्विवाकाचा किंवा न्यायाधीशाचा उल्लेख मध्ययुगीन कालांतील कोरीव लेखांत मुळींच आढळत नाहीं. राजासमोर महत्त्वाचे मुकद्दमे चालल्यानें त्यांचा निकाल जलदी व कायमचा होत असे आणि अपिलाची भानगडहि रहात नसे. अलबेरुनी (इ. स. १०३०) नें असें लिहिलें आहे कीं "साक्षीदारांची उलट तपासणी घेत नाहींत." वकिलांची संस्था ही ब्रिटिश राज्यांत उत्पन्न झाली असून मध्ययुगीन कालांत उलट तपासणीची भानगडच नसे; व साक्षीदारांची साक्ष मोठ्या शपथक्रियेनें होत असल्यानें साक्षीदार, विशेषतः राजापुढें, खरेंच सांगत असत. शिवाजीमहाराजांनीं प्राड्विवाक् अथवा न्यायाधीश कायमचा प्रधान नेमला ही गोष्ट मध्ययुगीन कालाला बराच फरक पडल्यानें शिवाजीमहाराजांनीं युक्तच केली. कारण पूर्वींचे राजे वेदशास्त्राध्ययनसंपन्न असून बहुधा स्मृतिशास्त्रज्ञ होते. भोजाचा तर स्मृतिशास्त्रावर एक ग्रंथ आहे. ठाण्याच्या अपरादित्य शिलाहार राजानें याज्ञवल्क्य स्मृतीवर विस्तृत टीका लिहिली असून ती काश्मीर इतक्या दूरदेशांत अद्याप मानली जाते. अशा प्रकारचें सामर्थ्य शिवाजीमहाराजांत नव्हतें, पण प्रजेस यथाशास्त्र न्याय मिळावा ही त्यांची इच्छा जागृत असल्यानें त्यांनीं न्यायाच्या कामांत मदत करण्यासाठीं न्यायाधीश हा स्वतंत्र प्रधान नेमला.

आतां आपण अमात्याविषयीं विचार करूं. अमात्य हा नीतिसारांत जमिनीचा प्रधान आहे, पण शिवाजीच्या अष्टप्रधानांत तो राज्याच्या जमाखर्चाचा कारभारी झाला असें रा. शेजवलकर म्हणतात. हें कितपत बरोबर आहे हें सांगतां येत नाहीं. तथापि हें निश्चित आहे कीं, मध्ययुगीन कालांत जमीनीचा अधिकार असलेला प्रधान अमात्यसंज्ञित नव्हता. अमात्य हें नांव बहुतेक राज्यांतून मध्ययुगीन कालांतील कोरीव लेखांत मुख्य प्रधानांचें येतें. मुख्य प्रधानास कांहीं राज्यांत महामात्य असें म्हणत व कांहींत नुसते मंत्रि म्हणत. शिवाजीनें आपल्या मुख्य प्रधानास पेशवा हें फारशी नांव ठेवून मुख्य प्रधान असेंहि नांव ठेवलें. शिवाजीमहाराजांनीं सर्व संस्कृत नांवें उपयोगांत आणलीं पण मुख्य प्रधानाचें नांव पेशवा हेंच मुसलमानी कायम ठेवलें; यांत त्यांचा हेतु असा दिसतो कीं एक तर लोकांना या नांवाची सहवासानें इतकी खोड पडून गेली होती कीं तें नांव बदलणें महाराजांस सोईचें वाटलें नाहीं. आणि दुसरें, विजा-

पूरचा किंवा अहमदनगरचा बादशहा सुलतान जसा स्वतंत्र असून त्याचा मुख्य प्रधान एक पेशवा असतो तसा मी स्वतंत्र असून माझाहि आहे हें लोकांच्या हृदयांत उतरण्यासाठीं त्यांनीं हें एकच मुसलमानी नांव कदाचित् कायम ठेवलें असावें.

पण मुजुमदार, सुरनीस, सबनीस, डबीर इत्यादि फारशीं नांवें काढून टाकून त्यांच्या ऐवजीं संस्कृत नांवें त्यांनीं योजिलीं व तीं अद्याप प्रचारांतहि आहेत. मुजुमदाराच्या ऐवजीं त्यांनीं अमात्य नांव योजिलें यांत शंका नाहीं. पण अमात्याचा हा अर्थ शिवाजीमहाराजांचा असून मध्ययुगीन नव्हे. त्याचप्रमाणें परराष्ट्रीय खात्याचा प्रधान सुमंत्र (याचें हल्लींचें रूप समंत आहे) असून शुक्रनीतिसारांत त्याचें काम राज्याच्या जमाखर्चाचें होतें असें शेजवलकर म्हणतात. मध्ययुगीन राज्यांत सुमंत्र नांवाचा कोणीहि प्रधान कोरिवलेखांवरून असलेला दिसत नाहीं. परराष्ट्रीय प्रधानाचें नांव सांधिविग्रहिक असें सर्व राज्यांतील कोरीव लेखांत येतें. हें मुसलमानी राज्याच्या वेळीं बिलकुल लुप्त होऊन नीतिसारांत त्याचा मागमूसहि नाहीं. जमीनमहसूलखात्याचा अधिकारी शिवाजीच्या राज्यपद्धतींत कोण होता हें लक्षांत येत नाहीं. या खात्याचा अधिकारी मध्ययुगीन कालांत महाक्षपटलिक असे. हेंहि नांव मुसलमानीकाळांत लुप्त होऊन नीतिसारांतहि त्याचा मागमूस नाहीं.

पंडित हें नांव नीतिसारांत नवीनच कल्पिलेलें दिसतें. कारण, मध्ययुगीन कालांतील कोरीव लेखांत धर्मखात्याचा अधिकारी महाधर्माध्यक्ष या नांवानें संबोधिला जात असे. त्याचप्रमाणें सचिव हेंहि नांव अगदीं नवीन असून नीतिसारानें तें नवीन कल्पिलेलें दिसतें. कारण, नीतिसारांत त्याचें काम युद्धखात्याचा प्रधान हें असल्याचें रा. शेजवलकर म्हणतात. पण हें चमत्कारिक दिसतें. सचिवाचा युद्धखात्याशीं विशेष संबंध लागत नाहीं. शिवाजीमहाराजांच्या राज्यपद्धतींत सचिवाकडे दप्तराचें काम असे. पूर्वी सांगितल्याप्रमाणें सचिव हें नांव मध्ययुगीन कालाच्या कोरीव लेखांत मुळींच येत नाहीं. त्या वेळेस दप्तर असे याबद्दल शंकाच नाहीं. जमिनीची मोजणी सुद्धां होऊन जमिनीच्या महसुलाचें पत्रक त्याकाळीं तयार होत असे व त्यास करण ही संज्ञा होती. ठाण्याच्या शिलाहारांच्या राज्यांत जमिनीच्या महसुलाचा अधिकारी श्रीकरण नांवाचा असे. जमिनीचे व इतर कागदपत्र

मध्ययुगीन कालांत कोणत्या अधिकाऱ्याच्या स्वाधीन असत हें निश्चयानें सांगतां येत नाहीं, पण राजाचा शिक्का मोर्तब महामुद्राधिकारी नांवाच्या अधिकाऱ्यापाशीं असे.

आठवें नांव उरलें तें मंत्री होय. मध्ययुगीन कालांत हें नांव मुख्य प्रधानाचें असे. नीतिसारांत मंत्री हा परराष्ट्रीय प्रधान आहे, पण शिवाजी-महाराजांच्या अष्ट–प्रधान पद्धतींत तो खाजगी कारभारी आहे. खाजगी कारभाऱ्याचें काम मध्ययुगीन कालांत अंतःपुरिक नांवाच्या अधिकाऱ्या-कडे असें.

वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल कीं, प्रधानांची संस्था ही प्राचीनकाळापासून असलीच पाहिजे, त्याप्रमाणें मध्ययुगीन कालांतील राज्यांत होती, व शिवाजीमहाराजांनीहि स्थापिलेल्या स्वराज्यांत उत्पन्न केली. पण मध्ययुगीन कालांतील नांवें व कामें शिवाजीमहारा-जांच्या अष्टप्रधानपद्धतींत दिसत नाहींत हें निर्विवाद आहे. शिवाजी महाराजांनीं नांवें नीतिसारांतून घेतलीं तरी, त्यांच्या कामांत बराच बदल केला. प्रधानांचे आधिकार काय होते व त्यांस वेतन काय मिळे हें मध्ययु-गीन इतिहासांत सांपडत नाहीं. शिवाजीमहाराजांस ती व्यवस्था स्वतंत्र करावी लागली. चिटणीस, फडणीस हीं नांवें मराठी राज्यांत कशीं उत्पन्न झालीं व देशमूख, देशपांडे वगैरे स्थानिक अधिकाऱ्यांचीं नांवें मध्ययुगीनकालांत दिसत नाहींत तीं केव्हां उत्पन्न झालीं, वगैरे अन्य प्रश्नांबद्दल जास्त चौकशी करून अन्य प्रसंगानें लिहितां येईल.

---

# शिवाजीमहाराजांचा महाराष्ट्रधर्म.

## ( श्रीशिवाजीजयन्ती अंक )

शिवाजीमहाराजांनीं महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापन केलें याबद्दल कोणाचाच मतभेद नाहीं. स्वराज्य असावें अशी कल्पना किंवा इच्छा त्यावेळीं किंवा त्यापूर्वीं शेंकडोंना झाली असेल, पण स्वराज्य स्थापणें शक्य आहे ही कल्पना शहाजीराजांना स्पष्टपणें आली व त्यानीं तसें करूनहि थोडेसें दाखविलें. पण स्वराज्य स्थापण्याचा प्रयत्न करणें धाडसाचें आहे; शक्य असलें तरी संभाव्य नाहीं आणि या प्रयत्नांत पदरचें आहे तें तरी घालवून बसू नये अशा विचारांचे शहाजीराजे होते, असा माझा समज आहे. शिवाजीमहाराजांची खरी थोरवी यांतच आहे कीं, स्वराज्य स्थापन करणें संभाव्य आहे इतकेंच नव्हे, तर तें मी स्थापन करून दाखवीन, या प्रयत्नांत प्राण गेला तरी हरकत नाहीं, जहागीर गेली तरी परवा नाहीं, अशा प्रकारें स्वतःचें सर्वस्वी नुकसान सोसण्याचें धाडस करून त्यांनीं पाऊल टाकलें. याच त्यांच्या स्वभावाला आणि विचाराला ओळखून शहाजीराजांनीं त्यांस आपल्यापासून दूर करून पुण्यास ठेविलें आणि आपण निराळी जाहागीर बेंगरूळाकडे संपादन करून राहिले. तात्पर्य हें धाडस शहाजीराजांनीं केलें नाहीं. शिवाजीचा उपक्रम ओळखून त्यास त्यांनीं अडथळा केला नाहीं किंबहुना एक स्वतंत्र जहागीर प्रथमच साधन करून दिली व अन्य रीतीची सहानुभूति दाखविली; पण त्याच्या उद्योगाचा दोष किंवा जोखीम आपल्यावर येऊं दिली नाहीं. तात्पर्य स्वराज्यस्थापनेच्या कल्पनेचें मुख्य श्रेय शिवाजी महाराजांसच नसलें तरी ती कल्पना आपल्या बुद्धिवैभवानें, धाडसानें, व पराक्रमानें सिद्धीस नेण्याचें श्रेय शिवाजीमहाराजांस आहे.

या स्वराज्याची कल्पना शिवाजी महाराजांची काय होती? स्वराज्य म्हणजे भोसल्याचें राज्य अशी त्यांची कल्पना खास नव्हती. कदाचित् शहाजी राजांची कल्पना तशी असेल. स्वराज्य म्हणजे महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांचें स्वधर्म–स्थापनायुक्त राज्य, अशीच व्यापक कल्पना शिवाजी महाराजांची होती. मोठ्या विभूति कांहीं नवीन कल्पना प्रस्थापित करतात आणि त्यासाठीं एखादा नवीन शब्दहि रूढींत आणतात. गोष्टी जरी मुळांत

त्याच पूर्वींच्या असल्या तरी नवीन दृष्टि व नवीन शब्द रूढ करणें हें महान् विभूतीचें एक कार्य होय. नॉन–को–ऑपरेशन, बायकॉट बहिष्कार ( असंग ) इत्यादि कल्पना व शब्द अशा तऱ्हेचे आहेत. स्वराज्य शब्द हिंदुस्थानाच्या इतिहासांत शिवाजी महाराजांपूर्वी सांपडणार नाहीं आणि तो शब्द जो एकदा प्रचलित झाला तो हल्लींच्या काळींहि समान परिस्थितींत काम देत आहे. दादाभाईसारख्या परस्थ पारशी गृहस्थानें पुन्हां तो प्रचलित केला आहे. महाराष्ट्रांत पूर्वी चालुक्य, राष्ट्रकूट, यादव यांचें राज्य होतें, पण त्यास कोणी स्वराज्य म्हटलें नाहीं. स्वराज्याची कल्पना परराज्याशिवाय यावयाची नाहीं. परकीधर्माचा राजा व त्याचें राज्य चालविणारे परकी धर्माचे व परमुलुखाचे, अशी परिस्थिति जेव्हां महाराष्ट्रांत दोन तीनशें वर्षें राहून धर्माचा आणि अर्थाचा दोहोंचा जुलूम सर्व महाराष्ट्रीयांवर झाला तेव्हां स्वराज्य पाहिजे, आपल्या धर्माचा राजा पाहिजे, व राज्य चालविणारे अधिकारी, फौजी व मुलुखी, आपल्या देशांतील पाहिजेत ही तीव्र जाणीव महाराष्ट्रांत उत्पन्न झाली. आणि या आकांक्षेस स्वराज्याची लालसा हें नांव शिवाजी महाराजांनीं देऊन तें ध्येय आपल्यासमोर व लोकांसमोर मांडलें. या स्वराज्य शब्दांत अर्थातच मोहिनी भरली होती. आमचे महाराष्ट्रीयाचें राज्य महाराष्ट्रांत झालें पाहिजे व होणार अशी प्रत्येकास इच्छा व उमेद आली आणि साहजिकच लोकांची सहानुभूति शिवाजी महाराजास मिळाली.

पण या स्वराज्याची व्याप्ति महाराष्ट्रापुरती होती हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हल्लीं स्वराज्याची व्याप्ति जशी हिंदुस्थास व्यापून आहे तशी तेव्हां नसणें साहजिकच आहे. स्वराज्याची सनद दिल्लीहून बाळाजी विश्वनाथानें आणली, त्या लेखांत स्वराज्य शब्दाचा अर्थ महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांचें स्वतंत्र राज्य आहे हें आम्हांस मान्य आहे असाच होता. शिवाजी महाराजांच्या दृष्टीनें मराठी भाषा बोलणारे हिंदुधर्मीय श्रुतिस्मृत्युक्त वर्णाश्रमधर्म चालविणारे ज्या प्रदेशांत राहतात तो महाराष्ट्र आणि त्यांत स्वराज्य. त्याच्याबाहेर महाराष्ट्राची किंवा भोंसल्यांच्या राजवंशाची सत्ता असल्यास ती स्वराज्यस्वरूपाची नव्हे अशीच त्यांची कल्पना दिसते. कारण तेथें चौथाई आणि सरदेशमुखीचे हक्क त्यांनीं संपादन केले. संभाजी, राजाराम यांच्या वेळेसहि स्वराज्य याचा अर्थ महाराष्ट्रांतील महाराष्ट्रीयांचें राज्य असाच दिसतो. बंगाल्यांत किंवा माळव्यांत मराठ्यांचें स्वराज्य नसून साम्राज्य

होतें असेंच म्हणावें लागतें. आणि साम्राज्य पेशवाईच्या काळीं स्थापित झालें, तत्पूर्वी झालें नाहीं. शिवाजी महाराजांच्या मनांत असें साम्राज्य स्थापित करण्याचा विचार होता किंवा नाहीं, हा प्रश्न सोडविणें कठिण आहे. शिवाजीमहाराजांचें तंजावरकडील राज्य हेंहि साम्राज्य स्वरूपाचें होतें, स्वराज्य नव्हतें. तथापि तें राज्य शहाजीराजांच्या मरणानंतर कांहीं वारसानें आलेलें होतें व कांहीं जिंकलेलें होतें. असो, स्वराज्यस्थापनेच्या उच्च मनोभावनेच्या दृष्टीनें केलेला शिवाजीमहाराजांचा उदात्त उपक्रम आणि साम्राज्य स्थापनेकरितां केलेला पहिल्या बाजीरावाचा उपक्रम यांत अंतर आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे; आणि जे दोष थोडेबहुत या पुढील उद्योगांत दिसतात ते प्रथम उद्योगांत मुळींच नसून त्याचें कार्यक्षेत्र उच्चतर भूमिकेवर होतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

स्वराज्य शिवाजी महाराजांनी स्थापिलें आणि तें हल्लींच्या तऱ्हेच्या कल्पनेनें केवळ स्ववंशाचें राज्य नसून देवाब्राह्मणांचें, लोकांचें, महाराष्ट्रीयांचें, स्वदेशांत राज्य अशा कल्पनेचें होतें असें मला वाटतें आणि त्याची व्याप्ति महाराष्ट्रापुरती होती. महाराष्ट्रधर्म हें याच कल्पनेचें स्वरूप आहे, असा माझा समज आहे. महाराष्ट्रांत महाराष्ट्रीयांचेच स्वधर्माचें म्हणजे वैदिक धर्माचें राज्य म्हणजेच स्वराज्य आणि महाराष्ट्रधर्म. महाराष्ट्रधर्म हा शब्द प्रथम प्रामुख्यानें श्रीसमर्थ रामदास यांच्या लेखांत येतो हें प्रसिद्ध आहे. 'रामदास आणि रामदासी' यांत 'महाराष्ट्रधर्म' या मथळ्याखालीं जी विस्तृत माहितीनें आणि विचारानें भरलेली लेखमाला प्रसिद्ध होत आहे त्यांत रामदासापूर्वी महाराष्ट्रधर्म हा शब्द प्रचारांत होता आणि गुरुचरित्रांत तो एके ठिकाणीं आहे असें दाखविलें आहे तें मान्य केलें पाहिजे. तथापि पूर्वींचाच शब्द असला तरी तो शब्द विशिष्ट अर्थानें वापरण्याचा मार्ग सांगितल्याप्रमाणें समर्थांनीं प्रघात घातला म्हणून त्यास विशिष्ट सामर्थ्य आलें. धर्म शब्द मुख्यतः religion अर्थी असला तरी हिंदुधर्मांत राजधर्म अन्तर्भूत होतो आणि राजधर्माशिवाय वर्णाश्रमधर्म निराबाध चालत नाहीं हें प्रथमपासून आपल्या इकडे मान्य आहे; आणि म्हणूनच स्मृत्यांतून धर्माच्या बरोबर राज्यव्यवहाराचेहि नियम दिलेले असतात हें प्रसिद्ध आहे. तथापि राजकारणाचा हरिनामस्मरणाशीं निकट संबंध आहे अशी तीव्रभावना रामदासांसच होती, तुकाराममहाराजांस नव्हती असें

नाहीं. महाराष्ट्रांतील यवनी राजसत्ता देशाच्या व धर्माच्या सुस्थितीस अत्यंत जाचक होत आहे हें त्यांनांहि दिसत होतें आणि तीव्र दुःख होत होतें. पण त्यांनीं राजकारण आपला विषय नव्हे असें सांगून आपल्यास केवळ हरिभजनास वाहून घेतलें होतें व त्या रीतीनें देशाचें आध्यात्मिक सामर्थ्य ते वाढवीत होते. रामदासांनीं दोन्ही उद्योग अंगावर घेतले आणि म्हणूनच ते शिवाजीमहाराजांचे योग्य रीतीनें गुरु झाले. रामदासांच्या शिकवणीनें शिवाजी महाराजांनीं स्वराज्यस्थापनेचा उद्योग केला ही कल्पना चुकीची. हा उद्योग व संकल्प त्यांचाच. पण त्यांस गुरु त्यांच्या मताचा भेटला हें उत्तम झालें. आणि साधारणतः असाच नियम घालून देतां येईल. आध्यात्मिक ध्येय एकच असलें तरी त्याचे मार्ग अनेक असल्यानें आपल्या प्रकृतीस जुळेल असाच उपदेश करून मार्ग दाखविणारा गुरु आपल्यास भेटावा व आपण करावा. तात्पर्य आपल्या सुराशीं मिळेल असाच संवादी सुराचा योग उत्तम असतो आणि जुळतो, आणि या न्यायानें शिवाजी-महाराज आणि रामदास समर्थ ही जोडी एका सुराची होती आणि म्हणूनच जुळली. असो तर, राजकारण आणि हरिभजन यांची सांगड घालून उपदेश करणारे रामदास आणि हा उद्योग करणारे शिवाजीमहाराज यांच्या दृष्टीनें महाराष्ट्रधर्म म्हणजे महाराष्ट्रांत स्वराज्यस्थापनापूर्वक चाल-विलेला वैदिक वर्णाश्रम–धर्म, असा अर्थ अभिप्रेत होता आणि अशा अर्थानें त्यांनीं तो शब्द वापरून त्यांत सामर्थ्य उत्पन्न केलें असें मला वाटतें. अशा रीतीनेंच वैदिक धर्मास सनातनधर्म किंवा भारतधर्म असें आपण संबोधितों. त्या शब्दापासून कांहींतरी विशिष्ट निराळा अर्थ महा-राष्ट्र धर्म या शब्दांत निघतो असें माझें मत आहे. अर्थात् स्वराज्यस्थापन युक्त महाराष्ट्रांत स्वधर्मी महाराष्ट्री राजे असून त्यांनीं चालविलेला वैदिक वर्णाश्रमधर्म असा याचा अर्थ आहे असें मला वाटतें.

प्रबळ झालेल्या यवनसत्तेस कसें हाणून पाडावें आणि महाराष्ट्र धर्म कसा स्थापन करावा हा अत्यंत बिकट प्रश्न शिवाजी महाराजांसमोर होता. यवन राजांशीं म्हणजे त्यांच्या सैन्याशीं युद्ध करून त्यांचा पाडाव करणें शक्य होतें, हें शहाजी राजांनीं स्पष्ट दाखविलें. तथापि एक महत्त्वाची बाब अडचणीची होती. हिंदुस्थानांत प्राचीन काळापासून राज्यें होतीं, राष्ट्रें नव्हतीं. राज्य म्हणजे राजाचें आणि तें त्याच्या मालकीच्या

धनाप्रमाणें. राज्य लोकांचें आणि त्याची मिळकत लोकांची ही कल्पनाच अतिशय प्राचीन काळींच हिंदुस्थानांत नष्ट झाली होती. अर्थात् राज्य म्हणजे Kingdom-peopledom नव्हे असें वाटत गेल्यानें सर्व धडपड राजवंश टिकवावयाची असे. लोकांचें राज्य स्थापन करण्याची कल्पनाच नाहीं, तेथें राष्ट्रीय भावना कोठून जागणार आणि स्वदेशभक्ति तरी कोठून जागृत राहणार ? स्वामिभक्ति हीच मोठेपणाची खूण होती. हिंदुस्थानांत प्राचीन काळापासून Loyalty स्वामिभक्ति जागृत असून Patriotism ला-स्वदेशप्रीतीला वाव नव्हता. यामुळें परकी राजा का असेना, त्याचीच सेवा करून स्वामिभक्तीनें-loyalty नें-राहणारे स्वदेशाचेच लोक पूर्वी असत, व हल्लींहि तीच रडकथा आहे. सर्व जोर आणि मान loyalty चाच आहे. तुम्ही यवनाची नोकरी कां करतां असें अनेक मराठे सरदारांस विचारलें तर स्वामिभक्ति, गादीशीं निमकहरामीपणा करणें अन्याय असें उत्तर मिळे. तात्पर्य, यवनांचें सामर्थ्य केवळ यवनी फौजेवर अवलंबून नसून त्यांस मदत करणाऱ्या अनेक स्वदेशी वीरांवरहि अवलंबून होतें. अशा कल्पनेचा प्रतिकार करण्यास राज्य राजवंशजांचें नसून लोकांचें आहे, देवाब्राह्मणांचें आहे, आणि लोकांच्याच धर्माचा पाठीराखा राजा पाहिजे अशा प्रकारच्या उपदेशाची म्हणजे महाराष्ट्रधर्माच्या उपदेशाची त्या वेळीं अवश्यकता होती. ही गोष्ट शिवाजीमहाराजांच्याहि लक्षांत आली आणि समर्थांच्याहि लक्षांत आली, आणि देशी लोकांचें लक्ष यवन-सेवेपासून वळवून स्वराज्यस्थापनेकडे वळविण्याचा प्रयत्न दोघांनीं आप-आपल्या परीनें केला हें प्रसिद्धच आहे.

दुसरी गोष्ट अशी कीं, याहीमागें जाऊन विचार करूं लागलों तर प्रथम ज्या वेळीं यवनांनीं महाराष्ट्र जिंकला त्या वेळीं त्यांच्या फौजेंत मराठे नव्हते हें खरें आहे. कदाचित् इंग्रजांनीं हिंदुस्तान जिंकलें त्या वेळीं त्यांची फौज इंग्रजी व हिंदुस्तानी अशा शिपायांची असल्यानें इंग्रजांनीं हिंदुस्तान हिंदुस्तानच्याच लोकांच्या साहाय्यानें जिंकलें आणि या देशांत राष्ट्रीय भावना जागृत ननल्यानें आम्हीं आमच्याच लोकांविरुद्ध कसे लढूं ही कल्पना आमच्या लोकांस शिवली नाहीं. पण यवनांनीं हिंदुस्तान जिंकलें त्या वेळींतरी त्यांच्या फौजेंत हिंदु शिपाई नव्हते. पण एखादी लढाई जिंकली तरी सर्व राष्ट्र कसें जित झालें याचा विचार करतां राष्ट्र लोकांचें आहे, राजाचें नव्हे ही गोष्ट आमच्या लोकांस उमजली नाहीं हेंच

यांचें कारण आहे हें दृष्टोत्पत्तीस येईल. अल्लाउद्दीनानें रामदेव जाधवास जिंकल्याबरोबर जाधवाचें राज्य म्हणजे महाराष्ट्र, मुसलमानांचें झालें असेंच लोक समजत. मालकमच्या हातावर बाजीरावानें राज्याचें उदक सोडल्या-बरोबर महाराष्ट्र इंग्रजांचें झालें. पण महाराष्ट्र बाजीरावाचें नसून लोकांचें आहे हें जर लोक जाणते तर आपलें राष्ट्र कायम ठेवण्यासाठीं लोक प्रयत्न करते. तात्पर्य, समर्थोपदिष्ट महाराष्ट्रधर्माचें खरें इंगित शिवाजी महाराजांच्या लक्षांत आलें होतें, व राजारामाच्या वेळीं त्याच्या हाताखालीं जिवापाड मेहनत करणाऱ्या लोकांच्याहि लक्षांत आलें होतें. यामुळें सर्व महाराष्ट्र अवरंगजेब स्वतः प्रचंड सेना घेऊन व्यापून बसला होता तरी डगमगला नाहीं, किंवा त्यांचें स्वातंत्र्य नष्ट झालें नाहीं. No independent people can be conquered by a foreign army however large या पाश्चात्य राजकीय महत्त्वाचा प्रयोग प्रत्यक्ष महा-राष्ट्रानें दाखविला.

लढवय्या लोकांतहि प्रभु, ब्राह्मण आणि मावळे वगैरे लोक होते, व मराठे क्षत्रियहि होते हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आणि शिवाजीनें सर्वांचा उपयोग करून घेतला. या प्रमाणें सर्व मराठ्यांचें साहाय्य मिळालें तेव्हां यवनी सत्तेचा पराभव होऊन स्वराज्य व स्वधर्म यांची स्थापना झाली. शिवाजीमहाराजांना केवळ मराठे क्षत्रियांचाच अभिमान होता असें नाहीं, किंवा केवळ त्यांचाच उत्कर्ष व्हावा अशी कल्पना नव्हती. सर्व महाराष्ट्रीयांचा हा देश आहे आणि यांत स्वराज्यस्थापना व्हावी एतदर्थ सर्वांनीं प्रयत्न केला तरच फलोद्देश होईल अशी राष्ट्रीय कल्पना शिवाजी-महाराजांस होती हें यावरून निर्विवाद दिसतें.

परकीय व परधर्मी सत्तेस केवळ क्षत्रियांनीं प्रतिबंध होणें शक्य नाहीं हें तत्त्व प्राचीन काळीं समजलेलें होतें हें नाकबूल करतां येणार नाहीं, पण हें तत्त्व पुढें विसरलें गेलें. या प्राचीन सिद्धान्ताची नीट कल्पना मनुस्मृतीच्या पुढील वाक्यावरून सहज होईल. “ शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते ” जेव्हां धर्मावरच घाला येतो, म्हणजे धर्म शब्दाचा व्यापक अर्थ घेऊन—स्वराज्यसत्ता नष्ट होऊन वर्णाश्रमधर्म नष्ट होण्याचा प्रसंग येतो, तेथें सर्व लोकांनीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, अर्थात् त्यांचें साहाय्य करणारे शूद्र या वर्णांनीं शस्त्र ग्रहण केलें पाहिजे असें मनूनें सांगितलें आहे. सर्व देशावर आपत्ति आली असतां केवळ क्षत्रियांनीं स्वराज्याचें

रक्षण होणें शक्य नाहीं. क्षत्रियांची संख्या नियमित असल्यानें अशा प्रसंगीं क्षत्रियांवरच केवळ अवलंबून उपयोग नाहीं. हें तत्त्व प्रत्यक्ष अनुभवानें सिद्ध होणारें असून वर्णधर्माची भलतीच कल्पना घेऊन बसलेल्यावेळीं एका लढाईंत क्षत्रिय ( उदा. पृथ्वीराज ) पडला कीं देश बुडाला अशी स्थिति होऊं लागली. मनुस्मृतीची किती व्यापकदृष्टि आहे हें वरील वाक्यावरून लक्षांत येईल. शस्त्र धरणें हा जरी क्षत्रियांचा धर्म आहे तरी देशावरच्या व्यापक-आपत्ति-प्रसंगीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांनीं सर्वांनीं शस्त्रग्रहण केलें पाहिजे, हें मनूचें सांगणें शिवाजी महाराजांस ठाऊक असलें पाहिजे. किंबहुना त्यांना त्यांच्या विशाल बुद्धीनें समजलें असलें पाहिजे; आणि रामदासांच्याहि कल्पनेंत तेंच असलें पाहिजे. आणि म्हणूनच मराठा म्हणजे महाराष्ट्राचा अभिमान असलेला प्रत्येक मनुष्य ब्राह्मण, प्रभु, कुणबी, क्षत्रियांस त्यांनीं हाताशीं धरला आणि समर्थांनींहि ' मराठा तितुका मेळवावा ' असा व्यापकउपदेश करून महाराष्ट्रधर्म व्यापक अर्थानें वाढविला. याप्रमाणें शिवाजी महाराजांनीं चालविलेला महाराष्ट्रधर्म व्यापक स्वरूपाचा म्हणजे स्वराज्ययुक्त सनातन धर्म त्यांनीं चालविला, हीच त्यांच्या चरित्राची आणि कल्पनेची थोरवी आहे. त्यावेळीं महाराष्ट्रांत स्वतंत्र राज्य असावें अशी कल्पना साहजिक होती आणि महाराष्ट्रांत निराळी यवन-सत्ताहि होती. आतां स्वराज्य एखाद्या प्रान्तालाच मिळणें शक्य नाहीं किंवा चालविणें शक्य नाहीं व इंग्रजी सत्ताहि सबंध हिंदुस्तानाला व्यापून आहे, तेव्हां महाराष्ट्राऐवजी भारतधर्म चालविणें प्राप्त आहे. तरी सुद्धां महाराष्ट्राचाच विचार केला तरी महाराष्ट्रांत राहून महाराष्ट्राचा अभिमान धरणारा आणि ज्याचा जो धर्म असेल तो स्वराज्यांत सारख्या हक्कानें एकमेकांस त्रास न देतां नांदावा अशी इच्छा बाळगणारा तो मराठा असें म्हणण्यास हरकत नाहीं. या दृष्टीनें बाप्टिस्टासाहेब आपल्यास मराठा म्हणवितात, तें गैर नाहीं. एवढें आधुनिक काळाविषयीं सांगून या शिवाजी महाराजांच्या नूतन जन्मतिथि उत्सवप्रसंगानें शिवाजी महाराजांच्या स्वराज्यकल्पनेंत आणि महाराष्ट्रधर्मकल्पनेंत राष्ट्रीय भावना कशी अन्तर्भूत होती आणि स्वराज्याच्या कामांत सर्व मराठा जातीचा त्यांनीं कसा पाठिंबा मिळविला आणि सर्वांस कसें आपल्यास अनुकूल करून घेतलें हें जनतेपुढें ठेवून हा लेख मी संपवितों.

# शिवाजीमहारजांची थोरवी.

( केसरी )

"Had all traditions, arrangements, creeds, societies that men ever instituted sunk away, this would remain; the certainty of Heroes being sent us; our facutly, our necessity to reverence Heroes when sent.-- Carlyl's Hero-worship.

प्रत्येक देशांत ईश्वरेच्छेनें महापुरुष निर्माण होतात; व प्रत्येक देशांत अशा महापुरुषांची लोक नेहमीं पूजा करितात. महापुरुषांच्या आगमनानें इतिहासाला योग्य वळण लागतें व महापुरुषांच्या पूजनेनें लोकांत सद्वृत्ति जागृत राहून नीतिमत्तेचा अम्मल चिरस्थायि होतो. असा कोणता देश आहे कीं, ज्यात असे पुरुष निर्माण झाले नाहींत किंवा जेथें या पुरुषांची सादर आठवण लोक करीत नाहींत ? जसे जर्मनींत लूथर अथवा प्रिन्स बिस्मार्क उत्पन्न होऊन लोकांस प्रिय व पूज्य झाले; इंग्लंडांत पिट किंवा हांपडेन अगर ड्यूक ऑफ वेलिंग्टन, फ्रान्सांत जोम ऑफ आर्क किंवा व्हॉल्टेअर; स्काटलंडांत वॉलेस, रशियांत पीटर धि ग्रेट, अमेरिकेंत वाशिंग्टन, त्याचप्रमाणें आपल्या या महाराष्ट्रांत शिवाजी महाराज उत्पन्न होऊन ते आपल्या सत्कृतीनें प्रत्येक महाराष्ट्रीयास प्रिय व पूज्य झाले आहेत. विभूतीवांचून महाराष्ट्राचा इतिहास कधींहि बनावयाचा नाहीं. विभूतीच्या पूजनाशिवाय महाराष्ट्रास कधींहि सच्छील मिळावयाचें नाहीं. वर कार्लाइलनें म्हटल्याप्रमाणें मनुष्यानें केलेल्या समाजव्यवथा ढांसळतील, पण परमेश्वराचा हा नियम ढांसळणार नाहीं. परमेश्वराच्या कृपेनें प्रत्येक प्रगमनशील समाजांत परमेश्वराचे अंश अवतीर्ण झालेच पाहिजेत व प्रत्येक प्रगमनशील समाजांत अशा पुरुषांविषयीं प्रेम, आदर व पूज्यभाव सदोदित जागृत राहिलाच पाहिजे.

परमेश्वराचा अंश ही पदवी मिळण्यास किंवा ही भावना होण्यास शिवाजीमहाराज किती योग्य होते याचें विवेचन आपण या निबंधांत करूं. शिवाजीमहाराजांनीं महाराष्ट्रास स्वातंत्र्य दिलें हा भाग निराळा ठेविला, तरी सुद्धां त्यांचें चरित्र किती तरी उदात्त आहे ! मनुष्यानें कुटुंबांत, समाजांत, राज्यांत कसें वागावें, याविषयीं धडा घेण्यासारखें चरित्र शिवाजीमहाराजांनीं

केलें. मनुष्यानें धर्माची कास कोणत्याहि प्रसंगी सोडतां कामा नये असा जो महाभारताचा महासिद्धांत, ज्या सिद्धान्ताचें समर्थन महर्षि व्यास महाभारतांत पदोपदीं करितात, त्या सिद्धांताला अनुरूप असें शिवाजीमहाराजांचें चरित्र आहे. यांत एका दृष्टीनें आश्चर्यहि नाहीं. महाराजांनी लहानपणापासून महाभारताचें तृषिताप्रमाणें पान केलें होतें. नुसतें पान केलें नाहीं, तर ज्याप्रमाणें आपण पुराणांतील वांगीं पुराणांत ठेवून घरीं निर्लेप येतों त्याप्रमाणें न करितां त्यांनीं महाभारताचा सदुपदेश पदोपदीं प्रत्यक्ष अमलांत आणिला होता. नीतीचे सिद्धांत सांगणें सोपें आहे; पण ते सिद्धांत आचरणांत आणणें अत्यंत कठिण आहे. शिवाजीमहाराजांचें चरित्र म्हणजे नीतिसिद्धांताचा प्रत्यक्ष अनुभवांतील धडाच होय. या चरित्रांतील कित्येक गोष्टी सांगून वरील विधानाची सत्यता वाचकांपुढें मांडण्याचा मी प्रयत्न करीत आहें. ज्यांनीं ज्यांनी शिवाजीचें चरित्र लिहिलें आहे—मग ते स्वकीय असोत किंवा परकीय असोत—त्यांनीं त्यांनी त्याचे अलौकिक सद्गुण कबूल केले आहेत, हें नमूद करण्यास आनंद वाटतो. स्काट भेनवेरिंग यानें शिवरायाचा इतिहास दिला आहे तो फार जुना असून बराच मार्मिक रीतीनें लिहिलेला आहे व कित्येक ठिकाणीं त्याजवर त्यानें टीकाहि केली आहे. तीच मुख्यतः आपण येथें आधाराला घेऊं; कारण महाराजांचें चरित्र सर्वांस ठाऊकच आहे, तेव्हां तें समग्र न सांगतां त्यांतील कांहीं मनोरंजक मुद्दे वाचकांपुढें मांडले असतां फायदा होईल.

मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्यदेवो भव, अतिथिदेवो भव, इत्यादि शिक्षाध्यायांतील आचरणाचे नियम हजारों लोक तोंडपाठ म्हणतात. पण ते अमलांत आणण्याचें श्रेय कितीजणांस देतां येईल? शिवाजीमहाराजांची मातृभक्ति विलक्षण होती. सुदैवानें जिजाऊसारखी पूज्य, निस्पृही, करारी, सद्गुणी अशी त्यांस मातुश्री लाधली होती. तिची भक्ति केवळ देवासारखी शिवाजीमहाराजानीं केली. तिला हरप्रयत्नानें संतुष्ट ठेवण्याचा त्यांनीं आमरणान्त प्रयत्न केला व कोणतीहि गोष्ट तिला विचारल्याशिवाय केली नाहीं. नवऱ्यानें दूर केल्यामुळें कदाचित् जिजाऊचा ओढा माहेराकडे जावयाचा; पण तिनें स्वकर्म काय आहे ह्याचा पक्का विचार करून माहेराचा मुळींच ओढा धरिला नाहीं, (ही गोष्ट शिवभारतावरून अलीकडे खोटी ठरली आहे) व आपल्या मुलावर जीव कीं प्राण प्रेम करून आपल्या पतीच्याच जहागिरीवर तिनें दिवस काढले. या गोष्टीचा परिणाम महाराजांच्या मनावर झाला असलाच पाहिजे; व यामुळेंच

त्यांनीं नीस हरप्रयत्नानें सुख देण्याचा यत्न केला. शिवाजीचें मातेवरील प्रेम व जिजाऊचें आपल्यावर विशेष प्रेम न करणाऱ्या पतीसंबंधानें आचरण लक्षांत घेतलें म्हणजे रामचंद्र—कौसल्येची आठवण झाल्यावांचून राहात नाहीं. कौसल्ये-सहि पतीचा आधार कमीच होता. ती केवळ रामचंद्राच्या आधारावर जगली होती. तथापि कौसल्येनें दशरथासंबंधींचें आपलें कर्तव्य टाकलें नाहीं, किंवा रामचंद्रानेंहि टाकलें नाहीं. आपला बाप आपल्या आईचा अव्हेर करितो या कल्पनेनें रामचंद्राचें अंतःकरण दशरथासंबंधानें जसें कधींहि दूषित झालें नाहीं, त्याचप्रमाणें शिवाजीमहाराजांचें अंतःकरण शहाजीसंबंधानें दूषित झालें नाहीं, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. जशी शिवरायाची मातृभक्ति प्रसिद्ध आहे तशी त्यांची पितृभक्तिहि प्रसिद्ध आहे. यासंबंधानें मेनवेरिंग स्काटनें कांहीं थोडासा मतभेद प्रदर्शित केला आहे. शिवाजीनें राज्य स्थापन केल्यानंतर व अनेक पराक्रम केल्यानंतर शहाजीराजे त्यास कर्नाटकांतून भेटण्यास आले. त्या वेळेस शिवाजीनें जें पितृप्रेम व जो पित्रादर दाखविला त्याचें वर्णन त्यानेंहि केलें आहे, ही गोष्ट खरी. "Shivaji omitted no means of demonstrating his respect. He ran several miles before his palanquin, attended him as his servant and refused to be seated in his presence." अशा प्रकारचें आचरण राजवैभवास चढलेल्या शिवाजीनें आपल्या पित्यासंबधें केलें तें खरोखर अनुकरणीय, स्पृहणीय व प्रशंसनीय आहे. याच्या उलट वर्तन औरंग-जेबानें आपल्या बापाशी केलें होतें, हें त्याच वेळचें उदाहरण आहे. त्यानें शहाजहान याच्या विरुद्ध बंड करून त्यास कैद करून आपण राज्य बळकावलें हें प्रसिद्ध आहे. या वेळीं औरंगजेब आपल्या बापाच्या तर्फे दक्षिणेंत सुभेदार होता. आपल्या सैन्यानिशीं जेव्हां त्यानें दिल्लीवर चाल केली तेव्हां त्यानें शिवाजीमहाराजांपाशी मदत मागितली. बापाच्या विरुद्ध बंड करण्यास मदत मागणें हें शिवाजीस कसें रुचेल ? त्यास औरंगजेबाच्या पत्राचा मोठा त्वेष आला. स्कॉट मेनवेरिंग लिहितोः— Shioaji treated this letter with contempt. It was tied to the tail of a dog and exposed to the derision and laughter of the inhabitants of Poona. Aurangzeb did not forget the insult and declared that he would have his vengeance. But although he succeeded in gaining the throne, he was unable to carry out his vow." या वेळेस शिवाजीमहाराजांचें मुख्य ठिकाण पुणें होतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. "शिवा-

जीनें हें पत्र कुत्र्याच्या शेपटीस बांधून पुण्याच्या लोकांकडून त्याची फजिती व हसें करविलें. हा अपमान औरंगजेबास कळला तेव्हां त्यानें शिवाजीचा सूड उगविण्याचा निश्चय केला. औरंगजेबास दिल्लीची गादी मिळाली पण शिवाजीचा सूड उगवतां आला नाहीं." यापुढें या हकीकतीवर स्कॉटनें थोडीशी प्रतिकूल टीका केली आहे. "The horror which he affected at this unnatural rebellion was ridiculous in a person who stood in a similar situation." "शिवाजीनें औरंगजेबाच्या अमानुष बंडाविषयीं आपला तिरस्कार दाखविण्याचा जो आव घातला तो शिवाजी स्वतः तशाच परिस्थितींत असल्यामुळें हास्यास्पद आहे." असा जो वरील वाक्यांत या ग्रंथकारानें टीकात्मक शेरा मारला आहे तो सर्वथैव अयोग्य आहे, हें कोणाच्याहि लक्षांत येईल. शिवाजीमहाराज पुणें व सुपें प्रांताचा जो उपभोग घेत होते ते शहाजीविरुद्ध बंड करून नव्हे, तर त्यांच्या परवानगीनें व खुषीनें घेत होते. जिजाऊ ही जाधवाची मुलगी—किंबहुना दौलताबादच्या यादव राजघराण्यांतील ती होती असें म्हटलें असतां चालेल. तिच्या व तिच्या मुलाच्या चरितार्थाकरितां व इतमामाकरितां शहाजीनें पुणें व सुपें प्रांताची वडिलार्जित जहागीर खुषीनें लावून दिली होती हें इतिहासप्रसिद्ध आहे. याशिवाय कर्नाटकांतील जहागिरीचा व मुलुखाचा उपभोग शहाजी घेत होता; त्याजला त्या कर्नाटक प्रांतांतून हाकून लावण्याचा किंवा त्याजपासून ती जहागीर छिनून घेण्याचा शिवाजीनें कधींच यत्न केला नाहीं. किंबहुना शिवाजीनें राज्यविस्तार करण्याचा यत्न चालविला होता तोहि केवळ शहाजीचे इच्छेविरुद्धच होता असेंहि म्हणतां येत नाही. सारांश, वरील टीका अगदीं चुकीची आहे, हें यापेक्षां विस्तारानें सांगण्याची अवश्यकता नाहीं. ज्या वेळेस शिवाजीच्या धामधुमीमुळें विजापूरकरांनीं शहाजीस बोलावून आणून कैद केलें व त्याचे हालहाल करण्यास सुरुवात केली त्या वेळेस शिवाजीमहाराजांस किती वाईट वाटलें हें बखरींतून स्पष्ट वर्णिलें आहे. शहाजीकरितां आपला जीव धोक्यांत घालण्यास, किंबहुना आपल्या आयुष्यांतील कृतसंकल्प सोडण्यास ते तयार झाले होते; व केवळ आपल्या आईच्या, बायकोच्या व मुत्सद्यांच्या विनवण्यांमुळें त्या वेळेस त्यांनीं तसें केलें नाही. सारांश, शिवाजीची पितृभक्ति मातृभक्तीप्रमाणेंच अवर्णनीय होती.

शिवाजी महाराजांची मातृभक्ति व पितृभक्ति जशी अवर्णनीय होती, तशीच त्यांची आचार्यभक्ति अवर्णनीय होती. रामदासस्वामींस शिवाजीनें आपले

गुरु केलें, त्याप्रमाणें हा गुरुशिष्यसंबंध आमरणांत त्यांनीं अप्रतिम चालविला, हें प्रसिद्ध आहे. रामदासांसारखे सद्गुरु व शिवाजीमहाराजांसारखे सद्भक्त ज्या देशांत व ज्या काळीं निर्माण होतात तो देश व तो काळ धन्य होय. अशा गुरुशिष्यांच्या सच्चरित्रानें महाराष्ट्र देश पुनीत होऊन ऊर्जितदशेस आला ह्यांत नवल कोणतें ? शिवाजीमहाराजांच्या गुरुभक्तीचें चित्र प्रत्येक मराठी भाषा बोलणाराच्या हृदयावर उमटलेलं आहे. त्याचा विस्तारानें उल्लेख करणें जरूर नाहीं. गुरुभक्तीप्रमाणें अतिथिभक्तिहि महाराजांची अलौकिक होती. पूज्य व सन्मान्य पुरुषांचा सत्कार करून त्यांचा परामर्ष घेण्यास शिवाजीमहाराज नेहमीं तत्पर असत व असें करण्यांत त्यांस अत्यंत आनंद वाटे, ही गोष्ट अनेक उदाहरणां-वरून व्यक्त करतां येईल. पण विस्तारभयास्तव करीत नाहीं. या सद्गुणाचा उल्लेख He was a friend to men of virtue and religion ह्या लहा-नशा पण अर्थपूर्ण वाक्यानें मेनवेरिंगनें केला आहे.

आतां यापुढें शिवाजीमहाराजांच्या ज्या सद्गुणाचा उल्लेख करावयाचा आहे तो याहीपेक्षां महत्त्वाचा व दुर्मिळ होय. स्वस्त्रीवर प्रीति करून परस्त्रीस मातेसमान मानणें हा संसारांतील अत्युच्च व अतिपवित्र नियम आहे, पण तो तितकाच दुर्मिळ व कठिण आहे. ज्या मनुष्यास थोडंबहुत तरी स्वास्थ्य आहे त्या मनुष्यास सुद्धां कामास जिंकणें कठिण जातें. मग राजकुळांत जन्मलेल्या, स्वपराक्रमानें अपार संपत्ति व वैभव मिळविलेल्या पुरुषास हा कठिण नियम पाळणें किती दुर्धर आहे याची सहज कल्पना होईल. अनेक देशांतील अनेक विभूतींचीं चरित्रें पाहिलीं तर या कसोटीस किती लोक उतरतील ? पण अन्य देशांची व अन्य लोकांची गोष्ट कशास पाहिजे ? मराठ्यांचाच इतिहास घ्या. शिवाजी-सारखें कडकडीत व्रत पाळल्याची किती उदाहरणें देतां येतील याचा विचार केला तर शिवाजीसारखें उदाहरण शिवाजीचेंच असें म्हणावें लागेल. चिमाजी अप्पाचें नांव संस्मरणीय आहे हें खरें; पण चिमाजीअप्पासुद्धां शिवाजीमहारा-जांच्या पंक्तीस जाऊन बसूं शकत नाहींत. चिमाजीअप्पा धाकटे बंधु होते ही गोष्ट विसरतां कामा नये. अपार संपत्ति व अमर्याद अधिकार या जोडगोळीच्या माऱ्यांतून वांचणें फार दुर्घट आहे. जो अंतर्यामींचा सर्वांत बलिष्ठ शत्रु काम जिंकील त्यास बाह्य परशत्रु जिंकणें कठिण नाहीं. शिवाजीमहाराजांचा हा सद्-गुण मनांत आणला असतां त्यांची विभूतिवर्गात फार उच्च कोटींत गणना केली पाहिजे. पाश्चात्य इतिहासकार या बाबीसंबंधानें बहुधा फारसा उल्लेख कोणत्याहि व्यक्तीच्या वेळीं करीत नाहींत. पण शिवाजीमहाराजांची थोरवी कशी होती

याचा आपण विचार करूं लागलों म्हणजे आबाजी सोनदेव यानें कल्याण घेते वेळीं सांपडलेल्या सुंदर युवतीस शिवाजीमहाराजांकडे पाठविलें तेव्हां शिवाजीनें तिला सन्मानानें परत पाठवून आबाजी सोनदेव यांची कानउघाडणी केली, हें चित्र डोळ्यांसमोर उभें राहतें. म्हणूनच तत्कालीनच नव्हे, तर त्रिकालीन महापुरुषांमध्यें शिवाजीमहाराजांस फारच उच्च स्थान दिल्याशिवाय राहवत नाहीं.

शिवाजीमहाराजांची बंधुप्रीतिहि वाखाणण्यासारखी होती. व्यंकोजी हा शिवाजीचा सावत्र बन्धु होता. व त्याजला शहाजीची कर्नाटकांतील जहागीर उपभोगास मिळाली होती; परंतु व्यंकोजीस शहाजीचें शहाणपण व पराक्रम नव्हता. शहाजीच्या संस्थानांची धूळधाण होण्याची वेळ आल्यामुळें शिवाजीमहाराजांस कर्नाटकाचा बंदोबस्त करावा लागला. त्याशी व्यंकोजी लढण्यास उभा राहिला. अवरंगजेबानें दुर्धर महत्वाकांक्षेच्या नादीं लागून बन्धूंची काय व्यवस्था लावली किंवा इतर शेंकडों मुसलमान व हिंदू राजघराण्यांच्या इतिहासांत आपल्यास काय दृष्टीस पडतें, त्याच्या पडछायेंत शिवाजीमहाराजांचें व्यंकोजीशी झालेलें वर्तन किती तरी उदात्त दिसतें ! व्यंकोजीस सर्व गुन्हे माफ करून त्यांनी त्याला पुनः जहागिरिवर कायम केलें आणि कांहीं हिस्सा आपल्याकडे घेऊन व जिंजी वगैरे नवीन प्रांत काबीज करून शिवाजीमहाराज परत आले. हाच जिंजीचा किल्ला पुढें मराठी राज्याच्या संरक्षणास फार उपयोगी पडला.

व्यंकोजीचे अपराध क्षम्य कोटींतील असून शिवाजीमहाराजांनीं बंधुप्रीतीस्तव माफ केले. पण पुत्र संभाजीचा अपराध अक्षम्य होता. शिवाजीमहाराजांनीं संभाजीस शासन केलें याजवरून त्यांच्या निःपक्षपाताची परीक्षा होते. याहूनहि कदाचित् प्रशंसनीय उदाहरणें इतिहासांत सांपडतील. पण इतकी गोष्ट निर्विवाद आहे की, शिवाजीमहाराजांनीं आपल्या पुत्राच्या दुर्वर्तनाकडे पुत्रप्रेमांधतेनें दुर्लक्ष केलें नाहीं; त्यांस याजबद्दल किती किती तरी वाईट वाटलें. शिवाजीमहाराजांस असा पुत्र व्हावा हा दुर्भाग्याचाच योग. पण त्यांनी आपली सद्बुद्धि व न्यायबुद्धि पुत्रप्रेमाकरितां ढळूं दिली नाहीं.

आपल्या लोकांविषयीं प्रेम असणें, त्यांचा अभिमान बाळगणें, त्यांस त्यांच्या कामगिरीबद्दल योग्य बक्षीस देणें; त्यांस ऊर्जित स्थितीस पोंचविणें, हा सद्गुण विभूतीशिवाय इतर ठिकाणी सांपडत नाहीं. बहुधा प्रत्येक मनुष्यास आपल्या खालच्या स्थितींतला मनुष्य खालींच राहावा असें वाटतें. कित्येकांस

नर आपल्याहून कनिष्ठ पण कर्तृत्ववान् मनुष्याचा मत्सर वाटतो. पण शिवाजी-महाराजांची स्थिति अगदीं उलट होती. त्यांची नीतिमत्ता व त्यांचें सामर्थ्य इतकें श्रेष्ठ होतें कीं, त्यांची बरोबरी करण्याचे कोणाच्या मनांतहि येणें शक्य नव्हतें व त्यांसहि कोणाची भीति वाटण्याचे कारण नव्हतें. याजमुळें ते सर्वांस प्रेमानें व अभिमानानें वागवीत आणि जे योग्य व लायक असत त्यांस श्रेष्ठ पदास चढवीत. या त्यांच्या गुणानें हजारों माणसें शिवाजीमहाराजांकरितां प्राण देण्यास तयार असत; हजारों लोक त्यांना मदत देण्यास एका पायावर उभे असत. जो मनुष्य लाखों माणसांचा नेता होतो त्याचे ठिकाणीं हा गुण नेहमीं असतो. आपल्या मनुष्यास कधी न सोडणें व त्याच्या उत्कर्षाविषयीं नेहमीं काळजी बाळगणें हें थोर पुरुषाचें ब्रीदच होय.

अशा अनेक सद्गुणांमुळें शिवाजीमहाराज एक अलौकिक सत्पुरुष आहेत अशी लोकांची समजूत झाली यांत आश्चर्य नाहीं. त्यांतच त्यांच्या अद्वितीय राजकीय सद्गुणांची भर पडली. त्यांचा पराक्रम, त्यांचें धाडस, त्यांची स्वातंत्र्य-प्रीति, त्यांची स्वधर्माविषयी निष्ठा, त्यांची स्वदेशाविषयी भक्ति इत्यादि गुणांमुळें त्यांस लोक परमेश्वराचा अंश मानूं लागले यांत नवल नाही. सर्व सृष्टि—सर्व प्राणि—परमेश्वराचेच अंश आहेत हें खरें; पण त्यांतल्यात्यांत ज्या व्यक्तीच्या ठिकाणी अलौकिक नीतिमत्ता व अद्वितीय सामर्थ्य दिसतें ती व्यक्ति परमे-श्वराचा उद्भूत व उत्कट अंश आहे असें म्हटलें पाहिजे; "and which has enlightened the darkness of the world; and this not a kindled lamp only, but rather as a *natural luminary shining by the gift of Heaven* (*Carlyle*), अशा प्रकारच्या परमेश्वराच्या देणगीनें जात्या तेजोमय ज्या व्यक्ति समाजांत उत्पन्न होतात व त्यास सुस्थितीस पोंचवतात त्यांपैकीच शिवाजीमहाराज हे होते यांत संशय नाही व त्यांच्या ठिकाणी लोकांची तशी भक्ति होती यांतहि आश्चर्य नाही.

स्कॉट मेनवेरिंगनें शिवाजीमहाराजांच्या राजकीय गुणांचें योग्य वर्णन केलें आहे. शिवाजीमहाराजांचें शौर्य व त्यांचा दीर्घोद्योग यांजविषयीं मतभेदास जागाच नाही. His talent as a soldier places him above the heroes of the East. His personal activity was astonishing. शिपाई-गिरींत शिवाजीची बुद्धिमत्ता इतकी अव्वल दर्जाची होती कीं पूर्वेकडील शूर पुरुषांत त्यांचा सर्वांत वरचा दर्जा आहे. तसेंच त्याची शारीरिक मेहनत तोंडांत बोट घालण्याजोगी होती. पण एवढ्यानेंच राज्यस्थापनेचें काम सिद्धीस जात

नाहीं. दीर्घ कल्पना मनांत आणून त्या सिद्धीस नेण्याचा रस्ता पूर्वीपासून आंखून त्या मार्गाचें निश्चयानें आक्रमण करणें हेंहि विशाल मुत्सद्देगिरीचें लक्षण आहे. अशा प्रकारच्या कल्पना शिवाजीस सुचत होत्या इतकेंच नव्हे, तर त्या ते सिद्धीसहि नेत His schemes comprehended the option of more than one success, nor did the accomplishment of his object discover the extent of its advantages until developed by subsequent acquisition. मोठमोठ्या कामगिऱ्या सिद्धीस गेल्यावरच त्यांचा किती फायदा आहे किंवा होता याची कल्पना पाहाणारास होत असे. कालिदासानें रघूविषयीं म्हटल्याप्रमाणें ' फलानुमेयाः प्रारंभाः ' अशा प्रकारची कोणतीहि गोष्ट सिद्धीस नेण्याची शिवाजीची तऱ्हा होती. याच्याच तोडीचा दुसरा सद्गुण म्हटला म्हणजे कोणत्याहि प्रकारचा कठिण प्रसंग येवो, त्यांत न डगमगतां त्यांतून निर्गम करून घेण्याचा उपाय सुचणें हा होय. No emergency, however sudden, found him without resource. No danger, however imminent, appalled his mind accustomed to the greatest trials अशा प्रकारचे प्रशंसायुक्त उद्गार मेनवेरिंग स्कॉटनें काढले आहेत; ते किती योग्य आहेत याचें एक उदाहरण म्हटलें म्हणजे शिवाजीचें आग्र्यास जाणें हें होय. आग्र्यास जाण्यांत शिवाजीचे किती हेतू होते हें पुढील हकीकतीवरून व्यक्त होतें. शिवाजीमहाराज उत्तरेस जात होते ते कैदी म्हणून नव्हते हें त्यांनीं औरंगाबादे-सच व्यक्त केलें. त्यांस औरंगाबादेचा मुख्य अधिकारी सामोरा आला नाहीं तेव्हां त्यांनी आपली नाखुषी स्पष्ट दाखविली. याहिपेक्षां आग्र्यास पोंचल्यावर औरंग-जेबानें त्यांस अटकेंत ठेविल्यानंतर शिवाजीमहाराजांनीं आपली सुटका कशी करून घेतली याचा इतिहास प्रसिद्ध आहे. मेनवेरिंग म्हणतोः— In the habit of a Bairagi divested of his band and accompanied by Niraji who spoke the dialects of the people; he took the high road of Ma thura, Benares and Gaya. संभाजीला मथुरेस एका ब्राह्मणाकडे ठेविलें होतें. त्यानें पुढें संभाजीस मुलीचा वेष देऊन रायगडास पोंचविलें. त्यास शिवाजीमहाराजांनी चाळीस हजार मोहरा बक्षीस दिल्या. असो, अशा कठिण प्रसंगांत न डगमगतां युक्तीनें सुटून जाऊन महाराजांनीं मथुरा, काशी, गया इत्यादि यात्राहि केल्या. याजवरून शिवाजीमहाराजांचें धैर्य, प्रसंगावधान व धर्म-प्रीति यांचें उत्कृष्ट दिग्दर्शन होतें.

अशा अलौकिक नीतिमत्तेनें आणि अद्वितीय पराक्रमसाहसानें शिवाजी-महाराजानीं राज्य संपादन केल्यावर स्वतःस राज्याभिषेक करून घेतला. या वेळचें वर्णन आपल्या बखरकारांनी लिहून ठेविलेंच आहे. पण आक्झेनडेन नांवाचा मुंबईसरकारचा वकील दोस्त या नात्यानें त्या वेळेस रायगडास हजर होता. त्यानें प्रत्यक्ष पाहून लिहून ठेविलेलें वर्णन येथें उतरून घेण्यासारखें आहे. रायगड ज्यांनी पाहिला असेल त्यांस या दरबाराची कल्पना करतां येईल. हल्ली फक्त नगारखाना मात्र शिल्लक आहे. त्याच्या आंत राजवाड्याच्या इमारती-पर्यंतच्या मोठ्या मैदानांत अद्याप असलेले खांब उभारून मोठें विस्तीर्ण दालन तयार करतां येत असावें. अशा सभामंडपांत सिंहासनावर शिवाजीमहाराज विराजमान असून सिंहासनाच्या पायरीवर राजपुत्र संभाजीराजे व दिवाण मोरोपंत पिंगळे व गागाभट्ट बसले होते, आणि सर्व मुलकी व फौजेंतील अधिकारी दोनही बाजूंला रांगेनें व अदबीनें उभे होते. अशा दरबारांत आक्झेनडेन यास बोलावून शिवाजीनें त्याचा योग्य सन्मान केला व त्यास पोषाख दिला, वगैरे हकीकत त्यानें लिहून ठेविली आहे, ती फारच मनोरंजक आहे.

"Accordingly next morning, he and his retinue went to Court and found the Raja seated on a magnificent throne and all the nobles waiting on him in rich attire; his son Sambhaji Raja, Peshwa Moropant and a Brahmin of great eminence seated on an ascent under the throne, the rest, as well the officers of the army as others, standing with great respect. The English made their obeisance at a distance and Narain Shenwi held up the ring that was to be presented. He personally took notice of it and ordered their coming nearer even to the foot of the throne, where being rested they were desired to retire.

शिवाजीमहाराजांच्या राज्यारोहणासंबंधानें एक गोष्ट ध्यानांत ठेवण्या-सारखी आहे व तिनें त्यांच्या सर्व आयुष्यांतील चरित्राचा धागा नीटपणें लक्षांत येतो. राज्यस्थापना करून व राज्याभिषेक करून घेऊन शिवाजीमहा-राजांनीं सर्व राज्य श्रीसमर्थ रामदासांस अर्पण केलें असें म्हणतात. युधिष्ठिरानें अश्वमेधयज्ञ केल्यानंतर दक्षिणा द्यावयाची वेळ आली त्या वेळेस 'मी सर्व पृथ्वी व्यासास दान करून अरण्यांत जातों' असें त्यानें म्हटलें व चौघांभावांनीं व

द्रौपदीनेंहि ‘ तथास्तु ’ म्हणून आनंदानें अनुमोदन दिलें ! तेव्हां सर्वांच्या अंगावर आनंदानें व आश्चर्यानें रोमांच उभे राहिले असें महाभारतांत वर्णन आहे. त्याचप्रमाणे शिवाजीमहाराजांचें हें कृत्य कोणास आनंद देत नाहीं ? व्यासाप्रमाणेंच समर्थांनी दिलेलें राज्य शिवाजीस परत दिलें व आपली भगवी छाटी देऊन निशाण भगवें करण्यास सांगितलें. यांतील मर्म फारच उदात्त आहे. राज्यवैभव स्वतःच्या सुखाकरितां नाहीं, तर लोकांच्या सुखाकरितां आहे, त्याचा उपभोग केवळ निवृत्तिपर होऊन घेतला पाहिजे; राज्याचा पाया सत्य, नीति, प्रजेचें कल्याण व परोपकार यांजवर आहे, इत्यादि उदात्त विचार शिवाजीमहाराजानीं व श्रीसमर्थांनी या भगव्या निशाणांत व्यक्त केले आहेत हें उघड आहे. कोणत्याहि स्थितींत व कोणत्याहि प्रसंगीं धर्माचा अवलंब केला पाहिजे, काम किंवा अर्थ यांचेंहि साधन धर्माचरण हेंच होय, अशा प्रकारचें भारताचें मुख्य उदात्त तत्व शिवाजीमहाराजांच्या चरित्रांत अव्वलपासून अखेरपर्यंत दिसून येतें. त्याजवर अनेक प्रसंग आले तरी त्यानीं धर्माची कास सोडली नाहीं. नीतिरूप यष्टीचा त्यांनी कधींहि त्याग केला नाहीं. मग त्यास जय कां न यावा ? यासंबंधानें शिवाजीमहाराज मरण पावले त्या वेळीं अवरंगजेबानें काढलेले उद्गार महत्त्वाचे आहेत. " He was a great captain and the only one who has had the magnanimity to raise a kingdom. My armies have been employed against him for 19 years; nevertheless his state has always been increasing. " “ शिवाजी एक मोठा योद्धा होता व राज्यसंस्थापनेचें उदात्त काम त्यानें एकट्यानेंच केलें. माझें सैन्य १९ वर्षें त्याच्याशी लढत आहे. तरीहि त्याचें राज्य वाढतच जात आहे. ” औरंगजेबाचे हे उद्गार ऐकून **यतो धर्मस्ततो जयः** या महाभारताच्या वाक्याची आठवण झाल्यावांचून रहात नाहीं.

असो, याप्रमाणें शिवाजीमहाराजांच्या थोरवीचें यथाशक्ति चित्र मी वाचकांपुढे ठेविलें आहे. शिवाजीमहाराजांचें मातृ-प्रेम, त्यांची पितृसेवा, त्यांची गुरुभक्ति, त्यांचें बंधुप्रेम, त्यांचा कामजय, त्यांची सद्बुद्धि व न्यायदृष्टि, त्यांचा सज्जनांविषयी आदर, त्यांचा अद्वितीय पराक्रम, त्यांची अविश्रांत मेहनत, त्यांच्या दीर्घ कल्पना, त्यांचें धैर्य, त्यांचें साहस आणि त्यांची आजन्म निवृत्तिपरता या गोष्टी मनांत आणल्या म्हणजे शिवाजीमहाराज परमेश्वराचे अंशभूत अवतार होते, अशी जी आपल्यांत कल्पना आहे ती किती योग्य आहे हें कोणाच्याहि लक्षांत येईल. अशा प्रकारचें उदात्त चरित्र हिंदुस्थानच्या इतिहासांत दुर्मिळ आहे,

किंबहुना सर्व जगताचा इतिहास डोळ्यांसमोर ठेविला तर अलौकिक नीतिमत्ता व अद्वितीय पराक्रम यांची सांगड रामचंद्राच्या खालोखाल शिवाजीमहाराजांतच दिसते. त्यांचें चरित्र फार उदात्त आहे; यास्तव तें रामचंद्रचरित्राप्रमाणें पूज्य, रम्य व पवित्र आहे. शिवरायाच्या उदात्त व पवित्र चरित्राची जी रम्य स्थळें मी वाचकांपुढें मांडली आहेत, यांजवरून त्यांची थोरवी किती होती, हें लक्षांत आलेंच असेल. व " न जातु कामान्नभयान्न लोभात् धर्मं त्यजेज्जीवितस्यापि हेतोः " या महाभारतांतील महावाक्यानें मी हा लहानसा निबंध पुरा करतों.



# पुरवणी.



# शिवाजीमहाराज लुटारू होते काय ?

श्रीशिवाजीमहाराजांविषयीं आमचें इतकें आदरपूर्ण पूज्य मत आहे कीं, त्यांस आम्ही शंकराचा अवतार मानतों. कोणत्याहि पूज्य विभूतीस अवतार मानण्यास त्या व्यक्तीच्या ठिकाणीं नुसता अद्वितीय पराक्रमच पुरेसा होत नाहीं. त्याच्या ठिकाणीं असामान्य नीतिमत्ताहि असावी लागते. नुसता पराक्रम पुरेसा असता तर नेपोलियन, विक्रम, शिकंदर किंवा पहिला बाजीराव यांसहि लोकांनीं अवतार मानलें असतें. श्रीरामचंद्राप्रमाणेंच अलौकिक नीतिमत्ता शिवाजीमहाराजांच्या ठिकाणीं होती. त्यांची पितृमातृभक्ति श्रीरामासारखीच निःसीम होती. त्यांचें परस्त्रीविषयींचें मनोनिग्रहाचें वर्तनहि श्रीरामासारखें अद्वितीय होतें. कल्याणच्या सुभेदाराच्या अत्यंत लावण्यवती स्नुषेस आपली बहीण म्हणून सत्कारपूर्वक त्यांनीं परत पाठवलें हें पाहून त्या वेळच्या एकंदर परिस्थितीच्या दृष्टीनें लोकांस अतिशय आश्चर्य वाटलें. त्यांचें प्रजावात्सल्यहि अनुपम होतें व भृत्यानुरागहि उज्ज्वल होता. त्यांचें स्वदेशभक्तीनें ओथंबलेलें चरित्र तर अतिशयच पूज्य आहे आणि सर्वांत श्रेष्ठ त्यांची स्वधर्मनिष्ठा निरतिशय जाज्वल्य होती. स्वधर्मनिष्ठा व स्वदेशप्रीति यांनीं प्रेरित होऊनच त्यांनीं स्वराज्यसाधनाचा प्रचंड उद्योग केला आणि आपल्या अतुल पराक्रमानें तो सिद्धीस नेला. सारांश, श्रीशिवाजीमहाराजांचे सद्गुण इतके अनेक व उज्ज्वल आहेत कीं, त्यांस आम्ही योग्य रीतीनें अवतार मानतों. मग शिवाजीमहाराजांवर लुटारूपणाचा आरोप कसा येतो ? शिवाजीमहाराज लुटारू—अन्यशब्दानें बोलणें तर दरवडे घालणारे—होते काय ? इतिहास तर असें धडधडित आज कित्येक वर्षें सांगत आहे. तेव्हां हा दोष त्यांच्या ठिकाणीं त्यांच्या गुणसन्निपातांत ‘इंदोः किरणेष्विवाङ्कः’ प्रमाणें बुडून जातो असें आम्ही मानावयाचें किंवा कसें ? हा एक अत्यंत महत्वाचा प्रश्न असून त्याची व्हावी तशी छाननी आजपर्यंत झाली नाहीं असें माझें मत आहे.

हा आरोप इतिहासग्रंथांत भरपूर भरला आहे. मुळांत तो अनेक मुसलमानी इतिहासग्रंथांत असावा. तेथून मनुष्यस्वभावानुरूप इंग्रजी इतिहासकारांनीं घेतला व त्यास बरेंच अग्रस्थान दिलें. आमच्या इकडच्या अनेक लहानमोठ्या इतिहासग्रंथांत तो अर्थात् जशाचा तसा इंग्रजींतून आला. मुलांबाळांच्या व थोरामोठ्यांच्या वाचनांत तो नेहमीं येऊन बहुतेक सर्वांच्या हृदयांत बिंबला आहे. साधारपणें श्रीकृष्णावरच्या गोपीलीलांच्या खोट्या आरोपाप्रमाणें तो आमच्या मनोभूमींत पूर्ण रुजला असून त्याचप्रमाणें आम्ही ह्याकडेहि दुर्लक्ष करतों. पण इंग्रजी इतिहासकारांची ही मोठी चूक झाली आहे. त्यांनीं या गोष्टीचें विवेचन करून योग्य स्वरूप द्यावयास पाहिजे होतें. तसें न केल्यानें आमचें मोठें नुकसान झालें आहे, इतकेंच नव्हे तर इंग्रजी राज्याचेंहि एका दृष्टीनें झालें आहे हें मी पुढें सांगणार आहें. अलीकडील स्वदेशी अर्थात् मराठी इतिहासकारांनीं या दोषाच्या आरोपाचा विचार केला आहे. शिवाजीमहाराजांचा हेतु स्तुत्य म्हणजे स्वातंत्र्य मिळवून स्वराज्यस्थापनेचा होता, यामुळें हा दोष त्यांजवर लागू होत नाहीं असें केळुसकर म्हणतात. " हिंदुस्थानच्या लोकांस स्वतंत्र करण्याच्या पुण्य कृत्याप्रीत्यर्थ लुटीच्या द्रव्याचा त्यांनीं उपयोग केला, यांत त्यांच्याकडून मोठेंसें पातक झालें, असें आम्हां **महाराष्ट्रीयांस तरी** निदान वाटणार नाहीं. त्यांनीं लुटालूट करून द्रव्य मिळवावयाचें नव्हतें असा नीतिबोध करणें म्हणजे स्वराज्य व स्वातंत्र्य मिळविण्याच्या उद्योगासच लागावयाचें नव्हतें असें म्हणणें होय " ( पान ५४२ ). लुटारूपणाच्या आरोपाची वरप्रमाणें केळुसकरांनीं बरीच निरवानिरव केली आहे. त्याप्रमाणें सरदेसाई यांनींहि केली आहे व इंग्लंदांतील ' Forced Loans अथवा जबरदस्तीचीं कर्जें ' या तत्वावर या आरोपांचा निरास करण्याचा आणखी प्रयत्न त्यांनीं केला आहे. पण आमची महाराष्ट्रीयांची स्वजनप्रेमाची किंवा इंग्लंदांतील सर्व सामान्य व्यक्तीची दृष्टि न घेतां एकंदर मनुष्यसमाजाच्या व्यापक नीतिदृष्टीनें विचार केला असतांहि शिवाजीमहाराजांवरचा हा आरोप जसा दिसतो तसा नाहीं, ही गोष्ट विवेचनाअंतीं दिसून येईल. या विवेचनाच्या प्रारंभाला हा मूळ मुद्दा सांगितला पाहिजे कीं, नीतीचे दोन मुख्य भाग आहेत; समाजनीति आणि राजनीति.

हा दुसरा शब्द International या अर्थी मी थोडक्यांत योजीत आहें हें सांगितलें पाहिजे. 'सामुदायिक' राजनीति असें पाहिजे तर म्हणतां येईल. अर्थात् राजाची प्रजेशीं वर्तणुकीच्या संबंधानें जी नीति तिचा येथें विचार नाहीं. निरनिराळया राजांच्या आपसांतील संबंधाची नीति येथें उद्दिष्ट आहे. असो, सामाजिक नीति आणि सामुदायिक राजनीति यांत फारच अंतर आहे आणि दोघांचे नियम व ध्येय भिन्न आहेत हें कोणासहि सहज कळण्यासारखें आहे. उदाहरणार्थ, सामाजिक नीतींत लूट अथवा दरवडा म्हणजे जमवानें जबरदस्तीची चोरी करणें आणि खून हे दोन सर्वांत मोठे गुन्हे आहेत. हीं कृत्यें समाजनीतीनें अत्यंत निंद्य ठरलेलीं आहेत. पण राजनीतींत यांचें स्वरूप भिन्न आहे व निंद्य कोणतें, अनिंद्य कोणतें हें ठरविण्याचे नियम व दिशा फार निराळया आहेत. आपण खुनाचेंच उदाहरण घेऊं. समाजनीतींत एका मनुष्यानें दुसऱ्याचा अचानक जाऊन प्राणघात करणें साधारणतः अतिशय निंद्य मानलें जातें. पण ज्या वेळेस एखाद्या राष्ट्राचा दुसऱ्या राष्ट्राशीं युद्धप्रसंग होतो त्या वेळेस प्रत्यक्ष युद्धप्रसंगाशिवायहि दुसऱ्याचे प्राणघात होतात; उदाहरणार्थ, एखाद्या चौकीवर छापा घालून शत्रूचे सैनिक कापून काढण्यांत येतात; अशा परिस्थितींत हे शत्रूचे लोक कापून काढणारे शिपाई खुनी आहेत असें कधीं कोणी म्हटलें आहे काय? नाहीं. नीतिशास्त्राचीं मूलभूत खोल तत्वें यांचा विचार करतां ह्या क्रिया निंद्य किंवा दुष्ट, अधमपणाच्या अथवा अधोगतीस नेणाऱ्या नाहींत, हें निर्विवाद आहे. कारण अशा परिस्थितींत मनुष्याचें मन दुराचरणाच्या वृत्तीनें भरलेलें नसतें, किंबहुना त्याचे विचार उच्च स्वदेशनीतीनें भरलेले असून त्याच्या मनोवृत्ति उदात्त शौर्य, वीर्य इत्यादि सद्गुणांच्या असतात. तात्पर्य, समाजनीतीचे नियम निराळे व सामुदायिक राजनीतीचे नियम निराळे, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. मुख्यतः आमची चुकी होते ती हीच. शिवाजीमहाराजांच्या कृत्याकडे आम्ही सामाजिक नीतिदृष्टया पाहतों. लूट करणें म्हणजे दरवडा घालणें खरोखरच निंद्य आहे, पण तें समाजांत. एका मनुष्यानें आपल्या देशांत एकाच राजसत्तेखालीं शांतता भंग होणार नाहीं या भरंवशानें राहणाऱ्या दुसऱ्या मनुष्यास जाऊन लुटावें ही गोष्ट नीतदृष्टया व कायद्यानें निंद्य आहे हें कोणीहि कबूल करील. पण राजकीय

दृष्ट्या म्हणजे सामुदायिक राजनीतिदृष्ट्या जेव्हां एका देशाचे लोक दुसऱ्यावर युद्ध पुकारून स्वारी करतात तेव्हां त्याच्या सैन्यानें दुसऱ्या देशाच्या लोकांस लुटलें तर तें कृत्य निंद्य आहे कीं काय, ही गोष्ट निराळ्या दृष्टीनें वरप्रमाणेंच ठरविली पाहिजे. (Alexander and Robber) शिकंदर व दरवडेखोर ही गोष्ट प्रसिद्ध आहे. शिकंदरानें दरवडेखोरास आणून शिक्षा देण्याच्या वेळीं मी एक लहान प्रमाणावर चोर अथवा पश्यतोहर आहें, तूं मोठ्या प्रमाणावर आहेस असें दरवडेखोरानें सांगितलें हें आपल्या ध्यानांत असेल. पण ह्या गोष्टीचें रहस्य तत्वदृष्ट्या असें नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. एकंदर नीतीचें मूलभूत तत्व असें आहे कीं, मनुष्याच्या कृतीचें निंद्यत्व ठरवितांना त्याची मनोवृत्ति पाहिली पाहिजे. दरवडा घालणाऱ्याची मनोवृत्ति निराळी आणि परराज्यावर स्वारी करणाऱ्या राजाची व त्याच्या सेनेची मनोवृत्ति निराळी. अर्थात् दोघांच्या मनोवृत्ति भिन्न असल्यानें त्यांचीं कृत्येंहि भिन्न स्वरूपाचीं ठरतात हें उघड आहे. असो तर, शिवाजीमहाराजांच्या लुटारूपणाचा विचार आपण सामाजिक—नीतिदृष्ट्या न करतां International Morality सामुदायिक राजनीतीच्या दृष्टीनें केला पाहिजे. लुटारू हा शब्द सामाजिक दृष्टीचाच मराठींत दोन्हींकडे उपयोगांत येत असल्यानें आपल्या विचाराची सरणि दूषित होते आणि शिवाजी लुटारू होता हे शब्द ऐकल्याबरोबर आपल्या मनांत लुटारूपर्याय दरवडेखोराची कल्पना येते. तरी ही कल्पना बाजूस सारून आपण शिवाजीमहाराजांच्या लुटारूपणाचा सामुदायिक—राजनीतिदृष्ट्या विचार करूं.

International Law अथवा सामुदायिक राजनीति हिचे नियम अलीकडे पाश्चात्य देशांत बरेच निश्चित झाले आहेत. किंबहुना हेग येथील राजपरिषदेनें युध्यमान राष्ट्रांनीं कोणी कोणते दयाभूतवृत्तीचे नियम पाळावे हें अलीकडे ठरविलें आहे. हे नियम शिवाजीमहाराजांच्या वेळीं अमलांत नव्हते हें सांगणें नकोच. हिंदुस्थानांतही राजनीतींत धर्मयुद्धाचे नियम फारच उच्च प्रतीचे प्राचीन काळीं रूढ झाले होते हें महाभारतावरून स्पष्ट दिसतें. या नियमांची छाया शिवाजीमहाराजांच्या आचरणावर पडलेली दिसते, हें मी पुढें सांगणार आहें. पण आपण आधीं शिवाजीमहाराजांच्या काळच्याच राजनीतीचा विचार करूं. इकडील देशांत हेगसारखे लेखी नियम नसले तरी कांहीं तरी युद्धाचे नियम अथवा रीति चालू असल्याच

पाहिजेत हें उघड आहे; आणि अशा लेखी नसल्या तरी समाजांत मान्य झालेल्या राजनीतीच्या धोरणाच्या दृष्टीनें आपण या विषयाचा विचार करूं. अर्थात् हा विचार इतिहासाच्या आधारानें करावयाचा आहे; आणि शिवकालीन व पूर्वकालीन मुसलमान राजांनीं काय केलें, किंबहुना या वेळचे पाश्चात्य देशांतील राजेलोक काय करीत होते हें आपणास येथें पहावयाचें आहे.

अशा दृष्टीनें पाहतां एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर युद्ध पुकारून स्वारी केली असतां स्वारी करणाऱ्या राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रांतील लोकांस लुटणें हा ठराविक राजनीतीचा रस्ता होता असें दिसतें. तत्कालीन अहमदनगर, विजापूर, गोंवळकोंडा या राज्यांतील आपसांतील युद्धें पाहिलीं तर युद्ध पुकारतांच एकाच्या सैन्यानें दुसऱ्याच्या प्रांतावर चालून जावें आणि त्यांतील लोकांस लुटावें व मुलूख उध्वस्त करावा हा नेहमींचाच प्रकार होता. फेरिस्ताचा इतिहास वाचीत असतां अशी प्रांतांची वारंवार झालेली दुर्दशा वाचून या इतिहासांत लूट—जाळपोळ यांवांचून कांहींच नाहीं असें वाटूं लागतें. या प्रकारची लुटालूट पदोपदीं आपल्यास दृष्टी पडत असून असें कधींहि आपल्यास फेरिस्ताच्या इतिहासांत किंवा तदनुयायी इंग्रजी इतिहासांत लिहिलेलें आढळत नाहीं कीं हीं राष्ट्रें लुटारू होतीं. बुऱ्हाणशा निजाम किंवा सुलतान कुली कुतबशहा किंवा अली आदिलशहा यांनीं परराज्यांतील लोकांस लुटण्याची मुळींच कसूर केली नाहीं, असें असतां यांस कोणी लुटारू म्हटलें नाहीं. तात्पर्य, परराष्ट्रांतील युध्यमान किंवा अयुध्यमान लोकांस शत्रुराष्ट्रानें लुटावें हा ठराविक तसाच मान्य मार्ग त्या काळीं होता, हें कोणासहि दिसून येईल. या गोष्टीची विचाराची दिशा नेहमीं अशी असे कीं, यानें लुटणाऱ्या राष्ट्राचें बल वाढतें, लुटलेल्या राष्ट्राचें बल कमी होतें, आणि दुर्दशा इत्यादिकांनीं त्या राष्ट्रांतील लोकांस दहशत बसते. या कारणांनीं युध्यमान राष्ट्रांत विजय संपादन करण्यास जें जें जरूर आहे तें तें न्याय्य आहे असा राजनीतींतील युद्धनीतीचा सिद्धान्त असल्यानें लुटण्याचा हक्क स्वारी करणाऱ्या राष्ट्राचा त्या काळीं मान्य केलेला दिसतो. अर्थात् तत्कालीन शेंकडों मुसलमान राजांनीं जें केलें तेंच शिवाजीमहाराजांनीं केलें असें आपल्यास दिसतें. असल्या अनेक राजांस जर आपण लुटारू म्हणत नाहीं तर शिवाजीमहाराजांसहि म्हणतां येणार नाहीं हें उघड आहे.

याहून पूर्वीच्या मुसलमानी राष्ट्रांचा विचार केला तर हीच पद्धति नेहमीं सर्रास चालू दिसते. त्यांचीं उदाहरणें देत बसण्याची अवश्यकता नाहीं. पण लुटण्याच्या कारवाईचे दोन मुकुटमणि येथें उल्लेखिले पाहिजेत. सर्वांत लुटारूंचा कप्तान सुलतान महमूद गझनवी हा होता. यानें हिंदुस्थानांत अनेक स्वाऱ्या केल्या, त्यांत कित्येक तर नुसत्या लुटण्याच्या उद्देशानें केल्या. त्यांत राज्यस्थापनेचा किंवा देश जिंकण्याचा इरादा दिसत नाहीं. त्यानें अनेक शहरें व देवालयें लुटून उध्वस्त केलीं व फोडलीं. विशेषतः मथुरा, कनोज व सोमनाथ या तीन ठिकाणांवर केवळ लुटीच्या इराद्यानें स्वारी करून त्यानें अगणित संपत्ति स्वदेशास नेली. महमुदास लुटीची चव लागून गंगायमुनांच्या कांठीं पंजाबापलीकडे मातबर शहरें आहेत असें समजल्यानें फौजेचा चांगला बंदोबस्त करून हिमालयाच्या लगत्यानें थोड्या थोड्या मजला करीत तो एकदम कनोजवर आला. महमुदापुढें आपला उपाय चालणार नाहीं हें जाणून कनोजचा राजा त्यास शरण गेला. मग महंमदानें कनोज शहर यथेच्छ लुटलें व तेथील भव्य देवालयें फोडून टाकलीं. परत जातांना त्यानें मथुरा शहरहि असेंच सहज लुटलें. सोमनाथाची श्रीमंती ऐकून त्यानें त्या दूरच्या प्रांतावर शेवटची स्वारी केली व तें देवालय फोडून तेथील अपरंपार संपत्ति स्वदेशास नेली. त्यानें संपत्ति किती नेली याची कल्पना सरदेसायांनीं दिलेल्या पुढील आंकड्यांवरून होईल. नगरकोट येथील ज्वालामुखीचें देवालय असेंच पूर्वी लुटून "सात लक्ष सुवर्णदीनार, सातशें मण सोन्याचांदीचे दागिने, दोनशें मण सोन्याच्या लगडी आणि मोत्येंहिरे वगैरे वीस मण जवाहीर" त्यानें स्वदेशीं नेलें. असो, इतकी लुटालूट केवळ लुटीच्या उद्देशानें करणाऱ्या महमुदास इतिहासकारांनीं लुटारू म्हणून डागिलें नाहीं, किंवा या संबंधानें त्याची निंदा केली नाहीं. अर्थात् शत्रूच्या राज्यास लुटणें हा एक हक्क स्वारी करणाऱ्या राष्ट्रांतील लोकांचा आहे असें पौर्वात्य मुसलमान राजे व इतिहासकार समजतात हें उघड आहे.

महमुदानंतरचा दुसरा लुटारूंचा कप्तान अल्लाउद्दीन खिलजीचा सरदार मलिककाफुर हा होय. जसें महंमदानें उत्तरेस लुटलें त्याप्रमाणें या बाटलेल्या हिंदूगाजीनें दक्षिणेस लुटलें. त्यानें थेट रामेश्वरापर्यंत स्वारी करून अनेक शहरें लुटलीं व वरंगळ, द्वारसमुद्र इत्यादि राज्यें बुडविलीं.

त्यानें हजारों मण सोनें, मोतीं, जवाहीर दिल्लीस नेलें त्याची गणाति फेरिस्तानें दिली आहे.* लुटारूंच्या यादींत मलिककाफुराचें नांव महमुदगझनवीच्या दुसऱ्या नंबरावर लाविलें पाहिजे. तथापि त्यासहि इतिहासकारांनीं दरवडेखोर म्हणून निंदिलें नाहीं. या वेळचा एक मनोरंजक संवाद सरदेसाई यांनीं दिला आहे त्यांतील एक वाक्य येथें महत्वाचें आहे. अल्लाउद्दिन खिलजीचें व त्याच्या काजीचें संभाषण झालें त्यांत काजीनें असें म्हटलें कीं, "इस्लामी फौजेच्या लुटीचें द्रव्य सरकारी खजिन्यांत जमा झालें पाहिजे, ती खासगी मिळकत नव्हे" अर्थात् इस्लामी राजनीतीच्या दृष्टीनें परराज्यांस विशेषत: हिंदुराज्यांस लुटून त्या लुटीचा ऐवज सरकारी कामास लावणें न्याय्य होतें. शिवाजीमहाराजांची कृति याच न्यायास अनुसरून होती हें प्रसिद्ध आहे. लुटीचा सर्व ऐवज सरकारी खजिन्यांत जमा होत असे. कोणाहि शिपायास ती खासगी ठेवतां येत नसे. त्यास योग्य तें पारितोषिक मिळे; परंतु एकंदर लूट सरकारी मत्ता आहे हा न्याय पूर्णपणें अमलांत होता.

आतां पश्चिमेकडे नजर दिली असतां तिकडील तत्कालीन राजनीतीचें धोरण निराळें दिसत नाहीं. प्राचीन ग्रीक व रोमन इतिहास पाहिला तर शत्रूच्या राज्यावर किंवा शहरावर स्वारी केली आणि तें जिंकिलें म्हणजे त्या शहरांतील लोकांस लुटणें हा त्यांचा पहिला हक्क होता. पण या लोकांचें धोरण याच्यापुढेंहि भयंकर असे. पाडाव केलेल्या शहरांतील लढवय्ये लोकांस सरसहा मारून टाकणें व तेथील स्त्रियांस व लहान मुलांस गुलाम करून स्वदेशीं नेणें हा परिपाठ नेहमींचाच होता. यांत कधींच ग्रीक लोकांनीं कसूर केली नाहीं. असलीं भयंकर कृत्यें ग्रीक लोकांच्या इतिहासांत पदोपदीं आढळतात आणि त्या इतिहासास या कृत्यांनीं भेसूर व क्रूर स्वरूप आलें आहे. असो, या गोष्टीचा उल्लेख पुन्हा करणें आहे. आपण येथें फक्त लुटीचाच विचार करूं. शत्रूच्या राज्यांतील लोकांस युद्धप्रसंगीं लुटणें हा जेत्यांचा हक्क ग्रीकरोमनानंतरच्याहि इतिहासांत वारंवार बजावलेला दिसतो. रोम शहराचेंच उदाहरण पुरें आहे.

* हिचे आकडे एके ठिकाणीं असे दिले आहेत. "मलिककाफुरानें आपल्या बादशहास ३०० हत्ती, २०,००० घोडे, ९६००० मण सोनें आणि रत्नांनीं व मोत्यांनीं भरलेल्या कित्येक पेट्या नजर केल्या.

( Alaric ) अलारिकनें केलेला Sack of Rome इतिहासांत प्रसिद्ध आहे. यापुढेंहि रोम शहर दोनचारदां लुटलें गेलें आहे. चार्लस धी फिफ्थ या जर्मन बादशहानेंहि तें पोपच्या समक्षसुद्धां यथेच्छ लुटलें. तात्पर्य, प्राच्य देशाप्रमाणें पाश्चात्य देशांतहि कित्येक बरेच प्रसिद्ध लुटणारे झाले. त्यांचा इतिहास येथें देत न बसतां आपण इंग्लिश व फ्रेंच यांच्या इतिहासांत काय सांपडतें तें पाहूं. स्वारी करणाऱ्या राष्ट्राच्या लोकांचा लुटण्याचा हक्क या लोकांनीहि अवलंबिलेला दिसतो. पादाक्रांत केलेल्या मुलुखावर खंडणी बसवणें हा त्याचाच प्रकार आहे. आक्रांत केलेल्या शहरापासून खंडणी घेण्याची तऱ्हा बहुतेक सर्वत्र जारी दिसते. याचीं पाश्चात्य देशांतील उदाहरणें न देतां हिंदुस्थानांतील एक उदाहरण देऊं. इंग्रज व फ्रेंच यांची युरोपांत लढाई सुरू झाली म्हणजे इंग्रजांनीं पांदेचरीवर हल्ला करून खंडणी घ्यावी किंवा फ्रेंचांचा जोर चालला तर त्यांनीं मद्रासवर हल्ला करून खंडणी घ्यावी असा प्रकार कित्येक वेळां झाला आहे. अशा प्रकारची खंडणी किंवा Ransom शिवाजीमहाराजहि घेत असत. कोणत्याहि शहरानें सामोपचारानें खंडणी दिली तर ते त्या शहरास लुटीत नसत. असो, लुटण्याचीं उदाहरणें पाश्चात्य इतिहासांत कमी सांपडतात. पण खंडणीचा प्रकार बराच दिसतो. बहुधा पाश्चात्य देश १६ व्या शतकापर्यंत एवढे श्रीमंतहि नव्हते. अमेरिकेची व हिंदुस्थानची संपत्ति जेव्हां त्यांच्या हातांत गेली तेव्हांपासून ते देश सधन झाले आहेत. आणि अलीकडे पाश्चात्य युद्धाचे सुधारलेले नियम तिकडे बरेच अमलांत आले आहेत, तथापि लुटण्याचीं उदाहरणें सांपडत नाहींत असें नाहीं. उदाहरणार्थ पोर्टरायल येथील फ्रेंचांची वसाहत इंग्रजांनीं लुटली त्याचे संबंधीं Historian's History of the World मध्यें असा उल्लेख आहे. And plunder enongh was received by the ravage of the neighbouring settlements to pay the expenses of the expedition ( Vol XXIII 187 ). या वाक्यांत लुटीचा परिपाठ आणि त्याची उपपत्ति यांचा स्पष्ट उल्लेख आहे. स्वारीखर्चाची परभारें उगवणी करणें ही सामान्यतः अशा लुटीची उपपत्ति होय. प्राच्य प्राश्चात्य इतिहासांत लुटीचे दाखले इतिहासकार मुद्दाम टाळतात असेंहि दिसतें. कारण हिंदुस्थानांतील अगदीं अलीकडे इंग्रजांनीं झांशी लुटल्याची गोष्ट प्रसिद्ध असून ती इतिहासांत फारशी नमूद नाहीं. झांशी १८५८ त घेतल्यावर तीन दिवस इंग्रजांच्या

नेटिव्ह व युरोपियन शिपायांनीं लुटली म्हणजे युद्ध करणारे व न करणारे सर्वच लोक सरसहा लुटले गेले ही गोष्ट छापलेली नाहीं. ही लूट शिपायांची होती हें येथें सांगितलें पाहिजे. अतिशय त्रास भोगलेल्या वेढा घालणाऱ्या फौजेस परभारें पारितोषिक देण्याचा हा प्रकार पाश्चात्य इतिहासांत बराच दृष्टीस पडतो व या कृत्यानें जित लोकांस दहशतहि बसते हें उघड आहे.

पण इंग्रज लोकांच्या इतिहासांत लुटीच्या हक्काचें मान्यत्व याहूनहि ढळढळीत दृष्टीस पडतें आणि तें समुद्रावर. इंग्रजांची सत्ता समुद्रावर तीनशें वर्षांहून अधिक प्रस्थापित झाली आहे. आणि इंग्रजांनीं हा समुद्रावरच्या लुटीचा हक्क तेव्हांपासून आजमितीपर्यंत अबाधित चालवला आहे. याला लूट असें नांव न देतां प्राइझ असें नांव दिलें आहे. हा एक गोड भाषा वापरण्याचा प्रकार होय. पण प्राइझ म्हणजे लूट हें निःसंशय होय. कोणत्याहि देशाशीं, स्पेन, फ्रान्स, हालंड, जर्मनी वगैरेशीं इंग्रजांनीं युद्ध पुकारलें म्हणजे त्या देशांचीं जीं जहाजें समुद्रावर माल, खजिना वगैरे नेत असतील तीं इंग्रज खलाशी तत्काळ पकडून इंग्लंडांत आणतात व त्यांवरील सर्व मालमत्ता सरकारची व पकडणाराच्या मालकीची असा हा नियम अजून पाश्चात्य युद्धनीतींत अबाधित चालू आहे. प्रथम प्रथम स्पेन देशाचीं जहाजें अमेरिकेहून सोनें व रुपें या धातूंनीं लादलेलीं इंग्रजी धाडशी खलाश्यांनीं इंग्लंडांत आणल्याच्या हकीकती फारच मनोरंजक असून इंग्रजी इतिहासांत नमूद आहेत. जमिनीवर शहरें लुटण्यापेक्षां समुद्रावरील जहाजें लुटणें हें फारच सोपें व फायदेशीर असतें. शहरांत गरीब जास्त असून श्रीमंत शोधावे लागतात व संपत्तीहि लपवून ठेवतां येते. जहाजावर सर्वच श्रीमंत आणि मालाशिवाय दुसरें कांहींच नसतें. आणि अचानक सर्व माल एक ठिकाणीं केलेला आणि लपवतां येणें अशक्य. सारांश समुद्रावर वर्चस्व असलेल्या इंग्रजांनीं हीं जहाजें पकडून लुटून नेण्याचा हक्क लढाईंत नेहमीं कायदेशीर मानला होता. आणि त्यांनीं तो कधींहि सोडला नाहीं. स्पेन देशाचें विशेषतः अशा रीतीनें अतिशय नुकसान होई व अमेरिकेंतून येणारा खजिना, सोनें–रुपें, अचानक इंग्रजांना सांपडे. अशीं जहाजें पकडून नेणाऱ्या धाडशी इंग्रजी खलाशांस कधीं कोणी लुटारू म्हटलें आहे ? इंग्रजांनीं म्हटलें नाहीं हें उघड आहे. स्पॅनिश इतिहासकारांनीं म्हटलें असल्यास तें त्यांच्या भाषेच्या ज्ञानाच्या अभावीं

सांगतां येत नाहीं. तथापि इंग्रजी इतिहासकारांनीं शिवाजीमहाराजांस "marauder" दरवडेखोर म्हणावें व ड्रेक, हाकिन्सप्रभृतींस heroes म्हणावें हें मनुष्यस्वभावास धरून "माझा तो बाळया आणि तुझा तो शेमड्या" या न्यायानें आहे हें उघड आहे. तत्वविवेचक दृष्टीनें दोघेहि पूज्य व क्षम्य होत. प्रारंभीं म्हटल्याप्रमाणें मनुष्याचीं कृत्यें त्याच्या मनोवृत्तीप्रमाणें क्षम्य किंवा निंद्य ठरतात. अर्थात् धनलोभानें शांततेच्या काळीं दुसऱ्यास लुटणारा दरवडेखोर निराळा आणि स्वदेशासाठीं युद्धकाळीं शत्रुराष्ट्राच्या शहरांस किंवा जहाजांस लुटणारा निराळा. पहिला निंद्य तर दुसरा प्रशस्त होय. या दृष्टीनें ड्रेक, हाकिन्सप्रभृतींप्रमाणें शिवाजीमहाराज कसे शस्य व क्षम्य ठरतात हें आपण जरा जास्त विस्तारानें पाहूं.

वरील विवेचनावरून एका राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्रावर युद्ध पुकारल्यानंतर त्याच्या लोकांस लुटणें, स्वबळ वाढविण्याचे व परबळ कमी करण्याचा हा रस्ता युद्धनीतीस धरून आहे ही गोष्ट पौर्वात्य हिंदुस्थानांतील मुसलमान राजांच्या व पाश्चात्य इंग्रज वगैरे लोकांच्याहि इतिहासावरून ठरते. या न्याय्यतेस दोन मुख्य अटी आहेत. लुटणारा खासगी व्यक्ति नसून राजा अथवा राष्ट्र असतो आणि राष्ट्रहितेच्छा स्वायत्त असतो; ही अट प्रथम लक्षांत ठेविली पाहिजे. आणि दुसरी ही कीं दुसऱ्या राष्ट्रांतील लोकांस लुटतांना त्या राष्ट्रांशीं युद्ध पुकारलेलें असलें पाहिजे. शिवाजीमहाराजांच्या लुटीच्या कृत्यांस या दोनही अटी लागू पडतात किंवा नाहीं हें आपण विस्तारानें पाहूं. शिवाजीमहाराज नेपोलियनप्रमाणें एक खासगी व्यक्ति नव्हते ही गोष्ट प्रथम ध्यानांत धरली पाहिजे. ते एका बऱ्याच विस्तृत भूमीचे जहागीरदार असून त्या वेळच्या जहागीरदारांच्या हक्काप्रमाणें आपल्या राज्याचे पूर्ण मालक होते. ते विजापूरचे अंकित होते म्हणजे विजापुरवाल्यांस प्रसंग विशेषीं फौजेनें मदत करणें एवढेंच त्यांचें कर्तव्य होतें. ज्या वेळेस त्यांनीं स्वतंत्रता पुकारली त्या वेळेस ते खरे राजे झाले. येथें एवढें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं त्यांनीं आपला स्वातंत्र्यस्थापनेचा उद्योग कधींहि गुप्त ठेविला नाहीं. असो तर, पहिली अट ही कीं लुटण्याची क्रिया एका स्वतंत्र राष्ट्राधिपतीनें किंवा त्याच्या हुकमानें राष्ट्रीय साधनांसाठीं झाली पाहिजे. शिवाजीमहाराजांस ही अट पूर्णपणें लागू पडते. आतां दुसरी अट म्हणजे युद्ध पुकारलेल्या वेळींच लुटीचा हा हक्क आहे.

तिचा आपण केळुसकरांच्या चरित्रावरून खुलासा पाहूं. प्रथम त्यांनीं मोंगलांशीं युद्ध आरंभून जुन्नर व अहमदनगर शहरें लुटलीं, तेथें अनेक घोडे मिळाले त्यांच्या योगानें त्यांनीं आपलें घोडदळ वाढविलें. यानंतर त्यांनीं विजापुरकरांनीं पाठविलेल्या अफजुलखानादि सरदारांस नामोहरम करून आपली स्वराज्याची इमारत मजबूत केली. नंतर त्यांनीं राजापूर शहर घेतलें व लुटलें त्या वेळींहि त्यांचें विजापुरकरांशीं युद्ध होतें. यानंतरची लूट म्हणजे प्रसिद्ध सुरतेची होय. या वेळीं त्यांचें मोंगलांशीं युद्ध होतें, पण विजापुरकरांशीं त्यांचा तह होता. तो तह विजापुरकरांनींच मोडून कोंकणपट्टी घेण्याचा प्रयत्न केला तेव्हां शिवाजीमहाराजांनीं बार्सिलोर शहरावर एकाएकीं जाऊन तेथील लोक लुटले. यानंतर त्यांचा विजापुरकरांशीं तह झाला तो पुन्हां त्यांनींच मोडला, तेव्हां त्यांनीं हुबळी शहर लुटलें. यानंतर त्यांस राज्याभिषेक झाला. यापुढें सुरत शहर दुसऱ्यांदां लुटलें; त्याचप्रमाणें जालना शहरहि लुटलें. मुख्य मुख्य शहरांच्या लुटीची हकीकत येथें मुद्दाम दिली आहे आणि त्या त्या वेळीं शिवाजीमहाराजांचें त्या त्या शहरांच्या राष्ट्रांशीं म्हणजे विजापुरकरांशीं व मोंगलांशीं प्रसिद्ध युद्ध असल्याचें दिसून येतें. फक्त एके वेळीं भागानगरावर शिवाजीमहाराज चालून गेले व त्या शहरापासून खंडणी घेतली, त्या वेळीं कुतुबशाहीशीं शिवाजीमहाराजांचें युद्ध सुरू किंवा पुकारलें असल्याचें वर्णिलेलें नाहीं. पण मला वाटतें ही केळुसकरांची दृष्टि नसल्यानें त्यांनीं या वेळीं युद्ध होतें कीं नाहीं हें वर्णिलेलें नाहीं; बहुधा युद्ध सुरू असावें किंवा कुतुबशाहीनें कबूल केलेली वार्षिक खंडणी दिलेली नसावी. कसेंहि असलें तरी हा प्रकार पूर्वीं वर्णिलेल्या महमुद गझनवीच्या कनोजवरच्या स्वारीप्रमाणें थेट आहे. महमुदाचें व कनोजचें या वेळीं युद्ध नव्हतें, वांकडेंहि नव्हतें; किंबहुना कनोजच्या ध्यानींमनींहि ही गोष्ट नव्हती. एकाएकी स्वारी करूनच युद्ध पुकारणें, आगाऊ सूचना न देतां एखाद्या ठिकाणावर हल्ला करणें, ही युद्ध पुकारण्याची तऱ्हा हल्लींच्या पाश्चात्य International Law मध्येंहि मान्य आहे. यासाठीं ही भागानगरावरची स्वारी गैरशिरस्ता किंवा अन्याय्य मानतां येणार नाहीं. असो तर, एकंदर अनेक शहरांची लूट तत्कालीन युद्धनीतीला व राजनीतीला सोडून आहे, असें कधींहि म्हणतां येणार नाहीं. याशिवाय मुलुखगिरीच्या स्वारीचाहि उल्लेख करावयास पाहिजे. या स्वाऱ्या मोगलांशीं किंवा विजापुरकरांशीं किंवा दोहोंशीं युद्ध पुकारलें असतांच त्या

त्या मुलखांत होत असत आणि ज्यांच्याशीं युद्ध नसून तह असे त्यांच्या मुलुखांत होत नसत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. शिवाजीमहाराजांनीं कित्येक प्रांतांवर जी चौथाई बसविली ती एका प्रकारें परराज्यांतील प्रांत एकदम खालसा न करतां आस्ते काबीज करण्याची पुढें इंग्रजांनीं अवलंबिलेल्या राजनीतीचीच पूर्वपद्धत होती. तिचा आपल्यास येथें विचार करण्याची आवश्यकता नाहीं.

युध्यमान राष्ट्रास लुटण्याचा जसा जिगीषमाण राष्ट्राचा हक्क आहे त्याप्रमाणेंच शत्रूराष्ट्रापासून स्वतःच्या प्रजेस लुटीपासून वांचविण्याची त्याजवर जबाबदारी आहे. शिवाजीमहाराजांस ह्या जबाबदारीची पूर्ण जाणीव होती. आणि यावरून त्यांची कृति राजनीतीला धरून होती असेंच म्हटलें पाहिजे. स्वराज्यांतील लोकांस शत्रूच्या सैन्यानें लुटूं नये याजविषयीं ते नेहमीं खबरदारी घेत. युद्ध सुरूं झाल्याबरोबर परराज्यावर चालून जाण्यांत हा भाग नेहमींच साधतो. जर्मनांनीं फ्रान्सवर स्वारी केली असल्यानें जर्मनीचा मुलूख उध्वस्त होण्यापासून वांचला हें आपण पहातच आहों. शिवाजीमहाराजांची विजापूरकरावर किंवा मोंगलाईवर बहुधा चढाईच असे. यामुळें स्वराज्य नेहमीं लुटीपासून वांचलेलें असे. पण कधीं कधीं हा डाव साधत नाहीं. शिवाजीमहाराजांनीं दूर तंजावरकडे स्वारी केली त्या वेळेस त्यांचा महाराष्ट्रांतील मुलूख अर्थातच विजापुरकरांच्या स्वारीस मोकळा पडला. या वेळीं विजापूरचे मराठे सरदार निंबाळकर व घाटगे यांनीं स्वराज्यांतील पन्हाळे प्रांतावर स्वारी करून कऱ्हाडापर्यंत मुलूख लुटला. शिवाजीमहाराजांस ही खबर लागतांच त्यांनीं पिलाजी काटकर यास त्यांजवर पाठविलें आणि त्यानें त्यांजवर तुटून पडून लुटीचा सर्व माल परत आणला. या मालावर आपली सत्ता नाहीं असें जाणून शिवाजीमहाराजांनीं आपल्या प्रजेपैकीं ज्याचा ज्याचा जो माल होता त्याचा त्याचा त्यास परत केला. " त्या मालांतील एक तनसडीस ते शिवले नाहींत " ( केळुसकर-पान ४४६ ). या हकीकतीवरून शिवाजीमहाराजांच्या मनोवृत्तीची आपल्यास ओळख पटते आणि ती सामान्य समाजांतील लुटारूच्या मनोवृत्तीहून भिन्न व फारच उच्च दर्जाची, राजकर्तव्याची योग्य जाणीव असलेली दृष्टीस पडते.

वरील हकीकतीसंबंधीं एका गोष्टीचा उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं. स्वराज्यस्थापनेच्या शिवाजीमहाराजांच्या उद्योगास त्यांचेच जातभाई व नातेवाईक आडवे येत होते ही गोष्ट दुर्दैवानें हिंदुस्थानच्या इतिहासांत नमूद करावी लागते. जगाच्या इतिहासांत असा चमत्कार हिंदुस्थानांतच दृष्टीस पडतो कीं आम्ही आम्हासच लुटावें आणि मारावें. पाश्चात्य इतिहासांत इंग्रजांनीं स्पानियर्ड लोकांस लुटलें किंवा जर्मनांनीं फ्रेंचांस लुटलें किंवा स्पानिश लोकांनीं डच लोकांस लुटलें असेंच दिसेल. इंग्रजांनीं इंग्रजांसच लुटलें असें दिसणार नाहीं. किंबहुना पौर्वात्य लोकांत तुर्कांनीं अरबांस लुटलें किंवा अरबांनीं इजिप्शियनांस लुटलें किंवा मोंगलांनीं चिनी लोकांस लुटलें असेंच दिसेल. अरबांनीं अरबांस लुटलें असें बहुधा दिसणार नाहीं. हिंदुस्थानांत स्वजनविरोध पदोपदीं दृष्टीस पडतो. या स्वजनविरोधानेंच शिवाजीमहाराजांस स्वराज्यस्थापनेच्या कामांत अतिशय प्रयास पडले, आणि गुजराथी लोकांस, कर्नाटकी लोकांस आणि आंध्रादिकांसच नव्हे तर महाराष्ट्रीय स्वजनांसच त्यांस वारंवार लुटावें लागलें. एकच भाषा, धर्म, जात किंबहुना गोत यांतील लोकांचे असे दोन तुकडे पडले होते कीं मुसलमानी राज्याच्या सरदाऱ्या किंवा नोकऱ्या करणाऱ्या महाराष्ट्रीयांस शिवाजीमहाराजांस लुटावें लागे किंबहुना मारावें लागे. पण उदात्त स्वराज्य–कल्पनेस प्रधान मानून शिवाजीमहाराजांनीं ही आपत्ति मान्य केली. अर्थात त्यांचें कृत्य कधीं कधीं मराठ्यांस अप्रिय झालें. शिवाजीमहाराजांची आग्र्याहून सुटका झाल्यावर गोसाव्याच्या वेषानें महाराष्ट्रांत एका बाईच्या येथें मुक्काम केला असतां त्या बाईनें शिवाजीमहाराजांस न ओळखतां त्यांच्या लुटारूपणाबद्दल शिव्या दिलेल्या त्यांनीं आनंदानें ऐकिल्याची गोष्ट प्रसिद्ध आहे. असा हा स्वराज्याचा विभाग आपण राजकीय दृष्टीनें बाजूस ठेवला पाहिजे हें उघड आहे. शिवाजीमहाराजांनीं अनेक वेळां मराठ्यांस लुटलें. पण तें स्वराज्यांत नव्हे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. हे स्वजातीय लोक स्वकीय म्हणजे स्वराज्यांतील नव्हते; ते मोगलांच्या राज्यांतील किंवा विजापुरच्या राज्यांतील होते. स्वराज्यांतील लोकांस–मग ते मराठे असोत किंवा मुसलमान असोत–शिवाजीमहाराजांनीं स्वतः कधीं लुटलें नाहीं व दुसऱ्यास लुटूं दिलें नाहीं.

ही स्वराज्याची जबाबदारी त्यांनीं पूर्णपणें ओळखली होती व पार पाडली होती.

" It is only just to state that this extraordinary man while devastating other lands was not unmindful of the duty he owed to his own subjects." ( H. H. of the world )

इतकेंच नव्हे तर, युद्धकालीं शत्रुराष्ट्राला लुटून हीनबल करण्याची शिवाजीमहाराजांची प्रत्यक्ष तऱ्हा धर्मयुद्धाच्या उच्च नीतीस सोडून नव्हती ही गोष्ट आपल्यास सिद्ध करतां येईल. शिवाजीमहाराजांनीं स्वराज्य-स्थापनेच्या पवित्र कार्यासाठीं तत्कालीन राजनीतीप्रमाणें शत्रुराज्यांतील लोकांस किंबहुना हिंदूंस व स्वकीयांस अपरिहार्य म्हणून लुटलें, तरी अशा वेळीं त्यांनीं उच्च धर्म व नीति यांची कास सोडली नाहीं. बहुधा हा परिणाम त्यांच्या महाभारतांतील धर्मयुद्धाच्या नीतीच्या श्रवणाचा होय असें मानतां येईल. पाश्चात्य इतिहासकारांनीं शिवाजीमहाराजांची ही उच्च नीति मान्य व कबूल केली आहे. Historian's History of the world चा इतिहासकार म्हणतो—" Cows, cultivators and women were exempt from plunder. And he shed no unnecessary blood. He was not cruel for cruelty's sake " ( Vol XXII ). " गाई, शेतकरी आणि स्त्रिया लुटीपासून मुक्त होत्या, आणि केवळ निर्दयतेची हत्या त्यानें कधींहि केली नाहीं." यांतील प्रत्येक शब्द महत्त्वाचा आहे. शिवाजीमहाराजांच्या लुटींत गाई हंबरडा फोडीत कधीं हाकल्या गेल्या नाहींत किंवा गरीब बिचारे शेतकरी आपल्या अल्प वित्तापासून नागवले गेले नाहींत. ग्रीक लोकांनीं भरतखंडांत स्वारी केली त्या वेळीं अन्य देशांत कधीं न दिसणारा हा चमत्कार त्यांनीं लिहून ठेवलेला आहे, कीं येथें लढाया चालू असतां शेतकरी लोक बिनहरकत आपला व्यवसाय करीत असतात. महाभारतकाळीं जे धर्मयुद्धाचे नियम होते तेच शिवाजी-महाराजांनीं चालविले असें यावरून स्पष्ट दिसतें. मुसलमानांनीं गाईचा कधींच विवेक केला नाहीं आणि शेतकऱ्याचा केला नाहीं. अर्थात शिवाजीमहाराजांच्या धर्मपरायणतेचा तत्कालीन व पूर्वकालीन मुसलमान राजांच्या क्रूर वर्तनाशीं तुलना करतां लोकांच्या मनावर उत्तम पगडा बसला असला पाहिजे हें उघड आहे.

वरील वाक्यांत गाई व शेतकरी यांजबरोबर ब्राह्मण व फकीर हे

लुटीपासून मुक्त होते हें सांगितलें पाहिजे होतें. इतकेंच नव्हे तर हिंदूंचीं देवळें व मुसलमानांच्या मशिदी याहि लुटीपासून मुक्त होत्या. ब्राह्मणांस व फकीरांस शिवाजीमहाराजांच्या लोकांनीं कधीं लुटलें नाहीं. हें त्यांचें करणें केवळ अंध धर्मश्रद्धेनें नव्हे तर उच्च धार्मिक बुद्धीचें होतें हें उघड आहे. कारण अंध श्रद्धा त्यांस फकीरांविषयीं बेफिकीर करती. ब्राह्मण व फकीर बिचारे बहुधा गरीबच असत तेव्हां त्यांस न लुटलें तरी चालेल असें कदाचित् वाटेल. पण उच्च धार्मिक बुद्धीनें शिवाजीमहाराजांनीं देवळांस व मशिदींस लुटलें नाहीं. या दोनही ठिकाणीं त्यांस पुष्कळ संपत्ती सांपडली असती. परंतु तिजकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें. यासंबंधानें मुसलमानांचीं कृत्यें त्या वेळचीं व पूर्वींचीं पहा. मुसलमानांनीं तर प्रथम धाड देवळांवरच नेहमीं घातली आहे व देवळांस लुटून मूर्तिहि फोडल्या आहेत. कदाचित् मूर्ति फोडणें व देवळें लुटणें हा त्यांच्या धर्माचाच आदेश होता असें कोणी म्हणेल तर पाश्चात्य देशांच्या इतिहासाकडे पहा. पाश्चात्य देशांत एकच धर्म ख्रिस्ती असून जिंकणाऱ्या सेनेनें देवळें लुटण्यास बहुधा कसूर केली नाहीं. या बाबतीचीं शेंकडों उदाहरणें सांपडतील. किंबहुना हल्लींच्या युद्धांत जर्मन तोफा खुशाल ख्रिस्ती देवळें फोडीत आहेत. शिवाजीमहाराजांची धर्मनीति किती वरिष्ठ दर्जाची होती हें यावरून स्पष्ट दिसेल. त्यांनीं धर्मश्रद्धेनें आपलीं देवळें तर लुटलीं नाहींतच, पण मुसलमानांच्या मशिदींनाहि त्यांनीं हात लावला नाहीं. जें भयंकर कृत्य मुसलमान गाजींनीं पदोपदीं केलें, जें ख्रिस्ती गाजीहि वारंवार करीत आले, तें निंद्य कृत्य शिवाजीमहाराजांनीं कधींहि केलें नाहीं हें प्रशंसनीय नव्हे काय ?

पण स्त्रियांच्यासंबंधानें शिवाजीमहाराजांनीं जो आदर व मनोनिग्रह दाखविला तो तर आजपर्यंतच्या इतिहासांत अद्वितीय होय. शिवाजीमहाराजांस आम्ही जे अवतार मानतों तें यामुळें यथार्थ होय असेंच वाटतें. स्त्रियांस लुटूं नये ही उदात्त नीति आजपर्यंतच्या इतिहासांत शिवाजीमहाराजांशिवाय दुसऱ्या कोणीहि दाखविली नाहीं. इतकेंच नव्हे तर बहुधा स्त्रियांसंबंधानें अन्य लोकांचें आचरण अधमपणाचेंच इतिहासांत दिसतें. विजयधुंदीनें उन्मत्त झालेल्या सैनिकांनीं जबरदस्तीनें धरलेल्या स्त्रियांच्या किंकाळ्या मुसलमानांच्या व ख्रिस्त्यांच्याहि इतिहासांत वारंवार

ऐकूं येतात. जिंकलेल्या शहरांतील किंवा प्रांतांतील स्त्रिया धरून नेऊन गुलाम किंवा दासी करण्याचा सांप्रदाय ग्रीकांच्या इतिहासांत व पूर्वेकडच्या पारशी, मुसलमानांच्या इतिहासांत सर्रास दिसतो. हिंदुस्थानांतीलच इतिहासांत हा अनर्थ इतका भयंकर दृष्टीस पडतो कीं महमुदाच्या स्वाऱ्यांत स्त्री-गुलाम चारचार रुपयांस मिळूं लागले होते असें वर्णन आहे. शिवाजीमहाराजांनीं त्यांच्या वेळींहि चालू असलेल्या मुसलमानांच्या दुष्ट कृत्यांचा सूड उगवला नाहीं, इतकेंच नव्हे तर सर्व जातींच्या स्त्रियांकडे लुटण्यासाठीं ढुंकून बघूं नये अशी कडकडीत शिस्त ठेवली. वास्तविक स्त्रियांना लुटण्यांत चांगलाच फायदा असला पाहिजे. हिंदुस्थानांत कोणत्याहि स्त्रीजवळ, मुसलमान-हिंदु, गरीब-श्रीमंत, स्त्रीजवळ, दागिने मिळावयाचे नाहींत असें कधीं व्हावयाचें नाहीं. असें असून केवळ धर्मनीतीनें स्त्रियांकडे पहावयाचें नाहीं ही महाभारताची शिकवण शिवाजीमहाराजांनीं मान्य केली. स्त्रियांस त्यांनीं लुटलें नाहीं मग धरून नेण्याची गोष्टच कशाला ? येथें हें उल्लेखिलें पाहिजे कीं, पाश्चात्य देशांच्या इतिहासांत स्त्रियांसंबंधानें अधर्माचरण युद्धप्रसंगीं स्पेन, फ्रान्स, इताली, जर्मनी इत्यादि देशांत आढळतें, पण इंग्लंडच्या इतिहासांत आढळत नाहीं. इंग्रजांची स्त्रियांसंबंधानें वर्तणूक नीतियुक्त दिसते. हिंदुस्थानच्या इतिहासांतहि असेंच दिसतें. किंबहुना सत्तावनच्या बंडाच्या वेळींहि त्यांची वर्तणूक प्रशस्त होती. जोंपर्यंत देवांस व स्त्रियांस इंग्रज हात लावीत नाहींत तोंपर्यंत त्यांचा पराजय होणार नाहीं असें त्या वेळेस वृद्ध लोक बोलत. पण झांशीच्या लुटींत स्त्रियांस हात लावूं नये अशी जशी सक्त ताकीद होती, तशी त्यांस लुटूं नये अशी ताकीद असल्याचें दिसत नाहीं आणि म्हणूनच स्त्रियांस लुटूं नये हा शिवाजीमहाराजांचा नियम खरोखरच इतिहासांत अद्वितीय होय. अशा शिवाजीमहाराजांस आम्ही धन्य व पूज्य मानतों यांत नवल कोणतें ?

लुटण्याच्या कारवाईत शिवाजीमहाराजांनीं विनाकारण क्रूरता कधींच दाखविली नाहीं हें वरील इतिहासकाराच्या वाक्यांत स्पष्ट नमूद आहे. शिवाजीमहाराजांनीं क्रूरता कधींच अवलंबिलेली नाहीं. स्वारी केलेल्या प्रांतांतील लोकांस--ते युध्यमान असोत, किंवा अयुध्यमान असोत-कतल करण्याचा सांप्रदाय मुसलमानांच्या इतिहासांत दृष्टीस पडतो. कांहीं

कांहींनीं तर या बाबतींत अतिशय क्रूरता केलेली आढळते. मुसलमानी इतिहासकारांनीं ही गोष्ट लपवूनहि ठेवली नाहीं. महमूदबाहमनी या बाबतींत फारच क्रूर होता. त्यानें विजयानगरचे प्रांत लुटले इतकेंच नव्हे तर हजारों लोकांची कत्तल केली. विजयानगरावरच्या एका स्वारींत एक लाख मनुष्यें कत्तल करीन अशी प्रतिज्ञा करून ५ लाख माणसें मारलीं. एके वेळीं तर the slaughter amounted to 70 thousand men, women and children. अशीं भयंकर वर्णनें अधिक देत नाहीं. विजयानगरनें या वेळीं महंमुदाची विनंति करून अयुध्यमान गरीब प्रजेस परस्परांनीं मारूं नये असा तह केला. इतिहासकार म्हणतो ( Sewell' s Forgotten Empire ) " For some years the promise was fulfilled, but we read of wholesale massacres perpetrated by sovereigns of later date " अशा प्रकारची कत्तल चिडून विजयानगरचे लोकहि मुसलमानांच्या राज्यांत करीत. शिवाजीमहाराजांच्या वेळींहि अशीं क्रूर कत्यें मुसलमानांनीं केलीं आहेत. त्यांतील दोनचार उदाहरणें देऊं. दिलेरखानानें चाकणचा किल्ला काबिज करून आंतील नऊ वर्षांहून अधिक वयाच्या सर्व माणसांची कत्तल उडविली ( केळु. पा. ३१७. ). मोंगलांनीं भूपाळगड घेतला त्या वेळेस किल्ल्यावरचे सर्व लोक पकडले. " त्या मोंगल सरदारानें त्या निरपराध लोकांचे डावेउजवे हातपाय तोडले. हें क्रूर कर्म संभाजीस पाहवलें नाहीं " ( पा. ४५९ सदर ). जंजिऱ्याच्या सिद्दीनें कुर्ला प्रांतांतील लोकांस पकडून न्यावें, कित्येकांचा शिरच्छेद् करावा व बायकामुलांस गुलाम म्हणून विकावें असे अनेक अत्याचार शिवाजीमहाराजांच्या समोर घडत. पण त्यांचा मोबदला शिवाजीमहाराजांनीं कधीं घेतला नाहीं. शिवाजीमहाराजांनीं निरपराध प्रजेची शत्रूच्या मुलुखांत कत्तल केली नाहीं असें निश्चयानें म्हणतां येतें. लुटीच्या वेळीं व्यापाऱ्यांस व धनिकांस हातपाय तोडण्याची किंवा डोकीं मारण्याची ते केवळ भीति दाखवीत असत. सारांश, एकंदर शिवाजी-महाराजांची राजनीति धर्मयुद्धाच्या नियमांस धरून होती. महाभारताच्या श्रवणाचा त्यांच्या मनावर सुपरिणाम झालेला निःसंशय दिसतो आणि या-मुळेंच हल्लींच्या पाश्चात्य सुधारलेल्या युद्धनीतीइतकी सुधारलेली युद्धनीति महाराजांची होती. महाभारतांत शांतिपर्व अध्याय १३४ यांत पुढील श्लोक आहे—" अयुध्यमानस्य वधो दारामर्षः कृतघ्नता । ब्रह्मवित्तस्य चादानं निःशेषकरणं तथा । स्त्रियां मोषः पतिस्थानं दस्युष्वेतद्विगर्हितम् ॥"

अनार्य लोकांतहि अयुध्यमान प्रजेला मारणें, बायकांवर जुलूम करणें, विश्वासघात करणें, निःशेष करणें ( नांगर फिरविणें ), बायका पळवून नेणें अथवा लुटणें हें निंद्य सांगितलें आहे. याप्रमाणें शिवाजीमहाराजांचें वर्तन होतें. ब्रह्मवित्त घेऊं नये या नियमाचा योग्य रीतीनें विस्तृत अर्थ घेऊन ब्राह्मण व फकीर, देवळें व मशिदी, यांच्या वित्तास ते कधींच शिवले नाहींत. अयुध्यमान गरीब प्रजेची शत्रूच्या राज्यांत त्यांनीं कधींच कत्तल केली नाहीं. जें निंद्य कर्म मुसलमान त्यांच्यासमोर त्यांच्या भोंवतालीं वारंवार करीत होते ( उ. " कुर्ला प्रांतांत शिद्यांनीं शिरून गांव लुटून पुष्कळ प्रजेची कत्तल केली व पुरुष-स्त्रिया-मुलें पकडून नेऊन गुलाम म्हणून विकले " केलु. पा. ३३६. ), जे घोर कत्तलीचें कर्म त्यांचे वेळीं व पूर्वी पोर्तुगीज करीत होते तें शिवाजीमहाराजांनीं कधीं केलें नाहीं. उलट युध्यमान सैनिकांपैकीं जे निक्षिप्तशस्त्र होत, हत्यारें खालीं ठेवून शरण येत, त्यांसहि त्यांनीं मारलें नाहीं. किंबहुना जखमी होऊन पाडाव झालेल्यास बरें करून परत पाठविलें; ही गोष्ट महाभारताच्या उदात्त धर्मयुद्धाच्या नियमाप्रमाणें त्यांनीं केली. याबाबतींत पाश्चात्य देशांतीलहि सुधारलेले धर्मयुद्धाचे नियम यापुढें गेले नाहींत.

शिवाजी एक दरवडेखोर होता हें समाजनीतिदृष्ट्या इतिहासकाराचें विधान सर्वथैव चुकीचें आहे. शिवाजीमहाराजांस आपल्या कृत्याच्या रास्तपणाची जाणीव चांगली होती. तत्कालीन इतर राष्ट्रांच्या लोकांसहि होती. राजास किंवा राष्ट्रास ज्या राष्ट्रांशीं त्याचें युद्ध नाहीं त्यांतील लोकांस लुटण्याचा हक्क नाहीं, ही मर्यादा शिवाजीमहाराज जाणत होते. त्यांनीं सुरत लुटली त्या वेळेस इंग्रज किंवा फ्रेंच किंवा डच वखारीस लुटलें नाहीं. या लोकांनीं आपला बचाव सामर्थ्यानें केला हें वर्णन चुकीचें आहे. शिवाजीमहाराजांस त्यांस लुटावयाचें असतें तर तें त्यांनीं सिद्ध केलेंच असतें. सुरतेच्या धनिक लोकांस त्यांनीं आश्रय दिला एवढ्याचबद्दल तंटा असावा असें दिसतें. राजापूर व हुबळी लुटली त्या वेळीं इंग्रजांच्या वखारीचें नुकसान झालें असें दिसतें. मुंबईचा गव्हर्नर आंजियर्स यानें आमचें नुकसान झालें तें भरून द्या अशी मागणी शिवाजीमहाराजांपाशीं केली. शिवाजी लुटारू होता तर अशी मागणी आंजियर्स यास करतांच आली नसती. शिवाजीमहाराज खरोखरच दरवडेखोर असते तर ते ही मागणी कबूल करतेहिना.

या मागणीला एकच आधार होऊं शकतो, तो हाच कीं इंग्रजांचें व शिवाजीमहाराजांचें युद्ध नव्हतें. अर्थात् इंग्रजांना लुटणें सामुदायिक राजनीतीला सोडून होतें. शिवाजीमहाराजांनीं ती मागणी मान्य केली. जी खरोखर नुकसानी हुबळी येथें झाली तिची, व मागें राजापुरास झालेल्या नुकसानीची भरपाई करून देण्यास आपण तयार आहों असें शिवाजीमहाराजांनीं या वेळीं इंग्रजांस कळविलें (केळु. पा. ३२७). व पुढें राज्याभिषेकप्रसंगीं इंग्रजांचा वकील आला होता त्याच्याशीं कलमबंदी ठरली त्यांत या नुकसानीसंबंधानें भरपाईची तजवीजहि केली. असो तर तात्पर्य हें कीं, या बाबतींत International Law चे जर कांहीं नियमच नसते, आणि शिवाजीमहाराज व एखादा खराखुरा दरवडेखोर यांत कांहीं अंतर नसतें तर इंग्रजहि नुकसान भरून मागतेना आणि शिवाजीमहाजहि भरून देतेना. असें असून इंग्रज व मुसलमान इतिहासकारांनीं शिवाजीमहाराजांस साधारण लुटारूंच्या पंक्तीस नेऊन बसविलें आहे. शिवाजी लूट करीत असे, पण हें त्यांचें कृत्य राजनीतीस धरून होतें; व नियमबद्ध,–योग्य आणि नीतियुक्त धर्मयुद्ध नियमांनीं बांधलेलें होतें असा त्यांनीं इतिहासांत शेरा द्यावयास पाहिजे होता तो त्यांनीं कधींहि दिला नाहीं याचें आश्चर्य केल्यावांचून रहावत नाहीं.

पण इतिहासकारांच्या–विशेषतः इंग्रजी इतिहासकारांच्या–या चुकीमुळें प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें आमचें व इंग्रजांचेंहि फार नुकसान झालें आहे. आमच्या मनांत शिवाजीमहाराजांविषयीं भलत्याच कल्पना भरल्या आहेत व आमच्या राजनीतिच्या कल्पनेची धांव भलत्याच दिशेकडे वाहवली आहे. सामान्य लुटारू आणि युध्यमान शत्रुराष्ट्रांतील लोकांस लुटणारा राजा यांतील भेद आमच्या लक्षांत राहिला नाहीं. जें शेंकडों मुसलमान राजांनीं केलें व जें समुद्रावर हल्लीं इंग्रजहि करीत आहेत तें शत्रूच्या लोकांस लुटण्याचें कर्म सामुदायिक राजनीतीच्या युद्धनियमांस अनुसरून आहे हा भेद आम्ही विसरलों; व इंग्रजी इतिहासकारहि जाणून बुजून किंवा साहजिक विसरले. यामुळें लोकांची, विशेषतः कच्चें डोकें असलेल्या तरुण इंग्रजी शिकलेल्यांची, अशी कल्पना झाली आहे कीं, स्वराज्यस्थापनेच्या कामासाठीं पाहिजे त्याला लुटून धन मिळविणें न्यायाचें आहे. आणि या भ्रांत समजुतीला आधार शिवाजीमहाराजांच्या अत्युदात्त

चरित्राचा! इतिहासाच्या चुकीच्या दृष्टीचा केवढा दुष्परिणाम होतो हें यावरून लक्षांत येईल. शिवाजीमहाराजांनीं लोकांस लुटून राज्य स्थापन केलें हीच कल्पना चुकीची. शिवाजीमहाराज एका राष्ट्राचे प्रत्यक्ष राजे होते, त्यांनीं मोंगलांशीं किंवा विजापुरकरांशीं युद्ध पुकारलें होतें, त्यांनीं त्या शत्रुराष्ट्रांतील लोकांस युद्धनीतीस अनुसरून युद्धसमयीं लुटलें, त्यांनीं स्वकीयांस म्हणजे स्वराज्यांतील लोकांस लुटलें नाहीं या गोष्टी हे भ्रांत तरुण लोक विसरतात आणि स्वदेशांतील स्वबांधवांसच शांततेच्या काळांत लुटतात. मनोवृत्ति निर्मळ असली तर कृत्य निंद्य होत नाहीं हा सिद्धांत लागू केला तरीहि अशा लोकांचें कृत्य सदोष व निंद्यच ठरेल. हे तरुण लोक स्वराज्यस्थापनेच्या उच्च कल्पनांनीं प्रेरित असतात, त्यांची स्वदेशप्रीति उज्ज्वल असते हें खरें; पण उघड रीतीनें युद्ध पुकारून चालून न आलेल्या राजाच्या सैनिकांची मनोवृत्ति स्वदेशप्रेमानें भरली असली तरी त्यांच्या कृत्याच्या सदोषतेनें ती मलिन झाल्याखेरीज राहणार नाहीं.

शिवाजीमहाराज सामाजिक नीतीदृष्ट्या लुटारू नव्हते आणि राजनीतिदृष्ट्या युध्यमान राजास शत्रूच्या लोकांस लुटण्याचा, त्या वेळच्या इतिहासाप्रमाणें निदान, धडधडित हक्क होता असें असून शिवाजी लुटारू होता हा भलता प्रवाद कां उत्पन्न झाला याचें कारण थोडेंबहुत तरी शोधलें पाहिजे. याचीं दोन कारणें देतां येतील. प्रथम शिवाजीमहाराजांच्या लुटी इतक्या अनेक व फलदायी झालेल्या दिसतात कीं, साहजिकच कोणत्याहि मनुष्याला हेवा उत्पन्न झाल्याशिवाय राहत नाहीं. मुसलमानांस तर तो झाला असलाच पाहिजे. इंग्रजांस झाला असावा. शिवाजीमहाराजांचें आयुष्य बहुतेक युद्धांत गेलें. विजापुरकरांशीं किंवा मोंगलांशीं व कधीं दोघांशीं त्यांचें युद्ध चालू असे. आणि दरवर्षी बहुतकरून कोणतें तरी संपन्न शहर ते लुटीत. ही त्यांची स्वारी इतकी जोराची व अचानक होत असे कीं त्यांस श्रीमंत शहरें सहज लुटावयास सांपडत, व ते झपाट्यानें आपली लूट स्वदेशीं पोंचवीत. त्यांची स्वारी कधीं फुकट गेली नाहीं. सुरतेची त्यांनीं दोनदां लूट केली व अतिशय द्रव्य नेलें. त्यांचें सामर्थ्य पाहतां व मोंगल बादशहाच्या प्रचंड सामर्थ्याशीं तुलना करतां शिवाजीमहाराजांनीं सुरत शहर दोनदां लुटलें ही खरोखरच कमाल केली. तात्पर्य शिवाजीमहाराजांची लुटण्याची यशस्वी क्रिया अद्वितीय असून दृष्ट लागण्यासारखी होती. अर्थात् परकी

लोक, मुसलमान, इंग्रज व फ्रेंच शिवाजीमहाराजांस हेव्यानें किंवा आश्चर्यानें लुटीच्या सातत्यामुळें व अव्याहत विजयामुळें लुटारू म्हणत असें दिसतें.

दुसरी गोष्ट अशी कीं, शिवाजीमहाराजांस अवरंगजेब **राजा** लेखीत नसे. राजनीतीप्रमाणें शिवाजीमहाराज जर निश्चयात्मक स्वतंत्र राजासत्ताधीश असते तर त्यांच्या लुटण्याच्या क्रियेस सामान्य लुटारूपणाचें स्वरूप कधींच आलें नसतें. महमूद गझनवीप्रमाणें शिवाजीमहाराजांची लूट अनेकदां यशस्वी झालेली असून महमुदास लुटारू म्हणून कोणी डागिलेलें नाहीं आणि शिवाजीमहाराजांस इतिहासकार लुटारू लेखतात याचें एक कारण हेंच दिसतें कीं, अवरंगजेब त्यांस राजा लेखीत नव्हता; आणि यामुळेंच तो त्यांस लुटारू किंवा दरवडेखोर म्हणे. शिवाजीमहाराजांस या न्यूनतेची जाणीव भासत होती असें दिसतें. शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाचें महत्त्व या दृष्टीनें फार मोठें आहे. केळुसकर म्हणतात " महाराजांस या वेळीं असें वाटूं लागलें कीं शास्त्रविधीनें छत्रसिंहासनादि राजचिन्हें धारण केल्यावांचून शत्रु आपणास पुंडपाळेगारांतच लेखतील. इतर राजे व पातशहा द्यावा तसा मान देणार नाहींत. या देशांत जे परस्थ लोक राहिले आहेत ते आपणास **केवळ लुटारू** समजून आपला तिरस्कार करतील " पा. ४३९. जसा एखादा पाळेगार किंवा सरदार जहागीरदार राजसत्तेशीं बिघडून पूर्वीं पुंडाई करून लुटालूट करीत असे, किंवा हल्लीं एखादा भिल्ल-रामोशी दरवडे घालूं लागतो तशापैकीं शिवाजी आहे असें अवरंगजेब मुद्दाम मानी व बोलून दाखवी. पण शिवाजीमहाराज तशापैकीं नव्हते हें निर्विवाद आहे. प्रारंभापासून त्यांनीं आपल्यास स्वतंत्र राजेच लेखिलें होतें असें स्पष्ट दिसतें. त्यांची मनोवृत्ति स्वतंत्र राजाची होती. ते आपल्या प्रजेस राजभावनेनेंच पाहत, ते King de facto म्हणजे वस्तुस्थित्या राजे होते; पण King de jure नव्हते हें त्यानांच मान्य करावें लागलें. ते कायद्यानें व शास्त्रानें राजे नव्हते हें त्यांना जाचे. शहाजी राजे जिवंत होते तोंपर्यंत त्यांनीं पितृभक्तीनें व राजनीतीस अनुसरून राजचिन्हें धारण केलीं नाहींत व राजे ही पदवीहि धारण केली नाहीं. मोंगलबादशहापासून आपल्या स्वराज्याची सनद घेणें शिवाजीमहाराजांस कधींच पसंत पडलें नसावें. बाळाजी विश्वनाथानें पुढें स्वराज्याची सनद दिल्लीहून आणली, त्याची मनोवृत्ति

शिवाजीमहाराजांच्या मनोवृत्तीहून खालच्या दर्जाची. याशिवाय इतरांनीं आपलें स्वातंत्र्य कबूल करावें हा हल्लींच्या राजनीतीचा भाग आहेच. रोमानियाचा तह इतर राष्ट्रांनींहि मान्य करावा लागतो किंवा फिनलंडचें स्वातंत्र्य इतरांनीं मान्य करावें लागतें हें आपण पाहतों. त्याचप्रमाणें स्वराज्याच्या स्वातंत्र्याची मान्यता बाळाजी विश्वनाथानें दिल्लीच्या बादशहाकडून मिळविली हें योग्यच झालें. पण शिवाजीच्या स्वातंत्र्याची मान्यता अवरंगजेब देईल हें शक्यच नव्हतें; शिवाय त्याच्याकडून फर्मान मिळविणें हें शिवाजीमहाराजांसारख्या अत्युदात्त मनोवृत्तीच्या पुरुषास कधींच मान्य होण्यासारखें नव्हतें. आणि खरोखरच स्वातंत्र्याची किंवा स्वराज्याची सनद दुसऱ्यानें काय द्यावयाची आहे? शिवाजीमहाराजांनीं अवरंगजेबापाशीं स्वराज्याची सनद कशी मागायची? राजपद दुसऱ्या राजानें काय द्यावयाचें आहे? तें राजांचा राजा परमेश्वर यानेंच दिलें पाहिजे, तें ईश्वरानें शिवाजीमहाराजांस दिलें होतें. "नरपति, हयपति, गजपति। गडपति भूपति जलपति। पुरंदर आणि छत्रपति। शक्ति पृष्ठभागीं॥" या समर्थांच्या दिव्य रसपूर्ण उक्तीप्रमाणें ईश्वरकृपेनें शिवाजी महाराज प्रत्यक्ष राजे झालेच होते. पण त्याला ईश्वराचें शिक्कामोर्तब पाहिजे होतें. यामुळें धर्मविधीनें राज्याभिषेक करून घेण्याची कल्पना महाराजांनीं काढली. स्वराज्यस्थापनेच्या कल्पनेप्रमाणें, स्वराज्यस्थापनेला धार्मिक विधीच्या शिक्कामोर्तबाची कल्पना त्यांचीच होय. हिंदुपद्पातशाहीची स्थापना धार्मिक विधीनेंच झाली पाहिजे. धार्मिक विधीचें महत्त्व प्रत्येक लोकांत मानलें जातें. हल्लींच्या प्रेसिडेंटाच्या नेमणुकीस धर्मविधि नको आहे. कारण त्याचें राजत्व ईश्वरदत्त कायमचें नसतें, मनुष्यदत्त पांच वर्षांचें असतें. पण इंग्लंड, जर्मनी वगैरे ख्रिस्ती देशांतसुद्धां कारोनेशनचा धर्मविधि आहे. ईश्वराच्या शिक्कामोर्तबाच्या रक्षणाचे अधिकारी यांनां मंगलतेल राजास लावावें लागतें व मुकुट राजशिरांवर ठेवावा लागतो. मुसलमानांत धर्मविधि आहे, तो अगदीं सोपा आहे तरी मशिदीमध्यें राजाच्या नांवानें खुतबा पढावा लागतो. मुसलमानी इतिहासांत सरदार स्वातंत्र्य वारंवार पुकारीत व स्वतंत्र राजे बनत. पण त्यांचें राजत्व हा खुतबा काजीनें पढल्याशिवाय मान्य होत नसे. सारांश तत्कालीन समजुतीप्रमाणें स्वतंत्र राजास जगजाहीर करण्यास धार्मिक

विधीची अवश्यकता जाणून शिवाजीमहाराजांनीं आपल्यास हिंदुधर्मशास्त्र-विधीनें राज्याभिषेक करविला. गागाभट्ट या विद्वान् काशीस्थ महाराष्ट्र ब्राह्मणानें व्रतबंध झाला नाहीं इत्यादि क्षुद्र अडचणी बाजूस ठेवून व्रात्य-क्षात्रियत्व मुख्य धरून हा विधि वेदोक्त रीतीनें केला हें त्यासहि भूषण आहे. सारांश, कोणत्याच रीतीनें या विधीच्या साफल्यास अडचण आली नाहीं आणि शिवाजीमहाराजांचें स्वातंत्र्यप्रख्यापन संपूर्ण पार पडलें. महारा-ष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या स्थापनेचा हा महोत्सव अश्रुतपूर्व वैभवानें साजरा झाल्याचीं वर्णनें वाचून कोणा महाराष्ट्रीयाचे नेत्रांतून प्रेमाश्रु येत नाहींत? ज्येष्ठ शुद्ध १३ शके १५९६ या पुण्य व धन्य दिवशीं रायगडावर हजारों नव्हे लक्षावधी ब्राह्मण, मराठे, सरदार, दरकदार, पंडित, गुणिजन जमा झाले होते. कोणास कांहींहि वाण पडणार नाहीं अशी सर्वांची उत्तम व्यवस्था ठेविली होती. कित्येक दिवस सुमृष्ट अन्नानें ब्राह्मणांचें संतर्पण झालें होतें. त्रयोदशीच्या दिवशीं सुमुहूर्तावर मंगलवाद्यांच्या सुस्वर गजरांत ब्राह्मणांच्या वेदघोषयुक्त आशीर्वादांत प्रजाजनांच्या प्रेमपूर्ण धन्यवादांत, सरदार, दर-कदार, पंडितांच्या जयजयकारांत, बंदिजनांच्या ललकारयुक्त गायनध्वनींत महाराजांनीं सिंहासनावर आरोहण केलें. पट्टराणीस पट्टबंध करून जवळ बसविलें. राजपुत्र युवराज सिंहासनाच्या पायरीवर बसला. अष्टप्रधान मोर-चेल वगैरे घेऊन अष्टदिशेस उभे राहिले. अनेक सरदारांनीं मुजरे व नजरा केल्या. इंग्रजांच्या वकिलांनींहि नजर केली. अशा वैभवशाली विधीनंतर अनेक सुवर्णालंकारांनीं लदलेल्या घोड्यांच्या व हत्तींच्या रागांनीं सुशो-भित झालेल्या स्वारीच्या थाटानें शिवाजीमहाराज दोन्ही बाजूच्या माड्यां-तून स्त्रियांनीं उधळलेल्या सुवर्णफुलांच्या वर्षावांत शहरांतून देवदर्शन करून राजवाड्यांत आले. नंतर ब्राह्मणांस दक्षिणा व प्रधानसरदारांस देणग्या व वस्त्रालंकार भरपूर दिले. गागाभट्टास एक लक्ष रुपये दिले व अष्टप्रधानांस प्रत्येकीं एकएक लक्ष होन दिले. याच औदार्यानुरूप सर्वांस संतुष्ट करून महाराजांनीं नरपति, हयपति, गजपति इत्यादि स्वतंत्र राजांच्या बिरुदांपैकीं छत्रपति हें बिरुद पद धारण करून आपलें स्वातंत्र्य व राज्या-धिकारधारण सर्व जगतास विदित केलें. याप्रमाणें शिवाजीमहाराजांचा हा राज्याभिषेकोत्सव युधिष्ठिराच्या राजसूययज्ञाप्रमाणें अगणित ब्राह्मणभोजन, अपरंपार संपत्तिदान इत्यादिकांनीं वैभवयुक्त होऊन महाराष्ट्रास यशस्वी

झाला. पण त्याप्रमाणें विघ्नयुक्त न होतां त्यानें शिवाजीमहाराजांस मूर्धाभिषिक्त राजपदीं बसविलें. ते केव्हांहि प्रत्यक्ष स्वतंत्र राजेच होते पण या धार्मिक विधीनें त्यांच्या कृत्यास शिक्कामोर्तब परमेश्वराकडून लागला. अर्थात् शिवाजीमहाराज लुटारू होते हें म्हणणें सामाजिकनीतिदृष्ट्या तर चूकच होय; पण राजनीतिदृष्ट्याही वाजवी नाहीं असें मान्य केलें पाहिजे. इति शम्.



# वैद्य यांचे

# ऐतिहासिक निबंध

## खंड २ रा.

# प्राचीन इतिहास

## नवीन युगकल्पना चुकीची.

राजश्री त्र्यंबक गुरुनाथ काळे यांनीं आपल्या पुराणांच्या संशोधनाचा निष्कर्ष "पुराणनिरीक्षण" या ग्रंथाच्या रूपानें लोकांपुढें नुकताच ठेविला असून, तो ग्रंथ हल्लीं अभिप्रायास्तव 'विविधज्ञानविस्तारा'कडे आला आहे. त्र्यं. गु. काळे यांची शोधकता व व्यासंग करण्याची पद्धति महशूर असून त्या गुणांस साजेल अशा प्रकारची माहिती या पुस्तकांत वाचकांच्या दृष्टीसमोर त्यांनीं ठेविली आहे हें सांगणें नको. पहिल्या प्रकरणांत पुराणांविषयीं सामान्य माहिती रा. काळे यांनीं दिली असून इतिहास, पुराण, आख्यान, उपाख्यान, कल्पशुद्धि या शब्दांनीं कोणत्या ग्रंथांचा व विषयांचा बोध होतो हें त्यांनीं चांगल्या रीतीनें व साधार दाखविलें आहे. प्रत्यक्ष पाहून लिहिलेली हकीकत ती आख्यान होय, व ऐकून लिहिलेली माहिती उपाख्यान होय, ही गोष्ट पुष्कळांस ठाऊक नसते. हा भेद आमच्या पूर्व ग्रंथकारांच्या लक्षांत होता हें पाहून प्राचीन आर्यांस इतिहासलेखनाच्या गुणदोषांची चांगली कल्पना होती हें वाचकांच्या ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं. याच प्रकारच्या ऐतिहासिक ग्रंथांशीं पुराणांचा संबंध असून पुराणें फार प्राचीन काळीं अस्तित्वांत आलीं आहेत व त्यांचा उल्लेख वैदिक ग्रंथांतहि येतो, हें रा. काळे यांनीं सप्रमाण दाखविलें आहे. वैदिक काळापासून पुराणांचें रूपान्तर कसकसें होत गेलें, प्रथम व्यासांनीं पुराणांचें रूपांतर कसें केलें, व्यासांनंतर पुराणांस चालन कसकसें व कितीदां मिळालें, याजविषयीं रा. काळे यांनीं यापुढें चांगलें विवेचन केलें आहे.

शेवटीं पुराणांचा हेतु वेदार्थ प्रकट करण्याचा किंबहुना धर्म सांगण्याचा आहे, असें रा. काळे यांनीं "इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्" "पुराणे धर्मनिश्चयः" इत्यादि वचनांवरून दाखविलें आहे. याजवरून पुराणांची महती पुराणचालनकर्ते काय समजत होते हें वाचकांच्या लक्षांत येईल; व या समजुतीप्रमाणें पुराणांना हल्लींचें स्वरूप प्राप्त झालें आहे, असें म्हटलें असतां चालेल.

पुराणांचा मूळ हेतु 'धर्मनिश्चय' करण्याचा नसावा असें माझें मत आहे. रा. काळे याविषयीं येथें कांहींच लिहीत नाहींत, याजवरून पुराणांचा मूळहेतु हाच होता असें त्यांचें मत असल्याचें दिसतें. पुराणांचा हा हेतु मागाहून उत्पन्न झालेला असो किंवा मूळचा असो, त्या हेतूप्रमाणें त्यांचें हल्लींचें स्वरूप त्यांस मिळालें हें निर्विवाद आहे. हें स्वरूप केव्हां मिळालें हें रा. काळे यांनीं सविस्तर दाखविलें आहे. पुराणांस प्रथम चालन विक्रमोत्तर मिळालें ही गोष्ट पुराणांतील वचनांवरूनच त्यांनीं सिद्ध केली आहे. एकंदर १८ पुराणें मिळून ४ लक्ष ग्रंथ, महाभारत एक लक्ष व रामायण २४००० ग्रंथ, असा सवापांच लक्ष धर्मग्रंथ होय असें सांगणारें एक महत्त्वाचें वचन "एवं सपादाः पंचैते लक्षा मर्त्ये प्रकीर्तिताः" रा. काळे यांनीं दाखविलें आहे. अठरा पुराणें मिळून चार लक्ष—म्हणजे एक एक पुराण सरासरीनें २२००० चें पडतें. मूळ अठरा पुराणें १२।१२ हजारांचीं असें सांगणारें दुसरें एक वचन भविष्यपुराणांतून रा. काळे यांनीं दाखविलें आहे. ही याप्रमाणें पुराणांची दुसरी आवृत्ति व प्रथम वृद्धि होय. यानंतर तिसरी पुराणांची आवृत्ति म्हणजे हल्लीं उपलब्ध असलेलीं पुराणें. हीं पांचव्या किंवा साहाव्या ख्रिस्ती शकांतील आहेत, हें भविष्यद्राजांच्या वर्णनावरून त्यांनीं ठरविलें आहे, तें योग्य आहे. कारण या राजांच्या वर्णनांत शेवटीं कैलकिल यवनांचें वर्णन असून हे विंध्यशक्ति वगैरे कैलसिल राजे इ० स० ६०० च्या सुमारास झाले हें इतिहाससिद्ध आहे. यापूर्वी इ. स. ४०० च्या सुमारास ब्रह्मांडपुराण अथवा वायुपुराण आणि महाभारत व रामायण हे ग्रंथ यवद्वीपांत म्हणजे बालिबेटांत गेले. तेथें ते अद्याप उपलब्ध असून कविभाषेंत प्रचलित आहेत. ब्रह्मांडपुराणाचें डा. फ्रेड्रिक साहेबांनीं दिलेलें महत्त्वाचें वर्णन रा. काळे यांनीं वाचलें आहे. त्यांतील कथाभाग हल्लीं हिंदुस्थानांत असलेल्या ब्रह्मांडपुराणाशीं बहुतेक जुळत आहे. मात्र भविष्यद्राजवर्णनाचा भाग त्यांत नाहीं. "याजवरून इ. स. ४०० च्या सुमारास

ब्रह्मांड किंवा वायु पुराणांत भविष्याचा भाग नव्हता, हें कळून येईल " हा महत्त्वाचा शोध काळे यांनीं या प्रकरणांत दिला आहे, हें वाचकांनीं येथें लक्षांत ठेविलें पाहिजे; कारण काळे यांचेंच यापुढें या गोष्टीकडे दुर्लक्ष झालेलें दिसतें, हा चमत्कार होय.

मूळ पुराण एक असून त्याचीं व्यासांनीं १८ आदि–पुराणें केलीं, व त्यांजवर तीन किंबहुना चार संस्करणें झालीं. तीं केव्हां व कशीं झालीं हें थोडक्यांत रा. काळयांच्याच शब्दांनीं देऊं. " सारांश, व्यासापूर्वीचें पुराण, व्यासकृत आदि पुराणांची प्रवृत्ति, तीं आदिपुराणें विक्रमाच्या काळापर्यंत स्वस्वरूपांत कायम असणें, तेव्हां त्या प्रत्येकाची १२ हजार संख्या असणें, नंतर विक्रमकाळीं पुराणांवर द्वितीय संस्कार होऊन तीं सूताकडून पुनरुक्त होणें व त्यांची संख्या तेव्हां चतुर्लक्ष असणें; त्यानंतर इ० स० ५००–६०० सुमारास सद्यःकालीन पुराणांस भविष्यवर्णनाचे भाग जोडण्यांत येणें; नंतर कांहीं कांहीं पुराणांत मतप्राबल्याच्या वेळीं कांहीं प्रक्षेप जोडण्यांत येणें; इतके संस्कार पुराणांस झालेले स्पष्ट दिसत आहेत." रा. काळे यांनीं शोधक व ऐतिहासिक दृष्टीनें काढलेलीं वरील निगमनें बहुतेक सर्वांस मान्य होतील व तीं चांगलीं साधार आहेत असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं.

दुसऱ्या प्रकरणांत काळे यांनीं प्रत्येक पुराणाविषयीं सविस्तर माहिती दिली आहे. नारदसूची म्हणजे नारद पुराणांत दिलेली प्रत्येक पुराणाची माहिती या कामीं फारच महत्त्वाची आहे, व तिजशीं व प्रत्येक पुराणाच्या हल्लींच्या स्वरूपाशीं रा. काळे यांणीं तुलना केली आहे. या सूचींत पुराण कोणीं कोणास सांगितलें, तें कोणत्या मन्वन्तराविषयीं आहे, त्यांत प्रकरणें भाग, खंड वगैरे किती व कोणते आहेत, प्रत्येक प्रकरणांत काय काय कथा आहेत, एकंदर प्रकरणवार श्लोकसंख्या किती, अशी तपशीलवार माहिती दिली असल्यामुळें ही नारदसूची ग्रंथाची स्थिति स्थिर होण्यास मोठी साधनीभूत झाली असावी. अशी सूची झाल्यावर बहुधा ग्रंथाचा विस्तार होणें किंवा मूळांत फेरबदल होणें बहुतेक अशक्य असतें. ही सूची रा. काळे यांच्या मतें इ. स. ५००–६०० किंबहुना याहूनही अर्वाचीन असावी. या वेळचें पुराणस्वरूप काय होतें हें समजण्यास या सूचीचा फार मोठा उपयोग होतो. या सूचीवरून कित्येक अपवाद सोडून बहुतेक पुराणांची स्थिति त्या वेळेस–म्हणजे सूचीच्या

वेळेस—जशी होती तशीच हल्लीं आहे असें दिसतें. प्रत्येक पुराणासंबंधानें अत्यंत महत्त्वाची माहिती, रा. काळे यांनीं या सूचीवरून व इतर अनेक प्रमाणांवरून दिली आहे. निरनिराळ्या पुराणांच्या संबंधानें त्यांनीं दिलेली माहिती येथें सारांशरूपानें देणें किंवा त्याजविषयीं त्यांचें मत कितपत योग्य आहे याजबद्दल ऊहापोह करणें महत्त्वाचें आहे तरी विस्तारभयास्तव तसें करणें सोडून देतों. रा. काळ्यांनीं दिलेली माहिती फारच महत्त्वाची आहे व त्याजवरून त्यांची शोधकता व्यक्त होते. त्यांनीं या प्रकरणांत नमूद केलेलीं मतेंहि एक दोन अपवाद खेरीज करून मजला मान्य आहेत. व बहुधा सर्वांसच मान्य होतील. सारांश, हा भाग माहितीच्या व शोधाच्या दृष्टीनें जिज्ञासूंस अत्यंत उपयोगी व मनोरंजक आहे यांत शंका नाहीं.

आतां आपण या पुस्तकांतील तिसऱ्या प्रकरणाकडे वळूं. हें प्रकरण म्हणजे या पुस्तकांतला सर्वांत अत्यंत महत्त्वाचा भाग होय. या प्रकरणांतील मुद्दे नवे असून त्यांतील कांहीं मतें नवीन एवढेंच नव्हे तर चमत्कारिक आहेत, ही गोष्ट रा. काळे यांसहि मान्य आहे. व त्यांनीं या उत्तरार्धास स्वतंत्र प्रस्तावना जोडून त्यांत "ह्या भागांत आलेले विषय जुन्या मताच्या लोकांस विस्मय करणारे आहेत, पण एवढ्यामुळें त्यांनीं या भागाचें वाचन सोडून देऊं नये" अशी विनंति केली आहे. मुख्यतः या प्रकरणांत रा. काळे यांनीं आपली नवीन युगकल्पना लोकांसमोर मांडली आहे. हल्लींची युगांची कल्पना म्हणजे ४ लक्ष ३२ हजार वर्षांचें कलियुग, व याच्या दुप्पट, तिप्पट व चौपट द्वापर, त्रेता आणि कृतयुग मिळून ४३ लक्ष २० हजारांचें चतुर्युग होय. ही हल्लींची कल्पना महाभारत मनुस्मृतींत नाहीं व तेव्हांचें चतुर्युग म्हणजे १२००० वर्षांचें होतें, असें हल्लींच्या कित्येक विद्वानांचें म्हणणें आहे. पण रा. काळे तेंहि सोडून पुढें गेले आहेत. या मानवी वर्षांचीं युगें देखील "ऐतिहासिकदृष्ट्या ग्राह्य धरितां येत नाहींत, असें कांहीं पाश्चात्य व कांहीं पौर्वात्य विद्वानांचें मत आहे. अशा प्रकारच्या युगांच्या भिन्न भिन्न अवाढव्य व्याप्तीमधून सुव्यवस्थित साध्या युगाकडे मीं कशी वाट काढली" हें रा. काळे यांनीं या प्रकरणांत दाखविलें आहे. पूर्वीं चार वर्षांचेंच युग मानीत असत व ३१०१ सन पूर्व हा कलियुगाचा आरंभ नसून कल्पाचा आरंभ आहे, व ७१ युगांचें मन्वंतर म्हणजे २२८ वर्षांचें मन्वन्तर होय अशी मूळची कल्पना होती, असा रा.

काळे यांचा एकंदर सिद्धांत या तिसऱ्या प्रकरणांत नमूद केला असून तदनुरोधानें भारतीय युद्धाचा काळ व कित्येक प्राचीन राजांचा काळ रा. काळे यांनीं ठरविला आहे. सारांश, ह्या उत्तरार्धांतील विवेचन, विशेषतः या तिसऱ्या प्रकरणांतील विवेचन, अत्यंत महत्त्वाचें असून त्याजविषयींच मुख्यतः ह्या लेखांत मला ऊहापोह करावयाचा आहे.

त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षांच्या चतुर्युगास व याच्या एकाहत्तर पट म्हणजे ३० अब्ज ६७ लक्ष २० हजार वर्षांच्या मन्वंतरास भिऊन रा. काळे यांनीं ४ वर्षांचें चतुर्युग व २२८ वर्षांचें मन्वंतर या छोटेखानी—किंबहुना बाहुलाबाहुलीच्या—कालगणनेकडे जी वाट काढली आहे, ती खरोखर आश्चर्यकारक आहे, इतकेंच नव्हे, तर चुकीची आहे यांत शंका नाहीं. नवीन कल्पनेस भुलून रा. काळे यांनीं हा जो नवीन सिद्धान्त रचला आहे त्याचा जर तेच शांतपणानें व अभिनिवेश सोडून विचार करतील तर ते तो सोडून देतील अशी मला खात्री वाटते. या कल्पनेचें मूळ रा. आर. शामशास्त्री, बी. ए., यांचें " गवामयनम् " हें पुस्तक होय, हें रा. काळे यांनीं कबूल केलेंच आहे. एक वर्षाचें एक युग अशी चतुर्युगांची कल्पना शामशास्त्री यांनीं घेऊन सदर पुस्तक लिहिलें आहे. ती कल्पना रा. काळे यांनीं उचलून तिजवर आपल्या आणखी कल्पनांची इमारत रचून हा जो सिद्धान्त त्यांनीं बसविला आहे, तो त्यांच्या मार्गदर्शकाच्या दिशेसहि सोडून गेला आहे असें दिसून येतें. याच सिद्धान्ताचें मुख्यतः निरीक्षण करणें जरूर असल्यामुळें विशेष विस्तृत रीतीनें हा विषय वाचकांपुढें मांडला पाहिजे.

हा सिद्धांत विस्तारानें रा. काळे यांच्याच शब्दांनीं वाचकांपुढें मांडू. " यावरून एवढें उघड होतें कीं आपण जो तूर्त कल्यारंभ म्हणून समजतों तो खरोखर पूर्वींचा कल्पारंभ. कल्पारंभ व कल्यारंभ यांच्या लेखनसादृश्यावरून ही चूक झाली असावी. यामुळें भारतीयुद्धाचा खरा ऐतिहासिक काळ लोपून कल्यारंभ भारतीय युद्धापासून समजण्यांत येऊन भारती युद्धाचा काळ ३१०२ इ. स. पू. हा समजण्यांत आला. या प्रमादपरंपरेचें खापर आर्यभट्टादि ज्योतिष्यांच्या डोक्यावर फोडलें पाहिजे. कल्पाचा आरंभ खरोखर इ. स. पू. ३१०२ सालीं होऊन ही वैदिककालगणना नाभानेदिष्टापासून १८३९ वर्षांपर्यंत सुरू होती. पुढें भारती युद्धा-

नन्तर ही कल्पाची गणना निरसून गेली. भारती युद्धाच्या वेळीं द्वापर व कलि हीं वर्षांचीं नावें होतीं. " वगैरे. इ. स. पू. ३१०१ हा कलीचा आरंभ असें आपण हल्लीं सर्व मानतों. तो आरंभ परंपरेनें ठरविला नसून आर्यभट्टानें गणितानें कायम केला, असें प्रो. रंगाचार्य प्रभृति विद्वान् आजपर्यंत म्हणत आले. परंतु त्याजवरहि रा. काळे यांनीं कडी केली असें म्हणावें लागतें. रंगाचार्यादि विद्वान् लोक आर्यभट्टाची विद्वत्ता तरी कबूल करतात. कारण गणितानें मागचा काळ काढणें कांहीं सोपें काम नव्हे. पण रा. काळे यांनीं प्रख्यात प्रथमार्यसिद्धांतकार आर्यभट्ट यास अक्षर–ओळखहि नव्हती अशा प्रकारचा वेडगळ ठरविला आहे. ह्या प्रमादाचा चिखल त्या बिचाऱ्याच्या डोक्यावर टाकून रा. काळे यांनीं त्यास स्वर्गांतहि धुळवडीच्या दिवसाचें दैन्य भोगावयास लावलें आहे. पण हा वेडगळपणाचा आरोप आर्यभट्टावर करण्यापूर्वीं रा. काळे यांनीं थोडासा विचार करावयास पाहिजे होता. कल्पारंभ असून कल्यारंभ असें आर्यभट्टानें प्रमादानें वाचलें हें संभवनीय तरी आहे काय ? हल्लीं जसा एखादा अशोक–कालीन दोन हजार वर्षांपूर्वींचा शिलालेख त्यावेळची अक्षराची लिपि अगदीं लुप्त झाल्यावर आपल्या समोर येतो आणि आपल्यास अक्षरें वाचण्याची अडचण पडते, तसा प्रसंग आर्यभट्टावर आला होता कीं काय ? इ. स. पू. ३१०१ किंवा ३१७९ शकपूर्व कल्पारंभ असा लेख दोनचारशें वर्षांतच आर्यभट्टापुढें आला असेल; कारण आर्यभट्टाचा काल ४२१ इ. स. हा आहे. किंवा त्याच्या पूर्वीं हजार दोन हजार वर्षें ही परंपरा किंवा हा लेख लुप्तच होता ? अशाविषयीं कोठें उल्लेख किंवा दाखला आहे काय ?– किंवा ही केवळ कल्पना ? याशिवाय परंपरा शिलालिखित नसून लोकांत तोंडीं प्रचलित असतात, किंबहुना प्राचीन काळीं बहुतेक सर्व ग्रंथ तोंडीं पाठ करण्याचा सम्प्रदाय विशेष; तेव्हां जेथें कोठें कल्पारंभ शब्द आला असेल ( तो कोठें होता हें रा. काळयांस मुळींच माहीत नाहीं ) तेथें तोंडीं म्हणण्याच्या पाठांत कल्पारंभाच्या ठिकाणीं कल्यारंभ असा शब्दव्यामोह होणें शक्य नाहीं. सारांश, कल्पारंभ असून त्या ठिकाणीं कल्यारंभ असें आर्यभट्टानें प्रमादानें वाचलें ही केवळ कोटी आहे, व या कोटीच्या मोहास रा. काळे बळी न पडते तर ती त्यांनीं त्यांच्या विचारपरिप्लुत ग्रंथांत नमूद केली नसती.

पण ३१०१ इ. स. पूर्व हा कल्पारंभ, असा पूर्व काळीं कोठें लेख असेल हेंच असंभवनीय आहे, हें थोडासा विचार केला असतां दिसून येईल. कल्प शब्दाला प्रारंभापासून एकच अर्थ आहे. युग शब्दाचे जसे अनेक अर्थ पूर्वी होते,– मनुष्ययुग, दैवीयुग, इत्यादि निरनिराळे उल्लेख जसे पूर्वी मिळतात– तसे कल्पाचे मिळत नाहींत. कल्प म्हणजे सृष्टीच्या उत्पत्तीपासून सृष्टीच्या लयापर्यंतचा काळ, असाच नेहमीं अर्थ होता हें स्पष्ट आहे. कल्प हा शब्द वैदिक वाङ्मयांत आहे कीं नाहीं हें मला नक्की सांगतां येत नाहीं. पण कल्प शब्दाच्या या अर्थाचें मूळ वेदांत आहे. "धाता यथा पूर्वमकल्पयत्" या ऋचेंत त्याचें मूळ आहे. पूर्वींप्रमाणेंच धात्यानें सृष्टि पुन्हा उत्पन्न केली, या वाक्यांतील कल्प् धातूवरून कल्प शब्द निघाला आहे. तो भगवद्गीतेंत याच अर्थानें वापरलेला आहे. अध्याय ९ मधील "सर्वभूतानि कौंतेय प्रकृतिं यांति मामिकाम् । कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम्" या श्लोकांत हीच कल्पना स्पष्ट आहे. हा कल्प ब्रह्मदेवाचा एक दिवस अशीहि कल्पना फार प्राचीन आहे; व हा दिवस म्हणजे एक हजार युगें, ही समजूत अत्यंत जुनी आहे. 'सहस्रयुगपर्यंतमहर्यद् ब्रह्मणो विदुः । रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहो– रात्रविदो जनाः ॥ हा श्लोक फार जुना आहे. तो भगवद्गीतेंत आहे, इतकेंच नव्हे, तर तो यास्काच्या निरुक्तांतहि आहे. सारांश, कल्प म्हणजे सृष्टीच्या उत्पत्तीपासून लयापर्यंतचा काळ, व हा काळ म्हटला म्हणजे एक हजार युगें, ही कल्पना फार प्राचीनकाळापासून अबाधित चालू आहे; व कल्प शब्दास या विषयाला लागू पडेल असा दुसरा अर्थच नाहीं. असें जर आहे तर ३१०१ इ० स० पू० कल्पारंभ अशी परंपरा किंवा समजूत कधीं तरी आर्यलोकांत होती हें संभवत नाहीं. सृष्टीची उत्पत्ति झाल्यापासून इसवी सनाच्या आरंभापर्यंत ३१०१ वर्षेंच झालीं, इतकी वेडगळ समजूत आमची कधीं होती हें शक्यच नाहीं. इसवी सनाच्या आरंभापर्यंत सृष्टि उत्पन्न झाल्याला सहा सात हजार वर्षें झालीं असें ज्यू लोक मानतात व त्यांना हल्लींचे भूगर्भशास्त्रवेत्ते हंसतात. सृष्ट्युत्पत्तीस इ० स० पर्यंत ३१०१ वर्षेंच झालीं असें आमचे आर्यपूर्वज मानीत असतील तर ते ज्यू लोकांपेक्षांही वेडगळ म्हणावयाचे ! सृष्ट्युत्पत्तीला ( कल्पाला ) प्रारंभ होऊन शकापर्यंत किंवा विक्रमापर्यंत तीन हजार किंवा एकतीसशें वर्षें झालीं असें कधींहि

कोणीं हिंदुस्थानांत मानलें नाहीं व मानल्याचा दाखला मिळत नाहीं. तेव्हां आर्यभट्टाला, इ. स. पू. ३१०१ म्हणजे कल्पारंभ, असा कोठें दाखला मिळाला असेल असें संभवत नाहीं. ह्या गोष्टीचा विचार शांतपणें रा. काळे करतील तर ते ही आपली कल्पना सोडून देतील असें मला वाटतें. कदाचित् कल्पारंभ या शब्दांतील कल्प शब्द अन्यार्थी असल्यास नकळे; पण मला तो अन्यार्थीत उपयोगांत आल्याचें आजपर्यंत दृष्टीस पडलें नाहीं.

इ. स. पू. ३१०१ हा कल्पारंभ अशी समजूत आर. शामशास्त्री, बी. ए., यांचीहि नाहीं. ते हा कल्यारंभच समजतात हें येथें सांगितलें पाहिजे. "गवामयनम्" या पुस्तकांत पान १४१ वर ते लिहितातः—

"There is no doubt that concurrently with the Vedic Era of the "Cows' walk" kept by the priests for themselves, there was also a vulgar era, the Kali era counted seriatim by the common people from the same starting point as that of the Cows' walk and continued without interruption even during the 12th century and onwards when, for reasons already stated, the sacrificial era of 460 or 459 cycles came to a stop."

"यज्ञकर्त्यांनीं आपल्यासाठीं चालू केलेल्या गवामयन नांवाच्या कालगणना–पद्धतीशिवाय साधारण लोकांनीं कलिकाळ म्हणून एक पद्धति त्याच प्रारंभापासून सुरू होणारी चालू केली, यांत मुळींच संशय नाहीं. आणि ही सामान्य लोकांची पद्धति इ० स० पू० बाराव्या शतकांतूनही पुढें राहिली. म्हणजे ज्याप्रमाणें गवामयनांची पद्धति ४६० पर्याय अथवा ४५९ युगांनंतर बंद पडली त्याप्रमाणें ती बंद पडली नाहीं." ह्या वाक्यावरून रा. आर. शामशास्त्री यांचें मत स्पष्ट दिसतें कीं इ. स. पू. ३१०१ याला पूर्वीपासून कल्यारंभच म्हणत होते आणि गवामयन पद्धत तरी कल्पारंभापासून नव्हे तर कलि म्हणजे पहिलें वर्ष धरून एक सुरू केलेली कालगणनापद्धति असून, तिचा आरंभ जेव्हांपासून वैदिक ऋषींनीं ३६५¼ दिवसांचें वर्ष शोधून काढून अधिक दिवस मोजणारी चतुर्युगपद्धति बसविली तेव्हांपासून गवामयन सुरू झालें. असो, शामशास्त्री यांच्या कल्पनेचा आधार घेऊन त्याजवर रा. काळे यांनीं इ. स. पू. ३१०१ म्हणजे कल्पा–

रंभ ही भलतीच कल्पना केली असें मला वाटतें. आणि या आधारावर त्यांनीं आर्यभट्टास वेडगळ ठरविण्याचा प्रयत्न केला आहे !!!

कल्पारंभाची कल्पना जशी काळे यांची चुकली आहे तशीच युग म्हणजे एक वर्ष, आणि कृत, त्रेता, द्वापर, कलि हीं चतुर्वर्षांच्या युगांतील प्रत्येक वर्षाचीं नावें भारतकाळीं होतीं, ही त्यांची समजूत चुकीची आहे, हें वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल. ' सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः । ' या श्लोकांतील युग शब्द चार वर्षांचा वाचक जर घ्यावयाचा तर कल्पांचीं एकंदर वर्षे ४००० च होतात; म्हणजे जगताच्या उत्पातिलयाचा अवघा खेळ चार हजार मानवी वर्षांतच कीं काय ? इ. स. पू. ३१०१ या वर्षी सृष्टि उत्पन्न झाली, आणि इ. स. ८९९ च्या वर्षी तिचा लय झाला अशा प्रकारचा वेडगळ अर्थ या कल्पनांपासून होतो असें जेव्हां मीं रा. काळे यांच्या निदर्शनास आणिलें तेव्हां त्यांस निराळी कल्पना कायम करणें भाग पडल्याचें त्यांनीं मला सांगितलें. ती अद्याप पूर्णतेस आली नाहीं. पण ती अशी कीं, पूर्वी दैवी युगें निराळीं मानीत होते, व मानवी युगें निराळीं मानीत होते. आलें तर पुन्हा दैवी युगावर; म्हणजे चार वर्षांच्या पेक्षां मोठ्या युगावर पुन्हां येऊन ठेपलें म्हणावयाचें. सहस्र युगांचा कल्प म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस. येथें युग शब्द दैवीयुगवाचक आहे असें मानिलें पाहिजे, असें काळे कबूल करितात. दैवी युग किती मानवी वर्षांचें हें अद्यापि त्यांनीं ठरविलें नाहीं !!!

पूर्वी चार वर्षांचें युग होतें याजबद्दल आधार म्हणून भारतकाळीं कृत, त्रेता, द्वापर, कलि हे शब्द वर्षाचे वाचक होते असा भ्रम रा. काळे यांचा ज्या श्लोकांवरून झाला आहे त्या श्लोकांचा आतां विचार केला पाहिजे. कारण या श्लोकांचा अवास्तव अर्थ काळे यांनीं घेतल्यामुळें त्यांच्या चुकीच्या समजुतीला व सिद्धान्ताला पाठिंबा मिळाला असें त्यांस वाटलें; पण त्या श्लोकांचा खरा अर्थ पाहिला म्हणजे त्यांची चुकी वाचकांच्या नजरेस येईल. या श्लोकांपैकीं मुख्य श्लोक वनपर्वांतील असा—

संधिरेष नरश्रेष्ठ त्रेताया द्वापरस्य च । वन० १२१

संधिर्द्वयोः नरश्रेष्ठ त्रेताया द्वापरस्य च । वन० १२५

याजवर रा. काळे म्हणतात " यांत पांडव तीर्थयात्रेंत असतां त्रेता आणि द्वापर यांचा संधि दोन ठिकाणीं आहे. पुढें भीमाची व हनुमानाची गांठ पडली असतां म्हटलें आहे:—

एतत्कलियुगं नाम अचिराद्यत्प्रवर्तते ॥ वन० १४९

म्हणजे वनवासाच्या बारा वर्षांच्या अवधींत एकदां त्रेताद्वापराचा संधि होता व एकदां द्वापरकलीचा. मग हीं युगें होतीं तरी केवढीं ? तीं चार युगांचीं म्हणजे चार वर्षांचीं चतुर्युगें होतीं असें मानल्यावांचून गत्यंतर नाहीं. " वरील अवतरणावरून काळे यांना गूढ कोणतें पडलें व त्यांनीं तें स्वतःच्याच कल्पनेवरून भलत्याच रीतीनें कसें सोडवलें हें दिसून येईल. ते जर श्लोकांचा पूर्वापार संबंध वाचते व टीकाकाराची मदत घेते तर हें गूढ सरळ रीतीनें सुटलें असतें. प्रथमोक्त दोन्ही चरण वनपर्वांतील सुकन्येच्या आख्यानांत आले आहेत. सुकन्या नांवाची शर्याति राजाची एक मुलगी होती. भार्गवच्यवन ऋषि तप करीत असतां त्यांच्या अंगावर वारूळ वाढलें होतें, त्यांतून त्यांचे डोळे लुकलुक करीत होते, ते सुकन्येनें खेळांत गवताच्या काडीनें फोडले. तेव्हां ऋषीनें शर्यातीच्या सैन्यांतील सर्व लोकांचें मलमूत्र बंद केलें. चोहींकडे हाहाःकार झाल्यामुळें हा अनर्थ कसा झाला ह्याची चौकशी करितां राजास खरी हकीगत कळली, तेव्हां त्यानें च्यवनाची क्षमा मागितली व आपल्या मुलीच्या अपराधाबद्दल तिचें त्याशीं लग्न करून दिलें. ती एकनिष्ठपणें पतीची सेवा करीत असतां अश्विनीकुमारांनीं तिच्या पतीस एका सरोवरांत स्नान घालून दिव्यरूप केलें. तेव्हां च्यवनानें अश्विनीकुमारांस यज्ञांत सोमभाग देण्याचें वचन देऊन आपला सासरा शर्याति याजकडून एक यज्ञ करविला. त्यांत अश्विनींस सोमभाग इंद्राच्या मर्जीविरुद्ध दिला. इंद्रानें च्यवनास वज्र मारण्याला उगारलेला हात च्यवनानें स्तंभित केला. अशी या सौकन्यआख्यानांत कथा असून तें सरोवर व तो यज्ञ केलेला देश नर्मदेच्या व वैडूर्य पर्वताच्या दरम्यान असून, तें तीर्थ लोमशानें धर्मराजास दाखवून त्याचें माहात्म्य सांगितलें, तेथें हा श्लोक आहे. त्याच्या मागच्या पुढच्या संदर्भासहित या आख्यानाच्या आरंभीं एकदां श्लोक आला आहे तो असाः--

देवानामेति कौंतेय तथा राज्ञां सलोकताम् ।
वैडूर्य-पर्वतं दृष्ट्वा नर्मदामवतीर्य च ॥ १९
संधिरेष नरश्रेष्ठ त्रेताया द्वापरस्य च ।
एनमासाद्य कौंतेय सर्वपापैः प्रमुच्यते ॥ २०

एष शर्याति-यज्ञस्य देशस्तात प्रकाशते।
साक्षाद्यत्रापिबत्सोममश्विभ्यां सह कौशिकः॥
चुकोप भार्गवश्चापि महेंद्रस्य महातपाः।
संस्तंभयामास च तं वासवं च्यवनः प्रभुः॥
सुकन्यां चापि भार्यां स राजपुत्रीमवाप्तवान्॥ २२

याप्रमाणें १२१ अध्यायांत कथा-प्रस्ताव असून सुकन्येची कथा सांगितल्यावर १२५ व्या अध्यायांत येणेंप्रमाणें शेवट केलेला आहेः--

तस्यैतद्द्विज-संघुष्टं सरो राजन् प्रकाशते।
अत्र त्वं सह सौंदर्यैः पितॄन्देवांश्च तर्पय॥
एतद्दृष्ट्वा महीपाल सिकताक्षं च भारत।
सैन्धवारण्यमासाद्य कुल्यानां कुरु दर्शनम्॥
पुष्करेषु महाराज सर्वेषु च जलं स्पृशन्।
स्थाणोर्मंत्राणि च जपन् सिद्धिमाप्स्यसि भारत॥
संधिर्द्वयोर्नरश्रेष्ठ त्रेताया द्वापरस्य च॥

"या सरोवरांत स्नान कर, व पितृंचें तर्पण कर व या सैंधवारण्यांतील नद्यांचें व पुष्करणीचें पाणी शंकराचे मंत्र जपून नेत्रांस लाव म्हणजे सिद्धि प्राप्त होईल. हा त्रेता आणि द्वापर यांचा संधि आहे." पहिल्या श्लोकांतील 'हा' या शब्दानें हा काल घ्यावयाचा नाहीं तर हा देश घ्यावयाचा आहे हें उघड आहे. एष म्हणजे एष देशः असाच अर्थ उत्पन्न होतो, व टीकाकारानें येथें असेंच म्हटलें आहेः--" सांप्रतं कलिद्वापरयोः संधावपि अत्र तीर्थे त्रेताद्वापरसंधिकालोऽस्ति. अत्र स्नातानां कलिस्पर्शो नास्तीति भावः।" सारांश, या तीर्थांत स्नान करणाऱ्यांस नेहमींच त्रेता-द्वापराचा संधि आहे, म्हणजे इतकें पुण्य आहे, अशी प्रशंसा. हल्लीं वेळ उत्तम आहे म्हणून स्नान कर अशी येथें वेळेची प्रशंसा उद्दिष्ट नाहीं. आतां येथें कोणी अशी शंका घेईल कीं, देशाची किंवा तीर्थाची प्रशंसा उक्त आहे, तर त्रेताद्वापराचा संधि असेंच कां म्हटलें? कृतत्रेता कां म्हटलें नाहीं, किंवा कृतच नुसतें कां म्हटलें नाहीं? तर यांतही कांहीं मर्म आहे असें दाखवितां येईल. कृतांत कोणतेच विधि प्रवृत्त झाले नाहींत, त्रेतांत यज्ञ सुरू झाले, व द्वापरांत तप प्रधान होतें, असें कित्येक ठिकाणीं

निर्दिष्ट केलेलें आढळतें. वनपर्व अ. १४९ मध्यें जेथें भीमहनुमानाची भेट आहे व निरनिराळ्या युगांचें वर्णन आहे तेथें " त्रेतामपि निबोध त्वं यस्मिन्सत्रं प्रवर्तते " " तपोदानप्रवृत्ता च राजसी भवति प्रजा " असें त्रेताद्वापरांचें वर्णन आहे.* शर्यातीचा यज्ञ, अश्विनींना मिळालेला सोमभाग, व च्यवनभार्गवाचें तप, यांस उद्देशून त्रेताद्वापर यांचा येथें संधि म्हणजे मेळ आहे असें म्हटलें असल्यास नवल नाहीं. सारांश, ज्या वनपर्वांत कृतत्रेताद्वापरकलि यांचीं परिमाणें दिलीं आहेत, " एतत्कलियुगं नाम अचिराद्यत्प्रवर्तते " असा जेथें पुढेंच श्लोक आहे, त्यांत मध्यंतरीं त्रेताद्वापर संधि या शब्दांनीं त्रेता द्वापर हीं एका वर्षाचीं नांवें कशीं संभवतील? याचा विचार करून टीकाकारानें जो अर्थ लावला आहे व जो मागच्या पुढच्या संदर्भावरून योग्य दिसतो तोच युक्त आहे हें कोणी कबूल करील.

आतां रा. काळे यांचा दुसरा आधार म्हणून घेतलेला श्लोक घेऊं. येथें पूर्वापर संबंध न पाहिल्यामुळें व कथा काय आहे हें लक्षांत न घेतल्यानें रा. काळे यांची चूक झाली आहे. कृत, त्रेता, द्वापर, कलि हे शब्द व युगशब्द महाभारतांत नेहमीं दीर्घकालवाचक येतात हें रा. काळे यांस कबूल आहे. कोठें चुकून एकवर्षबोधक हे शब्द येतात असें त्यांचें म्हणणें आहे. यांपैकीं पहिल्या उदाहरणाची व्यवस्था आपण पाहिली. दुसरें उदाहरण देतांना रा. काळे म्हणतात " युग शब्द वर्ष या अर्थी कोठें कोठें चुकून आढळतो. हजार वर्षांच्या कलीच्या अन्ताचें वर्णन करीत असतां चुकून म्हटलें आहे कीं,

तस्मिन् युगसहस्रान्ते संप्राप्ते चायुषः क्षये ।
अनावृष्टिर्महाराज जायते बहुवार्षिकी ॥ व. १८८. ६५

येथें ' युगसहस्रान्ते ' हा शब्दप्रयोग वर्षसहस्रान्ते याच अर्थी योजिला आहे. युग शब्द वर्षाच्या अर्थी योजलेला येथेंच प्रथम आढळतो." पान २६१. पण येथें **युग** शब्द नेहमींच्या चतुर्युगाच्या म्हणजे १२ हजार वर्षांच्या युगाच्या अर्थी आहे, हें रा. काळे यांस संदर्भावरून व गोष्टीवरून सहज समजलें असतें. प्रत्येक कलियुगाच्या अन्तीं जगताचा

* अन्य ठिकाणी अन्य प्रकारचें वर्णन आहे. उ. शांतिपर्वांत ' तपः परं कृतयुगे त्रेतायाम् ज्ञानमुत्तमम् । द्वापरे यज्ञमेवाहुः दानमेकं कलौ युगे ॥ ' असें म्हटलें आहे; पण बहुधा त्रेतांत यज्ञ व द्वापरांत तप असें दिसतें.

क्षय होत नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. जगताचा अंत कल्पाच्या अंतीं होतो हें पूर्वीं सांगितलेंच आहे; आणि कल्प एक हजार युगांचा हें ठरींव आहे. 'सहस्रयुगपर्यंतमहर्यद्ब्रह्मणो विदुः' हें गीतावाक्य पूर्वीं दिलेंच आहे. त्या युगसहस्राच्या अन्तीं म्हणजे कल्पाच्या अन्तीं जगताचा लय कसा होतो, हें मार्कंडेय ऋषि ( ज्यांना कित्येक कल्पांचें आयुष्य आहे ) वर्णन करतांना हा श्लोक आला आहे. यांत कलियुगाचा उल्लेख मुळींच नाहीं आणि युग 'शब्द' येथें नेहमींच्या चतुर्युगाचाच वाचक आहे. ही गोष्ट मागील पुढील संदर्भाचे श्लोक दिले असतां वाचकांच्या लक्षांत येईल.

चत्वार्याहुः सहस्राणि वर्षाणि तत्कृतं युगम् ।
तस्य तावत्शती संध्या संध्याशश्च तथा स्मृतः
एषा द्वादशसाहस्री युगाख्या परिकीर्तिता ।
एतत्सहस्रपर्यन्तमहो ब्राह्ममुदाहृतम् ।
लोकानां मनुजव्याघ्र प्रलयं तं विदुर्बुधाः ।

यानंतर निरनिराळया युगांचें वर्णन केल्यावर प्रलयाचें वर्णन सुरू करतांना मार्कंडेय म्हणतात—

अल्पावशिष्टे तु तदा युगान्ते भरतर्षभ ।
सहस्रान्ते नराः सर्वे प्रायशोऽनृतवादिनः ॥

नंतर 'तस्मिन् युगसहस्रान्ते' वगैरे श्लोक आला आहे. यावरून युग शब्द येथें वर्षवाचक नाहीं ही वाचकांची खात्री होईल.

महाभारतांत चुकूनसुद्धां युग शब्द एकवर्षार्थी किंवा कलिद्वापरत्रेता शब्द एका वर्षाचे वाचक सांपडावयाचे नाहींत. रा. काळे यांनीं महाभारताच्या बाहेरचीं जीं दोन उदाहरणें दिलीं आहेत, त्यांचा आतां विचार करूं. रा. काळे म्हणतात, "भारतकाळीं एक वर्षाचें युग होतें यास उत्तम उदाहरण गर्गाच्या बृहद्गार्गी संहितेमध्यें आहे.

ततो नरक्षये वृत्ते सुशान्ते नृपमण्डले ।
भविष्यति कलिर्नाम चतुर्थं पश्चिमं युगम् ॥
ततः कलियुगस्यान्ते परीक्षिज्जनमेजय ।
पृथिव्यां प्रथितः श्रीमानुत्पत्स्यति न संशयः ॥

"येथें भारतीय युद्धाचें वर्णन आहे. युद्ध झाल्यानंतर कलियुग लागलें. नंतर त्या कलियुगाच्या शेवटीं परीक्षित् जन्मला हें कसें? उत्तर

युद्धकाळीं गरोदर होती, ती पुढें कांहीं महिन्यांनीं प्रसूत झाली. इतक्यांत कलियुग संपत आलें असावें. म्हणजे हें अर्थात् एका वर्षाचें कलियुग होय." रा. काळे यांनीं येथें पूर्वापर संबंध पाहिला नाहीं. दुसऱ्यांनीं कोठें तरी उतरून घेतलेल्या एकाकी श्लोकावर, मुळाशीं ताडून न पाहतां व आपल्या नेहमींच्या शोधकपणाचा उपयोग न करतां, रा. काळयांनीं असलीं भ्रामक प्रमाणें घेतलीं आहेत, असें दुर्दैवानें म्हणावें लागतें. गर्ग-संहितेंतील युगपुराण नामक अध्यायांत हे श्लोक आहेत त्यांचा मागचा पुढचा संदर्प असा:--

सर्वच श्लोक देणें कंटाळवाणें होईल म्हणून मुख्य मुख्यच देतों.

... ... ... ...

प्रापद्यत ततो घोरं तृतीयं द्वापरं युगम् ।
नरा वर्षसहस्रेण देहं त्यक्ष्यन्ति दुःखिताः ॥

तस्यापि च युगस्यान्ते मेदिनी क्षयमेष्यति ।
वधार्थं द्वापरस्यान्ते समुत्पत्स्यति केशवः ॥

ततो नरक्षये वृत्ते प्रशान्ते नृपमंडले ।
भविष्यति कलिर्नाम चतुर्थं पश्चिमं युगम् ॥
ततः कलियुगस्यान्ते परीक्षिज्जनमेजयः

... ... ...

ततः कलियुगे राजा शिशुनागात्मजो बली
ततः साकेतमाक्रम्य पाञ्चाला माथुरास्तथा
यवना युद्धविक्रान्ता प्राप्स्यन्ति कुसुमध्वजम् ॥

... ... ...

शकानां च ततो राजा ह्यर्थलुब्धो महाबलः

या अध्यायावरून असें स्पष्ट दिसतें कीं, प्रथम कृतयुग. त्यांत मनुष्यांना एक लक्ष वर्ष आयुष्य. त्यानंतर देवासुरयद्ध झाल्यावर त्रेतायुग, चारी वर्णांची उत्पत्ति व सत्राचें प्रवर्तन. यांत मनुष्याचें आयुष्य दहा हजार. या युगाच्या शेवटीं परशुराम क्षत्रियांस निःशेष करील. मग द्वापर युग. यांत मनुष्याला एक हजार वर्षें आयुष्य. या युगाच्या शेवटीं कौरव-पांडवयुद्ध. नंतर कलियुग चौथें व शेवटचें युग. यांत प्रथम परीक्षित् जन-

मेजय—नंतर शिशुनागवंश—नंतर यवन—नंतर शक—नंतर अनेक राजे होतील; असें वर्णन आहे. या पूर्वापर संदर्भावरून हें चौथें व शेवटचें कलियुग एकच वर्षाचें होतें असें कसें संभवेल! बरें, परीक्षितानंतर याच कलियुगांत एका वर्षांत शिशुनागराजे, यवन व शक कसे आले? रा. काळे हा पूर्वापर संबंध पाहते तर, हा कलि एक वर्षाचा आहे असें कधींही मानते ना.

पण या श्लोकावरच जर ते अधिक लक्ष देते तर त्यांना अधिक चौकशी करण्याची जरूर इच्छा उत्पन्न झाली असती. जनमेजय असें जें यांत पद आहे तें मुळांत ' जनमेजयः ' असें आहे. जनमेजय असें संबोधन घेतलें तर गर्गसंहितेंतील हें युगपुराण जनमेजयाला सांगितलें असें होईल. हा श्लोक महाभारतांतला नाहीं. येथें जनमेजय असें संबोधन कां याची चौकशी रा. काळे यांनीं केली पाहिजे होती, आणि ती केली असती म्हणजे मुळांत जनमेजयः असें पद आहे हें ते पाहते, आणि हा श्लोक मुळींच परीक्षिताविषयीं नसून परिक्षिताचा पुत्र जनमेजय याजविषयीं आहे, हें त्यांचे लक्षांत आलें असतें. ह्याच्या लागलीच पुढील श्लोकावरून ही गोष्ट निर्विवाद दिसते. तो श्लोक असा:—

सोपि राजा द्विजैः सार्धं विरोधमुपयास्यति ।
दारविप्रकृतामर्षः कालस्य वशमागतः ॥

या श्लोकांत सांगितलेल्या गोष्टीवरून, येथें परीक्षिताच्या **जन्माची** मुळींच उक्ति नाहीं, तर जनमेजयाच्या होण्याची हकीकत आहे, रा. काळे यानीं आपल्या कल्पनेच्या आधाराला भलताच श्लोक घेतला आहे, हें स्पष्ट दिसतें. पूर्वापार संबंध पाहिल्याशिवाय एखादा श्लोक मध्येंच घेतला म्हणजे अर्थाचा अनर्थ माहितगार मनुष्याच्या हातून कसा होतो याचें हें एक उदाहरण आहे.*

---

*चुकीचा श्लोक घेऊन रा. काळे याची कशी धादल उडाली आहे, हें चाणाक्ष वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. ' ततः कलियुगस्यान्ते परीक्षिज्जनमेजयः ।' याजवर रा. काळे म्हणतात, 'उत्तरा भारतयुद्धकाळीं गर्भार होती ती पुढें काहीं महिन्यांनीं प्रसूत झाली. इतक्यांत कलियुग **संपत आलें** असावें.' भारती युद्ध मार्गशीर्षांत झालें हें लक्षांत घेतां, व गर्भाचे पूर्ण दिवस घेऊनहि परीक्षिताच्या जन्माच्या वेळेस पुढचें वर्ष संपत येत नाही. वर्ष चैत्रादि घ्यावयाचें आहे. माघादि घेतलें तरीही तें संपत येत नाही!!! अन्ते याचा अर्थ सन्निधौ असा घेतला पाहिजे.

आतां आपण रा. काळे यांनीं आधार मानलेल्या शेवटल्या श्लोकां-कडे वळूं. हा श्लोक भागवतांतील आहे. 'अधीतवान् द्वापरादौ पितुर्द्वैपाय-नादहम्। २–१–८. यांत 'द्वापराच्या प्रारंभीं शुक व्यासापासून भागवत शिकला असें म्हटलें आहे. तेव्हां येथें द्वापार एकच वर्षाचा घेतला पाहिजे' असें रा. काळे म्हणतात. पण एक वर्ष अर्थ घेतला तर अर्थबोध काय होतो हें पहा. एक वर्षाच्या आरंभीं म्हणजे पहिल्या दिवशीं, किंवा पहिल्या महिन्यांत, किंवा दोन महिन्यांत, असा अर्थ फार झालें तर होईल. पण शुक एक दोन महिन्यांत समग्र भागवत शिकला हें संभवनीय नाहीं. याहून विशेष गोष्ट रा. काळयांच्या सर्व वचनांना व सिद्धान्ताला लागते ती ही कीं, जर दर चार वर्षांनीं तींच तींच नांवें येणार तर अमुक गोष्ट द्वापरांत झाली इतकें सांगण्यानें कालबोध कसा होईल? कालासंबंधानें साधारण ठोकळसुद्धां कल्पना अशा उल्लेखानें होत नाहीं, हें कोणाच्याही लक्षांत येईल. अमुक गोष्ट द्वापरांत झाली, असें सांगण्यांत आजच्यापर्वी एक वर्ष, पांचवें वर्ष, नववें वर्ष, असें पाहिजे तितकें मागचें वर्ष येतें. सारांश, अशा प्रकारच्या उल्लेखांत कांहींच स्वारस्य राहात नाहीं. यासाठीं कांहीं तरी कालविशिष्ट अर्थबोध होईल असाच या शब्दाचा अर्थ घेतला पाहिजे, हें उघड आहे. हा अर्थ कोणता हें भागवताच्या टीकेंत स्पष्ट दाख-विलें आहे. या श्लोकावर श्रीधर स्वामींनीं अशी टीका केली आहे:— "द्वापरः आषिः यस्य कालस्य तस्मिन् द्वापरादौ इत्यर्थः शन्तनुसमकाले व्यासावतारप्रसिद्धेः ॥" सारांश, टीकाकार काय म्हणतात याजकडे पुष्कळ वेळां आपण दुर्लक्ष्य करितों. मौजेखातर ग्रंथकार एखादें गूढार्थ पद ठेवतो. महाभारतांत जागजागीं अशा ग्रंथग्रंथि ठेवल्या आहेत अशी व्यासांची प्रारंभीं प्रतिज्ञाच आहे. अशा ठिकाणीं पूर्वापर संबंधाकडे लक्ष दिलें पाहिजे. टीकाकार काय म्हणतात तें पाहिलें पाहिजे, व आपण जो अर्थ लावूं पाहतों तो लागू होत नाहीं, हें लक्षांत घेतलें पाहिजे. विशेषतः नवीन विलक्षण सिद्धान्त बसवितांना अशी खबरदारी घेतलीच पाहिजे. ती रा. काळे यांनीं घेतली असती तर अशा प्रकारच्या भ्रमांत ते पडले नसते व भलतेच श्लोक त्यांनीं आपल्या पुष्टीकरितां पुढें केले नसते.

रा. कांळे यांच्या या नवीनयुगकल्पनेंत सर्वांत मोठा दोष हा आहे कीं, ज्या आधारावर त्यांनीं ही कल्पना रचली आहे त्या आधारास ती

सोडून आहे. चार वर्षांचें युग गवामयनाच्या कालमापकपद्धतीसाठीं वैदिक काळीं सुरू झालें, असें आर. शामपट्टण शास्त्री यांचें म्हणणें आहे; व त्या चार वर्षांचीं नांवें कलि, द्वापर, त्रेता आणि कृत अशीं होतीं. या पूर्व-परंपरेच्या कल्पनेवर भारतकालीं हें चार वर्षांचें युग चालू होतें, असें रा. काळे म्हणतात. पण या कल्पित चतुर्युगांतील वर्षांच्या नांवांचा क्रम अगदीं उलट आहे. या गोष्टीकडे रा. काळे यांनीं लक्ष पुरविलें नाहीं. पहिल्या वर्षी $\frac{1}{4}$ दिवसाची वाढ, या मानानें कलि=एक म्हणजे प्रथम वर्ष, द्वापर दोन म्हणजे दोन वर्षांत $\frac{1}{2}$ दिवसाची वाढ, म्हणून दुसरें वर्ष द्वापर, याप्रमाणें त्रेता म्हणजे तीन आणि कृत म्हणजे चार चतुर्थांश म्हणजे पूर्ण दिवसांची वाढ; म्हणजे चार वर्षांच्या अंतीं अधिक दिवस—असा युगांचा क्रम शाम-शास्त्री यांनीं मानिला आहे. रा. काळे हे जीं वचनें दाखवीत आहेत त्यांत युगांचा अथवा वर्षांचा क्रम उलट आहे. म्हणजे प्रथम कृत, नंतर त्रेता, नंतर द्वापर, नंतर कलि, नंतर पुनः कृत—असा क्रम आहे. तेव्हां ही रा. काळे यांची कल्पना पूर्वोक्त युगकल्पनेला धरून नाहीं, सोडून आहे, किंबहुना त्याजशीं विरुद्ध आहे. भारतीयुद्ध द्वापरान्तीं झालें. त्याच्यापुढें वैदिक चतुर्युगाप्रमाणें त्रेता यावयास पाहिजे, कलि नव्हे. सारांश, कल्पा-रंभाच्या कल्पनेंत जसे रा. काळे त्यांच्या मार्गदर्शकाच्या दिशेला सोडून भलतीकडे गेले आहेत, तसेंच या युग शब्दाच्या व कृत, त्रेता, द्वापर, कलि यांच्या अर्थाच्या कल्पनेंत सुद्धां ते त्यांच्या कल्पनेला सोडून गेले आहेत.

वरील विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत आलें असेल कीं, रा. काळे यांचा हा ( कल्प व युगें यासंबंधाचा ) नवीन सिद्धांत निराधार आहे. भारतकालीं युग शब्दाचा अर्थ एक वर्ष नव्हता. कृत, त्रेता, द्वापर व कलि हीं नांवें दीर्घकालदर्शक युगांचींच प्रारंभापासून म्हणजे वैदिक काळापासून आहेत. युग शब्द कमी ज्यास्त कालाचा वाचक वेदांत सांपडतो. दैवी युग, मानुषी युग इत्यादि युगाचे भिन्न अर्थ वैदिक वाङ्मयांत दिसतात; पण कृत, त्रेता, द्वापर, कलि हे शब्द दीर्घ अथवा दैवी युगाचे होत. अथर्ववेदांतील एका मंत्रावरून या युगाची मर्यादा दहा हजार वर्षांहून अधिक आहे हें स्पष्ट आहे. उपनिषदांत हाच दीर्घ काळ द्योतन होत होता. “ मंत्रेषु कर्माणि कवयो यान्यपश्यंस्तानि त्रेतायां बहुधा संततानि ” ( मुंडकोपनिषद्. ) या वाक्यांत दीर्घकालद्योतकच त्रेतायुग आहे. ( यांतहि

त्रेतायुगांत सत्रादि कर्में उत्पन्न झालीं अशी कल्पना आहे. ) सारांश, उपनिषदें, महाभारत इत्यादिकांत त्रेता द्वापर कलि हे शब्द एका वर्षाचे द्योतक मिळावयाचे नाहींत. युगांचीं प्रमाणें महाभारत व मनुस्मृतींत १०००, २०००, ३०००, ४००० वर्षे दिलीं आहेत. तीं मानवी वर्षे किंवा दिव्य वर्षे हा एक वाद रंगाचार्यप्रभृतींनीं उपस्थित केला आहे. पण तीं दिव्य वर्षेंच होत, असें शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचें मत आहे. ४३२००० वर्षांचें युग खाल्डियन लोकांना फार प्राचीन काळीं माहित होतें, तसें आपल्याकडे प्राचीन काळीं माहित असणें असंभवनीय नाहीं. ही कालगणना ज्योतिष्यांनीं उत्पन्न केलेली नसून ती स्मृत्युक्त आहे, म्हणजे स्मृतिकालापासून किंबहुना उपनिषत् कालापासून चालू आहे. युग, मन्वंतर, कल्प स्मृतींत सांगितले आहेत. ते रोमक सिद्धान्तानें घेतले नाहींत म्हणून तो स्मृतिबाह्य होय, असें ब्रह्मगुप्तानें म्हटलें आहे ( दीक्षित पान १५५ ). सारांश, आर्य ज्योतिष्यांनीं ही नवीन पद्धति बसविली नसून जुनीच ठेविली आहे.



# भारती युद्धाचा काळ.

## काळ्यांची कल्पना चुकीची.

मागील लेखांत रा. काळे यांची नवी युगकल्पना कशी चुकीची आहे हें दाखविलें; या लेखांत त्यांनीं कायम केलेला भारती युद्धाचा काळ हाहि चुकीचा आहे हें दाखविणें आहे. रा. काळे यांनीं आपल्या पुस्तकांतील उत्तरार्धांत हा विषय मांडला आहे, व तो मांडतांना सर्व प्रमाणांचा यथामति विचार त्यांनीं केलेला आहे, हें कबूल केलें पाहिजे. विरोधी वचनांची यथाशक्ति व्यवस्था लावण्याचा त्यांचा हा यत्न प्रशंसनीय आहे. परंतु रा. काळे यांचा मूळ सिद्धान्तच चुकीचा असल्यामुळें त्यांचें पुढील सर्व विवेचन चुकलें आहे असें माझें मत आहे. यासाठीं माझी बाजू काय आहे हें जिज्ञासु वाचकांपुढें ठेविलें पाहिजे; व काळे यांची बाजू कशी चुकली आहे हें दाखविलें पाहिजे. किंबहुना माझें पत्र रा. काळे यांनीं या उत्तरार्धाच्या प्रस्तावनेंत छापलें आहे त्यांत "तुम्हांस सप्रमाण उत्तर देण्याची माझी इच्छा आहे" असें मीं म्हटलें आहे, त्याप्रमाणें मजवर आलेली जबाबदारी मला पुरी केली पाहिजे.

या पत्रांत मी जे दोन मुद्दे नमूद केले आहेत त्यांचा क्रमानेंच येथें उहापोह करणें बरें दिसतें. पहिला मुद्दा, "तुम्ही पौराणिक दन्तकथांवर पूर्ण विश्वास ठेवतां" असा मीं या पत्रांत नमुद केला आहे, त्याचा खुलासा येथें करतों. पुराणांतील भविष्यद्राजवर्णनाच्या दन्तकथा ऐतिहासिक दृष्ट्या विशेष भरंवशालायक नाहींत; विशेषतः बुद्धपूर्व इतिहासाच्या संबंधानें त्यांची किंमत फारच कमी आहे, असें माझें मत आहे. हा भविष्यद्राजवर्णनाचा भाग मूळपुराणांत नव्हता व तो इ. स. ५०० पासून ६०० च्या सुमारास त्यांत जोडला गेला, हें रा. काळे यांनींच सप्रमाण दाखविलें असतां, या गोष्टीकडे त्यांचें दुर्लक्ष पुढें कसें होतें याचें मला आश्चर्य वाटतें. ऐतिहासिक दृष्ट्या पाहतां ज्या शेवटल्या ऐतिहासिक राजाचें नांव या भविष्यद्राजवर्णनांत येते, त्या राजाच्या नंतर हा भाग जोडला गेला हें निर्विवाद आहे. कैललिक यवनांच्या विंध्यशक्ति राजाचें व त्याच्या वंशाचें या भविष्यद्राजवर्णनांतील अध्यायांत शेवटीं शेवटीं वर्णन आहे,

यावरून विंध्यशक्तीनंतर हा भाग जोडला गेला हें निश्चित ठरतें; विंध्यशक्तीचा काळ इ. स. ५०० च्या नंतरचा आहे—अर्थात् इ. स. ६०० नंतर हा भाग वायुपुराणांत आला. याशिवाय ब्रह्मांडपुराण, महाभारत व रामायण इसवी सनाच्या पांचव्या शतकांत वालिबेटांत गेलें, त्यांत हा भविष्यद्राजवर्णनाचा भाग मुळींच नाहीं. हा एक अत्यन्त महत्त्वाचा पुरावा रा. काळे यांनींच शोधून काढला आहे; आणि त्यावरून "यानंतर म्हणजे कैलकिल यवनानंतर इ. स. ६०० च्या सुमारें भविष्यें जोडण्याचा दुसरा संस्कार पुराणांवर झाला" (पान ३०) असें रा. काळे यांनीं स्वतःच निगमन केलें आहे. या इ. स. ५००–६०० च्या दरम्यान लिहून ठेविलेल्या प्राचीन राजांच्या हकीगतींची विश्वसनीयता ऐतिहासिक दृष्ट्या विचार करतां किती ?—हा महत्त्वाचा प्रश्न येथें उपस्थित होतो. मला वाटतें, जसजसें आपण मागें जावें, तसतसें अशा हकीगतीचें प्रामाण्य कमी; हा ऐतिहासिक सिद्धान्त कोणास नाकबूल करतां यावयाचा नाहीं. म्हणजे इ. स. ५००–६०० त लिहिलेली हकीगत इ. स. ४००, ३०० २००, १०० व इ. स. पूर्व १००, २००, ३०० इत्यादि शतकांत जसजसें आपण मागें जाऊं तसतशी कमी कमी प्रमाणानें विश्वसनीय होय हें उघड आहे. आपल्या मागील शंभर वर्षांची माहिती मागील २०० वर्षांच्या माहितीपेक्षां अधिक विश्वसनीय, हें विस्तारानें सांगणें नको. या रीतीनें वायुपुराणांतील ९९ अध्यायांतील भविष्यद्राजवर्णनाचा समग्र अध्याय तपासून पहिला असतां असें दिसून येईल कीं, विंध्यशक्तीच्या पूर्वीं सविस्तर वर्णन केलें आहे असे आंध्रभृत्य राजे होत. त्यांचें वर्णन बरेंच विश्वसनीय आहे, ही गोष्ट अवान्तर पुराव्यानें माहित झालेल्या प्राचीन इतिहासावरून स्पष्ट दिसते. आंध्रांच्या नंतर आणि कैलकिल यवनांच्या पूर्वीं गुप्तराजे झाले, त्यांचें सविस्तर वर्णन या वायुपुराणांत नाहीं याचें आश्चर्य वाटतें. तथापि त्यांचें नांव या कैलकिलांचे तुल्यकाल म्हणून या अध्यायांत आलें आहे. बहुधा हा भविष्यद्राजवर्णन करणारा दक्षिणेंतील असावा. त्याशिवाय त्यास कैलकिलयवनांचें महत्त्व वाटलें नसतें. 'अनुगंगं प्रयागं च साकेतं मगधांस्तथा। एताञ्जनपदान् सर्वान्भोक्ष्यन्ते गुप्तवंशजाः ॥' एवढाच त्यानें गुप्तांचा उल्लेख केला आहे. कदाचित् गुप्त हे सार्वभौम नव्हते असें त्याचें मत दिसतें. यवनांचें व म्लेच्छ राजांचें वर्णन त्यानें सविस्तर केलें नाहीं यांत नवल नाहीं. कारण हे राजे आपल्या धर्माचे नव्हते. तथापि आन्ध्रांच्यानंतर 'दशाभी-

रास्ततो नृपाः । सप्त गर्दभिनश्चापि ततोथ दश वै शकाः ॥ यवनाष्टौ भवि-ष्यंति तुषारास्तु चतुर्दश । त्रयोदश मनण्टाश्च मौनाद्यष्टादशैवतु ॥ ' असा आभीर, गर्दभिल, शक, यवन, तुषार, मनण्ट, व मौन यांचा उल्लेख केलेला आहे. असो, आंध्रांच्या पूर्वी काण्व, काण्वांच्या पूर्वी शुंग, शुंगांच्या पूर्वी मौर्य, मौर्यांच्या पूर्वी नवनंद, नवनंदांच्या पूर्वी शैशुनाक, व शैशु-नाकांच्या पूर्वी प्राद्योत, इतके वंश या वर्णनांत सांगितले आहेत व त्यांची वर्षासहित माहिती दिली आहे. यांच्या पूर्वी बार्हद्रथ राजे झाले असें लिहिलें आहे. बृहद्रथाच्या वंशांत जरासंध झाला. जरासंधाचा मुलगा सह-देव पांडवांच्या तर्फे लढला व युद्धांत मारला गेला. त्यानंतरचे प्राद्योतां-पर्यंत राजेहि राज्यवर्षासहित या अध्यायांत दिले आहेत. अशी जी सवि-स्तर माहिती दिली आहे ती पूर्व—पूर्वोत्तर कमी विश्वसनीय होय हें सप्रमाण सिद्ध करतां येईल व याच अध्यायावरून करतां येईल. तें कसें हें दाखवितों.

भारती युद्धापासून तों बुद्धापर्यंत जे राजे झाले त्यांची माहिती हल्लींच्या पुराणकर्त्यांस अगदींच नव्हती; व अनमानधपक्यानें त्यांनीं कांहीं तरी नांवें व कांहीं तरी वर्षें ठोकून दिलीं आहेत, हें सप्रमाण दाख-विणें कठिण नाहीं. बुद्धापासून त्यांना जैन व बौद्ध अशा दोन्ही परंपरा मदतीला मिळाल्या, त्यामुळें त्यांना कांहीं तरी विश्वसनीय सांगतां आलें. बुद्धापूर्वींच्या राजांच्या याद्या व वर्षें हल्लींच्या पुराणकर्त्यांस मिळाल्या नव्हत्या असें दिसतें. याचें कारण मध्यंतरीं उत्पन्न झालेला बुद्ध धर्म होय. याशिवाय क्षत्रियराजपरंपरा तुटून शूद्र व म्लेच्छ राजे झाले; यामुळें पूर्वीं प्रत्येक राज्यांत राजांचीं नांवें व वर्षें लिहून ठेविलेलीं असत ती परंपरा नष्ट झाली. शूद्र, म्लेच्छ, व बौद्धधर्मी राजांना पूर्व आर्य क्षत्रिय राजांचें वर्णन महत्त्वाचें वाटलें नाहीं यांत आश्चर्य नाहीं; व त्यांच्या दुर्लक्षानें किंवा सम-न उमजून केलेल्या कृतीनें पूर्वपरंपरा विच्छिन्न झाल्या. मेग्यास्थिनीसला हल्लींच्या पुराणांच्या परंपरा मिळाल्या नसून जुन्या राजपरंपरा मिळाल्या असाव्या असा माझा तर्क आहे. बेरोससनें बाबिलोनियन राजांच्या मिळवून ठेविलेल्या यादी जशा हल्लीं इष्टिकालेखांवरून खऱ्या ठरत आहेत तशा मेग्यास्थिनीसच्या यादी जर आज उपलब्ध असत्या तर हिंदुस्थानच्या बुद्ध-पूर्व इतिहासावर चांगला प्रकाश पडला असता. असो, एवढी प्रस्तावना करून पुराणांच्या बुद्धपूर्व राजांच्या यादी कशा छिन्नभिन्न व परस्परविरोधी आहेत तें दाखवितों.

'प्रथमग्रासे मक्षिकापातः' या न्यायानें प्रथम परीक्षिताच्याच वंशजांचीं पुराणांत दिलेलीं नांवें पहा. इंद्रप्रस्थ येथील राजे म्हणून ३२५ पानावर रा. काळे यांनीं पुरवणींत नांवें दिलीं आहेत (इंद्रप्रस्थ येथील नव्हे तर हस्तनापूर येथील असें पाहिजे होतें,) तेंच घेऊं; जनमेजयानंतर, १ शतानीक, २ अश्वमेधदत्त, ३ अधिसीमकृष्ण, ४ निचक्नु. असे चार पहिले राजे आहेत; पण हरिवंश, अध्याय ३, भविष्यपर्व, यांत—१ चंद्रापीड, २ सत्यकर्ण, ३ श्वेतकर्ण, ४ अजपार्श्व—दिले आहेत ते अगदींच भिन्न! आतां हे खरे कीं ते खरे? हरिवंश सर्व पुरणांत जुनें आहे असें मला वाटतें. त्यांत व यांत एवढा फरक! एकहि नांव मिळत नाहीं. बरें असो, निरानिराळया पुराणांत निरनिराळीं नांवें येतात, तेव्हां हा विरोध कसाबसा मिटविला तरी त्याच पुराणांतहि घोंटाळा दिसतो. मुद्दाम या दृष्टीनें वायुपुराण, विशेषतः त्यांतील हा ९९ वा अध्याय वाचून पाहिला असतां हा घोंटाळा नजरेस येईल.

मगधवंशांतील बुद्धपूर्व म्हणजे बार्हद्रथ राजांची यादी अशीः—

**भारतीयुद्धापूर्वींचे राजेः—**

| | | |
|---|---|---|
| १ बृहद्रथ | २ कुशाग्र | ३ ऋषभ |
| ४ पुष्पवान् | ५ विक्रान्त | ६ सुधन्वा |
| ७ ऊर्ज | ८ नभस | ९ जरासंध |
| १० सहदेव ( भारतीयुद्धांत पडला. ) | | |

यापुढील राजे राज्यवर्षासहित या अध्यायांतच दिले आहेत ते असेः—

| | |
|---|---|
| ( ११ ) सोमाधि ५८ व., | ( १२ ) श्रुतश्रवा ६४ व., |
| ( १३ ) अयुतायु २६ व., | ( १४ ) निरामित्र १०० व., |
| ( १५ ) सुकृत ५६ व., | ( १६ ) बृहत्कर्मा २३ व. |
| ( १७ ) सेनाजित् २३ व. | ( १८ ) श्रुतंजय ४० व. |
| ( १९ ) महाबाहु ३५ व. | ( २० ) शुचि ५८ व. |
| ( २१ ) क्षेम २८ व. | ( २२ ) भुवत ६४ व. |
| ( २३ ) धर्मनेत्र ३१ व. | ( २४ ) नृपति ५८ व. |
| ( २५ ) सुव्रत ३८ व. | ( २६ ) दृढसेन ५८ व. |
| ( २७ ) सुमति ३३ व. | ( २८ ) सुचल २२ व. |
| ( २९ ) सुनेत्र ४० व. | ( ३० ) सत्याजित् ८३ व. |
| ( ३१ ) वीराजित् ३५ व. | ( ३२ ) अरिंजय ५० व. |
| | एकंदर वर्षें ९९७. |

याच्याच पुढें असा श्लोक आहे “द्वात्रिंशच्च नृपा ह्येते भवितारो बृहद्रथात् । पूर्णं वर्षसहस्रंच तेषां राज्यं भविष्यति” बृहद्रथापासून ३२ राजे या यादींत आहेत. पण सहदेवापासून पुढें २२ राजे मिळून ९९७ वर्षे होतात. तेव्हां सर्व बत्तीस राजांना १००० वर्षे कशीं ! ! या यादींतील राजांचीं कित्येक नांवें व आंकडे केवळ काल्पनिक, असें शुचि, क्षेम, नृपति या नांवांवरून व १००,८३,६४ या आंकड्यांवरून भासतें. तसेंच बार्हद्रथ राजे ३२ व त्यांना एकंदर बरोबर हजार वर्षे, ही परंपरा स्वतंत्र असावी असें जरी कोणी मानलें तरी त्यांतील हजार हा आंकडा ठोकळ व अनमान–धपक्याचा आहे हें कोणासहि दिसून येणारें आहे. कोणताहि राजवंश हजार वर्षे टिकत नाहीं हें निराळेंच. प्रद्योत्त वंशापर्यंत बार्हद्रथ वंशच होता हें म्हणणें चुकीचे, तीन चार वंश झाले असले पाहिजेत, म्हणजे पुराणकारांना प्राचीन माहिती मुळींच नाहीं.

यापुढें मगधांत प्रद्योत वंश झाला असें मानण्यांत येतें. त्यांचीं नांवें दिलीं आहेत तीं येथें उतरून घेतों. रा. काळे प्रद्योत वंश मगधांत झालाच नाहीं असें म्हणतात, तें आपला हिशोब जुळण्यासाठीं होय. वायुपुराणाचा आधार घ्यावयाचा, व त्याला एके ठिकाणीं चुकीचा ठरवून त्याचें मत सोडून द्यावयाचें, हें येथें काळे यांचें करणें बरोबर दिसत नाहीं. वीतिहोत्र राजे उज्जनींत होते हें खरें धरिलें तरी ते मगधाचे मांडलिक होते. ‘प्रद्योतो स्वामिनं हत्वा पुत्रं समभिषेक्ष्यति’ असें जें वायु पुराणांत म्हटलें आहे त्याचा अर्थ असा कीं, प्रद्योतानें अरिंजय नामक बार्हद्रथास मारून आपल्या मुलास मगधाच्या गादीवर बसवलें. सारांश, प्रद्योत उज्जनींत राजा राहिला व त्याचा मुलगा व त्याचा वंश मगधांत राज्य करूं लागला. अर्थात् त्यानें व प्रद्योताचा दुसरा पुत्र असेल त्यानें उज्जनींत वंश कायम ठेविला. प्रद्योत नांवाचा एक पराक्रमी राजा उज्जनींत होता, त्यानें उदयनाला युक्तीनें पकडून कैदेंत टाकिलें, अशी आख्यायिका आहे. ती खरी कीं खोटी व ती या प्रद्योताची किंवा कसें, याजविषयीं आपणास येथें पाहणें नाहीं. वायुपुराणकर्त्यानें प्राद्योतांची वंशावळी मगधांत दिली आहे, ती अशी—

( १ ) प्रद्योत किंवा सुत २३ व. ( २ ) पालक २४ व. ( ३ ) विशाखयूप ५० व. ( ४ ) अजक ३१, व. ( ५ ) वर्तिवर्धन २० व. एकूण १४८ वर्षे.

" अष्टात्रिंशत् शतं भाव्याः प्रद्योताः पंच ते सुताः " या येथील वाक्यावरून प्रद्योताचे वंशज ५ राजे १३८ वर्षे राज्य करतील असें आहे. पण वर बेरीज आली १४८!! पुढें शिशुनाग वंश दिला आहे. ते १० राजे ३६२ वर्षे राज्य करतील असें सांगितलें आहे. पण राजांच्या राज्यवर्षांची बेरीज ३३४ वर्षे होते.

पुराणांची माहिती किती घोंटाळयाची आहे याची याजवरून कल्पना होईल. ती तशी घोंटाळयाची आहे हें रा. काळे कबूल करतात. " पुराणांवर किती संस्कार झाले " ह्या मथळयाखालीं २३१ पानांपासून २३७ पानापर्यंत त्यांनीं विवेचन केलें आहे, तें सर्व आश्चर्यचिन्हांनीं भरलेलें आहे. एका पुराणानें दुसऱ्या पुराणांतून उतरून घेतांना कसे प्रमाद व घोंटाळे केले हें ( **कल्पनेवरूनच** ) काळे यांनीं लिहिलें आहे. पण त्यांचें एक वाक्य येथें उतरून घेण्यासारखें आहे. पान २३४ वरील टीपेंत ते म्हणतात " आन्ध्रांच्या अंतापर्यंत सप्तर्षि २४ वे नक्षत्रावर येतील या परंपरेचें हें चुकीचें भाषान्तर होय! २३०० हून अधिक व २४०० हून कमी इतका काळ बेरजा करून ठरविण्यांत आला !! ८३६+८३६=१६७२ चे ऐवजीं बेरजांनीं २३५० वर्षे या संस्कारकर्त्यानें ठरविलीं !!! सगळाच घोंटाळा !!! " सगळाच घोंटाळा जेथें आहे तेथें पुराणांतील माहितीवरून ऐतिहासिक काळ काढणें म्हणजे रेतीच्या पायावर इमारत बांधणें नव्हे काय? यापुढेंहि वाचीत गेलें म्हणजे प्रत्येक वाक्यागणित उद्गारचिन्ह आहे असें दिसून येईल. शेवटीं रा. काळे म्हणतात—" यावरून तीनचार भिन्नभिन्न पुराणसंस्कर्त्यांच्या मतानें पौराणिककालगणना तीन चार भिन्न भिन्न तऱ्हेची कोणकोणत्या चुकीच्या समजाची झाली हें नीट कळून येईल. हीं सर्व घोटाळयांचीं भविष्यें एकाच व्यासाचीं असणें शक्य नाहीं !!! " एवढें असूनहि पुराणसंस्कर्त्यांनीं अखेरचा संस्कार केला तेव्हां कलीचीं ३८०० वर्षे गेलीं होतीं या कल्पनेला अनुकूल असाच संस्कार केला, असें रा. काळे म्हणतात. तर मग हल्लींचीं पुराणांतील भविष्यद्राजवर्णनांचीं भविष्यें इ. स. पू. ३१०१ हाच कलिप्रारंभ अथवा भारतीयुद्धकाल असें धरून आहेत हें रा. काळे यांना मान्य आहे. यापूर्वींच्या संस्कारकर्त्यांना मात्र तें मान्य नव्हतें हें ते कशावरून म्हणतात? याला प्रमाण काय? वायुपुराणांतील हल्लींचा ९९ वा अध्याय अथपासून इती-

पर्यंत सूक्ष्मपणानें वाचला तर कलियुग ३१०१ इ. स. पूर्वी सुरू झालें, व हें कलियुग ४,३२,००० वर्षांचें आहे, हेंच वायुपुराणाचें मत दिसतें. सर्व भविष्यद्राजवर्णन झाल्यावर "क्षीणे कलियुगे तस्मिन् दिव्ये वर्षसहस्त्रके । निःशेषास्तु भविष्यंति सार्धं कलियुगेन तु ॥ ससंध्यांशे तु निःशेषे कृतं वै प्रतिपत्स्यते" असें म्हटलें आहे. म्हणजे, दिव्य एक हजारवर्षें व संध्यांश गेल्यावर कृतयुग येईल, असें वायुपुराण म्हणतें. कलियुग ४३२००० वर्षांचें हें स्मृतिशास्त्रोदित व ज्योतिषग्रंथोक्त मत जसें वायुपुराणाला मान्य आहे तसेंच कलियुगास प्रारंभ ज्योतिष्यांच्या मताप्रमाणें इ. स. पू. ३१०१ वर्षांपूर्वी झाला हेंहि त्यांस मान्य होतें. वायुपुराणाच्या या अध्यायावरून तें स्पष्ट आहे. एकंदर राजांच्या वर्षसंख्या दिल्या आहेत त्या घेऊन त्यांची आपण बेरीज करूं.

सहदेवानंतरचे--

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २२ बार्हद्रथराजे,(सु.) | ७०० | व. | ५ प्राद्योत | १३८ | व. |
| १० शैशुनाक | ३६२ | ,, | ९ नंद | १०० | |
| ९ मौर्य | १३७ | ,, | १० शुंग | ११२ | |
| ४ काण्व | ४५ | ,, | ३० आन्ध्र | ४०५* | |
| | ------ | | १० आभीर | १६७ | |
| ७ गर्दभिल | ७२ | ,, | १० शक | ३८० | |
| ८ यवन | ८० | ,, | १४ तुषार | ५०० | |
| १८ मनंट | ३०० | ,, | १३ अन्यराजे | १६० | |
| | १७९६ | | | १९६२ | |

यानंतर कैलकिल झाले असें म्हटलें आहे. म्हणजे कलि लागून ३६५८ वर्षें झाल्यावर कैलकिल आले. त्यांचा इतिहासांतला काळ इ. स. ५५० सु. धरला तर कलियुगारंभ ३१०८ इ. स. पू. येतो.

वरील यादींत दोन तीन चुका हल्लींच्या उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक माहितीप्रमाणें धडधडीत दिसतात. आंध्रांना २०० वर्षे सुमार द्यायचीं तीं चारशें दिलीं. दुसरें आंध्रांनंतर कैलकिलापर्यंत यवनशकतुषार वगैरे म्लेच्छराजे झाले.

---

* मत्स्य आन्ध्र आणि दोनशें वर्षे असें एक मध्यंतरीं दिलें आहे, तें काय हें समजत नाही !

त्यांना ३०० वर्षें यावयाचीं तीं सुमारें १४०० दिलीं. आभीर, गर्दभिल, हे आंध्रांपूर्वी होत असें वाटतें, ते नंतर धरले. तात्पर्य, पुराणाची माहिती किती ढोबळ आहे हें यावरून उघड दिसतें. तरी याचा निष्कर्ष कलिप्रारंभ ३१०१ इ. स. पू. हाच निघतो! या बेरजेच्या अडचणीसंबंधानें रा. काळे असें म्हणतात कीं, पुराणांच्या शेवटच्या संस्कारकर्त्यांनीं यवनांना वाटेल तितकीं वर्षे देऊन कलिकालाची कल्पना त्यावेळेस होती त्याबरोबर वर्षे केलीं. पण कलिकालाची हीच कल्पना पूर्वी होती असें संभवतें आणि इकडे यवनांचीं वर्षे वाढविलीं तर तीं पूर्वीच्या बार्हद्रथ राजांत कमी केलीं असेंहि या संस्कारकर्त्यांनीं केलें असणें संभवनीय आहे. जसें कल्हणानें मागील वर्षे कमी करून रणादित्याला एकदम ३०० वर्षे दिलीं, तसें कां न झालें असावें? निदान वायुपुराणांत हल्लीं जें दिसतें आहे त्यापूर्वी लोकांत परंपरा कशा होत्या हें या यादीवरून मुळींच सांगतां यावयाचें नाहीं, हें खचित आहे. वायुपुराणाच्या हल्लींच्या ५००–६०० इ. स. दरम्यानच्या स्वरूपाच्या वेळीं लोकांची समजूत अमुक होती एवढेंच सांगतां येईल. यापेक्षां ज्यास्त सांगतां येणार नाहीं हें उघड आहे.

तत्रापि रा. काळे यांनीं असें सांगण्याचा प्रयत्न केला आहे तो कितपत सिद्धीस गेला आहे हें पाहूं. काळयांच्या ग्रंथांतील मुख्य विवेचन हेंच आहे. यांतील किल्ली ही रा. काळे यांना आर, शामशास्त्री यांच्या "गवामयनम्" ग्रंथावरूनच मिळाली आहे. त्या पुस्तकांतील पुरवणींत शेवटीं त्यांनीं मत्स्यपुरांतील एका वचनाचा उल्लेख करून त्याचा अर्थ स्वमताला अनुकूल पडेल *असा लावून घेतला आहे. या युक्तीला धरून रा. काळे यांनीं वायुपुराणांतला श्लोक लावला आहे. तो श्लोक असा–

महादेवाभिषेकात्तु जन्म यावत् परीक्षितः।
एक–वर्ष–सहस्रं तु ज्ञेयं पञ्चाशदुत्तरम्॥

या श्लोकाच्या दुसऱ्या ओळीचा, १००१ पन्नासांनीं अधिक–म्हणजे ९५१–असा अर्थ आर. शामशास्त्री यांनीं प्रथम केला आहे. तोच रा. काळे यांनीं घेऊन, त्यांस महादेव म्हणजे चंद्रगुप्त अशी जोड

* The interval between him ( Parikshit ) and Nanda is according to the Matsya Purana one thousand years less by one hundred and fifty.

देऊन, आपल्या भारतीय युद्धाच्या काळाच्या समर्थनाकरितां तो उपयोगांत आणला आहे. या श्लोकाचा विपरीत अर्थ समजून मत्स्य, विष्णु व भागवत या पुराणांनीं उत्तरोत्तर घोटाळा केला आणि मागील खरी परम्परा लुप्त केली किंवा विपरीत केली, असें काळे प्रतिपादन करतात; पण तीन प्राचीन पुराणें चुकलीं आणि रा. काळे मात्र खऱ्या अर्थाला ओळखूं शकले असें मानण्यापेक्षां, पुराणें बरोबर आहेत आणि रा. काळे चुकले हेंच अधिक संभवनीय दिसतें

महादेवाभिषेकात्तु जन्म यावत्परीक्षितः ।
एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पञ्चाशदुत्तरम् ॥

**वायुपुराण.**

महापद्माभिषेकात्तु यावज्जन्म परीक्षितः ।
एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पञ्चाशदुत्तरम् ॥

**मत्स्यपुराण.**

यावत्परीक्षितो जन्म यावन्नंदाभिषेचनम् ।
एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पञ्चदशोत्तरम् ॥

**विष्णुपुराण.**

आरभ्य भवतो जन्म यावन्नंदाभिषेचनम् ।
एतद्वर्षसहस्रं तु शतं पञ्चदशोत्तरम् ॥

**भागवत.**

इतक्या सर्व पुराणांची येथें एकवाक्यता आहे, त्याअर्थी महादेव, महापद्म आणि नंद या तिन्ही व्यक्ति एकच आहेत असें मानणें विशेष योग्य आहे. इतर पुराणांचा आधार सोडून नुसत्या वायुपुराणांतील या अध्यायांतील पूर्वापर श्लोकांचा विचार केला असतांहि हेंच दिसून येईल. रा. काळे यांचा या पुस्तकांत जो मोठा दोष दिसतो तो हा कीं, शब्दार्थ लावतांना ते ग्रंथाचा पूर्वापर संदर्भ व सांगण्याचें तात्पर्य यांजकडे मुळींच लक्ष देत नाहींत. वायुपुराणांत या अध्यायांत भविष्यद्राजांचें सर्व वर्णन झाल्यावर मागें सांगितल्याप्रमाणें ‘क्षीणे कलियुगे तस्मिन् दिव्ये वर्षसहस्रके’ वगैरे श्लोक आल्यानंतर असे श्लोक आहेतः—

एष वंशक्रमः कृत्स्नो कीर्तितो वो यथाक्रमम्।
अतीता वर्तमानाश्च तथैवानागताश्च ये॥
महादेवाभिषेकात्तु जन्म यावत्परीक्षितः?
एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पञ्चाशदुत्तरम्।
प्रमाणं वै तथा चोक्तं महापद्मान्तरं च यत्!
अन्तरं तत्शतान्यष्टौ षट्त्रिंशच्च समाः स्मृताः॥
एतत्कालान्तरं भाव्या आन्ध्रान्ता ये प्रकीर्तिताः।
भविष्यैस्तत्र **संख्याता** पुराणज्ञैः श्रुतर्षिभिः॥

"हा सर्व वंशक्रम क्रमवार, गेलेल्या, हल्लींच्या व पुढें येणाऱ्या राजांचा, सांगितला. परंतु महादेवाच्या अभिषेकापासून परीक्षिताच्या जन्मापर्यंत १०५० वर्षें, तथाच महापद्मापासून जें अंतर तें ८३६ वर्षे असें प्रमाण ( मोजमाप ) होय. आन्ध्रान्तापर्यंत जे राजे सांगितले ते एवढ्या काळापर्यंत होतील; ते भविष्यांनीं व पुराणज्ञांनीं संख्येनें सांगितले आहेत." हें येथें सांगण्याचें तात्पर्य काय हें लक्षांत आणलें पाहिजे. परीक्षिताचा जन्म म्हणजे कलिकालाचा आरंभ, तेव्हां ही एक या अध्यायांत दिलेल्या संख्यागणनेंत मुख्य मर्यादा आहे. तसेंच महादेव अथवा महापद्म ही एक दुसरी मुख्य मर्यादा आहे. आणि आन्ध्रान्त ही एक तिसरी मर्यादा आहे. हे मुख्य मर्यादाबिंदु कसे हें याच अध्यायांतील मागील वर्णनांत स्पष्टपणें आलें आहे. प्रथम कलियुगांत राजे कोण कसे झाले हें सांगा; असा प्रश्न आहे. ( श्लोक २६२–२६३ ). दुसरें, नंद, महापद्म जेव्हां राज्यावर आला तेव्हां क्षत्रिय राजगणना संपली. कारण तो शूद्रीच्या पोटीं जन्मला होता. शिवाय, जे इतर क्षत्रियवंश भारतकालापासून चालू होते ते सर्व यानें उच्छिन्न करून एकछत्री राज्य स्थापन केलें, या अर्थाचे श्लोक पूर्वी आले आहेत, ते असे --

ततःप्रभृति राजानो भविष्याः शूद्रयोनयः।
अष्टाविंशतिवर्षाणि पृथिवीं पालयिष्यति॥
एकराट् स महापद्म एकच्छत्रो भविष्यति॥ ३२७
सर्वक्षत्रहरोद्धृत्य भाविनोऽर्थस्य वै बलात्॥ ३२८

आतां आन्ध्रान्त तिसरा बिन्दु कसा हें लक्षांत घेतलें पाहिजे. आंध्रान्तापासून पुढें शूद्र राजेहि राहिले नाहींत. यवनशकतुषारादि म्लेच्छ

राजे ह्यापुढें शेवटपर्यंत होतील असें पुराणांनीं त्या वेळच्या प्रत्यक्ष स्थिती-वरून भविष्य केलेलें आहे. पारीक्षितापासून आन्ध्रान्तापर्यंतच्याच राजांचीं निरनिराळीं नांवें व राज्यवर्षे दिलीं आहेत हें याच अध्यायाच्या समग्र वर्णनावरून दिसून येईल. यवनादि म्लेच्छ राजांचीं नांवें व राज्यवर्षे दिलीं नाहींत. त्यांचीं नुसतीं एकंदर वर्षे दिलीं आहेत. तात्पर्य, या दोन श्लोकांत पूर्वीच्या निरनिराळ्या संख्या दिलेल्या वर्णनांचा उपसंहार केला आहे असें म्हटलें पाहिजे. क्षत्रिय राजे १०५० वर्षे व शूद्र राजे ८३६ वर्षे होतील, अशा निरनिराळ्या संख्या दिल्या आहेत असें 'संख्याता' या पदावरूनहि दिसतें. मागील वर्णनावरून महादेव हें नांव महापद्माला लागू पडतें. मौर्य चन्द्रगुप्ताची प्रशंसा या अध्यायांत नाहीं. चंद्रगुप्ताचें माहात्म्य पौराणिकांना नाहीं; महापद्मनंदाचें आहे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. चंद्रगुप्ताचें महत्त्व पाश्चात्य लोकांना आहे. कारण मेग्यास्थिनिस त्याचे दरबारीं ग्रीकांकडून वकील होता; त्याचें महत्त्व आपल्या लोकांना नाहीं. दुसरें, ज्या चंद्रगुप्ताला वृषल संज्ञेनें चाणक्य मुद्राराक्षसांत संबोधितो त्याला महादेव हें पद शोभत नाहीं. महापद्माचा बाप तरी क्षत्रिय होता. चंद्रगुप्त दोन्ही बाजूंनीं शूद्र होय. चंद्रगुप्ताला महादेव म्हटल्याचें दुसरें कोठेंहि उदाहरण काळे यांनीं दिलें नाहीं. तिसरें, वायुपुराणांतील मागील संदर्भावरून हें नांव महापद्मालाच युक्त दिसतें व पुढील श्लोकावरूनहि त्याचाच बोध होतो. इतर पुराणांनींहि तीच परंपरा देतांना त्याचेंच नांव घेतलें आहे. सारांश, काळे यांनीं महादेवाचा अर्थ चुकीचा केला आहे असें म्हटलें पाहिजे. "प्रमाणं वै तथा चोक्तं" यापुढील श्लोकांतील शब्दांचाहि अर्थ त्यांनीं चुकीचा घेतला आहे. मागील श्लोकांतील विधानास प्रमाण म्हणून हा श्लोक दिला नाहीं, तर ही आणखी निराळी गोष्ट सांगितली आहे. मत्स्यपुराणांतहि असाच श्लोक अशाच अर्थी पुढें आला आहे. पण रा. काळे म्हणतात कीं, मत्स्यपुराणाला वायुपुराणांतला श्लोक समजला नाहीं, व त्याचें कारण ते देतात तें असें: "मत्स्यपुराणानें महादेव म्हणजे महापद्मच ठरवून टाकला व इतर पुराणांनीं त्याचेंच अनुकरण केलें; पण मत्स्यपुराणाचे असें कसें लक्षांत आलें नाहीं कीं, एकदां आपण परीक्षितापासून महापद्मापर्यंत ९५१ वर्षे म्हणतों व लगेच खालीं ८३६ वर्षे झालीं म्हणतों!" (पान १८८). वस्तुस्थिति अशी आहे कीं, वायुपुराण व मत्स्यपुराण येथें काय म्हणतात हेंच काळे यांच्या लक्षांत

आलें नाहीं. जें वायूनें म्हटलें आहे तेंच मत्स्यानें म्हटलें आहे, व मत्स्यांत मागें पुढें रा. काळे म्हणतात तसा विरोध नाहीं. हें कसें तें पाहूं. " महादेवापासून परीक्षिताच्या जन्मापर्यंत १०५० वर्षे झालीं. आणखी मान असें कीं ( प्रमाणं वै तथा चोक्तं ) महापद्मापासून आन्ध्रान्तापर्यंत ८३६ वर्षे झालीं. "–वायु०. " महापद्मापासून परीक्षिताच्या जन्मापर्यंत १०५० वर्षे झालीं. तसेंच ( तथा ) पुनः पुलोम आन्ध्रापासून महापद्मापर्यंत ८३६ वर्षे झालीं. "–मत्स्य. याच्यापुढें मत्स्यांत एक तिसरा श्लोक आहे, त्याचा भलताच अर्थ केल्यानें काळे मत्स्यावर विरोधी विधानें केल्याचा आक्षेप करतात. तो श्लोक असाः—

तावत्कालान्तरं भाव्यं आन्ध्रान्तादापरीक्षितः

भविष्ये ते प्रसंख्याताः पुराणज्ञैः श्रुतर्षिभिः ॥

याचा चुकीचा अर्थ काळे यांनीं केला आहे तो असाः—" तसेंच आन्ध्रान्तापासून (?) परीक्षिताच्या वेळेपर्यंत तितकींच वर्षे गेलीं." येथें आन्ध्रान्तापासून हें स्पष्ट पद असून त्याचा भलताच अर्थ करून, म्हणजे 'महापद्मापासून ' असा अर्थ करून, पूर्वी ९५० वर्षे याचीं सांगितलीं होतीं तीं पुन्हां ८३६ कशीं सांगितलीं, असा काळे प्रश्न करतात ! " आन्ध्रांतापासून " यापुढें रा. काळे यांनीं प्रश्नचिन्ह करून ठेविलें आहे, हें बरें आहे. कारण येथें आपण चुकत आहों असा त्यांना भास होत होता असें दिसतें. असो. या श्लोकाचा खरा अर्थ असा. प्रथम 'तसेंच' हा शब्द येथें मुळींच नाहीं. " एवढें अन्तर आन्ध्रान्तापासून परीक्षितापर्यंत होईल असें श्रुतर्षि पुराणज्ञांनीं संख्येनें सांगितलें आहे." यांत वरील दोन्ही श्लोकांचा एकत्र मेळ केला आहे आणि एवढें अन्तर म्हणजे, परीक्षितापासून महापद्मापर्यंत १०५० व महापद्मापासून आन्ध्रांतापर्यंत ८३६, एवढें म्हणजे १०५०+८३६= १८८६ वर्षे–एवढें अन्तर आन्ध्रान्तापासून परीक्षितापर्यंत होईल, असा या श्लोकाचा सरळ अर्थ आहे. काळे यांनीं ' प्रमाणं वै तथा चोक्तं ' याचा चुकीचा अर्थ केल्यानें तें त्यांच्या लक्षांत राहिलें व मत्स्यांतील सरळ श्लोकांचा अर्थ त्यांस लागला नाहीं.

रा. काळे यांस ' प्रमाणं वै तथा चोक्तं ' याचा भलता अर्थ घेऊनसुद्धां इष्टार्थ सिद्ध करण्याकरितां कोणत्या स्वकपोलकल्पित गोष्टी घेणें

भाग पडलें तें आपण पाहूं. वायुपुराणांतील श्लोकांचा अर्थ ते करतात तो असा:-" महादेवाच्या अभिषेकापासून परीक्षिताच्या जन्मापर्यंत १००१ वर्षें झालीं; पण यांत पन्नास वर्षें अधिक झालीं; ( म्हणजे ९५१ वर्षें झालीं. ) यास प्रमाण असें कीं, ( परीक्षितीच्या अभिषेकापासून ) महापद्मापर्यंत ८३६ वर्षें झालीं असें मानतात. इतकाच काळ ( महापद्मापासून ) आन्ध्रान्तापर्यंत झाला. " या अर्थांत काळे यांनीं तीन हातचे घेतले आहेत, ते असे. प्रथम वायुपुराणांत १००१ एकवर्षसहस्र नसून एतद्वर्षसहस्र आहे. दुसरें 'परीक्षिताच्या अभिषेकापासून हें त्यांनीं आपल्या डोक्यांतून काढलें. मागच्या श्लोकांत ' परीक्षिताच्या जन्मापर्यंत ' आहे. तेंच साहाजिक पुढें येईल. ' अभिषेकापासून ' हें कोठून आलें ? हें त्यांनीं आपल्या पदरचें घेतलें, हें त्यास कौंस घातल्यावरूनच स्पष्ट आहे. तें मागील श्लोकावरून येत नाहीं. शिवाय परीक्षिताचा अभिषेक येथें मुळींच कोठें उक्त आहे ? जेथें मगध राजांच्या वर्षसंख्या दिल्या आहेत तेथें परीक्षिताचा अभिषेक अप्रासंगिक होय. सहदेवाचा पुत्र सोमाधि याच्या अभिषेकापासून हा काळ दिला आहे. सोमाधीचा **अभिषेक** आणि परीक्षिताचा **जन्म** एकाच वर्षीं. कारण या दोन्ही गोष्टी भारतीयुद्धांतीं लवकरच झाल्या; व दोन्ही गोष्टी कलिकालाच्या प्रारंभीं होत. सारांश, परीक्षिताचा अभिषेक कोणत्याच युक्तीनें येथें येणें शक्य नाहीं. तो १५ वर्षे हातचीं घालण्यास रा. काळे यांनीं घेतला आहे. पण परीक्षिताचा अभिषेक १५ व्या वर्षी झाला याला तरी प्रमाण ? तें द्यावयास पाहिजे होतें. भारतावरून तो ३६ वे वर्षी झाला असें दिसतें. सारांश, ८३६ त १०० मिळविण्याकरितां महादेवशब्दानें चंद्रगुप्त घेतला, १५ वाढविण्याकरितां अभिषेक घेतला; आणि १ कमी होता तो 'एकवर्षसहस्र ' असा पाठ घेऊन भरीस घातला. शिवाय ५० वाढले म्हणून पञ्चाशदुत्तरम् याचा अर्थ उलटा घेतला. सारांश अभिमत आंकडा असे तीन हातचे मदतीला घेऊन आणला. अशा प्रकारचे हातचे मदतीस घेतले म्हणजे उदाहरण बरोबर येणारच ! व अशाच प्रकारचे हातचे बहुतेक सर्व हिशेबांत रा. काळे यांनीं घेतले आहेत हें वाचकांच्या लक्षांत येईल. आणखी उदाहरणें पुढें देऊं.

शेवटची मौजेची गोष्ट अशी कीं, या खटपटीवरून जो निष्कर्ष काढ-

ण्याचा रा. काळे यांचा प्रयत्न आहे तो सिद्धीस जात नाहीं. परीक्षिताच्या जन्मापासून चंद्रगुप्ताभिषेकापर्यंत ९५१ वर्षें झालीं अशी एक " **प्राचीन परंपरा** ' होती, असें काळे दाखवूं इच्छितात. पण तें त्यांच्याच म्हणण्यावरून निष्पन्न होत नाहीं. या परंपरेचें प्रमाण म्हणून ते दुसरी एक परंपरा अशी दाखवितात कीं, परीक्षिताच्या अभिषेकापासून महापद्माच्या अभिषेकापर्यंत जितकीं वर्षें तितकींच वर्षें महापद्माच्या अभिषेकापासून आन्ध्रान्तापर्यंत; म्हणजे ८३६ वर्षें झालीं. या म्हणण्याचा विचार सूक्ष्म दृष्टीनें करूं. अशी परंपरा प्रथम तर आन्ध्रान्तानंतर उत्पन्न झाली पाहिजे हें उघड आहे. आन्ध्रान्तापूर्वी अशी परंपरा उत्पन्न होऊं शकत नाहीं. दुसरी गोष्ट, आन्ध्रान्तानंतर लागलीच ही परंपरा उत्पन्न झाली नसावी कारण हीं ८३६ वर्षे चुकीचीं आहेत ही गोष्ट निर्विवाद आहे. राजांचीं जीं वर्षें पूर्वी दिलीं आहेत तिचा हिच्याशीं मेळ मिळत नाहीं, हें तर वेगळेंच; कारण नवनंद १००, मौर्य १३७, शुंग ११२, काण्व ४५ व आंध्र ४०६, असें पूर्वी आंकडे दिले आहेत, यांची बेरीज ८०० येते. पण तेंहि मी येथें लक्षांत घेत नाहीं. खरा इतिहास पहातां ही गोष्ट सिद्ध झाली आहे कीं, महापद्मापासून आन्ध्रान्तापर्यंत– म्हणजे सुमारें इ० स० पू. ४०० पासून इ० स० नं. २०० पर्यंत–६०० वर्षें झालीं. जर आन्ध्रांतानंतर लागलीच परंपरा उत्पन्न होती तर ती इतिहासाला म्हणजे सत्याला इतकी सोडून गेली नसती. तेव्हां हें उघड होतें कीं, अशी ८३६ वर्षांची परंपरा उत्पन्न झाली असेल तर ती आन्ध्रांतानंतर बऱ्याच वर्षांनीं झाली असली पाहिजे. तात्पर्य, या परंपरेचा जन्म ज्यावेळेस पुराणास शेवटचा संस्कार मिळाला त्या सुमारासच येऊन ठेपतो; म्हणजे आन्ध्रांनंतर म्लेन्छराजे अनेक झाल्यावर व या राजांचा राज्यकाल लोकसमजुतींत भलत्याच रीतीनें वाढल्यावर या परंपरेचा उगम दिसतो. तिसरें, अपासून बपर्यंत जितका काल तितकाच बपासून कपर्यंत. अशा स्वरूपांत परंपरा आली म्हणजे हें समजावें कीं, एक काळ कांहीं तरी ठोकळ मानानें माहीत आहे, आणि दुसऱ्याविषयीं कांहींच माहिती नसून कांहीं तरी काळ बहुधा ठोकून दिला आहे. महापद्मापासून आन्ध्रापर्यंत शूद्र राजे हा एक मोठा विभाग माहीत आहे. त्यापूर्वींचा क्षत्रिय राजकाळ तितकाच, हें विधान पुराणसंस्कर्त्यांनीं जेव्हां हें भविष्यद्राजवर्णन प्रकरण नवीन घातलें

तेव्हां ठोकून दिला. शिशुनाग वंशाची माहिती कांहीं तरी होती, पण त्यास बार्हद्रथवंशाची फारच थोडी माहिती होती, असें अनुमान साहजिक निघतें. एकंदरींत पाहतां ही वायुपुराणांत दिलेली परंपरा प्राचीन नसून इ. स. ५००–६०० सुमाराचीच आहे असें दिसतें.

पौराणिक राजांच्या म्हणजे बार्हद्रथराजांच्या यादीवरून किंवा वर्षांवरून भारतीयुद्धाचा काळ ठरविणें किती अशक्य आहे हें येथपर्यंत विस्तारानें दाखविलें. आतां याच गोष्टीचा दुसऱ्या रीतीनें विचार करूं. पुराणांनीं जो काळ सांगितला आहे तो विरुद्ध पुराव्याच्या अभावीं मानणें कदाचित् योग्य झालें असतें; कारण ही कांहीं तरी एक परम्परा आहे, असें म्हणतां येईल. तात्पर्य, विरुद्ध पुरावा जर नसता, म्हणजे पुराणांचें हें म्हणणें अन्य अधिक विश्वनीय पुराव्यावरून अग्राह्य आहे असें जर दिसलें नसतें, तर हेंहि घेण्यास हरकत नव्हती. पण असा विरुद्ध पुरावा सांपडतो, यासाठीं पुराणांचें हें लंगडें कच्चें म्हणणें ग्राह्य धरतां येत नाहीं. मीं आपल्या पत्रांत म्हटल्याप्रमाणें, भारतीयुद्धाचा काळ पुराणांवरून काळे यांनीं ठरविल्याप्रमाणें इ. स. पू. १२६३ हा किंवा त्या सुमाराचा कोणताहि घेतला तरी किती घोंटाळे उत्पन्न होतात याची कल्पना काळ्यांस किंवा या अन्य लोकांस नाहीं. ते घोंटाळे कोणते हें आतां आपण पाहूं.

प्राचीन हकीकतींचा काळ ठरवितांना कोणत्या प्रमाणांना अधिक वजन द्यावयाचें हा एक मोठा महत्त्वाचा विचार आहे. वास्तविक पाहतां यांत कांहीं मोठें गूढ आहे असें नाहीं. हा विचार सर्व लोकांस ठाऊकच आहे. पुराव्याच्या कायद्याचें तें एक मुख्य तत्त्वच आहे. ऐकलेल्या माहितीपेक्षां पाहिलेली माहिती सांगणारा साक्षिदार अधिक विश्वसनीय हें उघडच आहे. हें तत्त्व प्राचीन आर्यांनीं उपनिषदांतहि सांगितलें आहे. 'चक्षुर्वै सत्यं तस्माद्यदीदानीं द्वौ विवदमानावेयातामहमदर्शमहमश्रौषमिति य एव ब्रूयादहमदर्शमिति तस्मा एव श्रद्दध्याम' या बृहदारण्यकांतील वाक्यांत याच तत्त्वाचा उल्लेख आहे. असो, अशा प्रकारच्या अधिक वजनाच्या पुराव्यानें पुराणांत दिलेल्या राजांच्या यादीवरून ठरविलेला काळ अग्राह्य ठरवावा लागतो. प्रथम पुरावा असा कीं, वेदांगज्योतिषाचा काळ रा. शंकर दीक्षित यांनीं १४०० इ. स. पू. ठरविला आहे. त्यांतील "प्रपद्येते श्रविष्ठादौ

सूर्याचन्द्रमसावुदक् " ह्या वचनावरून हा काळ ठरविला आहे. श्रविष्ठेच्या म्हणजे धनिष्ठेच्या आरंभीं सूर्य उत्तरेकडे फिरतो हें वेदांगज्योतिषांत नमूद केलेलें दृक्प्रत्ययात्मक वचन अत्यन्त महत्त्वाचें आहे; व यावरून गणितानें वेदांगज्योतिषाचा काळ काढतां येतो. ह्या वचनाचा पाश्चात्य विद्वानांस मोठा विचार पडला आहे व त्यांच्या वैदिक वाङ्मयाच्या काळाच्या कोत्या कल्पनेला मोठा धक्का बसला आहे. कोलब्रूकनें प्रथम हें वचन पाश्चात्यांच्या नजरेस आणलें व त्या वेळीं प्रथम १४०० इ. स. पू. हाच त्यानें वेदांगज्योतिषाचा काळ काढला. मॅक्समुलरला हें असंभाव्य वाटून त्यानें याजबद्दल पुन्हां दुसऱ्याकडून गणित करविलें; व आपल्या ऋग्वेदाच्या प्रस्तावनेंत, याचा उल्लेख केला. या प्रस्तावनेंत आर्चडीकन प्रॅाट यानें या स्थितीचा काळ इ. स. पू. ११८१ च्या सुमाराचा कायम केला असें म्हटलें आहे; व रा. काळे यांनीं हाच ग्रहण केला आहे ( पान २५० ). पण रा. शंकर दीक्षित यांनीं आपल्या 'भारतीय ज्योतिःशास्त्र' या अमूल्य ग्रंथांत याजविषयीं काय म्हटलें आहे तें येथें वाचकांपुढें ठेविलें पाहिजे. विषय गणिताचा आहे. पाहिजेल तेव्हां याच्या खरेखोटेपणाविषयीं जांच करतां येण्यासारखी आहे. संपाताला मागें गति आहे, या कारणानें हल्लीं उद्गयनबिंदु श्रविष्ठेच्या मागें आला आहे. याजवरून हें गणित करतां येतें. दीक्षित लिहितातः " धनिष्ठांपैकीं आल्फाडेल्फिनी ही योगतारा केरोपंत मानितात, व हीच कोलब्रूकनें घेतली आहे, हिचा भोग सन १८८७ चा सूक्ष्मरीतीनें मीं काढला, तो १० रा., १५ अं., ४८ क., २९ वि. येतो. म्हणजे हा तारा ( पूर्वी ९ राशि होता तो ) ४५ अंश ४८ क. २९ वि. पुढें सरकला. संपातगति दर वर्षास ५० विकला धरून तारा इतका सरकण्यास ३२९७ वर्षे लागतात. यांत १८८७ वजा देतां १४१० इ. स. पू. यावेळीं धनिष्ठारंभीं उद्गयन होत असे. कोलब्रूक वगैरे काळ काढतात तें विभागात्मक धनिष्ठेच्या प्रारंभीं उद्गयन होत असे असें धरून काढतात. धनिष्ठेच्या प्रत्यक्ष दिसणाऱ्या ताऱ्यावरून काळ काढला पाहिजे, हें वर सांगितलेंच आहे " ( पान ८७–८८ ). शंकर दीक्षितांनीं जो काळ काढला आहे तोच युक्त आहे असें मला वाटतें; व तो पाहिजे तेव्हां आल्फाडेल्फिनीचा वेध घेऊन पुन्हां काढतां येईल.

वेदांगज्योतिषकाळीं सर्व वैदिक वाङ्मय तयार झालें होतें ही गोष्ट सर्वच कबूल करतील. रा. काळे यांनींहि ती कबूल केली आहे.

"वेदांगज्योतिष सर्व वैदिक वाङ्मयानंतर निपजलेलें असल्यामुळें त्या काळीं वैदिक वाङ्मय सद्य:स्वरूप पावलें होतें असें अनुमान निघतें–" असें २५१ पानावर तेच म्हणतात. वैदिक वाङ्मयांत सर्व उपनिषदें नसलीं, तरी दशोपनिषदें येतात, हेंहि कबूल करावें लागेल. निदान छांदोग्य उपनिषद् हें वेदाङ्गज्योतिषापूर्वीचें आहे असें मानलें पाहिजे. भाषेच्या तुलनेवरून वेदांगज्योतिषापूर्वी निदान दोनशें वर्षे छांदोग्य प्राचीन असावें, हेंहि 'चक्षुर्वै सत्यं' प्रमाणपद्धतीला अनुसरून आहे. हल्लीं दोन्ही ग्रंथ समोर असून पाहिजे त्यास ही भाषेची तुलना करतां येईल. वेदांगज्योतिष जर १४०० इ. स. पू. तर छांदोग्य उपनिषद् निदान १६०० इ. स. पू. ठरतें. या छांदोग्यांत देवकीपुत्र श्रीकृष्ण याचा उल्लेख आलेला आहे. "तद्धैतद्घोर आंगिरसः कृष्णाय देवकीपुत्रायोक्त्वो. वाचापिपास एव स बभूव" प्रपा० ३, खं० १८. हा भूतकाळीं उल्लेख असल्यानें, देवकीपुत्र श्रीकृष्ण या छांदोग्याच्या पूर्वीचा असें दिसतें. श्रीकृष्ण आणि भारतीयुद्ध यांची ताटातूट करतां येत नाहीं. असें जर आहे तर भारतीयुद्धाचा काळ इ. स. पू. १२६३ हा कसा संभवतो? मुळींच वेदांगज्योतिष इ. स. पू. १४०० चें, म्हणजे त्या पूर्वीचें १५० वर्षांचें; त्या पूर्वीचें छांदोग्य, आणि त्या पूर्वीचा श्रीकृष्ण. तेव्हां हा विरोधी पुरावा अधिक महत्त्वाचा–प्रत्यक्ष पाहिलेल्या प्रकारचा–असल्यानें भारतीयुद्धाची १२६३ इ. स. पू. ही तारीख पुराणांवरून ठरवितात, ती ग्राह्य नाहीं हें उघड आहे

मॅक्समुल्लरप्रभृति विद्वानांना हें कोडें पडत नाहीं; कारण ते वेदांगज्योतिषाचा काळ इ. स. पूर्वी तीनशेंचाच सुमार धरितात. तथापि वेदांगज्योतिषांत सांगितलेल्या अयन–स्थितीचा काळ १४०० पासून अलीकडे ओढण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे, आणि तो इ. स. ११८१ हा ठरविला आहे. रा. काळे यांनीं हाच मान्य केला आहे. हा मान्य केला तरी सुद्धां वरील कोडें शिल्लक राहतें, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. म्हणजे काळे म्हणतात त्याप्रमाणें १२६३ इ. स. पू. भारतीयुद्धाचा काळ मानला तर वेदांगज्योतिषाच्या काळांत आणि यांत अवघीं ८२ वर्षे राहतात. एवढ्या मुदतींत छांदोग्य उपनिषद् घालावें लागतें. म्हणजे वेदांगज्योतिषापूर्वी तीस एक वर्षे छांदोग्य आणि त्यापूर्वी ५० एक वर्षे श्रीकृष्ण, अशी मोठी धांदल

उडते. पण भाषेच्या दृष्टीनें वेदांगज्योतिषापूर्वी तीस वर्षेंच छांदोग्य, असें दिसत नाहीं. यामुळें इ. स. पू. ११८१ हा जरी वेदांगाचा काळ घेतला तरीहि भारतीयुद्ध इ. स. पू. १२६३ च्या बरेंच पूर्वी घालावें लागेल.

दुसरा महत्त्वाचा पुरावा असा कीं शतपथ ब्राह्मणाच्या तेराव्या काण्डांत अश्वमेध प्रकरणांत जनमेजय पारीक्षित व त्याचे तीन बन्धु–श्रुतसेन, उग्रसेन व भीमसेन–यांचा उल्लेख आला आहे. हे जनमेजय पारीक्षित अर्जुनाचे पणतू होत, असा माझा समज आहे. रा. काळे यांचा समज ते अर्जुनाचे पूर्वज होते असा आहे. हा वाद सध्यां बाजूला ठेवितों. याजविषयीं सविस्तर विवेचन अन्य प्रसगानें करीन. शतपथ ब्राह्मणाचें चवदावें काण्ड म्हणजे बृहदारण्यक उपनिषद् होय हें प्रसिद्ध आहे. यांत पारीक्षितांचा उल्लेख दोनदां आला आहे. हे पारीक्षित म्हणजे अर्जुनाचे पणतू होत, अशाविषयीं कोणाचाच मतभेद दिसत नाहीं. प्रो. वेबरही असेंच म्हणतो. रमेशचंद्र दत्त असेंच समजतात. रा. काळेहि हेंच मानतात, असा माझा समज आहे. आतां या गोष्टीवरून रा. काळे यांची भारतीयुद्धाची तारीख १२६३ इ. स. पू. मानली म्हणजे कसा घोंटाळा उत्पन्न होतो तो पहा. बृहदारण्यकांत पारीक्षितांचा उल्लेख आहे, तेव्हां बृहदारण्यक पारीक्षितांनंतर निदान ५० वर्षांनीं झालें असें धरूं. पारीक्षितांचें व पाण्डवांचें पन्नास वर्षांचें अन्तर धरलें तरी पारीक्षितांनंतर ५० वर्षांनीं–म्हणजे भारतीयुद्धानंतर निदान शंभर वर्षांनीं बृहदारण्यक झालें असें होतें. म्हणजे भारतीयुद्ध इ. स. १२६३ धरल्यास बृहदारण्यकाचा काळ इ. स. ११६३ सुमार येतो. वेदांगज्योतिषाच्या दोन्ही काळांनंतरचा हा काळ आहे. म्हणजे बृहदारण्यक वेदांगज्योतिषानंतरचें ठरतें. दुसरें, शतपथाचे दोन भाग आहेत. पूर्वभागांत दहा काण्डें आहेत; आणि उत्तरभागांत ११ वें, १२ वें, १३ वें व १४ वें अशीं ४ काण्डें आहेत. पूर्वभागाहून उत्तरभाग कांहीं अर्वाचीन आहे असें मानतात, पण त्यांत भाषेच्या दृष्टीनें पाहतां थोडा फरक आहे हें सांगतां येण्यासारखें आहे. असो, शतपथाच्या पूर्वभागांत एके ठिकाणीं एक महत्त्वाचें दृक्प्रत्ययाचें वचन आहे. तेंहि शंकर बाळकृष्ण दीक्षितांनींच आपल्या ' भारतीय ज्योतिषशास्त्रां'त दाखविलें आहे. " एता वै कृत्तिकाः प्राच्यै दिशो न च्यवन्ते " म्हणजे ह्या कृत्तिका पूर्वदिशेपासून ढळत नाहींत, असें वचन दुसऱ्या काण्डामध्यें आहे. याजवर दीक्षित म्हणतात, [ पान १२८ ] " कृत्तिका पूर्वदिशेपासून चळत नाहींत; म्हणजे

त्या विषुववृत्तावर आहेत. त्यांची क्रांति शून्य आहे. सांप्रत त्या थेट पूर्वेस उगवत नाहींत, पूर्वबिन्दूच्या उत्तरेस उगवतात. अयनगतीमुळें असें झालें आहे. अयनगति वर्षास ५० विकला धरून कृत्तिकांतील योगतारेची क्रांति शून्य असण्याचा काळ काढला तो श. पू. ३०६८ वें वर्ष येतें. संपातगति ४८ विकला धरली तर याहून १५० वर्षें पूर्वी, म्हणजे कलियुगारंभाच्या थोडासा पूर्वी ( श. पू. ३२१८ ) काळ येतो. " प्रत्यक्ष लिहून ठेविलेल्या तारास्थितीच्या आधारानें गणितानें हा जो शतपथब्राह्मणाच्या पूर्वभागाचा काळ निघाला तो पाश्चात्य विद्वान् लोकांनीं अलीकडे ओढण्याचा कितीहि यत्न केला तरी तो हालूं शकणार नाहीं, व शतपथ ब्राह्मणाच्या पूर्व भागाचा रचनाकाळ ३२०० श. पू. ठरतो तो खोडून काढतां येणें शक्य नाहीं. आतां भारतीयुद्धकाळ १२६३ इ. स. पू. धरिला तर दुसरें विचित्र विधान करावें लागतें. तें हें कीं, शतपथ ब्राह्मणाचा पूर्वभाग इ. स. पू. ३१०० वर्षीचा तर उत्तरभाग इ. स. पू. ११५० सुमाराचा, म्हणजे त्यांच्या दरम्यान १९५० वर्षें निघून गेलीं !!! शिवाय वर सांगितल्याप्रमाणें वेदांगज्योतिषानंतर बृहदारण्यक मानावें लागतें. भाषेच्या दृष्टीनें पाहतां दोन्ही कल्पना असंभवनीय होत, हें निराळें सांगणें नको.

बुद्धपूर्व आर्यांच्या ऐतिहासिक अंधकारांत वेदांगज्योतिषाचा काळ ( सुमारें इ. स. पू. १४०० ) व शतपथ ब्राह्मणाच्या पूर्व भागाचा काळ ( सुमारें इ. स. पू. ३१०० ) हे उच्च दीपस्तंभ आहेत असें म्हटलें तरी चालेल. हे उभारण्याचें—म्हणजे कायम करण्याचें—श्रेय शंकर बाळकृष्ण दीक्षित यांना आहे. या दीपस्तंभांचा पाया प्रत्यक्ष पाहून लिहून ठेविलेले ज्योतिर्विषयात्मक उल्लेख आहेत व त्यांजवरून गणितानें निघणारा काळ कधीं हलूं शकणार नाहीं. पाश्चात्य विद्वानांची भारतीय आर्यांच्या प्राचीन वाङ्मयाच्या काळासंबंधानें फार कोती दृष्टि आहे. त्या दृष्टीची नजर अद्याप या दीपस्तंभाकडे गेली नाहीं, यामुळें ते वेदांना व भरतखंडांतील प्राचीन हकीकतींना फार अलिकडचे काळ ठरवितात. पण अलीकडे बाबिलोनियन इष्टिकालेखांत इ. स. पू. १७०० वर्षांच्या पूर्वी वैदिक देवतांचा उल्लेख सांपडल्यामुळें त्यांच्या दृष्टीस अंजन बसल्यासारखें झालें आहे. असो, पाश्चात्य विद्वानांची दृष्टि ज्यूलोकांच्या संकुचित कालगणनेमुळें जात्याच कोती आहे, तशी ती आमच्या इकडील

विद्वानांची कां असावी हें मात्र समजत नाहीं. शतपथब्राह्मणपूर्वभागाचा रचनाकाल इ. स. पू. ३१०० तर यजुःसंहितेचा त्याच्या पुष्कळ पूर्वी, व ऋग्वेदसूक्तांचा काळ त्याच्या पूर्वी निदान ४००० इ. स. पू. येतो.

तात्पर्य, या दोन मुख्य निश्चित कालांच्या मानानें कोणता नवीन सिद्धान्त बसविणें तो बसविला पाहिजे हें उघड आहे. परंतु या गोष्टीकडे आपल्याकडील विद्वानांचें दुर्लक्ष होतें ही आश्चर्याची गोष्ट होय. भारती युद्धाला किंवा ऋग्वेदादि वाङ्मयाला इतका प्राचीन काळ ठरविणें हें असंभवनीय कोटींतलें आहे असें नाहीं. प्राचीन राष्ट्रांपैकीं इजिप्त, खाल्डिया, चीन, व हिंदुस्थान हीं मुख्य होत. इजिप्तमधले पिरामिड इ. स. पू. ५००० च्या पूर्वींचे आहेत व त्यांचा इतिहास इ. स. पू. ६००० पर्यंत उपलब्ध झाला आहे. अशीच गोष्ट खाल्डियाची आहे. चीनचा इतिहास इ. स. पू. ३००० पासून सुसंबद्ध मिळतो. मग हिंदुस्थानांत भारती युद्ध ३१०१ इ. स. पू. झालें किंवा ऋग्वेद सूक्तें इ. स. पू. ४००० च्या सुमारास झालीं, यांत आश्चर्य तें काय ?

भारतीयुद्धाचा काळ म्हणजे महाभारताच्या हल्लींच्या स्वरूपाचा काळ नव्हे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे. हल्लींचें महाभारत इ. स. पू. २००--३०० पर्यंतचें आहे. यांत वेदांगज्योतिषांत सांगितलेली अयनस्थिति आली आहे, इतकेंच नव्हे, तर त्याच्या आलीकडीलहि आली आहे. धनिष्ठेपासून मागें हटत उदगयनबिंदु श्रवणावर आला त्या वेळेस विश्वामित्रानें नवीन श्रवणादि नक्षत्रगणना सुरू केली, असा उल्लेख भारतांत आला आहे. भारती युद्ध मात्र वेदांगज्योतिषापूर्वीचें इतकेंच नव्हे तर तें ब्राह्मण-काळाच्या मध्यें झालें, हें वर दाखविलेंच आहे.

वराहमिहिरानें दुसरा एक काळ इ. स. पू. २६४४ "षड्द्विकपंच-द्वियुतः शककालस्तस्य राज्ञश्च" म्हणून दिला आहे, तोहि वरील दृक्प्रत्ययावरून आलेल्या काळाशीं विरोधी नाहीं हें कबूल केलें पाहिजे. पण शतपथब्राह्मण -पूर्वभागरचनाकाळ इ. स. पू. ३१००, भारतीयुद्ध इ. स. पू. २६४४ व यानंतर उत्तरभाग शंभर दोनशें वर्षें-म्हणजे इ. स. पू. २४५०, यावरून शतपथाच्या दोन भागांमधील अन्तर साडेसहाशें वर्षांचें येतें. हें ज़्यास्ती येतें. शिवाय वराहमिहिराच्या पूर्वी आर्यभटानें ३१०१ इ. स. पू.

कलिकालारंभ ही परंपरा दिली आहे. कल्हणानें काश्मीरचा इतिहास राजतरंगिणींत लिहिला, तेव्हां प्रारंभीं वराहमिहिरोक्त भारतीयुद्धाचा काळ घेतांना कलीच्या प्रारंभीं भारतीयुद्ध झालें अशा " वार्तयेति विमोहिताः " 'लोकपरंपरेनें भ्रमून,' असें म्हटलें आहे. तेव्हां लोकपरंपरा इ. स. पू. ३१०१ असेंच त्यानें दर्शविलें आहे. वायुपुराणानेंसुद्धां पूर्वी दाखविल्याप्रमाणें हीच परंपरा मान्य केल्याचें दिसतें. ज्या वायुपुराणाच्या आधारावर रा. काळे इ. स. पू. १२६३ हा भारतीयुद्धकाळ घेतात त्यांत कलीचा प्रारंभ अथवा पारीक्षितीचा जन्म इ. स. पू. ३१०१ च आहे. तेव्हां भारतीयुद्धाचा हाच काळ बहुपरंपरासंमत असून पूर्वी सांगितलेल्या दोन दृक्प्रत्यायांवरून आलेल्या काळाशीं अविरोधी असल्यानें तोच ग्राह्य ठरतो.



# प्राचीन वंशावलि आणि भारतीय युद्धाचा काल.

## ( केसरीकर्त्यांस उत्तर )



सुप्रसिद्ध व सर्वमान्य ' केसरी ' पत्रामध्यें माझ्या " Mahabharata-criticism " या पुस्तकासंबंधानें गुणदोषप्रकाशन या रूपानें बरेच अनुकूल असे लेख आले आहेत. परंतु भारतीय युद्धकालासंबंधानें माझ्या पुस्तकांत जें विवेचन आलें आहे त्याविषयीं केसरीकर्त्यांनीं आपल्या लेखांमध्यें मतभेद प्रदर्शित केला आहे. यासंबंधानें त्यांनीं जे तीन मुद्दे पुढें आणिले आहेत त्यांसंबंधानें माझें उत्तर येणेंप्रमाणें आहे.

**१ महाभारतांतील जनमेजय, परिक्षित व शतपथ ब्राह्मणांतील जनमेजय पारिक्षित हे एकच कीं काय?**

महाभारत ( आदिपर्व, अध्याय ३ ) व शतपथ ब्राह्मण ( कांड १३ अ० ५ ) हीं दोन्ही एकत्र वाचलीं असतां भारतांतील जनमेजय व ब्राह्मणांतील जनमेजय हे दोन्ही एकच आहेत ही गोष्ट कोणाच्याहि दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून राहणार नाहीं. ज्यांना प्रत्यक्ष ग्रंथ पाहण्याची सवड नाहीं त्यांनीं खालीं दिलेलें दोहोंचें मराठी भाषांतर पहावें.

**शतपथब्राह्मण.** जनमेजय परिक्षित यानें केलेल्या ब्रह्महत्येच्या क्षालनासाठीं इंद्रोत शौनक यानें अश्वमेध यज्ञ केला—इतकें सांगून 'ब्राह्मणां'त पुढें असें म्हटलें आहे:—

पहिल्या दोन दिवसांचा तोच प्रकार आणि नंतर ज्योतिष अतिरात्र याप्रकारें भीमसेनाकरितां त्यांनीं यज्ञ केला; मागाहून पहिले दोन दिवसांचा तोच प्रकारें व नंतर गो अतिराव असा त्यांनीं उग्रसेनाकरितां यज्ञ केला. पहिल्या दोन दिवसांचा तोच प्रकार व नंतर आयुः अतिरात्र, या प्रकारें त्यांनीं श्रुतसेनाकरितां यज्ञ केला.

हेच पारिक्षितीय होत आणि यांचाच खालील गाथेंत उल्लेख आहे.

' धार्मिक पारिक्षितीयांनीं अश्वमेध करून आपल्या धर्मकृत्यानें आपलीं पापकृत्यें एकामागून एक नाहींशीं केलीं. '

यावरून तीन अनुमानें सहजच निघतातः— १, परिक्षितास चारच मुलगे होते; २, ते सर्व सद्गुणी होते खरे, परंतु त्या सर्वांवर ब्रह्महत्येचा व इतर पापकृत्यांचा दोष आला होता; ३, त्यांनीं चार निरनिराळे अश्वमेध यज्ञ करून आपापल्या पापांचें क्षालन केलें. महाभारताच्या आदिपर्वांतील तिसऱ्या अध्यायामध्यें जी कथा दिली आहे, ती आमचे पुस्तकाच्या सहाव्या परिशिष्टांत संक्षेपानें दिली असून ती कथा सविस्तर अशी आहेः—

कुरुक्षेत्रामध्यें जनमेजय पारीक्षित हा बरेच दिवसांचा यज्ञ करीत होता. त्याला उग्रसेन, श्रुतसेन व भीमसेन या नांवाचे तीन भाऊ होते. हे सर्व यज्ञकर्मामध्यें निमग्न असतां यज्ञभूमीचे मडपांत एका श्वानानें प्रवेश केला. जनमेजयाच्या भावांनीं त्यास मारिलें. म्हणून तें आपल्या आईपाशीं ओरडत गेलें. तुझ्या दुःखाचें कारण काय, तुला कोणी मारिलें कीं काय, असें आईनें विचारलें तेव्हां तें म्हणालें "जनमेजयाच्या भावांनीं मला मारिलें आहे." "तूं त्यांचा कांहीं अपराध केला असशील?" त्यावर श्वान बोललें—'मुळींच नाहीं. मी हविर्भागांकडे नुसतें पाहिलें नाहीं, मग त्यांना मुखस्पर्श केल्याची गोष्टच नको.' यावर ती देवतारूप शुनी ( सरमा ) यज्ञभूमीकडे जाऊन परिक्षितांना क्रोधानें म्हणाली, 'माझ्या मुलानें तुमच्या हवीस मुखस्पर्श केला नाहीं, त्यांच्याकडे पाहिलें सुद्धां नाहीं. तो अगदीं निरपराधी असतां तुम्हीं त्यास कां मारिलें?' यावर तिला कांहीं उत्तर मिळालें नाहीं. "तुम्ही माझे मुलास विनाकारण मारिलें आहे, तेव्हां तुमचेवर एक अतर्कित वाईट प्रसंग ओढवेल." अशा प्रकारचा शाप तिनें त्यांस दिला. त्या दिव्य सरमेच्या शापानें जनमेजयाचें धाबें धडाडलें. यज्ञ समाप्त करून हस्तिनापुरास आल्यावर आपल्या पापकृत्यापासून आपणास मुक्त करणारा कोणी पुरोहित पहावा म्हणून तो जारीनें शोध करूं लागला. एके समयीं तो मृगयेस गेला असतां त्याचेच राज्यांत असलेला एक आश्रम त्याचे दृष्टीस पडला. त्यामध्यें श्रुतश्रवा नांवाचा ऋषि तपश्चरण करीत होता. त्याचा मुलगा सोमश्रवा. हा सोमश्रवा आपला पुरोहित झाल्यास पहावें म्हणून जनमेजयानें ऋषीस प्रणिपात करून 'आपले मुलानें माझें पौरोहित्य स्वीकारावें' अशी त्यास विनंति केली. एका सर्पिणीनें माझें रेत प्राशन केल्यामुळें तिला गर्भ राहिला व तिचेपासून हा उत्पन्न झाला आहे. हा मोठा तापसी व वेदपारंगत आहे. महादेवकृत्या वर्ज करून कोणत्याहि

पापकृत्यांचें क्षालन करण्यास हा समर्थ आहे. कोणी कांहीं याचना केली असतां तिला नाहीं म्हणावयाचें नाहीं अशी याची मात्र एक गुप्त प्रतिज्ञा आहे. ती तुला मान्य असेल तर खुशाल तूं यास घेऊन जा ' असें श्रुतश्रव्यानें राजास सांगितलें. जनमेजय—' होय, मला मान्य आहे ' असें बोलून त्यास घरीं घेऊन आला आणि आपल्या भावांस म्हणाला—' मी या ऋषीस आपला उपाध्याय केला आहे. तेव्हां याची जी जी आज्ञा होईल ती ती तुम्हीं मनांत कसलाहि विकल्प न आणितां पाळावी. ' याप्रमाणें त्यांना सांगून तो तक्षशिलेकडे गेला आणि तो देश त्यानें आपल्या हस्तगत करून घेतला. '

ही गोष्ट येथवर येऊन एकदम थांबली आहे. सोमश्रव्याजवळ कोणीं काय मागितलें व जनमेजय व त्याचे भाऊ यांचेवर कोणतें अतर्कित संकट आलें याचा पुढें कोठेंहि उल्लेख झालेला नाहीं. इंद्रानें दिलेला रथ गार्ग्य ब्राह्मणानें जाळून टाकिला, म्हणून जनमेजयानें त्याचा वध केला, अशा आशयाच्या हरिवंशांतील कथेचा केसरीकर्त्यांनीं निर्देश केला आहे. परंतु या आख्यानाचे अनुसंधानानें पाहिलें असतां त्या गोष्टीचा इच्याशीं कांहीं संबंध नाहीं हें उघड आहे व शांतिपर्वाच्या १५० व्या अध्यायांत जनमेजयाचे हातून ब्रह्महत्या यदृच्छेनें झाली, असें म्हटलें आहे त्यावरून वरील कथा बनावट दिसते. सहज ओघानें आलें म्हणून हें येथें सांगितलें. असो, भारतांतील हकीकतीवरून एवढें आढळून येईल कीं, जनमेजयाला भाऊ तीन, म्हणजे एकंदर पारिक्षितीय चौघे. आणि शतपथ ब्राह्मणामध्यें त्यांचा जो नामनिर्देश आहे तोच या ठिकाणींहि आहे. ते सर्व मिळून एकाच पापकृत्यामध्यें सामील होते. ते धर्मभीरु होते, तथापि त्यांच्या हातून चुकून जी ब्रह्महत्या घडली तीमध्यें कमीजास्त प्रमाणानें प्रत्येकाचें अंग होतें. या सर्वांचा विचार करून पाहतां भारतांतील जनमेजय व ब्राह्मणांतील जनमेजय हे एकच आहेत असें साहजिक अनुमान निघतें. ऐतरेय ब्राह्मणामध्यें जनमेजय पारिक्षितास तुरकावशेयानें राज्याभिषेक केला असा उल्लेख आहे. हा जनमेजय पारिक्षित पांडवांचा पणतू आहे, असें रंगाचार्य यांचेंहि मत आहे.

शतपथ ब्राह्मणांमधील **जनमेजय पारीक्षित** हा पांडवांचा वंशज नसून तो त्यांचा पूर्वज आहे असें केसरीकारांचें मत आहे, व त्याच्या पुष्टिकरणार्थ

आदिपर्वाच्या अध्यायांत पांडवांचा वंशानुक्रम दिला आहे त्याचा आणि शांतिपर्वाच्या १५० व्या अध्यायामध्यें जनमेजय पारीक्षितास इंद्रोत देवापीनें ब्रह्महत्येच्या पातकापासून मुक्त केलें अशी शतपत ब्राह्मणांतील कथा भीष्मानें युधिष्ठिरास सांगितली आहे त्याचा आधार ते घेतात. या दोन्हीहि अध्यायांसंबंधानें आमचें विवेचन आमच्या ग्रंथांत दिलें आहे व हे दोन्ही अध्याय सौतीनें पाठीमागून घातले आहेत असें आम्हीं दाखविलें आहे. आम्हीं दिलेल्या मुद्यांकडे केसरीकारांचें बहुधा लक्ष गेलें नाहीं, म्हणूनच त्यांचा विचारहि झाला नाहीं; याकरितां तेच मुद्दे पुन्हा एकवार सांगून आणखीहि कांहीं मुद्दे सांगूं.

प्रथम, आदिपर्वामध्यें पांडवाच्या वंशानुक्रमाचे दोन अध्याय आहेत. एक अध्याय ९४ हा पद्यात्मक व दुसरा अध्याय ९५ हा गद्यात्मक आहे. अध्याय ९५ हा पूर्वीचा असावा असें दिसतें. त्यांत दिलेल्या वंशावलींत पांडवांच्या पूर्वजांमध्यें **जनमेजय पारीक्षित** किंवा **परीक्षितीचा** मुलगा **जनमेजन** असा कोणीहि पुरुष नाहीं. दुसरे, अध्याय ९४ हाच जरी धरून चाललें तरी कुरुपासून वंशानुक्रम येणें–प्रमाणें आहे––




आतां, या ठिकाणीं परीक्षिताचे मुलगे चार न सांगतां सात सांगितले आहेत व त्यांच्यामध्यें श्रुतसेनाचें नांव आढळून येत नाहीं. यावरून शतपथ ब्राह्मणांमध्यें आलेले परीक्षित हे पांडवांचे काल्पनिक पूर्वज नसून त्यांचे पणतू होत असें निश्चयात्मक अनुमान करण्यास कांहीं हरकत नाहीं. तिसरें, प्रक्षिप्त प्रकरणें उघडकीस यावयाचींच. या वरील मागाहून घुसडून दिलेल्या वंशावलीमध्यें पांडवांचे पूर्वजांत दोन जनमेजय येतात. हे दोघे व पांडवांचा पणतू एक असे तीन जनमेजय होतात. परंतु वास्तविक पाहतां

हरिवंशांतील श्लोकावरून* ( या श्लोकाचें अवतरण केसरीमध्यें केलें आहे ) असें दिसून येतें कीं, पांडवांचे कुलामध्यें फक्त दोन परीक्षित्, दोन जनमेजय व तीन भीमसेन झाले. चौथें, अध्याय ९५ गद्यात्मक आहे व त्यांतील वंशानुक्रम विशेष संगतवार आहे. तो असाः--




या अध्यायामध्यें जे राजपदारूढ झाले होते त्यांचींच नांवें दिलीं आहेत; व पूर्वींच्या अध्यायामधील जो आविक्षित तोच अनश्वा, असें त्याच अध्यायावरून दिसून येतें. त्याला जनमेजय नांवाचा एखादा भाऊ असेल. परीक्षितानंतर भीमसेन गादीवर आला असें सांगितलें आहे, तेव्हां तो सर्वांत वडील असला पाहिजे असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. तर परिक्षिताचा वडील मुलगा भीमसेन व शतपथ ब्राह्मणांमध्यें परिक्षिताच्या मुलांपैकीं एक म्हणून सांगितलेला भीमसेन हे एक नव्हत. सारांश, पांडवांच्या पूर्वजांमध्यें एक परिक्षित व एक जनमेजय झाला याबद्दल शंका नाहीं. परंतु शतपथ ब्राह्मणांमध्यें आलेले जनमेजय, श्रुतसेन, उग्रसेन आणि भीमसेन हे व त्याच नांवाचे आदिपर्वाच्या तिसऱ्या अध्यायांत आलेले म्हणजे पांडवांचे पणतू जनमेजय परीक्षित व त्याचे तिघे भाऊ हे एकच आहेत. 'केसरी'कारांचें असें उपपादन आहे कीं आम्ही फक्त एकच जनमेजय मानितों. परंतु तें चुकीचें आहे. पांडवांचा पूर्वज कोणी जनमेजय होता ही गोष्ट आम्हांस कबूल आहे तशी आम्ही मानितों; परंतु या जनमेजयाच्या बापाचें नांव परिक्षित नव्हतें असें आमचें म्हणणें आहे.

---

* **द्वावृक्षौ** तव वंशेऽस्मिन् द्वावेव तु **परिक्षितौ** ।
**भीमसेनास्त्रयो** राजन् द्वावेव **जनमेजयौ** ॥

जर पांडवांचा पणतू जनमेजयपारिक्षित याचा शतपथ ब्राह्मणामध्यें उल्लेख आहे तर त्याच शतपथ ब्राह्मणामध्यें युधिष्ठिरानें केलेल्या अश्वमेध यज्ञाचा कोठें उल्लेख नाहीं हें कसें, असा साहजिक प्रश्न उद्भवतो. केसरी-कारांनीं याच मुद्याला धरून पांडव हे शतपथ ब्राह्मणानंतर झाले व शतपथ ब्राह्मणामध्यें आलेला जनमेजय हा त्यांचा पूर्वज आहे असें स्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे. अशा प्रकारच्या अभावावर रचलेल्या कोटिक्रमांत कांहीं हंशील नाहीं असें आम्हीं आमचे पुस्तकांत दाखविलेंच आहे. ज्यानें ज्यानें म्हणून अश्वमेध यज्ञ केला त्या त्या सर्व राजांची झाडून नांवनिशीवार यादी शतपथ ब्राह्मण, कांड १३, अध्याय ५, यांत आहे—असें केसरीकारांचें म्हणणें आहे कीं काय ? असें म्हणणें अगदींच अयुक्तिक आहे. प्राक्कालीं जे मोठमोठे अश्वमेध यज्ञकर्ते झाले त्यांपैकीं कांहींचा उल्लेख ब्राह्मणामध्यें उदाहरणादाखल झालेला आहे. जे अगदीं नुकतेच झालेले असतील किंवा ज्यांनीं पुष्कळच अश्वमेध केले असतील अशाच राजांचा उल्लेख व्हावा हें स्वाभाविक आहे. पारीक्षित जनमेजय व त्याचे भाऊ यांनीं निरनिराळे असे चार अश्वमेध यज्ञ केले, ही गोष्ट लोकांच्या नुकतीच स्मरणांत होती. कित्येकांनीं तर दहा दहा वीस वीस अश्वमेध केले असें लिहिलें आहे. आतां, युधिष्ठिरानें तर एकच अश्वमेध केला व त्यापूर्वीं घोर युद्ध होऊन देश अगदीं निकृष्ट दशेला पोंहोंचला होता ही गोष्ट विचारांत घेतली तर युधिष्ठिराचा यज्ञ त्याच्या पणतवांचे यज्ञ ज्या थाटानें झाले त्या थाटानें झाला नसावा. युधिष्ठिराच्या यज्ञाचा उल्लेख कां आला नाहीं याचें जें वाजवी कारण दिसलें तें आम्ही येथें सांगत आहों. एखादी गोष्ट सांगितली नाहीं तरी त्याजपासून कांहीं एक अनुमान निघत नाहीं हें आणखी सबळ रीतीनें दाखवून देतां येईल. शतपथ ब्राह्मण, कांड १३, अध्याय ५, यांत रामानें केलेल्या दहा जारूथ्य अश्वमेध यज्ञांचा कोठेंच उल्लेख नाहीं. तेव्हां केसरीकारांचें असें म्हणणें आहे काय कीं युधिष्ठिराप्रमाणें राम हा शतपथ ब्राह्मणांनंतर झाला ? ऋग्वेदाच्या एका ऋचेमध्यें वेन राजाबरोबर रामाचा उल्लेख आहे असें Arctic Home in the Vedas या पुस्तकांत त्यांनींच सांगितलें आहे.

## २ कलियुगाचा आरंभकाल मागाहून गणितानें ठरविला होता कीं काय ?

आतां आपण दुसऱ्या मुद्याकडे वळूं. यासंबंधानें ध्यानांत ठेवाव-

याची पहिली गोष्ट म्हटली म्हणजे भारतीय युद्ध म्हणजे कलियुगाचा आरंभ, असें प्रचलित व सर्वमान्य असलेलें मत ही होय; किंवा विशेष खुलासेवार सांगणें झाल्यास, भारतीय युद्ध मार्गशीर्षांत झालें व लगेच नंतरच्या चैत्रापासून कलियुगास प्रारंभ झाला असें सर्व मानितात, याबद्दल खुद्द महाभारतांत पुरावा आहे. भागवत, विष्णुपुराण आदिकरून सर्व पुराणें हेंच सांगतात, आणि झाडून साऱ्या भारतीय ज्योतिर्विदांचें हेंच मत आहे. युद्धास प्रारंभ होण्याचे पूर्वी ३ किंवा ४ वर्षे 'लवकरच कलियुगास आरंभ होईल' असें वनपर्वांत म्हटलें आहे. युद्धसमाप्तीचे वेळीं जेव्हां दुर्योधन मारला गेला तेव्हां भीमानें राजाच्या प्रेतासंबंधें अपमानास्पद वर्तन केलें. त्याबद्दल भीमाचा दोष निरसन करीत असतां कृष्णानें बलरामास म्हटलें "कलियुग लागलेंच असें समजा." यावरून, युद्धांनंतरच्या चैत्र महिन्यापासून कलियुगास सुरुवात झाली ही कल्पना ख्रिस्ती शकापूर्वी २०० किंवा ३०० वर्षांच्या सुमारास, जेव्हां भारतास शेवटचें रूप प्राप्त झालें त्यावेळीं, हिंदुस्थानामध्यें होती हें स्पष्ट आहे. या गोष्टीबद्दल रंगाचार्य, आय्यर, किंवा इतरांस शंका नाहीं. युद्धापासून कलियुगारंभ मानण्यांत एक विशेष अन्वर्थता आहे. हिंदुस्थानांतील सुधारणेच्या व नीतिमत्तेच्या ऱ्हासास तेव्हांपासून प्रारंभ झाला असें आमच्या पुस्तकांत आम्हीं सांगितलेंच आहे. रंगाचार्यांचे पुस्तकावरून हा आरंभकाल अधिकच यथायुक्त दिसतो. कलि म्हणजे कलह, किंवा विशेषत: आपसांतील कलह. शुक्लयजुर्वेदामध्यें कलीस आस्कंद असें म्हटलें आहे, आणि कलि व आस्कंद म्हणजे युद्ध किंवा मारामारी असें अमरकोशांत आहे. तेव्हां कुरुक्षेत्राच्या मैदनांतील मोठ्या लढाईपासून, चालू असलेल्या कलियुगास किंवा कलहकालास प्रारंभ झाला असें मानणें सुयुक्तिक आहे. हें स्वाभाविक अनुमान निघतें. व यावरून महाभारतास शेवटचें रूप मिळण्याच्या पूर्वीची ही कल्पना आहे असेंहि सिद्ध होतें.

यानंतर दुसरी गोष्ट अशी कीं, जर भारतीय युद्धापासून हल्लींचा कलह, नाश व नीतिभ्रष्टता यांच्या कालास सुरुवात झाली असें लोक मानीत आले आहेत, तर त्यावेळेपासून किती काळ गेला याची चौकशी त्यांनीं कधीं केली होती कीं नाहीं ? भारतीय ज्योतिषांनीं या गोष्टींचा काल मागाहून म्हणजे महाभारताची अखेरची रचना झाल्यावर बरेच वर्षांनीं ठरविला

आहे, असें ज्यांचें म्हणणें आहे त्यांस, मध्यंतरीं लोक, कलिकालास भारती-युद्धापासून आरंभ झाला एवढ्यावरच समाधान मानून त्या युद्धास किती वर्षे झालीं वगैरेची विचारपूस न करितां स्वस्थ बसले होते असें मानणें भाग पडेल. तें युद्ध ख्रिस्ती शकापूर्वी ११२७ व्या वर्षी झालें असें मध्यंतरींच्या लोकांस माहित होतें असें मि. आय्यर प्रतिपादन करितात. ज्या कलियुगांत आपण राहतों त्या कलियुगाची मर्यादा १०००, फार झालें तर १२०० वर्षे आहे, व ख्रिस्ती शकाचे प्रारंभाचे सुमारास हल्लींचा पडता काल संपेल आणि यवन व म्लेंच्छ यांस हाकून लावल्यावर दुसऱ्या कृतयुगास प्रारंभ होईल असें ते मानीत होते, असें आणखी आय्यर यांचें म्हणणें आहे. मनुष्याच्या साहजिक मनोवृत्तीकडे पाहिलें तर ही कल्पना असंभाव्य व विसंगत दिसते. आहे हा काळ वाईट व येणारा तो याहूनहि वाईट हा समज सर्व देशांत व सर्वकाळीं असतो. आपल्या गत वैभवासंबंधानें प्रत्येक देशांतील लोकांचे विचार अतिशयोक्तीचे व आदरयुक्त असतात; त्यांतून हिंदुस्थान, चीन व इजिप्त वगैरे देशांतील लोकांचे तर विशेषेंकरून असले पाहिजेत. कारण अति प्राचीन काळींच ह्या देशांतील लोक सुधारणेच्या शिखरास पोंहोचले होते, व त्यांच्या कृतीसारख्या कृती अलीकडे होणें शक्य नाहीं. उपनिषद् ग्रंथांसारख्या केवळ अमानुष ग्रंथांच्या तोडीचा ग्रंथ यापुढें होण्याची आशाच नको. असो, तत्त्वज्ञान व गणितशास्त्र यांमध्यें निपुण असे जे आमचे आर्य लोक, ते महाभारतास शेवटचें स्वरूप प्राप्त होण्याचे वेळेस, दोन किंवा तीन शतकांनीं चालू निकृष्ट काल पुरा होऊन कृतयुगास प्रारंभ होईल असें मानीत होते हें विधान केवळ असंभाव्य वाटतें.

ज्या आधारावर या समजुतीचा पाया रचला गेला आहे त्याचा आपण थोडा बारकाईनें विचार करूं. मनुस्मृति व महाभारत ( वनपर्व अ० १८८ ) यांमध्यें चार युगांचा काल अनुक्रमें ४ हजार, ३ हजार, २ हजार व १ हजार, व याबरोबर प्रत्येकाचीं तितकींच शतकें संध्या व संध्यांश असा दिला आहे. याप्रमाणें चतुर्युगांचा सर्वकाल १२००० वर्षांचा होतो. हजार चतुर्युगें म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस असेंहि सांगितलें आहे. वर्ष म्हणजे दिव्य वर्ष एवढी गोष्ट शिवाय करून हिंदुस्थानांतील ज्योतिष्यांची कालगणना हीच आहे. कुल्लूक भट्टाच्या टीकेवरून वर्ष या शब्दाचा

अर्थ असाच लावला पाहिजे असें स्पष्ट दिसून येतें. रंगाचार्य म्हणतात:— " मूरसाहेबांनीं निर्दिष्ट केल्याप्रमाणें वर्षें म्हणजे दिव्य वर्षें असा उल्लेख ह्या साऱ्या उताऱ्यांत आम्हांस कोठेंहि आढळून आला नाहीं, व कुल्लूकभट्टाच्या टीकेनें मनुस्मृतीचें जें विशदीकरण झालें आहे तें केव्हांपासून चालत आहे व तें किती सप्रमाण आहे, हा प्रश्न वादग्रस्त आहे " या गोष्टीचा जो शांतपणें विचार करील त्यास असें दिसून येईल कीं, कुल्लूकभट्टाचें विशदीकरण हें संदर्भावरून साहाजिक प्राप्त होतें. मनुस्मृतींतील ते श्लोक आम्ही खालीं देतों, त्यांचा वाचकांनींच विचार करावा.

दैवे रात्र्यहनी वर्षं प्रविभागास्तयोः पुनः ।
अहस्तत्रोदगयनं रात्रिः स्याद्दक्षिणायनम् ॥ ६७ ॥
ब्राह्मस्य तु क्षपाहस्य यत्प्रमाणं समासतः ।
एकैकशो युगानां च क्रमशस्तन्निबोधत ॥ ६८ ॥
चत्वार्याहुः सहस्राणि वर्षाणांहि कृतं युगम् ।
तस्य तावच्छती संध्या संध्यांशश्च तथाविधः ॥ ६९ ॥
इतरेषु ससंध्येषु ससंध्यांशेषु च त्रिषु ।
एकापायेन वर्तन्ते सहस्राणि शतानि च ॥ ७० ॥
अ० १.

महाभारत ग्रंथांतील श्लोकांत असा कांहीं प्रकार नाहीं हें खरें आहे तरी, त्यामध्यें ज्या ज्या बारीक गोष्टींची माहिती दिली आहे त्या सर्व जशाच्या तशाच मनुस्मृतींत आहेत; आणि मनुस्मृति ग्रंथ जरी हल्लींच्या स्थितींत असलेल्या महाभारताच्या पूर्वींचा नसला तरी तो त्याच्या इतका जुना आहे. यावरून आपली अशी खात्री होईल कीं, त्यांत राहिलेली गोष्ट मनुस्मृतीवरून घेतली पाहिजे. असें न केलें तर ज्या महाभारतांत वर्तमान कलियुगांतील अनाचार, अनीति व दुःस्थिति यांचें मोठें भयंकर वर्णन केलें आहे त्याच महाभारतांत, तें कलियुग दोन तीनशें वर्षेंच बाकी राहिलें आहे. व नंतर सर्व प्रकारें नीतिमत्तेनें युक्त असें कृतयुग येईल असें सांगितलें होतें हें आपणास मानावें लागेल. कोणत्याहि लोकांनीं, मग ते कितीहि जंगली अथवा अशिक्षित असोत, अशा प्रकारच्या ( आशावादी ) कल्पनेचा अवलंब केला नाहीं; आणि 'मिलेनियम' किंवा कृतयुग ही अपरिमेयकालानें घडून येणारी मानवी आशेच्या आटोक्याच्या बाहेरील गोष्ट आहे असेंच प्रत्येक देशांतील लोक मानीत आलेले आहेत.

युग हा शब्द इंग्रजींतील aeon या शब्दाला अगदीं समानार्थक आहे, व aeon या शब्दाचे ज्याप्रमाणें निरनिराळे वाढते अर्थ होत गेले आहेत त्याप्रमाणेंच युग शब्दाचेहि झाले आहेत. प्रारंभीं सूर्य व चंद्र यांच्या दोन संगमांमधील एक महिन्याच्या कालास युग असें म्हणत असत. नंतर युग या शब्दाचा अर्थ पांच संवत्सरांचें चक्र असा होऊं लागला. पांच संवत्सरांचें चक्र म्हणजे अधिक महिन्याच्या गणनेस उपयुक्त असणाऱ्या निरनिराळ्या परिस्थितीचे संयोगास लागणारा काळ असल्यानें तसा अर्थ झाला. नंतर युग शब्दाचा अर्थ मनुष्याची आयमर्यादा (मानुषायुगा—ऋ.), नंतर बरेच जन्मांचा अवधि दर्शविणारा काल असा झाला. लोकमान्य टिळक व प्रो. रंगाचार्य यांनीं दाखविल्याप्रमाणं वेदांमध्यें या शब्दाच्या निरनिराळ्या सर्व वाढत्या अर्थांचा उल्लेख आहे. परंतु aeon या शब्दा प्रमाणं युग हा शब्द दीर्घकालद्योतक झाला तेव्हां, युग म्हणजे अमुक एक नक्की वर्षसंख्या अशी त्याची परिमितता कोणींच केली नाहीं. प्रो. रंगाचार्य यांनीं अथर्ववेद ८–२–२१ यांतील उतारा घेतला आहे. "आम्ही तुझा १०० वर्षे १०००० वर्षे एक दोन तीन चार युगें इतका अवधि मानितों. या ठिकाणीं जे काळ सांगितले आहेत ते चढत्या प्रमाणावर आहेत हें स्पष्ट आहे म्हणून एक युग दहा हजार वर्षांहून अधिक अवधि दाखवितें असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं." असा जर अथर्ववेदांत उल्लेख आहे तर, महाभारतामध्यें किंवा मनुस्मृतीमध्यें कलियुग एक हजार वर्षच चालेल असें वचन आहे, अशा प्रकारचें समर्थन कसें करितां येईल? वेदकालापासून तों तहत सांप्रतच्या महाभारतकालापर्यंत दीर्घकालवाचक युग शब्द हा हजाराहून किती तरी अधिक काल दर्शवितो असें मानिल्यावांचून राहवत नाहीं.

महाभारतास सांप्रतचें स्वरूप येण्यापूर्वी किंचित् अगोदर हिंदुस्थानांतील ज्योतिष्यांनीं अशा प्रकारच्या दीर्घावधीची नक्की मर्यादा ठरविण्याचा प्रयत्न केला असावा. हिंदुस्थानांतील लोकांशीं ग्रीक लोकांचा संपर्क आल्यापासून त्यांच्या ज्योतिषशास्त्राचे अध्ययनास निराळीच दिशा मिळाली. अमुक एक विवक्षितकालीं ग्रहांची स्थिति कोठें आहे, यासंबंधीं गणित करण्याची काय रीत आहे हें येथील ज्योतिषांस पूर्वी अवगत नव्हतें. फक्त चंद्राच्या गतीसंबंधानें त्यांस माहिती होती. याच्यापूर्वी क्याल्डियन लोकांपासून ताऱ्यांचीं नांवें प्रचारांत आणिलीं ही गोष्ट

बहुसंमत आहे. त्याचवेळीं ह्या लोकांचें अनुकरण करून युगावधि ठरविला असावा. क्याल्डियन लोक ४३२००० ह्या आंकड्याचा उपयोग ज्योतिषांत करीत असत असें कबूल केलें गेलें आहे. जरी हा आंकडा हिंदु लोकांनीं त्यांचेपासून घेतला नसला तरी १२, ६० व ६० यांचा तो भाज्य असल्याकारणानें ज्योतिषशास्त्राचे गणितास विशेष सोईस्कर म्हणून त्याचें त्यांनीं सहज अवलंबन केलें असावें. आम्हांस तर असें वाटतें कीं हा आंकडा हिंदु ज्योतिष्यांनीं क्याल्डियन लोकांपासून घेऊन दीर्घ कालावधीचें माप बसविण्याकरितां त्यांनीं युग किंवा कल्पपद्धतीचा क्रम ठरविला. प्रो. रंगाचार्य यांचें असें मत आहे कीं सृष्टीच्या उत्पत्तिकालाबद्दल दिलेले हे कल्पित आंकडे अर्वाचीन शास्त्रावरून खोटे दिसतात. आम्हांस तर असें वाटतें कीं, विश्वरचनेच्या कालासंबंधानें केलेली हिंदु लोकांचीच अटकळ इतर राष्ट्रांच्या क्षुद्र मानापेक्षां अर्वाचीन शास्त्रास विशेष धरून आहे. सारांश, पाश्चात्त्य ज्योतिषांत महाकाश मोजण्याचें पृथ्वीपासून सूर्याचें अंतर हें जसें उपयुक्त परिमाण तसेंच अनंतकालाचें मापन करण्याचें युग हें सोईस्कर साधन आहे.

परंतु ह्या विषयाशीं आम्हांस कांहीं कर्तव्य नाहीं. युगकालाची कल्पना क्याल्डियन लोकांपासून घेतली, अथवा मनुस्मृति किंवा सांप्रतचें महाभारत यांच्या कालाच्या कांहींसें पूर्वी हिंदुलोकांनीं त्याची योजना स्वतंत्र केली असें जरी मानिलें, तरी एवढ्यावरून कलिकालांचा आरंभ ज्योतिष्यांनीं ठरविला असें अनुमान निघत नाहीं. हल्लीं कलियुग आहे हा समज सर्वत्र आहे. ग्रीक लोकांच्या लोहकाला ( Iron age ) प्रमाणें कलियुगाचेंहि कालमान अति दीर्घ मानिलें असावें असें दिसतें, व त्या लोहकालासहि भारतीय युद्धापासून सुरुवात झाली असा सार्वत्रिक समज होता. अतएव कलियुगारंभ होऊन किती वर्षे लोटलीं या गोष्टीची माहिती लोकांना असावी असें स्वाभाविकपणें मानितां येईल. मागाहून गणितानें काल्पनिक प्रारंभकाल ठरविण्याचें कांहीं प्रयोजन नव्हतें. शिवाय अशा प्रकारचें गणित करणें शक्य नव्हतें. दीक्षितांची उपपत्ति आम्ही आमचे पुस्तकांत दिलीच आहे, ती उपपत्ति खरी ठरण्यास कलियुगाचे आरंभाचे वेळीं मध्यमग्रह मेषाच्या आरंभाजवळ होते असें मानणें जरूर होतें. परंतु मध्यमग्रह ही आकाशांत दिसणारी गोष्ट नव्हे. ज्योतिषांचे कल्पनासृष्टींत तिचें वास्तव्य असतें. स्पष्टग्रह

व मध्यमग्रह यांचेमध्यें नेहमीं बरेंच अंतर असतें. भारतीय युद्धाच्या वेळीं मेषाच्या आरंभाजवळ ग्रहांची कांहीं एक स्थिति होती याबद्दल त्यावेळीं मुळींच आख्यायिका नव्हती. उलटपक्षीं महाभारतावरून असें दिसतें कीं वर निर्दिष्ट केलेल्या ग्रहांच्या स्थितीहून भारतीय युद्धाचे वेळीं ग्रहांची स्थिति फार निराळे ठिकाणीं लोक मानीत होते. सारांश, ह्या गणिताच्या प्रमेयाबद्दल जर लोकांत दंतकथा असती तर ही गणितानें काढलेली आरंभकालाची कल्पना शक्य झाली असती. दीक्षितानीं दाखवून दिल्याप्रमाणें शतपथब्राह्मणामध्यें असें आढळून येतें की त्यावेळीं कृत्तिका थेट पूर्वेस उगवत असत. अशा प्रकारच्या लेखी विधानावरून त्यावेळेच्या संबंधानें गणितानें काल काढणें शक्य आहे. कलियुगाचा प्रारंभकाल ठरविण्याकरितां जो गणितप्रकार उपयोगांत आणिला आहे त्यास अशा प्रकारच्या लेखी विधानाचें पाठबळ कोठेंहि नाहीं. किंबहुना मध्यमग्रहस्थिति लिहून ठेवणें मुळींच शक्य नाहीं, आणि महाभारतांत दिलेली ग्रहांची स्थिति व गणितानें आलेली ग्रहांची स्थिति यांमध्यें अतिशय तफावत आहे. खरी गोष्ट अशी आहे कीं, भारतीययुद्ध होऊन किती वर्षे झालीं, किंवा हेंच दुसऱ्या शब्दांनीं सांगणें म्हणजे कलियुगास आरंभ होऊन किती वर्षे झालीं, ही गोष्ट सर्वकालीं लोकांस माहीत होती; आणि अमुक एका विशिष्टकालीं ग्रहस्थिति काय आहे हें जेव्हां ज्योतिष्यांस काढितां येऊं लागलें तेव्हां मध्यमग्रह ( स्पष्ट नव्हत ) त्या वर्षी मेषाच्या आरंभाजवळ होते असें त्यांस आढळून आलें. ही गोष्ट गणितानें काल काढण्याच्या कल्पनेस आधारभूत नसून तिजपासून निष्पन्न झालेली नमूद केलेली आहे.

गणितानें कलियुगाचा प्रारंभकाल कसा काढला असावा अशाविषयीं केसरीकारांनीं आणखी दोन मार्ग दाखविले आहेत. निदान आम्हांस तरी ते प्रथम आढळून आले आहेत. तथापि या दोन्ही मार्गांसहि वरील आक्षेप लागू पडतात. प्रथम आपण गर्गाच्या उपपत्तीचा विचार करूं. केसरीकार असें प्रतिपादन करितात कीं, ( नं ६, ता. १६ मे १९०५ ) भारतीय युद्धास किंवा कलिकालाच्या प्रारंभास किती वर्षे झालीं या प्रश्नाच्या वाटाघाटीस प्रथम शककालानंतर सुरवात झाली. पांडवांच्या वेळीं सप्तर्षि मघा नक्षत्रांत होते असें वचन गर्गास कोठेंसे मिळालें व त्याचे वेळेस सप्तर्षि मघामध्यें होते असें त्यास आढळून आलें; व त्यांस एका नक्षत्रांतून दुसऱ्या

नक्षत्रांस जाण्यास १०० वर्षें लागतात असें गृहीत धरून, यावरून शक कालांत २५२६ वर्षें मिळविलीं म्हणजे युधिष्ठिराचा काल येतो असें गर्गानें ठरविलें. कारण २७ नक्षत्रांमधून एक चक्र पुरें करण्यास सप्तर्षींस २७०० वर्षें लागतात असें सूर्यसिद्धांतांत लिहिलें आहे. व २५२६ यांत १७४ मिळविले असतां २७०० येतात, तेव्हां गर्ग हा शककालाच्या १७४ वर्षी झाला असावा. वरील कोटिक्रमांतील बहुतेक सर्व प्रमेयें काल्पनिक घेतलीं आहेत असें दिसून येईल. फक्त पांडवांचे वेळीं सप्तर्षि मघांत होते एवढेंच काय तें विधान गर्गानें बाहेरचें घेतलें. तेंहि कोठचें याचा पत्ता नाहीं. कोठें तरी आढळेल. सप्तर्षींची गति १०० वर्षांची आहे असें ज्योतिष्यांनीं कोणीकडून काढिलें? येथें सगळेंच काल्पनिक आहे, तेव्हां ५० वर्षांची गति गृहीत धरण्यास कांहीं हरकत नव्हती व एकंदर नक्षत्रचक्रांतून सप्तर्षीस जाण्यास १३५० वर्षें धरलीं गेल्यास युधिष्ठिराचा काल १३५० उणे १७४ म्हणजे ११७६ वर्षें शकाब्दापूर्वींचा सांगण्यास हरकत नव्हती आणि आश्चर्य हें आहे कीं, गर्गाचा काल शकाब्द १७४ वर्षे आहे हेंहि निराळ्या पुराव्या वरून शाबीत केलेलें नाहीं. गर्गाचा काल दुसरा कोणताहि घेतला म्हणजे युधिष्ठिराचा काल निराळाच येईल. सारांश, अधिकरणांतील प्रत्येक प्रमेय काल्पनिक आहे व अशा अधिकरणावर कलियुगारंभकाल गणित करून मागाहून काढिला हा सिद्धान्त रचिला गेला आहे. यांतील तथ्य बहुधा असें दिसतें कीं युधिष्ठिराचा काल २५२६ शकाब्दापूर्वीचा गर्गानें दिला आहे तो कोणत्याहि अधिकरणावरून अनुमानानें काढिलेला दिला नाहीं, तर परंपरेनें माहित असलेलें एक प्रमेय म्हणून दिलेला आहे. या प्रमेयाची व सप्तर्षि पांडवांचे वेळीं मघांत होते या विधानाची एकवाक्यता करून सप्तर्षींची १०० वर्षांची गति काढिली गेली असावी. असो, या विषयाबद्दल ज्यास्ती लिहिण्याची अवश्यकता नाहीं. कारण, या कोटिक्रमाची मूळ रचनाच काल्पनिक आहे; म्हणजे, सप्तर्षींची गति, त्या गतीचें प्रमाण व गर्गाचा काळ ह्या तीनहि गोष्टी काल्पनिक आहेत.

आतां केसरींत दिलेल्या दुसऱ्या उपपत्तीचा विचार करूं. "गर्गानें सांगितलेली सप्तर्षींची गति काल्पनिक आहे असें आर्यभट्टास दिसून आल्यावर कलियुगारंभ त्यानें पुढील रीतीनें गणितानें काढिला. शकाब्द ४२१ यांत अयनांश शून्य होता असें त्यास आढळून आलें; व कलिका-

लारंभहि अयनांश शून्य होता असें त्यासें गृहीत धरून व सूर्यसिद्धांतांत दिलेली अयनांशाची एकंदर चक्राची गति ३६०० वर्षें घेऊन त्यानें असें अनुमान काढिलें कीं, कलिकालास शकाब्दापूर्वी ( ३६००-४२१ ) ३१७९ वर्षीं प्रारंभ झाला. " वरील विधानांतील प्रमेयें पूर्वीच्या अधिकरणाप्रमाणेंच काल्पनिक आहेत. केसरीकार स्वतः कबूल करितात कीं, कलिकालारंभीं म्हणजे भारतीययुद्धाचे वेळीं अयनांश शून्य होता असें आर्यभट्टानें गृहीत धरिलें. अनुमान करण्याची ही एक नवीनच रीति आहे असें म्हटलें तरी चालेल. कारण, आपणास अनुकूल पडेल असें वाटेल तें प्रमेय घेण्यास नवीन रीतींत हरकत पडत नाहीं. युद्धकालीं अयनांश शून्य होतें असें महाभारतांत कोठेंच सांगितलें नाहीं; किंबहुना त्यावेळेस अयनांश माहीतहि नव्हते. असो, आर्यभट्टास वाटेल तें गृहीत धरण्यास हरकत नव्हती तर त्यानें कलीचे आरंभीं अयनांश १८० होते असें कां मानिलें नाहीं ? किंवा शून्यच होतें असें मानिलें तरी एकाचे ऐवजीं दोन चक्रभाग झाले असें कां मानिलें नाहीं ? वरील अनुमानांतील दुसरें प्रमेय सुद्धां, तितकें नाहीं तरी, कांहीं अंशीं काल्पनिकच आहे. शकाब्द ४२१ यांत अयनांश शून्य होते हें म्हणणें कांहीं अंशीं काल्पनिक आहे. कारण, मेषारंभस्थान वैकल्पिक आहे. प्राचीन व अर्वाचीन ज्योतिष्यांनीं तें निरनिराळें मानिलें आहे, व वास्तविक पाहतां असें करण्यास कांहींच हरकत नाहीं. हिंदुस्थानांत रेखांश उज्जनीपासून मानितात, तेंच विलायतेंत ग्रीनिच पासून धरितात. याचप्रमाणें ग्रहगोलावरहि निरयण मेषारंभ कमीजास्ती घेतला तरी हरकत नाहीं. तात्पर्य, तुमचीं गणिताचीं प्रमेयें जर काल्पनिक आहेत, म्हणजे कलियुगाचे आरंभीं पाहिजेल ते अयनांश तुम्हांस घेतां येतात व अयनांश मोजण्याचें ठिकाणच पाहिजे तसें कमीजास्ती घेतां येतें तर अशा प्रमेयावरून केलेलें गणित लोकादरास कसें पात्र होईल ? आर्यभट्टासारख्या गणितज्ञानें अशा काल्पनिक पायावर गणित केलें असेल हेंहि संभवनीय वाटत नाहीं. यापेक्षां अधिक संभाव्य असें दिसतें कीं, कलियुगारंभापासून किती वर्षे झालीं हें त्याचे वेळेपूर्वीपासून परंपरेनें माहित होतें व ती माहिती एक प्रमेय घेऊन आर्य ज्योतिष्यांनीं गणितानें कलियुगारंभीं अयनांश किती होते हें काढण्याचा यत्न केला असावा. कलियुगास भारतीय युद्धापासून प्रारंभ झाला असें नेहमीं लोक मानीत

होते; परंतु आर्यभट्टानें किंवा गर्गानें गणित करी तोंपर्यंत ( व तेंहि गणित प्रत्यक्ष पाहून लिहून ठेविलेल्या गोष्टींवर नव्हे तर काल्पनिक विधानावर ) लोकांस कलियुगारंभापासून किती वर्षे गेलीं हें ठाऊक नव्हतें असें म्हणणें चमत्कारिक व प्रमाणशास्त्राविरुद्ध दिसतें.

## ३ मेग्यास्थेनीसनें दिलेली माहिती.

भारतीय युद्धापासून ( मग तें खिस्ती सनापूर्वी १५०० च्या वर्षी झालें असो अगर ३१०१ या वर्षी झालें असो ) तों तहत मेग्यास्थेनीसपर्यंत, किंबहुना शककालाच्या ४२१ वे वर्षी आर्यभट्ट झाला तोंपर्यंत, सर्व मध्यंतरींच्या कालांत भारतीय युद्धापासून किती वर्षे लोटलीं याविषयींची माहिती लोकांस परंपरेनें होती हें मेग्यास्थेनीसच्या लेखावरून पूर्णपणें सिद्ध करितां येईल. निरनिराळ्या देशांच्या दिलेल्या माहितीशीं या पुराव्याचा पडताळा पाहून आम्ही तो सविस्तर येथें देतों. युधिष्ठिरशक म्हणून कोणीएक शक पूर्वी प्रचारांत नव्हता ही गोष्ट आम्हांस माहीत आहे व कबूलहि आहे. वास्तविक ' युधिष्ठिरशक ' हा शब्दच मुळीं असंबद्ध आहे. गर्ग या शब्दाचा कोठेंच उपयोग करीत नाहीं, परंतु २५६६ वर्षे हा युधिष्ठिराचा काल आहे असें तो फक्त म्हणतो. प्राचीनकाळीं कोणताहि शक कोणत्याहि देशांत प्रचलित नव्हता, त्यामुळें प्राचीन राष्ट्रांना राजांच्या कारकीर्दीच्या वर्षसंख्येवरून घडून आलेल्या गोष्टी नमूद कराव्या लागत आणि इतिहासाची साधारण माहिती वंशावळी सांगून द्यावी लागत असे. हा प्रकार केवळ हिंदुस्थानांतच होता असें नाहीं तर चीन, खाल्डिया, असीरिया, ईजिप्त वगैरे देशांतहि होता. ग्रीक लोकांची इतिहासप्रियता अपूर्व होती. इतिहासाचा जनक जो हिराडोटस त्याचेपासून हा गुण त्यांचे अंगीं आला होता. जिंकलेल्या राष्ट्रांच्या इतिहासाचें निष्कामबुद्धीनें ग्रीक लोकांनीं अध्ययन केलें. ईजिप्त, खाल्डिया, हिंदुस्थान वगैरे प्राचीन देशांची जी कांहीं थोडीबहुत साधारण माहिती आपणास झाली आहे, ती ग्रीक लोकांपासूनच झाली आहे. हिराडोटसनें खिस्तीशकापूर्वी ४०० च्या सुमारास खुद्द ईजिप्त देशांत जाऊन त्या देशाची माहिती जमविली होती. त्याशिवाय अलेक्झांडर बादशाहानें ईजिप्त देश जिंकल्यानंतर तद्देशीय लोकांकडून ग्रीक लोकांनीं आणखी माहिती मिळविली ती आपणास उपलब्ध आहे. मॅनेथो म्हणून एक इजि-

ष्शियन धर्मगुरु होता; त्यानें तेथल्या राजांच्या वंशावळींच्या यादी ग्रीक लोकांस दिल्या आणि याच आधारावर ईजिप्त देशाचा प्राचीन इतिहास रचला गेला. अलेक्झांडरच्या स्वारीपावेतों ३० राजघराणीं झालीं असें सांगून प्रत्येक राजाचें नांव व त्यानें किती वर्षें राज्य केलें हेंहि या यादींत सांगितलें आहे. " मेनेस हा ईजिप्तचा पहिला मानवी राजा झाला व तो ख्रिस्तीसनापूर्वी ३३०० वर्षांच्या सुमारास राज्य करीत होता. त्याच्यापूर्वी सुमारें २४९०० वर्षें देव, देवांश आणि वीरपुरुषांचें राज्य होतें." असा मेनेथोनें ग्रीकांस दिलेल्या ईजिप्तच्या प्राचीन इतिहासाचा थोडक्यांत सारांश आहे. बॅबिलोनियासंबंधीं बेरोसस यानेंहि राजांची व त्यांच्या वंशावळींची याच प्रकारची यादी तयार केली व त्यांतहि प्रत्येक राजाचें नांव व त्याच्या कारकीर्दीचा काल हीं दिलीं. मेग्यास्थेनीस यानें या देशांत अशा प्रकारच्या वंशावलींच्या यादी गोळा केल्या असल्या पाहिजेत असें दिसतें. दुर्दैवेंकरून मेग्यास्थेनीसनें लिहिलेलें पुस्तक नष्ट झालें आहे म्हणून मेनेथो यानें तयार केलेली ईजिप्त देशांतील यादी किंवा बेरोसस यानें तयार केलेली खाल्डिया देशांतील यादी ह्या ज्याप्रमाणें आपणास हल्लीं उपलब्ध आहेत त्याप्रमाणें मेग्यास्थेनीस यानें जमविलेल्या या देशांतील राजांच्या वंशावळींची यादी आपणांस उपलब्ध नाहीं. परंतु इतर पुस्तकांमध्यें मेग्यास्थेनीसच्या ग्रंथाचे जे कांहीं उतारे उपलब्ध आहेत त्यांमध्यें इतकी बारीक माहिती दिली आहे कीं, तीवरून मेग्यास्थेनीस यास येथील राजांच्या वंशावळींची यादी, प्रत्येक राजाचें नांव व त्याचा राज्यकाळ यांसहित, मिळाली असावी हेंच अनुमान निघतें. ते उतारे अक्षरशः या ठिकाणीं देणें आवश्यक वाटतें म्हणून देतों.

### प्लिनीनें घेतलेला उतारा.

" बॅकसच्या कालापासून अलेक्झांडर धी ग्रेटपर्यंत १५४ राजांची गणना आहे व त्यांच्या राज्यकालाची अवधी ६४५१ वर्षें आणि तीन महिने इतकी आहे. "

### सोलिननें घेतलेला उतारा.

" बॅकसपासून अलेक्झॅंडर धि ग्रेटपर्यंत ६४५१ वर्षें शिवाय तीन महिने इतकी गणना झाली आहे, या अवधींत १५३ राजांनीं राज्य केलें. त्यांच्या राज्यकालाची बेरीज करून ही संख्या काढली आहे. "

## अरायनच्या ग्रंथांतील उतारा.

" डायोनिसॉस ( बॅकस ) च्या कालापासून सॅंडरकॉटस ( चंद्रगुप्त ) पर्यंत हिंदुलोक १५३ राजे झाले व ६०४२ वर्षांची अवधि गेली असें मानतात. परंतु त्यांमध्यें तीन वेळां लोकसत्ताक राज्य स्थापिलें गेलें.

*   *   *   *

दुसरें एक ३०० वर्षांचें व आणखी एक १२० वर्षांचें झालें. डायोनिसॉस हा हिरॅक्लिसाहून १५ पिढ्यापूर्वींचा होता असेंहि हिंदुलोक आपल्यास सांगतात. "

ईजिप्त व बॅबिलोनिया देशांप्रमाणें प्रत्येक राजाचें नांव, त्याच्या राज्यकालाची वर्षसंख्या यांसहित मेग्यास्थेनीसनें जमविलेली माहिती किती तपशीलवार आहे हें वरील वेंच्यांवरून सहज दिसून येईल. ही माहिती इतक्या बारकाईची आहे कीं तिची मजल महिने सांगण्यापर्यंत देखील येऊन पोहोंचली आहे. ओरायनच्या ग्रंथांतील उताऱ्यांत जो मध्येंच खाडा पडला आहे त्याचें कारण तो सोलिनच्या उताऱ्यास जुळवून कांहींसें सांगतां येईल. कारण त्या तीन लोकसत्ताक राज्यांचा अवधि ( ६४५१–६०४२ ) ४०९ वर्षांचा असला पाहिजे. तीन लोकसत्ताक–राज्यकाळाच्या ज्या दोन संख्या सांगितल्या आहेत त्यांची बेरीज ह्या संख्येपेक्षां अधिक आहे व म्हणून वरील उताऱ्यांत मध्येंच खाडा पडली आहे. जरी या ठिकाणीं उघडपणें कांहीं चूक आहे तरी ती फार क्षुल्लक आहे. लोकसत्ताक राज्य म्हणजे बहुतकरून अराजककाल असावा

आतां या उताऱ्यांवरून एक गोष्ट ढळढळीत दिसून येते. प्रत्येक राजाच्या राज्यकालावधीचा उल्लेख सांप्रतचें महाभारत किंवा हरिवंश या दोहोंतून एकांतहि केलेला नाहीं. मेग्यास्थेनीसनें आपली माहिती एतद्देशीय पंडितांकडून मिळविली ही गोष्ट केसरीकारांस कबूल आहे, व ग्रीक ग्रंथकारांनीं ईजिप्त व बॅबिलोनिया देशांत जी खटपट केली त्यावरूनहि संभवनीय दिसते. म्हणून मेग्यास्थेनीसच्या वेळीं हिंदुराजांच्या वंशावळी अस्तित्वांत होत्या, परंतु आतां त्या उपलब्ध नाहींत. यावरून असें दिसतें कीं, महाभारतास जें शेवटचें स्वरूप मिळालें तें मेग्यास्थेनीसच्या कालानंतर मिळालें असावें. पूर्वीं हरिवंश हा ग्रंथ वास्तविक वंशकथनरूप असला पाहिजे व त्यामध्यें प्रत्येक राजाचा राज्यकालावधि दिला होता,

व मेग्यास्थेनीस यानें आपली माहिती जमविल्यानंतर सौतीनें त्यास निराळें स्वरूप दिलें असें दिसतें. किंबहुना हरिवंश ग्रंथ बहुतकरून वैशंपायनाच्या भारताहून एक निराळाच ग्रंथ होता व सौतीनें मेग्यास्थेनीसनंतर या दोन्ही ग्रंथांस निराळें रूप दिलें, आणि आपल्या महत्वाकांक्षेनुरूप एक लक्ष श्लोकांची भरती करण्याकरितां हरिवंश ग्रंथ त्यांत सामील केला असें अनुमान निघतें.

'केसरी'नें कबूल केलें आहे कीं, आम्ही हिरॅक्लीसचें श्रीहरी याशीं केलेलें एकीकरण योग्य आहे. कारण, हिरॅक्लिस ह्यास मथुरा नगरींत शौरसेनी लोक पूजितात व त्यानें पुष्कळ बायकांशीं लग्न केलें होतें ह्या मेग्यास्थेनीसनें दिलेल्या माहितीवरून तें स्पष्ट दिसतें. केसरीस मेग्यास्थिनीसच्या उताऱ्यांतील डायॉनिसास हा कोण आहे हें शोधून काढण्याचें श्रेय आहे. मि. आयर यांनीं इक्ष्वाकूशीं डायॉनिसासचा मेळ घालण्यांत चुकी केली आहे. वास्तविक डायॉनिसासपासून हिरॅक्लिसपर्यंत १५ पिढ्या झाल्या होत्या या सांगण्याचा मेळ दाक्षायण मनूपासून श्रीकृष्णापर्यंत महाभारतांत व हरिवंशांत तितक्याच पिढ्या सांगितल्या आहेत ही गोष्ट आधारभूत घेऊन केसरीनें डायॉनिसासचें दाक्षायणाशीं केलेलें एकीकरण सयुक्तिक दिसतें.

पण केसरीनें मेग्यास्थेनीसचे पुराव्याचे विरुद्ध काढलेला पहिला आक्षेप असा आहे कीं, महाभारतामध्यें पांडवांपासून दाक्षायणमनूपर्यंत ३५ पिढ्या दिलेल्या असून पांडवांचा समकालीन श्रीकृष्ण याजपासून दाक्षायणापर्यंत १५ च पिढ्या दिल्या आहेत, ह्यावरून मेग्यास्थेनीसची माहिती कुचकामाची आहे. या अनुमानाकडे केसरीकार कशी धांव मारितात तें आम्हांस कळत नाहीं. त्यावेळीं उपलब्ध असलेल्या पुस्तकांवरून मेग्यास्थेनीसनें आपली माहिती गोळा केली ही गोष्ट तुम्ही कबूल करितां. तुम्ही हें ही कबूल करिता कीं डायॉनिसास व हिरॅक्लिस यांच्या दरम्यानच्या त्यानें सांगितलेल्या १५ पिढ्या महाभारतांत सांगितलेल्या दाक्षायण व श्रीहरी यांच्या दरम्यानच्या पिढ्यांच्या संख्येशीं जुळतात. या दोन प्रमेयांवरून साहजिक निघणारें अनुमान हेंच आहे कीं, डायॉनिसास व चंद्रगुप्त यांच्यामधील मेग्यास्थेनीसनें सांगितलेली पिढ्यांची संख्या (१५३) त्याच्या वेळच्या पुस्तकांवरून दिलेली आहे. हल्लींच्या महाभारतांत दाक्षा-

यण व श्रीकृष्णाचे समकालीन पांडव यांच्यामध्यें ३५ पिढ्या सांगितल्या आहेत, म्हणून मेग्यास्थेनीसनें सांगितलेली डायॉनिसास व चंद्रगुप्त यांमधील १५३ संख्या चूक आहे असें अनुमान करणें धडधडीत प्रमाणशास्त्रविरुद्ध आहे. वरतीं सांगितलें आहे कीं महाभारत व हरिवंश यांचें हल्लींचें स्वरूप मेग्यास्थेनीसनंतर सौतीनें त्यांस दिलें. तेव्हां हें संभाव्य आहे कीं मेग्यास्थेनीसच्या वेळच्या भारतांत पांडवांच्या पूर्वजांत ज्यांचीं नांवें नव्हतीं अशीं कित्येक राजांचीं नांवें सौतीनें मागून घातलीं असतील; दुसरें; श्रीकृष्णाचें वय मरणसमयीं १२० होतें, त्याचा बापहि पुष्कळ वर्षें जगला होता. श्रीहरि पांडवांहून वयानें वडील होता. पांडवांचे जवळचे पूर्वज अल्पवयी मेले होते. याशिवाय एकाच मूळ पुरुषापासून निघालेल्या निरनिराळ्या शाखांपैकीं समकालीन पुरुषांच्या पिढ्यांत फरक नेहमीं असावयाचाच. सारांश एवढ्यावरूनच कोणतीही वंशावळ खोटी ठरत नाहीं. केसरींतील मराठी उत्तरावरील टीपेंत केसरीनें असेंही म्हटलें आहे कीं, १५ संख्या १५३ तून वजा देतां येत नाहीं, कारण त्या संख्या वंशवृक्षाच्या निरनिराळ्या शाखेच्या आहेत. आम्ही आपली गणना निराळ्या रीतीनें येथें देतों. आमचें म्हणणें असें आहे कीं, चंद्रगुप्त व डायॉनिसास यांच्या दरम्यान १५३ पिढ्या सांगितल्या आहेत. प्रत्येक पिढीस वीस वर्षांची सरासरी धरून (ही सरासरी योग्य आहे असें केसरीनें कबूल केलें आहे) चंद्रगुप्त व डायॉनिसास यांमधील अंतर ३०६० वर्षांचें येतें. हिरॉक्लिस डायॉनिसासहून १५ पिढ्यांनीं अलीकडचा होता म्हणून तो डायॉनिसासनंतर ३०० वर्षांनीं झाला असावा. यावरून असें अनुमान निघतें कीं, श्रीहरी व चंद्रगुप्त यांच्या दरम्यान सुमारें २७६० वर्षांचा काल गेला असावा. चंद्रगुप्ताचा काल ख्रिस्ती शकाच्या पूर्वीं ३१५ धरला जातो. यावरून श्रीकृष्णाचा म्हणजे जवळ जवळ भारतीय युद्धाचा काल २७६०+३१५=३०७५ ख्रिस्ती सनाचे पूर्वींचा ठरतो. जरी श्रीकृष्णाच्या व पांडवांच्या डायॉनिसासपासून सरासरीनें काढिलेल्या काळांत फरक पडतो तरी १५३ इतक्या लांब पिढ्यांची गणना करितांना थोडीं व पुष्कळ वर्षें राज्य करणारे राजांच्या कारकीर्दीनें एकंदर मेळ पडून असला फरक अगदीं थोडा राहील; आणि हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, हें गणित सरासरीचें आहे तरी कोणत्याहि स्थितींत दोनतीनशें वर्षांहून जास्ती या गणितांत फरक पडण्याचा संभव नाहीं.

मेग्यास्थेनीसचे पुराव्याविरुद्ध केसरीचा दुसरा आक्षेप असा आहे कीं, ' मेग्यास्थेनीसनें दिलेली वर्षसंख्या फार मोठी आहे. म्हणजे १५३ राजांना ६०४२ वर्षे घेतलीं तर प्रत्येक राजास सुमारें ५० वर्षांची सरासरी पडते. परंतु निरनिराळ्या देशांतील ऐतिहासिक राजांच्या पिढ्या घेतल्या तर ही सरासरी २० वर्षांची येते. ' या आक्षेपानें मेग्यास्थेनीसचा एकंदर पुरावा कुचकामाचा आहे असें आपणांस म्हणतां येतें काय? फार झालें तर एवढेंच मानितां येईल कीं, मेग्यास्थेनीसला दिलेली वर्षसंख्या फुगविलेली होती ती कमी करून प्रत्येक पिढीस २० वर्षे घेऊन या वर्षसंख्येस ऐतिहासिक स्वरूप दिलें पाहिजे; आणि हेंच आम्हीं केलें आहे. म्हणजे हिरॅक्लीस आणि चंद्रगुप्त यांच्या व डायॉनिसास यांच्या दरम्यानच्या सांगितलेल्या पिढ्या खऱ्या घेऊन आम्ही गणित केलें आहे व भारतीय युद्धाचा काल खिस्तशकापूर्वी ३०७५ वर्षांचे सुमाराचा काढिला आहे.

आर्यपंडितांनीं मेग्यास्थेनीसला दिलेली वर्षसंख्या संभवनीय कशी असावी हें पाहण्याकरितां प्राचीन देशांच्या वंशावळींचा थोडा ज्यास्त विचार केला म्हणजे आपल्यास असें दिसून येईल कीं, आर्यलोकांनीं दिलेल्या वर्षसंख्येंत अतिशयोक्तीचा भाग फार थोडा आहे व अशा अतिशयोक्तीचें मूळ काय आहे हें आपल्या लक्षांत येईल. प्राचीन सर्व वंशावळींत ही एक गोष्ट दिसून येते कीं, प्रत्येक देशांत मानवी राजे सुरू होण्यापूर्वीं कांहीं ना कांहींतरी देवांश राजे असावयाचेच व अशा राजांची वर्षसंख्या मोठी असावयाची. पूर्वी सांगितल्याप्रमाणें ईजिप्त देशांत मेनेथो यानें दिलेल्या वंशावळींची यादी मानवी राजा मेनेसपासून सुरू होते, व त्यापूर्वीं राज्य करणाऱ्या देवांशक राजांची त्यांत मुळींच गणना केली नाहीं. मेनोथे यानें असें म्हटलें आहे कीं, त्या राजानंतर कोणीही देव मानवी स्वरूप धारण करून आला नाहीं. हिंदुस्थानांत हिरॅक्लीस अथवा हरी हा विष्णूचा शेवटला अवतार होता असें मानितात, त्याच्या मरणोत्तर कलियुगास प्रारंभ झाला. तेव्हां हिरॅक्लीसनंतर १३८ झालेले राजे मानवी होते व त्यांचें आयुष्यप्रमाण मानवीच होतें असें म्हटलें तरी चालेल; व म्हणून त्या राजांचा काल, वीस वर्षांची सरासरी घेऊन, २७६० वर्षे धरण्यास हरकत नाहीं. आतां हिरॅक्लीस व डायॉनिसास यांच्या दरम्यानच्या १५ पिढ्यांना ६०४२–२७६०=३२८२ वर्षे राहतात, म्हणजे दर पिढीस

सुमारें २०० वर्षांचें मान पडतें. ईजिप्त देशांत मानवी राजा मेनिस याचे-पूर्वी देव व देवांश राजांनीं २४९०० वर्षे राज्य केलें असें समजत. खाल्डिया देशांत १० प्रजापतींनीं ४३२००० वर्षे राज्य केलें असें मानीत होते. आर्यपंडितांनीं दाक्षायण मनूपासून १५ राजांना ३२८२ वर्षे दिलीं हें वरील दुसऱ्या देशांतील समजुतींचे मानानें पुष्कळ प्रमाणशीर आहे. चीन-देशांत मानवी राजांची 'याओ' बादशहापासून (इ. स. पूर्वी २०८५ वर्षे) कारकीर्द सुरू झाली असें मानितात. त्याचेपूर्वी कांहीं अंशीं काल्पनिक असे राजे झाले व त्यांतील शेवटला 'हवाजिस' आपल्या पूर्वजांप्रमाणें एक शतकाहून अधिक वर्षे जगला. ज्यू लोकांची वंशावळ सर्वांत अधिक विश्वसनीय व चांगली जपून ठेविलेली आहे असें मानितात. पण तींत-सुद्धां मोझेसचे पूर्वीचे प्रजापतींची आयुर्मर्यादा फार मोठी दिली आहे. पहिल्या भागांत म्हणजे जगत्सृष्टीपासून जलप्रलयापर्यंत, ज्यू लोकांच्या माहितीप्रमाणें ॲडमपासून नोवापर्यंतच्या ११ पुरुषांस २२६२ वर्षे दिलेलीं आहेत; म्हणजे दर पिढीस सुमारें २०० वर्षे पडतात. दुसऱ्या भागांत म्हणजे जलप्रलयापासून प्रयाणापर्यंत, म्हणजे शेमपासून अब्राहामपर्यंतच्या ११ पुरुषांस, १३१० वर्षे मानितात. म्हणजे दर पुरुषास सरासरी १२० वर्षे पडलीं. तिसऱ्या भागांत मात्र आपणास स्वाभाविक सृष्टिक्रमानुरूप मोझेसपासून सालोमनपर्यंतच्या बारा पुरुषांस ४०८ वर्षे दिलीं आहेत.

सारांश, हिंदुस्थानांत प्राचीनकालीं आर्यलोकांनीं ईजिप्त देशांतील कॉप्ट लोकांप्रमाणें किंवा बॅबिलोनिया देशांतील खाल्डियन लोकांप्रमाणें, किंवा पॅलेस्टाईनमधील ज्यू लोकांप्रमाणें खुलासेवार वंशावळी ठेविल्या होत्या ही गोष्ट शंकास्पद नाहीं. प्रारंभींचे दहा, बारा, पंधरा राजे प्रत्येकांत देवांश मानिले जाऊन पुढील एखाद्या विशेष व्यक्तीपासून मानवी व ऐतिहासिक राजे झाले, अशा वंशावळी हिंदुस्थानांतील पंडितांनीं मेग्यास्थेनीसला ख्रिस्ती शकापूर्वी ३१५ चे सुमारास ईजिप्तांतील मेनेथोनें दिलेल्याप्रमाणें किंवा बॅबिलोनियांत बेरोससला दिलेल्याप्रमाणें दिल्या. मेग्यास्थेनीसनें लिहून ठेविलेल्या माहितीवरून हिंदुस्थानांतील प्रथम ऐतिहासिक राजाचा ठरणारा काळ व फार प्राचीन कालापासून प्रचलित असलेल्या दंतकथेनें भारती युद्धाचा मानलेला काळ ३१०१ ख्रि. पू. हा एकच येतो, ही गोष्ट लक्षांत ठेविली असतां तो असंभवनीय आहे असें म्हणतां येईल काय ? ईजिप्तमध्यें पहिला मानवी राजा इ. स. पूर्वी ३३७० वर्षे राज्य करूं लागला, टायर हें

शहर इ. स. पूर्वी २७५० वर्षे वसविलें गेलें, ईजिप्तमधील अति उंच पिरॅमिड इ. स. पूर्वी २५०० वर्षे बांधला गेला, इत्यादि तारखांवरून हा काळ अत्यंत संवभनीय दिसतो.

मेग्यास्थेनीसचा पुरावा अप्रमाण मानून केसरीकार भागवत आणि विष्णुपुराण यांतील वंशावळींवर भरंवसा ठेवितात, आणि त्याच रीतीनें म्हणजे प्रत्येक राजाची तीच सरासरी घेऊन व पांडवांचा समकालीन जरासंध आणि चंद्रगुप्ताचे पूर्वी होऊन गेलेले नंद राजे यांचे दरम्यान सुमारें ३९ राजे झाले असें मानून, भारतीय युद्धाचा काल सुमारें १५०० इ. स. पू. असा ठरवितात. तेव्हां वादग्रस्त प्रश्न एवढाच आहे कीं, मेग्यास्थेनीस यानें सांगितलेल्या १५३ पिढ्या अधिक विश्वसनीय आहेत किंवा भागवत आणि विष्णुपुराण यांत सांगितलेल्या ३९ पिढ्या अधिक विश्वनीय आहेत ? मेग्यास्थेनीस हा परस्थ असून इतिहासकार होता, त्यानें आपली माहिती ३१५ इ. स. पू. चे सुमारास त्यावेळच्या व हरिवंश या ग्रंथांवरून मिळविली, किंवा तत्कालीन पंडितांकडून किंवा अस्तित्वांत असलेल्या राजेवंशावळींतून मिळविली या विरुद्ध दुसरे पक्षीं ६०० ईसवीचे सुमारास पुराणांस अनाडी लोकांकडून हल्लींचें स्वरूप मिळालें, इतिहासाच्या दृष्टीनें विचार केला असतां पुराणांचें महत्व फारच कमी आहे, आणि यासंबंधाचें पुराणांचें मत पुराणांहून प्राचीन असलेल्या ज्योतिष्यांचे मताविरुद्ध धडधडीत आहे, ह्या सर्व गोष्टी ध्यानांत घेतल्या तर ह्या मुद्यावरील भागवत किंवा विष्णुपुराण यांहून मेग्यास्थेनीसचाच पुरावा अधिक महत्त्वाचा आहे असें मान्य केल्यावांचून राहवत नाहीं, व परंपरेनें आलेला भारतीय युद्धाचा ३१०१ इ. स. पू. हा काळ अधिक बळकट होतोच.



# भारतीय युद्धाचा काळ.

## ( करंदीकरांचें मत असाह्य. )

### युद्धवर्ष

भारतीवीरांचीं चरित्रें ऐतिहासिक असून सत्य कोटींतील आहेत, हें सिद्ध झाल्यास त्यांचें उपदेशपर सामर्थ्य अधिक वाढेल यांत शंका नाहीं. यासाठीं भारतीयुद्ध नक्की कधीं झालें हें ठरविणें महत्त्वाचें आहे. इतिहासाला काळ आणि स्थळ यांचा निश्चय असणें अवश्य असतें. असें नसेल तर ती दंतकथा समजली जाऊन त्याची किंमत कमी होते. हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत भारतीयुद्ध ही प्रारंभींची ऐतिहासिक गोष्ट आहे. त्या युद्धाचें स्थळ प्रसिद्ध कुरुक्षेत्र असून त्याचा काळ सर्व आस्तिकमतानें व ज्योतिष्यांच्या मतानें इ. स. पू. ३१०२ ठरलेला आहे. हाच कलियुगाचा आरंभ काळ आहे. याच्या विरुद्ध लोकमान्य टिळक व अनेक पाश्चात्त्य संशोधक यांचें मत पुराणांतील पिढ्यांवरून असें आहे कीं, भारती युद्ध सुमारें इ. स. पू. १५७८ त झालें. वराहमिहिर एकटा ज्योतिष–प्राचीन–ग्रंथकार व राजतरंगणीकार शकपूर्व २५२६ हा भारतीयुद्धाचा काळ मानतात, तर अलीकडचे विद्वान ज्योतिषी नागपूरचे दफ्तरी शकपूर्व १२७५ मानतात. तथापि मुख्यत्वें श. पू. ३१७९ किंवा श. पू. १५७८ हेच दोन युद्धाचे काळ मानले जातात. 'मुरारेस्तृतीयः पन्थाः' याप्रमाणें रा. ज. स. करंदीकर यांनीं चित्रमयजगत् १९२२ च्या प्रथमांकांत 'भारतीययुद्धकालनिर्णय' या मथळयाखालीं लेख लिहून नक्की खरा काळ इ. स. पू. १९३६ अथवा शकपूर्व २०१४ ठरविला आहे, व त्याचीं सविस्तर कारणें देऊन इतर काळ कसे चुकीचे आहेत हें **सप्रमाण** ( त्यांच्या मतानें ) दाखविलें आहे. हा लेख वाचून मीं आपलें मत बदललें नाहीं, हें त्यास मीं तोंडी कळविलेंच आहे; तथापि माझ्या मताचीं कारणें वाचकांसमोर ठेवणें अवश्य आहे.

**मैत्रायणीय उपनिषदावरून ठरविलेला काळ चुकीचा.**

प्रथम रा. करंदीकर यानीं आपला काळ मैत्रायणीय उपनिषदावरून ठरविला तो कसा चुकीचा आहे हें पाहूं, मग इतर काळ त्यांनीं जे खोडले

आहेत ते कसे अप्रमाण खोडले आहेत हें दाखवूं. हा भाग लिहितांना याला निरुत्तर पुरावा असें करंदीकर म्हणतात. आपल्या मुलास रावसाहेब आपण म्हणण्यासारखें हें आहे. हा निरुत्तर पुरावा देतांना ते म्हणतात, 'गीता आणि कठकादि उपनिषदें यांच्यांत विचारसादृश्य आहे......गीतेचा काळ निश्चित करण्यास उपनिषदांचा काळ निश्चित झाला पाहिजे...... लोकमान्य टिळकांनीं गीतारहस्यांत मैत्रायणी उपनिषदाचा काळ इ. स. पू. १६८० ते १८८० असा दिला आहे......शब्दयोजना व विचारसरणि यांवरून मैत्रायणी-उपनिषद् गीतेच्या नंतरचें दिसून येतें. ( कदाचित् गीता व मै. उपनिषद् या दोन्ही ग्रंथांनीं तिसऱ्यांतून वाक्यें घेतलीं असतील. यावरून फार झालें तर दोन्हींचा काळ जवळ जवळ असला पाहिजे. कारण **याखेरीज समान ग्रंथांतून समान वचनें उद्धृत केलीं जात नाहींत** ). यावर कोणास शंका बाकी असेल तर मैत्रायणी उपनिषदांतील व भारतांतील षोडशराजांची तुलना करून पाहावी, म्हणजे या उपनिषत्कर्त्यापुढें भारतग्रंथ होता अशी खात्री होईल. सारांश, मै. उ. चा काळ इ. स. पू. १९०० अर्थात् गीतेचा व भारताचा काळ तत्पूर्वी—पांच पन्नास वर्षांचा ठरतो. अर्थात् भारतीयुद्ध **इ. स. पू. १९०० च्या अलीकडे येऊं शकत नाहीं.** ”

वरील विवेचनांत दिलेलीं विधानें किती चुकीचीं आहेत हें निराळें दाखवावयास नको. मैत्रायणी उपनिषद् आणि गीता यांचा एक काळ ज्या वाक्यावरून ठरविण्याचा प्रयत्न करंदीकर करतात, तीं वाक्यें जुन्या उपनिषदांतील असून दोघांनीं निरानिराळया वेळीं घेतलीं असूं शकतील. करंदीकरांचा भयंकर हेत्वाभास नेहमीं असाच असतो. आपणच एक व्याप्ति किंवा साधारण नियम असा घालून देतात कीं तो क्षणभर टिकूं शकत नाहीं. एककालीनत्वाशिवाय समान ग्रंथांतून समान उतारे उद्धृत केले जात नाहींत, ही व्याप्ति किती चुकीची आहे? एकाच ग्रंथांतून उतारे घेणाऱ्या दोन ग्रंथांचें हजारों वर्षांचें अन्तर असूं शकेल. मनुवचन महाभारतांत सांपडतें व अगदीं अलीकडच्या ग्रंथांतहि सांपडतें. पण तें कशाला ? **शंका बाकी न ठेवण्याकरितां** षोडशराजीय कथेचा आधार करंदीकर देतात, पण हें कथानक मूळ भारतांतील नसून शतपथब्राह्मणांतील आहे आणि त्यांतून मैत्रायणी उप-

निषदांत घेतलें असावें आणि भारतांतहि घेतलें असावें आणि या दोहोंत निःसंशय १६०० वर्षांचें अंतर आहे. कारण महाभारत ग्रंथ निश्चयानें इ. स. पू. ३०० च्या सुमाराचा आहे हें आतां बहुतेक सर्वसंमत आहे. ( टिळकांनींहि गीतारहस्यांत हें माझें मत मान्य केलें आहे. )

आणि येथें हेंहि सांगण्यासारखें आहे कीं, भारताचा किंवा गीतेचा काळ ठरविल्यानें भारतीयुद्धाचा काळ ठरत नाहीं. हा अत्यन्त महत्त्वाचा मुद्दा करंदीकर विसरतात. महाभारत तीन ग्रंथकारांनीं केलेलें निश्चित आहे, व्यास, वैशंपायन आणि सौति. खुद्द सौति जरी आपल्यास वैशंपायनाच्या वेळचा आणि जनमेजयाच्या वेळचा त्याच्या सर्पसत्रांत भारत ऐकिलें म्हणणारा बनवींत आहे तरी सौतीचें महाभारत इ. स. पू. ३०० च्या सुमाराचें आहे. हा निश्चय निश्चित–प्रमाणानेंच होतो; म्हणजे ग्रीकांचा उल्लेख, श्रवणादि नक्षत्रांचा उल्लेख वगैरे अनेक प्रमाणांवरून इ. स. पू. ४०० नंतर आणि डायान क्रायसोस्टोम यानें एकलक्षात्मक इलियडचा उल्लेख केल्यावरून इ. स. पू. १०० च्या पूर्वीं हा ग्रंथ ठरतो. पण हें महाभारत व्यासाच्या वेळेपासून म्हणजे इ. स. पू. २००० किंवा ३००० जसा भारतीयुद्धाचा काळ ठरेल, त्या वेळेपासून बनत आलें आहे. अर्थात् महाभारताचा कोणताहि भाग अमुक वेळचा हें निश्चित सांगतां येत नाहीं. गीता सुद्धां निश्चयानें व्यासकालीन म्हणतां येत नाहीं. श्रीकृष्णानें जो अर्जुनास उपदेश समरांगणावर केला तो व्यासप्रसादानें संजयानें ऐकिला आणि खुद्द श्रीकृष्णाच्याच शब्दांनीं गीतेंत सांगितला, हें ऐतिहासिक विधान नव्हे. गीतेचा काळ त्यांतील शब्दांवरून व विवरणावरून निराळा ठरेल आणि खुद्द भारतीयुद्ध आणि मूळ कृष्णअर्जुन–संवाद निराळ्या वेळीं झालेले ठरतील. तात्पर्य भारतीयुद्धाचा काळ आणि गीतेचा काळ एक म्हणणें तर्कास धरून नाहीं, किंबहुना संभवनीयहि नाहीं. यामुळें शेवटल्या वाक्यांत गीतेची, भारताची, भारतीयुद्धाची जी सांगड करंदीकरांनीं घातली आहे ती चूक आहे. या विचारसरणीचें पुढें आणखी प्रयोजन आहे.

तथापि ही जी तर्क-पद्धति मैत्रायाणि उपनिषद्मावरून करंदीकरांनीं स्वीकारली आहे ती मला विरोधी नाहीं; कारण या पद्धतीनें भारतीयुद्ध इ. स. पू. १९०० च्या अलीकडे येऊं शकत नाहीं, एवढेंच सिद्ध

झालें; पण पकीकडे वाटेल तितकें जाऊं शकेल. तेव्हां तें निश्चित करण्यासाठीं रा. करंदीकर पुन्हां पुराणांकडेसच धांव घेतात. पुराणांतल्या पिढ्या आणि आंकडे गडबडगुंडाचे आहेत हें मी अनेक वेळां दाखविलेंच आहे. आणि करंदीकरांस या गडबडगुंड्यावर आणखी गडबडगुंडा करावा लागला याचें आश्चर्य नको. प्रथम **लेखक-प्रमादानें व अन्यकारणांनीं पाठभेद व अशुद्धें यांची गर्दी पुराणांत झाली आहे** असें करंदीकर कबूलच करतात. मग वाटेल तो पाठ आणि वाटेल तो अर्थ घेऊन वाटेल तो सिद्धान्त प्रस्थापित करतां येईल; आणि असेंच करंदीकर यांनीं केलें आहे. पुराणांतील बार्हद्रथ राजे वगैरेसंबंधीं वचनें देऊन व त्यांतील घोटाळे दाखवून सर्वांचा भागवत पुराणांतील पाठांत अन्तर्भाव करून परीक्षिताचे जन्मापासून नन्दाभिषेकापर्यंत 'एतद्वर्षसहस्रं तु शतं पञ्चदशोत्तरम्' असें करंदीकर निश्चित करतात. पण हेंहि गळ्यांत येत असल्यानें म्हणजे यांत १०१५ हा आंकडा आल्यानें करंदीकरांचा कार्यभाग साधेना, तेव्हां शतं पञ्च असें पद तोडून दशोत्तर निराळें करून परीक्षिताच्या जन्मापासून नंदाच्या अभिषेकापर्यंत १५१० वर्षें झालीं असें करंदीकरांनीं ठरविलें. 'शतानि पंच' पाहिजे ते शतं पञ्च आहे, याचें समाधान 'निरंकुशाः कवयः' असें ते करतात. पण निरंकुशाः गणकाः किंवा 'निरंकुशः तार्किकाः' असें कां म्हणूं नये? तात्पर्य, वाटेल तें प्रमेय घेऊन वाटेल तो सिद्धान्त काढतां येईल याच मार्गाचें अवलंबन करंदीकर करीत आहेत. नंदाचा अभिषेक इ. स. पू. ४२५ सर्वमान्य आहे, हें ठीक आहे. हीं वर्षें मिळवतां परीक्षिताचा जन्म १९३५ इ. स. पू. आणि भारतीयुद्ध इ. स. पू. १९३६ ठरलें. निश्चित काळ याप्रमाणें ठरविल्यावर दुसऱ्यास ही शतं पंचची कल्पना सुचली नाहीं याचें करंदीकर आश्चर्य करतात!! बिचारे लोकमान्य टिळक, रमेशचन्द्र वगैरे, नन्दापूर्वीं परीक्षित १०१५, किंवा १०५० वर्षेंच मानीत आले!! (त्यांचें डोकें इतकें चाललें नाहीं! कीं शतं पंच आणि शतानि पञ्च एकच). हें त्यांचें व हिंदुस्थानांतील जनतेचें दुर्दैव, तें आतां करंदीकरांनीं सुधारलें.

रा. करंदीकर म्हणतात 'शतं पञ्च दशोत्तरम् याचा अर्थ (एक हजारांवर) पांचशें दहा असाच घेतला पाहिजे कारण बार्हद्रथ वंशावळींत दिलेल्या आंकड्यांच्या बेरजेशीं तो जुळतो.' पण बार्हद्रथ वंशाचा

आंकड्यांचा कसा घोंटाळा आहे हें महाभारत उपसंहार पृष्ठ १४४–१४५ यांत मीं विस्तारानें दाखविलें आहे. प्रथम, ३२ राजे सांगून ‘पूर्णं वर्षसहस्रं च तेषां राज्यं भविष्यति’ बरोबर १००० वर्षें त्यांचीं सांगितलीं. नंतर २२ राजांची कारकीर्द वर्षें सांगितलीं त्याचीच बेरीज ९९७ आली तेव्हां ३२ राजांना हजार बरोबर वर्षें कशीं? दुसरें, या यादींत कित्येक राजांना जास्त वर्षें दिलीं आहेत, १००, ६४, ८३ वगैरे आंकडे आहेत, तेव्हां या संख्या काल्पनिक आहेत. हे आंकडे कमी करून ‘यावत्परीक्षितो जन्म’ या वचनांतील १११५ किंवा १०१५ इत्यादि जो पाठ घ्याल त्याशीं जुळते घेतले पाहिजेत. याच्या उलट करंदीकर शतं पञ्च म्हणजे ५०० असा चुकीचा अर्थ घेऊन बार्हद्रथ आंकड्यांशीं जुळतें करून घेत आहेत. खरी तर्कसरणि म्हणजे दोन्ही आंकडे भरमसाट व विरोधि म्हणून टाकून देण्यास योग्य आहेत, म्हणजे ऐतिहासिक विचारांत या पुराणवचनांस कांहींच किंमत नाहीं असेंच ठरविणें योग्य आहे.

रा. करंदीकर कदाचित् म्हणतील कीं, ‘यावत्परीक्षितो जन्म’ या वचनांतील आंकडा आम्ही बार्हद्रथवंशाच्या आंकड्यांशीं जुळता करून घेतल्यास अन्य प्रमाण जुळतें येतें म्हणून घेतो तर तें अन्यप्रमाण आपण आतां पाहूं. पुराणांत आंध्रापर्यंत महापद्मापासून ८३६ वर्षें सांगितलीं आहेत या गोष्टीचा कांहींच उपयोग नाहीं. परीक्षितापासून महापद्मापर्यंत १०१५ कीं १५१० हा तंट्याचा प्रश्न आहे. यांत आंध्रान्ताचीं ८३६ वर्षें मिळविलीं तर २३४६ ( १५१०+८३६ ) वर्षें येतात, असें करंदीकर म्हणतात. पुराणांत जर ही २३४६ संख्या परीक्षितासापासून आन्ध्रान्तापर्यंतची दिली असती तर निर्णय झाला असता; पण ही संख्या कोठेंच दिली नाहीं. ही करंदीकर आपल्यास अनुकूल अशी बनवितात. बहुधा करंदीकर येथें असें म्हणतील कीं, ही संख्या सप्तर्षींच्या गणनापद्धतीनें वायुपुराणांतील वचनांवरून निघते, तेव्हां ती तशी निघते कीं काय याचा आपण बारकाईनें विचार करूं. पुराणवचनें ओबडधोबड जशीं आहेत तशींच घेऊन करूं. हीं वचनें वायुपुराणांत जशीं आहेत तशीं करंदीकरांनीं ( पृ. ४० चि. म. अ. १ स. १९२२ ) दिलीं आहेत.

पहिल्या श्लोकांत परीक्षित–जन्मापासून महादेवा ( नन्दा )–भिषेकापर्यंत ‘एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पञ्चाशदुत्तरम्’ या वाक्यानें १०५० वर्षें

दिलीं आहेत; १५११ नाहींत. पुढच्या श्लोकांत आन्धान्तापर्यंत ८३६ आणखी वर्षें झालीं असें सांगितलें आहे. अर्थात् या पुराणकारापुढें परीक्षितापासून आंध्रान्तापर्यंत १८८६ वर्षेंच होतीं, २३८६ नव्हतीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तेव्हां पुढील श्लोकांत सप्तर्षिगणना जी सांगितली आहे, ती १८८६ ला जुळेल अशीच असली पाहिजे. ती गणना अत्यन्त ओबड धोबड आहे तरी त्यांतून २३४६ वर्षें निघत नाहींत. आपण पाहिला श्लोक घेऊं " सप्तर्षयस्तथा प्राहुः प्रतीपे राज्ञि वै शतम् " यांत प्रतीपाच्या वेळीं सप्तर्षि कोणत्या नक्षत्रांत होते हें सांगितलें नाहीं. शंभर वर्षें होते एवढेंच म्हटलें आहे. ( सप्तर्षि वस्तुतः मुळींच चालत नाहींत ते होते तेथेंच आहेत. पण ही एक काल्पनिक गति धरून गणनामान सांगितलें आहे हें सर्वांस मान्य आहे ). सप्तविंशे शतैर्भाव्या आंध्रान्तात्ते तदा पुनः " याचा अर्थ लागत नाहीं. सत्ताविसाव्या नक्षत्रीं शतांनीं आंध्रान्तांत ते येतील ( किंवा सप्तविंशैः असा पाठ घेऊन २७०० वर्षांनीं आंध्रान्तांत तेथें पुन्हां येतील. म्हणजे प्रतीपाच्या वेळेच्या ठिकाणीं येतील असें घ्यावें ). याच्या पुढच्या श्लोकांत जास्त खुलासा आहे, मघायुक्त सप्तर्षि ' काले पारिक्षिते शतम् ' ( अभवन् ) आंध्रान्ते सचतुर्विंशे भविष्यन्ति मते मम ॥ दुसऱ्या चरणाचा अर्थ लावतां सचतुर्विंशे याचा अर्थ चुकीचा लावून करंदीकर आपलें मत प्रस्थापित करतात. चोविसाव्या नक्षत्रासह असा त्याचा अर्थ सरळ **मघांपासून** चोविसाव्या नक्षत्रीं असा त्यांनीं अर्थ घेतला आहे. येथें ' पुराणकारानें नक्षत्रच स्पष्ट दिलें असतें तर घोंटाळा झाला नसता. परीक्षिताच्या वेळीं मघांत सप्तर्षि होते; आन्धाताच्या वेळीं अमुक नक्षत्रीं होते असें म्हटलें असतें म्हणजे विवादच नव्हता, पण चतुर्विंशे असें म्हटलें आहे आणि तेथेंहि स चतुर्विंशे असें म्हणून आणखी घोंटाळा केला. आंकडे देतांना कांहीं तरी कूट घालावयाचें असा कित्ता महाभारतकार सौतीनें घालून दिला आहे तो पुराणकार मुद्दाम गिरवितात, किंवा त्याच्या डोक्यांत गोंधळ म्हणून कांहीं तरी सांगतात. असो, मघापासून २४ वे नक्षत्रीं असा जर अर्थ अभिप्रेत असता तर पूर्वी १०५० व ८३६ ही संख्या स्पष्टपणें सांगून २४०० वर्षें सांगणारा पुराणकार पांडव किती तर बाजेच्या खुराइतके तीन म्हणून दोन बोटें दाखविणाराच म्हटला पाहिजे. तेव्हां तसें न मानतां १८८६ ला जुळता येईल असाच अर्थ केला पाहिजे. नक्षत्रें कृत्तिकेपासून मोजतात. तेव्हां २४ नक्षत्रें संपून पुढच्या नक्षत्रांत आन्धान्त होईल, असें

हा पुराणकार म्हणतो. मघा आठवें नक्षत्र आहे तेव्हां मघा धरून १८ नक्षत्रें होतात, म्हणजे १८०० वर्षें होतात. असा हा अर्थ बसवितां येतो. प्रतीपाच्या वेळीं २७ वे नक्षत्रीं ( सप्तविंशे ) भरणींत असा अर्थ होईल. यांत ७०० वर्षें धरावीं लागतात हें खरें पण त्यांत आश्चर्य काय ? ' प्रतीप शंतनु भीष्म ' यांपैकीं भीष्मच तर १५० वर्षें जगले होते. करंदीकर यांनीं लाविलेली अर्थसंगति विलक्षण आहे. कारण २३०० वर्षें आपल्यास अभिप्रेत आहेत तीं आणण्यासाठीं सप्तर्षि–नक्षत्रास्थिति घ्यायची वायुपुराणांतील वचनावरून, आणि आंकडे जुळावावयाचे ते त्याच वायुपुराणांतील वचनावरून नव्हे तर भागवत पुराणाचा शतंपञ्चदशोत्तरं हा पाठ घेऊन त्याचा शतानि पंच असा अर्थ लावून जुळवाजुळव करायाची. ती तर्कशुद्ध कशी म्हणतां येईल ? वायुपुराणांतीलच वाक्यें घेऊन अर्थ निघेल तो काढला पाहिजे.

याप्रमाणें मैत्रायणी उपनिषदाचा **निरुत्तर** पुरावा व वायुपुराणावरून निघालेला **निश्चितकाळ** याविषयीं यथामति उत्तर दिल्यावर करंदीकरांनीं इतर मतांचें जें खण्डन केलें आहे त्याकडे वळूं. वराहमिहिरवचनावरून तरंगिणीकारानें दिलेला भारतीयुद्ध काळ चुकीचा ठरवितांना करंदीकर म्हणतात "वराहमिहिराच्या ( षड्द्विकपञ्चद्वियुतः शककालस्तस्य राज्ञश्च ) या वचनाचा अर्थ आज २५२६ वर्षें असा लावला पाहिजे. "त्या वेळीं सप्तर्षि कोणत्या नक्षत्रांत आहेत असें म्हणावयाचें असेल तें म्हणा. युधिष्ठिराचा राज्याभिषेक काळ वराहाला अवगत होता त्या वेळीं सप्तर्षि मघांत हा कल्पित लोकप्रवाद त्यास माहित होता. अर्थात् **युधिष्ठिर शकाच्या** २५२६ व्या वर्षीं वराहानें बृहत्संहिता हा ग्रंथ लिहिला. त्यांचा जन्मकाल श. ४२७ सर्वास संमत आहे. आपण भारती-युद्धकाल श. पू. २०१४ ठरविला आहे. आतां युधिष्ठिरशक भारतीयुद्धापासून न धरितां राजसूयापासूनहि धरण्याची वहिवाट आहे; यास्तव हा युधिष्ठिर शक २०२८ ( चौदा वर्षें पूर्वीं ) येतो. तेव्हां बृहत्संहिता २५२६–२०२८ म्हणजे शक ४९८ व्या वर्षीं लिहिली म्हणजे ४२७ वजा करतां ७१ व्या वर्षीं लिहिली, "**वराहमिहिराच्या वचनाचा इतरांनीं अनेकविध केलेला अर्थ अग्राह्य आहे हें उघड आहे.** " म्हणजे कल्हणतरंगिणीकार किंवा तदनुयायी आर्य समाजस्थापक दयानंद स्वामी, लो. टिळक, वेलंडी अय्यर, वगैरे सर्व चुकले आणि करंदीकरांना बरोबर अर्थ समजला ! ! !

पण करंदीकरांनाच बरोबर अर्थ कळला नाहीं असें दिसतें. "बृहत्संहिता ७१ व्या वर्षीं लिहिली." " राजसूयापासूनहि युधिष्ठिर शक मोजतात " वगैरे हातचे त्यांनीं घेतले आहेत ते सोडूं. मुख्य गोष्ट ही कीं, वराहमिहिरानें जो हा काळ सांगितला आहे तो, आपल्या ग्रंथाच्या वेळेपर्यंत कीं, शककाळपर्यंत ? आतां पावेतों शककाळापर्यंत असेंच सर्व लोक मानीत आले आहेत. आणि वरील वचनांत **शककाल** असाच शब्द आहे. शककाल याचा अर्थ शकांचा काळ, असाच अभिप्रेत आहे. **युधिष्ठिराचा शक** ही परिभाषा अलीकडची आहे. युधिष्ठिराचा काळ म्हणजे २५२६ **युत** ( मिळवून, मित नव्हे ) शकांचा काळ असाच याचा अर्थ आहे. शककाळाचा भलताच अर्थ करून रा. करंदीकर चुकले. कदाचित् माझी व कल्हणाची व इतर लोकांचीहि चुकी असेल. हें वचन मूळचें गर्गाचें धरून शकपूर्व. गर्ग असल्यानें शककाळ म्हणजे शाक्यमुनि काळ असा अर्थ करण्याचा प्रयत्न मी केला होता. पण साधारण समजूत शककाल म्हणजे शकांचा इ. स. ७८ चा काळ होय. यापेक्षां या चुकीसंबंधीं ज्यास्त लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

आतां पौराणिक पिढ्यांवरून आपला काळ सिद्ध करण्याचा करंदीकरांचा प्रयत्न कितपत सिद्धीस जात आहे तें पाहूं. या पिढ्या विश्वसनीय आहेत असें प्रथम सांगून बार्हद्रथवंशाच्या ३२ राजांची समष्टि सांगितलेली हजार ही संख्या मान्य करावी. आणि पुढें २२ च राजे सांगितले असले तरी मुख्य मुख्य सांगितले बाकीचे सांगितले नाहींत असें मानावें असें करंदीकर म्हणतात; पण हें म्हणणें त्यांच्या गळ्यांत येतें हें ते विसरतात. कारण ३२ चीं नांवें दिलीं आहेत. तीं बृहद्रथापासून सहदेवापर्यंत १०, आणि सोमापीपासून अरिंजयापर्यंत २२, आणि या २२ ची राज्यवर्षे बेरीज ९९७ सरासरीनें हजार होते, त्यांतील आंकडे फुगवलेले आहेत, म्हणजे यांचा कालावधि कमी करून सुमारें ५०० किंवा ७०० धरावयास पाहिजे. भारतीयुद्धापासून एवंच १५०० वर्षे येत नाहींत तीं काढण्याचा प्रयत्न करंदीकर करीत आहेत. किंबहुना सर्व पुराणांत दिलेला १०१५, १०५०, १११५ हाच आंकडा येतो.

पुराणांचा काळा कोळसा उगाळीत न बसतां आपण कलियुगारंभीं भारतीयुद्ध झालें या सर्वमान्य समजुतीची जुळवाजुळव करंदीकर कशी

करतात तें पाहूं. ते म्हणतात, " संधिकालासह चतुर्युग १२०० वर्षांचें ठरलें, म्हणजे कृत ४८०, त्रेता ३६०, द्वापर २४० आणि कली १२० वर्षे. परंतु हें कधीं ठरलें हें सांगतां येत नाहीं. भारतकालीं ही समजूत होती असें दिसतें. ज्याअर्थी ३१०१ इ. स. पू. वर्षीं कलियुगारंभ होता. त्याअर्थी पुन्हां इ. स. पू. १९०१ वर्षीं कलियुगारंभ होता. भारतीयुद्ध इ. स. पू. १९३६ व्या वर्षीं झालें, तेव्हां ३६ वर्षांनंतर कलियुग लागलें, भारतीयुद्ध द्वापार व कलि यांच्या संधींत झालें. ३६ वर्षांनंतर श्रीकृष्णपरमात्मा निजधामास गेले तेव्हां कलियुगास प्रारंभ झाला असें भागवत १२ स्कंधांत सांगितलें आहे. ' चिंतामणराव वैद्यांच्या लक्षांत १२०० वर्षांचें युगचक्र आलें असतें तर इ. स. पू. ३१०१ मधील कलियुगाशीं मेळ घालतांना जी त्यांची धरसोड झाली आहे ती करण्याचा त्यांजवर प्रसंग आला नसता. गीता समरांगणावर सांगितली, हें सांगून गीता इ. स. पू. २००० च्या पूर्वी जाऊं शकत नाहीं. असलीं परस्परविरोधी विधानें करण्यांत त्यांची मोठी तारांबळ उडाली आहे, ' असो, ही तारांबळ नाहींशी करण्याकरितां करंदीकरांनीं शोधलेला मार्ग किती चुकीचा आहे हें त्यांच्या लक्षांत आलें असतें तर माझी खोटी तारांबळ त्यांनीं कल्पिली नसती असें मला येथें म्हणावें लागतें. ज्यांनीं युगचक्र १२०० वर्षांचें ठरविलें, त्यांनीं कलियुगारंभ ३१०१ इ. स. पू. हा ठरविला नव्हता, आणि ज्यांनीं कलियुगारंभ ३१०१ इ. स. पू. ठरविला त्यांचें कलियुग ४३२००० वर्षांचें असून त्यांच्या मतांत मध्यंतरीं कृतयुग दोन तीनदां येऊन गेलें ही वेडसर कल्पनाच नाहीं. हल्लींचं हें मधलें कलियुग सरल्यानंतर इ. स. पू. ( १९०१–७२० ) ११८१ वर्षीं किंवा त्यानंतर १२०० वर्षांनीं म्हणजे इ. स. १०० या वर्षीं कृतयुग पुन्हां आलें अशी कोणाची कल्पना असल्याचें दिसत नाहीं. किंबहुना यानंतर १२०० वर्षांनीं म्हणजे इ. स. १३०० ताहे हिंदुस्थानावर व दक्षिणेंत जो मुसलमानी अम्मल सुरू झाला तो कृतयुगकाळच म्हणावा लागेल ! ! ! तात्पर्य, करंदीकरांची जी वारंवार चूक होते ती ही कीं, एकाची गाय आणि दुसऱ्याचें वासरूं घेऊन आपल्यास अभिप्रेत दूध काढावयाचें. पूर्वींहि वायुपुराणाच्या वचनांत भागवतपुराणाचा पाठ घेऊन आणि त्याचाहि अर्थ आपल्या पद्रचा लावून आपल्यास इष्ट काळ त्यांनीं काढला. येथेंहि भारतमनुस्मृतीची १२०० वर्षांची युगपद्धति घेऊन ती इ. स. पू. ३१०१ या कलि-

युगारंभाच्या ज्योतिष्यांच्या ४३२०००० च्या युगचक्राशीं लावून आपला काळ सिद्ध करण्याकरितां एक १९०१ इ. स. पू. नवा कलियुगारंभ काढला. खरी गोष्ट अशी म्हणतां येईल कीं, १२०० वर्षांचें युगचक्र मानलें तेव्हांचें वर्ष मानवी नसून दैवीवर्ष ( ३६० मानवी वर्षांचें ) धरलें होतें. भारतकाळानंतर केव्हांहि मध्यंतरीं कृतयुग आलें असें कोणीं मानलें नाहीं, किंवा कोणाच्या अनुभवास आलें नाहीं. कृतयुगाचे आगमनी एक काल्पनिक योग ( सूर्य, चंद्र, तिष्य, बृहस्पति ) भारतांत सांगितला आहे. इ. स. पू. १९०१ व्या वर्षी कलियुग पुन्हां लागलें असें मानून करंदीकर आतांपर्यंत दोन तीन कृतयुगांचें आगमन मानतात, ही माझ्या मतें त्यांची शोचनीय तारांबळ आहे. आतां गीता रणांगणावर सांगितली आणि गीता इ. स. पू. २००० च्या पूर्वी जाऊं शकत नाहीं असें जें मी मानतों त्यांत तारांबळ मुळींच नसून त्याची उत्पत्ति पुढील विवेचनावरून दिसेलच.

पण या मुद्याकडे वळण्यापूर्वी आणखी एक शेवटचा मुद्दा करंदीकरांच्या लेखांत आहे तो सांगून टाकूं. महाभारतांत युद्धाच्या वेळीं दिलेल्या ग्रहस्थितीवरून गणितानें युद्धकाळ काढतां येणार नाहीं हें करंदीकरांचें मत मलाहि मान्य आहे. एक तर सूर्यचंद्राशिवाय इतरांची गति त्यावेळीं ठाऊक नव्हती. आणि साती ग्रहांची आकाशांतली स्थिति युद्धाच्या वेळीं व्यासांनीं पाहून लिहून ठेविली असणें शक्य नाहीं. हे सर्व उल्लेख मागूनचे प्रक्षिप्त आहेत. दुसरे यांतहि नक्की अंश वगैरे दिलेले नाहींत, यामुळें गणित करणें कठिण आहे. तथापि एका गोष्टींत माझा मतभेद आहे. युद्धाच्या पूर्वीच्या कार्तिकी अमावास्येस सूर्यग्रहण पडलें होतें ही गोष्ट तेव्हांपासून लिहून ठेविलेली असणें शक्य आहे. सूर्यग्रहण पूर्व अमावास्येस झालेले अपशकून म्हणून ध्यानांत राहिले असले पाहिजेत. शिवाय यास कांहीं बारीक वेधाची किंवा निरीक्षणाची जरूरी नाहीं. तेव्हां सूर्यग्रहण पडलें होतें हें व्यासोक्त मानून ती कसोटी लावितां बहुमान्य असलेल्या इ. स. पू. ३१०२ च्या वर्षास गणितानें ती बरोबर लागते. ती करंदीकरांच्या काळास लागते किंवा नाहीं हें त्यांनीं सांगितलें नाहीं. बहुधा ती लागत नसावी म्हणूनच करंदीकर सूर्यग्रहण युद्धापूर्वी झालें होतें ही गोष्टहि प्रक्षिप्त मानतात.

मी व सर्व ज्योतिष्यांनीं मानलेला भारतीयुद्धाचा काळ चुकीचा आहे, यासंबंधींचें करंदीकरांचें पुढील विवेचन कितपत टिकतें हें आपण

शेवटीं पाहूं. या विवेचनांतील मोठी चुकी म्हणजे हीच कीं, करंदीकर गीतेचा आणि भारतीययुद्धाचा काळ एक समजतात. युद्धभूमीवर कृष्णानें अर्जुनास केलेला उपदेश संजयानें ऐकिला आणि तो होता तसा त्यानें सांगितला हें गीतेचें हल्लीं स्वरूप असलें तरी हल्लींच्या स्वरूपाची गीता म्हणजे भारतीयुद्धकाळाची ही कल्पना अनैतिहासिक आहे हें मीं पूर्वी सांगितलेंच आहे. गीताकाळ आणि युद्धकाळ एक मानण्यांत करंदीकरांचीच तारांबळ उडाली आहे. हा त्यांचा भलताच भ्रम या सर्व विवेचनांत दिसतो. भारतग्रंथ तिघांनीं कमींत कमी लिहिला, आणि तो इ. स. पू. ३००० ( माझ्या मतें ) किंवा २००० ( करंदीकरांमतें ) पासून इ. स. पू. ३०० पर्यंत रचला गेला, हा निश्चय. अर्थात् कोणता भाग युद्धकाळचा हें कधींच सांगतां येणार नाहीं. सौति जरी म्हणतो कीं, मी जनमेजय सत्रांतून आलों तरी तें खरें नाहीं. त्यांच्यांत २००० वर्षांचें अन्तर. वैशंपायन व्यास शिष्य खरा, परंतु भगवद्गीता ही त्याच वैशंपायनाची म्हणतां येणार नाहीं. युद्धाचा समकालीन व्यास होता असें ऐतिहासिकरीत्या नव्हे तर दन्तकथेनें मान्य आहे; आणि व्यास म्हणजे ऋग्वेदास हल्लींचें व्यवस्थित रूप देणारा वेदव्यास हें निश्चित. यामुळें ऋग्वेदकालापासून तों तहत युद्धकालासुद्धां एकंदर तीन हजार वर्षांतील बदलणारी सर्व परिस्थिति महाभारतग्रंथांत नमूद आहे. यामुळें ग्रंथावरून भारतीयुद्धाचा काळ ठरविणें चुकीचें आहे. भगवद्गीतेचें हल्लींचें स्वरूप ‘ मासानां मार्गशीर्षोऽहं ’ या वाक्यावरून मार्गशीर्षादि मासनावें प्रचारांत आलीं, त्यानंतरचें म्हणजे शं. बा. दीक्षित यांनीं गणितानें ठरविल्याप्रमाणें इ. स. पू. २००० च्या नंतरची गीता हें निश्चित. भारतीयुद्ध त्याच्या पूर्वींचें हेंहि निश्चित्त, पण किती पूर्वींचें हें अन्यप्रमाणांनीं ठरवावें लागेल.

करंदीकर म्हणतात “ भारतात जें तत्त्वज्ञान आहे, धर्मप्रतिपादन आहे, समाजस्थितीचें चित्र आहे तें उपनिषत्कालाशीं जुळते असून ऋग्वेदकाळाशीं जुळत नाहीं, ( पा. ३७ ) पण भारत म्हणजे भारतीयुद्ध नव्हे. ग्रंथाची रचना जर दोनहजार वर्षें होत होतीं तर उपनिषत्कालाचें चित्र त्यात दिसतें यांत नवल काय ? त्याचप्रमाणें ब्राम्हणकालाची छटा भारतीय समाजावर दिसते याचें उदाहरण म्हणून पांच सात गोष्टी पृ. ३७ च्या शेवटीं करंदीकरांनीं सांगितल्या आहेत. “ ऋग्वेदांत इंद्र, अग्नि वगैरे देवता पुढें येतात, तर भारतांत सरस्वती, रुद्र, महादेव इत्यादिकांची स्तुति येत्ये.

प्रारंभींच्याच श्लोकांत नारायण आणि सरस्वती यांना नमन आहे. शतपथ ब्राह्मणांत प्रथम सरस्वतीची स्तुति आली आहे आणि त्यांतच विष्णूचें नारायण हें नांव प्रथम आलें आहे." इत्यादि अनेक विधानें करंदीकर करतात. त्यांचा उपयोग काय ? भारतग्रंथावर शतपथाची आणि उपनिषदांची छाप असणें अपरिहार्य आहे. पण ग्रंथावरून युद्धकाल मुळींच ठरवितां येत नाहीं. येईल तर अशा रीतीनें येईल कीं, भारतग्रंथांत किंवा भारती व्यक्तींच्या चरित्रांत ऋग्वेदकालीन स्थिति दिसत आहे कीं नाहीं ? दिसत असेल तर हें सिद्ध होईल कीं, ऋग्वेदकालीन स्थितीपासून ब्राह्मण, उपनिषदें, वेदांगें वगैरेंतून बुद्धकालापर्यंतची सर्व स्थिति महाभारतांत व्यक्त, होत आहे आणि म्हणून भारतीयुद्ध आरंभींच्या स्थितीशींच संलग्न आहे. या दृष्टीनें आपण भारती व्यक्तींच्या चरित्राकडे व भारतीयुद्धपरिस्थितीकडे पाहूं.

प्रथम ही गोष्ट सांगितली पाहिजे कीं, ऋग्वेदकालीन स्थिति सुद्धां भारताप्रमाणें दोनहजार वर्षांवर पसरली आहे. ऋग्वेदाचें शेवटचें स्वरूप व्यासाच्या हातचें आहे, या दन्तकथेंत तथ्य आहे. इ. स. पू. ५००० पासून सुमारें इ. स. पू. ३१०० पर्यंत जीं जीं ऋषींचीं सूक्तें " जुनीं व नवीन निरनिराळया कुळांत प्रचलित होतीं तीं एके ठिकाणीं मंडळविभागांत संगृहीत करून व्यासानें हल्लींचा ऋग्वेद तयार केला. अर्थात् यांत दोनहजार वर्षांतील स्थित्यंतरें प्रतिबिंबित आहेत. व्यासाचा काळ ३१०० इ. स. पू. असा निश्चित ठरतो. कारण ऋग्वेदाच्या हल्लींच्या स्वरूपाचें ऋचांच्या संख्येसह परिगणन शतपथ ब्राह्मणांत आहे. आणि या शतपथब्राह्मणाच्या पूर्वभागाचा रचनाकाळ इ. स. पू. ३००० असा शं. बा. दीक्षित यांनीं 'कृत्तिका थेट पूर्वेस उगवतात' या त्यांतील ज्योतिर्विषयक उल्लेखावरून ठरविला आहे; तो कोणीहि अद्याप खोडून काढला नाहीं. शतपथ पूर्वार्धाचा काळ कृत्तिकादि गणनेवरून इ. स. पू. २३२० पासून १९०० पर्यंत करंदीकर ठरवितात, ही एक त्यांची मोठी चूक आहे. **शं. बा. दीक्षित शतपथाचा काळ २३२० देत नाहींत; इ. स. पू. ३००० देतात.** व्यासाचा शिष्य वैशंपायन, त्याचा भाचा याज्ञवल्क्य यानें शतपथ ब्राह्मण आणि शुक्ल यजुर्वेद रचला; अर्थात् व्यासाचा काळ शतपथापूर्वी १०० वर्षें म्हणजे इ. स. पू. ३१०० हाच ग्राह्य दिसतो. याच वेळीं जर पांडव आणि श्रीकृष्ण होते तर ऋग्वेदांत कृष्णाचें किंवा नारायणाचें नांव नाहीं यांत आश्चर्य

नको. कृष्णभक्ति पुढें वाढून त्यास विष्णूचा अवतार समजून नारायणादि नांवें तेव्हांपासून प्रचारांत आलीं यांत नवल काय ? पण शतपथांत जर नारायण नांव आणि सरस्वतीचा उल्लेख आहे, तर व्यासाच्या भारताच्या आदि श्लोकांत सरस्वती आणि नारायण आले तर त्यांत बिघडतें कोठें ? मुख्य मुद्दा सांगण्याचा हा कीं, ऋग्वेद कालाच्या अन्तीं म्हणजे ऋग्वेद रचना झाल्या वेळीं भारतीयुद्ध झालें; यामुळें **ऋग्वेद काळाच्या अंतीं** जी परिस्थिति होती तिचा परिणाम भारतीवीरचरित्रांत दिसला पाहिजे आणि तो तसा दिसतो. पण ऋग्वेदकालीन २००० वर्षांवर पसरलेली स्थिति समग्र दिसणें अशक्य आहे.

इंद्रादि देवता ब्राह्मणकाळांत मागें पडल्या आणि विष्णु व शिव या पुढें झाल्या हें निर्विवाद आहे. त्याप्रमाणें महाभारतांतहि होणें अपरिहार्य होय. पण पांडवांची उत्पत्ति वैदिकदेवतांपासून मानली गेली हें लक्षांत ठेवलें पाहिजे. धर्म यमाचा पुत्र आणि यम म्हणजे धर्माचा अधिपति वेदांत आहे. अर्जुन सर्वांत पराक्रमी वीर इंद्राचा पुत्र, किंबहुना अर्जुन हें नांव वेदांत इंद्राचेंच आहे. भीम वायूचा पुत्र आणि नकुल सहदेव अश्विनींचे. अश्विनींचें महत्व वेदांत जास्त आहे. ब्राह्मणकाळांत नाहीं. श्रीकृष्ण विष्णूचा अवतार मानला आहे आणि विष्णु ही वैदिक देवता आहे. दुसरें, भारतकालीन लोकांत जुगाराचें व्यसन स्पष्ट दिसतें. हें व्यसन ऋग्वेदकालीन आहे. ज्याप्रमाणें युद्धास बोलावलें असतां नाहीं म्हणावयाचें नाहीं, त्याप्रमाणें द्यूतास बैस म्हटलें असतां नाहीं म्हणणें क्षत्रिय पुचाटपणाचें लक्षण मानीत; हा प्रकार ऋग्वेदकालीन होय, ब्राह्मणकालीन नव्हे. तिसरें, सर्वांनीं वडील भावाच्या आज्ञेंत गुलामाप्रमाणें राहावयाचें, त्यांस पणासहि लावण्याचा त्याचा अधिकार असे, ही ऋग्वेदकालीन परिस्थिति. चवथें, पांच नवरे करण्याची आर्यांत असलेली चाल ब्राह्मणकालची खास नव्हे. पांचवें, जरासंध पुरुषमेध करणार होता, ही गोष्ट ऋग्वेदकालीन; ब्राह्मणकालीन नव्हे. क्षत्रिय वेदविद्येंत आणि यज्ञकर्मांत निष्णात धर्मासारखें असणें ही परिस्थिति ऋग्वेदकालीन, ब्राह्मणकालीन नव्हे. अशा ज्या कित्येक विशिष्ट गोष्टी ऋग्वेदकालीन नजरेस येतात त्या ब्राह्मणकालाच्या अन्तीं घडलेल्या वृत्तांत कल्पनेनें सुद्धां येणें शक्य नाहीं. ज्या काळीं जें प्रचलित असतें तेंच प्रशस्त व्यक्तींच्या चरित्रांत कल्पिलें जातें. तात्पर्य, या बीजभूत खुणांनीं भारतीयुद्ध ऋग्वेदकालाच्या अंतीं झाल्याचें दिसून येतें.

असूर शब्दाबद्दल करंदीकर स्वतःच म्हणतात कीं, ऋग्वेदकालाच्या अखेरी–अखेरीस तो शब्द निंदावाचक झाला होता. या अर्थानें तो शब्द १५ ठिकाणीं ऋग्वेदांतच आला आहे. तेव्हां भारतांत व गीतेंत आसुर आणि दैव शब्द वाईट आणि चांगला या भावनेनें आले आहेत यांत अश्चर्य काय ? पण गीता जर उपनिषत्कालानंतरची ठरलीच आहे, तर त्यांत आसुर शब्द वाईट अर्थानें निश्चयानें येणार, त्याचा भारतीयुद्धकालाशीं संबंध नाहीं. भारतीयुद्धकाळ आणि गीताग्रंथकाळ करंदीकर एक मानतात म्हणूडच ही चुकी झाली आहे. हींच चुकी भयंकर रीतीनें वाढवून करंदीकर पुढें लिहितात " भारती युद्धकाळ इ. स. पू. ३१०१ मानला तर रामायणाचा काळ ५०० । ६०० वर्षे मागें नेला पाहिजे; म्हणजे त्याचा काळ इ. स. पू. ३७०७ पर्यंत गेला, म्हणजे ऋग्वेदकाळ पुन्हा त्याच्या मागें लोटावा लागेल; कारण ऋग्वेदाचा काळ रामावताराच्याहि बराच पूर्वींचा काळ होय." यांतील एकेक वाक्य आश्चर्योत्पादक आहे. रामायण काव्याचा काळ म्हणजे रामाचा काळ नव्हे, कां रामायण रामाच्यापूर्वीं भविष्यरूपानें वाल्मिकीनें सांगितलें असेंच करंदीकर मानतात ! तें असो. ऋग्वेदकाळहि रामाच्या पूर्वींचा नव्हे. राम ऋग्वेदकालीन राजा आहे. ऋग्वेदरचना व्यासकृत झाली, त्यापूर्वीं म्हणजे कृष्णापूर्वीं तो ५००, ६०० वर्षें खरोखरच झाला असावा. कारण त्याचा उल्लेख एका ऋग्वेदसूक्तांत आहे ( ऋ. १० म. ९३ सूक्त ). राम ऋग्वेदकालीन आहे; आणि ऋग्वेदरचना श्रीकृष्णाच्या वेळेस झाल्यानें त्याचा उल्लेख ऋग्वेदांत नाहीं ही साहजिक गोष्ट झाली. रामांत आणि कृष्णांत पांच सहाशें वर्षांचें अंतर मानतात तें योग्य आहे. करंदीकर म्हणतात त्याप्रमाणें राम इ. स. पू. ३७०० च्या सुमारेंच झाला. त्याच वेळीं ऋग्वेदांतील कित्येक सूक्तांची रचना झाली, यांत कांहीं कोठें चुकलें नाहीं, हें रा. करंदीकरांनीं पुन्हा तपासून पहावें.

भारतांतील किंवा गीतेंतील सांख्ययोगादि तत्त्वज्ञानावरून भारतीयुद्धाचा काळ ठरविणें चुकीचें आहे. कारण भारत दोन तीन हजार वर्षें बनत आलें आहे आणि भगवद्गीता आहे तशी भारती युद्धाच्या वेळीं सांगितली गेली हें विधान ऐतिहासिक नव्हे. तथापि भारतांतील व्यक्ति कोणत्या प्राचीन ग्रंथांत उल्लेखित आहेत हें पाहून त्यावरून कोणता काळ येतो हें पाहाण्यासारखें आहे. सर्वांत मुख्य व्यक्ति श्रीकृष्ण त्याचा उल्लेख वेदांत येणें शक्य नाहीं हें वर सांगितलेंच आहे. पण त्याचा उल्लेख छांदो-

ग्यांत आहे. ' कृष्णाय देवकीपुत्राय ' अशा रीतीचा स्पष्ट उल्लेख त्यांत आहे. आतां करंदीकरांचींच प्रमाणें घेतां त्यांचा काळ कसा चुकतो तें दाखवितां येतें. " बृहदारण्य, छान्दोग्य, तैत्तिरीय, ऐतरेय, कौषीतकी, केन, कठ, मुंडक, श्वेताश्वेतर, महानारायण, प्रश्न, माण्डूक्य असा ( उपनिषदांचा ) कालक्रम बहुतेक संशोधकांनीं मान्य केला आहे, ( ईश प्रथम कसें घातलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें. ) ( पृ. ३९ )......भगवद्गीता व उपनिषदें यांची तुलना केली असतां बृहदारण्यकापासून कौषीतकीपर्यंतचीं उपनिषदें गीतेच्या पूर्वींचीं दिसतात. आणि मैत्रायणी गीतेच्या नंतरचें दिसतें. " आणि मैत्रायणीचा काळ इ. स. पू. १९०० धरून गीतेचा सुमारें १९५० मानून भारती युद्धाचा काळ जवळ जवळ तोच करंदीकर कायम करतात. पण मैत्रायणी जर १९०० इ. स. पू., तर छांदोग्य तत्पूर्वीं दोनतीनशें वर्षें धरलें पाहिजे आणि त्यांत कृष्ण देवकी-पुत्राचा उल्लेख आहे, त्यास शंभर वर्षें तरी पूर्वीं धरलीं पाहिजेत; म्हणजे कृष्णाचा काळ कमींत कमी २३०० इ. स. पू. ठरतो. येथें भगवद्गीतेची आणि श्रीकृष्णाची ताटातूट निदान दोनशें वर्षांनीं होते. येथें करंदीकर म्हणतील ( नेहमींप्रमाणें ) छान्दोग्यांतील कृष्ण देवकीपुत्र भारतीयुद्धांतील गीतोपदेश करणारा नव्हे. मॅकडोनेलनेंहि ऋग्वेदाच्या उपनिर्दिष्ट ऋचेंतील पृथुवेन राजांबरोबर उल्लेखिलेला राम, अयोध्याधिपति राम नव्हे तर एक अनिर्देश्य मनुष्य होता असें म्हटलें आहे. तसेंच छान्दोग्यांतील ' कृष्णाय देवकीपुत्राय ' हे शब्द एक अनिर्देश्य मनुष्यवाचक आहेत असें करंदीकर म्हणतील तर म्हणोत. कोणासहि तसें वाटणार नाहीं, एवढेंच सांगून दुसऱ्या व्यक्तीकडे वळू.

दुसरी व्यक्ति व्यास. यानें हल्लींचें तीन वेदांचें स्वरूप कायम केलें अशी परंपरा. याचा शिष्य वैशंपायन, याचा भाचा याज्ञवल्क्य. यानें मामापाशीं यजुर्वेदाचें अध्ययन केलें. पुढें मामाशीं तंटा झाल्यानें त्याचा (कृष्ण) यजुर्वेद टाकून देऊन नवीन ( शुक्ल ) यजुर्वेदाची व शतपथाची रचना त्यानें केली; अशी परंपरागत कथा. शतपथ पूर्वार्ध काळ माझ्या मतें इ. स. पू. ३००० आहे. पण करंदीकर म्हणतात त्याप्रमाणें तो काळ इ. स. पू. २३०० सुमारें घेऊं ( पृ. ३८ ). अर्थात् व्यासाचा काळ इ. स. पू. २४०० सुमार येतो आणि कृष्ण व व्यास बरोबरचे दन्तकथेंत आहेत. तेव्हां भारतीयुद्ध सुमारें इ. स. पू. २५०० ठरतें. म्हणजे गीतेच्या व भारती-

युद्धाच्या करंदीकरांनीं ठरविलेल्या इ. स. पू. १९३६ या काळाच्या पूर्वीं तीन चारशें वर्षें व्यास जातो. यावरहि उत्तर पूर्वींचेंच देतां येईल. ' वेदं विव्यास यस्मात्स वेदव्यास इतीरितः ' हा व्यास निराळा आणि युद्धावेळीं असलेला धृतराष्ट्रपाण्डुपिता व्यास निराळा. हें उत्तर ज्याला मान्य असेल त्यानें मानावें. मला व पुष्कळांना तें मान्य होणार नाहीं. कृष्ण आणि व्यास या एकेकच व्यक्ति होत्या, आणि शतपथब्राह्मणाच्या कोणत्याहि भागाच्या रचनेच्या पूर्वीं व्यास व भारती युद्ध झालें, हाच सिद्धान्त सयुक्तिक आहे.

तिसरी व्यक्ति जनमेजय, हा परिक्षिताचा पुत्र. याचे तीन भाऊ श्रुतसेन, उग्रसेन, भीमसेन. या चौघांचा उल्लेख महाभारतांत आरंभींच आहे. यानेंच सर्पसत्र केलें आणि तेथें भारत प्रथम वाचविलें. परिक्षिताचा जन्म आणि भारतीयुद्ध एक–काळ, चार महिन्यांचा फक्त फरक. परिक्षित ५० व्या वर्षीं मेला ( ३६ व्या वर्षीं पांडव त्यास राज्यावर बसवून हिमालयांत गेले ) असें धरून सर्पसत्र जनमेजयानें सुमारें दहा वीस वर्षांनीं केलें असें धरलें तर भारतीयुद्धानंतर ७० वर्षांनीं भारताचें प्रथम पठण झालें. नंतर जनमेजय व त्याचे तीन भाऊ यांनीं चार अश्वमेध केले. अर्थात् याचा काळ आपण युद्धानंतर ८० । ९० वर्षांनीं घेऊं. या चार जनमेजयादि परिक्षित-पुत्रांचा उल्लेख शतपथब्राह्मण उत्तरार्ध ( कांड १३ ) मध्यें आहे. अर्थात् हें उत्तरार्ध जनमेजयानंतरचें निश्चित होतें. शतपथ पूर्वार्द्धाचा काळ इ. स. पू. ३००० दीक्षितांनीं ठरविला आहे. उत्तरार्ध फार झालें तर शे-दोनशें वर्षांनन्तरचें मानतां येईल. तेव्हां उत्तरार्धाच्यापूर्वीं भारतीयुद्ध ३०० वर्षांचें मानण्यास हरकत नाहीं. करंदीकरांनीं शतपथ पूर्वार्धाचा काळ इ. स. पू. २३०० सुमार मानला आणि उत्तरार्ध भारतीयुद्धानंतर मानून दोहोंमध्यें भारतीयुद्ध धरलें आहे. करंदीकरहि पूर्वार्धानंतर उत्तरार्ध तीनशें वर्षांपेक्षां जास्त मानीत नाहींत आणि उत्तरार्ध सुमारें इ. स. पू. १९०० धरून भारतीयुद्ध इ. स. प. १९३६ चें मानतात. पण मूळ पूर्वार्धाचेच काळांत त्यांची मोठी चुकी पुढें दाखविल्याप्रमाणें झाली असल्यानें शतपथ उत्त-रार्द्ध इतका अलीकडे ते ओढतात. वास्तविक पूर्वार्ध इ. स. पू. ३००० आणि उत्तरार्ध इ. स. प. २६०० च्या अलीकडे येऊं शकत नाहीं, अर्थात् उत्तरार्धांत जनमेजयाचा उल्लेख असल्यानें भारतीयुद्ध इ. स. पू. २६०० च्या अलीकडे येऊं शकत नाहीं, पूर्वीं केव्हां तरी झालें असेंच ठरतें. लोकमान्य टिळक भारतीयुद्ध इ. स. पू. १५०० च्या सुमारें

मानीत, त्यामुळें जनमेजय पांडवांचा पणतु यांनतर असला पाहिजे. याचा उल्लेख शतपथोत्तरार्धांत कसा ? हें कोडें लोकमान्यांना सोडवावें लागलें. तें त्यांनीं नेहमींप्रमाणें शतपथांतील जनमेजय पांडवांचा पूर्वज असें मानून सोडविलें. पण शतपथांत जनमेजयाचे तीनच भाऊ सांगितले आहेत. आणि पूर्वज जनमेजयाचे महाभारतांत सहा भाऊ सांगितले आहेत, इत्यादि अडचणी मीं त्यांना दाखविल्या होत्या. करंदीकरांनीं शतपथांतील जनमेजय हा पांडवांचा पणतु हें मान्य केलें आहे व त्याच्या पुष्ट्यर्थ एक वायुपुराणांतून नवीन वचन दाखवून जनमेजय वाजसनेयांचा आश्रय देणारा होता व त्यांच्या पद्धतीनें त्यानें अश्वमेध केले वगैरे दाखविलें आहे, तें मान्य करण्यास हरकत नाहीं. कारण पांडवांचा नातु ( पणतु अभिमन्यूला धरून ) जनमेजय आणि व्यासाचा नातु शिष्य याज्ञवल्क्य, वाजसनेयसंहिता रचणारा समकालीन येतात. तेव्हां जनमेजयानें शुक्ल–यजुर्वेदपद्धतीनें अश्वमेध केले असणें शक्य आहे. तेव्हां जनमेजय शतपथांतील पांडव–पणतु हें योग्यच करंदीकर म्हणतात. त्यांनीं भारतीयुद्ध इ. स. पू. १५०० वरून इ. स. पू. २००० वर नेलें आणि कृत्तिकादि गणनेची गांठ त्यांशीं घातली. त्यांनीं ही चूक केली नसली तरी शतपथाच्या काळाची चूक करून शतपथ पूर्वार्ध व उत्तरार्ध दोघांस ओढून इ. स. पू. २००० चे मागें पुढें बसविलें. खरें पाहिलें असतां हे काळ इ. स. पू. ३००० जवळ गेले पाहिजेत. आणि जनमेजय शतपथोक्त पांडव पणतु असल्यानें भारतीयुद्धाचा काळ इ. स. पू. ३१०० हाच ठरतो.

दुसरी चुकी करंदीकरांच्या म्हणण्याप्रमाणेंच उत्पन्न होते ती अशी. सर्व उपनिषदांत बृहदारण्यास त्यांनीं जुनें ठरविलें आहे आणि तें कांहीं चुकीचें नाहीं. बृहदारण्यापासून कौषीतकीपर्यंतचीं उपनिषदें गीतेपूर्वींचीं आणि गीता मैत्रायणीपूर्वींची. मैत्रायणीचा १९०० इ. स. पू. काळ धरून गीतेचा १९५० इ. स. पू. आणि भारती युद्धाचा जवळ जवळ तोच काळ असें त्यांचें म्हणणें. पण गीता १९५० इ. स. पू. तर बृहदारण्यक निदान दोनशें वर्षें तरी अगोदर धरलें पाहिजे. आणि त्या बृहदारण्यकांत पारीक्षितांचा उल्लेख, तेव्हा जनमेजय त्यापूर्वी निदान ५० वर्षें आणि त्यापूर्वी ७० वर्षें भारतीयुद्ध. अर्थात् भारती युद्धाचा काळ इ. स. पू. २३०० सुमारास येतो, हें करंदीकरांच्या म्हणण्याप्रमाणें प्राप्त येतें, म्हणजे गीतेचा

काळ व भारतीयुद्धाचा काळ जवळजवळ नसून त्यांत निदान ३०० वर्षांचें अंतर पडलें पाहिजे. म्हणजे भारतीयुद्धाचा काळ इ. स. पू. २३'१० इतका मागें जातो.

( येथें 'चत्वरो मनवः पूर्वे ' याची नवीन उपपत्ति ( पृ. ३९ ) करंदीकरांनीं दिली आहे, त्याचें परीक्षण करूं. हजार वर्षांचें युग, यालाच करंदीकर मन्वंतर म्हणतात, हें आश्चर्य आहे. आणि इ. स. पू. १९३६ च्या युद्धकाळीं ४ मनु होऊन गेले होते, असें सिद्ध करण्यासाठीं मेग्यास्थेनीसनें दिलेलीं ६७७६ वर्षें डायानिसाचीं घेऊन तेव्हांपासून दर १००० वर्षांप्रमाणें चार मनु होऊन गेले असें जुळवतात. वाटेल तें प्रमेय घेऊन वाटेल तें जुळवतां येईल. मन्वंतर म्हणजेच चतुर्युग हें प्रथम प्रमेय पदरचें, आणि डायानिसाचा मेग्यास्थेनिसनें दिलेला ( पुराणांनीं किंवा ज्योतिषांनीं नव्हे ) काळ दुसरें प्रमेय, वडाची साल पिंपळाला. या दोन प्रमेयांवरून इष्ट सिद्धान्त बरोबर निघाला. यापेक्षां जास्त लिहिण्याची अवश्यकता नाहीं. )

चौथी भारतीय व्यक्ति जिचा उल्लेख वैदिक ग्रंथांत येतो, ती धृतराष्ट्राची होय, धृतराष्ट्र—वैचित्रवीर्याचा उल्लेख तैत्तिरीय ब्राह्मणांत आहे, पण त्यावरून तैत्तिरीयाच्या पूर्वी तो होता हें सिद्ध झालें तरी तैत्तिरीयाचा काळ शतपथाप्रमाणें निश्चित नसल्यानें व किती पूर्वी धृतराष्ट्र हें निश्चित नसल्यानें या उल्लेखाचा उपयोग होत नाहीं.

या नंतर वैदिकप्रमाण म्हणून जें प्रमाण पुढें मांडलें आहे आणि जें अत्यन्त महत्त्वाचें आहे त्याकडे मी वळतों. ऋग्वेदांतील देवापीच्या सूक्तावर हा देवापि कौरव शन्तनूचा भाऊ असा प्राचीन इतिहास ऋग्विधान ग्रंथांत दिला आहे. महाभारतांतहि प्रतीपाचा पहिला पुत्र देवापि हा अरण्यांत गेला आणि दुसरा पुत्र शंतनु हा राजा झाला, शंतनूचा भीष्म अशी वंशाची माहिती दिली आहे. ऋग्वेदाचा रचनाकाळ इ. स. पूर्व ३१०० शतपथांत ऋग्वेदाच्या सूक्तसंस्था ऋचासंख्या बरोबर दिल्या असल्यानें ठरतो. निदान शंभर वर्षें शतपथापूर्वी ऋग्वेद हल्लींचा लावला गेला हें सिद्ध आहे. यांतील देवापीचें सूक्त दशममंडळांतील अगदीं शेवटचें मानलें तरी इ. स. पू. ३२०० सुमारचें ठरून शंतनूचा तो काळ ठरतो अर्थात भीष्माचा व भारतीयुद्धाचा काळ इ. स. पू. ३१०१ चा योग्यच येतो असें माझें अधिकरण आहे. यावर करंदीकरांनीं ठराविक उत्तर दिलें; म्हणजे हा सूक्त-

कार देवापि आणि शंतनूचा भाऊ देवापि एक नव्हत. करंदीकर म्हणतात, " ऋग्वेदांतील देवापि भीष्मपिता शंतनु याचाच भाऊ असें सिद्ध करण्यास ऋग्वेदाच्या त्या ऋचेंत (सूक्तांत) कांहीं अधार नाहीं. यास्काचार्यांनीं स्वकल्पनेनें हा संबंध जोडला आहे. यास्कानें वडाची साल पिंपळाला जोडली. शिवाय आख्यायिकांवरून शंतनूचा बंधु देवापि हा वेदमत न मानणारा होता. तो ऋग्वेदांतील सूक्तकार असणें शक्य नाहीं. " ही देवापीची आख्यायिका कोठली याला आधार करंदीकरांनीं दिला नाहीं. आणि यास्काची आख्यायिका खोटी, तर ही आख्यायिका खरी कशावरून? दुसरें यास्काला पूर्वपरंपरा ठाऊक होती, त्यानें वडाची साल पिंपळाला लावली हें म्हणणें करंदीकरांस शोभत नाहीं. एवढेंच नव्हे, महाभारत उपसंहार पृ. १४७ वर सांगितल्याप्रमाणें देवापि शंतनूचा भाऊ असल्याचा उल्लेख ऋग्विधानांत आणि हें ऋग्विधान शांडिल्योक्त आहे. यांत शंतनूच्या राज्यांत अवर्षण पडलें तेव्हां त्यानें आपल्या भावास बोलावून पर्जन्याची स्तुति त्याजकडून करविली आणि पाऊस पडला अशी आणखी कथा आहे तेंच हें पर्जन्यसूक्त आहे. सूक्तांत देवापीचेंहि नांव नाहीं, तेव्हां सूक्त देवापीचें कशावरून तर ऋग्विधावरून. ऋषिगणनावरून अमक्या सूक्ताचा कर्ता अमुक ही परंपरागत माहिती मान्य करावी लागेल. शिवाय वरील आख्यायिकेवरून देवापि हा वेदमत मानणारा नव्हता ही आख्यायिका असल्यास खोटी ठरते किंवा त्याचा अर्थ निराळा करावा लागेल. देवापीच्या सूक्तावरून व त्याच्या शंतनूशीं सांगितलेल्या संबंधावरून ऋग्वेदरचनेनंतर १०० वर्षांनीं सुमारें भारतीयुद्ध झालें, हें अनुमान मीं काढलेलें नसून पारगिटरनें प्रथम काढलेलें मीं मान्य केलें आहे. ऋग्वेदरचना-काळ शतपथावरून ठरतो, कारण शतपथाचा काळ ज्योतिष उल्लेखावरून शं. बा. दीक्षित यांनीं ३००० इ. स. पू. ठरविला आहे, तो हालूं शकणार नाहीं. तो पाश्चात्य पंडित अलीकडे ओढतात यामुळें त्यांच्या मताला हीनत्व येतें.

देवापीच्या वैदिक प्रमाणाशिवाय मीं स्वतः दुसरें प्रमाण काढलेलें सोमक–सहदेवपुत्राविषयींचें होय. एका ऋग्वेद सूक्तांत 'सोमकः साहदेव्यः' असा स्पष्ट निर्देश आहे. सहदेव-पुत्र सोमक यानें नारदपर्वत यांच्या सांगण्यावरून विशिष्ट विधानानें सोमरस काढला म्हणून त्यास कीर्ति मिळाली, अशी कथा ऐतरेय ब्राह्मणांत आहे. सोमक आणि पांचाल एक, हें महाभार-

तांतील अनेक ठिकाणच्या उल्लेखांवरून दिसतें. या प्रमाणावर मात्र हा सोमक सहदेव पांचाल सोमक नसून दुसरा कोणी आहे असा आक्षेप करंदीकरांनीं घेतला नाहीं, हें भाग्यच म्हणावयाचें. त्यांचें म्हणणें असें कीं, एवढ्यावरून ऋग्वेदकाळानंतर १००-१५० वर्षांनीं भारतीयुद्ध झालें असें अनुमान काढणें धाडसाचें आहे. पण धाडस कसचें? उपसंहारांत दाखविलेंच आहे कीं, ( पृ. १४८ ) हरिवंशांत पांचालांची वंशावळ सहदेव, सोमक, जन्तु, पृषत्, द्रुपद अशी दिली आहे. अर्थात् सहदेवानंतर किंवा सोमकानंतर साधारणपणें ३० वर्षांची पिढी घेतां द्रुपद १०० वर्षांनीं झाला, आणि भारतीयुद्ध १५० वर्षांनीं झालें असें ठरतें. ऋग्वेद सूक्ताचा काळ कोठेंहि ठरला नसला तरी सदरील ऋग्वेदसूक्तानंतर भारतीयुद्ध १५० वर्षांनीं झालें हें निश्चित. आणि ऋग्वेदरचना म्हणजे ऋग्वेदाची जुळवणी अमुक वर्षीं झाली हें निश्चयानें ठरवितां आलें तर भारतीयुद्धाचा काळ निश्चित ठरवितां येईल. तात्पर्य, **अमुक वैदिक सूक्त शक पूर्व वर्षीं झालें असावें असें निश्चयानें म्हणतां येईल.** "ऋग्वेदांतील पुराव्याला निश्चित आधार नाहीं आणि कालनिर्णयाच्या कामीं तो पुरावा फारच डळमळीत आहे." हें करंदीकरांचेंच म्हणणें निःसंशय धाडसाचें आहे असें मी म्हणतों व त्याचें स्पष्टीकरण असें:—

ऋग्वेदादि वैदिक पुरावा आणि पुराणांचा पुरावा पुढें आला असतां वैदिक पुरावा ग्राह्य हें निश्चित आहे. श्रुति-स्मृति-विरोधे श्रुतिरेव बलीयसी श्रुति-पुराण-विरोधेच श्रुतिः सुतरां बलीयसी हा सिद्धान्त जसा धर्मशास्त्र विषयांत आहे तसा इतिहासांतहि आहे. कारण पुराणांचीं वचनें बहुधा पाठभेदानें अनिश्चित आणि कोठें काय केव्हां घुसडलेलें असेल याचा नेम नाहीं. त्यांत भविष्यद्राजवचनें तर फारच संशयित, व्हिक्टोरियाराणीपर्यंत आलेलीं. अशा पुराण-वचनांचा वैदिकपुराव्याशीं स्पष्ट विरोध आला असतां तीं ऐतिहासिक विचारांतहि त्याज्य आहेत. कारण वैदिक पुराव्यांत प्रक्षिप्त किंवा विक्षिप्त ( पाठभेदानें ) असें कांहींच नाहीं. हा असा मजबूत पुरावा काय सांगतो तें पाहूं. ऋग्वेद मांडणी व्यासांनीं केली. या मांडणीनंतर शतपथ ब्राह्मण निःसशय लिहिलें गेलें, कारण त्यांत हल्लींच्या ऋग्वेद मांडणीचा स्पष्ट, ऋचा-संख्यासह, उल्लेख आहे. हें शतपथ 'कृत्तिका प्राच्यै दिशो न च्यवन्ते' कृत्तिका थेट पूर्वेस उगवतात; असें म्हणतें. हा काळ शं. बा. दीक्षितांनीं इ. स. पू. ३००० ठरविला आहे. अर्थात् ऋग्वेद

मांडणी इ. स. पू. ३००० च्या पूर्वीची. ऋग्वेदांतील सूक्तांत देवापि आणि साहदेव्य सोमक यांचा उल्लेख आहे; पण श्रीकृष्ण किंवा पांडव यांचा नाहीं. आणि शतपथांत जनमेजय परीक्षित–पुत्र याचा उल्लेख आहे. देवापि आणि सोमक हे पांडव आणि द्रुपद यांचे तीन पिढ्या पूर्वज आणि जनमेजय पांडवांचे तीन पिढ्यांचे वंशज. अर्थात् भारतीयुद्ध ऋग्वेदरचने-नंतर शतपथ रचनेपूर्वी झालें. म्हणजे इ. स. पू. ३००० च्या सुमारें १०० वर्षें पूर्वीं झालें हा निश्चय होतो.

शतपथ–ब्राह्मणाचा काळ इ. स. पू. ३००० हा शं. बा. दीक्षितांनीं दिलेलाच मीं घेतला असून त्यांच्याच पुस्तकाच्या आधारानें करंदीकर यानीं इ. स. पू. २३२० सुमार दिला आहे. किंबहुना शतपथ पूर्वार्द्धाचा ( वरील विवेचनांत शतपथ पूर्वार्द्धाचाच उल्लेख आहे ) काळ आणखीहि अलीकडे ते ओढतात " अत एव शतपथ ब्राह्मणाचा काळ इ. स. पू. २३२० पासून इ. स. १९०० पर्यंत कोणताहि असूं शकेल. " असें त्यांनीं लिहिलें आहे. शं. बा. दीक्षित यांच्या भारतीय ज्योतिषाचा इतिहास पृष्ठ १२८ चा हवाला देऊन " दीक्षितांनीं कृत्तिकांत वसंत संपात असल्याचा काळ २३२० इ. स. पू. दिला असल्यानें आणि वैद्याचा भारतीयुद्धाचा काळ यावरच अवलंबून असल्यानें त्यांनीं हा काळ इ. स. पू. २००० च्या सुमारास ओढून आणला पाहिजे " असेंहि स्पष्ट करंदीकर लिहितात. तेव्हां मी दीक्षितांचें म्हणणें भलतेंच समजलों असें वाटून त्यांचा ग्रंथ मीं मुद्दाम काढून पाहिला, तों करंदीकर भलतेंच समजले आहेत असेंच दिसून आलें. भा. ज्यो. इ. पान १२८ वर दीक्षित लिहितात "शतपथांत कृत्तिका पूर्वेस उगवतात असा वर्तमान काळीं प्रयोग आहे. हल्लीं उत्तरेस उगवतात. श. पू. ३१०० च्या पूर्वीं दक्षिणेस उगवत होत्या. यावरून शतपथ ब्राह्मणाच्या ज्या भागांत हीं वाक्यें आहेत तो ( पूर्वार्ध ) भाग श. पू. ३१०० सुमारें लिहिला गेला होता हें सिद्ध होतें. "

कृत्तिकांचें पूर्वेस उगवणें आणि कृत्तिकेंत वसंत संपात असणें या गोष्टी निराळ्या आहेत. ही दुसरी गोष्ट करंदीकर घेऊन चालतात ही त्यांची विल-क्षण चूक झाली आहे. कृत्तिकेंत वसंत संपात असण्याचा काळ दीक्षितांनीं लागलीच पुढें इ. स. पू. २३३० दिला आहे तो कृत्तिका सायन भोग शून्य केव्हां होता त्यावरून काढला आहे. पण येथें लागलीच दीक्षितांनीं असें लिहिलें आहे कीं, कृत्तिकादि नक्षत्रगणना कृत्तिकेंत संपात होता यावरून निघा-

लेली नाहीं. कारण तैत्तिरीय संहितेंतहि कृत्तिकादि गणना आहे. तेव्हां ही गणना वेदकालीन असल्यानें तिचा काळ इ. स. पू. २३२० इतका अलीकडे येऊं शकत नाहीं; पान १२९ वर दीक्षित स्पष्ट लिहितात कीं, कृत्तिका थेट पूर्वेस उगवतात, हें वाक्य शंभर दोनशें वर्षे ठीक लागू पडेल. यामुळें इ. स. पू. ३००० हाच काळ निश्चित आहे ( तो २३२० इतका अलीकडे येऊं शकत नाहीं ) आणि **कृत्तिकादि गणनेचें कारण कृत्तिकांचें पूर्वेस उगवणें हेंच आहे**. तैत्तिरीय संहिता शतपथ ब्राह्मणापूर्वींची असली पाहिजे तींत कृत्तिकादि नक्षत्रें आहेत, तेव्हां तिचा काळ याहून शें दोनशें वर्षे प्राचीन असावा" ( व्यासानें तीन्ही वेदांची मांडणी केली ही समजूत बरोबर आहे ) एकंदर वेदकाळ हाच असावा असें सांगून दीक्षित आणखी म्हणतात. "ऋग्वेदसंहिता शतपथ ब्राह्मणाहूनहि प्राचीन, त्यांत कृत्तिकादि नक्षत्रें नाहींत, त्याचा काळ इ. स. पू. ३००० हून बराच प्राचीन आहे."

असो तर, दीक्षितांचा ग्रंथ पाहतां त्यांनीं शतपथ पूर्वार्धाचा काळ इ. स. पू. ३००० दिला आहे. दीक्षित चुकले असें बहुधा करंदीकर म्हणणार नाहींत; किंबहुना या शतपथ-कालाबद्दल इं. अँटिक्वेरींत लेख लिहून दीक्षितांनीं जगतास आव्हान केलें होतें, परंतु अद्याप त्यांचें मत कोणी खोडलें असल्याचें मला माहीत नाहीं. ( अलीकडे विन्टरनिटझ् व रा. दप्तरी यानीं खोडण्याचा प्रयत्न केला आहे तो कसा लंगडा आहे हें माझ्या नवीन पुस्तकांत History of Sanskrit Literature: Vedic Period दाखविलें आहे. ) मला वाटतें, करंदीकर येथें चुकले आहेत तथापि ते चुकले नसल्यास त्यांनीं याबद्दल गणितयुक्त उत्तर द्यावें. 'कृत्तिका पूर्वेपासून चळत नाहींत' हें वाक्य शतपथब्राह्मणाच्या काळाचें आधारस्तंभ आहे आणि त्यावरच वैदिक-प्रमाणांची माझी सर्व भिस्त आहे. बॅबेल टावर-संबंधीं करंदीकरांनीं दिलेलें प्रमाण असंबद्ध आहे असें मला वाटतें. त्या कथेचा आणि शतपथांतील असुरांच्या कथेचा कांहींच मेळ नाहीं. आकाशांतील ढगांना वाटेल तें रूप देतां येतें. तात्पर्य, हा विषय बराच लांबला तो आटोपून मी एवढें थोडक्यांत म्हणतों कीं, शतपथाबद्दल करंदीकरांचें मत चुकीचें आहे आणि त्यांचें एकंदर विवेचनहि वर विस्तार-पूर्वक दाखविल्याप्रमाणें चुकीचें आहे. भारती युद्धाचा काळ इ. स. पू. ३१०२ हा जो बहुतेक सर्व ज्योतिष्यांनीं व साधारण लोकांनीं मानला आहे तोच वैदिक प्रमाणें मजबूत असल्यानें खरा आहे.

## युद्धदिन

भारती युद्धवर्षाचा विचार झाल्यावर भारती युद्धतिथीविषयीं विचार करूं. हें युद्ध मार्गशीर्षांत झालें असें करंदीकरहि म्हणतात. त्यांचा लेख चित्रमय जगत् स. १९२१ खास अंक यांत प्रसिद्ध झाला, त्यांत ते मार्गशीर्ष शु. ११ हा युद्धदिन निश्चित करतात. नीलकंठ चतुर्धरानें मार्ग० शु. १३ मृगनक्षत्रीं भारतीयुद्ध सुरू झालें असें मानलें आहे, व तें मत आज सर्वसंमत असेंच धरलें जातें. तें मत सोडून दोन दिवस अगोदर भारतीयुद्धदिन ओढण्याचें योग्य कारण करंदीकरांच्या सदर लेखांत आलें नाहीं असें मला वाटतें. प्रश्न दोन दिवसांचाच आहे, सबब महत्त्वाचा नाहीं, हें मला मान्य आहे, आणि केतकर वगैरे युद्ध मागें किंवा पुढें आणखी ओढतात तें योग्य नाहीं हें जें करंदीकरांनीं दाखविलें आहे तें मान्य करण्यासारखें आहे. केतकर जयद्रथवधदिनीं सूर्यास्तापूर्वीं सूर्यग्रहण लागलें असावें असें मानतात आणि तो दिवस मार्गशीर्ष अमावास्येचा धरतात हें चूक आहे. याला आणखीं कारणें देतां येतील. ग्रहण होणार हें अगोदर सर्वांस माहित असलें पाहिजे, कां एकट्या कृष्णास स्वप्रभावानें कळलें होतें ? स्वप्रभाव विलक्षण मानावा तर सूर्याला क्षणभर आवरण घालण्याचीहि त्याची शक्ति मानतां येईल. दुसरें, संध्याकाळपर्यंत ग्रहण नव्हतें आणि त्या सुमारास लागून क्षणभरानें पुन्हां सूर्य दिसला ही स्थिति खग्रास ग्रहणाची नाहीं, आणि थोड्याशा ग्रहणानें सूर्यास्त झाला असेंहि कोणास वाटावयाचें नाहीं. असो; केतकरांचें मत शं. बा. दीक्षित यांनींहि नापसंत केलें आहे, आणि करंदीकरहि करतात. राहिलें कार्तिक व. ३० चें मत. तेंहि सोडावें लागतें. कारण घटोत्कचवधरात्रीं अत्यंत काळोखांतील युद्ध आणि पहांटेस चंद्रोदय हें जें अपरित्याज्य लक्षण भारतीयुद्धाचें आहे तें या मतांतहि सोडावें लागतें. या मतानें तो दिवस मार्गशीर्ष शु. १३ चा येतो म्हणजे बहुतेक भररात्रीं चंद्रप्रकाशच येतो. यांत भीष्मनिर्याणाच्या ५८ रात्रीहि साधत नाहींत, त्या मार्गशीर्ष शु. ८ स युद्धारंभादिन मानला तर माघ शु. ८ स म्हणजे भीष्माष्टमीस साधतात. पण मार्ग. शु. ८ स मघा विषयगः सोमस्तद्दिनं प्रत्यपद्यत' हें वर्णन युद्धारंभाचें जुळत नाहीं. आणि बलरामाचें भीमदुर्योधनाच्या गदायुद्धाच्या वेळीं 'श्रवणे पुनरागतः' हें वाक्य जमत नाहीं. याप्रमाणें बहुतेक गोष्टी चुकत असल्यानें कार्तिक अमावास्या किंवा शु. ८ मार्गशीर्षाची किंवा पौर्णिमा जमत नाहींत, हें करंदीकरहि मानतात.

चतुर्धरीनें दिलेल्या मार्ग. शु. १३ ला मुख्य अडचण भीष्मनिर्याणाची येते. युद्धाच्या दहाव्या दिवशीं भीष्म शरपंजरीं पडले; तेव्हां त्या दिवशीं वद्य ७ मी येते. तेथून नेहमींची भीष्मनिर्याण—तिथि माघ शु. ८ घेतली तर ५८ दिवस होत नाहींत ४२ दिवस होतात. तेव्हां चतुर्धरानें 'अष्टपंचाशतम् याचा अष्टपंच+अशतम् असा पदच्छेद करून ४२ (१००-५८) रात्री काढल्या. पण युधिष्ठिर ५० दिवस हस्तिनापुरांत राहिल्यावर भीष्मापाशीं गेला. येथें पंच-अशत् हा प्रयोग चालत नाहीं, कारण एकदम ९५ (१००-५) येतील. यासाठीं माघ वद्यांत भीष्मनिर्याण नेलें पाहिजे. पण वद्यपक्षहि निर्याणाला युक्त नाहीं (धूमोरात्रिस्तथा कृष्णःषण्मासा दक्षिणायनम् इत्यादि प्रसिद्ध वचन आहे). तेव्हां करंदीकरांनीं एक सयुक्तिक कल्पना बसविली आहे. निर्याणदिन माघ वद्य पंचमी घ्यावा आणि वद्यपंचमीपर्यंत पक्ष शुद्धपक्षाप्रमाणें आहेच असें समजलेंहि जातें. शिवाय 'पक्षोऽयं शुक्लो भवितुमर्हति' या वाक्यांत शुक्लोऽस्ति असें न म्हणतां भवितुमर्हति म्हटलें आहे, तेव्हां तो खरा वद्य असून शुक्लाप्रमाणें आहे म्हणजे पंचमीचा आहे. तो त्रिभागशेष पक्ष नसून "माघोयं सम-नुप्राप्तः मासःसोम्यो युधिष्ठिर" यांतील, मास घेऊन त्रिभागशेष मास म्हणजे तिसरा हिस्सा बाकी म्हणजे १० दिवस बाकी महिन्यांतील राहिले आहेत असा अर्थ घ्यावा असें त्यांचें म्हणणें आहे. या रीतीनें माघ व. ५ स भीष्मनिर्याण धरून ५८ दिवस ते शरपंजरीं होते हें जुळतें. या गणनेनें भीष्म मार्गशीर्ष व. ५ स शरपंजरीं पडले असें निघतें. तेव्हां युद्धारंभदिन मार्गशीर्ष शु. ११ येतो, असें त्यांचें म्हणणें आहे. आतां मघाविषयग चन्द्र त्या दिवशीं होता असें जें वर्णन आहे, त्याचा अर्थ चतुर्धरानें घेतल्याप्रमाणें मृग न घेतां ९ नक्षत्रांच्या समूहास पुन्हां तेच विषय येतात असेंहि मानलें असल्यानें भरणी नक्षत्र घ्यावें. आणि मार्गशीर्ष शुद्धांत ११ स भरणी नक्षत्र बहुधा येतें असें एकंदर करंदीकरांचें विवेचन आहे. "११ स गीतोपदेश झाला हेंहि उत्तम आणि तिथीस मोक्षदा म्हणतात तेंहि बरोबर ठरतें."

पण हें म्हणणें कसें चुकतें आणि फाटकें धोतर कोठेंहि धरलें तरी कसें फाटतें तें आपण पाहूं. एकादशी दिन पुण्य असल्यानें त्या दिवशीं उपवासतिथि, युद्ध सुरू होणें असंभवनीय. (कदाचित् तेव्हां एकादशी व्रत सुरू झालें नसेल असें म्हणतां येईल.) दुसरें, पहांटेस चन्द्रोदय झाला आणि रात्रीस युद्ध द्रोणानें पुन्हां सुरू केलें हें मुख्य वर्णन चुकतें. ११ स

युद्ध सुरू झालें तेव्हां व ५ स भीष्म पडले. अर्थात् व. ९ मीस घटोत्कचाचें रात्रि–युद्ध पडतें. त्या रात्रीं चन्द्रोदय मध्यरात्रीनंतर लवकरच होईल आणि चंद्र कोरेसारखा दिसणार नाहीं. तिसरें 'श्रवणे पुनरागतः' हें बलरामाचें गदायुद्धदिवशींचें वाक्य मुळींच जुळणार नाहीं. या वचनांची संगति लावतांना करंदीकरानीं हात टेकले आणि शेवटीं हें वाक्य प्रक्षिप्त धरून या वचनाची अपेक्षा न धरावी हेंच त्यांस युक्त वाटलें. यांत पुनरागतः यांतील पुनः शब्दावर बरीच टीका त्यांनीं केली आहे. पुनः आलेल्याचा अर्थ पूर्वीं येथें आलों होतों आणि येथूनच तीर्थयात्रेला जाऊन पुन्हां येथेंच आलों असा सरळ बसतो. आतां राहिली भीष्माष्टमी; ती नेहमींची खोटी धरून माघ व. ५ मानून तो दिन भीष्मनिर्याणाचा धरून ५८ रात्री जुळविल्या आणि कृष्णपक्षाचा शुद्धपक्षहि मानला. त्रिभागशेष महिना धरून माघाचे दहा दिवस बाकी ठरविले. पण येथें पुन्हां कसें बिघडलें तें पहा. "माघो ऽयं समनुप्राप्तः" असें वाक्य आहे. माघ महिना संपत येऊन १० दिवस बाकी असतां 'माघ सम्यक् प्राप्त झाला', असें म्हणणें जुळणार नाहीं. तेव्हां, माघ शु. ८ च योग्य दिसते आणि त्रिभागशेष महिनाहि. $\frac{3}{4}$ तीन हिस्से शेष जवळ जवळ म्हणतां येतें. तात्पर्य शुक्लो भवितुमर्हति हें धरायला जावें तर समनुप्राप्त येथें फाटतें. यापेक्षां ५८ रात्री आणि ५० दिवस या संख्या कूटाच्या आहेत असें मानावें हें ज्यास्त प्रशस्त. संख्यावाचक किती तरी कूटें महाभारतांत आहेत हें उपसंहारांत मीं दाखविलें आहे, (पृष्ठ. १९७). महाभारतकालीन लोक राशि मुळींच माहित नसल्यानें नक्षत्रांचा नेहमीं उल्लेख करीत, म्हणजे चंद्र अमुक नक्षत्रीं असतां अमुक गोष्ट झाली असें नेहमीं सांगत. 'श्रवणे पुनरागतः' असें बलराम गदायुद्धाच्या दिवशीं म्हणतो तें टाकतां येणार नाहीं. तें गृहीत केलें म्हणजे गदायुद्ध पौ. शु. प्रतिपदेस किंवा मार्ग० अमावास्येस झालें असें दिसतें. भीष्म मार्ग० व. ७ स शरपंजरीं पडले, पांच दिवस द्रोणानें युद्ध केलें आणि द्वादशीस तो पडला. चतुर्दशीस कर्ण पडला. अमावास्येस दुर्योधन पडला. क्षय तिथि आली असल्यास पौ. शु. १ असणें शक्य आहे. ते दिवशीं श्रवण नक्षत्र येणें असंभाव्य नाहीं. कोणत्याहि सालचें पंचांग वाचकांनीं काढून पहावें. तिथीचा आणि नक्षत्राचा मेळ हजारों वर्षांपूर्वीं होता तसाच हल्लीं पडतो. एक दोन नक्षत्रें नेहमींच मागें पुढें होतात. पौ. शु. १ स श्रवण नक्षत्र बहुधा येतें. मार्गशीर्ष शु. १३ स मृगनक्षत्र येणें शक्य आहे. दहाव्या

दिवशीं भीष्म पडले, तेव्हां चित्रा येतील. पांच दिवसांनीं मूळनक्षत्रावर द्रोण पडला. पूर्वाषाढा, उत्तराषाढा कर्ण, आणि दुर्योधन पडला ते दिवशीं श्रवण असूं शकेल. तात्पर्य, बळरामाचें नक्षत्र—स्पष्ट वाक्य टाकून देण्यापेक्षां अष्टपंचाशत् आणि पंचाशत् या संख्या कूटयुक्त म्हणून लक्षांत घेऊं नये हें बरें दिसतें. आणि माघः समनुप्राप्तः धरून भीष्म—निर्याण नेहमींप्रमाणें माघ शु. ८ सच धरावें. याप्रमाणें या विषयाची परिस्थिति आहे. करंदीकर यांच्या व माझ्या मतांत फरक दोन दिवसांचाच आहे, तथापि मार्गशीर्ष शु. १३ ही पूर्वापार मानलेली तिथि, घटोत्कच—वधाच्या दिवशीं पहाटेचा चन्द्रोदय, श्रवण नक्षत्रीं गदायुद्ध व भीष्माष्टमी नेहमींची पडते, या तिथीनें सर्व गोष्टी जुळतात. पूर्वापार चालत आलेलेंच वर्ष घेणें योग्य आहे हें पूर्वी दाखविलेंच आहे तेव्हां भारती युद्धवर्ष व दिवस श. पू. ३१७९ मार्ग. शु. १३ (म्हणजे इ. स. पू. ३१०२ डिसेंबर) हाच योग्य दिसतो.



# सूर्यचंद्रवंशी क्षत्रियांचा वेदांतील माग.

[ भारत-इतिहास-संशोधक मंडळाच्या तृतीय सम्मेलनापुढें
२९ मे १९१५ रोजीं वाचलेला निबंध. ]

भागवतांतील व मत्स्यपुराणांतील एका वचनावरून मीं असें दाखविलें आहे कीं, हिंदुस्थानास प्राचीनकाळीं भारतवर्ष किंवा भरतखण्ड असें जें नांव होतें तें चंद्रवंशी दौष्यन्ति भरतावरून नव्हे, तर स्वायंभुव मनूच्या भरत नांवाच्या एका प्रपौत्रावरून पडलें होतें. या गोष्टीचा माग पुराणाहून प्राचीन ग्रंथांत अर्थात् वैदिक वाङ्मयांत सांपडतो कीं काय, हें पाहण्याच्या इच्छेनें मीं त्या वाङ्मयाचें आलोचन केलें. त्यांत जी महत्त्वाची माहिती मला उपलब्ध झाली, ती मीं रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबईच्या शाखेपुढें विस्तारानें आक्टोबर सन १९१४ मध्यें एका लेखांत मांडली आहे. ती सारांशरूपानें मराठींत मांडण्याची मी परवानगी घेतों. कारण, ही माहिती मनोरंजक असून, तिच्या संबंधानें योग्य ऊहापोह होऊन तिच्या सत्यासत्यतेविषयीं निर्णय जनतेस करतां येईल.

प्रथम गोष्ट ही सांगितली पाहिजे कीं, वैदिक वाङ्मयाचें जें मीं परिशीलन केलें तें केवळ या बाबतीसंबंधानेंच केलें व तें करतांना 'वैदिक इंडेक्स' या अत्यंत उपयुक्त इंग्रजी पुस्तकाची मदत घेतली. या सूचींत मॅकडोनेलनें वैदिक वाङ्मयांत येणाऱ्या सर्व नांवांची माहिती देऊन त्या त्या शब्दांचे दाखले ( References ) दिले आहेत. त्या त्या दाखल्यां-वरून मीं मूळ वचनें काढून पाहिलीं, एवढी मात्र मीं खबरदारी घेतली. कारण, कित्येक प्रसंगीं मॅकडोनेलप्रभृति पाश्चात्य विद्वानांचे मूळचे गैर-समज असल्यानें चुकीचीं अनुमानें निघतात, ही गोष्ट माझ्या दृष्टोत्पत्तीस आली होती. त्याचीं उदाहरणें पुढील विवचनांत येतीलच. असो, प्राचीन वेदादि निरनिराळ्या ग्रंथांत विरुद्ध विधानें सांपडल्यास त्यांची गति कशी लावावी, याजविषयीं मीं एक ऐतिहासिक सिद्धांत बांधला आहे, तो असा. प्राचीन ग्रंथांचा ऐतिहासिक क्रम येणेंप्रमाणें लावतां येईल:—

( १ ) ऋग्वेद.
( २ ) यजुर्वेद. } ( सुमारें ३६०० इ. स. पू. )

( ३ ) ब्राह्मण ग्रंथ. त्यांत मुख्य शतपथ. ( ३०००–१५०० ).

( ४ ) वेदांगज्योतिष वगैरे ( १५००–१००० ).

( ५ ) धर्मसूत्रें, गृह्यसूत्रें वगैरे ( १०००–५०० ).

( ६ ) एरायन मेग्यास्थेनीस प्रभृति ग्रीक इतिहासकार ( इ. स. ५००–३०० ).

( ७ ) महाभारत हल्लींचें. याचा काळ सुमारें इ. स. पू. २५०.

( ८ ) रामायण हल्लींचें. याचा काळ सुमारें १०० इ. स. पू.

( ९ ) पुराणें हल्लींचीं ( यांचा काळ इ. स. ३०० पासून ६०० किंवा ८०० पर्यंत ).

या ग्रंथांचें पूर्वपूर्वप्रामाण्य मानलें पाहिजे, हें उघड आहे. म्हणजे पुराणांपेक्षां ग्रीक ग्रंथकारांस मान दिला पाहिजे. ग्रीकांपेक्षां पाणिनीस, पाणिनींपेक्षां ब्राह्मणांस आणि सर्वांत श्रेष्ठ प्रामाण्य ऋग्वेदास. शेवटीं शीर्षमापनशास्त्र व भाषाशास्त्र या नवीन शास्त्रांवरून जे सिद्धान्त निघाले आहेत ते या चिकित्सेंत सामील करण्यासारखे आहेत. एवढी प्रस्तावना करून मी आपल्या मुख्य विषयाकडे वळतों.

महाभारतापासून अलीकडच्या ग्रंथांत आर्यांचे दोन वर्ग मानले गेले आहेत, यावरून आर्यांच्या दोन टोळ्या दोन वेळीं हिंदुस्थानांत आल्या असाव्या, असें अनुमान सहज निघतें. शीर्षमापनशास्त्राचा हाच सिद्धान्त आहे. पंजाबांत व राजपुतान्यांत बहुतेक शुद्ध आर्य म्हणजे लांब डोक्याचे व उंच नाकाचे लोक सांपडतात; आणि संयुक्त प्रांत व मुंबई इलाखा येथें मिश्र आर्य म्हणजे मध्यम डोक्याचे व मध्यम उंच नाकाचे लोक सांपडतात; असें १९०१ च्या सेन्ससच्या वेळीं घेतलेल्या मापांवरून जाहीर झालें आहे. भाषाशास्त्रहि ह्याच सिद्धान्तास दुजोरा देतें, तो असा. पंजाबी, राजस्तानी व पूर्वेकडील हिन्दी–म्हणजे अवध व मिथिल प्रांतांतील हिन्दी-यांचा एक स्वतंत्र वर्ग पडतो व मध्यदेशांतील भाषा म्हणजे पश्चिमेकडील हिंदी–इचा स्वतंत्र वर्ग पडतो. डॉक्टर होर्नेल यांनीं हिंदी आर्यांसंबंधें याजवरून जें अनुमान काढलें आहे व जें डॉक्टर ग्रीयरसन वगैरे भाषाकोविदांस पसंत पडलें आहे, आणि जें १९११ च्या सेन्सस रिपोर्टांत नमूद झालें आहे, त्यासंबंधीं तेथील उतारा घेऊं:–These languages, according to Dr. Hoernle were brought to India by two successive hordes of

invaders. After the first horde had settled in the plains of Northern India a fresh horde came in and penetrated the original mass, like a wedge, blotting out the languages in the centre and extending from Ambala in the north to beyond Jubbulpore in the south and from Kathiawar in the south-west to Nepal in the north-east..." पृ. २२५, प्रथम आलेल्या व बहुतेक गंगोत्तर उत्तर हिंदुस्थानांत पसरलेल्या आर्यांच्या वसाहतींत दुसरी आर्यांची टोळी मध्यें घुसली आणि अंबाल्यापासून दक्षिणेकडे काठेवाड-जबलपुरच्या रेषेपर्यंत पसरली असें जें हिंदुस्थानांतील सध्यांच्या भाषांवरून अनुमान काढलें गेलें आहे व ज्यास शीर्षमापनशास्त्राप्रमाणें घेतलेल्या डोक्यांच्या व नाकांच्या मापांवरून बळकटी येते, तेंच अनुमान वैदिक वाङ्मयपरिशीलनानें दृढ होतें असें माझ्या दृष्टोत्पत्तीस आलें आहे. आर्यांच्या याच दोन टोळ्यांस भारतादि ग्रंथांपासून सूर्यवंशी व चंद्रवंशी क्षत्रिय म्हणण्याचा प्रघात पडला. महाभारतांत सभापर्वांत जरासंधाला जिंकतां येईल कीं नाहीं, या युधिष्ठिराच्या प्रश्नाला उत्तर देतांना श्रीकृष्ण म्हणतो " सध्यां सूर्य व चंद्र यांजपासून उत्पन्न झालेल्या आर्यांचीं १०१ कुळें भरतखण्डांत आहेत व त्यांतल्या त्यांत भोजवंशांतील चंद्रवंशी क्षत्रिय बलिष्ठ असून त्यांनीं मध्यदेश व्यापला आहे." या उताऱ्यांतील वर्णन वरील सिद्धान्ताशीं चांगलें जुळतें. आतां सूर्यवंशी व चंद्रवंशी क्षत्रियांचा माग वेदांत कसा लागतो व त्यांच्या पसरण्याचा वर दिलेला त्रोटक इतिहास वैदिक वाङ्मयावरून कसा दृढ होतो हें या निबंधांत दाखवतों.

वेदिक इंडेक्स ग्रंथांत ' भरत ' शब्दाखालीं माहिती दिली आहे ती अशी—"ऋग्वेदांत भरत हें नांव एका महत्त्वाच्या लोकांचें आहे. तें विशेषतः तिसऱ्या व सातव्या मण्डलांत त्रित्सु आणि सुदास या नांवांबरोबर वारंवार येतें; आणि सातव्या मंडलांत त्यांचा संबंध दिवोदासाशीं आढळतो." यापुढें मॅकडोनेलनें एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, " या भरतांचें पुढें काय झालें हें समजत नाहीं. बहुधा ते कुरुलोकांत सामिल झाले असावे." माझ्या मतें भरत शब्दानें दौष्यन्ति भरताची जी एकदम कल्पना मनांत येते ती या गैरसमजाला कारण झाली आहे. ऋग्वेदांतील जे जे उल्लेख मॅकडोनेलनें ' भरत ' शब्दाखालीं दिले आहेत, ते सर्व मीं काढून पाहिले आणि माझा असा सिद्धांत झाला आहे कीं, ऋग्वेदांत ज्या भरतांचा वारंवार नाम-

निर्देश येतो, तेच पुढें सूर्यवंशी क्षत्रिय या नांवानें संबोधले गेले. या निरनिराळ्या उल्लेखांचा आपण सविस्तर विचार करूं. प्रथम सातव्या मंडळांत भरतांचा उल्लेख पुष्कळ येतो. हें मण्डल वसिष्ठ ऋषींनीं केलेल्या सूक्तांचें आहे. भरत म्हणजे वैदिक भाषेंत भरत राजा किंवा भरतवंशी लोक ( भरताः ) असा अर्थ होतो. या उल्लेखांवरून असें दिसतें कीं, या भरत लोकांचे पुरोहित वसिष्ठ व तत्कुलोत्पन्न ऋषि होते. भरत म्हणजे सूर्यवंशी क्षत्रिय, अशा सिद्धान्ताचा हा पहिला व मजबूत पुरावा आहे. सातव्या मंडलांतील पहिलें महत्त्वाचें सूक्त म्हणजे ३३ हें होय. ऋग्वेदांतील सूक्तें इंद्रादि देवतांच्या स्तुत्यर्थ आहेत हें प्रसिद्धच आहे. तीं कांहीं इतिहास म्हणून रचलेलीं नाहींत; परंतु त्या सूक्तांत ऐतिहासिक उल्लेख प्रसंगोपात्त आला आहे, तो फार महत्त्वाचा आणि बहुतेक प्रत्यक्ष असा पुरावा आहे. या तेहतिसाव्या सूक्तांत एका मोठ्या लढाईचा उल्लेख आहे. त्यास दाशराज्ञ युद्ध म्हटलें आहे; म्हणजे दहा राजे या लढाईंत होते. या लढाईंत भरतांचा पराभव होण्याचा वेळ आला होता; परंतु भरतांचा पुरोहित वसिष्ठ हा पुढें आला व त्यानें आपल्या स्तुतीनें इंद्रास तुष्ट करून भरतांचा जय करून दिला. " दण्डा इवेद्गोअजनास आसन् परिच्छिन्ना भरता अर्भकासः। अभवच्च पुरएता वसिष्ठ आदित्तृत्सूनां विशो अप्रथन्त ॥ ( ६ )." सूक्तांचा अर्थ लावतांना आरनोल्डचें भाषान्तर मीं बहुधा घेतलें आहे. पण बहुतकरून इतर ग्रंथ—श्रुतिबोध वगैरे—जो अर्थ देतात त्याशीं विरोध येणार नाहीं असें वाटतें. असो. या लढाईविषयीं सविस्तर मी पुढें सांगेन. दुसरें महत्त्वाचें सूक्त मण्डल ७, १८ हें होय. यांत भरत राजाचा उल्लेख असून त्याच्या अग्नीचें वर्णन आहे. " प्र प्रायमग्निर्भरतस्य शृण्वे अभि यः पूरुं पृतनासु तस्थौ " आर्यांच्या पूर्वीचे येथील रहिवाशी अग्न्युपासक नव्हते. आर्य अग्न्युपासक असून प्रसिद्ध राजांचे अग्नि त्यांच्या त्यांच्या नांवानें ऋग्वेदांत उल्लिखित आहेत, हें येथें सांगण्यासारखें आहे. या ऋचेंत भरतानें पूरूचा पराभव केला, असा उल्लेख आहे. हा पूरु कोण? पूरु नांव ऐकल्याबरोबर ययाति—शर्मिष्ठांचा पुत्र पूरु याची स्मृति होते. परंतु जसा भरत नांवानें घोटाळा उत्पन्न केला आहे, तसा पूरु या नांवानेंहि केला आहे. शतपथ ब्राह्मणांत एके ठिकाणीं या ऋचेंतील पूरु म्हणजे एक असुर होय असें स्पष्ट म्हटलें आहे. मॅकडोनेलनें याजवर पूरु शब्दाखालीं अशी टीका

केली आहे. " पूरु म्हणजे ययातिपुत्र पूरु. पण शतपथ-काळीं या पूरूची आठवण इतकी बुजाली होती कीं, पूरु हा एक असुर मानला गेला. " येथें मॅकडोनेलची चूक झाली आहे, असें निःसंशय वाटतें. शतपथकाळीं ऋग्वेदकालीन पुरुषांची आठवण आमच्यापेक्षां पुष्कळच जास्त होती. भरताच्या वेळीं त्याशीं लढण्यास ययातिपुत्र पूरु येऊं शकत नाहीं, हें जाणून शतपथानें मुद्दाम हा इशारा देऊन ठेविला आहे. पूरु नामक एका असुराचा म्हणजे आर्य-शत्रूचा भरतानें पराभव केला. हा पूरु ययातिपुत्र घेतला, तरी भरत हा दौष्यन्ति भरत नव्हे हें निश्चित आहे. कारण, दौष्यन्ति भरत पूरूचा किती तरी पुढील वंशज होय. तात्पर्य हा भरत दौष्यन्ति भरत नव्हे आणि हा पूरु ययातिपुत्र पूरु नव्हे.

भरतांच्या दुसऱ्या सुदास नांवाच्या राजाचा उल्लेख करणारीं आणखी वसिष्ठाचीं सूक्तें म्हणजे मण्डळ ७, ८३ व ७, १८ हीं होत. यांत दाशराज्ञ युद्धाचा स्पष्ट उल्लेख आहे. " यत्र राजभिर्दशभिर्निबाधितं प्र सुदासमावतं तृत्सुभिः सह " ७, ८३ ( ६-७ )* तसेंच, " दाशराज्ञे परियत्ताय विश्वतः सुदास इंद्रावरुणावशिक्षतम् " ७, ८३ ( ८-७ ). याच मण्डळाच्या १८ व्या सूक्तांत या लढाईचें सविस्तर वर्णन आहे, त्याजविषयीं पुढें लिहावयाचें आहे.

आतां आपण मण्डल ३ कडे वळूं. मण्डल ७ हें जसें वसिष्ठाच्या सूक्तांचें आहे, तसें मण्डल ३ हें विश्वामित्राच्या सूक्तांचें आहे. विश्वामित्राचा संबंध सूर्यवंशी क्षत्रियांशीं वसिष्ठाइतकाच आहे असें म्हटलें तरी चालेल. या विश्वामित्राच्या सूक्तांत भरतांचा पुष्कळ उल्लेख आहे. पहिलें सूक्त ३, २३ हें आहे; हें देवश्रवा व देववात या दोन भारत राजांनीं केलेलें आहे व तें विश्वामित्राच्या मण्डलांत दिलेलें आहे. " देवश्रवा व देववात या भरतांनीं दृशद्वती, आपया व सरस्वती या नद्यांवर अग्नि प्रज्वलित केला, " असा यांत उल्लेख आहे. " अमन्थिष्टां भारता रेवदग्निं देवश्रवा देववातः सुदक्षम् । " तसेंच " दृशद्वत्यां मानुष आपयायां सरस्वत्यां रेवदग्ने दिदीहि । " ( ४ ). दुसरें महत्त्वाचें सूक्त म्हणजे ३, ३३ हें होय. शतद्रु आणि विपाशा यांच्या संगमावर एके प्रसंगीं भरत आले असतां अतिशय पुरामुळें वाट मिळेना. तेव्हां विश्वामित्रानें भरतांकरितां या नद्यांची स्तुति

* मोठे आंकडे मण्डळांचे, लहान सूक्तांचे, व कौंसांतील ऋचांचे समजावे.

केली असतां पाणी ओसरून भरत पलीकडे गेले. त्यांच्या गाड्यांच्या आंसाला सुद्धां पाणी लागलें नाहीं. "अधोअक्षाः सिन्धवः स्रोत्याभिः।" भरत पलीकडे गेले म्हणजे तुम्ही खुशाल वाढा अशी विश्वामित्रानें या नद्यांस प्रार्थना केली. " यदङ्ग त्वा भरता सन्तरेयुः " वगैरे. तिसरें आणखी महत्त्वाचें सूक्त ३, ५३ आहे. यांत विश्वामित्रानें सुदास राजाला मदत केली असें वर्णन आहे. हा सुदास राजा वसिष्ठाच्या दाशराज्ञ युद्धांतीलच असावा. त्याला अन्य प्रसंगीं विश्वामित्रानें मदत केली. " विश्वामित्रो यदवहत्सुदासमप्रियायत कुशिकेभिरिन्द्रः" या सूक्तांतील "विश्वामित्रस्य रक्षति ब्रह्मेदं भारतं जनम् " ही ऋचा फारच मजेची आहे. 'भारत जनांचें रक्षण विश्वामित्राचें हें ब्रह्म म्हणजे स्तोत्र करीत आहे ' या वाक्यांत भारतजन या शब्दांनीं भारतवर्षाचाच ध्वनि कानीं पडतो असें म्हटलें असतां चालेल. पौराणिक विश्वामित्राच्या कथेचीं बहुतेक बीजें या सूक्तांत आहेत. विश्वामित्र हा कुशिक वंशांतील आहे. तो मूळचा राजा होता किंवा नाहीं हें स्पष्ट नाहीं. भरत हे प्रबळ व सर्वत्र प्रसृत झाले असून त्यांचा राजा सुदास यास विश्वामित्रानें मदत केली. अर्थात् विश्वामित्र व वसिष्ठ यांची स्पर्धा उत्पन्न झाली असावी. रामायण उत्तरकाण्ड अ० ६५ यांत कल्माषपाद याची गोष्ट दिली आहे; तेथें तो सौदास होता असें म्हटलें आहे. "युष्माकं पूर्वजो राजा सौदासस्तस्य भूपतेः " वगैरे कथा वाल्मीकीनें शत्रुघ्नाला सांगितली आहे. त्यांत वसिष्ठानें कल्माषपादाला ( सौदासपुत्राला ) सोडलें, तेव्हां विश्वामित्रानें त्यास मदत केली असें वर्णन आहे. असो, हरिश्चंद्राच्याहि कथेंत शुनःशेपाला वांचविण्यास विश्वामित्र पुढें सरसावला, असें ब्राह्मणकथेंत वर्णन आहे. सारांश, विश्वामित्राचा सूर्यवंशाशीं संबंध पक्का आहे; आणि ऋग्वेदांतील हे भरत व सुदास सूर्यवंशी होते असें दिसतें.

आतां आपण सहाव्या मण्डलाकडे वळूं. हें मंडल भरद्वाजाच्या सूक्तांचें आहे. यांत भरत राजा, भारत लोक, भरताचा अग्नि, दिवोदास राजा, व खुद्द भरद्वाज यांचा उल्लेख विशेष आहे. सूक्त ६, १६ यांत खालील ऋचा आहेत. " त्वमिमा वार्या पुरु दिवोदासाय सुन्वते। भरद्वाजाय दाशुषे ॥ आग्निरगामि भारतो वृत्रहा पुरुचेतनः॥ दिवोदासस्य सत्पतिः ॥ प्र देवं देववीतये भरता वसुवित्तमम्। आ स्वे योनौ निषीदतु ॥ " दिवोदास हा ऋग्वेदांत सुदासाचा पिता होता असें वर्णन येतें. त्याचा

संबंध भरद्वाजाशीं कां ? त्याच्या पुत्राचा संबंध वसिष्ठ–विश्वामित्राशीं येतो अशी पाश्चात्य वैदिक पंडित शंका नमूद करतात. पण यांत आश्चर्य नाहीं. वसिष्ठ भरतांचा पुरोहित होता हें उघड आहे. पण यामुळें इतर ऋषींचा संबंध भरतांशीं किंवा त्यांच्या राजांशीं येऊं नये असें होत नाहीं. सूर्यवंशाशीं भरद्वाजाचा संबंध रामायणावरूनहि दिसतो.

तात्पर्य, वरील सूक्तांवरून ऋग्वेदांतील भरत म्हणजे पौराणिक काळांतील सूर्यवंशी क्षत्रिय होत, हें उघड आहे. त्यांचे राजे भरत, सुदास, दिवोदास, पुरुकुत्स, त्रसदस्यु वगैरे दिसतात. रामायणांतील बा० कां० अ० ७० मधील सूर्यवंशाच्या वंशावळींत भरत आहे. त्यांत सुदास नाहीं, पण कल्माषपाद आहे व उत्तर कांडाच्या ६२ व्या अध्यायांत हा कल्माषपाद सौदास म्हणून स्पष्ट सांगितलें आहे. इतर पुराणांतील सूर्यवंशावळींत सुदास आहे, पुरुकुत्स आहे व त्रसदस्यु आहे. सारांश, पुराणांतील वंशावळी जरी छिन्नभिन्न झालेल्या व परस्परविरोधी आहेत, तरी माननीय आहेत, त्या ऋग्वेदांतील उल्लेखानें दुरुस्त करून घेतल्या पाहिजेत. ऋग्वेदाचें प्रामाण्य पुराणांपेक्षां जास्त आहे, हें पूर्वीच सांगितलें आहे; पण कोणतीहि वंशावळ घेतल्यास तींत भरत आणि सुदास हे आहेत. तेव्हां ऋग्वेदांतील भरत म्हणजे पुराणांतील सूर्यवंशी क्षत्रिय होत. ब्राह्मणकाळीं सूर्यवंशी क्षत्रियांचीं राज्यें कोसल व विदेह हींच होतीं व पश्चिमेकडे कुरु प्रबळ होऊन त्यांनीं सर्व देश पादाक्रांत केला होता. यामुळें ब्राह्मणांत भरतांचा उल्लेख कमी येतो. तथापि भरत शब्दानें सामान्य क्षत्रिय वीर किंवा सामान्य ऋत्विज् असा अर्थ ब्राह्मणकाळीं समजला जात असे. याजवरून हिंदुस्थानांतील आर्यांचें सामान्य नाम भरत हें पडलें होतें असें दिसतें. तसेंच भारती याचा अर्थ निरुक्तकारानें "भरतः आदित्यस्तस्य इयं भाः भारती" असा दिला आहे. यावरून या भारतांना सूर्यवंशी क्षत्रिय असें नांव पुढें कसें पडलें असावें याचा बोध होतो. या क्षत्रियांचा मूळ पुरुष मनु होता, ही गोष्ट ऋग्वेदावरूनहि दिसते. मनु हा सर्व मानवजातीचा मुख्य पिता ही कल्पना वेदांत आहे; आणि मनु हा सूर्याचा पुत्र हीहि कल्पना (यथा मनौ विवस्वति) ऋग्वेदांत आहे. भरत म्हणजे सूर्यवंशी क्षत्रिय, त्यांचे पुरोहित वसिष्ठ व इतर ऋषि विश्वामित्र व भरद्वाज; हे भरत प्रथम हिंदुस्थानांत आल्यामुळेंच हिंदुस्थानास भारतवर्ष हें नांव पडलें; इत्यादि गोष्टी आप-

त्यास वरील विवेचनावरून दिसतील. आतां आपण **चंद्रवंशी क्षत्रियां-कडे** वळूं.

चंद्रवंशी क्षत्रिय पूर्वीच्या क्षत्रियांप्रमाणंच **अग्न्युपासक आर्य होते;** पण कांहीं बाबतींत ते भिन्न होते. ते मागाहून आले आणि **प्रथम सरस्वती-तीरावर** त्यांनीं वसति केली. तेथून ते दक्षिणेकडे व **आग्नेयीकडे पसरले.** त्यांनीं पूर्वेकडच्या पूर्वीच्या आर्यांस जिंकण्याचा **प्रयत्न केला व पश्चिमे-कडच्या** म्हणजे पंजाबांतील आर्यांस जिंकण्याचा **प्रयत्न केला. दोन्हीकडे** त्यांस प्रथम अपयश आलें. पण शेवटीं पंजाब देश त्यांनीं जिंकला; म्हणजे तेथील नुसतें सार्वभौमत्व संपादिलें, पण तेथें वसाहत थोडी केली. यांची वसाहत मुख्यतः कुरुक्षेत्र, दुआब व काठेवाडपासून जबलपुरापर्यंत गंगेच्या दक्षिण किनाऱ्यानें झाली. या गोष्टी वैदिक वाङ्मयावरून अनुमानानें कशा निघतात हें मी आतां दाखवितों.

पहिला मुद्दा असा कीं, एका सूक्तांत यदु, तुर्वश, अनु, द्रुह्यु, आणि पूरु या पांचांचीं म्हणजे या पांच लोकांचीं नांवें एके ठिकाणीं आलीं आहेत. हा उल्लेख एकत्र पाहून मला सानन्द आश्चर्य वाटलें, आणि पुराणां-तील चंद्रवंशाच्या माहितीला वेदांत चांगला आधार आहे, असें दिसून आलें. ऋ. १, १०८ यांत ८ वी ऋचा अशी आहे—“ यदिंद्राग्नी यदुषु तुर्वशेषु यद्द्रुह्युष्वनुषु पूरुषु स्थः। अतः परिवृषणावा हि यातमथा सोमस्य पिबतं सुतस्य ॥ ” हे इंद्राग्नीनो, तुम्ही जरी यदूंमध्यें व तुर्वशांमध्यें तसेंच द्रुह्यूंमध्यें, अनूमध्यें व पूरूंमध्यें असाल, तरी येथें या आणि हा काढलेला सोमरस प्या. ” यावरून अनेक अनुमानें निघतात. पहिलें हे लोक पूर्वीच्या आर्यांप्रमाणेंच इंद्राचे व अग्नीचे उपासक होते. दुसरें हे पांच लोक एका जातीचे असावेत. तिसरें, त्यांतल्या त्यांत यदु आणि तुर्वश एका मेळाचे असावेत. यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु आणि पूरु हे प्रथम राजे असून त्यांचे वंशज त्याच अनेकवचनी नांवानें संबोधिले जात. सारांश, चंद्रवंशांतील ययातीच्या दोन बायकांपासून झालेल्या पांच पुत्रांची कथा येथें चांगली व्यक्त होते. या सूक्तांचा कर्ता कुत्स आंगिरस आहे, याचें महत्त्व मी पुढें सांगेन.

दुसरी गोष्ट अशी की, या मागून आलेल्या आर्यांचा भरतांशीं तंटा लागला व त्यांशीं लढाया झाल्या. हे लोक मागून आले, ही गोष्ट कित्येक

सूक्तांत त्यांच्यावर ऋषींचा राग दिसतो, यावरून निष्पन्न होते. प्रथम तंटा दिवोदासाशीं लागला असें दिसतें. मंडळ ९, सू. ६१, ऋ. २ अशी आहे:–
" पुरः सद्य इत्थाधिये दिवोदासाय शंबरम् । अध त्यं तुर्वशं यदुम् ॥ "
दिवोदासाकरितां इंद्रानें शंबराला मारलें, तसेंच तुर्वश व यदु यांना मारलें. यदु–तुर्वशांचा. असा विरुद्ध उल्लेख पुष्कळ ऋग्वेदसूक्तांत आलेला आहे. सरयू नदीवर भरत राजे, अर्ण आणि चित्ररथ या नांवाचे यदु–तुर्वशांच्या लढाईत मारले गेले; असें मण्डल ४, ३० ऋचा १७।१८ त वर्णन आहे. " उत त्या तुर्वशायदू अस्नातारा शचीपतिः । इंद्रो विद्वाँ अपारयत् ॥ १७ ॥ उत त्या सद्य आर्या सरयोरिन्द्र पारतः । अर्णाचित्ररथा-वधीः ॥ १८ ॥ " असो. सर्वांत मोठें युद्ध म्हणजे पाशराज्ञ होय. याचा उल्लेख पूर्वीं आलाच आहे. हें युद्ध वसिष्ठाच्या एका सूक्तांत ( ७, १८ ) विस्तारानें वर्णिलें आहे. युद्ध परुष्णी नदीच्या कांठीं म्हणजे पंजाबांतील हल्लींच्या रावी नदीच्या कांठीं झालें. एका पक्षास भरत, त्यांचा राजा सुदास व त्याचे पुरोहित वसिष्ठ आणि त्रित्सु होते. दुसऱ्या पक्षास पांच आर्य-राजे म्हणजे यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु आणि पूरु व त्यांचे पांच अनार्य मित्र-राजे पखत्, भलान, भनन्तालि, विषाणि आणि शिव हे होते. यांपैकीं पखत् म्हणजे हल्लींची पश्तु भाषा बोलणारे लोक असावेत. पश्तु याचा उच्चार कित्येक पठाण जातींत अद्यापहि पखत असा करतात, असें डॉ. ग्रीयरसननें लिहिलें आहे. या लढाईत भरतांचा अगदीं मोड होणार होता व त्यांचें धन त्यांचे शत्रु लुटणार होते; परंतु जेव्हां वसिष्ठानें इंद्राची स्तुति केली, तेव्हां नदीचा पाट फोडून नेत असतां परशत्रूचीं सैन्यें वाहून गेलीं आणि शेवटीं त्यांचेंच सामान भरतांनीं लुटून घेतलें. यांत सहा हजार अनु व द्रुह्यु गाईबैल हांकून नेत असतां रणावर पडले. वैदिक सूक्तांचा समग्र अर्थ समाधानकारक लागत नाहीं, हें कबूल केलें पाहिजे; तथापि या सूक्तांतील शब्दांवरून वरप्रमाणें गोळाबेरीज निघते. यांतील मुख्य मुख्य ऋचा खालीं देतों " अर्णांसि चित्पप्रथाना सुदास इंद्रो गाधा-न्यकृणोत्सुपारा । पुरोळा इत्तुर्वशो यक्षुरासीद्रायो मत्स्यासो निशिता अपीव । श्रुष्टिं चक्रुर्भृगवो द्रुह्यवश्च सखा सखायमतरद्विषूचोः । आ पक्तथासो भला-नसो भनन्तालिनासो विषाणिनः शिवासः ॥ आ योऽनयत् सधमा आर्यस्य गव्या तृत्सुभ्यो अजगन्युधा नृन् ॥ दुध्यर्थं न न्यर्थं परुष्णी माशुश्चनेदभि-

पित्वं जगाम। सुदास इंद्रः सुतुकाँ अमित्रानरन्धयन्मानुषे वध्रिवाचः॥ ५॥ नि गव्यवोऽनवो द्रुह्यवश्च षष्टिः शता सुषुपुः षट् सहस्रा।" या सूक्तांत तुर्वश, द्रुह्यु, अनु आणि पूरु हीं चार नांवें आलीं आहेत; पण यदूचा अंतर्भाव तुर्वशांत करावयास ऋग्वेदांतील या नांवांच्या नेहमींच्या साहचर्यावरून हरकत नाहीं. मत्स्य हेंही नांव यांत आलेलें आहे, पूर्वोक्त मं. ७, सू. ८३ मधील उल्लेखांवरून या लढाईत दहा राजे सुदासाच्या विरुद्ध होते, ही गोष्ट निश्चित आहे; आणि त्यांत आर्य आणि दास म्हणजे अनार्य असे होते, हेंही स्पष्ट लिखित आहे. "राजभिर्दशभिर्निबाधितं प्र सुदासमामतं तृत्सुभिः सह" या पूर्वोक्त ऋचेशिवाय आणखी एक ऋचा या सूक्तांत "दासा च वृत्रा हतमार्याणि च सुदासमिन्द्रावरुणावसावतम्॥" अशी स्पष्ट आहे. सारांश, पंजाबांतील प्रथम येऊन राहिलेल्या भरतांस व त्यांचा राजा सुदास यास जिंकण्याचा प्रयत्न नंतर आलेल्या यदुतुर्वशादिकांनीं मूळच्या रहिवाश्यांच्या राजांसह केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. बहुधा ऋग्वेदकाळीं हा प्रयत्न विफल गेला असें दिसतें आणि हे आर्य दक्षिणेकडे पसरले असें वाटतें. ब्राह्मणकाळीं त्यांनीं पंजाब जिंकलें हें मी पुढें सांगेन. असो, आतां आपण हे दुसरे आर्य प्रथम सरस्वतीतीरावर आले आणि तेथून दक्षिणेकडे व आग्नेयीकडे पसरले, या अनुमानास बळकटी आणणाऱ्या वैदिक वचनांकडे वळूं.

दुसऱ्या वैदिक चंद्रवंशी आर्यांत पूरूचें कुळ सर्वांत जास्त मोठें व प्रसिद्धीस आलें होतें. ययातीच्या पांच पुत्रांत पूरु हाच मुख्य राजा झाला व 'अपौरवा तु हि मही न कदाचिद्भविष्यति' असा त्यास बापाचा आशीर्वाद होता अशी पुराणकथा प्रसिद्ध आहे. पूरूच्या कुळांत दौष्यंति भरत आणि त्याच्या कुळांत पुढें कुरु आणि पांडव झाले. हे पूरु प्रथम सरस्वतीतीरावर येऊन राहिले, असा ऋग्वेदांत दाखला सांपडतो. पूर्वीचे आर्य पंजाबांत व गंगोत्तर पूर्वेकडील प्रदेशांत पसरले होते. मध्यें सरस्वतीतीरावर मोकळें रान पाहून पूरु घुसले असावे. तेथून थोडें दक्षिणेकडे कुरुक्षेत्र आहे; तेथें कुरु भरभराटीस आले; येथें आर्यांची संस्कृति अतिशय उन्नतीस गेली; तेथील भाषा अत्यंत संस्कृत असें लोक मानूं लागले ( जशी महाराष्ट्रांत पुण्याची भाषा ); इत्यादि सिद्धान्तांस ब्राह्मणांत आधार सांपडतो. प्रथम पूरूंचा ऋग्वेदांतील उल्लेख कसा आहे तो

पाहूं. ते सरस्वतीच्या उभय तीरांवर वसले होते, हें मं. ७, सू. ९६ यांत वसिष्ठानें वर्णिलें आहे. "उभे यत्ते महिना शुभ्रे अन्धसी अधिक्षियन्ति पूरवः।" असा या सरस्वतीच्या सूक्तांत उल्लेख आहे. सारांश, प्राचीन वसिष्ठाच्या काळीं पूरु सरस्वतीतीरावर वसले. सुदासावर त्यांनीं येथूनच पश्चिमेकडे दाशराज्ञ लढाईच्या वेळीं स्वारी केली असावी. पूरूला दस्यु म्हणजे मूळच्या रहिवाशांशींहि पुष्कळ वेळां लढावें लागलें असें दिसतें. वसिष्ठाच्या दुसऱ्या एका सूक्तांत पूरु राजाचा असा उल्लेख आहे. मं. ७, सूक्त ९ यांत "त्वं धृष्णो धृषता वीतहव्यं प्रावो विश्वाभिरूतिभिः सुदासम्। प्र पौरुकुत्सिं त्रसदस्युमावःक्षेत्रसाता वृत्रहत्येषु पुरुम्" अशी ऋचा आहे. या ऋचेवरून पुरुकुत्स हा पूरु राजा होता, असा तर्क कित्येक वैदिक विद्वान् करितात. पण मला वाटतें, यांतील प्रत्येक राजा निराळा आहे. वसिष्ठ इन्द्राला निरनिराळीं उदाहरणें देऊन म्हणतो, "वृत्रहत्येषु म्हणजे दासांच्या लढाईत तूं वीतहव्याचें रक्षण केलेंस, तसेंच सुदासाचें केलेंस, तसेंच पुरुकुत्सपुत्र त्रसदस्यूचें केलेंस व पूरूचें केलेंस." या चारी व्यक्ति निरनिराळ्या आहेत. उलट शंका येईल म्हणून ब्राह्मणांत एके ठिकाणीं हा पुरुकुत्स ऐक्ष्वाक होता असें स्पष्ट सांगितलें आहे, आणि ब्राह्मणाचें प्रामाण्य संहितेच्या खालोखाल आहे, हें मीं सांगितलेंच आहे. पुराणांतहि पुरुकुत्स आणि त्रसदस्यु हे राजे फक्त इक्ष्वाकु-कुळांतच सांपडतात. असो, हें एक विषयान्तर-पण जरूरीचें विषयांतर आहे. या ऋचेवरून पूरूला दस्यूशीं अथवा आर्यशत्रूंशीं लढावें लागलें असें स्पष्ट आहे. वृत्राशीं झालेल्या पूरूच्या युद्धाचा उल्लेख इतर सूक्तांतहि आहे. मं. १, सू. ५९ "यं पूरवो वृत्रहणं सचन्ते." "वृत्रांस मारणाऱ्या ज्या अग्नीचें पूरू सेवन करतात;" मं. १-१३१. "विदुष्टे अस्य वीर्यस्य पूरवः पुरो" "तुझ्या या सामर्थ्याचें पूरूंना पूर्वीं ज्ञान होतें." मं. ४, सू. २१ "हंता वृत्रं वरिवः पूरवे कः" "पूरूसाठीं वृत्राला कोणीं मारलें?" मं. ६, २०. "प्र पूरवः स्तवन्त एना यज्ञैः।" हे पूरु पुढें इतके प्रबल व प्रसृत झालें कीं, पूरु शब्दानें सामान्यतः मनुष्य असा अर्थ घ्यावा, असें यास्कानें सुचविलें आहे. याचाच प्रतिध्वनि 'अपौरवा तु हि मही न कदाचिद्भविष्यति' या पुराणांतील वचनांत ऐकूं येतो. पूरूच्या प्रसृत झालेल्या कुळांत अजमीढ झाला, याचा उल्लेख ऋग्वेदांत आहे. त्याच्या कुळांत पुढें भरत झाला, त्याचा उल्लेख

ऋग्वेदांत नाहीं, तथापि ब्राह्मणांत आहे; पण तेथें दौष्यन्ति हें विशेषण नेहमीं दिलेलें असतें. त्याच्या वंशांत कुरु झाला त्याचाहि उल्लेख ऋग्वेदांत नाहीं, पण ब्राह्मणांत पुष्कळ आहे. ऋग्वेदांत भरत व कुरु यांचा उल्लेख नसला, तरी ते ऋग्वेदसूक्तांच्या अखेरीपूर्वी झाले असा आपल्यासमोर पुरावा आहे. कारण, ऋग्वेदांतील शेटवशेवटच्या सूक्तांपैकीं देवापि आर्ष्टि षेणाच्या सूक्तात शंतनूचा उल्लेख आहे. हा शन्तनु पौरव शंतनु होय, असें बृहद्देवता यांत स्पष्ट सांगितलें आहे. याप्रमाणें या पूरुकुलाचा इतिहास ऋग्वेदाच्या अंतापर्यंत झाला. यानंतर ब्राह्मणांत जनमेजय पारीक्षिताचा उल्लेख वारंवार येतो आणि कुरु--पांचालांचाहि येतो. हे पांचाल कोण, हें आतां पाहूं.

पुराणांतील वंशावळीवरून पांचाल हीं पूरूच्याच कुलाची एक धाकटी शाखा होय. यांचा मूळ प्रसिद्ध पुरुष सृंजय. या सृंजयाचा ऋग्वेदांत उल्लेख आहे. या राजामुळें या कुलांतील लोकांना सृंजय असेंहि म्हणतात. त्याच्या वंशांत सहदेव, व त्याचा पुत्र सोमक झाला. याचाहि उल्लेख ऋग्वेदांत आहे. या सोमकानें राजसूय यज्ञ पर्वतनारदांच्या सल्ल्यानें अमुक तऱ्हेनें केला म्हणून तो मोठा चक्रवर्ती झाला, असा ब्राह्मणांत उल्लेख आहे. या राजावरून पांचालांना सोमकाः असेंहि नांव होतें. सृंजय, सोमक आणि पांचाल हीं तीन्हीं नांवें महाभारतांत उपयोगिलीं आहेत. पांचाल हें नांव पांच जाति किंवा कुळें एकत्र झाल्यावरून पडलें असावें. पांचाल म्हणजेच क्रिवि ( ऋग्वेदांतील एक नांव ) असें ब्राह्मणांत म्हटलें आहे. मं. ६, सू. २७ यांत "स सृंजयाय तुर्वशं परादाद्वृचीवतो दैववाताय शिक्षन्" अशी ऋचा आहे. याजवरून तुर्वश सृंजयांत मिळाले, असें दिसतें. मं. ४, सू. १५ यांत सृंजय व सोमक या दोघांचा उल्लेख आहे. "अयं यःसृंजये पुरो दैववाते समिध्यतें ॥" येथें सृजयाच्या अग्नीचा उल्लेख आहे. यावरून सृंजय मोठा यज्ञकर्ता झाला असें दिसतें. या सूक्तांत शेवटीं सहदेवकुमार सोमक याला आशीर्वाद दिला आहे. "एवं वां देवावश्विना कुमारः साहदेव्यः दीर्घायुरस्तु सोमकः" यावरून हें सूक्त सोमकाच्या वेळीं झालें असावें. पुराणवंशावळीवरून सोमकापासून द्रुपद चौथा पुरुष येतो. याजवरून भारतीय युद्ध या सूक्तानंतर सरासरी शंभर वर्षांनीं झालें असावें, असें अनुमान मीं अन्यत्र काढलें आहे.

तुर्वश शेवटीं सृंजयांत मिळाले; पण यदु हे निराळे राहून त्यांनीं यमुनातीरीं वसाहत केली. या कुळांत पुढें श्रीकृष्ण झाल्यानें या कुलाचें नांव अजरामर झालें आहे. ऋग्वेदकाळीं यदु–तुर्वश एकत्र असावेत. त्यांचा एकत्र उल्लेख ऋग्वेदांत पुष्कळदां येतो. कांहीं ठिकाणीं शत्रूच्या नात्यानें येतो, तर कांहीं ठिकाणीं प्रशंसापर येतो. प्राचीन सूक्तांच्या वेळीं ते हिंदुस्थानांत नुकतेच आले असावे व पुढच्या सूक्तांच्या वेळीं ते येथें कायमचे रहिवासी झाले असावे. ऋषींवरहि हा फरक अवलंबून आहे. मं. ७, सूक्त १९ यांत वसिष्ठ म्हणतो, "नि तुर्वशं नि याद्वं शिशीह्यतिथिग्वाय शंस्यं करिष्यन्॥" अतिथिग्व हें नांव प्रसिद्ध दिवोदासाचें आहे. 'दिवोदासाकरितां तुर्वश आणि यदु यांना हे इंद्रा, तूं मार.' आतां. मण्डल ८ हें काण्वऋषींचें आहे. त्यांतील पुष्कळ सूक्तांत यदु-तुर्वशांचा चांगला उल्लेख आहे. ४।७।९।१०।४५ इतक्या सूक्तांत हा उल्लेख आहे. ४ सूक्तांत देवातिथि काण्व म्हणतो, "मीं ६००० गाई तुर्वशांपासून घेतल्या." यांत तुर्वश–यदूंचा उल्लेख तीनदां आला आहे. "महत्ते वृष्णो अभिचक्ष्यं कृतं पश्येम तुर्वशं यदुम्" वगैरे तीन ठिकाणीं उल्लेख आहे. सूक्त ७ मध्यें पुनर्वत्स काण्व म्हणतो, 'येनाव तुर्वशं यदुं येन कण्वं धनस्पृतम्।' 'ज्यानें हे मरुतांनो, तुम्ही यदु, तुर्वश व कण्व यांचें रक्षण केलें.' सूक्त ९ मध्यें शशकर्ण काण्व म्हणतो, 'इमे सोमासो अधि तुर्वशे यदाविमे कण्वेषु वामन." सूक्त १० मध्यें प्रगाथ काण्व म्हणतो, 'यद्द्रुह्यव्यनवि तुर्वशे यदौ हुवे वामथ मा गतम्॥' "हे आश्विनींनो तुम्हीं द्रुह्यु, अनु, तुर्वश आणि यदु यांजवर कृपा केलीत." आणि सूक्त ४५ मध्यें त्रिशोक काण्व म्हणतो, "सत्यं त्ततुर्वशे यदौ विदानो अन्हवायम्॥" या सर्व सूक्तांत काण्ववंशाचे ऋषि यदुतुर्वश व द्रुह्युअनु यांचें कल्याण इच्छितात. याचें इंगित असें दिसतें कीं कण्व हा चंद्रवंशांतला होता. पुराणांतील वंशावळीवरून कण्व पूरूच्या वंशांतला होता. त्याची उत्पत्ति मतिनारापासून झाली असें वर्णन आहे. हा मतिनार दौष्यन्ति भरताचा चौथा पूर्वज होय. दौष्यन्ति भरताचा व कण्वाचा संबंध याजवरून चांगला जुळून येतो व दुष्यंताच्या राज्यांत कण्वाचा आश्रम होता यांत आश्चर्य वाटत नाहीं. ब्राह्मणांतहि भरताचा पुरोहित कण्वच आहे. चंद्रवंशाचे शुभेच्छु जसे कण्व होते, तसे आंगिरसहि होते असें दिसतें. आङ्गिरसांच्या कित्येक सूक्तांत यदुतुर्वशांचा व कण्वाचा उल्लेख आहे. मं. १, सू. ३६ यांत घोर ऋषि म्हणतो, "अग्निर्ववे सुवी-

र्यमग्निः कण्वाय सौभगम् । अग्निना तुर्वशं यदुं परावत उग्रादेवं हवामहे ॥"
हा घोर आंगिरस असावा. मं. १, सू. ५४ यांत सव्य आंगिरस म्हणतो, "त्वमाविथ नर्यं तुर्वशं यदुं त्वं तुर्वीतिं वय्यं शतक्रतो ।" शेवटचें मं. १, सू. १०८ प्रारंभीं सांगितलेलें होय. यांत कुत्स, आंगिरस, यदु, तुर्वश, द्रुह्यु, अनु आणि पूरु या पांचांचाहि उल्लेख करतो. याचा ऋषि आंगिरस याचें महत्त्व पुढें सांगतां येईल असें मीं पूर्वी म्हटलें तें सांगण्याचा प्रसंग येथें आहे. या तीन सूक्तांचे ऋषि आङ्गिरस आहेत यावरून भरत किंवा सूर्यवंशी क्षत्रिय यांचे ऋषि जसे वसिष्ठ व विश्वामित्र होते, त्याप्रमाणें चंद्रवंशी क्षत्रियांचे काण्व व आङ्गिरस दिसतात. छांदोग्यांत कृष्ण देवकीपुत्राला घोर आङ्गिरसानें एका औपनिषदविद्येचा उपदेश केला असें म्हटलें आहे त्याची संगति वरील माहितीवरून चांगली बसूं शकते. हा कृष्ण यदुकुळांतीलच प्रसिद्ध श्रीकृष्ण होय असें अनुमान दृढ होतें. असो, यदुकुळवंशांचा आणखी दोन चार ठिकाणीं चांगल्या प्रकारचा उल्लेख आहे. मं. १, सू. १७४; मं. ४, सू. ३०; मं. ५, सू. ३१; मं. ६, सू. ४५ आणि मं. १०, सू. ४९. शेवटच्या सूक्तांत इंद्र वैकुण्ठ म्हणतो, "अहं सप्तहा नहुषो नहुष्टरः प्राश्रावयं शवसा तुर्वशं यदुम् ॥" या ऋचेंत नहुषाचाहि आणखी उल्लेख आहे. या सर्व उल्लेखांवरून ऋग्वेदकाळीं यदुवंशाचा बराच बोलबाला असावा.

आतां आपण अनु आणि द्रुह्यु या राहिलेल्या दोन शाखांचा विचार करूं. मं. ७, सू. १० यांत द्रुह्यूचा स्वतंत्र उल्लेख आहे तो इतरांबरोबर नाहीं. पण मं. ६, सू. ४६ त द्रुह्यूचा आणि पूरूचाच आहे. "यद्वा तृक्षौ मघवन्द्रुह्यावाजने यत्पूरौ यच्च वृष्णयम् ।" पूरूंच्या धाकट्या शाखेंत म्हणजे पांचालांत हे लोक सामील झाले असावे. पण पुराणकाराच्या मतानें द्रुह्यूचे वंशज म्हणजे गांधार होत. अनूंचा स्वतंत्र उल्लेख मं. ८, सू. ७४ यांत आहे. "आगन्म वृत्रहन्तमं ज्येष्ठमग्निमानवम् ।" यावरून आनव राजेहि मोठे यज्ञकर्ते होते. त्यांचें कुळ म्हणजे पंजाबांतील शिबि औशीनराचें कुळ होय, असें पुराणकार मानतात.

येथवर यदु, तुर्वश, अनु, द्रुह्यु आणि पूरु यांचा ऋग्वेदांतील इतिहास झाला. यांचे पूर्वज ययाति, नहुष, आयु आणि पुरूरवा पुराणमतानें होते, यांचाहि उल्लेख ऋग्वेदांत आहे. एका सूक्तांत पुरूरवा व ययाति यांचा उल्लेख एकत्र आला असून, ययाति पुरूरव्याच्या वंशांत झाला कीं

नाहीं अशी पाश्चात्य पंडितांची शंका नाहींशी होते असें मला वाटतें. मं. १, सू. ३१ हें हिरण्यस्तूप आङ्गिरसाचें आहे. यांत प्रथम असें म्हटलें आहे कीं, "हे अग्नि! तूं प्रथम आङ्गिरसाला माहित झालास, नंतर विवस्वानास, नंतर मनूला आणि पूरुरव्याला." "त्वमग्ने मनवे द्यामवाशयः पुरूरवसे सुकृते सुकृत्तरः" व सूक्ताच्या शेवटीं "मनुष्वदग्ने अङ्गिरस्वदङ्गिरो ययातिवत्सदने पूर्ववच्छुचे" अशी ऋचा आहे. अर्थात् पुरूरव्याच्या ठिकाणीं ययाति हें नांव आलें आहे, तें तत्स्थानापन्न स्पष्ट आहे; म्हणजे ययाति हा पुरूरव्याच्या वंशांतला होय हें उघड आहे. पुरूरवा प्रतिष्ठान अथवा अलाहाबाद् येथें राज्य करीत होता व ययातीनें आपल्या पांच पुत्रांस भरतखण्ड तेथून वांटून दिलें, त्यांत पूरूस अलाहाबाद् मिळालें ही पुराणांची कल्पना चुकीची व मागूनची आहे. वेदांवरून पुरूरवा हिमालयोत्तर होता असें दिसतें. आणि पूरूनें प्रथम वस्ती सरस्वतीतीरावर केली; तर मग प्रतिष्ठानांत पूरू कसा येईल? आतां पुरूरव्याची उत्पत्ति बुधापासून, बुध चंद्रापासून, वगैरे गोष्टींस ऋग्वेदांत आधार बहुधा नाहीं असें वाटतें; निदान मला सांपडला नाहीं. या दुसऱ्या वंशाच्या लोकांस चंद्रवंश नांव महाभारतापासून पुढें कां पडलें, हा एक प्रश्न महत्त्वाचा आहे. पूर्वीच्या वंशास वैवस्वत मनूचा वंश म्हणतात. भारत हें नांव त्यांचें होतें. यांतील भरतआदित्य अशी उपपात्ति लागली. अर्थात् तो सूर्यवंश झाला. तेव्हां दुसरा वंश उपमानानें चंद्रवंश ठरला. मानवी वंश चंद्रसूर्यांपासून उत्पन्न होत नाहींत, हें खरें. तथापि आपल्या नामांकित पुरुषांची उत्पत्ति देवांपासून, मानण्याचा प्रघात चोहोंकडे आहे. ग्रीक रोमन लोकांत देवापासून पूर्ववीरांची उत्पत्ति मानीत असत हें प्रसिद्ध आहे. इतकेंच नव्हे, अमेरिकेंत स्पानिश लोक गेले तेव्हां प्रसिद्ध स्पानिश वीरांना मेक्सिकोचे लोक सूर्यपुत्र मानीत. त्याप्रमाणें ही कल्पना उत्पन्न झाली असावी. वसिष्ठाला मित्रावरुणाचा उर्वशीपासून झालेला पुत्र ऋग्वेदांतच मानला आहे, त्याच अनुरोधानें ही कल्पना प्रसृत झाली असावी; किंवा अन्यत्र दाखविल्याप्रमाणें सूर्यवंशाचे आर्य सौरमानाचें वर्ष पाळीत व पांडवादि चांद्र वर्ष पाळीत, याजवरून ही कल्पना प्रसृत झाली असावी. कांहीं असो, सूर्य-चंद्र-वंश हीं नांवें ऋग्वेदांत नाहींत, तथापि भरत व यदुतुर्वशद्रुह्युअनुपूत यांचे वंशज ऋग्वेदांत प्रसिद्ध आहेत, आणि पहिल्यांचे ऋषि वसिष्ठ, भरद्वाज व विश्वामित्र असून दुसऱ्यांचे काण्व व आङ्गिरस होते यावरूनहि हेच सूर्यवंशी व चंद्रवंशी क्षत्रिय असें अनुमान बहुतेक निश्चयानें ठरतें.



# जगांतील शकपद्धति.

या विषयाचा ऊह करतांना प्रथम शक शब्दाचा अर्थ व व्युत्पत्ति यांचा विचार केला पाहिजे. हा शब्द मराठींत रूढ व यौगिक या दोन्ही अर्थानीं वापरला जातो. " शके बाराशें बारोत्तरें " या वाक्यांत शक शब्द यौगिक अर्थानें वापरला आहे. " शक नांवाच्या कालमानपद्धतीला सुरू होऊन १२१२ वर्षें गेलीं असतां " असा या वाक्याचा अर्थ आहे. पंचागांत " कलौ षट् शककर्तारः " असें वचन आपण नेहमीं पाहतों, त्यांत शक शब्द सामान्यार्थानें कोणत्याहि कालमापनपद्धतीला उद्देशून वापरलेला आहे. विशेषवाचक शब्द रूढार्थानें सामान्यवाचक झाल्याचीं उदाहरणें इतर भाषांप्रमाणें मराठींत बरींच आढळतात. 'तांब्या' 'पीतांबर' या शब्दांचा यौगिक अर्थ जाऊन हल्लीं ते शब्द सामान्यार्थींच रूढ झाले आहेत. पिंवळा पितांबर किंवा तांब्याचा तांब्या असें म्हणतांना आपल्या मनास कधींच धक्का बसत नाहीं. त्याच प्रकारचा शालिवाहन शक हा प्रयोग आहे, असें समजण्यास हरकत नाहीं. शक शब्द जसा सामान्यवाची झाला आहे, तसा संस्कृतांत पूर्वीं संवत् शब्द होता असें दिसतें. संवत् हें संवत्सराचें संक्षिप्त रूप आहे. हल्लीं बहुधा संवत् शब्द विक्रम शकालाच लावितात. विक्रम संवत् असाहि 'शालिवाहन शक' या पदांच्या सान्निध्यानें आपण पुष्कळ वेळां प्रयोग करितों. याशिवाय तिसरा शब्द याच अर्थी रूढ होऊं पाहणारा म्हटला म्हणजे 'सन' होय. सन शब्द आरबी असून त्याचा अर्थ आयुष्य असा आहे. हा शब्द बहुधा हिंदुस्थानच्या बाहेरच्या शकांना लावतात. 'ईसवी सन' किंवा 'हिजरी सन' यांच्या ऐवजीं 'ईसवी शक' हिजरी शक' असा मराठींत प्रयोग गोड लागत नाहीं. भाषेस कांहीं स्वदेशीपरदेशीची निवडानिवड आहे असें दिसतें. परकीय कालपद्धतीस सन हा परकी शब्द लावण्याकडे व हिंदुस्थानांतील कालपद्धतीस शक शब्द लावण्याकडे मराठी भाषेची प्रवृत्ति दिसते. असो, या लेखांत शक शब्द सामान्यार्थी कोणत्याहि कृत्रिम कालमापनपद्धतीस उद्देशून वापरला आहे हें वाचकांच्या लक्षांत येईल

वर शक शब्दाचा अर्थ कृत्रिम कालमापनपद्धति असा केला आहे. येथें कृत्रिम शब्द महत्त्वाचा असून त्यानें नैसर्गिक कालमापनापासून शक

शब्दाची भिन्नता स्पष्ट करून दाखविली आहे. दिवस, महिने, ऋतु, वर्ष इत्यादि कालविभाग नैसर्गिक आहेत. पण या विभागांनीं कालज्ञापनाचें काम भागत नाहीं ही गोष्ट थोडा विचार केला म्हणजे सहज लक्षांत येण्यासारखी आहे. अमुक गोष्ट कधीं झाली, असा प्रश्न केला असतां अमुक वर्षीं झाली असें सांगतांना कोठून तरी प्रथम प्रारंभ करावा लागतो; व हा प्रारंभ नैसर्गिक होऊं शकत नाहीं. जसें आकाश अनंत आहे, त्याप्रमाणें कालहि अनंत आहे. अनंत आकाश मोजण्याकरितां जसा कोठें तरी प्रारंभबिन्दु कल्पित मानवा लागतो, त्याप्रमाणेंच अनंत काल मोजण्याकरितां एखादा कल्पित बिंदु घ्यावा लागतो. त्याशिवाय काल सांगतां यावयाचा नाहीं. कालगतीच्या रेषेला 'पाऱ्याबोला'चें स्वरूप आहे असें मानूं या. ज्याप्रमाणें या वृत्ताचीं दोन्ही टोंकें अनंत आकाशांत जातात, त्याप्रमाणें काळ अनंतापासून आला आहे आणि अनंताकडे चालला आहे. या वृत्ताला मोजणें म्हणजे कोठें तरी प्रारंभबिंदु कल्पिला पाहिजे. तसा कल्पिला म्हणजे बाकीचा कोणताहि बिंदु अधिक व उणे या खुणांनीं दाखवितां येईल. उदाहरणार्थ– कालगतीला ख्रिस्ताचा जन्म हा प्रारंभबिंदु कल्पिला म्हणजे पुढील सर्व गोष्टी A. C. या संज्ञेनें व मागील सर्व गोष्टी B. C. या संज्ञेनें दाखवितां येतील; व अशीच काल मोजण्याची पद्धति ख्रिस्ती सनांत चालू आहे. असा प्रारंभबिंदु कल्पनेनें घ्यावा लागतो, हा एक विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. सूर्यचंद्रादि ज्योतींच्या भ्रमणांत कोठेंच असा विशिष्ट बिंदु सांपडत नाहीं. पृथ्वीचें सूर्याभोंवतीं एक भ्रमण झालें म्हणजे आपण एक वर्ष झालें असें समजतों. वर्ष हें मैल, कोस इत्यादि आकाशमापाप्रमाणें आपलें कालमापाचें मान आहे. याहूनहि मोठीं मानें आपल्यास सांपडतात. बार्हस्पत्य मान हें साठ वर्षांचें ठोकळ मानानें आहे. यालाच आपण संवत्सरचक्र म्हणतों. 'अमुक संवत्सरे' असें आपण नेहमीं म्हणतों. पण तेवढ्यानें काल निश्चित होत नाहीं. कारण तोच संवत्सर ६०।६० वर्षांनीं या अनंत काळाच्या गतींत अनंत वेळां येईल हें उघड आहे. यामुळें अमुक संवत्सरांत अमुक गोष्ट घडली एवढ्यानें कालनिश्चय मुळींच होत नाहीं. याहून मोठालीं चक्रें सांपडतील, किंवा उत्पन्न होतील. पण अशीं चक्रें शकाचें काम करणार नाहींत हें उघड आहे. सप्तर्षिचक्र आपल्या फार प्राचीन ज्योतिष्यांनीं मानलें आहे. सप्तर्षि प्रत्येक

नक्षत्रीं शंभर वर्ष राहतात असें कल्पून हें सप्तर्षिचक्र २७०० वर्षांचें आहे असें मानतात. तरी पण सप्तर्षिचक्राच्या उदाहरणार्थ १७०० व्या वर्षी अमुक गोष्ट झाली असें विधान केल्यानें त्या गोष्टीचा काल निश्चित होत नाहीं. कारण अशीं सप्तर्षिचक्रें कालगतींत अनेक होत आहेत. किंबहुना महायुगादि किंवा कल्पादि सुद्धां हा प्रारंभबिंदु होऊं शकत नाहीं. महायुगादि व कल्पादि अनंत कालांत अनंत होऊन गेले व जातील. यामुळें कालनिश्चय करण्याकरितां कांहीं तरी मानवी कल्पित खूण मानावी लागते. निदान कल्पाला कल्पादि नांवें देऊन हल्लींच्या कालाशीं त्याचें अन्तर सांगावें लागतें. सारांश, कालमापनपद्धतीला एक कल्पित प्रारंभ मानावाच लागतो आणि अशा प्रारंभापासून वर्षाच्या मापानें काल मोजणें या कृत्रिम कालमापनपद्धतीला शक शब्द लागू केला आहे.

अशा शकपद्धति फार प्राचीन काळापासून या पृथ्वीवर सुरू झाल्या असाव्या असें आपल्यास प्रथमदर्शनीं वाटतें. परंतु वस्तुस्थिति तशी नाहीं. शकपद्धतीच्या जनकत्वाचा मान पाश्चात्य लोक Eratosthenes ( इराटास्थेनीस ) याजला देतात. अलेक्झांडरनें आपल्या स्वारीबरोबर जे अनेक विद्वान लोक घेतले होते, त्यांत इराटास्थेनीस हा एक होता. तो अलेक्झांड्रिया येथील पुस्तकालयाचा अधिकारी असून त्यानें भूगोल व इतिहास यांचा चांगला अभ्यास करून या विषयावर ग्रंथ लिहिले होते. इतिहास सांगतांना प्रथम शकपद्धतीचा अवलंब त्यानेंच केला असें दिसतें. इराटास्थेनीस याच्या पूर्वीं लोक कालनिर्देश कसा करीत हा प्रश्न येथें साहजिक उपस्थित होतो व इराटास्थेनीसच्या पूर्वीं शकपद्धतीचा उपयोग लोकांनीं कां केला नाहीं हेंहि आपल्यास गूढ वाटतें. परंतु याचें समाधान उघड आहे. शकपद्धतीला कल्पित प्रारंभबिंदु घ्यावा लागतो हें वर निर्दिष्ट झालेंच आहे. सर्वांना संमत होईल असा प्रारंभबिंदु घेणें बरींच वर्षें प्रथम प्रथम अशक्य झालें असावें. राजेलोकांना आपला राज्यारोहण–काल हा प्रारंभ घेणें अगदीं साहजिक सुचलें असावें, हें जरी खरें आहे–तरी, एक राजा गेल्यावर दुसरा राजा गादीवर आला म्हणजे त्यालाहि आपल्या राज्यारोहणापासून वर्षें मोजण्याची इच्छा व्हावी हेंहि साहजिक आहे. जर ज्योतिष्यांना नैसर्गिक प्रारंभबिंदु मिळाला असता, तर वर्ष, ऋतु, महिने याप्रमाणें तो लवकरच सर्व लोकांनीं घेतला असता; इतकेंच नव्हे, तर

सर्व देशांत एकच शकपद्धति वर्षमासदिनादि मानाप्रमाणें अमलांत आली असती. परंतु प्रारंभबिंदु कल्पित घेणेंच शक्य असल्यामुळें सर्वसंमत प्रारंभबिंदु पुष्कळ काळपर्यंत लोकांना मिळाला नाहीं हें उघड आहे. यामुळें शकपद्धति सुरू होण्यापूर्वी बहुधा राजांच्या राज्यारोहणाच्या वर्षांनीं इतिहास सांगितला जाई. ही गोष्ट इजित, बाबिलोन, आसिरिया, चीन व हिंदुस्थान या पुराण्या देशांच्या इतिहासावरून स्पष्ट दिसते. अलेक्झांडराबरोबरच्या विद्वान् मंडळीपैकीं मानिथो यानें इजिप्त देशाचा पुराणा इतिहास मिळविला व लिहून ठेवला; व बेरोसस यानें बाबिलोन–आसिरियाच्या इतिहासाचा शोध करून तो लिहून ठेवला. त्यांनीं लिहिलेले इतिहास अद्याप उपलब्ध असून प्रसिद्ध आहेत. त्यांत सर्व इतिहास वंशावळीच्या रूपानें दिलेला आहे. अमुक वंश झाले, त्यांत प्रत्येक वंशांत अमुक राजे झाले, अमुक राजाच्या कारकीर्दीच्या अमुक वर्षी अमुक गोष्ट झाली, अशाच स्वरूपाचा हा इतिहास आहे. हा इतिहास थोडाथोडका नसून अलेक्झांडरच्या पूर्वी तीनपासून चार हजार वर्षांचा आहे. एवढ्याहि दीर्घ काळांत शकपद्धति सुरू झाली नाहीं हें प्रथमतः आश्चर्य वाटण्यासारखें आहे. It seems strange that vague counting by generations should so long have prevailed and satisfied the wants of inquiring men and that so simple and precise and seemingly obvious plan of counting by years did not occur to any investigator before the time of Eratosthenes ( Chronology, Encyclopaedia Britannica ). या शंकेचें समाधान माझ्या मतें वर दिल्याप्रमाणें आहे. शकपद्धतीला कल्पित प्रारंभबिंदु घ्यावा लागतो व असा कल्पित बिंदु सर्वसंमत सांपडण्यास बरींच वर्षे कठिण गेलें असावें, ही याची उपपत्ति सयुक्तिक दिसते. असो, प्राचीनकाळीं इजिप्त व बाबेलोनिया या देशांचा सुमारें तीन चार हजार वर्षांचा इतिहास वंशावळींत दिलेला आहे. चीन व हिंदुस्थान या देशांतहि अशीच स्थिति होती हें मी पुढें सांगणार आहें. शकपद्धतीचें जनकत्व Eratosthenes ( इराटोस्थेनीस ) याजकडे आहे, व त्यापूर्वी इतिहास वंशावळीच्या स्वरूपानें दिला जाई, या दोन गोष्टींचा निर्देश करून आपण पाश्चात्य देशांत कोणकोणत्या शकपद्धति उत्पन्न झाल्या या विषयाकडे वळूं. याची माहिती Encyclopaedia Britannica मधील Chronology या लेखामध्यें दिलेली आहे ती मनोरंजक अस-

त्यानें सारांशरूपानें मराठी वाचकांपुढें ठेवितों. हिंदुस्थानांतील शकपद्धती संबंधाच्या वादग्रस्त विषयांचा उलगडा करण्यासहि या माहितीचा उपयोग होईल, व अशा रीतीनें ही माहिती फायदेशीर आहे.

सर्वांत जुना शक पाश्चात्य देशांत नबूनासर यानें जारी केला. बाबिलोनिया येथील मोडकळीस आलेलें राज्य पुन्हां संस्थापन करणारा हा नबूनासर राजा इसवी शकापूर्वी आठव्या शतकांत झाला व त्यानें शक सुरू केला तो ख्रिस्तापूर्वी ७४७ व्या वर्षी सुरू केला. बाबिलोन येथील राज्य फार जुनें, म्हणजे यापूर्वी सरासरी ३००० वर्षांचें होतें. एवढ्या मुदतींत राज्य अनेक वेळां उलथेंपालथें झालें होतें. परंतु तेथील प्रीस्ट अथवा ब्राह्मण लोक धर्माच्या व विद्येच्या कामांत पुढारी मानले जात, यामुळें बाबिलोनचा इतिहास तीन हजार वर्षांचा त्यांनीं जतन करून ठेविला होता व तसेंच ज्योतिषविषयक गोष्टीहि त्यांनीं लिहून ठेविल्या होत्या. त्या, व अनेक कौलांवर व विटांवर लिहून ठेविलेली माहिती, नबूनासर यानें एके ठिकाणीं संगतवार जमवून लिहून काढली. नबूनासर हा मोठा विद्याप्रिय राजा होता. त्यानें त्या वेळेस जसें आपण हल्लीं संशोधकाचें काम करतों तसें केलें असें म्हणावयास हरकत नाहीं. नबूनासर यानें पुन्हां संस्थापित केलेलें राज्य सुमारें दोनशें वर्षें चालून शेवटीं तें पर्शियन लोकांचा बादशहा Cyrus अथवा खुशरू याणें बुडविलें; तें पुन्हां उर्जित दशेला आलें नाहीं. पर्शियन लोकांचें राज्य अलेक्झांडर यानें यानंतर सुमारें दोनशें वर्षांनीं बुडविलें. अलेक्झांडर याचा विचार बाबिलोन ही आपली राजधानी करण्याचा होता, परंतु अलेक्झांडर याचा लवकरच अंत झाला व त्याच्या राज्याचे तुकडे झाले. पूर्वी लिहिल्याप्रमाणें अलेक्झांडरच्या वेळेस बेरोसस यानें बाबिलोनियन लोकांचा इतिहास जुन्या वंशावळी मिळवून लिहून ठेविला. बाबिलोनियन लोकांच्या ज्योतिषविषयक ज्ञानाचाहि फायदा ग्रीक लोकांनीं घेतला. नबूनासर यानें सुरू केलेला शक या ज्योतिषशास्त्रांत चालू असे. यामुळें असा चमत्कार झाला कीं, जरी बाबिलोनचें राज्य नाहींसें झालें तरी नबूनासर याचा शक ज्योतिष विषयांत ग्रीक लोकांतहि सुरू राहिला. अलेक्झांड्रिया येथें टॉलमीच्या वेळेस प्रसिद्ध ज्योतिषशाळा होती, त्या शाळेंत नबूनासर याचाच शक चालू असे, ही गोष्ट या शकाविषयीं विशेष लक्षांत ठेवण्यासारखी

आहे. आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी म्हटली म्हणजे ही कीं, हा शक नबूनासर यानें सुरू केला तेव्हांपासूनच अमलांत आला.

ग्रीस देशांत जारी असलेल्या आलिंपियाड शकाची माहिती सांगितली म्हणजे वरील दुसऱ्या गोष्टीचें महत्त्व वाचकांच्या लक्षांत नीट येईल. ग्रीस देशांत आलिंपियाड नांवाचा शक अमलांत आला. तो ख्रिस्ती सनापूर्वी ७७६ व्या वर्षापासून मोजीत. पण ही शकगणनापद्धति प्रारंभापासून अमलांत आली नाहीं. ती सरासरी पांचशें वर्षांनंतर पुढें अमलांत आली. ग्रीस देशांत (Olympic games) ऑलिंपस येथील खेळ दर चार वर्षांनीं होत असत व या खेळांत सर्व ग्रीक देशांतील निरनिराळ्या संस्थानांतील लोक सामील होऊन शर्यती लावीत. त्यांत चालण्याच्या शर्यतींत जो पहिला येत असे त्याचें नांव तेथील देवळावर खोदून ठेवीत. यामुळें प्रत्येक चार वर्षांच्या समूहाला त्या जिंकणाराचें नांव पडत असे. हे खेळ सर्व ग्रीक लोकांना पूज्य असल्यामुळें Olympiad नांवाचा शक ख्रिस्ती सनापूर्वी सुमारें तिसऱ्या शतकांत वापरण्याचा संप्रदाय सुरू झाला. त्यावेळेस जितक्या शर्यती जिंकणारांचीं नांवें खोदलीं गेलेलीं होतीं, तितक्या संख्येस चोहोंनीं गुणून आलिंपिक खेळ ख्रिस्ती सनापूर्वी ७७६ वर्षे सुरू झाले, निदान त्यावेळेस तरी जिंकणारांचीं नांवें खोदण्याचा परिपाठ सुरू झाला, असें सिद्ध धरून या शकाचें प्रारंभवर्ष ७७६ ख्रिस्ता पूर्वीचें ठरविलें गेलें. हा शक ग्रीस देशांत जारी होता हें उघडच आहे; व तो जरी ख्रिस्ती सनापूर्वी तिसऱ्या शतकापासून उपयोगांत येऊं लागला तरी त्याचें प्रारंभस्थान ख्रिस्ती सनापूर्वी ७७६ वर्षापासून धरलें गेलें, व तेंहि साधार माहितीवरून.

हीच गोष्ट रोमन लोकांत जारी असलेल्या शकाला लागू आहे. रोम शहराची भरभराट होऊन त्याचें राजकीय वर्चस्व जेव्हां वाढलें, तेव्हां रोमन लोकांना आपल्या शहराचा अभिमान वाटूं लागला. ह्यामुळें रोमन लोकांत रोमशहरच्या स्थापनेपासून रोमन शकाचा आरंभ मानण्याविषयीं जी कल्पना निघाली ती साहजिकच सर्वमान्य झाली. ही कल्पना ख्रिस्ती सनापूर्वीच्या पांचव्या शतकांत निघाली. तेव्हां रोम शहराला स्थापन होऊन किती वर्षें झालीं असावीं याची कल्पना लोकांस दंतकथेवरून माहित असावी. रोम्युलस याणें हें शहर स्थापिलें व तो रोमचा पहिला राजा होता, इत्यादि माहिती लोकांत प्रचलित असणें साहजिक आहे.

या माहितीवरून रोमशहरची स्थापना खि. स. पूर्वी ७५३ व्या वर्षी झाली असें ठरविलें जाऊन, रोमन लोकांनीं रोमन शकाचें आरंभस्थान ७५३ खिस्ती सनापूर्वीच्या वर्षाच्या एप्रील माहिन्याची पहिली तारीख हें मानलें. म्हणजे खि. पू. ७५२ ची एप्रिल १ हें पहिलें रोमन शकवर्ष यापमाणें ही पद्धति खिस्तीसनापूर्वीच्या पांचव्या शतकांत सुरू झाली. ग्रीक लोकांच्या शकाचें प्रारंभस्थान जितकें निश्चित पुराव्यावरून ठरविलें गेलें, तितक्या निश्चित पुराव्यावरून रोमन शकाचें प्रारंभस्थान ठरविलेलें नसलें तरी तें केवळ काल्पनिक नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे.

पाश्चात्य देशांतील चौथा महत्त्वाचा शक म्हणजे इसवी सन हा होय. हा सन खिस्ताच्या जन्मवर्षापासून मोजतात हें बहुतेकांस विश्रुत आहे. पण हा शक प्रारंभवर्षापासून अमलांत आला नाहीं ही गोष्ट पुष्कळांस माहीत नाहीं, व हें वाचून पुष्कळांस आश्चर्यहि वाटेल. इसवी सनाच्या साहाव्या शतकांत इताली देशांतील छोटा डायोनिसियस ( Dyonisius the Little ) नांवाच्या एका रोमन धर्माधिकाऱ्यानें हा शक उपयोगांत आणण्याचें सुरू केलें व तो लवकरच चोहोंकडे प्रचारांत आला; म्हणजे खिस्ताच्या जन्मानंतर पांचशें साडे पांचशें वर्षांनीं हा शक उपयोगांत येऊं लागला. इतक्या मुदतीनंतर खिस्ताच्या जन्माचें नक्की वर्ष ठरविणें साहजिकच कठीण होतें. तरी तें वर्ष ठरवून हा शक डायोनिसियस यानें सुरू केला. या ठरविण्यांत चार वर्षांची चुकी झाली आहे, असें आतां इतिहाससंशोधक मानतात. म्हणजे इ० स० शून्य या वर्षी खिस्ताचा जन्म झाला नसून तो इ० स० पू० चौथ्या वर्षी झाला असें हल्लींचे इतिहासकार मानतात. असो, इ० स० च्या सहाव्या शतकांत हा शक उपयोगांत येऊं लागला, त्याचे पूर्वी लोक कोणता शक वापरीत हा प्रश्न साहजिक उपस्थित होतो. प्रारंभीं प्रारंभीं खिस्ती धर्माचा प्रसार होण्यापूर्वी ग्रीस देशांत आलिंपियाड शक व रोमन राज्यांत रोमचा शक वापरीत असत हें उघड आहे. रानटी जर्मन, गाथ वगैरे लोकांत कोणताच शक नव्हता असें दिसतें. रोमन राज्यांत कानस्टंटाईन बादशहाच्या अमलांत खिस्ती धर्माची चांगलीच स्थापना झाल्यावरही बरींच वर्षे हा शक जारी नव्हता व धर्मसंस्थांत Cycle of Induction नांवाचें एक चक्र मोजीत असत असें दिसतें. हल्लीं यूरोप खंडांतील सर्व

देशांत खिस्ती धर्म मानला गेला आहे व हा सन त्या धर्माच्या संस्थापकाच्या नांवाचा असल्यामुळें हा शक सर्व देशांत मान्य झाला आहे. याचा प्रचार अमेरिका, आस्ट्रेलिया, आफ्रिका व खुद्द आशिया या खंडांतहि झाला आहे. या सनाचा उपयोग करणारे लोक किती आहेत याचा विचार केला तर त्यांची संख्या सर्वांत मोठी निघेल. सारांश, हा शक हल्लीं बहुतेक जगांत मान्य आहे व जोंपर्यंत खिस्ती धर्म अमलांत राहील तोंपर्यंत खिस्ती देशांत दुसरा कोणताहि शक सुरू होईल असा संभव दिसत नाहीं. सारांश, हल्लींच्या स्थितीचा विचार करितां हा शक भाग्यवान् म्हणजे फार प्रसृत असून दीर्घायुषी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

यानंतरचा महत्त्वाचा शक म्हटला म्हणजे हिजरी सन हा होय. हा ६२२ इ. स. पासून सुरू झाला. हा मुसलमानी धर्माचा संस्थापक महमद याच्या चरित्राशी संबद्ध असून, मुसलमानी धर्म ज्या देशांत व लोकांत चालू आहे तेथें हा प्रचलित आहे. महंमद पूर्वधर्मीयांच्या छळामुळें मक्का शहर सोडून मदीना शहरीं पळाला व तेथें त्याला चांगले अनुयायी मिळून तेथून महमंदी धर्माचा उत्कर्ष सुरू झाला म्हणून त्या वर्षापासून तो मोजतात व याला हिजरी सन म्हणजे पळाल्याचें वर्ष असें नांव मिळालें आहे. हा शक प्रारंभवर्षापासूनच अमलांत आला असें दिसतें. हा शक धर्मसंबंधीं असल्यामुळें खिस्ती धर्माप्रमाणेंच दीर्घायुषी होईल असा अंदाज आहे; व खिस्ती धर्माच्या खालोखाल याचा प्रसार आहे. या शकपद्धतींत जें वर्ष मापास घेतलें आहे, तें चांद्रवर्ष आहे, ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. बाकी सर्व शकांत मोजण्याचें माप सौरवर्ष घेतलेलें आहे. सौर वर्ष ३६५$\frac{1}{4}$ दिवसांचें असून चांद्र वर्ष सुमारें ३५४ दिवसांचें आहे यामुळें या शकाचीं वर्षें इतर शकांच्या वर्षाच्या मानानें लहान असून शकवर्षसंख्येचें अन्तर नेहमीं वाढत जातें हें उघड आहे.

हिजरी सनानंतर थोडयाच वर्षांनीं यज्दगिर्द शक सुरू झाला. हा शक इराण देशांत यज्दगिर्द बादशहानें इ. स. ६३२ त सुरू केला. यज्दगीर्द हा पर्शियन लोकांचा शेवटचा बादशहा होय. तो विद्याव्यासंगी असून त्याला ज्योतिषाचा नाद होता, व त्यानें हा शक ज्योतिष्यांच्या सोईकरितां सुरू करून या शकांत बरीच ज्योतिषविषयक माहिती दिली,

याचें वर्ष सौरमानाचें म्हणजे ३६५¼ दिवसांचें आहे. इराण देशांत जरी मुसलमानी धर्म यानंतर सुरू झाला, तरी इराणच्या ज्योतिष्यांनीं यज्द-गिर्दाचा शक सुरू ठेविला. प्रत्यक्ष सौर वर्ष ३६५¼ दिवसांहून कांहीं कमी असल्यामुळें वर्षगणनेंत कित्येक वेळां दुरुस्ती करावी लागली आहे. जूलियस सीझरच्या गणनापद्धतीची पोपग्रेगरी यानें दुरुस्ती करून नवीन क्यालेंडर सुरू केलें त्याला ग्रेगोरियन क्यालेंडर म्हणतात. त्यापेक्षांहि सोईस्कर व्यवस्था इ. स. १०७९ मध्यें इराणच्या जलालुद्दिन बादशाहानें अमलांत आणली, तीं यज्दगिर्दाच्या शकांतच होय. अलबिरूनी हा गणिती, ज्योतिषी व इतिहासकार म्हणून प्रसिद्ध आहे. त्यानें हिंदुस्थानांतील ज्योतिषाचा अभ्यास केला होता व त्याचा हिंदुस्थानावरचा ग्रंथ मोठा मनोरंजक व महत्त्वाचा आहे. तोहि यज्दगिर्दाचा शक वापरतो. तात्पर्य, ह्या शका-संबंधानें ही गोष्ट लक्षांत ठेविण्यासारखी आहे कीं जरी महमदी धर्म इराणांत चालू होता तरी ज्योतिषशास्त्राच्या माहितीच्या कारणामुळें यज्दगिर्दाचा शक बरींच वर्षें चालू होता.

वरील महत्त्वाच्या शकांशिवाय आणखीहि कित्येक शक पाश्चात्य देशांत सुरू होते व आहेत. सिल्यूसिडी शक अलेक्झांडरानंतर ज्या सिल्यूकसनें राज्य केलें व ज्याचा संबंध हिंदुस्थानाशींहि होता, त्या सिल्यूकसनें सुरू केला. तो कित्येक वर्षें जारी राहिला. तसेंच ज्यूलोक सृष्टीची उत्पत्ति अमुक वर्षीं झाली असें मानून तेथून सृष्ट्युत्पत्तिशक मानतात. हे व जे आणखी कांहीं शक चालू आहेत अथवा होते त्यांची जास्त माहिती स्थलसंकोचास्तव देतां येत नाहीं, व ती येथें देणें विशेष महत्त्वाचेंहि नाहीं.

आतां आपण पौर्वात्य देशांकडे वळूं. यांत मुख्यतः दोन देश येतात. हिंदुस्थान व चीन. चीन देशांत फार प्राचीनकालापासून चिनी कालगणनापद्धति चालू आहे. चिनी लोक ३६५¼ दिवसांचें वर्ष मानतात. साधारणतः वर्ष ३६५ दिवसांचें धरून प्रत्येक ४ वर्षांनीं एक दिवस जास्त धरतात. अशी वर्षगणनापद्धति त्यांच्यांत इ० स० पूर्वी २२७७ व्या वर्षापासून अमलांत आहे. म्हणजे जूलियन क्यालेंडरची व्यवस्था चिनांत जूलियस सीझरच्या पूर्वी २२ शें वर्षांपासून अमलांत आहे. याजवरून चिनी लोकांच्या प्राचीन संस्कृतीचें व बुद्धिमत्तेचें दिग्दर्शन सहज होतें. चिनी लोकांत शास्त्रीय पद्धतीनें ज्योतिषाचा अभ्यास फार प्राचीन काळापासून आहे.

ज्योतिर्विंदांचें एक स्वतंत्र सरकारी खातें ( Mathematical Tribunal ) चीन देशांत प्राचीन काळापासून आहे. चिनी लोक ६० वर्षांचें एक चक्र मानतात; या चक्रपद्धतीस सुरवात बादशाह याओ याच्या ८१ व्या वर्षा· पासून, म्हणजे पूर्वोक्त इ० स० पूर्वी २२७७ वर्षी झाली. तेव्हांपासून चिनी शक चालू आहे असें म्हटलें तरी चालेल. परंतु तो पूर्ण शकस्वरू-पाचा नसून साठ वर्षांच्या चक्रांनीं मोजला जातो; व याशिवाय राजवंशा-वळीचीहि पद्धति चीन देशांत अमलांत आहे. चिनी लोकांत आज चार हजार वर्षांचा इतिहास व ज्योतिषविषयक माहिती उपलब्ध आहे. हल्लीं जरी चिनी संस्कृति जीर्ण झाली आहे तरी ती फार प्राचीन असून तिची सुधारणा होण्याचा रंगहि दिसत आहे. त्यामुळें चिनी कालगणनापद्धति दीर्घजीवी आहे असें दिसतें.

ही गोष्ट हिंदुस्थानास लागू नाहीं. हिंदुस्थानांत अनेक शक सुरू झाले आणि लुप्तहि होऊन गेले. त्या सर्वांची माहिती येथें देऊं म्हटल्यास फार विषयविस्तार होईल. तेव्हां तीन चार मुख्य शकांविषयीं माहिती दिली असतां पुरे होईल. दुसरी गोष्ट अशी कीं, येथील बहुधा प्रत्येक शकाविषयीं कांहीं ना कांहीं तरी तंट्याचे मुद्दे आहेत. त्यांचा निर्देश करून त्यांज-विषयींचें माझें मत वाचकांपुढें थोडक्यांत ठेविलें पाहिजे. या मुद्यांचा निकाल करतांना पाश्चात्य देशांतील शकांविषयीं वर दिलेली माहिती बरीच उपयोगी पडेल.

प्रथमतः आपण युधिष्ठिर शक घेऊं. युधिष्ठिर शकाचा आरंभ इ. स. पू. ३१०१ वर्षापासून असून तो चैत्रादि सौर वर्षाचा आहे, असें हल्लीं सर्वत्र मानतात. युधिष्ठिर शक आणि कलिकाल एकच आहेत असेंहि दुसरें मत सर्वत्र प्रचलित आहे. हें मत फार प्राचीन काळापासून चालत आलें असून त्याचा उल्लेख खुद्द महाभारतांत आहे, व प्रत्येक पुराणांतहि तेंच मत गृहीत केलेलें सांपडतें. युधिष्ठिर शकाविषयीं दोन वादाचे मुद्दे आहेत. पहिला वादाचा मुद्दा जुना आहे तो असाः—युधिष्ठिर शक इ. स. पूर्वी ३१०१ व्या वर्षापासून सुरू नसून तो कलियुगप्रारंभानंतर ६५३ वर्षांनीं सुरू झाला—म्हणजे इ. स. पू. २४४८ व्या वर्षी अथवा शालिवाहन शका-पूर्वी २५२६ व्या वर्षी सुरू झाला. वराहमिहिरानें या कल्पनेला दुजोरा देण्याकरितां वृद्ध गर्गाच्या मताचा आधार देऊन एक आर्या आपल्या ग्रंथांत दिली आहे ती अशी—

आसन्मघासु मुनयः शासति पृथिवीं युधिष्ठिरे नृपतौ ।
षड्द्विकपञ्चद्वियुतः शककालस्तस्य राज्ञश्च ॥

अर्थः—' पृथिवीचें राज्य युधिष्ठिर करीत असतां सप्तर्षि मघा नक्षत्रांत होते. व त्या राजाचा काळ शकवर्षाला २५२६ मिळविले म्हणजे निघतो." हेंच मत काश्मीराचा इतिहासकर्ता कल्हण यानें अंगिकारलें आहे. पण कल्हणाच्या पूर्वींच्या इतिहासकारांचें मत याहून उलट होतें; म्हणजे कलिकाल आणि युधिष्ठिरकाल एक अशी त्यांची समजूत होती. ही गोष्ट कल्हणानें नमूद करून ठेविली आहे, हें आपलें सुदैव होय. ६५३ वर्षांची तफावत कल्हणानें पांडवकाळांत धरल्यामुळें काश्मीराच्या इतिहासांत त्याणें बराच घोटाळा केला आहे असें दिसतें. हा विषय आपण अन्यप्रसंगानें विस्तारानें मांडूं. येथें कल्हणानें राजतरंगिणीच्या प्रारंभीं या संबंधाचे श्लोक दिले आहेत ते उतरून घेतले म्हणजे पुरें होईल.

अष्टषष्ट्यधिकामब्दशतद्वाविंशतिं नृपाः ।
अपीपलंस्ते काश्मीरान् गोनन्दाद्याः कलौ युगे ॥
भारतं द्वापरान्ते भूद्वार्तयेति विमोहिताः ।
केचिदेतां मृषा तेषां कालसंख्यां प्रचक्रिरे ॥
शतेषु षट्सु सार्धेषु त्र्यधिकेषु च भूतले ।
कलेर्गतेषु वर्षाणामभूवन् कुरुपांडवाः ॥

अर्थः—" या कलियुगांत २२६८ वर्षेंपर्यंत गोनन्दादि नृपतींनीं काश्मीराचें पालन केलें. भारती युद्ध द्वापरांतीं झालें, या वार्तेनें विमोहित झाल्यामुळें ही त्यांची कालसंख्या कांहीं लोक खोटी करतात. परंतु कलीचीं ६५३ वर्षें झाल्यावरच कुरुपांडव झाले." यानंतर कल्हणानें ' षड्द्विक ' इत्यादि वराहमिहिराच्या वचनाचा आधार दिला आहे. याप्रमाणें वराहमिहिर व कल्हण यांचें मत प्रचलित मताच्या विरुद्ध आहे. माझ्या मतें वराहमिहिरानें चूक केली आहे. वराहमिहिरानें कलिकाल व युधिष्ठिरशक यांची जी ताटातूट केली आहे तिच्याविरुद्ध सर्व पुराणें, महाभारत, व खुद्द अनेक ज्योतिषग्रंथ आहेत. महाभारतांत गदापर्वांतीं भीमानें दुर्योधनास कमरेखालीं धर्मयुद्धाच्या नियमाविरुद्ध गदा मारली त्यावेळेस बलरामास क्रोध आला व तो भीमावर लांगल घेऊन उठला. त्यावेळेस कृष्णानें त्याचा राग " प्राप्तं कलियुगं विद्धि प्रतिज्ञा पांडवस्य च. " ' कलियुग प्राप्त झालेंच असें समजा

व भीमानें पूर्वी दुर्योधनाच्या मांडीवर गदा मारीन अशी प्रतिज्ञा केली होती' असें म्हणोन शांत केला, वगैरे अनेक प्रसंग प्रसिद्ध आहेत. खुद्द वराहमिहिराचा टीकाकार भट्ट उत्पल याणें वराहमिहिराचें हें वाक्य खोडलें आहे व गर्गाचेंच वचन देऊन असें दाखविलें आहे कीं, गर्गानें कलिआरंभींच मघांत सप्तर्षि होते म्हणून सांगितलें आहे असें कनिंगह्याम आपल्या पुस्तकांत ( Book of Indian Eras ) लिहितो. कनिंगह्यामच्या मतें वराहमिहिरानें सप्तर्षिचाराचा विचार करतांना हा कल्पित काळ काढला. सप्तर्षिचाराविषयीं येथें दोन शब्द लिहिणें जरूर आहे. सप्तर्षि स्थिर आहेत, तरी त्यांना काल्पनिक गति देऊन प्रत्येक नक्षत्रीं ते शंभर वर्षे राहतात, अशी आर्यांची फार जुनी समजूत आहे; म्हणजे हें एक २७०० वर्षांचें चक्र आहे. काश्मीरांत कल्हणाच्या वेळीं व अजूनहि हिमालयाच्या कित्येक प्रान्तांत लौकिक काल चालतो; त्यांचा या चक्राशींच संबंध आहे. हें एक शंभर वर्षांचें चक्र आहे; शंभर वर्षे झालीं म्हणजे पुन्हां एक दोन असें मोजतात. कल्हणानें आपल्या ग्रंथवर्षी, म्हणजे १०७० या शकवर्षी, लौकिककालवर्ष २४ होतें असें लिहिलें आहे. ( लौकिकाब्दे चतुर्विंशे शककालस्य सांप्रतम् । सप्तत्याभ्याधिकं यातं सहस्रपरिवत्सराः ). हा लौकिककाल म्हणजे खरी शकपद्धति नव्हे हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. असो, सतर्षिचारांचे कल्पांत किती फेरे होतात ह्याचा विचार करतांना वराहमिहिराला ही फिरवाफिरव करावी लागली, असें कनिंगह्यामचें मत आहे; व ६५३ व्या कलिवर्षी जर सप्तर्षि मघांत होते असें मानलें तर कलियुगारंभीं ते रोहिणींत होते असें त्यास मानावें लागतें. ६०० वर्षे म्हणजे मघांच्या मागें ६ नक्षत्रें गेलें पाहिजे. पण भटोत्पलानें वर लिहिल्याप्रमाणें गर्गाचेंच वचन देऊन कलियुगारंभींच सप्तर्षि मघांत होते असें सिद्ध केलें आहे. षट्द्विक इत्यादि गर्गवचनाचा काय अर्थ असावा याजविषयीं मीं आपला अभिप्राय ' The Mahabharata a criticism ' या पुस्तकांत दिला आहे. गर्ग हा शककालापूर्वीचा आहे, तेव्हां शककालाचा त्यानें उल्लेख करणें अशक्य आहे. शाक्यकालाचा म्हणजे बुद्धाच्या काळाचा त्यानें उल्लेख केला असावा असें माझें अनुमान आहे व षड्द्विक म्हणजे साहा दोन असा अर्थ होत नसून दोनदां साहा असा अर्थ होतो, यामुळें षड्द्विकपंचद्वि म्हणजे २५६६ असा अंक उत्पन्न होतो; तेव्हां शाक्य काल

शकपूर्व ३१७९-२५६६=६१३ योग्यच निघतो, असें दाखविलें आहे. सदरहु पुस्तक लिहिल्यानंतर माझ्या मताला पुष्टि देणारें एक सबळ प्रमाण मला सांपडलें आहे. इ. स. पूर्वी हिंदुस्थानांत बुद्धाचा निर्वाण शक चालू होता असें दिसतें. धार्मिक शक चालू करण्याचा पहिला मान अनेक इतर गोष्टींप्रमाणें बौद्धांनाच द्यावा लागतो. हा शक प्रारंभापासून मोजीत असत अशी एक आख्यायिका आहे. निर्वाणापासून प्रत्येक वर्ष संपलें म्हणजे एक एक टिंब त्रिपीटकाच्या लेखी प्रतीवर देण्याचा प्रघात होता. त्याप्रमाणें १३ शें वर कांहीं अधिक इतकीं टिंबें दिलेली एक पोथी एक चिनी प्रवासी हिंदुस्थानांतून चिनांत घेऊन गेला होता, अशी आख्यायिका आहे. तात्पर्य, बौद्ध लोकांत निर्वाण शक फार जुना आहे. सिंहलद्वीप, ब्रह्मदेश, इत्यादि ठिकाणीं हा शक अद्याप चालतो. अल्बिरूनी यानें हिंदुस्थानांत विक्रमसंवतापूर्वी एक श्रीहर्षशक चालत होता असें लिहिलें आहे. बहुधा ही त्याची चुकी केवळ हस्तदोषाची असावी. तरी त्याजवरून एखादा बौद्ध-शक संवतापूर्वी येथें हिंदुस्थानांत चालू होता असें गृहीत धरण्यास हरकत नाहीं. असो; बौद्ध शक जर चालू होता तर गर्गानें त्याचाच निर्देश करून वरील २५६६ चा आंकडा दिला असावा. ह्या अनुमानास चांगली बळकटी आणणारें एक विधान Indian Antiquary, Vol. XXXII, स. १९०३, यांत पी. सी. मुकरजी यांनीं An independent view of Buddhist chronology ह्या मथळ्याखालीं एक लेख लिहिला आहे, त्यांत सांपडतें (पा. २२८). तिबेटांतील ग्रंथांत बुद्धाच्या निर्वाणाची व परिनिर्वाणाची अशा दोन तारखा आहेत आणि कलिवर्ष २५६६ ह्याचा संबंध बुद्धाच्या परिनिर्वाणाशीं आहे हें उघड आहे. यांत एक वर्षाचें अन्तर पडणें साहजिक आहे. चालू वर्ष किंवा गत वर्ष हें सांगतांना कित्येक वेळां याप्रमाणें एक वर्षाची तफावत पडते. सारांश 'षड्द्विकपंचद्वियुतः' याचा शाक्यकालाशीं संबंध आहे, ह्या गोष्टीचा पुरावा तिबेटांतील बौद्ध ग्रंथांत सांपडतो. यावरून सदर आंकड्याचा संबंध शालिवाहन शकाशीं नाहीं असें मानण्यास हरकत नाहीं; व सर्व पुराणांनीं व महाभारतानें व अनेक ज्योतिर्विदांनीं युधिष्ठिरकाल व कलिकाल जो एक मानला आहे, तेंच खरें आहे हें मत मजबूत दिसतें.

युधिष्ठिराविषयीं दुसरा वाद अलीकडे उपस्थित झाला आहे. मद्रासचे रंगाचार्य यांच्या मतें कलिकाल कल्पित असून तो आर्यभट्टानें

कल्पनेनें मागाहून कायम केला. वास्तविक पहातां महाभारताचा काल इ. स. पूर्वी १५ शें किंवा १६ शें वर्षांचा आहे असें विष्णुपुराणादि ग्रंथांत दिलेल्या वर्षसंख्येवरून व राजांच्या पिढ्यांवरून सिद्ध होतें, तो महाभारतकाळ आणखी १५ शें वर्षें पाठीमागें ढकलून गणितानें आलेला एक आंकडा म्हणजे इ. स. पूर्वी ३१०१ हें वर्ष आर्यभट्टानें निश्चित केलें, असें प्रो. रंगाचार्य यांचें मत आहे. माझ्या समजुतीनें हें मत चुकीचें आहे. इ. स. पूर्वी ३१०१ हें वर्ष कोणत्याहि गणितानें काढलेलें नाहीं; असें गणित करण्यास पूर्वीचें कांहींच आधारभूत प्रमाण दाखविलें नाहीं. काल्पनिक आधार घेऊन काल्पनिक गणित करून कलिकालाला अथवा महाभारतकालाला मागें ढकलण्याइतके आमचे ज्योतिषी धर्मभ्रष्ट किंवा सत्यभ्रष्ट नव्हते. आर्यभट्टापूर्वी भारतयुद्ध कधीं झालें हें लोकांना माहीत नव्हतें हें म्हणणें धाष्टर्याचें आहे. आणि असें माहीत होतें तर, दोन हजार वर्षांचा काल खोटा ठरवून पस्तीसशें वर्षांचा काल मानण्यास लोक तयार होतील असें वाटत नाहीं. महाभारतयुद्ध कधीं झालें ही गोष्ट दंतकथेच्या परंपरेनें लोकांस माहित होती व सर्वांत विशेष गोष्ट ही कीं, मेग्यास्थेनीस यानें दिलेल्या पिढ्या व वर्षसंख्या, पुराणांनीं दिलेल्या पिढ्या व वर्षसंख्या यांहून भिन्न आहेत, व त्या प्राचीनतर असल्यामुळें अधिक मान्य आहेत, इत्यादि कारणें मीं माझ्या 'The Mahabharata a criticism' या पुस्तकांत सदर मत अग्राह्य आहे हें सिद्ध करण्याकरितां दिलींच आहेत. कलिकाल अथवा भारतयुद्धकाल लोकांना राजवंशावळीवरून दंतकथेच्या आधारें माहित होता हें निर्विवाद दिसतें. "The initial date of the era seems to have been a traditional date of the period of the great war which had been handed down for ages." असें कनिंगह्यामनेंहि लिहिलें आहे. युधिष्ठिर शक या स्वरूपानें हा काल पूर्वी चालू नव्हता हें संभवनीय आहे. इजिप्त, बाबिलोन, चीन या देशांप्रमाणें प्राचीन काळीं येथें राजवंशावळींनींच इतिहास नमूद केला जात होता असें दिसतें. कारण मेग्यास्थिनीसनें अशा वंशावळींचाच उल्लेख केला आहे, कोणत्याहि शकाचा उल्लेख त्यानें केलेला नाहीं. १५३ पिढ्या 'डायानिसास' पासून चंद्रगुप्तापर्यंत झाल्या असें त्यानें स्पष्ट नमूद केलें आहे, व त्याचीं सहा हजार व कांहीं अधिक वर्षें झालीं, हिराक्लीस डायानिसासनंतर १५ पिढ्यांनीं झाला हेंहि त्यानें लिहिलें. याप्रमाणें १५३–

१५-१३८ पिढ्यांचें अंतर हिराक्लिस अथवा हरि आणि चंद्रगुप्त यांच्या-मध्यें होतें; म्हणजे दर पिढीस २० वर्षांची सरासरी धरली तर सुमारें २७८० वर्षांचें अंतर चंद्रगुप्त व श्रीहरि यांजमध्यें होतें असें दिसतें. सारांश श्रीहरीचा काल सरासरीनें इ. स. पू. ३०८०।३१०० हाच येतो. असो, पूर्वकाळीं पिढ्यांवरूनच लोकांना वर्षांच्या अंतराची कल्पना असे त्याप्रमाणें हिंदुस्थानांतहि भारती युद्धाची होती; व भारतीयुद्धकाल व कलिकाल एक, या अत्यंत जुन्या लोकसमजुतीप्रमाणें कलिकाल अथवा युधिष्ठिरकाल लोकांना ठाऊक होता. हा काल साधारणतः यद्यपि ठाऊक होता तथापि युधिष्ठिरशक ज्योतिष्यांनीं इ. स. सुमारास सुरू केला असें वाटतें. आर्य-भट्टाचे पूर्वीपासून कलिकाल अथवा युधिष्ठिर काल प्रचलित होता असें अनुमान काढण्यास जागा आहे. सारांश, पाश्चात्य देशांत चालू असलेल्या शकांच्या इतिहासाची तुलनात्मक पद्धतीनें संगत जोडल्यास, इ. स. पू. मेग्यास्थे-नीसच्या वेळेस युधिष्ठिर शक प्रचलित नव्हता; तरी लोकांस भारतीयुद्ध-काळाची कल्पना राज्यवंशावळींवरून होती, ख्रिस्ती शकाप्रमाणें किंवा रोमन व ग्रीक शकांप्रमाणें हा शक मागाहून सुरू झाला तरी त्याचा आरंभ सदर तिन्ही शकांप्रमाणें दंतकथेवरून लोकांनीं कायम केला, कल्पनेनें कायम केला नाहीं, असें अनुमान काढणें वावगें होणार नाहीं.

वर युधिष्ठिर शकाचा विचार करतांना सप्तर्षिचक्र अथवा लौकिक काल व बुद्धनिर्वाण शक यांचाहि उल्लेख झालाच आहे. त्यांपैकीं बुद्धशक जुना होय. त्याचा आरंभकाल इ. स. पू. ५४४ वर्षांपासून ४७७ पर्यंतचा मानतात. वर वर्णन केलेल्या मुकरजीच्या मताप्रमाणें तो ३१०१-२५६५= ५३६ येतो. हा शक आरंभापासून बौद्धलोक वापरीत. लौकिककाल कधीं सुरू झाला हें निश्चित सांगतां येत नाहीं. तत्रापि तो सप्तर्षिचारावरून निघाला असावा व बुद्धकालाहून प्राचीन नसावा असें वाटतें. यानंतरचा महत्त्वाचा शक म्हटला म्हणजे विक्रमाचा संवत् होय. या शकाचा आरंभ इ. स. पूर्वी ५७ व्या वर्षापासून मानतात व विक्रम राजानें शकांचा पराभव करून हिंदुस्थानांत साम्राज्य स्थापन केलें तेव्हांपासून त्यानें हा संवत सुरू केला असा लोकांचा दृढ समज आहे. विक्रमाची राजधानी उज्जयिनी होती, भर्तृहरि हा त्याचा भाऊ व गंधर्वसेन हा त्याचा पिता होता, इत्यादि माहिती उज्जयिनींतील लोक अद्यापि सांगतात. याशिवाय विक्रमाविषयींच्या

शेंकडों गोष्टी सिंहासनबत्तिशींत, वेताळपञ्चविशींत व कित्येक जैनग्रंथांत दिलेल्या प्रसिद्ध आहेत. संस्कृतज्ञ लोकांत विक्रमाच्या दरबारीं कालिदासादि नवरत्नें होतीं असा समज आहे. विक्रमाची व शालिवाहनाची लढाई होऊन विक्रमाचा पराभव शालिवाहनानें केला अशी ऐतिहासिक दंतकथा महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहे. याप्रमाणें विक्रमाविषयींच्या अनेक गोष्टी आहेत. परंतु इतिहाससंशोधकांत त्यांच्या सत्यतेविषयीं बराच तंटा चालू आहे. प्रथम असा सिद्धांत निघाला कीं, विक्रमाची व्यक्ति ऐतिहासिक नसून केवळ काल्पनिक आहे व विक्रमसंवत् या नांवानें शक चारपांचशें वर्षांनंतर चालू झाला. विक्रमसंवतांतील एखादा लेख चारशेंच्या पूर्वीचा सांपडला नसून विक्रमाच्या वेळचीं नाणीं किंवा शिलालेख मुळींच अद्याप सांपडले नाहींत, याजमुळें असा सिद्धान्त निघाला असावा असें दिसतें. विक्रमादित्य नांव प्रथम गुप्तवंशांतील सार्वभौम राजा समुद्रगुप्त याचा पुत्र चंद्रगुप्त यानें धारण केलें असून त्यानेंच प्रथम विक्रम संवत् चालू केला असावा, असें डाक्टर भांडारकरप्रभृति विद्वानांचें ठाम मत झालेलें दिसतें. पूर्वी तर विक्रमकाल म्हणजे पराक्रमाचा काल एवढ्यावरूनच विक्रम संवत् सुरू झाला, असें डा० कीलहार्नप्रभृतींनीं मत दिलें. परंतु हल्लीं बहुतेक पुराणेतिहाससंशोधक असें मानतात कीं, चंद्रगुप्त विक्रमादित्य हा खरा विक्रम होय, तो इ० सन ४१४ च्या सुमारास झाला, त्याची राजधानी उज्जनीच होती, त्याच्याच दरबारांत कलिदासादि नवरत्नें होतीं, व त्यानें हा शक पूर्वी मालव शक या नांवानें होता तें नांव बदलून विक्रमसंवत् अशा नांवानें पुढें चालविला. १९१८ च्या जानेवारीच्या रायल एशियाटिक सोसायटी लंडनच्या त्रैमासिकांत डाक्तर हार्नल यांनीं या विषयावर एक महत्त्वाचा लेख लिहिला आहे. यशोधर्मा नांवाच्या माळव्यांतील एका माण्डलिकानें हिंदुस्थानचें सार्वभौमत्व संपादन केलें, त्यानें विक्रमादित्य संज्ञा धारण केली व तोच मालव शक बदलून विक्रमसंवत् चालू करणारा राजा होय, आणि त्याच्याच दरबारांत कालिदास होता, इत्यादि मुद्दे सदर लेखांत महत्वाची माहिती देऊन डा० हार्नल यांनीं सिद्ध केले आहेत. याच लेखामुळें मला हा लेख लिहिण्याची इच्छा उत्पन्न झाली. माझ्या मतें चंद्रगुप्त किंवा यशोधर्मन् याजला खरा विक्रमादित्य बनवून संवताचा प्रवर्तक करण्याचा हा यत्न चुकीचा आहे. पहिला अथवा खरा विक्रमादित्य इ० स०

पू० ५७ च्या सुमारास होऊन त्यानें शकांचा पराभव करून हिंदुस्थानांत सार्वभौमत्व स्थापून आपला शक सुरू केला, व तो शक प्रारंभापासून अमलांत आला, असें मानण्यास बळकट आधार आहे. पश्चात्य पण्डितांची विचारसरणी सामान्यतः न्यायशास्त्रास अनुसरून असली तरी ती त्यांच्या दृढ दुराग्रहामुळें कधीं कधीं कशी घसरते, याचें उत्कृष्ट उदाहरण पूर्वोक्त रॉयल ए. सो. च्या त्रैमासिकांतील डॉ. होर्नेल यांच्या निबंधांतील त्यांचें खालील वाक्य देतां येईल. "Kielhorn's idea that "Vikrama Kala" meant time for conquest was absurd. There is no other Indian era or indeed any era anywhere which is not called after a person or a people or an event or the like either actual or imaginary. If that be the case, the only question is who is the person who changed the name of the Malava era into that of the Vikrama era." भाषांतर असें-'विक्रम काल म्हणजे पराक्रम करून जिंकण्याचा काळ असा डाक्टर कीलहार्न यांचा समज वेडगळ आहे. हिंदुस्थानांत असा कोणताहि शक नाहीं, किंबहुना पृथ्वीच्या पाठीवर कोणत्याहि काळीं असा शक चालू झाला नाहीं कीं, ज्याचा संबंध एखाद्या व्यक्तीशीं किंवा लोकांशीं किंवा वृत्ताशीं नाहीं,—मग ती व्यक्ति, ते लोक किंवा तें वृत्त खरें असो किंवा काल्पनिक असो. असें जर आहे तर मग एवढाच प्रश्न उरतो कीं मालव शक हें नांव कोणत्या व्यक्तीनें बदलून विक्रम हें नांव केलें.' या वाक्यांतील पहिलीं दोन विधानें बरोबर आहेत, व आमच्या या लेखांत इतर शकांचा जो इतिहास दिला आहे त्यावरून त्यांची सत्यताहि वाचकांच्या लक्षांत आलीच असेल. पण या दोन विधानांवरून एकदम तिसऱ्यावर जी डाक्टर होर्नेल यांणीं उडी मारली आहे, तिच्या अंतर्भूत एक त्यांचा दुराग्रह स्पष्ट दृष्टीस पडतो, व तो दुराग्रह आहे असें त्यांच्याच पूर्वीच्या दोन विधानांवरून दिसून येतें. डाक्टर साहेबांच्या प्रश्नांत मालव शकाचें नांव बदलून विक्रमशक हें नांव चालू केलें ही एक गृहीत गोष्ट घेतली आहे. डाक्तर कीलहार्ननें या संवताचा उपयोग ज्यांत केला आहे अशा अनेक लेखांवरून हा चुकीचा सिद्धांत प्रथम काढला. त्याप्रमाणें ही गोष्ट गृहीत केली तरी जर कोणताहि शक सुरू होण्यास एखादी व्यक्ति किंवा वृत्त कारणीभूत असावें लागतें, तर प्रथम प्रश्न हा उत्पन्न होतो कीं, मालव शक तरी कोणत्या व्यक्तीनें सुरू

केला ? मालव शक मालव नांवाचा आहे एवढ्यानें डाक्तर होर्नेल सुटूं शकत नाहींत. या लोकांच्या नांवाचा शक इ. स. पू. ५७ व्या वर्षीं सुरू होण्यास कांहीं तरी कारण घडलेंच असलें पाहिजे. मग तें कारण व्यक्ति-रूप असो किंवा वृत्तरूप असो. सारांश, डाक्तर होर्नेल यांची मीमांसा त्यांच्याच विधानास लाविली असतां त्यांना हा प्रश्न उपस्थित झाला पाहिजे होता. तो त्यांस किंवा इतरांस उपस्थित झाला नाहीं याचें आश्चर्य वाटतें. मालव शक पूर्वीं होता तो बद्लून विक्रम संवत् हें नांव पडलें असें मानलें तरी सुद्धां मालव शक कोणीं कां सुरू केला, याची चौकशी कोणीच करीत नाहीं. मालवांनीं इ. स. पू. ५७ व्या वर्षीं कांहीं तरी पराक्रम केला असावा हें उघड आहे. तो पराक्रम म्हणजे शकांचा पराभव असणें संभवनीय आहे. निदान अशी दंतकथा खोटी मानण्यास कांहींच कारण नाहीं. विक्रमादित्य हा मालवांचा राजा होता. विक्रमादित्य ही पद्वी चंद्रगुप्तानें प्रथम घेतली असें जरी मानलें तरी विक्रमादित्य ही पद्वी उत्पन्न होण्यास कोणी तरी विक्रमादित्य 'शकारि' सार्वभौम पूर्वीं झाल्याशिवाय ती पद्वी होऊं शकत नाहीं. विक्रमादित्य हें मूळचें एखाद्या व्यक्तीचें नांव असलें पाहिजे. मग तें सीझर या नांवा-प्रमाणें पद्वी होऊं शकेल, मूळचा सीझर अत्यंत पराक्रमी व बहुतेक रोमचा सार्वभौम झाला. त्याचा पुतण्या Augustus Caesar बाद्शहा झाला, तद्नुरोधानें सीझर हा शब्द संज्ञारूपी 'बाद्शाहा' या अर्थीं झाला. तो हल्लीं सुद्धां केसर ( Kaiser ) व झार ( Czar ) ह्या शब्दांत बाकी आहे. पण सीझरचा अर्थ बाद्शाहा होण्यास मूळ एक सीझर व्यक्ति पाहिजे आहे, त्याचप्रमाणें विक्रमादित्य ही एक मूळची व्यक्ति पाहिजे आहे. चंद्रगुप्त व यशोधर्मन् हे मूळचे किंवा पहिले विक्रमादित्य नव्हते. कारण त्यांचीं मूळचीं भिन्न नांवेंच याची साक्ष देतात. विक्रमादित्य म्हणजे "पराक्र-माचा सूर्य" या यौगिक अर्थानें ही एक पद्वी अथवा बिरुद होतें, आणि तें प्रथम चंद्रगुप्तानें किंवा यशोधर्म्यानें धारण केलें, अशी कोणी शंका काढील; पण ही शंका अस्थानीं आहे. कारण विक्रमादित्य या पद्वीचा अर्थ यौगिक नसून कांहीं विशिष्ट आहे; म्हणजे या पदानें शकारि व सार्वभौम या दोन गोष्टींचा अप्रत्यक्ष बोध होतो. माझ्या मतें चंद्रगुप्ताच्या पूर्वीं कोणी तरी विक्रमादित्य नांवाचा सार्वभौम राजा होऊन गेला असून

त्यानें शकांचा विध्वंस करून साम्राज्य स्थापिलें असलें पाहिजे. सारांश, विक्रमादित्य हा इ. स. पू. ५७ च्या वर्षी अशा प्रकारचा एक राजा होऊन गेला, ही दंतकथा पुढील इतिहासावरूनच म्हणजे चंद्रगुप्तादि राजांनीं घेतलेल्या पद्वीवरूनच खरी आहे असें अनुमान होतें.

पण आपणास केवळ अनुमानावर अवलंबून बसावयाची जरूरी नाहीं. चंद्रगुप्ताच्या पूर्वी विक्रमादित्य ही व्यक्ति होती ही गोष्ट हाल-राजाच्या सप्तशतीवरून राजवाडे यांनीं दाखविल्याप्रमाणें स्पष्ट सिद्ध होत आहे. सप्तशती ग्रंथ चंद्रगुप्ताच्या पूर्वीचा आहे हें आतां सर्वमान्य झालें आहे. तो हाल राजानें लिहिलेला असून हाल राजाचा काळ इसवी सन ६० च्या सुमारास धरतात. सद्रहु सप्तशती ग्रंथांत विक्रमादित्याचें नांव स्पष्टपणें आलें आहे व शालिवाहनाचेंहि आहे. हे दोन्ही पराक्रमी राजे हाल राजापूर्वी झाले असले पाहिजेत हें निर्विवाद आहे. तेव्हां हा विक्रमादित्य इ. स. पू. ५७ चा संवत् चालू करणाराच विक्रम होय. चंद्रगुप्तानें ही पद्वी धारण केली असें प्रतिपादन करणाऱ्यांचें सप्तशतीच्या प्रमाणाकडे दुर्लक्ष कसें होतें हें समजत नाहीं. सप्तशतींतील ही आर्या खालील-प्रमाणें आहे.

संवाहनसुखरसतोषितेन ददता तव करे लाक्षाम्।
चरणेन विक्रमादित्यचरितमनुशिक्षितं तस्याः ॥ ६४ ॥

अर्थात् चौथ्या अगर पांचव्या शतकापूर्वी विक्रम संवताचा कोणत्याहि लेखांत उपयोग केलेला आढळत नाहीं, हेंहि प्रमाण आतां लंगडें पडलें आहे. वस्तुतः हें प्रमाणच निर्बल आहे. कारण या शतकापूर्वीच्या संवतांतील नाणीं किंवा लेख लोकांना अद्याप सांपडले नाहींत, यावरून तशीं प्रमाणेंच नव्हतीं असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. कारण हल्लीं लेख सांपडले नाहींत यावरून तसे लेख ( अगर नाणीं ) नव्हतीं असें म्हणतां येत नाहीं, पण हेंहि आतां म्हणणें बहुतेक राहिलें नाहीं. कारण १०३ संवतांतील एक महत्त्वाचा लेख सांपडला आहे. या लेखाचा संबंध ख्रिस्ती धर्माच्या प्रसाराशीं असून त्यानें एका गूढ प्रश्नाचें चांगलें निराकरण झालें आहे. ख्रिस्ताचे बारा प्रेषित बारा दिशांना धर्मप्रसारार्थ गेले हें विदितच आहे. त्यांत सेंट टामस हा हिंदुस्थानांत आला होता. तो कोणत्या राजाच्या दरबारांत कधीं व कसा मृत्यु पावला याची अलीकडे माहिती

एका ज्यू ग्रंथांत उपलब्ध झाली आहे. हा ग्रंथ इ० स० तिसऱ्या शतकांत लिहिला गेला आहे. या ग्रंथावरून सेंट टामस हिंदुस्थानांतील गन्दाफेरिज नांवाच्या राजाच्या दरबारांत आला होता असें निष्पन्न होतें. हा गन्दाफेरिज पंजाबांतील पार्थियन घराण्यांतील एक राजा होता. वरील सांपडलेला लेख गन्दाफेरिजचा आहे व त्यावर १०३ हा आंकडा असून २१ वें राज्यारोहणवर्ष हेंहि त्याजवर दिलें आहे. १०३ हें शकवर्ष धरलें तर इ० सन १८१वर्षांत २६ वजा करितां इ० सन १५५ हें वर्ष त्याच्या राज्यारोहणाचें वर्ष येतें. पण हें वर्ष इतिहासास बिलकुल जुळत नसून तें वरील सेंट टामसच्या हकीगतीशीं तर मुळींच जुळत नाहीं. याकरितां १०३ हें वर्ष संवताचें वर्ष धरावें असा डाक्तर फ्लीट यांनीं सिद्धांत काढला, तो बहुतेक प्राचीन संशोधकांस पसंत पडला आहे. डाक्तर भांडारकर या मताला अनुकूल झाले नाहींत. परंतु तें पूर्वग्रहानें असें म्हणावें लागतें. त्यांनीं या सेंट टामसच्या कथेवर विश्वास ठेवण्याचें नाकारलें तें फारच थोड्या व अपुऱ्या कारणाकरितां. A Peep into Indian History या निबंधांत ते म्हणतात कीं, ज्यू लोकांना दोनशें वर्षांनंतर गंदाफेरिजचें नांव स्मरलें असेल हें असंभाव्य आहे. मग काय हें नांव त्यांनीं स्वकपोलकल्पित लिहिलें ? शिवाय ज्या ग्रंथांत ( Act of St. Thomas ) तें लिहिलें आहे, तो जरी दोनशें वर्षांनंतरचा असला तरी नांवाची व हकीगतीची माहिती लोकांत दंतकथेमध्यें प्रचलित असलीच माहिजे. १०३ यांत ५७ वजा केले तर इ. स. ४६ ह्या वर्षाचा हा लेख असून, राज्यारोहणाचीं २१ वर्षें यांत वजा करितां इ. स. २५ वे वर्षीं गन्दाफेरिज गादीवर बसला, असें निष्पन्न होतें. सबब सेंट टामसचें हिंदुस्थानांत येणें या राजाच्या वेळेस झालें असें मानण्यास कांहींच प्रत्यवाय दिसत नाहीं. अशा प्रकारें या लेखांतील आंकड्याची उपपत्ति सयुक्तिक लागते, व त्याजवरून दोन गोष्टी सिद्ध होतात. एक, विक्रमसंवताचा प्रचार चार शतकांनंतर सुरू झाला ही गोष्ट आतां राहिली नाहीं. दुसरें, गंदाफेरिज ह्या पंजाबांतील पार्थियन घराण्यांतील राजाच्या या लेखांत या संवताचा उपयोग केला आहे, याजवरून विक्रमाचें सार्वभौमत्व साहजिक सिद्ध होतें; म्हणजे ज्या अर्थीं पंजाबांत हा संवत् चालू होता त्या अर्थीं या पूर्वीं एका काळीं हा देश विक्रमाच्या माण्डलिकत्वाखालीं होता, असें मानण्यास हरकत नाहीं. राजतरंगिणीकार कल्हण याणें आपल्या ग्रंथांत प्रारंभीं प्रारंभीं तारखांचा घोटाळा केला

आहे, तथापि त्यानें जी एक दंतकथा आपल्या ग्रंथांत नमूद करून ठेविली आहे तिजवरून हें विक्रमाचें सार्वभौमत्व सिद्ध होतें. प्रतापादित्य नांवाच्या राजानें एक वंश काश्मीरांत स्थापिला. हा प्रतापादित्य विक्रमाचा समकालीन असून त्याचा नातलग होता, अशी दंतकथा काश्मीरांत प्रचलित होती. ती कल्हणानें तारखांच्या घोटाळयामुळें सोडून दिली, पण आपल्या ग्रंथांत मेहरबानीनें ती त्यानें नमूद केली आहे. कल्हणानें दिलेल्या तारखांचा योग्य विचार केला तर प्रतापादित्य हा विक्रमाचाच समकालीन होता, हें सिद्ध करतां येईल. हा विषय स्वतंत्र विस्तारानें अन्य प्रसंगीं लिहूं.

विक्रमानें शकांचा पराभव केला ही गोष्ट असंभवनीय दिसत नाहीं. व्हिन्सेंट स्मिथ यांनीं लिहिलेल्या हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत शक लोकांच्या दोन टोळया हिंदुस्थानांत आल्या असें नमूद आहे. पहिली टोळी ख्रिस्ती सनापूर्वी हिंदुस्थानांत उत्तरेकडे आली व तिनें पंजाब वगैरे देश व्यापून टाकिला. या टोळीचा मागमूस या पुढें इतिहासांत मिळत नाहीं हें सर्व प्राचीन इतिहाससंशोधकांस कबूल आहे. आतां या टोळीचा उच्छेद कोणीं व केव्हां केला, हें कोणीच इतिहासकार सांगत नाहीं. अशा स्थितींत या शकांच्या टोळीचा उच्छेद विक्रमानें केला असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं. अल्बिरूनी यानें असें लिहिलें आहे कीं, शकारि विक्रमानें मुलतानजवळील कारुर या गांवीं शकांचा पराभव केला. अल्बिरूनीनें सांगितलेल्या या माहितीचा संबंध डॉ. होर्नेल यशोधर्म्याशीं लावतात, परंतु तसें मानण्यास कांहीं विशेष कारणें त्यांनीं दिलेलीं नाहींत. इ. स. पू. ५७ चा कोणी विक्रमच नव्हता असें मानलें तर मात्र ही कोरुरची लढाई दुसऱ्या कोणत्या तरी विक्रमाकडे लाविली पाहिजे. पण पहिल्या विक्रमाचें अस्तित्व ज्या अर्थी आपण स्थापित केलें आहे त्याअर्थी कोरुरची लढाई त्याच विक्रमाची असून त्यानेंच शकांचा पराभव करून सार्वभौमत्व स्थापिलें हें निर्विवाद आहे. हें कोरुर पंजाबांतच आहे. रजपूत लोक विक्रमास पांडवांच्या वंशांतील समजतात. या वंशांतील लोक हल्लीं तुवर रजपूत या नांवानें प्रसिद्ध आहेत. या पांडववंशीयांचें राज्य पूर्वी कोठें होतें हें जरी उपलब्ध नाहीं, तथापि प्रथम हे लोक उत्तरेकडे असावे व तेथून उज्जनीस आले असावे. विक्रमाचा बाप व भाऊ उज्जनीस राज्य करीत होते. यापुढें विक्रमाचा वंश उज्जनीस राज्य

करीत असावा व शेवटीं उज्जनीच्या या वंशाच्या राज्याचा उच्छेद शकांची दुसरी टोळी पश्चिमेकडून सिंध काठेवाडच्या दिशेनें खिस्ती सनानंतर आली तिनें केला असावा, असा तर्क बांधण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. साधारणपणें राजवंशाची मर्यादा २०० वर्षे असते, ह्या गोष्टीचा विचार करितां विक्रमाच्या बापापासून चाललेला वंश शकांनीं इ. स. ७८ च्या सुमारास नाहींसा केला असें अनुमान सयुक्तिक आहे.

येथून आतां आपल्यास शालिवाहन शकाकडे सहज वळतां येईल. शालिवाहन शक इ. स. ७८ वर्षीं सुरू झाला हें प्रसिद्धच आहे. तो शालिवाहन अथवा शातवाहन कुलांतील राजांनीं सुरू केला असा हल्लीं सर्वांचा समज आहे. परंतु संस्कृत ग्रंथांत यास शकनृपाब्द, शकाब्द, इत्यादि संज्ञा आहेत. त्याजवरून हा शक राजांनीं सुरू केला असें संस्कृत पण्डितांचें म्हणणें आहे. पहिल्या मताचा ऊह राजवाडे यांनीं आपल्या ज्ञानेश्वरीच्या प्रस्तावनेंत केला आहे. डाक्तर भाण्डारकर व इतर विद्वान् यांनीं दुसऱ्या मताचा अवलंब केला आहे. मला हें दुसरें मत विशेष ग्राह्य वाटतें. दंतकथा पाहातां दोन्ही प्रकारच्या आहेत. संस्कृत ग्रंथांत शालिवाहन शकाचा उल्लेख नसून शकाब्द, शकनृपाब्द, असाच उल्लेख आहे. मराठी ग्रंथांत मात्र शालिवाहन शक असा उल्लेख येतो. वर सांगितल्याप्रमाणें विक्रमाच्या वंशाचा शकांच्या दुसऱ्या टोळीनें नाश केला आणि उज्जनी येथें त्यांनीं राज्य स्थापिलें तें इ. स. ७८ त स्थापिलें असावें, असा तर्क होतो. या शकांचें राज्य गुप्तांनीं मोडलें व गुप्तांनीं आपला शक सुरू केला अशी ही परंपरा सुयुक्तिक दिसते. विक्रमाचा संवत् शकनृपतींनीं बुडविला, शकनृपतींचा शक गुप्तांनीं बुडविला, गुप्तांचा शक बरींच वर्षे चालू राहून नंतर श्रीहर्षाचा शक सुरू झाला, या प्रकारच्या परंपरेवरूनच सार्वभौमांनीं आपला शक सुरू करावा असा एक नियम पुराणकारांनीं सांगितला आहे. शकनृपति हे परकी राजे असून त्यांचा शक हिंदुस्थानांत सर्वत्र—विशेषतः दक्षिणेंत—कां चालू असावा आणि तो आम्हीं धर्मकृत्यांतहि कां घेतों, हें एक कोडें आपल्यापुढें येतें. या कोड्यावरूनच राजवाड्यांनीं असा सिद्धान्त प्रतिपादन केला आहे कीं, शातवाहन वंशांतील शकु नांवाच्या राजानें हा शक सुरू केला. शातवाहन वंशाची वंशावळ पाहतां शकसेन म्हणून एक राजा होता असें दिसतें. परंतु त्याचा काळ इ. स.

७८ च्या सुमारास येत नाहीं. शिवाय शालिवाहनानें विक्रमाचा पराभव केला ही दंतकथा शातवाहन वंशाचा पहिला राजा सिमुक याला लागू पडते. सिमुक हा शूद्र किंवा कुंभार असावा. त्यानें इ. स. पू. ७३ वर्षी दक्षिणेंत राज्य स्थापन केलें, असें डा. भांडारकर यांचें मत आहे, तेव्हां तो विक्रमाचा समकालीन होतो. इ. स. ६७ तील हाल राजाच्या सप्तश तींत विक्रमादित्याप्रमाणें शातवाहनाचा उल्लेख आहे व तो याचाच असला पाहिजे. उत्तर हिंदुस्थानाचें सार्वभौमत्व संपादून विक्रम दक्षिणेंत आला त्यावेळेस सिमुकानें त्याचा पराभव केला असावा. याचीच पुनरावृत्ति म्हटली म्हणजे श्रीहर्षाचा पराभव शीलादित्यानें इ० स० च्या सातव्या शतकांत केला ही होय. असो, या सिमुकानें शक चालू केला असता तर संभवनीय होतें. परंतु शकाच्या प्रारंभस्थानावरून तसें दिसत नाहीं. शातवाहन कुलांत इ. स. ७८ नंतर झालेल्या राजांच्या शिलालेखांत शकाचा उपयोग केलेला नसून राज्यारोहणवर्षाचाच उपयोग केलेला आहे. या जवरून शकाच्या कर्तृत्वाचें श्रेय शातवाहन वंशाकडे येत नाहीं. राजवाडे यांनींच ही गोष्ट ‘मराठ्यांच्या इतिसाचीं साधनें, खण्ड ४’ याच्या प्रस्तावनेंत दाखल केलेली आहे. शक दक्षिणेंत केव्हां आले होते व शकसन केव्हां झाला याचा आपण थोडासा जास्त विस्तारानें विचार करूं; म्हणजे या गोष्टीचा उलगडा होईल, इतकेंच नव्हे तर महाराष्ट्राच्या इतिहासाचा एक महत्त्वाचा भाग प्रकाशित होईल.

शातवाहन वंशाची माहिती बऱ्याच पुराणांत दिली आहे. त्याजवरून व शिलालेखांवरून व इतर देशांतील लोकांनीं लिहून ठेविलेल्या माहितीवरून त्या वंशाच्या बऱ्याच तारखा निश्चयानें सांगतां येतात. या कुळाचा संस्थापक सिमुक ( क्षिप्रक ) याचेविषयीं फार मतभेद आहे. म्हणजे डाक्तर भाण्डारकर यांस इ. स. पू. ७३ वे वर्षी कायम करितात तर व्हिन्सेंट स्मिथ इ. स. पू. २२४ वे वर्षी. तथापि पुढील पुढील राजांच्या तारखांत फरक पडत नाहीं. कारण या वंशाचा काळ डाक्तर भाण्डारकर ३०० वर्षें समजतात, तर व्हिन्सेंट स्मिथ ४५० वर्षें धरतात. शिवाय पुलोमायीचा उल्लेख टालमीनें केलला असल्यामुळें त्याचा काल बहुतेक निश्चित आहे. या तीन चार राजांचा उल्लेख व्हिन्सेंट स्मिथ यांनीं दिलेल्या वंशावळींत येणें-प्रमाणें आहेः—

| | | | इ. स. |
|---|---|---|---|
| शिवालकुर माढरीपुत्र शकसेन. | | राज्य २८ वर्षे. | ८५ |
| विलिवायकुर गोतमीपुत्र श्रीशातकर्णी | | ,, २५ ,, | ११३ |
| पुलुमायी वासिष्ठीपुत्र | ,, | ,, ३२ ,, | १३८ |

दक्षिणेंत नहपान खहरात या शकराजानें इसवी सन १०० च्या सुमारास बरीच धामधूम केली व जुन्नर येथें राज्यहि स्थापिलें. नहपानानंतर या शकांचा पराभव विलिवायकुर गोतमीपुत्रानें १२६ इ. सनांत केला. त्यानें नाशिक येथील शिलालेखांत हा आपला पराक्रम वर्णिलाहि आहे. या नहपानाचा पुत्र किंवा आणखी कोणी संबंधी चष्टन यानें उज्जनीस राज्य केल्याचा दाखला टालमी लिहितो. त्यानें याचें नांव टियास्टेनीस असें दिलें आहे. टालमीनें चष्टनाप्रमाणें दक्षिणचा राजा पुलुमायी याचाहि 'पुलुमाईस' असा उल्लेख केला आहे. सारांश, या तीन राजांचीं दिलेलीं वर्षे व त्यांनीं केलेल्या पराक्रमांची माहिती पुष्कळ साधार व विश्वसनीय आहे. या माहितीवरून असें दिसतें कीं, शकांचा धुमाकूळ नहपानाच्या वेळेस दाहावीस वर्षे राहिला, तो इ. स. १२६ त गोतमीपुत्रानें नाहींसा केला. त्याच्यानंतर शक उज्जनीस राहिले. तेव्हां शकसेनानें शकांचा पराभव केला नाहीं, व तो इ. स. ७८ या वर्षीं गादीवरहि नव्हता. आतां तारखांच्या अनिश्चिततेमुळें त्याचा काल मागें ढकलून त्यानें नहपानाचा पराभव केला असें कदाचित् मानलें, तरी शक नांवानें काल सुरू करण्यास तें कारण होतें असें दिसत नाहीं. शकांचाच पराभव शकसेनानें केला तेव्हां ह्या केलेल्या वर्षपद्धतीस शक हें संदिग्ध नांव दिलें असेल असें वाटत नाहीं. ही सर्व अडचण दूर ठेविली तरी राजवाडे यांनींच दाखविलेली अडचण यापुढेंहि आहेच. शकसेनाचा पुत्र किंवा पौत्र गोतमीपुत्र या शकांचा पराभव करून चालू केलेला वडिलांचा शक आपल्या लेखांत वापरीत नाहीं. किंबहुना शातकर्णी वंशाच्या कोणत्याहि राजानें वापरला नाहीं. उलट उज्जनीचे व काठेवाडचे शक राजे यांनीं आपल्या शिलालेखांत हाच शक वापरला आहे याजवरून हा शक त्यांनींच सुरू केला असें मानण्यास बळकट जागा आहे.

आतां हा परकीयांचा शक हिंदुस्थानांत पुढें सर्वत्र व विशेषतः दक्षिणेंत कां प्रचलित झाला याचें कारण सांगितलें पाहिजे. पाश्चात्य

शकांची जी वर माहिती दिली आहे त्यांत या प्रकारचे दोन शक सांपडतात, एक नबूनासर याचा व दुसरा यज्दगिर्दांचा. हे दोन्ही शक ज्योतिषविषयक माहिती त्यांत भरली असल्यामुळें इतरांनींहि बरींच वर्षें चालविले. शकासंबंधानें असेंच मानण्यास सबळ कारण आहे. उज्जनींत पहिल्यापासून ज्योतिषाचा चांगला अभ्यास होत असावा व शकांच्या अमलांत या अभ्यासाला यवन ज्योतिषाचें चांगलें पाठबळ मिळालें. पञ्चसिद्धांत व ग्रहगणित यांचा अवतार उज्जनीसच झाला असावा. आर्यज्योतिषांत रेखांशाचा प्रारंभ उज्जनीपासून करतात याचें तरी कारण हेंच होय. जसें इग्लंडांत ग्रीनिच, त्याचप्रमाणें हिंदुस्थानांत उज्जनी नगरी होती असें स्पष्ट दिसतें. ज्योतिषाचा विकास जो शकांच्या कारकीर्दींत झाला तो पुढें गुप्तांच्या कारकीर्दींत तसाच सुरू राहिला, व आर्यभट्ट व वराहमिहिर अशांसारखे प्रख्यात ज्योतिषी तेथें झाले. या सर्व ज्योतिष्यांनीं ग्रहगणित करण्यांत शकाचाच उपयोग केला आहे. यामुळें शककाल आपल्यांत फार महत्त्वाचा झाला आहे. कोणताहि ज्योतिषी घ्या, गणित करायाचें असल्यास शकावर काल आणून त्याचे आधारें गणित करितो, संवतावरून किंवा सनावरून करीत नाहीं. हें शकाच्या प्रसाराचें मुख्य कारण होय. दक्षिणेंतील लोक ज्योतिषासंबंधानें पुढें पुढें प्रसिद्धीस आले. त्यांनीं वराहमिहिरादिकांचें शकगणित पुढें चालविलें. दुसरी गोष्ट, शक लोक जरी प्रारंभीं प्रारंभीं परकी व परधर्मी होते, तरी उत्तरोत्तर उज्जनींत राहिल्यावर महाकालाच्या सान्निध्याचा परिणाम त्यांजवर घडलाच. ते पूर्ण हिंदू बनले व त्यांनीं रुद्रसिंह, रुद्रदत्त इत्यादि शिवभक्तिसूचक नांवें धारण केलीं. अगदीं प्रारंभींचे शक बौद्धधर्मी असावे, परंतु कालानें ते पूर्ण हिंदू बनले. याजमुळेंहि त्यांचा शक वापरण्यास लोकांस शंका येत नाहींशी झाली असावी. सारांश, शककालाची सुरवात शकनृपतींनीं केली असावी हें मत साधारण दृढ ठरतें.

शकानंतर इतर शक हिंदुस्थानांत बरेच प्रचलित झाले व लयाला गेले. ही गोष्ट प्रसंगोपात्त पूर्वीं आलीच आहे. गुप्त, वलभी, कलचूरी, श्रीहर्ष वगैरेपासून शिवराज्यारोहण–शकापर्यंत कित्येक शक उत्पन्न होऊन लयाला गेले. परंतु अद्याप संवत् व शक हेच चालू आहेत. जरी यांना धर्माचें पाठबळ नसल्यामुळें हिजरी सनाप्रमाणें किंवा इसवी सनाप्रमाणें यांच्याविषयीं मत खात्रीनें देतां येत नाहीं, तथापि हे शक दीर्घायुषी आहेत असें मानण्यास प्रत्यवाय दिसत नाहीं.

---

# स्कंदपुराणांतील भविष्य इतिहास.

प्रत्येक पुराणांत हिंदुस्थानांतील कलियुगाचा इतिहास बहुधा भविष्य रूपानें सांगितलेला असतो. निदान वायु, मत्स्य आणि भागवत ह्या पुराणांत तो सांगितलेला आहे. आणि त्याचा उल्लेख हिंदुस्थानाच्या प्राचीन इतिहासाच्या विचारांत नेहमीं येतो. बहुतेक पुराणें जन्मेजयाला किंवा परीक्षिताला सांगितलेलीं आहेत. कांहीं शंकरानें पार्वतीला किंवा दुसऱ्या कोणा देवतांना सांगितलेलीं आहेत. कलियुगांत पुढें काय अनर्थ होतील याचें भयंकर विस्तृत वर्णन बहुधा सर्वांत आहे. असो; हीं पुराणांतील भविष्य-इतिहासाचीं वर्णनें एकत्र आणून त्यांजपासून खऱ्या इतिहासास काय मदत मिळेल हें पहाणें फायदेशीर व मनोरंजक होईल. स्कंदपुराणांत जो भविष्य इतिहास मला सांपडला तो मी या लेखांत वाचकांपुढें ठेवितों. मत्स्य, वायु, भागवत ह्या पुराणांतील वर्णनाहून तो निराळया स्वरूपाचा असल्यानें फारच विचारणीय आहे. ह्याजबरोबर हा भाविष्य इतिहास निरनिराळया दृष्टीनें ऐतिहासकांनीं कसा लावला आहे व त्यांतून खरा इतिहास कसा निघतो हेंहि आपण पाहूं.

प्रथम वायु वगैरे पुराणांतून दिलेला इतिहास संक्षिप्त रीत्या सांगूं. हा बहुधा सर्वत्र एकाच स्वरूपाचा आहे. तो असा. "मगधांत बार्हद्रथ वंश म्हणजे जरासंधाचा वंश १००० वर्षें राज्य करील ( यांतील राजांचीं नांवें कारकीर्दीच्या वर्षांसह दिलीं आहेत ). यापुढें प्रद्योत वंश १३८ वर्षें राज्य करील. ( पांच राजे व त्यांचीं राज्य—वर्षें दिलीं आहेत ). त्यानंतर शैशुनाग वंश ३६२ वर्षें राज्य करील. ( दहा राजे व त्यांचीं वर्षें दिलीं आहेत ). त्यानंतर नवनंद १०० वर्षें राज्य करतील. यापुढें चंद्रगुप्तानें स्थापिलेला व चाणक्यानें मजबूत केलेला मौर्य वंश २१६ वर्षें राज्य करील. नंतर पुष्यमित्रादि शुंग राजे राज्य करितील. मग काण्वांचा ब्राम्हण वंश ८५ वर्षें राज्य करील. आणि नंतर आंध्र वंश ४५६ वर्षें राज्य करील. त्यापुढें म्लेच्छ होतील." तात्पर्य बहुतेक पुराणांत आंध्रवंशापर्यंत भविष्य इतिहास सांगितलेला असतो. दोन पुराणांत काकटीय यवन वंश सांगितला आहे असें त्र्यं. गु. काळे यांनीं लिहिलें आहे. वायु, मत्स्य, भागवत आणि विष्णु यांत आंध्रांपर्यंत भविष्य राजे सांगितले आहेत, ह्याची तीं पुराणें

ताडून मीं खात्री करून घेतली आहे. हे वंश किती वर्षें राज्य करतील ह्या-संबंधानें या चारी पुराणांत जो श्लोक सांपडतो तो असाः—

यावत्परीक्षितो जन्म यावन्नंदाभिषेचनम् ।
एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पंचदशोत्तरम् ॥ १ ॥

यवरच्या चरणाचे कित्येक पाठभेद आहेत ते पुढें पाहूं.

आतां स्कंदपुराणांत जो भविष्य इतिहास सांपडतो तो वरीलहून अगदीं भिन्न स्वरूपाचा आहे. त्यांत मगधांतील राजवंश मुळींच दिले नाहींत. आणि त्यांतील वर्षगणना कलियुगापासून फारच निराळी केली आहे. स्कंदपुराणांतील हीं वचनें आजपर्यंत लोकांपुढें आलीं नसल्यानें तीं विस्तारानें दिलीं पाहिजेत. स्कंदपुराण, माहेश्वर–खंडांतर्गत कौमारखंड, अ. ४० यांत ( खेमराज–श्रीकृष्णाची छापील प्रत ) पुढील वचनें आहेत.

अष्टाविंशे कलौ यत्र भावि तत् त्वं निबोध मे ।
त्रिषुवर्षसहस्रेषु कलेर्यातेषु पार्थिव ॥
त्रिशतेषु दश न्यूनेष्वस्यां भुवि भविष्यति ।
शूद्रको नाम वीराणामधिपःसिद्धिमत्र सः ॥
चर्चितायां समाराध्य लप्स्यते भूभरापहः ।
ततस्त्रिषु सहस्रेषु दशाधिक–शत–त्रये ।
भविष्यं नंद–राज्यं च चाणक्यो यान्हनिष्यति ।
शुक्लतीर्थे सर्वपापमुक्तिं योभिलप्स्यति ।
ततस्त्रिषु सहस्रेषु विंशत्या चाधिकेषु च ।
भविष्यं विक्रमादित्य–राज्यं सोऽथ प्रलप्स्यते ॥
सिद्धिं प्रसादात् दुर्गाणां दीनान् यो ह्युद्धरिष्यति ।
ततः शतसहस्रेषु शतेनाप्यधिकेषु च ।
शको नाम भविष्यश्च योतिदारिद्र्यहारकः ।
ततस्त्रिषु सहस्रेषु षट्शतैरधिकेषु च ।
मागधे हेमसदनादंजन्यां प्रभविष्यति ।
विष्णोरंशो धर्मपाता बुधः साक्षात् स्वयंप्रभुः ॥
तस्य कर्माणि भूरीणि भविष्यंति महात्मनः
ज्योतिर्बिंदुमुखानुग्रान् हनिष्यति स कोटिशः ॥
ततो वक्ष्यन्ति तं भक्त्या सर्वपापहरं बुधम् ॥

चतुर्षु च सहस्रेषु शतेष्वपि चतुर्षु च ।
साधिकेषु महान् राजा प्रमितिः प्रभाविष्यति ।
गोत्रेषु वै चंद्रमसो महासेनापतिर्बली ।
म्लेच्छान् स कोटिशो हत्वा पाषंडानि च सर्वशः
वैदिकं केवलं शुद्धं सद्धर्मं वर्तयिष्यति ।
गंगायमुनयोर्मध्ये निष्ठां यास्यति पार्थिवः

यानंतर संभल ग्रामांत विष्णुयशा नांवाच्या ब्राह्मणाच्या पोटीं विष्णु अवतार घेऊन म्लेच्छांचा कलियुगांतीं संहार करील हें ठराविक भविष्य दिलें आहे.

वर ग्रंथ जसा छापला आहे तसा दिला आहे. त्यांत कांहीं बदल करावयास पाहिजे हें उघड आहे. क्रमानें सांगितलेले राजे असेः—

| नांव | देश | कलि वर्षे. |
|---|---|---|
| १ शूद्रक | ० | ३०००–३१० |
| २ नंद | ० | ३००० शाधिक शतवर्षे |
| ३ विक्रमादित्य | ० | ३०२० |
| ४ शक | • | १०००० दरिद्रहरण करणारा<br>+१०० |
| ५ बुध | मगध | ३६०० |
| ६ प्रमिति (चंद्रवंशी) | गंगायमुना | ४४००. |

या उताऱ्यांत ततः हा शब्द अनुक्रमानें या अर्थी आहे हें उघड आहे. तेव्हां कालानें राजांचा अनुक्रम शूद्रक, नंद, विक्रम, शक, बुध आणि प्रमिति असा ठरतो. शक राजाला शतसहस्रेषु असें म्हटलें आहे, तें अल्प पाठानें स्पष्ट दिसतें. कारण पुढच्या राजाचा काल त्रिषु सहस्रेषु असाच सांगितला आहे. तेव्हां त्रिषु सहस्रेषु असें शतसहस्रेषुच्या ठिकाणीं पाहिजे म्हणजे शकाचा काल ३१०० ठरतो. ही चूक दुरुस्त केली असतां विक्रम आणि शक हे दोन राजे हल्लीं चालू असलेल्या संवताचे व शकाचे प्रवर्तक ठरतात. हल्लीं शकवर्षाचा प्रारंभ कलिवर्ष ३१७९ हा आहे. ३१०० वर्षी शकाचा जन्म धरावा आणि शककालारंभ ३१७९ हा त्याच्या मृत्यूपासून धरावा. विक्रम संवत् कलियुगारंभानंतर ३०४५ वर्षीं सुरू झाला (३१०१।५७). पण वरील उताऱ्यांत ३०२० वर्षे दिलीं आहेत, तो त्याच्या जन्माचा काल म्हणावा किंवा त्याच्या राज्यावर येण्याचा

म्हणावा. तेव्हां हे शक व विक्रम प्रसिद्ध शातवाहन व विक्रमादित्यच आहेत. आतां नंद व शूद्रक यांजविषयीं विचार करूं. हे हिंदुस्थानच्या इतिहासांत प्रसिद्धच आहेत; व हे विक्रमाच्या पूर्वीचे आहेत. वरील उताऱ्यांत नंदाला ३०००+ दशाधिकशतत्रये म्हटलें आहे याचें आश्चर्य वाटतें. तसेंच शूद्रक त्रिशतेषु दशन्यूनेषु म्हणजे ३२९० कलियुगांत कसा होईल ? तेव्हां येथें निराळा अर्थ लावला पाहिजे. चंद्रगुप्ताचा काळ ३१२ इ. स. पू. ठरला आहे म्हणजे शकपूर्व ३१२ + ७८=३९० होय. यापूर्वी नंद १०० वर्षे म्हणजे शकपूर्व ४९० म्हणजे गतकलि ३१७९–४९०= २६८९ किंवा २६९०. अर्थात् त्रिसहस्रे दशाधिकत्रयन्यूने असा शब्दप्रयोग घेतला म्हणजे ३१० न्यून ३००० अर्थात २६९० हा काळ बरोबर दिलेला आहे. फारतर १ किंवा १० वर्षांचा फरक पडेल. शूद्रक यापूर्वी २० वर्षे ठरतो ताहि बरोबर आहे. आतां विक्रम व शक यांच्या पुढचे दोन राजे सांगितले ते कोणते हें पाहूं. मगधांत गतकालि त्रिषु सहस्रेषु षट्शतैरधिकेषु म्हणजे ३६०० मध्यें बुध नांवाचा राजा होईल. तो अतिशय पुण्यवान् धर्मरक्षक होऊन ६४ वर्षे राज्य करील. ज्योतिर्मुख अशा उग्र म्लेंछांना कोटिशः मारील " हें वर्ष ३६००–३१०१ इ. म्हणजे ४९९ इ. येतें. या वेळेस मगधांत गुप्त राजे होते. त्यांचा उतरता काळ सुरू झाला होता; व हूण लोक त्यांनां फार त्रास देत होते. या हूणांचा पराभव नृसिंहगुप्त बालादित्य त्यानें केला असें ह्यूएनत्संगनें लिहिलें आहे. तो हिंदुधर्माभिमानी होता व बौद्धांचाहि आश्रयदाता होता. तो विष्णूचा अंशावतार होता असें स्कंदपुराण म्हणतें. तो विष्णुभक्त तर होताच. वैष्णव मताचा व बौद्धमताचा मेळ पुढें कसा झाला हें लक्षांत येण्यास हें पुरे आहे. नृसिंह बालादित्याचा काळ स्मिथनें ४८५ इ. दिला आहे. याशिवाय या घराण्यांत एक बुधगुप्तहि याच सुमारास झाला आहे. याचा शिलालेख गुप्त इन्स्क्रिप्शन्समध्यें छापला आहे. तथापि " ततो वक्ष्यन्ति तं भक्त्या सर्वपापहरं बुधम् " या स्कंदपुराणाच्या वाक्यावरून नृसिंहगुप्ताचेंच हें अपरनाम मानावें. ज्योतिर्बिन्दुमुखान् हें विशेषण हूणांस बरोबर लागतें. पण इतिहासकारांनीं नृसिंहगुप्तास ४० वर्षे राज्य दिलें आहे, ६४ नाहीं; कदाचित् ६४ वर्षे सबंध आयुष्य असेल. दुसरें 'अजन्यां हमसदनात्' या शब्दांचा अर्थ काय? ह्या दोन लहान गोष्टी बाजूला ठेविल्या तर नृसिंह बालादित्यानें हूणांचा पराभव केला या ह्यूएन्त्संगाच्या विधानास हा प्रत्यंतर पुरावा मिळतो. मंदोसरच्या

लेखांतील यशोधर्म्यानें मिहिरकुलाचा पाडाव केला असें वर्णन आहे त्यावरून या दोन्ही राजांनीं एकत्र होऊन हूणांचा पराभव केला असें इतिहासकार मानतात. मला वाटतें दोन निरनिराळया लढाया मानल्या पाहिजेत. बालादित्यानें हूणांचा पराभव करून त्यांस मगधांतून हांकून लाविलें आणि यशोधर्म्यानें माळव्यांतून व पंजाबांतून कांहीं वर्षांनंतर, हाकून लाविलें असें दिसतें.

बुधानंतर दुसरा राजा प्रमिति सांगितला आहे व त्याचा काळ ४४०० कलि दिला आहे. अर्थात् इ. स. ३१०१ उणे करतां १२९९ इ. स. येतो. या वर्षीं म्हणजे श. १२२१ मध्यें कोणी चंद्रवंशी राजानें गंगायमुनेच्या दरमियान म्लेच्छांचा नाश केल्याचें इतिहास सांगत नाहीं. किंबहुना याच्या उलट अल्लाउद्दीनानें हिंदूंचा नाश केल्याचें इतिहासांत दिसतें. हें भविष्य बहुधा स्कंदपुराणकर्त्यानें भावि कल्पित सांगितलें आणि सहजच तें खोटें ठरलें. ' चतुर्ष्वपि सहस्रेषु चतुर्ष्वपि शतेषु च ' या शब्दांतच पूर्वींच्या अनुकरणानें ( त्रिषु सहस्रेषु त्रिषुशतेषु ) काल्पनिकपणा स्पष्ट दिसतो. यापुढील लांबचें व शेवटचें भविष्य कल्किअवताराचें सर्वांचें आहे.

वरील विवेचनावरून स्कंदपुराणांतील हें भविष्य वर्णन कोणत्या काळांत लिहिलें गेलें याचा अंदाज होऊं शकतो. शके ४२० च्या नृसिंह बालादित्यानंतर स्कंद पुराण पुन्हां सुधरून त्यांत हा भविष्य भाग जोडला गेला असें स्पष्ट दिसतें. मला वाटतें हा स्कंदपुराणाचा संस्करणकार नृसिंहबालादित्याचाच आश्रित असावा. यामुळेंच त्याचें त्यानें इतकें गौरवयुक्त वर्णन केलें आहे. इ. स. ५०० पर्यंत हें संस्करण झालें असावें. कारण यांत श्रीहर्षाचें मुळींच नांव नाहीं. गुप्तांच्या अमदानींत पुराणांचें शेवटचें संस्करण झालें असा जो काळयांचा व ऐतिहासिकांचा तर्क आहे तो खरा दिसतो. पहिल्या गुप्त राजांच्या वेळीं इतर पुराणांचें संस्करण झालें व स्कंदपुराणाचें शेवटच्या गुप्तांच्या वेळीं झालें. हा संस्कर्ता बराच चांगला कवि होता. "सहसा विदधीत न क्रियामविवेकः परमापदां पदम्" हें वाक्य यांत आलें आहे तेव्हां भारवीनें यांतून घेतलें किंवा भारवींतून यानें घेतलें. वाय्वादि पुराणें गुप्तांच्या प्रारंभीं संस्करण पावलीं असें म्हणण्याचें कारण त्यांत आन्ध्रान्तापर्यंतचेच राजे भविष्यांत दिले आहेत, गुप्तांपैकीं कोणीं दिलेला नाहीं.

वाय्वादि चार पुराणें आणि स्कंदपुराण यांच्या भविष्यवर्णनांत काय काय फरक आहेत आणि कां आहेत हें आपण आतां पाहूं. पहिला फरक म्हणजे इतर पुराणांत विक्रम आणि शक सांगितलेले नसतात, स्कंदांत ते स्पष्ट सांगितले आहेत. यांचे शक संवत् अद्याप चालू आहेत. हे इ. स. पू. ५७ व. इ. स. ७८ चे शककर्ते आन्ध्रान्तापूर्वीचे आहेत. पूर्वीच्या पुराणकारांनीं आन्ध्रांचीं राजनांवें आणि राज्यवर्षें सांगितलीं. त्यांनीं विक्रम आणि शक कसे सांगितले नाहींत ? ते विसरले जाणें संभवनीय नाहीं. त्यांचे शकसंवत् चालू आहेत तेव्हां ते काल्पनिक होऊं शकत नाहींत. हें एक मोठें गूढ आहे. याचा उलगडा माझ्या मतें असा दिसतो कीं, प्रथम वाय्वादि पुराणें फक्त मगधाचे राजे देत. विक्रम व शक हे असत मगधांचे राजे नव्हते. आन्ध्र मगधाचे राजे मागून झाले. वाय्वादि पुराणें गुप्तकालाच्या आरंभीं ( म्ह. सु. ३२० इ. ) संस्करण पावलीं. स्कंदपुराण अखेरीस ( सु. ५५० इ. ). या दोनशें वर्षांच्या अवधीत एक मोठा फरक ज्योतिर्गणितांत झाला. मोठमोठे सिद्धान्तकार या काळांत होऊन हल्लींची ज्योतिषपद्धति उत्पन्न झाली व प्रचारांत आली. वाय्वादि पुराणांच्या संस्करणकालीं शककाल अगदीं कानाकोपऱ्यांत होता म्हणजे माळवा व काठेवाड येथेंच चालत होता व तो म्लेच्छ समजला जात होता. विक्रम संवत् त्याहून थोड्या भागांत चालत होता. वाय्यादि पुराणकारांस मगधाचेंच राज्य महत्त्वाचें वाटे. स्कंदपुराणाच्या संस्करणकालीं ज्योतिषसिन्धातकारांनीं शककालास पुढें आणलें होतें इतकेंच नव्हे तर शक म्हणजे शातवाहन ही गोष्ट प्रचलित झाली होती. ह्याच राजाचा सप्तशतींत शातवाहन असा उल्लेख आहे व तो लोकांचें दरिद्रहरण करणारा असें वर्णन आहे. तेंच या स्कंदपुरणांत शकाचें केलें आहे. अर्थात् शकाचा आणि शातवहनाचा एकीभाव लोकांच्या समजांत रूढ होऊन शकाचें नांव भविष्य राजांच्या यादींत यावेळीं आलें. विक्रमाचा संवत् या काळीं सर्वत्र रूढ झाला होता. यशोधर्म्याच्या साम्राज्यामुळें त्यास महत्त्व आलें असावें. अर्थात् विक्रमाचें म्हणजे इ. स. पूर्वसत्तावनचा संवत् चालविणाऱ्याचें नांव प्रशंसनीय राजमालिकेंत सहज आलें. विक्रमाचें नांव मध्यंतरीं शकांच्या विजयानें बरेंच ग्रस्त झालें होतें. उज्जनीस शकांचें राज्य होतें तेंहि गुप्तांनीं विच्छिन्न करून यशोधर्म्यानें विक्रमसंवत् वापरून पुन: प्रतिप्रसव आणलें, तेव्हांपासून विक्रमाचें यश आजपर्यंत गाजत आहे.

त्याची जी कथा हल्लीं प्रचलित आहे तीच त्यावेळीं होती असें दिसतें. कारण वरील स्कंदपुराणाच्या उताऱ्यांत दुर्गाच्या प्रसादानें विक्रमास सिद्धि मिळाली असें वर्णन आहे. चौसष्ट योगिनींच्या कृपेनें विक्रमाला अतुल सामार्थ्य लाभलें होतें इत्यादि कथा हल्लीं उज्जयिनीस सांगतात. तात्पर्य, वायुमत्स्यादि पुराणकर्त्यांनीं गुप्त राज्याच्या प्रारंभीं पुराणांत संस्कार देतांना शक व विक्रम दोन्हीं सांगितले नाहींत; तेच स्कंदपुराणाच्या शेवटचा संस्कार होतेवेळीं गुप्त राजांच्या अंताच्या सुमारास ज्योतिषांच्या नवीन गणितामुळें लोकांपुढें आले असें संभवतें.

आतां दुसरा महत्त्वाचा फरक वायुमत्स्यादींच्या भविष्यांत आणि स्कंदपुराणाच्या भविष्यांत असा आहे कीं स्कंदांत कलियुगकाल वापरला आहे आणि वाय्वादि पुराणांत वापरलेला नाहीं. कल्पारंभापासून किती काल गेला हें त्यांनीं एका श्लोकांत सुचविलें आहे पण या कालाचा शक कालगणनेप्रमाणें त्यांनीं उपयोग केला नाहीं. स्कंदपुराणांत याचा तसा उपयोग आहे. त्रिषु वर्षसहस्रेषु कलेर्यातेषु इत्यादि कालगणना दिलेली आहे. ती वाय्वादि पुराणांत नाहीं. याचेंहि कारण ज्योतिष्यांनीं आपल्या नवीन पद्धतींत कलियुगगणना पक्या पायावर स्थापिली हें होय. याचें विस्तृत विवेचन करणें अवश्य आहे. प्रथम मुद्दा असा कीं, कालमापनासाठीं कालाच्या अनंत प्रवाहांत कालमापनाचे स्तंभ रोवावे लागतात. या स्तंभांना धरून काल सांगतां येतो. निरनिराळे शक हे असेच स्तंभ आहेत. अर्वाचीन ज्योतिषसिद्धांतकारांनीं शकनृपतिकाल हा एक स्तंभ धरला, हें सहजच झालें. कारण ज्योतिषाची नवीन पद्धतीनें वाढ शकनृपतींच्या राज्यांत उज्जनीस झाली असें दिसतें. वास्तविक पाहतां आर्यसिद्धांतज्योतिषांत उज्जनीचे रेखांश जसे शून्य मानिले आहेत. ह्याचप्रमाणें कालाचा शून्य रेखांश विक्रमापासून मानला पाहिजे होता. पण तो शककालापासून मानला. तो तत्कालीन उज्जनीच्या शकराजांपासून मानला असें दिसतें. आतां शकपूर्व कलियुगारंभ कधीं झाला हें ज्योतिष्यांना कायम करावें लागलें. तो काल त्यांनीं शकपूर्व ३१७९ असा नक्की ठरविला. भारतीयुद्ध—काल आणि कलियुगारंभ एकच ही समजूत हिंदुस्थानांत फार प्राचीन कालापासून होती. महाभारतांत ती स्पष्टपणें आली आहे. अर्थात् भारतीयुद्धाचा काल ज्योतिषसिद्धांतमतें शकपूर्व ३१८० ठरला. यानंतर झालेल्या स्कंदपुराणसंस्कर्त्यांनें व अनेक लेखकांनीं कलिकाल म्हणजे भारतीयुद्धकाल याचा

उपयोग केलेला दिसतो. त्याची जोड शककालाशींहि घालण्याचा संप्रदाय पडलेला नजरेस येतो. येथें एक शिलालेख याच सुमाराचा देऊं.

चालुक्य पुलकेशी दुसरा याचा काल ऐहोळे येथील शिलालेखांत दिला आहे. तो असा. ' त्रिंशत्सु त्रिसहस्रेषु भारतादाहवादितः । सप्ताब्दशतयुक्तेषु गतेष्वब्देषु पंचसु । पंचाशत्सु कलौ काले षट्सु पंचशतासु च । समासुसमतीतासु शकानामपि भूभुजाम्॥' म्हणजे भारतीयुद्धापासून ३७३५ वर्षें व शकनृपतींचीं ५५६ वर्षे गेल्यावर हा लेख लिहिला. अर्थात् भारतीयुद्ध आणि कलियुगारंभ एक असें मानीत व शककाल आणि कलिकाल हे दोन्ही देण्याचा सांप्रदाय शकाच्या सहाव्या शतकांत होता. ही पद्धत तेव्हांपासून आतांपर्यंत चालू आहे आणि प्रत्येक पंचांगांत कलियुगकाल, विक्रमकाल आणि शककाल दिले जातात.

पण ज्योतिषसिद्धांत होण्यापूर्वीं भारती लोकांची कालगणनेसंबंधीं मोठी धांदल असावी असें दिसतें. शककाल शकाच्या राज्याच्या बाहेर चालत नव्हता, विक्रमकाल थोड्याच टापूंत चालत असे. तेव्हां हे काल चालू नव्हते त्या ठिकाणीं व त्या कालीं कोणती गणना चालू होती ? कलिकाल चालू होता असें लेखी पुराव्यावरून अद्याप सिद्ध झालें नाहीं. जैनांनीं महावीर-काल चालविला होता व बौद्धांनीं बुद्ध निर्याणकाल. पण हिंदूंजवळ असा कोणताहि काल सर्वमान्य नसल्यानें त्यांची धांदल होती. ही धांदल वाय्वादि पुराणांत स्पष्ट दिसते. कारण त्यांना कालगतीची कल्पना कशीतरी द्यावी लागली. कालाच्या अनंत प्रवाहांत आपण कोणत्या ठिकाणीं आहोंत हें ते कसें दाखवीत ? आर्यांच्या प्राचीन इतिहासांत मुख्य कालस्तंभ भारतीयुद्ध, तें व कलियुगारंभ एक ही प्राचीन समजूत. याचेंच अन्यरूप परीक्षितीचा जन्म. भारतीयुद्ध पौषांत झालें, फाल्गुनांत परीक्षित जन्मला, चैत्र शु॥ १ देस कलियुग लागलें. युधिष्ठिराला राज्याभिषेक पौषांतच युद्धानंतर लागलीच झाला. तात्पर्य भारतीयुद्ध, युधिष्ठिर शक, परीक्षिताचा जन्म, कलियुगारंभ हे सर्व एकच मानले जात व होते.

यानंतरच्या इतिहासाच्या कालप्रवाहांत आर्यधर्मीयांच्या ग्रंथांत हल्लीं जो स्तम्भ सांपडतो तो नंदाचा होय. याचें संपूर्ण नांव महापद्म नंद होतें. तो व त्याचे आठ पुत्र मिळून नवनंद. यांचा उच्छेद चन्द्रगुप्तानें केला.

बौद्धधर्मीयांस चन्द्रगुप्ताचें महत्व नाहीं. अशोक त्याचा नातु असून त्यानें बौद्धधर्म प्रसृत केला व त्यास राजाश्रयाचा पाठिंबा दिला. चंद्रगुप्ताचें महत्व ग्रीक व पाश्चात्य लोक यांना आहे; कारण त्याच्या दरबारीं मेगास्थेनीस ग्रीक वकील होता. याला सेल्युकसनें पाठविलें असल्यानें याचा युरोपीय इतिहासाशीं मेळ बसतो; आणि एक निश्चित काळ हिंदुस्थानच्या इतिहासांत कायम होतो. पण चंद्रगुप्त सनातनीयांना विशेष महत्त्वाच्या वाटत नाहीं, नंद वाटतात. कारण प्राचीन क्षत्रिय राजपरंपरेचा उच्छेद त्यांनीं केला. महापद्मानें द्वेषानें म्हणा किंवा महत्वाकांक्षेनें म्हणा, पूर्वींचे सूर्यचन्द्रवंशी राजे नष्ट केले. अर्थात् ‘ नन्दान्तं क्षत्रिय कुलम् ’ असें पुराणांत येतें. हा नन्द क्षत्रियापासून शूद्रीच्या पोटीं जन्मला होता आणि चन्द्रगुप्त तर केवळ शूद्र होता. यापुढें क्षत्रियवंश मगधांत राज्यावर आलाच नाहीं. मौर्य शूद्र, शुंग वैश्य, काण्व ब्राह्मण आणि आन्ध्र पुन्हा शूद्र असे राजवंश मगधांत झाले. वाय्वादि पुराणांत आध्रान्तापर्यंतच भविष्य आहे. हीं पुराणें गुप्तवंशाच्या प्रारंभीं झालीं असल्यानें यापूर्वींच्या काळाचे त्यानीं दोन तुकडे केले; एक नंदापासून आन्ध्रान्तापर्यंत व दुसरा परीक्षतापासून नंदापर्यंत. नंदापासूनची माहिती अलीकडील व बौद्ध–जैन लोकांनीं चांगली ठेविली असल्यानें त्यानीं बरोबर दिली. पण परीक्षितापासून नन्दापर्यंत त्यांना मागील परंपरा मिळाली नाहीं. कारण बौद्ध जैनांनीं ती बुडवून टाकली होती. अशोककाळीं बौद्ध–जैनांचा जोर होऊन त्यांनीं आपल्या प्राचीन भारुड कथा उत्पन्न केल्या. चंद्रगुप्तापर्यंत प्राचीन परंपरेची माहिती होती, ती मेग्यास्थेनीसला मिळालीहि होती, पण ती अशोकानंतर नष्ट झाल्यानें, गुप्तकालारंभीं पुराणसंस्कर्त्यांस केवळ कल्पना करावी लागली. शेवटचे प्रद्योत व शिशुनाग वंश यांची कांहीं तरी माहिती लागली पण परीक्षितापासून प्रद्योतापर्यंत किती वर्षें आणि किती राजवंश झाले हे ते बिलकूल जाणत नव्हते, यामुळें त्यांनीं कांहींतरी राजे व आंकडे राज्यवर्षांचे देऊन

यावत्परीक्षितो जन्म यावन्नन्दाभिषेचनम्
एतद्वर्षसहस्रं तु ज्ञेयं पञ्चदशोत्तरम् ॥ वायु

असें एकंदर प्रमाण बांधलें. पण प्रारंभींचा बार्हद्रथवंश ( जरासंधाचा ) एक हजार वर्षें राज्य करील असेंहि ठोकून दिलें. ‘ पूर्ण ’ वर्ष-

सहस्रं च तेषां राज्यं भविष्यति ॥ वायु. अर्थात् वरील श्लोकांच्या चौथ्या चरणाचे 'शतं पंचदशोत्तरम्' (१११५) इत्यादि अनेक पाठ आहेत. नन्दाभिषेकापासून मात्र आन्ध्रान्तापर्यंत त्यानीं बारकाईचा व योग्य काळ सांगितला आहे.

प्रमाणं वै तथा चोक्तं महापद्मान्तरं च यत

अन्तरं तत् शतान्यष्टौ षट्त्रिंशच्च समाः स्मृताः

एतत्कालान्तरे भाव्या आन्ध्रान्ता ये प्रकीर्तिताः ॥ वायु

अर्थात् महापद्मनंदापासून आन्ध्रान्तापर्यंत ८३६ वर्षे ही वाय्वादि पुराणें एकच संख्या सांगतात.

पण स्कंदपुराणाच्या भविष्यांत ही परंपरा अगदींच सुटली. अगोदर परीक्षिताचा जन्म न घेतां प्रारंभ कलियुगापासून घेतला. आणि प्रथम शूद्रक सांगितला, नंतर नंद, नंतर विक्रम व शक व नंतर बुध (गुप्त) मगधांत. पूर्वींच्यांचा देश सांगितला नाहीं व यांचीं वर्षें कलियुगारंभापासून ३००० उणे ३१० (त्रिशतेषु दशन्यूनेषु याचा अर्थ उलट घेऊन) वगैरे सांगितलीं. म्हणजे हें वर्णन 'वर्षसहस्रं शतं पंच' वगैरे साफ सोडून ३ हजार वर्षांवर आलें आहे. वाय्वादि पुराणें कलिनंदाचें अंतर १०१५ सांगतात तर स्कंदपुराण २६९० सांगतें. हें स्कंदमत ज्योतिषसिद्धान्तकारांस धरून आहे. कदाचित् त्यांस पूर्वींची मेग्यास्थेनिसची परंपरा मिळाली असेल. वायु–मत्स्यादि पुराणें ज्योतिषसिद्धांतापूर्वींचीं असून मागील परंपरा नष्ट झाल्यानें कांहींतरी काल्पनिक आंकडे देतात.

हे दोन मुख्य भेद सांगितल्यावर या पुराणांच्या हकीगतीवरून खऱ्या इतिहासास काय मदत मिळते तें पाहूं. प्रथम गोष्ट ही कीं ही स्कंदांतील हकीगत हल्लीं उपलब्ध असलेल्या इतिहासाला मदत देणारी आहे हें पाहून आश्चर्य वाटतें. नंदाचा काल कलियुगारंभापासून जो यांत दिला आहे तो खऱ्या इतिहासाशीं नक्की जुळतो, हें आश्चर्य होय. शककालापूर्वीं नंद ४९० वर्षे झाला ही माहिती ग्रीक इतिहासावरून पक्की ठरते. इतर शब्दांनीं हीच गोष्ट सांगावयाची म्हणजे गुप्तराज्य नष्ट होतेवेळीं नंदापासून किती काळ गेला होता ही माहिती लोकांस होती. स्कंदपुराण मध्यंतरींच्या राजवंशांच्या पिढ्या देण्याच्या भानगडींत पडलें नाहीं. कारण हे राजे बहुतेक आर्यधर्मीय नव्हते. तात्पर्य ही हकीगत खऱ्या इतिहासास म्हणजे हल्लीं मान्य झालेल्या इतिहासास दुजोरा देणारी आहे.

वाय्वादि पुराणांची हकीगत इतिहासास मदत देणारी नाहीं. नंदापासून आंध्रांतापर्यंत त्यांनीं पिढ्या दिल्या हें महत्त्वाचें आहे आणि ह्यांचा काल ८३६ वर्षें त्यांनीं दिला तो इतिहासाला जुळता आहे; म्हणजे इ. स. पूर्वी ४१२ नंद याजपासून गुप्तारंभ इ. स. ३२० पर्यंत हल्लींच्या इतिहासाप्रमाणें ७३२ वर्षे होतात. ह्यांत १०० वर्षांची तूट पडते, तथापि ती उपेक्षणीय आहे. पण पुराणांनीं नंदाच्या पूर्वींची दिलेली हकीगत विश्वसनीय नाहीं. कारण भारतीय युद्ध ही एक ऐतिहासिक गोष्ट आहे. तिचा काळ ३१८० शकपूर्व ठरतो. भारतीय युद्ध कलियुगारंभानंतर ६५१ वर्षांनीं झालें आणि युधिष्ठिराचा काल 'षड्द्विक–पंचद्वियुतः शककालस्तस्य राज्ञश्च' या वचनानें २५६६ वर्षें गर्गानें दिला तेव्हां त्यानें ही चुकी केली असली तरी कलियुगारंभ आणि भारतीययुद्ध एकाच कालीं मानलें तर, भारतीय युद्धाचा काल ३१७९ श. येतो. अर्थात् ठरलेल्या काळाशींच त्याचा मेळ आहे. आणि मेगॅस्थेनीस यानेंहि दिलेल्या माहितीशीं मेळ आहे, हें अन्यत्र दाखविलेंच आहे.

येथें आणखी एका मताचा उल्लेख व ऊहापोह केला पाहिजे. नारायणशास्त्री, बी. ए., बी एल्. मद्रास यांनीं 'एज ऑफ शंकर' या नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. त्यांत त्यांनीं ज्योतिष सिद्धांतकाराचें मत मान्य करून कलियुगारंभ शकपूर्व ३१७९ च मानला; पण भारतीय युद्धाचा काल शकपूर्व ३२१६ धरला आणि वाय्वादि पुराणांतील पिढ्या मान्य करून हल्लीं हिंदुस्थानच्या इतिहासांत मान्य झालेल्या सर्व तारखा चुकीच्या ठरविल्या. त्यांच्या विवेचनाचा निष्कर्ष इ. सनाच्या आंकड्यांनीं थोडक्यांत असाः–'यावत्परीक्षितो जन्म यावन्नन्दाभिषेचनम् । एतद्वर्षसहस्रं च शतं पञ्चदशोत्तरम् ॥' हें खरें धरून म्हणजे भारतीयुद्धानन्तर १५१० वर्षांनीं नंद मानून ते निरनिराळे व्यक्तींचे काळ देतात ते असे. भारतीय युद्ध इ. स. पू. ३१३८ मानून इतर काळ असे ठरविलेः—

| | नारायणशास्त्री यांनीं दिलेला | हल्लीं मान्य |
|---|---|---|
| १ प्रद्योत वंशप्रारंभ ,, | २१३३ इ. स. पू. | ७०० सु इ. स. पू. |
| २ शिशुनाग वंश प्रा. | १९९५ | ६०९ |
| ३ बिंबिसार | १८५३ | ५१९ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ गौतमबुद्ध | जन्म | १८८२ | ५०० सु. |
| ५ नवनंदारंभ | | १६३५ | ४२२ |
| ६ चन्द्रगुप्त | | १५३५ | ३२२ |
| ७ अशोक | | १४७३ | २४२ |
| ८ शुंगवशारंभ | | १२१९ | १८४ |
| ९ काण्व " | | ९१९ | ७२ |
| १० आन्ध्रारंभ " | | ८३४ | २२० |
| ११ हाल | | ४९५ | ६० इ. स. |
| १२ गुप्तारंभ | | ३२० | ३२० |
| १३ समुद्रगुप्त | | ३२१ | ३२७ |
| १४ विक्रमादित्य | | ४२७ | ५७ |
| १५ ( शकद्वेन ) | | ५५० | ७८ |

या यादींतील नारायणशास्त्री यानीं दिलेल्या सर्व काळांस प्राचीन ग्रंथांचा व लेखांचा विरोध आहे. फक्त कामकोटि व शृंगेरी येथील मठांत शंकराचार्यांचा काळ इ. स. पू. ५०९ मानला आहे आणि कामकोटी मठाची स्थापना इ. स. पू. ४८३ मानला आहे, तो त्यांना जुळता आहे. पण त्याविषयींहि दुसरें मत आहे तें आपण पुढें पाहूं. प्रथम त्यांस प्राचीन लेखांचा व ग्रंथांचा विरोध कसा येतो तें दाखवूं.

प्रथम भारतीय युद्धाचा काल नारायण शास्त्री इ. स. पूर्वी ३१३८ घेतात; पण महाभारतावरून हा काळ चुकीचा ठरतो. श्रीकृष्ण भारतीय युद्धानंतर ३६ वर्षांनीं निजधामास गेले; त्यानंतर कलीयुग लागलें असा कित्येकांचा समज आहे. पण तो भारताच्या विरुद्ध आहे. दुर्योधन-वधाच्या वेळीं भीमाची तरफदारी करतांना 'प्राप्तं कलियुगं विद्धि' असें श्रीकृष्णांनीं म्हटलें, तें भारतीय युद्धानंतर लागलीच कलियुग लागलें या म्हणण्यास अनुकूल आहे; ३६ वर्षांनंतर कलियुग लागलें या कल्पनेस जुळणार नाहीं. दुसरें श्रीकृष्णासमक्ष द्वारकेंत कलियुगाचा प्रादुर्भाव झाला असें भारतांतच वर्णन आहे. पोरें वडिलांची थट्टा करूं लागलीं, यादव ब्राह्मणांचा उपमर्द करूं लागले, पति-पत्नी आपला धर्म सोडूं लागले, लोक अतिशय दारू पिऊं लागले, इत्यादि गोष्टी पाहून कलि लागला, आतां राहून उपयोग नाहीं असें जाणून श्रीकृष्णांनीं यादवांचा संहार होऊं दिला व स्वतः निजधामास

गेले. कालाचा महिमा श्रीकृष्णासहि थांबवितां आला नाहीं किंवा तो थांबविण्याची त्यांची मुळीं इच्छा नव्हती. अर्थात् श्रीकृष्ण वारण्या-पूर्वींच कलियुग लागलें, भारतीययुद्ध-वर्षाच्या अंतीं चैत्रांत लागलें, हाच निश्चय. आणि ज्योतिषसिद्धांतकार याचप्रमाणें भारतीगुरु इत्यादि शब्द कलियुगारंभींचा गुरु इत्यादि अर्थानें वापरतात. ऐहोळे शिलालेखांतहि हेंच मत घेतलें आहे. भारतीय युद्धानंतर लागलीच कलियुग लागलें असे स्पष्ट शब्द त्यांत आहेत.

दुसरी ऐतिहासिक महत्त्वाची व्यक्ति बुद्धाची. हल्लीं बुद्धाचा जन्म इ. स. पूर्व ५०० ते ६०० मानतात आणि नारायणशास्त्री इ. स. पूर्व १८८२ मानतात. पण बुद्धाविषयीं सिंहलद्वीप, चीन, तिबेट वगैरे देशांत जो इतिहास प्रचलित आहे तो हल्लींचीच तारीख मान्य करतो. तेथील कोणत्याहि लेखांत बुद्धाचा हा काळ सांपडणार नाहीं. बुद्ध व त्याचा समकालीन जैन-मताचा स्थापक महावीर हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत कालगणनेचे महान स्तंभ आहेत. आणि बुद्धनिर्वाण-काल अजून कित्येक ठिकाणीं चालतहि आहे. महावीराचें निर्वाण संवत्पूर्व ४७० मध्यें झालें असें जैन मानतात. दिगंबर व सितंबर यांच्या परंपरेंत महावीरासबंधीं मुळींच फरक नाहीं. तसेंच अशोकाचे शिलालेख अनेक आहेत. या शासनांत तत्कालीन ग्रीक राजांचीं कित्येक नांवें आलीं आहेत. तीं त्याच्या मान्य झालेल्या काळाशीं इ. स. पू. २७० जुळतात. नारायणशास्त्री म्हणतात त्याप्रमाणें अशोकापूर्वीं बुद्ध १६०० वर्षें जाणें असंभाव्य आहे. यानंतरची मुख्य व्यक्ति म्हणजे शंकराचार्यांची होय. यांच्या कालासंबंधीं फारच मतभेद आहे. नारायण-शास्त्री शंकरास इ. स. पूर्वीं ५०९ मानतात, तर अलीकडे इ. स. ८०० हा त्यांचा काल निश्चित झाला आहे. कामकोटि मठ व शृंगेरीमठ नारायण-शास्त्र्यांचाच काळ देतात. किंबहुना या पीठांनीं मानलेला हा काळ सिद्ध करण्यासाठींच नारायणशास्त्री यांची खटपट आहे. पण पीठांनीं मानलेला हा काळ धडधडीत चुकीचा आहे. शंकरपंडित यांनीं “ गौडबहो ” हें पुस्तक छापतांना ‘ निधिनागेभवन्ह्यब्दे विभवे मासि माधवे । शुक्ले तिथौ दशम्यां च शंकरार्योदयःस्मृतः’ हें वाक्य दिलें आहे. म्हणजे शंकराचार्यांचा जन्म कलि० ३८८९ श. ७१० इ. स. ७८७ असा ठरतो व तो इतरत्रहि सिद्ध होतो. या कालांत आणि पीठानें दिलेल्या काळांत सुमारें १३०० वर्षांचें

अंतर आहे. हें अंतर काढून टाकण्याचा प्रयत्न पीठपरंपरेंत असा केलेला दिसतो कीं सुरेश्वराचार्य, शंकराचार्यांच्या नंतर झालेले पीठस्थ, ह्यांसच ७०० वर्षे दिलीं आहेत; व इतराचार्यांचेहि काल असेच फुगविलेले आहेत. पीठाचार्यपरंपरा अविच्छिन्न चाललेली नाहीं असेंच मानिलें पाहिजे. बहुधा मलिक काफुरच्या दक्षिणेंतील स्वारींत आचार्यांचे मठ उध्वस्त झाले. विजयानगरचें हिंदुराज्य स्थापन झाल्यावर हे मठ पुन: सुरू झाले, तेव्हां विध्वंसाच्या पूर्वीची परंपरा कल्पनेनें लावली गेली असें दिसतें. बौद्धकाळांत आणि शकयवनांच्या स्वाऱ्यांत पुराणांची परंपरा अशीच तुटली होती व राजवंशावळी नष्ट झाल्या होत्या त्या वाय्वादि पुराणांनीं अशाच चुकीनें जुळविल्या.

शिशुनाग व बिंबिसार या दोन राजांचा संबंध बौद्धाशीं येतो, तसा अशोक चंद्रगुप्त याचाहि येतो आणि नंदाचाही येतो. हे राजे बौद्ध इतिहासांत गुंफले असल्याकारणानें त्यांचा काल मागें जाऊं शकत नाहीं. याहीपेक्षां गुप्तवंशीय समुद्रगुप्त व चंद्रगुप्त यांचा काल मागें नेणें किती चुकीचें आहे हें पुढील विवेचनावरून लक्षांत येईल:—समुद्रगुप्ताचा लेख इ. स. पूर्व ३०० इतका जुना नसून इ. स. ३२७ चा आहे. तसेंच सिंहलद्वीपांतून समुद्रगुप्ताकडे आलेला दूत मेघवर्ण याचा काल मागें जाऊं शकत नाहीं. समुद्रगुप्ताचा पुत्र चंद्रगुप्त यानें उज्जनींतील शकांचा उच्छेद केला त्याची मितिहि निश्चित आहे (इ. स. पूर्व ४००). चिनी प्रवासी फाहियान हा चंद्रगुप्ताच्या वेळीं हिंदुस्थानांत इ. स. ४०० च्या मागें पुढें आला हें त्याच्या लेखांवरून सिद्ध असतां त्याला इ. स. ४०० तून इ. पू. पूर्वी २१७ त कसें घालतां येईल ? सीलोन, चीन वगैरे देशांशीं जुळलेला संबंध तोडून सबंध गुप्तवंशाला नारायणशास्त्री इ. स. पूर्वी घालतात ही मोठी चूक आहे. यशोधर्म विक्रमादित्य हाच इ. स. पूर्व ५७ च्या संवताचा संस्थापक असें त्यानीं वेडसरपणें मानलें आहे!!! त्याचा जयस्तंभ मालवशक (संवत्) ५०० चा आहे.

हा सर्व घोटाळा दोन भिन्न मतांचा एकत्र मेळ घातल्यानें झाला आहे. वाय्वादि पुराणांच्या वंशावळी आणि ज्योतिषांचा कलियुगारंभ किंवा भारती युद्धकाळ यांचा मिलाफ केल्यानें ही आपत्ति उत्पन्न झाली आहे. बुद्ध, नंद, अशोक, विक्रम, समुद्रगुप्त, शंकर यांचे काळ इतिहासांत निश्चित झाले आहेत ते हालूं शकत नाहींत. कोणी दोन व्यक्ति मानण्याची शकल

काढतात पण ती नेहमीं जुळणारी नव्हे. भाण्डारकरांनीं दोन कृष्ण मानले. भारतीयुद्धाचा कृष्ण निराळा आणि भागवतांतील गोकुळांतल्या गोपींचा श्रीकृष्ण निराळा. पण हें शक्य नाहीं. त्याचप्रमाणे दोन विक्रम कित्येक मानतात आणि दोन शंकराचार्य मानतात, पण ही सर्व धडपड व्यर्थ आहे. कधीं कधीं दोन सारखीं नांवें येतात आणि दोन कालिदास मानावे लागतात व दोन वराहमिहिर मानावे लागतात. बृहत्संहिताकार शके ४२० मध्यें झाला, पण विक्रमाच्या सभेंत कालिदास होता आणि वराहमिहिरहि होता तो निराळा, इ. स. पू. ५७ च्या विक्रमाच्या वेळीं मानावा लागतो. त्याच-प्रमाणें भास्कराचार्य ज्योतिषी इ. स. ११११४ चा निश्चित आहे. पण अल्बेरुनीनें एका भास्कराचा उल्लेख आपल्या ग्रंथांत केला आहे. तेव्हां त्या वेळेपूर्वीचा ( इ. स. १०३० सु ) भास्कर निराळा मानावा लागतो. ' करणसार ' कर्ता भास्कर महादेवपुत्र निराळा आणि ' करणकुतूहलकार ' भास्कर निराळा मानावा लागतो. पण अशी युक्ति परीक्षित, बार्हद्रथ वंश, प्रद्योत वंश, शिशुनाग वंश, वगैरे राजांस लावून भिन्नकाळ परीक्षिताचा वगैरे देणें शक्य नाहीं.

असो, वाय्वादि पुराणांचा जुना भविष्यक्रम सोडून स्कंद पुराणानें जो नवीन भविष्यक्रम सांगितला आहे तो जास्त खरा आहे आणि तो आलीकडच्या इतिहासास धरून आहे. त्यांतील नंद निराळा मानतां येणार नाहीं. कारण 'चाणक्यो यान् हनिष्यति ' असें स्कंदांत स्पष्ट म्हटलें आहे. कलियुगारंभ ३१०१ इ. ज्योतिषाचा घेऊन या नवनंदांचा काळ २६७० जो स्कंदांत दिला आहे तो चंद्रगुप्त, चाणक्य वगैरेच्या हल्लीं ठरलेल्या काळाशीं जुळता आहे. हें पुराण बुधगुप्त सु इ. स. ५०० नंतर व हर्ष इ. स. ६४० या पूर्वीं लिहिलें गेलें असल्यानें यांत विक्रामाचा काळ कळिकाल ३०२० दिला आहे म्हणजे इ. स पू. ८१ दिला आहे. आणि शकाचा काळ ३१०० दिला म्हणजे इ. स. १ दिला आहे ही फार महत्त्वाची माहिती आहे. यावरून चंद्रगुप्तानें विक्रमादित्य नांव धारण करून माळवकालाला विक्रम संवत् नांव दिलें पूर्वीं कोणी विक्रम झालाच नाहीं. ही अलीकडच्या संशोधकांची कल्पना खोटी ठरते. याजविषयीं जास्त विस्तारानें लिहावें लागेल तें पुढील लेखांत लिहूं. या मुद्यासंबंधानें स्कंदपुराणांतील भविष्यकथन फारच महत्त्वाचें आहे. कोणी अशी शंका घेईल कीं स्कंदपुराणांत वाटेल तें दडपून

दिलेलें आढळतें. स्कंद्पुराणे रेवाखण्डे हें एक थोतांड प्रसिद्धच आहे. पण वर सांगितल्याप्रमाणें हा भविष्य भाग हर्षापूर्वींचा आहे. तो अलीकडेचा असता तर त्यांत हर्षच काय, पृथ्वीराज, प्रतापसिंह, शिवाजी वगैरेही आले असते. बुधगुप्तानंतर एकच प्रमिति दिला आहे आणि तोहि काल्पनिक आहे, अर्थात् हें भविष्यकथन फार जुनें असल्यानें महत्त्वाचें आहे. त्यांवरून इ. स. ५०० च्या सुमारांतल्या लोकांच्या कल्पना आपणासमोर येतात.



# कालिदासाचा काळ

कालिदासाचा काळ हा विषय प्राचीन संशोधकांस एक मोठें कोडें होऊन बसला आहे. मला वाटतें, हिंदुस्थानच्या प्राचीन कवींनीं " मेल्यावरहि मी तुम्हांस हंसवीन " अशी प्रतिज्ञा करणाऱ्या विदूषकाप्रमाणें मरतांना आपले पाय वर करून ठेविले. यामुळें त्यांचे पाय पृथ्वीतलावर केव्हां होते हें त्यांनीं मुद्दाम लिहून न ठेवल्यामुळें भावि पिढीस त्यांनीं आपल्या काळाचीं मनोरंजक कोडीं घालून ठेविलीं आहेत. ज्योतिष ग्रंथकारांशिवाय कोणत्याहि भारतीय ग्रंथकारानें अथवा कवीनें आपण पृथ्वीवर केव्हां अवतरलों, कोणत्या राजाच्या वेळीं कोणत्या देशांत, वगैरे कांहीं लिहून ठेविलेलें नाहीं. यामुळें या गोष्टी ठरविण्यास अत्यंत प्रयास पडतो. पण प्रयासाबरोबर कोडें सोडविण्याचा आनंदहि असतो हें कबूल करावें लागेल. असो, संस्कृत कविवर्य कालिदास यानेंहि असें कोडें घातलें असल्यानें, कालिदास केव्हां व कोणत्या देशांत झाला याजबद्दल मोठा मतभेद पडला आहे. या बाबतींत अगदीं मागें पाहिलें तर डॉ. भाऊदाजी यांच्या लेखांपासून तों प्रो० परांजपे, चित्रमयजगत् जून १९१८, व विविधज्ञानविस्तार सप्टेंबर १९१८ तील प्रोफेसर हरि वामन भिडे यांच्या लेखांपर्यंत हा विषय चर्चित होत आला आहे. तथापि त्यांतील गोडी अद्याप कमी होत नाहीं आणि विषयाचा निकालहि लागत नाहीं. या विषयांत मतें दोनच आहेत ही गोष्ट त्यांतल्या त्यांत समाधानाची होय. विक्रमाच्या वेळीं कालिदास होता, असें दोन्ही मतांस मान्य दिसतें. विक्रम इ. स. पू. ५७ च्या संवताचा प्रवर्तक धरला तर कालिदासाचा काळ इ. स. पू. ५७ ठरतो. गुप्तवंशांतील चंद्रगुप्त विक्रमादित्य, उज्जनीच्या शकांचा उच्छेद करणारा, इ. स. ४०० च्या वेळचा विक्रम घेतला तर कालिदासाचा काळ इ. स. च्या नंतरचा ठरतो. म्हणजे कालिदासाच्या काळाबरोबर विक्रमाचाहि प्रश्न उपस्थित होतो. या वादाचा निकाल लावण्यास दुसऱ्या प्रमाणांच्या अभावीं अन्तःस्थ प्रमाणेंच उपयोगी आहेत हें उघड आहे. म्हणजे कालिदासाच्या ग्रंथांतले उल्लेख कोणकोणत्या कालाला लागू पडतात हें पाहिलें पाहिजे. माझ्या मतें अनेक उल्लेखांचा विचार करितां इ. स. पू. ५७ हाच काळ विशेष मान्य करण्यासारखा ठरतो, तें कसें हें या लेखांत मी दाखविणार आहें.

१ आपण शेवटल्या लेखापासून उलट मार्गानें विचार करूं. प्रो. भिडे यांनीं उत्तरायणारंभीं वसंताचें वर्णन कालिदासाच्या रघूच्या १६ व्या सर्गांत असल्याचें दाखविलें आहे. दिगुत्तरा, भास्वति सन्निवृत्ते इत्यादि श्लोकांचा हल्लींच्या स्थितीशीं मेळ नाहीं. उत्तरायण लागतांना वसंतऋतु असणें संभवनीय नाहीं हें खरें आहे. पण कालिदास दोन हजार वर्षांपूर्वी झाला किंवा १५०० वर्षांपूर्वी झाला हें यानें ठरणार नाहीं. कारण अयनचलनामुळें ऋतु मागें पडत चालले आहेत हें निर्विवाद आहे. तरी ४००।५०० वर्षांच्या अवधींत फार फरक पडणार नाहीं आणि याचमुळें ज्योतिर्विषयक उल्लेख अंशासहित अगदीं बारकाईचे असल्याशिवाय इ. स. पू. ५७ हा काळ खरा किंवा सुमारें इ. स. ४०० हा काळ खरा हें निश्चयात्मक सांगतां येणार नाहीं. तथापि यांत कांहीं प्रमाण निघालें तर तें पूर्वोक्त कालाला अनुकूलच निघेल. तें असें: उत्तरायण याचे दोन अर्थ निरनिराळ्या वेळीं मानले गेले आहेत असें आपल्या ज्योतिषशास्त्राचा इतिहास सांगतो. मकरापासून सूर्य उत्तरेकडे वळला म्हणजे उत्तरायण असा निश्चित अर्थ ज्योतिषसिद्धान्तापासून ठरला आहे. पण पूर्वी एका काळीं सूर्य विषुवावर आला अर्थात् मेषांत आला म्हणजे तो उत्तरेकडे आला असें मानून तेव्हांपासून उत्तरायण धरीत. वरील रघुवंशांतील श्लोकांत हाच प्रकार अभिप्रेत दिसतो. यावरून कालिदास ज्योतिषसिद्धांतापूर्वीचा ठरतो. परंतु हें प्रमाण अगदीं निश्चित नाहीं, कारण सिद्धान्तांच्या नंतरहि कोणी प्राचीन उत्तरायण मानणारे असूं शकतील.

हीच गोष्ट अगस्त्योदयाची आहे. "प्रससादोदयादम्भः कुम्भयोनेर्महौजसः" हा काळ अयनचलनामुळें हल्लींचा नाहीं. वराहमिहिराच्या वेळेचा "दृश्यते स किल हस्तगतेऽर्के" वगैरे भिडे यांनींच दिलेल्या वचनांवरून तो वराहमिहिराच्या वेळचा प्रकार आहे, म्हणजे इ. स. ५०० च्या वेळचा आहे. पण जवळ जवळ हीच स्थिति इ. स. पू. ५७ च्या वेळीं असूं शकेल; किंबहुना "दृश्यते स किल चित्रागतेऽर्के" अशी स्थिति असेल तर "प्रससादोदयादम्भः कुम्भयोनेर्महौजसः" अशा वाक्याशीं अधिक जुळेल. कारण, चित्रांत पाऊस पडण्याचा संभव थोडा आहे, हस्तांत पुष्कळ आहे, हेंहि प्रमाण निश्चित नाहीं; आणि झुकत असेल तर तें पूर्वकाळाकडेच झुकतें.

तिसरी गोष्ट प्रो. भिडे यांनीं दाखविलेली मेघदूतांतील “ आषाढस्य प्रथमदिवसे मेघमाश्लिष्टसानुम् ” याचा “ प्रत्यासन्ने नभसि दयिताजीविता-लंबनार्थी ” याशीं कसा मेळ बसतो, या प्रश्नांत आहे. आषाढाच्या पहिल्या दिवशीं “ प्रत्यासन्न नभः ” म्हणजे श्रावण कसा आणि चार महिने बाकी होते तर “ शापान्तो मे भुजगशयनादुत्थिते शार्ङ्गपाणौ ” कार्तिक शुद्ध एकादशीस कसा हे प्रश्न संभवत नाहींत असें मला वाटतें. कारण, वरील वाक्यांत अगदीं गणिताची कांटेतोल बोली नाहीं. आषाढ प्रतिपदेला पुढचा महिना श्रावणच येणार तेव्हां प्रत्यासन्न म्हणतां येईल, किंवा चार महिन्यां-वर अकरा दिवस वाढल्यानें “ चतुरो मासान् ” म्हणण्यांत दोष नाहीं. अर्थात् ज्यावरून गणित करितां येईल अशीं बारकाईचीं विधानें यांत नाहींत. यामुळें कालनिर्णयाच्या बाबतींत यांचा उपयोग होत नाहीं.

२. रा. पटवर्धन यांनीं चित्रमयजगताच्या जुलैच्या अंकांत “ आषा-ढस्य प्रथम दिवसे ” या शब्दावरून नक्की गणित करण्याचा एक मार्मिक प्रयत्न केला आहे. पण त्यांतहि माझ्या मतें ही अडचण येते. म्हणजे गणिताला लागणारे नक्की अंश कला विकला यांत उत्पन्न होत नाहींत. या-शिवाय पटवर्धन यांनीं काढलेलें उत्तरहि दोनतीनशें वर्षांच्या फरकानें दोन प्रकारचें येतें, तेव्हां इ. स. पू. ५७ व इ. स. ४०० यांच्या मधला हा काळ केव्हां तरी येईल तोहि निश्चित नव्हे. याकरितां या रीतीनेंहि प्रस्तुत प्रश्न सुटत नाहीं.

३. आतां प्रो. शि. म. परांजपे यांच्या रीतीकडे वळूं. ही रीत बरीच चातुर्याची आहे. तिचा आपण विस्तारानें विचार करूं. प्रोफेसरसाहेबांचे दोन मुद्दे आहेत. पहिला हा कीं, रामगिरीहून कैलासास सरळ वाट प्रयाग वगैरे असतां मुद्दाम यक्षानें मेघास पश्चिमेकडे उज्जनीवरून नेलें यावरून उज्जनी हा कविकुलगुरु कालिदासाचा अति प्रेमांतला आणि अति-परिचयाचा असा देश दिसतो. दुसरा मुद्दा असा कीं, मालविकाग्निमित्र नाटकांत अग्निमित्रपुष्पमित्रांच्या वेळच्या फार बारकाईच्या गोष्टी कालि-दासानें उल्लेखिल्या आहेत. त्या अग्निमित्रानंतर लवकरच झालेल्या कालि-दासाच्या माहितींत येऊं शकतील. पण अग्निमित्र ( इ. स. पू. १५० ) व चंद्रगुप्त विक्रमादित्य ( इ. स. ४५० ) यांमध्यें सुमारें ६०० वर्षें अंतर असल्यानें चंद्रगुप्ताच्या वेळीं कालिदास मानला तर त्याच्या वेळीं या बारीक

गोष्टी लोकांत राहणें शक्य नाहीं. हा दुसरा मुद्दा खरोखर महत्त्वाचा असून बराच निर्णायक आहे. प्रो. वुइलसन यांचें मत त्यांनीं आधारास घेतलेलें फारच महत्त्वाचें आहे:– "The events of his reign which are familiarly alluded to were not of a character to have survived any very protracted interval in popular recollection" "त्याच्या ( अग्निमित्राच्या ) कारकीर्दींतील ज्या हकीकती मालविकाग्निमित्रांत लोकांच्या अगदीं परिचयांतल्या म्हणून उल्लेखिल्या आहेत; त्या इतक्या क्षुल्लक आहेत कीं, लोकांच्या आठवणींत त्या फार दिवस टिकणें शक्य नव्हतें." अर्थात् कालिदास अग्निमित्रानंतर ६०० वर्षांनीं झाला असें मानणें शक्य नाहीं. या हकीकती येणेंप्रमाणें:–१ अग्निमित्राच्या दोन राण्या धारिणी आणि इरावती यांत सांगितल्या आहेत. तेव्हां दोन राण्या लोकपरिचित असाव्या. २ धारिणीचा भाऊ वीरसेन जातीनें कमी दर्जाचा होता हें सांगणें जरूर नव्हतें. ३ विदर्भ देशांतल्या राजाला पाठविलेलें पत्र दिलें आहे त्यांत "सकलत्रसोदर्यो मोक्तव्य" असें म्हटलें आहे. यांत कलत्राचा उल्लेख अनवश्यक आहे. ४ हीच गोष्ट पूर्वसंकल्पित या शब्दाला लागू पडते. ५ आणि विशेष मनोरंजक गोष्ट पुष्पमित्राच्या पत्राची आहे. यांत पुष्पमित्र अग्निमित्राचा बाप हा सार्वभौम पाटलिपुत्र येथें राज्य करीत असून त्याच्या तर्फे अग्निमित्र विदिशेंत प्रतिनिधित्वानें राज्य करीत होता. अग्निमित्रास पुष्पमित्रानें अश्वमेधाकरितां राजधानीस बोलावण्याचें मोठें मनोरंजक पत्र या नाटकांत दिलें आहे. यामुळें त्या वेळच्या पत्रांचा मायना लोकांपुढें महत्त्वाचा येतो. असो, या पत्रांत "विगतरोषचेतसा" यावें असें म्हटलें आहे. बापाच्या व मुलाच्या दरम्यान कांहीं वाद उपस्थित झाला होता असें यांत सुचविलें आहे; पण ज्या वादाचा नाटकाशीं कांहीं संबंध नाहीं त्याचा उल्लेखहि अगदीं अप्रस्तुत आहे. तो उल्लेखण्याचें कारण इतकेंच कीं, प्रेक्षकांस या अग्निमित्र–पुष्पमित्र व्यक्तिपरिचयाच्या द्वारें त्यांच्यामधील तंटा एकेकाळीं जगजाहीर होता त्याची आठवण खुबीनें प्रेक्षकांस येथें दिली आहे. अशा अप्रस्तुत गोष्टी पांचसहाशें वर्षांनंतर लोकांच्या आठवणींतहि राहणार नाहींत आणि कोठें इतिहासांत उल्लेखिल्या असल्या तरी दीर्घकाळानंतरचे प्रेक्षक व ग्रंथकार यांस त्यांचें महत्त्वहि नाहीं. अर्थात् कालिदास अग्निमित्रानंतर लवकरच झाला असावा हें अनुमान प्रो. परांजपे यांनीं काढलें आहे तें योग्य आहे.

४. आतां प्रो. परांजपे यांचा पहिला मुद्दा उज्जनीवरून मेघास मुद्दाम वांकडें नेण्याचा. यावरूनहि तेंच अनुमान निघतें, पण प्रोफेसरसाहेबांनीं तें चांगलें व्यक्त केलें नाहीं; शिवाय भूगोलिक शंकास्थानेंहि यांत राहिलीं आहेत आणि ऐतिहासिक दृष्टीचा विचार यांत आणखी करतां येईल. यासाठीं हा मुद्दा मी विस्तारानें थोडासा निराळा मांडतों. त्या देशाचा परिचयहि मला प्रत्यक्ष अनुभवाचा आहे. यामुळें मेघदूत वाचणाराला कांहीं मनोरंजक माहिती मिळेल, ती अशीः

यक्ष रामगिरीवर होता म्हणजे नागपुराजवळ होता. त्याला मेघास कैलासास पाठवावयाचें होतें. तेव्हां थोडें उत्तर–पश्चिम वायव्ये–कडेच जाणें जरूर होतें. प्रयागावरून थेट उत्तरेस जाऊन कैलास मिळणार नाहीं. दिल्लीवरून हरिद्वारावरून गंगेच्या खोऱ्यानेंच वर चढून जाणें जरूर होतें. हल्लींच्या ज्या रेल्वेच्या वाटा आहेत त्याच ठोकळ मानानें पूर्वी पायमार्गाच्या होत्या हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कारण मार्गाचें सौकर्य नेहमींच अभिप्रेत असतें. हल्लीं नागपुराहून जबलपूर–मार्गें रेलवेनें प्रयागास जातात. हा मार्ग वर सांगितल्याप्रमाणें कैलासाच्या पूर्वेस पडतो. शिवाय यांत डोंगर आडवे असून अरण्य फार, सबब हा टाकून आपण हुशंगाबादवरून रेलवे मार्गानें इंडियन मिडलंड लायनीनें ग्वालेर आग्रा दिल्ली अशा रस्त्यानें जाऊं. हा मार्ग योग्य होता आणि यक्षानें मेघाला भेलशापर्यंत याच मार्गानें नेलें, पण उज्जनीचा मोह कालिदासास असल्यानें त्यानें येथून मेघास उज्जैन-भोपाळ रेलवेनें पश्चिमेस नेलें आणि मग उज्जनीवरून नागद्रा–मथुरा किंवा रतलाम–मंदसोर–अबू वगैरे मार्गानें दिल्लीस नेऊन पोंचविलें अशी ठोकळ मानानें परिस्थिति वाचकांनीं लक्षांत ठेविली पाहिजे. या मार्गांतील स्थळें मेघदूतांत कशीं वर्णिलीं आहेत, तें खुलासेवार पाहूं.

सृष्टिसौंदर्यनिरीक्षणकुशल कविकुलगुरूचें हें भूगोलविषयक वर्णन अत्यंत रसभरित आहे हें सांगणें नकोच. नागर स्त्रियांचे मनोविकार बारकाईनें वर्णन करणारा कालिदास निसर्गदेवतेच्या मनोहर विकासांचें इतकें मार्मिक वर्णन करूं शकेल असें आपणांस वाटणार सुद्धां नाहीं. आणि सृष्टीच्या बारिकसारिक मनोहर गोष्टी पाहण्याचें आम्ही अगदीं विसरून गेलों आहों यामुळें कालिदासाचीं हीं सृष्टिवर्णनें आम्हांस पूर्णपणें कळतहि नाहींत. कविवर्याच्या अप्रतिम कौशल्याच्या चरणीं एवढें नमन केल्यावां-

चून पुढें जाववत नसल्यानें हें थोडेंसें विषयांतर झालें. असो. हें भौगोलिक वर्णन श्लोकवार पाहूं. " मार्गं तावच्छृणु कथयतस्त्वत्प्रयाणानुकूलं " असें सांगून यक्ष मार्ग सांगूं लागला. ( १० ) प्रथम रामगिरी नंतर (१४-१५), जबलपूराजवळची माळजमीन ( १६ ) नंतर आम्रकूटपर्वत-नंतर थोडा प्रवास केल्यावर विंध्याच्या पादतळीं रेवा ( १९ ) नंतर विंध्याद्रींतून सारङ्गांनीं वाट दाखवीत "फुटलेल्या कंदवी (रानकेळी) खात" (२०-२१) ठिकठिकाणच्या पर्वता-पर्वतावर विश्रांति घेत विंध्य ओलांडला पाहिजे, ( २२ ) म्हणजे प्रथम दशार्ण देश लागेल. हा देश महाभारतप्रसिद्ध असून भेलशाभोंवतालचा होय. याचें धसाण असें रूप प्राकृतांत होऊन एका नदीस येथें हल्लींहि हें नांव आहे ( २३ ). दशार्णाची राजधानी विदिशा वेत्रवतीच्या कांठीं आहे. हल्लींचें शहराचें नांव भेलसा व बेतवा त्यावरूनच निघालें ( २४ ). विदिशा नदी येथें कोठें सांगितली नाहीं. या शहराजवळ नीचैर्गिरि आहे. हल्लींहि एक चौकोनी ठेंगणी टेकडी येथें आहे. फार झालें तर शंभर फूट उंच असेल. पण सभोंवतालच्या मैदानांत एकटीच असल्यानें इच्याकडे लक्ष गेल्यावांचून राहत नाहीं. हल्लींच्या भेलसा स्टेशनाजवळच ही दिसते. हिच्यावर पूर्वीं किल्ला असावा; भेलसा शहरांतील लोक संध्याकाळीं हवा खाण्यास येथें येत असावे. प्राचीनकाळीं प्रत्येक शहरांत पण्यस्त्रिया फार असत हें चमत्कारिक आहे. या वेश्या, लोकांच्या हवा खाण्याच्या व फिरण्याच्या ठिकाणीं, यावयाच्याच आणि त्याप्रमाणें या निचैर्गिरीवर त्यांच्या बसायच्या जागा होत्या ( २५ ). ( प्राचीनकाळीं पण्य स्त्रियांची एवढी समृद्धि असून उपदंशविकार प्राचीन ग्रंथांत वर्णिलेला कोठेंच नाहीं यावरून या स्त्रियांचें आचरण बरेंच सचोटीचें-वसंतसेनेप्रमाणें-असावें असें दिसतें. किंवा माझे मित्र रा. सि. दळवी म्हणतात त्याप्रमाणें हा विकार मेक्सिकोमधून स्पेनमध्यें आला आणि पोर्तुगीज लोकांबरोबर हिंदुस्थानांत आला, सबब यास फिरंगी रोग म्हणतात. जसें क्विनीन जगतास दिल्याचें श्रेय अमेरिकेस आहे, तसेंच उपदंश दिल्याचें पापहि त्या खंडास आहे, असें त्यांचें प्रमाणबद्ध म्हणणें आहे. ), नंतर येथें जवळच वननद्यांच्या कांठीं ( डोंगरांतून वाहणाऱ्या नद्या. हें विशेषनाम नाहीं, सामान्यनाम आहे. ) पाण्यांनीं चिंब झालेल्या यूथिका ( आम्हांस हे वेल हल्लीं माहितहि नाहींत ) वेलींच्या झाडीच्या झाडी सिंचन करीत ( कारण त्या वननद्यांना उन्हाळ्यांत पाणी थोडें

असावयाचें ), येथून भेलसा–झाशी मार्गानें उत्तरेकडे न जातां थोडा पश्चिमेस वळ असें सांगण्यासाठीं श्लोक " वक्रःपंथाः " इत्यादि योग्य ठिकाणीं आला आहे. पश्चिमेकडे जाण्याचें कारण उज्जयिनी पाहिल्याशिवाय जाऊं नको, असें स्पष्ट सांगितलें आहे. उज्जयिनी कालिदासाच्या अति प्रेमाची होती असाच भाव निश्चयानें निघत नाहीं. त्या काळीं उज्जयिनी शहर अतिशय नामांकित होतें. आग्रा, ग्वालेर, दिल्ली इत्यादि शहरें त्या वेळीं अस्तित्वांतच नसावीं आणि असलीं तरी तीं खेडीं असावीं. पाटलिपुत्राच्या खालोखाल त्या वेळीं उज्जयिनीच होती. कनोज हर्षानंतर भरभराटीस आलें ( इ. स. ६०० ). दिल्ली अनंगपालानंतर ( इ. स. ८०० ). अर्थात् या शहराकडे नेण्याचा हाहि उद्देश असेल. शिवाय उत्तरेकडचा हरिद्वारचा रस्ता उज्जनीवरूनहि पडलेला असावा. हल्लींहि आग्रा–बॉम्बेरोड असाच जातो. असो; तर, येथें उज्जनीकडे नेण्यानें कालिदासाच्या काळाचें निश्चित प्रमाण उत्पन्न होत नाहीं. पण अन्य कारणानें होतें, तें पुढें सांगूं.

पश्चिमेकडे वळल्यावर प्रथम मोठी निर्विन्ध्या नदी लागली ( २८ ). माझ्या मतें ( २९ ) हीच सिंधु अथवा पार्वती नदी समजावी. सिन्धु हें येथें सामान्यनाम आहे. उगमाच्या जवळ असल्यानें या नद्या उन्हाळ्याच्या दिवसांत कृश असावयाच्याच. ( ३० ) येथें प्राण्यावंतीन् हे शब्द योग्य आले आहेत. ही पार्वती नदी दशार्ण आणि अवंति देशांची सरहद्द होय. पार्वती ( हल्लीं स्टेशन आहे ) ओलांडल्यावर अवंति देश लागला. अद्याप या देशाला माळवा हें नांव पडलें नव्हतें. माळवा हें नांव महाभारतांत नाहीं, वराहमिहिरांतहि नाहीं ( ५०० इ. स. ). तें प्रथम ह्युएन संगाच्या लेखांत आढळतें ( ६०० इ. स. ) तें इ. स. ५०० व ६०० च्या दरम्यान उत्पन्न झालें असावें. कालिदास या देशास अवंति म्हणतो यावरून कालनिगमन होत नाहीं. तो इ. स. पू. ५७ चा असो किंवा इ. स. ४०० चा असो हेंच नांव वापरता परंतु येथें जें उज्जनीचें वर्णन आलें आहे तें फारच वैभवाचें आणि मनोहर असें आहे. त्यावरून कालाचें निगमन होतें, तें मी पुढें दाखवीन, सध्यां मेघाचा मार्ग आपण संपवूं. अवंति देशांत उदयनाच्या कथा गांवढळ लोकांत फार प्रचलित होत्या, असें येथें म्हटलें आहे. " उदयनकथाकोविदग्रामवृद्धान् " हें सांगण्यासारखें आहे. उज्जनीला श्रीविशाल म्हटलें आहे; इतकेंच नव्हे तर, स्वर्गसुख बाकी पुण्यानें भोगण्या-

करितां स्वर्गाचेंच एक कांतिमत् खंड होय, अशी तिची तारीफ केली आहे ( ३० ). क्षिप्रेवरचा थंड वारा येथें वर्णिला आहे. ३१–३२ त हर्म्यांची व त्यांतील ललितवनितांची प्रशंसा आहे. ३३ त प्रसिद्ध महाकालाचा उल्लेख असून कालिदासाची त्याविषयींची भक्ति "**पुण्यं यायास्त्रिभुवनगुरोर्धाम चंडीश्वरस्य**" या अतिशय मधुर शब्दमधुर व अर्थमधुर वाक्यानें दर्शविली आहे. प्राचीनकाळच्या महाकाळाचें मंदिर उज्जयिनी नगरीपासून दूर होतें. जुनी उज्जयिनी हल्लीं नष्ट झाली असून हल्लींच्या शहरापासून अंतरावर आहे. महाकाळाच्या भोंवतालीं पूर्वी मोठें वन किंवा उपवन होतें. आणि ह्या उपवनाच्या एका बाजूस एक लहानशी नदी होती तिचें नांव गंधवती. ही क्षिप्रेला हल्लींहि येथेंच मिळते. "धूतोद्यानं" इत्यादि दोन चरणांत या उद्यानाचा व गंधवती लहान नदीचा उल्लेख आहे. ३४ त संध्याकाळच्या महाकालपूजेचा थाट व त्या वेळीं वाजणाऱ्या मृदंगध्वनीचा उल्लेख आहे. शंकराची प्रदोषपूजाच मुख्य आहे. व या वेळीं गाणें, नाच वगैरे गोष्टी मोठ्या देवालयांतून होतात. प्राचीनकाळीं शंकराच्या प्रदोषपूजनसमयीं नाचण्यासाठीं वतनदार पिढीजाद वेश्या असत; त्यांच्या नाचण्याचा उद्दाम प्रकार शंकराला अधिक प्रिय असतो, यासाठीं या वेश्या मुद्दाम उद्दाम नाच करीत. त्याचें सुंदर वर्णन "पादन्यासैः" इत्यादि ३५ व्या श्लोकांत आहे. पांचपंचवीस सुंदर नर्तकींचें उद्दाम नृत्य हल्लींच्या काळीं तर मुळींच पहावयास मिळत नाहीं. तें मुसलमानी काळानंतर हिंदुस्थानांत नष्ट झालें. असो, नंतर पुरुषांचा तांडवनाचाहि होत असे असें दिसतें. खुद्द शंकर ताण्डवनृत्य करितो अशी समजूत आहे. याचें वर्णन ३६ व्या श्लोकांत आहे. याप्रमाणें महाकालाची सेवा प्रदोषसमयीं केल्यावर रात्रीं महाकालवन सोडून लोक उज्जनी शहरांत परत जात असत असें वर्णन आहे. महाकालवनांत बहुधा रात्रीं वेताळ वगैरे पिशाच्च महाकाळाच्या दर्शनास येतात अशी समजूत त्या काळीं होती. उज्जनींत अतिशय उंच सातमजली हवेल्या होत्या. त्यांपैकीं कोणत्यातरी एखाद्या उंच हवेलीच्या गच्चीवर रात्रीं झोंप घे, असें ३८ त वर्णन आहे. सकाळीं तेथून उत्तरेकडे कूच सांगितला आहे. नंतर गंभीरा नदी लागेल. हल्लींहि हेंच नांव प्रसिद्ध आहे. ही नदी पाण्यानें भरलेली असून तिचें वर्णन ४० त आहे. 'या सुंदर नदीला ओलांडून पुढें जा ( ४१ ), म्हणजे देवगिरि लागेल' ( हा माझ्या पाहण्यांत नाहीं. ) तेथें स्कंदाचें प्रसिद्ध देवा-

लय होतें. ( ४२-४३ ). हल्लीं माळव्यांत स्कंदाचें देऊळ असल्याचें दिसत नाहीं. कार्तिकस्वामीचें स्थान फक्त दक्षिणेंत दिसलें. पूर्वकाळीं स्कंद-देवतेची भक्ति फार प्रचलित होती. या देवतेचें वाहन मयूर. स्कंदावरील पार्वतीचें प्रेम व मयूराचें मेघाशीं सख्य ४४ त वर्णिलें आहे. स्कंददेवता आणि मयूरचिन्ह गुप्तराजांचें होतें. त्या देवाचें दर्शन घेऊन पुढें उत्तरेकडे गेल्यावर चर्मण्वती नदी लागेल. या नदीच्या उत्पत्तीची हकीकत महाभारतांत सांगितल्याप्रमाणें रंतिदेवाच्या हजारों गवालंभांतील चर्मराशीपासून वर्णिली आहे ( ४५ ). चंबळकिनारा गाईम्हशींना अतिशय मानणारा असून त्या नदीकांठीं विपुल जनावरें मिळतात. ही मोठी नदी चंबल नांवानें माळव्यांत प्रसिद्ध आहे. ह्या नदीचें पाणी मेघास घ्यावें लागेल ( ४६ ). ही ओलांडल्यावर मोठें शहर लागतें तें दशपुर होय. हल्लीं याचें नांव मंदोसर आहे. मंद व दशपुर अशीं दोन गांवें एका लहान नदीच्या उभय तीरांवर असून मंद-दशपुर याचें प्राकृत रूप मंदोसर असें झालें आहे. येथें यशोधर्मा नांवाचा एक प्रतापी राजा होऊन गेला (इ. स. ५०० सुमारें ), त्यानें मिहिरकुल हूणाचा पराभव करून हिंदुस्थानांतील हूणांच्या आपत्तीचा उच्छेद केला. यानें मंदोसर येथें एक जयस्तंभ उभारला आहे, तो प्राचीनेतिहाससंशोधकांनीं वाचून या मोठ्या राजास उजेडांत आणलें आहे. याचेंहि बिरुद विक्रमादित्य होतें व डॉक्तर होर्नल यांच्या मतें याच्याच पदरीं कालिदास होता. या कवीचें मूळ नांव मातृगुप्त होतें; त्यास त्या राजानें काश्मीरची गादी रिकामी पडली तेव्हां त्याजवर प्रसन्न होऊन राजा म्हणून काश्मीरांत पाठविलें होतें. ही हकीकत राजतरंगिणींत कल्हणानें दिली आहे, त्याचा थोडासा ऊहापोह पुढें करूं. दशपुर हें पूर्वकाळीं प्रसिद्ध शहर असून दसउर-दसोर असें प्राकृत रूप होऊन येथील **दसोरे** ब्राह्मण या नांवाची एक माळवी ब्राह्मणजात अद्याप प्रसिद्ध आहे. माळव्यांचीं पूर्वींचीं तीन प्रसिद्ध शहरें विदिशा, उज्जयिनी आणि दशपुर तीन राज्यांच्या राजधान्या होत्या. तीं तिन्ही हल्लीं महाराजा शिंदे यांच्या राज्यांत आहेत, अर्थात् मुख्यत: माळवाधीश हल्लींचे शिंदेसरकारच आहेत.

येथें आपला मुद्दा संपला, तथापि मेघाचा पुढील मार्ग थोडक्यांत सांगूं. कारण, त्यांतहि एक मुद्दा निष्पन्न होणार आहे. मंदसोराहून एकदम मेघास यक्षानें कुरुक्षेत्रांत नेऊन पोंचविलें आहे. अर्थात् राजपुताना-माळवा रेल्वेनें दिल्लीस जातांना लागणारीं अजमीर, अल्वार, दिल्ली इत्यादि शहरें

त्या वेळीं अस्तित्वांत नव्हतीं किंवा लहान अप्रसिद्ध होतीं. या वर्णनावरून कालिदास हिमालयांत प्रत्यक्ष फिरलेला आणि मानससरोवर प्रदेश स्वतः पाहिलेला असा दिसतो, याचा फायदा आपण पुढें घेऊं.

वरील सर्व वर्णनावरून कालिदासाचें उज्जयिनीवर प्रेम विशेष होतें हें निर्विवाद आहे. ती नगरी त्याच्या पूर्ण परिचयाची दिसते. तिची भरभराटहि त्याच्या वेळेला परमावधीची होती; इतकी कीं, त्यानें तीस स्वर्गाचें खंडच म्हटलें आहे. या सर्व वर्णनावरून कालनिर्णयाच्या कामीं कशी मदत मिळते हें आपण येथें पाहूं. कालिदास मंद्सोरच्या यशोधर्म्याच्या पदरीं नसावा व तेथें त्याचा भाग्योदय झाला नसावा, ही गोष्ट प्रथमारंभींच सांगतां येईल. असें असतें तर त्यानें मंद्सोरचें अधिक वर्णन केलें असतें आणि उज्जनी पाहिली असली तरी तिचें वर्णन कमी केलें असतें. तेव्हां तो इ. स. पू. ५७ च्या विक्रमाच्या पदरीं असावा किंवा उज्जनी शकापासून जिंकणाऱ्या चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या पदरीं असावा हे दोनच पक्ष ठरतात. या दोन्हींला प्रथमदर्शनीं हीं वर्णनें अनुकूल पडतात. यामुळें कालनिर्णय पुन्हां भ्रांतींत पडतो असें वाटतें. पण माझ्या मतें सूक्ष्म विचार केला तर पूर्वकाळच जुळतो असें म्हणतां येतें. हें नीट समजण्याकरितां आपण उज्जनीनगरीचा त्रोटक इतिहास कसा आहे तें पाहूं.

उज्जनी केव्हां स्थापित झाली हें सांगतां येत नाहीं, तथापि मोक्षप्रद सप्तपुरींमध्यें ती प्राचीनकाळापासून परिगणित आहे, व याचें कारण महाकाळाचें सान्निध्य होय हें उघड आहे. ऐतिहासिक राजांची माहिती म्हटली म्हणजे " प्रद्योत " राजापासून सुरुवात होते. याचा समकालीन उदयन राजा होता. हा वत्स देशाचा व यमुनेवरील कौशाम्बी नगरीचा मोठा पराक्रमी व भाग्यशाली राजा असून माळव्यांत शिकार खेळावयास आला असतां प्रद्योतानें एक कूटहस्ती करून त्यास पकडलें आणि उज्जनींत कैदेंत ठेविलें. तेथें प्रद्योताची सुस्वरूप कन्या वासवदत्ता त्याला भाळली, आणि वत्सराज उदयनानें तिला पळविलें वगैरे कथा वासवदत्ताप्रबंधनाटकादिकांत प्रसिद्ध आहे. वत्सराजाचा समकालीन मगध देशाचा राजा दर्शक होता. पाटलिपुत्र अद्याप स्थापन झालें नव्हतें. ही हकीकत सरासरी इ. स. पू. ४७७ ची आहे ( स्मिथ–प्राचीन इतिहास, ३ री आवृत्ति पान ३९ ). उदयनानें दर्शकाची बहीण, त्यास जित करून घरांत

आणली. हा भाग्यशाली उद्‌यन व त्याचा नयचतुर प्रधान यौगंधरायण कथासरित्सागराचा नायक आहे. उद्‌यनाची कथा अवंति देशांतील खेडे- गांवांत सुद्धां प्रचलित व प्रिय होती हें कालिदासानें 'उद्‌यनकथाकोविद- ग्रामवृद्धान्' या पदानें सुचविलें आहे. त्याचा सासरा प्रद्योत उज्जनीचा राजा अतिशय बलाढ्य व समृद्ध होता. "प्रद्योतस्य प्रियदुहितरं वत्सरा- जोत्र जन्हे। हैमं तालद्रुमवनमभूदत्र तस्यैव राज्ञः॥ अत्रोद्भ्रांतः किल नल- गिरिः स्तंभमुत्पाट्य दर्पादित्यागंतून् रमयति जनो यत्र बंधूनभिज्ञः॥" हा श्लोक प्रक्षिप्त मानतात तरी तो माहितगाराचा असावा. सोन्याच्या कृत्रिम तालवृक्षांचें उपवन करणारा प्रद्योत विलक्षण श्रीमंत असला पाहिजे. कालि- दासाच्या वेळीं तें वन नव्हतें; पण अमुक ठिकाणीं होतें असें वृद्ध लोक दाखवीत. या प्रद्योतवंशाचें राज्य सरासरीं दानशें वर्षे चालून नंतर मूर्ख व शौर्यहीन राजे होऊन चारुदत्त—वसंतसेनेच्या वेळीं आर्यकानें राज्य बुडविलें असावें हा एक केवळ तर्क आहे. कारण या वेळीं बौद्ध भिक्षु थोडथोडे उज्जनीस दिसूं लागले होते, असें मृच्छकटिकावरून दिसतें. पण लवकरच हें शहर पाटलिपुत्राच्या मौर्य घराण्यानें जिंकलें व येथें अशोक युवराज म्हणून राजप्रतिनिधि नात्यानें राहत असे असा उल्लेख बौद्ध ग्रंथांत आहे. तेव्हां इ. स. पू. ३०० पासून २००, १५० पर्यंत उज्जनी साम्राज्यधानी नव्हती. शहराचा उत्कर्ष राजधानीच्या वेळींच असतो हें उघड आहे. मौर्यांचा उच्छेद झाला आणि अग्निमित्रादि शुंग राजे झाले, त्या वेळींहि माळवा अंकितच राहिला आणि Viceroy अथवा राजप्रतिनिधि अग्निमित्र उज्जनीस न राहतां विदिशेस राहत असे. माझ्या मतें इ. स. पू १००च्या सुमारास उज्जनीस पुन्हां राजधानीत्व प्राप्त झालें. या वेळीं गंधर्वसेन वगैरे स्वतंत्र राजे उज्जनीस राज्य करूं लागून शहरास पुन्हां भरभराट आली. याच वंशांतील विक्रमादित्यानें पंजाबच्या शकांचा पराभव केला व सर्व उत्तरहिंदुस्थानभर साम्राज्य स्थापिलें. यानेंच काश्मीर जिंकून शकांना तेथून हांकलून तेथें प्रतापादित्य नांवाचा आपला एक बांधव राजा स्थापित केला, असें राजतरंगिणीनेंहि सुचविलें आहे. या विक्रमाच्या वेळीं उज्जनी अतिशय भरभराटीस आली. याच्या वंशाचा पुढें शकांच्या दुसऱ्या शाखेनें चष्टन नांवाच्या राजाच्या वेळीं उच्छेद करून इ. स. ७८ त आपली गादी उज्जनी येथें स्थापिली. शकांचें राज्य उज्जनीस सुमारें ३००।३२५ वर्षे राहून इ. स. ४०० च्या सुमारास

पाटलिपुत्र येथील सार्वभौम गुप्तवंशांतील चंद्रगुप्तानें तें नाहींसें केलें. नंतर उज्जनी पूर्वीप्रमाणें सम्राट् गुप्तांची अंकित राहिली म्हणजे राजधानी नव्हती, येथें कोणी गव्हर्नर अथवा प्रतिनिधि रहात असे. गुप्तांचा अम्मल शंभर वर्षें राहून ५०० च्या सुमारास त्यांचें वर्चस्व कमी झालें तेव्हां एखादी गुप्तांची शाखा माळव्यांत होती. हर्षानें ठार केलेल्या मालवराज देवगुप्ताची राजधानी उज्जनी होती असें वाटत नाहीं. हुएनत्संगनें उज्जनी पाहिली त्या वेळीं तेथें (इ. स. ६४१) एक ब्राह्मण राजा होता. हा बहुधा हर्षाचा प्रतिनिधि असावा. प्राचीन काळीं गव्हर्नरास राजस्थानीय Viceroy असा अन्वर्थक शब्द असे. यापुढें माळव्यांत स्वतंत्र परमार वंशाची स्थापना झाली व त्यांत मुंज, भोज इत्यादि प्रसिद्ध राजे झाले, तेव्हां उज्जनी राजधानी नव्हती. परमारांची राजधानी धारानगरी होती. इ. स. १२२६ त परमारवंशास मारून मुसलमानांचें राज्य माळव्यांत झालें. तेव्हां उज्जनी येथील महाकालाच्या देवळाचा विध्वंस अलतमश बादशाहानें केला व तेथील सुंदर दरवाजे दिल्लीस नेले अशी कथा आहे. इ. स. १२२६ पासून सन १७२६ पर्यंत मुसलमानांचें राज्य माळव्यांत राहिलें. प्रारंभीं दिल्लीच्या बादशाहांचे सुभेदार रहात. मध्यंतरीं दोनशें वर्षें स्वतंत्र मुसलमानांचें राज्य झालें, पण त्यांची राजधानी मांडोगड होती आणि लक्ष्मीचा निवास मांडोगडास होता. मोंगलबादशाही झाली तेव्हां सुभेदार उज्जनीस राहूं लागला, परंतु राजधानीचें ऐश्वर्य उज्जनीस आलें नाहीं. १७२६ त मराठ्यांनीं माळवा घेतल्यावर राणोजी शिंद्यांस माळव्याचा मुख्य भाग आणि उज्जनी शहर मिळालें तेव्हां कांहीं दिवस राजधानीचें ऐश्वर्य उज्जनीस आलें. राणोजीचे दिवाण, पेशव्यांनीं दिलेले रामचंद्रराय शेणवी, निपुत्रिक होते. बायकोनें दत्तकाचा आग्रह केला तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, तुला असा पुत्र देतों कीं त्याची कीर्ति अक्षय राहील. त्यांनीं आपली संपत्ति महाकाळाचें देऊळ मोडून मशीद झाली होती ती मोडून पुन्हां महाकाळाचें टोलेजंग देऊळ बांधण्यांत खर्च केली असें लोक सांगतात. उज्जनी येथील क्षिप्रेचे सुंदर मैलभर संलग्न असलेले घाट त्यांनींच बांधले असें म्हणतात व स्कंद पुराणावरून भोंवतालचीं ६४ शिवलिंगें शोधून काढून पुन्हा स्थापना केली. याप्रमाणें राजधानीचें ऐश्वर्य येतांच उज्जनीचा पुन्हां उर्जितकाळ आला, पण तो सरासरी २५।३० वर्षें. महादजी शिंदे आग्रा मथुरा येथेंच रहात. कारण त्यांचा व्याप दिल्लीकडे

मोठा होता, आणि दौलतरावांनीं आपली गादी ग्वालेर येथें कायम केली. यामुळें उज्जनी मार्गेच पडली. असो, हा एकंदर इतिहास पाहतां इ स. ४०० च्या सुमारास शकांचें राज्य चंद्रगुप्त विक्रमादित्यानें मोडलें तेव्हांपासून हा वेळपावेतों उज्जनीस स्वतंत्र राजधानीचें ऐश्वर्य मिळालें नाहीं आणि यामुळें या शहरास वैभव पुन्हां प्राप्त झालें नाहीं. याचें प्रत्यंतर थोडक्यांत उज्जनी आणि इंदूर यांची तुलना केली असतां हल्लीं सहज दृष्टीस पडतें.

वरील त्रोटक पण मनोरंजक अशा उज्जनीच्या इतिहासावरून वाचकांस निर्णय करतां येईल कीं, कालिदास इ. स. पू. ५७ च्या विक्रमाच्याच वेळेस असावा. उज्जनीस हिंदुस्थानच्या सार्वभौम राजधानीचें ऐश्वर्य त्याच्याच वेळीं होतें. स्वर्गाचें कान्तिमत् खण्ड अशी प्रशंसा उज्जनीची दुसऱ्या कोणाच्या वेळेसहि होऊं शकत नाहीं. शकांचें राज्य भरभराटींत होतें हें खरें; परंतु तें सार्वभौम नव्हतें, एकदेशी होतें. तथापि त्यांच्या वेळेलाहि उज्जनीस बरेंच ऐश्वर्य नांदत असावें. तरी पण कालिदास चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या वेळीं ( इ. स. पू. ४०० ) होता, या म्हणण्यांत कदाचित् अर्थ असेल, पण येथील शकांच्या शेवटच्या राजाच्या पदरीं कालिदास असणें संभवनीय नाहीं. हा राज्याच्या नाशाच्या वेळचा शेवटचा शक राजा नेहमींप्रमाणें दुसऱ्या बाजीरावाच्या जातीचा होता. यासंबंधीचें पुढील वर्णन स्मिथमधून मुद्दाम देत आहें:— " दंतकथेचा परिवाद असा आहे कीं हा शकराजा परस्त्रीलंपट असून एका स्त्रीच्या मागें लागला असतां तिनें चंद्रगुप्तास बोलाविलें आणि चंद्रगुप्तानें त्या स्त्रीचा वेश घेऊन रुद्रसिंह तिजकडे आला असतां त्यास ठार केलें ( बाणाचें हर्षचरित्र. ) गुप्त राजे हिंदुधर्माभिमानी असून त्यांनीं शक राज्य बुडविलें. शकांचा शेवटचा उपलब्ध लेख इ. स. ३८८ चा आहे, यानंतर लवकरच त्यांच्या राज्याचा लय झाला असावा. " या वर्णनावरून आपल्या वरील प्रश्नाचा चांगलाच निकाल लागतो. राज्य गमावणाराविषयी रुद्रसिंह बौद्धधर्मी असला पाहिजे; त्याच्या पदरीं कालिदास असेल असें संभवत नाहीं. त्याच्या काळीं उज्जनी वैभवयुक्त असेलसेंहि वाटत नाहीं. चंद्रगुप्ताच्या पदरीं कालिदास पहिल्यापासून होता असें मानावें तर तो ऐश्वर्ययुक्त सार्वभौम होता हें खरें. पण तो उज्जनीस कधींच राहत नव्हता. त्याची राजधानी पाटलिपुत्र होती तेथें तो राहत असे. त्यानेंच सार्वभौम असतांना उज्जनी जिंकली. तेव्हां युवराज असतां तो उज्जनीस राजस्थानीय अशोकासारखा असेल

हेंहि म्हणणें संभवत नाहीं. शिवाय तो वैष्णव होता, शैव नव्हता. कालिदासाचा त्याचा एकजीव होणें संभवनीय दिसत नाहीं. रामचंद्राच्या वेळेपासून अयोध्या नष्ट व अज्ञात स्थितींत होती, ती चंद्रगुप्त विक्रमादित्यानें शोधून काढून तेथील सर्व प्राचीनस्थानांचा उद्धार केला अशी दंतकथा आहे, ती योग्य आहे. स्मिथहि म्हणतो:—

" Ayodhya, the legendary abode of the hero Rama, the ruins of which have supplied materials for the building of the modern city of Fyzabad, enjoyed a more favourable situation and appears to have been at times the headquarters of the Government of both Samudragupta and his son and the latter appears to have had a mint for copper coins there." सारांश, दंतकथा व इतिहास असें सांगतात कीं, चंद्रगुप्त विक्रमादित्य पाटलिपुत्र किंवा अयोध्या येथें राहत असे, उज्जनीस मुळींच नव्हता. तात्पर्य, चंद्रगुप्ताच्या पदरीं कालिदासाचें असणें संभवनीय वाटत नाहीं आणि त्याच्या पदरीं तो असता तर उज्जनीचें एवढें वर्णन तो करिताना किंवा तो महाकाळाचा भक्तहि असताना. त्यानें आपलें एक नाटक महाकाळाच्या यात्राप्रसंगीं प्रथम दाखविलें आहे हें प्रसिद्ध आहे.

उदयनकथा अवंतिदेशांत प्रिय होत्या, या कालिदासाच्या वाक्यावरूनहि हेंच अनुमान निघतें. वर जो इतिहास उज्जनीचा दिला आहे त्यावरून विक्रमानंतर उज्जनीस सार्वभौम कोणी झालाच नाहीं किंवा तेथें कोणी प्रतापी राजाहि झाला नाहीं. आज दोन हजार वर्षांत उज्जनी केवळ महापुरी म्हणून धार्मिकदृष्ट्या पूज्य आहे. एक २५।३० वर्षें मराठ्यांच्या वेळीं तिला राजधानीचें ऐश्वर्य आलें म्हणून महाकाळाचें देवालय व सुंदर क्षिप्रा–घाट हल्लीं दिसतात; अर्थात् हल्लीं प्राचीन कथा उज्जनीस ऐकावयाच्या म्हणजे विक्रमाच्याच हें उघड आहे. 'हा विक्रमाचा चोवीस खांबी दरवाजा' 'ह्या त्याच्या चौसष्ट योगिनी' 'ही भर्तृहरीची राणी पिंगला' 'ही भर्तृहरीची गुंफा' "इत्यागन्तून् रमयति जनान् कोविदास्तत्र वृद्धाः" असें आतां म्हणतां येईल. पण विक्रमाच्याच वेळच्या कालिदासाच्या काळीं स्थिति निराळी असली पाहिजे. त्याच्या वेळचे जुने संस्मरणीय राजे प्रद्योत व उदयन आणि म्हणून 'प्रद्योताची प्रियकन्या

वासवदत्ता वत्सराजानें येथून पळविली.' 'येथें त्याचें सुवर्णतालांचें उपवन होतं.' 'येथें त्याच्या नीलगिरि नांवाच्या प्रचण्ड हत्तीनें स्तंभ उपटून गोंधळ माजवला' वगैरे गोष्टी वृद्ध लोक सांगत, हें साहजिकच होय. विक्रमानंतर ४००।४५० वर्षांनीं चंद्रगुप्ताच्या वेळीं प्रद्योत व उदयनाच्या आठवणी बुजून भर्तृहरि–विक्रमाच्या आठवणी किंवा प्रारंभीच्या शक-राजांच्या आठवणी प्रचलित व्हाव्या; अर्थात् कालिदासाचें वर्णन पूर्व-काळाला विशेष लागू आहे असें निश्चयानें वाटतें. कदाचित् इ. स. पूर्व ५७ चा विक्रम झालाच नाहीं ही अर्वाचीन पंडितांची कल्पित कल्पना मान्य केली आणि उज्जनींत विक्रम झालाच नाहीं असें धरलें तरी शक-राज्य ३००।४०० वर्षें झाल्यावर प्रद्योतउदयनकथा लुप्तच झाल्या पाहि जेत हें उघड आहे; आणि ज्या अर्थी प्रद्योतउदयनकथा लोकांत प्रसृत व प्रिय होत्या त्या अर्थी शकराज्य होण्यापूर्वी म्हणजे इ. स. ७८ पूर्वी जो कोणी उज्जनीस राजवंश असेल त्याच्या पदरीं व त्याच्या वेळीं कालिदास उज्जनीस होता, म्हणजे तो शकपूर्व निश्चयानें ठरतो.

५ कालिदासाच्या काळासंबंधानें प्रो. पाठक यांनीं जें हूणाबद्दलचें विरुद्ध प्रमाण दाखवून त्याचा काळ सु. इ. ५०० ठरविला आहे त्या प्रमा-णाचा इतर लेखांत विचार झालाच आहे. येथें थोडक्यांत सांगणें म्हणजे रघूच्या दिग्विजयांत वंक्षु नदीवर हूणांचा पराजय रघूनें केला असें वर्णन आहे आणि आक्सस नदीवर पांढरे हूण आल्याचा काळ सु. इ. ५०० चा इति-हासांत ठरतो असें त्यांचें म्हणणें आहे. पण कालिदासानें उल्लिखित केलेले हूण White Huns होते यास प्रमाण नाहीं. शिवाय महाभारतांत उत्तरेकडील गोबी वाळवंटाच्या आजूबाजूचे लोक, पूर्वेस चीन आणि पश्चि-मेस हूण शुकाच्या मार्गांत शुकाख्यानांत सांगितले आहेत. तेव्हां तिबे-टाच्या उत्तरेकडच्या लोकांना सामान्यतः आर्यलोक ( इ. स. पू. २५० ) हूण म्हणत आले आहेत. अर्थात् हूणांचा उल्लेख विरुद्ध जात नाहीं.

६ पण याच रघूच्या दिग्विजयांत अफगाणिस्तानांत यवनांचा उल्लेख आहे, आणि या यवन लोकांत स्त्रिया सुद्धां दारू पीत असत असें स्पष्ट वर्णन आहे. "यवनी मुखपद्मानां सेहे मधुमदं न सः" या चरणावरून कालि-दासाच्या वेळीं अफगाणिस्तानच्या सरहद्दी प्रान्तांत यवन होते हें सिद्ध आहे. हिंदुस्तानच्या प्राचीन इतिहास पाहतां इ. स. पू. प्रथम शतकांतच

तेथें यवन होते असा निश्चय होतो. मिनांडरच्या वेळेस यवन म्हणजे ग्रीक हिंदुस्तानांत शिरून अयोध्येपर्यंत आले होते ( अरुणद्यवनः साकेतम्—पतंजलिमहाभाष्य ). या यवनांनंतर पंजाबांत शकांचें राज्य झालें आणि म्हणूनच शकयवनम् असा प्रयोग साहचर्यानें चालतो. या शकांना विक्रमादित्य ( उज्जनीचा ) यानें हाकलून दिलें हे अन्यत्र व पुढें सांगितलेंच आहे. या शकांनंतर गांधार पंजाब वगैरे देशांत कुशनांचें राज्य झालें, तें इ. स. ७८ पासून सुमारें दोन तीनशें वर्षे राहिलें. कनिष्काच्या वेळेला त्यांचा अत्यंत उत्कर्ष झाला. कनिष्काचा काळ अद्याप निश्चित नाहीं तरी तो इ. स. ७८ पूर्वी जात नसून इ. १५०—२०० पर्यंत कित्येक मानतात. याच्या अमदानींत यवनराज्य अफगाणिस्तानांत राहिलें नाहीं, किंबहुना त्यांचा मागमूसहि उरला नसावा. यानंतर केव्हांहि यवनांचें राज्य इ. स. ५०० किंवा ६०० सुमारें, नंतर किंवा पलीकडे, पंजाब—गांधार—अफगाणिस्तानांत झालेलें नाहीं. तेव्हां कालिदासाचें 'द्राक्षा वेलींच्या देशांत यवनांचा पराभव रघूनें केला' हें वर्णन इ. स. पू. पहिल्या शतकास लागतें. याच सर्गांत हूणांबरोबर यवनांचा थोडासा दाक्षिण्येंस उल्लेख आहे याजकडे प्रो. पाठक लक्ष देत नाहींत किंवा त्यांचें लक्ष गेलें नाहीं.

७ कालिदासाच्या रघुवंशांतच पुढें इंदुमतीच्या स्वयंवर—वर्णनांत एक अत्यंत महत्त्वाचें विधान आहे; त्यावरून कालिदासाचा काळ बहुतेक निःसंशय सनपूर्व ठरतो असें मला वाटतें. पाण्डच राजाचें वर्णन करितांना ' अथोरगाख्यस्य पुरस्य नाथम् ' असें रघूंत म्हटलें आहे. पाण्डच देशाची राजधानी यावरून कालिदासाच्या काळीं उरगपुर होती हा निश्चय आहे. मल्लिनाथ टीकाकारास हें उरगपुर ध्यानांत येईना तेव्हां त्यानें नागपुर असें शब्दान्तर केलें. पण पाण्डच देशांत नागपुर शहर होतें असें इतिहासांत नमूद नाहीं. हल्लींचें नागपुर तर पाण्डच देशाच्या फारच उत्तरेस आहे. या उरगपुराचा उलगडा अलीकडच्या शोधावरून होतो. पाण्डयांची प्राचीन राजधानी उरय्युर होती ती चोलांनीं उध्वस्त केली; तिचे अवशेष त्रिचनापल्लीजवळ हल्लीं सांपडले आहेत. उरय्युर हें उरगपुर याचें प्राकृत रूप स्पष्टपणें आहे ( उरगपुर—उरअउर—उरय्युर ). पूर्व पाण्डयांचें राज्य प्राचीन काळीं बलवान् होतें तें चोलांनीं इ. स. प्रारंभीं बुडविलें व त्यांची उरय्युर राजधानी तुडविली हें आतां निश्चित झालें आहे. पुन्हा पाण्डच

उदयास आले त्यावेळीं मदुरा ही राजधानी त्यांनीं ( इ. स. २०० सु. ) केली. तेव्हां कालिदास इ. स. ५०० किंबहुना ४०० सुमाराचा मानला तर त्यावेळीं उरगपुर नष्ट होतें, आणि पाण्ड्यांची राजधानी मदुरा होती, तेव्हां कालिदास पाण्ड्याला 'उरगाख्य–पुरस्य नाथम्' म्हणताना.

या माझ्या म्हणण्यावर असा आक्षेप येणें शक्य आहे व कोठें घेतलाहि आहे कीं कालिदास इंदुमतीच्या स्वयंवराच्या वेळीं प्राचीनतम गोष्टी सांगेल आणि पाण्ड्यांची उरग्पुर राजधानी जुनी नष्ट झालेली असली तरी प्राचीन माहितीनें सांगण्यासारखी होती. या आक्षेपास उत्तर असें देतां येईल कीं कालिदास कांहीं प्राचीन संशोधक म्हणून आपल्यापुढें नाहीं. तो कविवर्णनांत आपल्या वेळची किंवा थोडी पूर्वीची हकीकत देतो. रघूच्या दिग्विजयांत म्हणजे इंदुमतीच्या स्वयंवरापूर्वीं कित्येक वर्षें तो आपल्याच वेळचे हूण आणि यवन वंक्षु नदीवर आणि अफगाणिस्तानांत सांगतो; इराण्यांना पारसीक म्हणतो, प्राचीनतम शक व इराणी राजे किंवा लोक सांगत नाहीं. तात्पर्य आजपर्यंतच्या लोकांच्या माहितीकडे पाहतां कालिदासानें आपल्या पूर्वीं ५०० वर्षें नष्ट झालेल्या उरग्पुर शहरास पाण्ड्यांची राजधानी म्हणणें शक्य नाहीं.

कालिदासानें विक्रमोर्वशी नाटकाच्या नांवांत चन्द्रगुप्त विक्रमाचा गुप्त निर्देश केला आहे असें कित्येकांचें म्हणणें आहे. पण विक्रम हा कालिदासाचा आश्रयदाता असता तर त्याचा उल्लेख स्पष्टपणें आणि विशेष गौरवपर कालिदास करिता, गुप्त न करता. का हा गुप्तवंशी राजा होता म्हणून गुप्त उल्लेख केला!!! बरें विक्रमाचाच येथें उल्लेख आहे असें मानलें तरी पहिला मालव विक्रम कीं गुप्तवंशी विक्रम येथें घ्यावा याचा निवाडा होत नाहीं. यामुळें हें प्रमाण अगदींच कुचकामाचें आहे. किंबहुना माझ्या मतें कालिदास हा विक्रमाच्या दरबारांत होता ही परंपरासुद्धां फार अलीकडची आहे. कालिदासाच्या कोणत्याहि कृतींत तीस आधार सांपडणार नाहीं.

तात्पर्य, याप्रमाणें एकंदर कालिदासाच्या काळाचा त्याच्याच ग्रंथावरून अन्तःप्रमाणानें शोध लावतां मेघदूतांतील "उदयनकथाकोविदा वृद्धाः" व उज्जनीचें स्वर्गतुल्य वर्णन "दिवः कान्तिमत्खण्डमेकम्" या दोन पुराव्यावरून, रघुवंशांतील यवन अफगाणिस्तानांत आणि पाण्ड्यांची उर-

गपुर राजधानी या दोन उल्लेखांवरून आणि मालविकाग्निमित्रांतील अग्निमि॰ त्रानें 'विषयरोषचेतसा' अश्वमेधास यावें हें वाक्य आणि विदर्भांतील राजाचें सकलत्र बंधन या दोन उल्लेखांवरून तो त्या सुमाराचा म्हणजे इ. स. पू. पहिल्या शतकाचा ठरतो. 'विक्रम इ. स. ५७ चा कल्पित आहे' या कल्पनेनें मोहित होऊन संशोधक त्यास चंद्रगुप्त विक्रमाच्या वेळचा किंवा यशोधर्म विक्रमादित्याच्या ( इ. ५०० ) वेळचा मानतात. पण इ. स. पू. ५७ चा विक्रम निश्चयानें झाला होता हें आतां सिद्ध झालें आहे. त्याच्या १०१ संवतांतील लेख गंडाफेरिजचा पंजाबांत सांपडला आहे. याशिवाय मालवांचा शक पुढें यशोधर्म्यानें विक्रमसंवत् म्हणून चालविला ( कारण विक्रम संवत् अशा नांवानें तो पूर्वीं सांपडत नाहीं ) हें जरी मानलें तरी मालव शक मूळांत कोणी सुरू केला हें ठरविलेंच पाहिजे; तेव्हां तो मालव लोकांनीं माळवा जिंकल्यावर चालविला असेंच मानावें लागतें. 'मालवानां जय,' अशीं अक्षरें असलेलीं नाणीं इ. स. सुमारचीं सांपडलीं आहेत. तेव्हां इ. स. ५७ चा एक विक्रम सिद्ध होतो. या विक्रमाच्या दरबारांत कालिदास असूं शकेल. पण विक्रम व कालिदास यांचा मेळ घातलाच पाहिजे असें नसून कालिदासाचा काल स्वतंत्र रीत्या वरप्रमाणें इ. स. पू. प्रथम शतक निश्चित होतो.

कालिदासाच्या स्थलाविषयीं शेवटीं दोन शब्द लिहिले पाहिजेत. तो उज्जनीस राहत असावा हें निश्चित. तो मूळचा काश्मीरचा राहणारा असावा असें मेघदूताच्या कथेवरून आणि त्यांतील हिमालयाच्या परिचित वर्णनावरून दिसतें. तो बहुधा रामगिरि येथें कांहीं दिवस राहत असावा. त्यानें हिंदुस्थान बरेंच फिरून पाहिलें असावें असें मेघदूतावरून व रघूच्या दिग्विजयावरून दिसतें. तो बंगालचा राहणारा असावा असें बंगाली म्हणतात; पण कालिदासाची ग्रंथरचना वैदर्भी रीतींत आहे, गौडींत नाहीं, यावरून तो विदर्भाचा किंवा माळव्याचा रहिवाशी असलेला दिसतो. मूळचा काश्मीरचा राहणारा असेल. स्कंदपुराणांतील भविष्यवर्णनांत इ. स. ५७ च्या सुमाराचा विक्रम स्पष्टपणें सांगितला आहे. चंद्रगुप्त यानें प्रथम विक्रमादित्य हें नांव धारण केलें असा कित्येकांचा समज आहे. पण, गुप्तवंशाच्या शेवटल्या काळांत म्हणजे इ. स. ५००–६०० चे स्कंद पुराणांतील भविष्य आहे हें मागील लेखांत दाखविलेंच आहे. तेव्हां चन्द्रगुप्त

यानें प्रथम विक्रमादित्य पद्वी धारण केली असती आणि ५७ इ. स. पू. पहिला विक्रम नसता तर या पुराणांत निराळाच काळ विक्रमाचा दिला असता. तेव्हां इ. स. पू. पहिला विक्रम झालाच असला पाहिजे.

शेवटीं एक मनोरंजक गोष्ट सांगण्यासारखी आहे. मी एका प्रसंगानें काशीस गेलों असतां एक गृहस्थ मला भेटावयास आले आणि म्हणाले 'मीं कालिदासाचा काळ याविषयीं निबंध लिहिला आहे आपण वाचून पहा' मीं त्यास कोणता काळ तुम्ही निश्चित केला आहे असें विचारिलें तेव्हां त्यानें चन्द्रगुप्ताच्या वेळीं (इ. स. ४०० सु.) तो झाला असें उत्तर दिलें. इतक्यांत एक दुसरा अपरिचित गृहस्थ आला. त्यानें त्याच विषयावर एक निबंध लिहून आणला होता व त्यानें इ. स. पू. ५७ हा काळ निश्चित केला होता. विद्वान् मंडळींत या विषयाची किती चर्चा व गोडी आहे हें पाहून मला मौज वाटली. नंतर पहिल्यास तुमचीं कारणें वाचून दाखवा म्हणून सांगितलें तेव्हां त्यानें कांहीं वाचून दाखविलीं. दुसऱ्यास त्याचें खण्डन विचारिलें तेव्हां त्यानें आपल्या निबंधांतून त्या कारणाचें खण्डन काढून दाखविलें. त्यावर पहिल्यानें आपलें उत्तरहि दाखविलें. तेव्हां कालिदासाचा काळ अद्याप विद्वान् लोकांत चर्चेचा विषय आहे आणि जो तो आपली तर्कशक्ति कशी चालवितो हें पाहून आश्चर्य वाटलें. तथापि मी त्याचा इ. स. पू. काळच निश्चित समजतों हें शेवटीं सांगितलें पाहिजे.



# शंकराचार्यांची कामगिरी.

शंकरं शंकाराचार्यं केशवं बादरायणम् ।
भाष्यसूत्रकृतौ वन्दे भगवन्तौ पुनः पुनः ॥

भगवद्गीतेंत म्हटलें आहे.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहं ॥

या प्रसिद्ध श्लोकांतील वाक्याचा अर्थ सरळ आहे. पण जितका सरळ आहे, तितका तो खोल व विचारणीय आहे. श्रीमच्छंकराचार्यांनीं या श्लोकावर थोडक्यांत पण मार्मिक टीका अशी केली आहेः—"यदा यदा धर्मस्य ग्लानिर्भवति" म्हणजे "हानिर्वर्णाश्रमादिलक्षणस्य अभ्युदयनिःश्रेयससाधनस्य"—इहलोकीं व परलोकीं कल्याणाचें साधन असा जो वर्णाश्रमादिलक्षण धर्म त्याची जेव्हां जेव्हां हानि होते व "अभ्युत्थानं समुद्भवः अधर्मस्य" अधर्माचा समुद्भव होतो, तेव्हां तेव्हां मी आपल्याला "मायया सृजामि" मायेनें उत्पन्न करितों. 'मायया' मागच्या श्लोकावरून घ्यावयाचें; याप्रमाणें या श्लोकाचा सरळ अर्थ आहे. यांतील पदांचा आपण जरा खोल विचार करूं. ग्लानि हा शब्द या श्लोकांत मोठा मार्मिक आहे. धर्म हा नेहमीं ज़गतांत आहे; धर्माशिवाय व्यवहार चालावयाचा नाहीं. धर्म कधीं मरत नाहीं, परंतु अनेक वेळां ग्लान होतो. त्याची जागरूकता कमी होऊन त्याची शक्ति ग्लान होते. जशी आपल्या शरीरास चालविणारी शक्ति कधीं कधीं कमी होऊन आपल्याला ग्लानि प्राप्त होते, त्याप्रमाणें कधीं कधीं धर्मालाहि ग्लानि येते. याचें अनुमान प्रत्येक मनुष्य आपल्या अनुभवावरून करूं शकतो. आपणास कित्येक वेळां असे प्रसंग येतात कीं, आपल्या हृदयांत जागरूक राहणारी सदसद्विवेकबुद्धि मंदावून ग्लान होऊन जाते, व आपल्या हृदयांत अधर्माचें उत्थान होऊन चांगली गोष्ट कोणती हें आपल्यास समजत असूनहि कुमार्गाकडे जाण्याची प्रवृत्ति प्रबल होते, व आपण वांकडे जाऊं लागतों. किंबहुना अंतर्यामींची धर्मजागृति इतकी ग्लान होते कीं, त्या वेळीं आपणास चांगलें न्याय वर्तन कोणतें हें समजतहि नाहीं. अशा प्रसंगीं दुसऱ्यानेंच

आपणास हात दिला पाहिजे; तरच तरणोपाय होईल, नाहीं तर होणार नाहीं. हीच स्थिति समाजाची होय. समाजांत धर्माची जागृति जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत समाज ऐहिक व पारलौकिक कल्याणाच्या मार्गांत असून सर्व प्रकारच्या सुखांचा अनुभव घेत असतो. पण ज्या वेळेस ही धर्मजागृति कायम राहत नाहीं, म्लान होऊन जाते, व अधर्माचा समुद्भव होऊन समाज अकल्याणाच्या रस्त्याकडे वळायास लागतो, त्या वेळेस भगवंता-शिवाय दुसरा कोण तारणारा आहे? भगवंतानेंच महापुरुषांच्या रूपानें अवतीर्ण होऊन बुडत्या समाजाला हात दिला पाहिजे, दुसरें साधन नाहीं; व म्हणूनच भगवंतांनीं अशा प्रकारचें अभिवचन आपल्यास दिलें आहे. आपला समाज ज्या ज्या वेळेस विपन्नावस्थेंत येतो, त्या त्या वेळेस आपल्यास त्याचीच मदत व मार्गदर्शकता दुःखें तरून जाण्याचें साधन होते.

जशी प्रत्येक मनुष्याच्या शारीरिक स्थितींत कधीं कधीं ग्लानि येते, जशी समाजस्थिति कधीं कधीं विपन्नावस्थेला प्राप्त होते, त्याच-प्रमाणें धर्माची स्थिति कधीं कधीं ग्लान झाल्यावांचून राहत नाहीं. चांगली दशा व ग्लान दशा, या चक्रनेमिक्रमाप्रमाणें मनुष्याच्या, समा-जाच्या व धर्माच्या मागें लागल्याच आहेत. ही त्यांची नैसर्गिक उच्च नीच अवस्था एका बाजूनें अपरिहार्य आहे, तर दुसऱ्या दृष्टीनें ती फाय-देशीर आहे. सर्व समाज जर नेहमींच वाढत जातील, तर परमेश्वराचें स्मरणहि कोणास होणार नाहीं, व पृथ्वीवर समाजास राहण्यास जागा उरणार नाहीं. तसेंच परमेश्वराचें अवताररूपानें दर्शन होण्यास हा उच्च-नीचभावच कारणीभूत आहे. मनुष्यस्वभावांतच ह्या धर्मग्लानीचें बीज आहे. यामुळें कोणताहि धर्म घ्या, त्याला एकदां ऊर्जितावस्था येऊन नंतर तो निसर्गतः निकृष्टावस्थेंत जातो. याप्रमाणें धर्माची ग्लान अवस्था झाली म्हणजे महापुरुष निर्माण होऊन ते धर्माला व तेणेंकरून समाजाला पुन्हां उन्नत दिशेकडे लावितात. मी अमुक एक धर्म वाईट आणि अमुक एक धर्म चांगला या दृष्टीनें या वेळेस लिहीत नाहीं. समदृष्टीनें पाहिलें असतां सर्व धर्मांचीं मूल-तत्त्वें बहुतेक सारखींच असतात. धर्मशब्दाचा श्रीमच्छं-कराचार्यांनीं जो "अभ्युदयनिःश्रेयससाधनो धर्मः" म्हणून वरील टीकेंत खुलासा केला आहे, तो लक्षांत घेण्यासारखा आहे. ऐहिक व पारलौकिक सुखाचें साधन धर्म होय. दुसऱ्या शब्दांनीं बोलावयाचें म्हणजे, प्रवृत्ति

आणि निवृत्ती या दोन्ही पायांवर धर्माची उभारणी आहे. आश्रमधर्मांत दोन आश्रम प्रवृत्तीचे व दोन निवृत्तीचे आहेत. आश्रमधर्म व्यवस्थित चालले पाहिजेत, त्यांची हानि झाली असतां धर्माची ग्लानि होते, हें वरील टीकेंत "वर्णाश्रमधर्मादिलक्षणस्य" असें धर्माच्या व्याख्येंत आचार्यांनीं आणखी एक पद दिलें आहे, त्यावरून व्यक्त होतें. एखादा वर्ण किंवा आश्रम याचेंच प्राबल्य वाढून इतर वर्णांची किंवा आश्रमांची पायमल्ली झाली असतां समाजस्थिति बिघडल्यावांचून राहणार नाहीं, व धर्मास ग्लानि आल्यावांचून राहणार नाहीं बहुतेक सर्व धर्मांत वर्णाश्रमलक्षणाचा म्हणजे ऐहिक व पारलौकिक सुखसाधनाचा थोड्या अधिक अंशानें बंदोबस्त केलेला असतो. अशा प्रकारच्या व्यवस्थेंत गडबड होऊन जेव्हां आश्रमव्यवस्था बिघडते, प्रवृत्ति व निवृत्ति दोन्ही मार्गांची योग्य सांगड राहत नाहीं, त्या वेळेस त्या धर्माला ग्लानि प्राप्त होते. जशी शरीराची स्थिति सर्व अवयवांचें काम यथायोग्य आपआपल्या प्रमाणानें चाललें म्हणजे चांगली असते, पण कोणतेंहि मुख्य अंग बिघडलें असतां शरीर विकल होऊन मूर्च्छा पावतें,—तद्वत् समाजाची व धर्माची स्थिति आहे.

जगांतील सर्व धर्मांच्या इतिहासाकडे पाहिलें असतां ही गोष्ट आपल्या निदर्शनास येईल. मनुष्याच्या स्वभावाची अशी कांहीं चमत्कारिक घटना आहे कीं, कांहीं वेळ त्याचा ओढा प्रवृत्तीकडे वाहत जाऊन निवृत्तीला अगदीं संकुचित स्थान मिळूं लागतें. विषयाकडे मन इतकें लागतें कीं, सर्व लोक केवळ ऐहिक विषयांत गुंग होऊन जातात व परोपकारवृत्ति, समानबुद्धि, शमदमादि धर्म, इत्यादि निवृत्तीचें स्वरूप अगदीं संपुष्टांत येतें. असें झालें म्हणजे नानाप्रकारचीं दुःखें व संकटें येऊन मनुष्याचें मन निवृत्तीकडे वाहूं लागतें. तें वाढत वाढत इतकें वाढतें कीं, प्रवृत्तीकडे अगदीं दुर्लक्ष होतें व निवृत्तिच मुख्य समजली जाऊन तिची उपासना अखेरीस खोटी व पोकळ होऊं लागते. याप्रमाणें आश्रमधर्माची गैरव्यवस्था ज्या ज्या वेळेस धर्मांत दृष्टीस पडते त्या त्या वेळेस महान् पुरुष उत्पन्न होऊन ते धर्माला व्यवस्थित रूप देतात. आपण पाश्चात्य राष्ट्रांचें उदाहरण प्रथम घेऊं. ग्रीस व रोमन राष्ट्रांचा इतिहास पाहिला, तर ख्रिस्ती धर्माच्या प्रसारापूर्वीं त्यांची विषयासक्तता इतकी वाढली होती कीं, कोणी तरी धर्मव्यव-

स्थापक उत्पन्न होऊन त्यानें समाजाला व्यवस्थित रूप दिलेंच पाहिजे अशी स्थिति प्राप्त झाली. तेव्हां हळू हळू खिस्ती धर्माचा प्रसार होऊं लागला, व त्यांतील जीं कांहीं उच्च तत्त्वें आहेत त्यांचा पगडा लोकांवर बसून समाजाची स्थिति सुधारली. पण कांहीं काळानें या निवृत्तिपर वृत्तीचें प्राबल्य अधिकाधिक वाढूं लागलें. 'मंक' म्हणजे गोसावी यांची संख्या फार वाढली; त्यांचे अधिकार वाढले; त्यांची संपत्ति अवाढव्य होऊन गेली; आणि यामुळें खिस्ती धर्माला पूर्ण ग्लानि आली, आणि अधर्माचा, म्हणजे ऐहिक व पारलौकिक सुख साध्य न होतां दोघांचाहि उच्छेद होईल अशा मतांचा, जोर होऊं लागला. तेव्हां **लुथर**सारखे महात्मे उत्पन्न होऊन त्यांनीं खिस्ती धर्माला आलेलें वाईट स्वरूप काढून टाकिलें आणि प्राटेस्टंट धर्माची स्थापना केली. आज या धर्मास स्थापन होऊन सरासरी ४०० वर्षें झालीं आहेत. इतक्या अवधींत पाश्चात्य समाजाचा दुसऱ्या वृत्तीकडे ओढा अधिक वळायला लागला आहे; म्हणजे निवृत्तीचें बीज बहुतेक नाहींसें होऊन प्रवृत्तीचें प्राबल्य माजत चाललें आहे, असें दुर्दैवानें आपाल्यास म्हणावें लागतें.

आपण आपल्या देशाच्या इतिहासाकडे पाहिलें तर आपल्यांत या प्रवृत्ति-निवृत्तीकडे आंदोलनाप्रमाणें कडेलोट करणाऱ्या समाजवृत्तीचें उदाहरण दृष्टीस पडेल. परमोदात्त वैदिकधर्म प्रवृत्ति व निवृत्ति यांवर सारख्या जोरानें उभा आहे. वर्णाश्रमधर्माच्या पायावर वैदिक धर्माची इमारत अधिष्ठित झालेली आहे. उपनिषदांचीं तत्त्वें या दोन्ही वृत्तींला पूर्णपणें धरून आहेत. उपनिषदांचा समन्वय कर्माचा उच्छेद करण्याकडे नाहीं, तर प्रवृत्ति आणि निवृत्ति यांचा एकजीव करण्याकडे आहे. 'यद्विद्यया करोति तत् वीर्यवत्तरं भवति' ही उपनिषद्धर्माची मुख्य किल्ली आहे. वैदिक मंत्रांचा हाच आशय आहे. याप्रमाणें वैदिक धर्माची समतोल स्थिति होती. पण पुढें हळू हळू समाजाची प्रवृत्ति सांख्य आणि योग या तत्त्वज्ञानाकडे ओढूं लागली. संसार व्यर्थ आहे, प्रवृत्तीपासून दुःखपरंपरा आहे, इत्यादि गोष्टी अनेक तऱ्हेनें सांख्यांनीं व योग्यांनीं लोकांपुढें मांडल्यामुळें संन्यासाचें बंड वाढून लोकांची वृत्ति निवृत्तीकडे जाऊं लागली. मीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं जेव्हां जेव्हां केवळ निवृत्तीचें प्राधान्य होतें तेव्हां ती निवृत्ति पोकळ व खोटी होऊं लागते, व कर्तव्याला सोडून

मनुष्य भलतीकडे वाहूं लागतो. त्याप्रमाणें समाजाची स्थिति झाली. तेव्हां भगवंतांनीं अवतार धारण करून कृष्णस्वरूपानें अर्जुनाला अविनाशी गीतेच्या द्वारानें खऱ्या व उच्च तत्त्वांचा उपदेश केला. पोकळ व भासमान निवृत्तीच्या भरांत अर्जुन जेव्हां स्वकर्तव्याला पराङ्मुख होऊन युद्धापेक्षां सन्यास बरा असें म्हणून निस्तेज व हताश होऊन खालीं बसला, त्या वेळेस भगवंतांनीं आपल्या सदुपदेशानें त्याला योग्य ज्ञानाचें अमृत पाजिलें. सांख्य व योग यांचीं सर्व तत्त्वें खोटीं आहेत असें नाहीं. मीं पूर्वींच म्हटलें आहे कीं, प्रत्येक धर्मांत व मतांत ग्राह्य व उदात्त असा अंश आहेच व हा भाग बहुतेक सर्व धर्मांत एकच आहे. पण त्याजवर झांकण पडून त्याज्यांशाचा जेव्हां जोर होतो, तेव्हां त्या धर्माला व त्या मताला ग्लानि प्राप्त होते. त्याप्रमाणें सांख्य व योग या मतांची स्थिति झाली होती. सांख्य व योग मतांचें खरें स्वरूप काय आहे, व वैदिक अथवा औपनिषद मताशीं तें कसें मिळतें आहे, हें श्रीकृष्णांनीं सांगून "एकं सांख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥" असा सर्व मतांचा समन्वय केला व प्रवृत्ति आणि निवृत्ति यांची योग्य सांगड घातली. मनुष्याच्या ऐहिक व पारमार्थिक सुखाचा रस्ता अज्ञानानें व अधर्मानें अडला होता तो खुला केला. सारांश, संसारसमुद्रांत श्रीमद्भगवद्गीता हा एक मोठा मार्गदर्शक दीपकस्तंभ आहे व त्याचा उजेड दूर दूर पसरून अज्ञानांधकारांत कर्तव्यांध झालेल्या मनुष्यास रस्ता दाखविण्यास हजारों वर्षें किंबहुना चिरकाल समर्थ असा तो बांधून ठेवला आहे.

याप्रमाणें भगवंतांनीं अवतार घेऊन, वैदिक धर्माला सांख्य व योग मताची भलतीच वाढ झाल्यानें जी ग्लानि आली होती तिचें निराकरण करून, व नास्तिक मताचा केवळ निषेध करून, गीतेच्या द्वारें पुनः ऊर्जित दशा आणली. यानंतर शेंकडों वर्षांच्या अवधींत पूर्वीं वर्णन केलेल्या मनुष्यस्वभावाच्या आंदोलन पावणाऱ्या वृत्तींमुळें खोट्या निवृत्तीकडे पुनः समाजाचा ओघ वाहूं लागला. प्रवृत्तीला एकदेशानें अतिशय महत्त्व देणारें व निवृत्तीला तसेंच दुसरीकडे नेणारें पाशुपत पांचरात्र इत्यादींच्या स्वरूपानें ही वृत्ति प्रगट होऊं लागली. पाशुपत व पांचरात्र हीं मतें अगदींच धर्मबाह्य आहेत, असें प्रतिपादन करण्याचा माझा हेतु नाहीं; किंबहुना 'ये यथा मां प्रपद्यंते, तांस्तथैव भजाम्यहम्' या भगवद्गी-

तेव्हा उक्तीप्रमाणें सर्व मतांतून एकाच परमेश्वराचें भजन आहे. सर्व मतांचा रोख एकाच बिंदूकडे आहे. महाभारतांत वेदव्यासांनीं निरनिराळ्या मतांचा उल्लेख करून सर्वांचें रहस्य एकच आहे, ज्ञानी लोक मतवैचित्र्यानें फसत नाहींत, अज्ञानी मात्र परस्पर विरोधांत गर्क होऊन मुख्य गोष्टीला विसरतात, असें मोठ्या मार्मिक रीतीनें एका ठिकाणीं सांगितलें आहे. शांतिपर्वांतील अध्याय ३५० यांतील हे श्लोक फारच महत्त्वाचे आहेत.

सांख्यं योगः पांचरात्रं वेदाः पाशुपतं तथा
ज्ञानान्येतानि राजर्षे विद्धि नानामतानि वै ।
सर्वेष्वेषु नृपश्रेष्ठ ज्ञानेष्वेतेषु दृष्यते
यथागमं यथाज्ञानं निष्ठा नारायणः प्रभुः ॥

तात्पर्य, सांख्य काय, योग काय, किंवा पांचरात्र अथवा पाशुपत काय, सर्व मतांत परमेश्वराचीच स्तुति आहे असें अभेददृष्टीनें पाहिलें पाहिजे. पण असें पाहणारे फार थोडे; प्रत्येक मतवादी आपण घेतलेली गोष्ट वाढवून इतकी दूर घेऊन जातो कीं, शेवटीं ती उपहासास्पद होते व त्या धर्माला हास्यास्पद स्वरूप येतें. असो, वरील मतांशिवाय जैन आणि बौद्ध हीं मतें या अवधीत प्रचलित होऊन वैदिक धर्माचा अगदीं उच्छेद झाल्यासारखें झालें. तेव्हां भगवान् बादरायणाचार्यांनीं वेदान्तसूत्रें करून वैदिक धर्माचें पुनः प्रस्थापन केलें. बादरायणांनीं फार मोठी जबर कामगिरी बजाविली. प्रतिपक्षी जितके म्हणून होते तेवढ्यांच्या आगमांतील जे जे दृष्य भाग होते त्यांचें पूर्ण रीतीनें खण्डन करून, वैदिक म्हणजे औपनिषद मत स्पष्टपणें व संकलित रीतीनें एके ठिकाणीं सिद्धांतरूपानें ग्रथित केलें; व कित्येक गोष्टी ज्या पूर्वी अस्पष्ट होत्या, त्या स्पष्ट रीतीनें कायम करून ठेविल्या. भगवान् बादरायणांनीं अवतारकृत्यासारखेंच काम केलें, व ते व्यासाचे अवतार आहेत असें मानितात. वेदान्तसूत्रकर्ते बादरायण व्यास व महाभारताचे कर्ते द्वैपायन व्यास हे निराळे आहेत असा माझा समज आहे. वेदव्यासाचे अवतार बादरायण असावे व याच कारणानें दोघांचा ऐक्यरूपानें कोठें कोठें प्राचीन ग्रंथांत उल्लेख येतो.

बादरायणाचार्यांनीं वेदान्तसूत्रें करून वैदिक धर्माला पुनः जोर आणल्यानंतर दोन तीनशें वर्षें धर्मजागृति कायम होती, व हिंदुस्थानांत

अग्निमित्र, विक्रमादित्य, वगैरे बलाढ्य राजे हिंदुधर्माभिमानी झाले. यानंतर पुनः धर्माची ग्लानि व अधर्माचा उद्भव होऊन, विशेषतः बौद्ध मताचें फार प्राबल्य झालें. हिंदुस्तानांतच नव्हे, तर बाहेरच्या देशांत बौद्ध धर्माचा प्रसार यापूर्वीच अशोक राजाच्या वेळेपासून झाला होता. परंतु वैदिक धर्माला जैमिनि—बादरायणाचार्यांनीं पुनः स्थापन केलें होतें. ती धर्मजागृति कित्येक शतकें टिकली. किंबहुना मला वाटतें समुद्रगुप्त, चंद्रगुप्ताच्या वेळेपर्यंत हिंदुस्थानांत वैदिक धर्माचें प्राबल्य होतें. यानंतर बौद्ध धर्माला पुनः जोर आला, तो इतका कीं—हिंदुस्थानांतील बहुतेक राजे बौद्धमतानुयायी झाले. राजसत्तेचें धर्माला पाठबळ असलें म्हणजे तो धर्म जास्ती वाढतो, हें साहजिक आहे. हिंदुस्थानांत बौद्ध धर्माचा या वेळेस किती जोर होता, हें हुएनसांग या चिनी प्रवाशाच्या वृत्तावरून चांगलें व्यक्त होतें. हा प्रवासी एक जबरदस्त बौद्ध पण्डित असून त्याला बौद्ध धर्मांत कांहीं कांहीं शंकास्थानें होतीं, त्यांचा निरास करण्याकरितां खुद्द बौद्ध धर्माच्या जन्मभूमींत जावें अशी इच्छा होऊन अनेक प्रकारचे हाल व अडचणी सोशीत तो चीनपासून हिंदुस्थानच्या सरहद्दीवर पोंचला. येथवर सर्व बौद्ध धर्मच होता. प्रत्येक ठिकाणीं हजारों गोसावी ज्यांत आहेत, असे मठ व बुद्धाचीं शेंकडों देवालयें होतीं. काश्मीर, पंजाब, स्थानेश्वर म्हणजे कुरुक्षेत्र, कनोज, अयोध्या, बहार, पूर्व बंगाल, कामरूप ( आसाम ) मगध, गुजराथ वगैरे अनेक देश त्यानें पाहिले. त्या त्या देशांत हजारों संघाराम व बौद्धांचीं चैत्यें त्यानें पाहिलीं. ठिकठिकाणचे राजांनीं त्याचा सन्मान करून त्यास उच्चासनावर बसविलें. मोठमोठाल्या पण्डितांनीं त्याच्या बुद्धिमत्तेचा व धर्मजागरूकतेचा आदर करून त्याची पूजा केली. याप्रमाणें हुएनसांग उत्तर हिंदुस्थानांत फिरून दक्षिण देशांत आला. येथील राजेहि बहुतेक बौद्ध होते. परंतु उत्तर हिंदुस्थानापेक्षां येथें लोक वैदिक धर्माचा समाश्रय बराच करून होते. सिंहलद्वीप पाहून तेथून जलमार्गानें चीन देशांत जाण्याचा त्याचा विचार होता; परंतु सिंहल देशांत राज्यक्रान्ति झाल्यामुळें सिंहल देशांतील पळून आलेले बौद्ध संन्यासी त्यास पांड्य देशांत भेटले. तेव्हां त्यास आलेल्या रस्त्यानें परत जाणें भाग पडलें. परंतु जातांना नालंदा येथील बौद्ध मठांत त्यानें कांहीं दिवस वास केला. बौद्ध संन्यासी लोकांकरितां बांधलेला हा विहार हिंदुस्थानांत फारच मोठा होता. हा विहार शक्रादित्य म्हणून वंग देशाचा राजा होता त्यानें प्रथम

बांधला; व त्यांत दोन तीन पिढ्यांपर्यंत भर पडतच होती. एका मोठ्या चतुष्कोण प्राकाराच्या आंत शहरच वसलें होतें असें म्हटलें तरी चालेल. चारी बाजूंस मोठमोठाले दरवाजे असून त्यांजवर तीन मजले होते. पश्चिम दरवाज्याचे बाहेर एक रत्नखचित उंच स्तूप होता व त्यांत बौद्धाचा एक शरीरशेष होता. या विहारांत हजारों भिक्षु राहत असत. त्या सर्वांचा चरितार्थ राजाश्रयावर व लोकाश्रयावर चालत असे. सर्व भिक्षूंवर सत्ता एका अत्यंत वृद्ध व विद्वान् भिक्षूची असून त्याच्या हाताखालीं एक भिक्षु कारभाऱ्यासारखा असे. त्यास कर्मादान म्हणत. हे या विहार शहराचे राजा व प्रधानच होते व त्यांचा हुकूम सर्वांस पाळावा लागत असे. याच विहारांत मात्र सर्व हिंदुस्थानांत एक घटिकायंत्र असे त्याजवरून सर्व भिक्षूंचा आयुष्यक्रम ठरीव रीतीनें वेळशीर चालत असे. रात्रीचे तीन भाग केले असून पहिल्या व तिसऱ्या भागांत सर्व भिक्षु बौद्धागम पढण्यांत व ईश्वरसेवेंत घालवीत. मधल्या भागांत भिक्षूंनीं पाहिजेल तर निजावें किंवा जागत बसून ईशसेवा करावी. याप्रमाणें या विहाराची व्यवस्था असून आंतहि दोन दीडदीडशें फूट उंचीचे स्तूप होते. त्यांपैकीं एकांत बुद्धाची मोठी मूर्ति धर्माचें चक्र फिरवीत आहे, अशा प्रकारची होती. मध्यंतरीं एक उंच चबुतरा पंधरा सोळा हात लांब रुंद असून त्याजवर पावलांच्या स्वरूपाचीं बुद्धाचीं पाऊलें दाखविण्याकरितां कमळें खोदलीं होतीं.

वरील वर्णन सविस्तर देण्याचा मतलब हेतु इतकाच आहे कीं, बौद्ध धर्म कळसाला पोहोंचून त्याला उतरती कळा कशी लागली व कां लागली, हें सहज लक्षांत यावें. वैदिक धर्मापैकीं संन्यासमार्गाला प्रधान धरून बौद्ध धर्मानें संन्यास—वृत्तीला कळसाला पोंचविलें. हजारों संन्यासी सर्व वर्णांतून सर्व वयाचे व सर्व प्रकारच्या वृत्तीचे या धर्मात येऊं लागल्यापासून हळू हळू संन्यासधर्म कसा पोकळ व कपटमूल झाला असेल त्याची कल्पना करितां येईल. संन्याशांना राजे व श्रीमंत लोक धनादिकांनीं संन्यासमार्गापासून कसे च्युत करूं लागले, हेंहि लक्षांत येईल. संन्याशांच्या संस्था अशा मोठ्या प्रमाणावर झाल्यानें त्यांच्यांत ऐहिक सत्तेची इच्छा उत्पन्न होणें साहाजिक आहे. संन्याशाच्या मठावर आपण अधिकारी व्हावें अशी प्रबल इच्छा महत्त्वाकांक्षी लोकांस उत्पन्न झाल्यास नवल नाहीं. अशा प्रकारची निवृत्तिमार्गाची अगदीं थट्टा झाल्यानें पुढें सहजच अनर्थ कसे कोसळले

हें पुढें लौकरच दिसणार आहे. याशिवाय धर्मांत मतमतांतराचें बंड शिरलें. महायान व हीनयान हे दोन भेद होतेच. त्यांतहि पोटशाखा अनेक उत्पन्न झाल्या. अठरा मतांचे बौद्ध वादी प्रतिवादी भांडूं लागले. त्यावेळीं श्रीहर्ष नांवाचा कनोजचा बलाढ्य राजा उत्तर हिंदुस्थानावर सार्वभौम होता. तो बौद्धमताचा अभिमानी होता व दर ५ वे वर्षीं आपल्या संपत्तीचा त्याग करीत असे. त्यानें बौद्ध, जैन, ब्राह्मण, वगैरे सर्व मतांचे लोकांस वादाकरितां प्रयागास नेहमीं बोलावावें. त्यानें एक प्रचंड सभास्थान करून त्यांत बुद्धाची सोन्याची मूर्ति प्रतिष्ठापित केली व हुएनसांग यास सभाधिपति केलें; तेव्हां त्यानें बौद्ध महायान मताची प्रतिज्ञा केली. अनेक पंडितांनीं याच्याशीं वाद केला, पण त्यांस हुएनसांगनें जिंकलें. तेव्हां हत्तीवर बुद्धाची सुवर्णमूर्ति ठेवून मागें हुएनसांग यास बसविलें व राजानें स्वतः चवरी घेऊन त्याजवर ढाळीत ढाळीत मिरवणूक काढिली, व नंतर अगणित संपत्ति बौद्ध, जैन व ब्राह्मण भिक्षु यांस दान केली.

राजे व श्रीमंत लोकांनीं दिलेल्या संपत्तीमुळें हजारों सन्याशी एके ठिकाणीं नेहमीं राहूं लागल्यामुळें, त्यांची खाण्यापिण्याची योग्य सोय होऊं लागल्यामुळें, हळू हळू बौद्ध भिक्षु होणें हा एक धंदाच झाला. विरागाशिवाय संन्यास नाहीं, संन्यास घेतल्यावर एके ठिकाणीं राहणें नाहीं, फिरत असतांना खाण्याशिवाय जगताशीं संबंध ठेवणें नाहीं, इत्यादि वैदिक धर्मांतलीं संन्यासवृत्तीचीं जीं अवश्य व कडकडित बंधनें आहेत, तीं नाहींशीं झाल्यामुळें संन्यास म्हणजे एक फार्स झाला व बौद्ध सन्याशांत दुराचार वाढला. राजे लोकांवर बौद्ध सन्याशांचें चांगलें वर्चस्व असल्यामुळें ते लोकांस हवे तसे फसवूं लागले. अशा वेळीं वैदिक धर्मास पुनः जोर येणें साहजिक होतें. कुमारिलभट्टांनीं वैदिक धर्माची पुनः स्थापना केली. वेदाचें अनादित्व व अपौरुषेयत्व त्यांनीं सिद्ध केलें; आणि कर्ममार्गाची प्रतिष्ठा वाढविली.

कुमारिलभट्टांना या बाबतींत किती प्रयास पडले याचें दिग्दर्शन शांकरदिग्विजयांत चांगलें केलें आहे. प्रयागास त्यांच्या भेटीकरितां आचार्य गेले तेव्हां त्यांनीं असें सांगितलें कीं, बौद्धांचा पराजय करण्याकरितां मला त्यांचा आगम व त्यांचीं अंतर्गत तत्त्वें शिकावीं लागलीं तीं मी बौद्ध भिक्षु बनून शिकलों. हे लोक राजाश्रयाच्या जोरावर फार बंडाळी करितात.

सशिष्यसंघाः प्रविशन्ति राज्ञां ।
गेहं तदादि स्ववशे विधातुम् ॥
राजा मदीयोऽजिरस्मदीयं ।
तदाद्रियध्वं न तु वेदमार्गम् ॥

असो, अशा रीतीनें राजा व तदीय वर्गाच्या आश्रयानें उन्मत्त झालेल्या भिक्षुवर्गास शंकराचार्यांनीं सुधन्वा राजाच्या दरबारांत राजाश्रय मिळवून जिंकिलें. याप्रमाणें वैदिक मताला कुमारिलभट्टानें मदत केली, तत्रापि बौद्ध मताचा पूर्ण उच्छेद झाला नाहीं. कारण बौद्ध लोक निवृत्तीच्या अत्यंत टोंकाला गेल्यामुळें त्याच्या उलट दिशेनें कर्ममार्गी दुसऱ्या टोंकाला जाऊन पोंचले वेद प्रमाण आहेत; इतकेंच नव्हे तर वैदिक कर्माशिवाय बाकी सर्व व्यर्थ व अप्रमाण आहे, बौद्ध संन्याशांच्या उलट जावयाचें म्हणजे संन्यासधर्म मुळींच इष्ट नाहीं, निदान तो कलिवर्जीत आहे, अशा प्रकारानें वैदिक कर्ममार्ग्यांनीं आग्रह धरला. तात्पर्य, प्रवृत्तीच्या दुसऱ्या टोंकास ते गेले. सर्व सृष्टि मनुष्याच्या उपभोगाकरितां असून यज्ञयागादि निमित्तानें यथेष्ट मांस भक्षण करावें, दारू प्यावी अशा प्रकारचें कर्ममार्गीयांचें वृत्त होऊं लागलें. याशिवाय आपल्यांतच अनेक प्रकारचीं पाखंडें माजलीं. पाशुपतमतवादी स्वतःलाच श्रेष्ठ मानीत होते. हीच स्थिति पांचरात्र मतवादी, दुर्गामतवादी वगैरेंची होती. याशिवाय अघोरीमत, भैरवमत वगैरे भयंकर मतें होतींच. सारांश या वेळेस हिंदुस्थानांत अनेक मतें परस्पर विरोधी, परस्परांचा द्वेष करणारीं, परस्परांस हाणून पाडण्याचा यत्न करणारीं, व प्रत्येक मतांत आचाराचा समतोलपणा न राहतां एखाद्याच आचाराला भयंकर स्थितीला पोंहोंचविणारीं, प्रचलित होतीं. बौद्धांत संन्याशी संन्याशिणींचा सुळसुळाट झाला होता. जैन उपास व अहिंसा याचा कडेलोट करून बसले होते. कर्मवादी सकाळपासून संध्याकाळपर्यंत कर्मांत गुंतले होते. शाक्त लोक मांसमद्याच्या सेवनांत दुर्गेच्या नांवाखालीं नाचत होते. भैरवमतवादी अंगाला भस्म लावून हातांत नरकपाल घेऊन फिरत होते. अघोरपंथी याहूनहि भयंकर स्थितींत होते. अशा कारणांनीं हिंदुस्थानची धर्मदृष्ट्या मोठी शोचनीय स्थिति झाली. धर्माला अत्यंत ग्लानि आली. अधर्माचीं म्हणजे ऐहिक व पारलौकिक दोन्ही सुखांचा नाश करणारीं मतें ठिकठिकाणीं उत्पन्न होऊं लागलीं. अशा अत्यंत

शोचनीय स्थितींतून या आर्यभूमीस बाहेर काढण्याकरितां निरनिराळ्या मतांच्या आश्रयानें नीतीचा उच्छेद करून प्रवृत्तीच्या विपरीत दशेला पोंचलेल्या जनसमाजाला तारण्याकरितां, निवृत्तिवृत्तीची अधिष्ठात्री देवता शंकर यांनीं गीतेंत दिलेल्या वचनाप्रमाणें अवतार घेतला.

केरळ देशांतील याजुषशाखेच्या विद्याधिराज नांवाच्या ब्राह्मणाचा पुत्र शिव याच्या पोटीं श्रीमच्छंकराचार्य जन्मास आले. लहानपणींच विद्या अधीत करून त्यांनीं गुरूस थक्क केलें. मातेस समजावून तिनें आपल्या लग्नाचा केलेला बेत रहित करविला, व ते चतुर्थाश्रम घेण्याच्या इराद्यानें निघाले ते नर्मदातीरवासी श्रीगोविंद गुरु यांजपाशीं वेदान्तशास्त्राचें अध्ययन करून त्यांजपासून त्यांनीं संन्यासदीक्षा घेतली. काशीक्षेत्र हजारों वर्षांपासून पण्डितांची भूमि व विद्वत्तेची निकषशिला हिंदुस्थानांत आहे, तेथें जाऊन त्यांनीं आपल्या अद्वैत मताचा प्रचार सुरू केला व शेंकडों शिष्य केले. बदरिकाश्रमास जाऊन व्याससूत्रांवर भाष्य लिहिलें व गीताभाष्य, उपनिषद्भाष्यें इत्यादि ग्रंथ लिहून उपदेशसाहस्रीसारखे स्वतंत्र ग्रंथ लिहिले. नंतर आपल्या अवतारकृत्यास प्रारंभ केला. कुमारिलभट्ट या वेळेस निवर्तले असून त्यांचें कर्ममत त्यांचे शिष्य मंडनमिश्र आग्रहानें चालवीत होते त्यांस जिंकणें अवश्य होतें. प्रवृत्तीची केवळ कांस धरून निवृत्तीला अगदीं खोटें मानणारे हे मंडनमिश्र स–मांस श्राद्ध करीत बसले होते. तेथें संन्यासिश्रेष्ठ शंकराचार्य पोंचले. त्या संन्यासवेषास पाहतांच मंडनमिश्राच्या पायाची आग मस्तकास गेली व त्यांच्यांत वाद सुरू झाला. या वादाची हकीकत सर्वांस विदितच आहे. त्याजविषयीं जास्त विवेचन करण्याची जरूरी नाहीं. मात्र एका गोष्टीसंबंधानें मला मतभेद नमूद केल्यावांचून राहवत नाहीं. मण्डनमिश्राला जिंकल्यानंतर त्याची पत्नी सरस्वती हिणें आचार्यांना कामशास्त्रविषयक एक प्रश्न विचारिला आणि त्याकरितां आचार्यांनीं अमरक राजाच्या प्रेतशरीरांत योगबलानें प्रवेश केला, वगैरे हकीगत कल्पित असून, ही कथा मागाहून उत्पन्न होऊन जोडली गेली व ती विद्यारण्यस्वामींनीं जशीच्या तशीच आपल्या शांकरदिग्विजयांत घेतली. वस्तुतः वादास प्रारंभ करतांना आचार्यांनीं वादविषयक प्रतिज्ञा केली ती 'ब्रह्मैकं परमार्थसच्चिदमलं' वगैरे वेदांतशास्त्राची होती. या प्रतिज्ञेशीं सरस्वतीनें विचारलेल्या प्रश्नाच्या मुळींच मेळ बसूं शकत नाहीं. दुसरें आचार्य

शंकराचा अवतार होते. तेव्हां त्यांना या प्रश्नाचा जबाब देण्याकरितां अमरक राजाच्या शरीरांत प्रवेश करण्याची कांहीं जरूरी नव्हती. त्यांस आपल्या पूर्वस्मृतीचा व अनुभवाचा उपयोग करतां आला असता. हा विषय जास्त लांबवण्याची जरुरी नाहीं. तथापि एवढें सांगितल्यावांचून राहावत नाहीं कीं, हा प्रसंग खरा असो किंवा दंतकथेचा असो, त्यास मराठींत संगीत नाटकरूपानें आणणें अगदीं अप्रशस्त व तेणेंकरून एका अत्यंत पूज्य अशा आपल्या पूर्वजांपैकीं प्रसिद्ध व्यक्तीसंबंधानें लोकमतांत कमीपणा वाढतो व प्रसृत होतो.

प्रतिज्ञा केल्याप्रमाणें आचार्यांनीं मण्डनमिश्रास सरस्वतीची आज्ञा घेऊन संन्यास दिला व त्यास आपल्याबरोबर घेऊन सुरेश्वराचार्य हें नांव ठेविलें, व शृंगेरीस येऊन तेथें त्यांनीं शंकराचें देवालय बांधून शारदेची स्थापना केली. तेथें कांहीं दिवस ते स्वस्थ राहिले. याप्रमाणें कर्ममार्गाची जी एकदेशीय स्थिति झाली होती ती तोडून त्यांनीं प्रवृत्ति आणि निवृत्ति यांची योग्य सांगड घालून दिली. पण एवढ्यानेंच अवतारकार्य संपलें नव्हतें. बौद्ध, शैव, वैष्णव इत्यादि मतांमुळें देशांतील लोकांची ओढाताण होत होती व नीति व खरा धर्म यांचा ऱ्हास झाला होता. त्यांना मजबूत करण्याकरितां आचार्य शिष्यांसहित दिग्विजयाला निघाले. प्रथम रामेश्वरास जाऊन तेथील शाक्तांस त्यांनीं जिंकिलें. गिरिजेच्या नांवाखालीं सुरापान करणाऱ्या आग्रही ब्राह्मणांस जातिबहिष्कृत केलें. "नित्यं सुरा ब्राह्मणानाम् " असें वाक्य आचार्यांनीं आपल्या भाष्यांत स्पष्ट लिहून ठेविलें आहे. आचार्यांची दृष्टि केवळ वैदिक मार्गाचे प्रतिष्ठापनेकडे होती. जगत् आणि ब्रह्म यांच्याच ठिकाणीं त्यांची अभेद दृष्टि होती असें नाहीं, तर सर्व देवतांच्या ठिकाणीं त्यांची अभेद दृष्टि होती. शिव, विष्णु, दुर्गा, गणपति, ह्या भिन्न देवता आहेत व त्यांच्या उपासकांत विरोध असलाच पाहिजे, अशी त्यांची मुळींच कल्पना नव्हती. आचार्यांनीं भाष्यांत बहुधा शालग्रामपूजेचें उदाहरण घेतलें आहे. शारदेची पूजा त्यांनींच शृंगेरीस स्वतः स्थापन केली आहे. शंकरांचे तर ते अवतारच होते. पण यामुळें पाशुपत मत किंवा शाक्त मत किंवा पांचरात्र मत जेथें जेथें वैदिक धर्माला सोडून आहे—जेथें जेथें व्यर्थ भेदभाव ठेवून विरोध वाढविण्याची प्रवृत्ति आहे—तेथें तेथें त्यांनीं त्या मतांचें खंडन केलें आहे. वैष्णव मताचें जितक्या जोरानें त्यांनीं खंडन

केलें, तितक्याच जोरानें त्यांनीं पाशुपत मताचें खंडन केलें आहे; शाक्त मताचें जितक्या जोरानें त्यांनीं खंडन केलें, तितक्याच जोरानें बौद्ध मताचें खंडन केलें आहे. सारांश, शुद्ध वैदिक मताच्या स्थापनेकरितां पूर्वपरंपरे-प्रमाणें आचार्यांचा अवतार होता व म्हणूनच ते हिंदुस्थानचे जगद्गुरु झाले; व सर्व भारतवासीयांच्या पूजेस व कृतज्ञतेस पात्र झाले. शांकरदग्विजयांत विद्यारण्य स्वामींनीं श्रीमच्छंकराचार्यांचा अवतार कशाकरितां झाला हें थोडक्यांत प्रारंभींच सांगितलें आहेः—

शिवविष्णवागमपरैः लिंगचक्रादिचिन्हितैः ।
पाखंडैः कर्म संन्यस्तं कारुण्यमिव दुर्जनैः ॥
अनन्येन हि भावेन गच्छन्त्युत्तमपूरुषम् ।
श्रुतिः साध्वी मदक्षीबैः का वा शाक्यैर्न दूषिता ॥
तद्भवाल्लोकरक्षार्थमुत्साद्य निखिलान् खलान् ।
वर्त्म स्थापयतुं श्रौतं जगद्येन सुखं व्रजेत् ॥

सारांश, वैदिक धर्माची पुन्हा स्थापना करण्याकरितां आचार्यांनीं अवतार घेतला. या कार्यांत त्यांना बौद्धांशीं जसें झगडावें लागलें, त्याप्रमाणें पाशुपतवैष्णवादि आपसांतील वैदिक धर्मविरोधी मतांशीं झगडावें लागलें. शिवाजीला ज्याप्रमाणें स्वराज्यस्थापनेसाठीं मुसलमानादि बाह्य शत्रूंशीं लढून शिवाय चंद्रराव मोरे वगैरे अंतःशत्रूंशींहि झगडावें लागलें, त्याप्रमाणें श्रौत धर्माकरितां वेदाचा उच्छेद करणारे बौद्ध यांशींहि आचार्यांना लढावें लागलें; व त्याप्रमाणेंच वैष्णव-पाशुपतादि अंतस्थ मतांचाहि त्यांस कांहीं भागांत निषेध करावा लागला. वस्तुतः त्यांची दृष्टि शिव, विष्णु वगैरे देवतां-संबंधानें अभेदाची होती. त्यांस जसा विष्णु पूज्य तसाच शंकर पूज्य होता. सुरेश्वराचार्यांना रामेश्वरास लोकांनीं प्रश्न केला कीं रामेश्वर हा कोण समास आहे ? तेव्हां त्यांनीं मोठें मार्मिक उत्तर दिलें, तें येथें सांगण्यासारखें आहे.

रघूद्वहस्तत्पुरुषं परं जगौ ।
शिवो बहुव्रीहिसमासमैरयत् ॥
रामेश्वरे नामनि कर्मधारयं ।
परं समाहुः स्म सुरेश्वरादयः ॥

रामचंद्रानें तत्पुरुष समास मानून ‘ रामस्य ईश्वरः रामेश्वरः ’ असा विग्रह केला; शंकरांनीं ‘ रामःईश्वरः यस्य ’ असें म्हणून बहुव्रीहि समास मानला; सुरेश्वरादि विद्वान् समंजस लोक रामश्चासौ ईश्वरश्च असा विग्रह कर्मधारय समासाचा करितात. अशा प्रकारची उदात्त अभेद दृष्टि सर्व देवतांचे ठिकाणीं श्रीमच्छंकराचार्यांची असल्यामुळें जगद्गुरुत्व साहाजिक त्यांचे ठिकाणीं आलें. असो, रामेश्वराहून काञ्चीस जाऊन चोलपांड्य राजांना वशवर्ती करून शिवकांचीविष्णुकांचीची स्थापना केली व देवीची तंत्रानें उपासना करणाऱ्या लोकांस वैदिक मार्गानें उपासना करण्यास लाविलें. नंतर विदर्भ (महाराष्ट्र) देशांतील लोकांना स्वमतानुसारी करून भैरवमताचा उच्छेद करून कर्नाटकांत गेले. तेथें कापालिक मताचा मोठा जोर होता. कापालिकांचा अग्रणी क्राकच, गळयांत रुंडमाळा घातलेला, हातांत नरकपाळ घेतलेला, स्मशानभस्मानें चर्चिततनु असा होता, तो त्रिशूल घेऊन आला. मद्य पीत व स्त्रियांना आलिंगन देत त्याचे अनुयायी त्याचे मागून येतच होते. आचार्यांनीं हुंकारमात्रानें त्याचा निषेध केला व सुधन्व्यानें त्याचें पारिपत्य केलें. नंतर अपरांतांत गोकर्ण येथें पोहोंचले. तेथें नीलकंठ म्हणून शैवमताचा अभिमानी होता, त्यानें शिवमतावर भाष्य केलें होतें त्यास वादांत जिंकिलें. तेथून सौराष्ट्रांत द्वारका येथें आचार्य गेले. तेथें शंखचक्रादि तप्तमुद्रा धारण करणारे पांचरात्र मताभिमानी वादास आले त्यांस जिंकलें. नंतर उज्जनीस आले. अगरु चंदनाच्या सुवासानें धूपित केलेल्या अशा भव्य मंदिरांत महाकाळेश्वराचें दर्शन करून भट्टभास्कर नांवाचा सर्व वेदांवर भाष्य लिहिणारा कर्ममार्गाचा अभिमानी होता त्यास वादाला बोलाविलें व त्याला आपल्या मताकडे वळविलें. तेथून मथुरा, कुरुक्षेत्र इत्यादि ठिकाणीं आपलें मत स्थापन करून पंजाबांत गेले. तेथें दिगंबर जैनांस वादांत जिंकिलें. नंतर कोशल, विदेह, अंग इत्यादि ठिकाणीं आपलें मत स्थापन करून कामरूप देशांत अभिनवगुप्त म्हणोन शाक्त भाष्यकार होता त्यास जिंकिलें. नंतर वंगदेशांत येऊन गौडवादी मुरारि मिश्र, उदयन व धर्मगुप्त मिश्र यांना जिंकिलें. याप्रमाणें सर्व हिंदुस्थानांत फिरून स्वमतस्थापना करून आपले गुरूचे गुरु गौडपाद यांना काशींत प्रणाम करून संतोषित केलें व त्यांच्या सूत्रकारिकेवर व मांडूक्योपनिषदावर आपलें भाष्य त्यांस वाचून दाखविलें. तेव्हां गौडपादाचार्यांनीं

संतुष्ट होऊन आचार्यांस आशीर्वाद दिला. नंतर आचार्यांनीं काश्मीरांतील सर्वज्ञपीठाची हकीगत ऐकिली. त्याचा दक्षिणचा दरवाजा बंद होता. कारण, तेथें दक्षिणेंतील कोणीहि विद्वान् जात नसे. दाक्षिणात्याचें नांव राखण्याकरितां आचार्य काश्मीरास सर्वज्ञपीठाशीं पोंचले, तेव्हां अनेक मतवादी पुढें उभे राहून प्रश्न विचारूं लागले. त्या सर्वांचीं आचार्यांनीं समर्पक उत्तरें देऊन सर्वज्ञपीठावर आरोहण केलें. श्रीनगराजवळच्या टेकडीवर आचार्यांचें मंदिर अजून असून तेथें पूजा होते व शिखरावर एक विजेचा दिवा म्हैसूर दरबारच्या खर्चानें हल्लीं लागत असतो. मग बद्रिकाश्रमीं जाऊन त्यांनीं धर्माचा बंदोबस्त केला. चारी दिशांस चार मठ स्थापन करून त्यांच्यावर आचार्यपरंपरा राहावी या हेतूनें आपले चार शिष्य कायम केले. याप्रमाणें आपलें अवतारकृत्य ३२ वे वर्षापर्यंत संपवून श्रीमच्छंकराचार्यांनीं निजधामास प्रयाण केलें ( इ. स. ८३२ सुमारें ).

आचार्यांची कामगिरी खरोखर अलौकिक झाली. रामेश्वरापासून काश्मीरापर्यंत, द्वारकेपासून मणिपुरापर्यंत आजपर्यंत जी गोष्ट हिंदुस्थानांत झाली नाहीं, ती आचार्यांनीं घडवून आणिली. बुद्धाला जी गोष्ट करितां आली नाहीं, जी गोष्ट अवरंगजेबालाहि साध्य झाली नाहीं, ती आचार्यांनीं घडविली. आपसांतील विरोध व आपसांतील दुही ज्या देशाच्या अंगीं खिळून गेली होती, त्या देशास त्यांनीं आपल्या मताच्या म्हणजे वैदिक धर्माच्या एकच्छत्री अमलाखालीं आणिलें. सर्व हिंदुस्थानभर राजकीय सार्वभौमत्व आपल्या सामर्थ्यानें व युक्तीनें इंग्रज बहादरानें आज प्रस्थापित केलें आहे, पण जें आजवर हिंदुस्थानांत कोणासहि प्राप्त झालें नाहीं, तें धार्मिक सार्वभौमत्व आचार्यांनीं आपल्या बुद्धिबळानें व तेजस्वितेनें सर्व हिंदुस्थानवर संस्थापन केलें. श्रीमच्छंकराचार्यांस जगद्गुरु ही संज्ञा खरोखर शोभते. तेव्हांपासून बौद्धधर्म तर हिंदुस्थानांतून नाहींसा झाला व जैन धर्म पुष्कळ काळपर्यंत बहुतेक नामशेष राहिला. शैव, वैष्णव, शाक्तादि मतें आचार्यांनीं वैदिक मार्गानें जखडून टाकून एक केलीं. सर्व मतांच्या व सर्व जातींच्या लोकांनीं आचार्यांस नमन केलें व वैदिक धर्माचा अंगीकार केला. अशा प्रकारची अलौकिक कामगिरी बजावणें याचेंच नांव अवतारकृत्य. सर्व लोकांवर आचार्यांच्या बुद्धिमत्तेचा व मतांचा हा जो पगडा पडला, त्याचें इंगित कोणतें म्हणाल तर, माझ्या मतें, आचार्यांची अभेददृष्टि हें होय. जीवेश्वराचा अभेद आहे, ब्रह्मसृष्टीचा अभेद आहे, इत्यादि परमोदात्त

सिद्धांततत्त्वांचें रहस्य आचार्यांच्या वर्तनांत इतकें बसलें होतें कीं, त्यांची सर्वतोपरी अभेद-दृष्टि झाली होती. वर्णाश्रमधर्म जरी ते प्रवृत्तिरूपानें मानीत होते तथापि त्यांची सर्व वर्णांचे ठिकाणीं अभेद दृष्टि होती, हें काशींतील मातंगाच्या आख्यानानें जगताला त्यांनीं व्यक्त करून दाखविलें. प्रवृत्ति आणि निवृत्ति यांजविषयीं त्यांचा सारखाच कटाक्ष होता; किंबहुना त्यांच्या ठिकाणीं प्रवृत्ति निवृत्तिरूप झाली होती. उपास्य देवतांसंबंधानेंहि त्यांचा अभेद-भाव होता. अशा युक्तीनें त्यांनीं सर्वांस आपलेंसें करून सोडलें व सर्वांवर आपल्या मताची छाप बसविली तर यांत आश्चर्य कोणतें? जरा खोल दृष्टि नेली तर अभेद-बुद्धीशिवाय कोणत्याहि स्थितींत मनुष्यास यश येणार नाहीं. जो संसार करून कुटुंबांत राहतो, त्यानें जर सर्वांवर अभेद-दृष्टि ठेविली, आपल्या पुत्राप्रमाणेंच आपल्या भावाच्या पुत्रास मानिलें, बहिणीच्या मुलांस किंवा बाहेरच्या मुलांस सारख्या प्रेमानें वागविलें, तरच त्याचा संसार सुखी व यशस्वी होतो. हीच गोष्ट समाजाची आहे. ज्या समाजांत आपण राहतों, त्या समाजाचें कल्याण व्हावें अशी जर आपली इच्छा असेल, तर समाजांतील सर्व मनुष्यांना एकदृष्टीनें पाहिलें पाहिजे. उच्चनीच स्थितींतील सर्व जगांस आपल्यासारखें मानलें पाहिजे. आपलेंच सुख साधन करण्याच्या खटपटींत न गुंततां सर्व जणांच्या सुखाकरितां खटपट केली पाहिजे. हिंदुस्थान देशाचा तेव्हांच तरणोपाय होईल,--जेव्हां ही अभेद-वृत्ति समाजांत वाढेल व तिचा विकास होईल. समाज सोडून आपण वरच्या पायरीला गेलों आणि ' वसुधैव कुटुंबकं ' सर्व जग ज्याचें कुटुंब अशा सत्पुरुषांच्या चरित्रांकडे पाहिलें, तर त्यांचे ठिकाणीं आपणास हीच अभेद दृष्टि दिसून येते. मी मोठा तूं लहान, माझा देव मोठा तुझा लहान, इत्यादि भेदभाव आचार्यांचे ठिकाणीं कसा राहणार ?-व ' आप पर जया नाहीं ' अशा सत्पुरुषांस सर्व जग कां नमणार नाहीं? असो, याप्रमाणें श्रीमच्छंकराचार्यांनीं आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेनें, उदात्त विचारानें व परमोच्च अभेददृष्टीनें सर्व भारतवर्षास वैदिक धर्माच्या एकच्छत्राखालीं आणिलें आणि धर्मसंस्थापनेची इमारत मजबूत राखण्याकरितां चारी दिशांला चार मठांचे स्तंभ कायम केले. हिंदुस्थानांत यापुढें दोनशें वर्षें (८००-१००० इ. स.) धर्मैक्य नांदून सर्व देश सुस्थितीच्या उच्च बिंदूस पोंचला ही गोष्ट मध्य यु. भा. भाग २ यांत मीं विस्तारानें दाखविली आहे.

# मुसलमान–पूर्व दिल्ली.

दिल्ली शहराचा प्राचीन इतिहास फारच मनोरंजक असून तो त्या शहाराच्या भावी उत्कर्षास साजेल असाच आहे. दिल्ली शहराइतकें जुनें शहर हिंदुस्थानांत किंबहुना सर्व पृथ्वीवर नाहीं असें म्हटलें असतां चालेल. दिल्ली शहराबरोबर प्राचीनत्वाविषयीं प्रतिस्पर्धा करणारीं बाबिलोन, निनेव्ही, इत्यादि पुराणीं शहरें हल्लीं अस्तित्वांत नसून त्यांच्या जागा मोठमोठाल्या उकिरड्याच्या टेंकड्यांनीं भरल्या आहेत व या टेंकड्या खणून पुराणेतिहास–संशोधक विद्वान् लोक त्यांतून छापील विटांचे किंवा कोरलेल्या दगडांचे तुकडे बाहेर काढीत आहेत. युरोपांतील अस्तित्वांत असलेलें सर्वांत जुनें शहर रोम हें दिल्ली शहराच्या मानानें पाहतां अलीकडचें पोर म्हणावें लागेल. कारण त्याची स्थापना इ. स. पूर्वी ७०० च्या सुमारास झाली; म्हणजे त्याचें आयुष्य हल्लीं सुमारें २६०० वर्षांचें आहे. सर्व जगांतील हल्लींचें मोठें शहर लंडन हें जुलियस सीझरहून फारसें जुनें नसल्यानें त्याचें आयुष्य सुमारें २००० वर्षांचें असून दिल्ली शहराच्या मानानें केवळ अर्भक आहे. दिल्ली शहर याप्रमाणें सर्व जगतांत जुनें आहे इतकेंच नव्हे तर त्या ठिकाणीं मोठमोठे चक्रवर्ती राज्य करीत आले असून संपत्तीनें व कारागिरीनें तें जगांतील एका प्रचण्ड व बलसंपन्न राज्याचे अधिष्ठानास योग्य असेंच होतें व आहे. या ठिकाणीं सुमारें इ. स. पूर्वी ३१४० वर्षांपासून आजतागायत म्हणजे सुमारें ५०५१ वर्षांत निरनिराळ्या बलवान् सम्राटांनीं बांधलेल्या वसतीचीं पुटें एकमेकांवर बसलीं असून एकंदर दिल्ली शहराची वसति सुमारें ४५ स्केअर मैल इतक्या मोठ्या भूमीवर पसरलेली आहे. ही वसति यमुना नदीच्या दक्षिण अथवा उजव्या किनाऱ्यावर वसलेली असून तिची वाढ दक्षिणेकडून उत्तरेकडे होत आहे असें दिसतें. पाण्डवांचें पुराणें इंद्रप्रस्थ हिचें मूळ असून त्याजवर विक्रम, त्याजवर अनंगपाळ, त्याजवर हिंदुस्थानचा शेवटचा सार्वभौम शौर्यवीर्याचा पुतळा पृथ्वीराज चव्हाण, त्याजवर गुलामवंशाचा पहिला मुसलमान बादशाह कुतुबुद्दीन, नंतर फिरोझ तुघलख, यांच्या वसाहतींचीं व साम्राज्यांचीं चिन्हें दिसत असून शेवटचें पुट म्हणजे मोंगल बादशहा शहाजहान यानें बांधलेलें शहाजहानाबाद अथवा अर्वाचीन दिल्ली नांवाचें दिवाण–इ–खास, दिवाण–ई–आम, जुम्मा-

मशीद इत्यादि पाहणाऱ्यास चकित करणाऱ्या इमारतींनीं सुशोभित झालेलें शहर उत्तरेस आहे. याच्याच उत्तरेस लागून आतां यापुढें बादशहा जार्ज यांनीं नवीन स्थापिलेलें, बहुधा जार्जाबाद नांवानें प्रसिद्ध होणारें, पाश्चात्य शिल्पकलेच्या उत्कर्षानें मोंगल शहरावरहि ताण करणारें नवें शहर लौकरच वसेल हें निर्विवाद दिसतें. अशा या भाग्यशाली व अत्यंत पुराण नगराची स्थापना कोणीं केली, येथें मुसलमान इतिहासापूर्वीं कोणकोण पराक्रमी राजे झाले हें जाणण्याची प्रत्येकास उत्कट इच्छा साहजिकच होते. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास अंधकारमय खरा; पण याच अंधकारांत विशाळ प्रतिभेच्या दोन कवींनीं लिहून ठेवलेले दोन अजरामर ग्रंथ आपणास बराच प्रकाश देतात. महाकवि व्यासाचें महाभारत व चन्दबरदायी भाटाचा महाभारततुल्य पृथ्वीराजरासा या ग्रंथांवरून दिल्लीचा प्राचीन इतिहास आपल्यास बराच सांपडतो. तो थोडक्यांत असा. प्राचीनतम इंद्रप्रस्थ हिंदुस्थानास प्रथम प्रसिद्धीस आणणारा चक्रवर्ती राजा भरत व त्याचे पुरूरवा, नहुष, ययाति, पूरु, दुष्यन्त इत्यादि सोमवंशीय पूर्वज पंजाबांत प्रथम येऊन तेथें राज्य करीत होते. यांचीं नांवें वेदांच्या मंत्रभागांत प्रसंगोपात्त आलीं असून भरत अथवा भारतीय यांचें नांव पुष्कळदां आलें आहे. यावरून हे राजे मंत्रकाळांत होऊन गेले असावे. भरतवंशांतील कुरु नांवाचा राजा पंजाबाच्या अलीकडील सरस्वती, यमुना व गंगा या पवित्र नद्यांनीं अलंकृत केलेल्या प्रदेशांत प्रथम वसति करून राज्य करूं लागला. यामुळें या प्रदेशास कुरुक्षेत्र अथवा कुरुजांगल असें नांव पडलें. जांगल हा संस्कृत शब्द अल्पोदक देशाचा वाचक असून तेथील हवा dry कोरडी असते. येथील हवा चांगली असून जमीन सुपीक असल्यानें कुरुराज्यांतील लोक सशक्त व संपन्न होते. इतकेंच नव्हे तर कुरुदेश वेदविद्येचेंहि माहेरघर झाला. याकारणानें कुरुदेशाचें नांव वेदाच्या ब्राह्मणभागांत वारंवार येतें. कुरुवंशांतील हस्ति राजानें हस्तिनापुर शहर गंगेच्या कांठीं वसवून तेथें आपली राजधानी केली. हें हस्तिनापुर दिल्ली अथवा इंद्रप्रस्थ याहून निराळें हें पुष्कळ लोक विसरतात. तें गंगेच्या दक्षिण किनाऱ्यावर हरिद्वारापासून सुमारें वीस कोस दक्षिणेस वसलें होतें. तें गंगेच्या पुरानें प्राचीन काळीं जनमेजयानंतर वाहून गेल्यानें नामशेष झालें. असो, कौरव राजे राज्य करीत होते त्यांतील शेवटचे धृतराष्ट्र व पण्डु हे भाऊ असून त्यांच्या मुलांत म्हणजे धार्तराष्ट्र व पाण्डव यांत लहानपणापासून तंटे व चुरस लागल्यामुळें धृतराष्ट्रानें

राज्याचे दोन भाग करून पाण्डवांस यमुनेच्या पश्चिमेकडील भाग दिला. तेव्हां पाण्डवांनीं यमुनेच्या दक्षिण किनाऱ्यावर पूर्वींच असलेलें इन्द्रप्रस्थ या खेड्याचें शहर करून तेथें राजधानी केली. तेंच हल्लींच्या दिल्लीचें मूळ होय. युधिष्ठिर व त्याचे प्रतापशाली बन्धु यांनीं न्यायानें, पराक्रमानें राज्याचा उत्कर्ष केला, व त्यांच्या अमलांत इंद्रप्रस्थ शहर भरभराटीस आलें. इंद्रप्रस्थाची स्थापना अरण्य तोडून झाली होती; व त्या शहराच्या पश्चिमेस हें अरण्य फार वाढलें होतें व त्यांत नागजातीचे रानटी लोक राहत असल्यानें शहरास व राज्यास उपसर्ग लागे. यामुळें पाण्डवांनीं श्रीकृष्णाच्या साहाय्यानें व सल्ल्यानें हें खाण्डववन जाळून टाकलें तेव्हां त्यांतील नागलोक जळून गेले व जे वांचले ते पळून इतरत्र गेले. यामुळें नागांचें व पाण्डववंशाचें नेहमीं वैर होतें. तें तक्षकानें परीक्षिताचा खून करून उगविलें व परीक्षिताचा पुत्र जनमेजय यानें सर्पसत्र करून त्याचा भयंकर सूड घेतला. खाण्डववनांत असुर नांवाचे राक्षसहि राहत होते, ही कल्पना सुयुक्तिक नाहीं. कारण असुर राक्षसांहून भिन्न होते. मयासुर या खाण्डववनांतून वांचला तो नागांचा पक्षपाती असावा एवढेंच. त्यास जीवदान दिल्याबद्दल त्यानें पाण्डवांकरितां इंद्रप्रस्थांत एक दिव्य सभा म्हणजे दिवाण–ई–आम बांधून दिली. असो, खाण्डवदाहाच्या वेळीं अर्जुनास गाण्डीव धनुष्य मिळालें तें उत्तरगोग्रहणापूर्वीं ३२ वर्षे असा भारतांत एके ठिकाणीं उल्लेख असल्यामुळें व खाण्डवदहनापूर्वीं इंद्रप्रस्थाची स्थापना सात आठ वर्षे झाली असल्यानें ही स्थापना भारतीयुद्धापूर्वीं सुमारें ४० वर्षे झालीं असें अनुमान निघतें. भारतीयुद्धाचा काळ इ. स. पू. ३१०१ असल्यानें इंद्रप्रस्थ अथवा दिल्लीची स्थापना इ. स. पू. ३१४०–४१ वर्षीं झाली असें म्हणतां येतें. भारतीयुद्धाचा अगदीं अलीकडे ओढलेला काळ घेतला तरी तो, इ. स. पू. १२०० वर्षांच्या अलीकडे कोणाच्याहि मतानें नाहीं. तेव्हां या मताप्रमाणें सुद्धां दिल्लीच्या स्थापनेचा काळ इ. स. पू. १२४० म्हणजे रोम शहराच्या पूर्वीं ५०० वर्षे येतो.

## दिल्ली येथील पहिला साम्राज्यारोहणाचा दरबार

पांडवाच्या पराक्रमानें व न्यायानें त्यांचें राज्य भराभराटीस येऊन राजधानी इंद्रप्रस्थ नगर गजबजून गेलें व तेथें मयसभा झाल्यानें त्यास अलौकिक शोभा आली. साहजिकच युधिष्ठिरास राजसूय यज्ञ म्हणजे

भरतखण्डाच्या चक्रवर्तित्वाचा निदर्शक यज्ञ करण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्यानें श्रीकृष्णाचा सल्ला घेऊन जरासंध तुझें माण्डलिकत्व कबूल करणार नाहीं असें त्यानें सांगितल्यानें कृष्णार्जुनभीम या तीन वीरांस मगधांत पाठवून जरासंधाचा नाश करविला. याप्रमाणें चक्रवर्तित्वाच्या मार्गांतील कांटा नाहींसा झाल्यावर व यादवांनीं व कौरवांनीं प्रेमानें व भीतीनें पाण्डवांचें मांडलिकत्व कबूल केल्यावर युधिष्ठिरानें राजसूययज्ञ केला. भरतखण्डांतील सर्व राजे हल्लींच्या दिल्लीदरबाराप्रमाणें सार्वभौमाचे पद्रज मस्तकीं धारण करण्यास इंद्रप्रस्थास जमले. मयसभेंत दरबार होऊन सर्वांचे मुजरे होऊन सर्वांनीं युधिष्ठिरास नजराणे दिले, तेव्हां युधिष्ठिरानें सर्वांस बहुमान दिले. आलेल्या राजांचें व पाहुण्यांचें उत्तम प्रकारचें आदरातिथ्य युधिष्ठिराच्या आज्ञाधारक बंधूंनीं व प्रेमबद्ध द्वारकावासी माधवानें अत्यंत परिश्रम करून सार्वभौमत्व त्यास साजेल असें केलें. महाभारतांतील राजसूयाचें वर्णन वाचतांना हल्लींच्या दरबाराची आठवण आल्यावांचून राहणार नाहीं. तसेंच हल्लींच्या माधव महाराज शिंद्यांचें स्मरणहि 'नृपमखांत पत्रावळी' काढणाऱ्या माधवाच्या परिश्रमाचें वर्णन वांचून, झाल्याशिवाय राहत नाहीं.

पांडवांस कपटद्यूतांत जिंकून दुर्योधनानें त्यांस वनवासास धाडलें तेव्हां इंद्रप्रस्थाचें सार्वभौमत्व नाहींसें होऊन तें मांडलिक नगर झालें. परंतु दुर्योधनास राजसूय यज्ञ पांडवांनीं कबूल केल्याशिवाय करितां येईना. कौरवपांडवांचें युद्ध पुढें झालें आणि कौरव मारले गेले तेव्हां पांडव इंद्रप्रस्थास गेले नाहींत, कुरूंची प्राचीन राजधानी हीच त्यांनीं आपली राजधानी केली. व इंद्रप्रस्थ शाखानगरच राहिलें. पांडवांनीं अश्वमेध हस्तिनापुरास केला, इंद्रप्रस्थास नव्हे. द्वारकेस यादवी होऊन यादवांचा नाश झाल्यावर व द्वारका बुडाल्यावर श्रीकृष्णाचा पणतू वज्र यास पांडवांनीं इंद्रप्रस्थ दिलें. वरील हकीकत महाभारतावरून समजते. यापुढची इंद्रप्रस्थाची पौराणिक काळची माहिती समजत नाहीं. तेथें वज्राचा यादववंश किती वर्षे राज्य करीत होता वगैरे गोष्टी समजण्यास साधन नाहीं. तेथील राजे कोणातरी सम्राटाचे मांडलिक रहात आले असावे असें दिसतें.

इंद्रप्रस्थास सार्वभौमत्वाचें ऐश्वर्य इ. स. ५७ च्या सुमारास विक्रमादित्यानें दिलें असा रजपुतांच्या दन्तकथेवरून सुगावा लागतो. विक्र-

माचें वर्णन करणारा कोणी ग्रंथकार व्यासासारखा झाला असता, तर बरें झालें असतें. तरी विक्रमानें हिंदुस्थान जिंकून दिल्लीस साम्रज्यधानी केली यांत शंका नाहीं. पाश्चात्य विद्वान् या विक्रमाचें अस्तित्व मानीत नाहींत. पण भारतीय मानल्यावांचून राहणार नाहींत. रजपुतांचा अभिमानी इतिहासकार, राजतरंगिणीकार, रजपुतांचे दहाव्या शतकांतील ग्रंथ व चंद्रभाटाचा पृथ्वीराजरासा यावरून टॉड असें लिहितो कीं पांडवांनंतर २९१५ वर्षांनीं विक्रमानें दिल्लीस पुन्हा राज्य केलें व हा विक्रम पांडववंशांतील असून त्याचे हल्लींचे वंशज तुवर रजपूत आहेत. या पुराव्याशिवाय विक्रमाचा संवत् हा उत्तर हिंदुस्थानांत अजून चालू असून या गोष्टीची साक्ष देत आहे. अलबेरुनी यानें १००० इ. स. सुमारें लिहून ठेविलेल्या दन्तकथेवरून असें दिसतें कीं मुलतानापासून कांहीं दूर असलेल्या कारूर नांवाच्या गांवाजवळ विक्रमानें शकांचा पराभव करून शकांपासून हिंदुस्थानास मुक्त केलें. याच विक्रमानें दिल्ली येथें साम्रज्यशाही स्थापिली असें मानण्यास हरकत नाहीं.

## प्राचीन ऐतिहासिक दिल्ली.

इ. स. पू. ५७ नंतर आठव्या शतकापर्यंत दिल्लीचें वर्चस्व पुन्हा कमी झालें. यानंतर ऐतिहासिक दृष्ट्या अत्यंत विश्वसनीय अशा काळांत दिल्लीची पुन्हा ऊर्जित दशा आली. पाण्डववंशीय तुवर रजपुतांनीं पुन्हा दिल्ली येथें राज्य स्थापन केलें. इ. स. ७९२ मध्यें तुवर वंशीय अनंगपाळानें पुन्हा दिल्लीस पूर्वपदास पोचविलें. हे तुवर अत्यंत पराक्रमी असून ते आपणास पांडववंशीय मानतात. कर्नल टॉड या वंशोत्पत्तिसंबंधें म्हणतो. "Universal consent admits it and the fact is as well established as most others of such a distant period. Nor can any distinguished families of Europe produce evidence as strong as the Tuars, even to a much less remote antiquity" अनंगपाळाच्या वंशानें दिल्ली येथें ११६४ इ. स. पर्यंत राज्य केलें. महमूद गझनीनें हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या त्यावेळेस दिल्लीचें राज्य भरभराटींत नव्हतें. शेवटचा राजा अनंगपाळ याच नांवाचा होता. त्यास पुत्रसंतान नसल्यानें आपल्या मुलीचा मुलगा राजा पृथ्वीराज यास दिल्लीच्या गादीवर त्यानें बसविलें अशी दन्तकथा चंद्रभाट देतो; पण इतिहास पाहतां दिल्ली पृथ्वीराजाच्या चुलत्यानें जिंकून आपल्या राज्यास जोडिली. त्याच्या वेळेस दिल्ली पुन्हा सम्राज्यधानी झाली.

पृथ्वीराजानें संयोगिता मिळविली पण साम्राज्यलक्ष्मी घालविली. शहाबुद्दीन घोरीनें ११९२ त पृथ्वीराजावर स्वारी केली त्या युद्धांत तो पराभव पावला आणि हिंदूंचें साम्राज्य नष्ट झालें. याप्रमाणें दिल्लीचें मुसलमानपूर्व वैभव नष्ट झालें तरी त्याची साक्ष देणारे तेथें अवशेष पुढील-प्रमाणें आहेत. यांचें वर्णन मध्ययुगीन भारत भाग ३ यांत पृ. ४९८ वर विस्तारानें दिलें आहे त्याचा सारांश असा.

दिल्लीचीं एकंदर सात शहरें आहेत. मूळ इंद्रप्रस्थ गांव. याचें नांव हल्लीं इंद्रपत् आहे. याच्या नैर्ऋत्येस सुमारें दोन मैलांवर अनंगपाळ तुवर प्रथम राजा यानें लालकोट नांवाचा किल्ला बांधला. त्यांत हल्लीं कुतबमिनार आहे. हा मेहेरोली नांवाच्या गांवाजवळ आहे. अनंगपाळानें मथुरेहून आण-लेली लोखंडी लाट या किल्ल्याच्या मध्यभागीं आहे. लालकोटाच्या आंत पुष्कळ हिंदु व जैन देवालयें होतीं. तीं पाडून कुतुबुद्दीनानें आपली मशीद येथेंच बांधली. तीस त्या मंदिराचे, कोरलेल्या चित्रांनीं भरलेले, खांब जसेच्या तसे लावलेले आहेत. लोहस्तंभ व हे खांब पूर्वींच्याच स्वरूपांत त्यानें ठेविले यावरून पहिला मुसलमान बादशाह कुतबुद्दीन याचें चांगुलपण नजरेस येतें. लोहस्तंभावरील लेख वाचला गेला आहे त्यावरून हा स्तंभ विष्णुदेवतेस एका चन्द्रराजानें अर्पण केला होता. जैन स्तंभावर अबूच्या पहाडावर असलेल्या जैनमंदिरस्तंभाप्रमाणें चित्रें आहेत आणि हिंदुस्तम्भावर कृष्ण, यशोदा, गाई वगैरेचीं चित्रें कोरलीं आहेत. कीर्तिमुखाचीं चित्रें व त्यांतील दंतपंक्ति स्पष्ट दिसतात. या कोटाच्या आंत तुवर अनंगपाळाच्या वेळेपासून पृथ्वीराजापर्यंतच्या काळांत अनेक वाडे व मंदिरें बांधलीं गेलीं असावीं.

हें नवीन दिल्ली शहर अनंगपाळानें इ. स. १०५२ त बांधिलें असें लोहस्तंभावरील त्याच्या एका लेखांत स्पष्ट म्हटलें आहे. सुमारें १०० वर्षां-नंतर चाहमान राजा वीसल यानें हें शहर जिंकून आपल्या राज्यास जोडलें. दिल्ली नांव प्रथम अनंगपाळ तोमरानें दिलें असावें. तें दोन शिलालेखांत 'ढिल्लिका' या रूपांत दिसतें. ( इ. स. ११६३ चा सं. १२२० बिजो-लिया लेख 'ढिल्लिकाग्रहणश्रान्तमाशिकालाभलाम्भनात्' आणि इ. स. १३३६ चा मुसलमानी काळाचा एका विहिरींतील लेख ). ढिल्लिका याचा अर्थ काय होतो हें समजत नाहीं. हें नांव इ. स. १०५० इतकें जुनें आहे.

दन्तकथा अशी आहे कीं अनंगपाळ तोमरानें किल्ला बांधून लाट गाडली तेव्हां ती ज्योतिषानें दिलेल्या अशा पक्क्या मुहूर्तावर गाडली कीं ती शेषाच्या मस्तकीं पोंचली. पण लोकांनीं संशय प्रकट केल्यावरून तिला ढिली करून बाहेर काढली तेव्हां रक्त दिसलें. पण मुहूर्त गेल्यानें ती पुन्हा पक्की गाडली गेली नाहीं व तोमराचें राज्यहि ढिलें पडलें. ही दन्तकथा ढिल्ली या शब्दावर रचली गेली आहे. असो, अनंगपाळाचें राज्य ११५० त वीसळ चव्हाणानें घेतलें; नंतर पृथ्वीराज त्याचा नातू याचें राज्य १२०२ मध्यें कुतुबुद्दीननें घेतलें. दिल्लीस स्थापिलेले राजवंश आजपर्यंत शें दीडशें वर्षे राहून बदलत आलेले आहेत तेव्हां ढिल्ली नांव अन्वर्थ आहे. पृथ्वीराजानें आणखी एक कोट बाहेर बांधलेला अद्याप थोडा अवशिष्ट आहे. याच्या आंत असलेला कुतुबमिनार हा मूळचा वीसलदेवानें बांधलेला असावा असा तर्क आहे. त्याचे मजले तेव्हां दोन असावे. पुढें अल्तमशनें तिसरा व चौथा मजला चढविला. हा कीर्तिस्तम्भ मूळांत असून त्याचे बाहेरचे दगड काढून त्या जागीं दुसरे अरबी लेख खोदलेले बसविले आहेत असें कॅनिंगह्यामचें मत आर्किआलजिकल असिस्टंट मिस्तर बॅरालर यास दिसून आलेलें नमूद आहे. असो, पृथ्वीराजाची देवी येथून जवळच आहे. या दिल्लींत मुसलमानांनीं कांहीं वर्षे राज्य केल्यावर तगलख बादशहानें तगलखाबाद नांवाचें दुसरें शहर वसविलें. तेथून पुढें शहाजहानाबाद हल्लींची दिल्ली उत्तरेकडे वसली आहे.



# महाराष्ट्रांतील वैष्णवभक्ति व पंढरीचा विठोबा.

" महाराष्ट्रांतील वैष्णवभक्ति—अथवा पंढरपूर येथील विठोबा आणि वारकरी पंथ " या मथळ्याखालीं चित्रमय जगताच्या मार्च १९१४ च्या अंकांत रा. रामचंद्र भिकाजी जोशी यांचा लेख आला आहे. त्यांत पुष्कळ विधानें व अनुमानें चुकीचीं असून त्यांजवरून साधारण जनसमूहाचा गैर-समज होण्याचा संभव आहे. यासाठीं या विषयाची दुसरी बाजू लोकां-समोर मांडणें अवश्य आहे असें वाटून हा लेख मी चित्रमय जगताच्या द्वारें प्रसिद्ध करीत आहें. डॉ. सर रामकृष्ण भांडारकर यांच्या एका पुस्तकाच्या आधारें रा. जोशी यांनीं आपला लेख लिहिला आहे हें खरें आहे. पण मुळांत डॉक्टरसाहेबांचींच मतें चुकीचीं असल्यानें रा. जोशी यांची चूक झाली आहे असें दुर्दैवानें म्हणावें लागतें. डॉक्टरसाहेबांची विद्वत्ता सर्वजगप्रसिद्ध आहे आणि ते सध्या संस्कृत विद्यार्थ्यांस पूज्य आहेत. पण त्यांची चुकी त्यांच्या व इतरांच्या नजरेस आणून देण्याचा प्रयत्न केल्यास त्यांच्या-विषयींच्या पूज्यभावांत कांहीं कमतरता येते असें कोणी समजणार नाहीं. कदाचित् या बाबतींत माझी चुकी असूं शकेल. तेव्हां याविषयींची दुसरी बाजू समजून घेऊन विद्वान लोकांस आपलें योग्य मत कायम करण्यास या लेखानें आधार होईल असें मला वाटल्यावरून रा. जोशी यांच्या लेखां-तील एक एक विधान घेऊन तें कसें चुकीचें आहे हें मी सविस्तर दाख-विण्याचा यत्न करितों.

" विठ्ठल अथवा विठू हा विष्णु या शब्दाचा कानडी अपभ्रंश आहे " असें रा. जोशीं पान १२७ वर लिहितात. सन ११०४ पासून सन ११४१ पर्यंत होयसल यादव वंशांत विष्णुदेवानें राज्य केलें. त्याच्या प्रसिद्ध लेखांत " विठ्ठल देव " " विठ्ठ " असा त्याचा नामनिर्देश कानडींत आहे त्याजवरून हें विधान रा. जोशी यांनीं केलें आहे. पण या विधानाचा अर्थ काय? विष्णु हा संस्कृत शब्द आहे. विष्णु हा शब्द कानड्यांना उच्चारतां येत नाहीं म्हणून कानडी लोक आपल्या भाषेंत विशिष्टप्रकृत्यनुसार त्याचा " विठु " असा उच्चार करतात असा याचा अर्थ होतो; आणि तो अपभ्रंश कानडींत प्रथम होऊन त्याजपासून तो मराठींत आला, असें याजवरून गर्भित व उघड अनुमान निघतें. पण हें म्हणणें चुकीचें आहे. कानडी

लोकांनीं कोणत्याहि संस्कृत शब्दाचा अपभ्रंश केलेला दिसत नाहीं. किंबहुना कानडींत संस्कृत शब्द जसेच्या तसेच येतात हें प्रसिद्ध आहे. याशिवाय "ष्णु" चा 'ठु' करण्याकडे कानडी भाषेची प्रवृत्ति आहे असें दिसत नाहीं, किंवा उदाहरणें देऊन रा. जोशी यांनीं सिद्ध केलें नाहीं. कांहीं कांहीं प्रसंगीं Antiquarians अथवा पुराणेतिहास–संशोधक शिलालेखांवरील आपल्या भक्तीचा अतिरेक करतात असें म्हणतां येतें; आणि हें विधान त्याचें एक ढळढळीत उदाहरण आहे. एका कानडी लेखांत विठ्ठलदेव हें नांव दृष्टीस पडलें याजवरून तर्काच्या सशास्त्र रीतीनें जें अनुमान निघतें तें एवढेंच कीं, त्या लेखाच्या कालीं म्हणजे इ. स. ११०४ च्या पूर्वीं कानड्या मुलखांत विठ्ठल हें नांव प्रचलित होतें. यापेक्षां या उल्लेखावरून जास्त अनुमानें काढणें हा अतिप्रसंग होय. म्हणजे या उल्लेखावरून असें म्हणणें कीं 'विठ्ठल' हा 'विष्णू' चा **कानडी** अपभ्रंश आहे, किंवा कानडी मुलखांतून हा शब्द महाराष्ट्रांत आला इत्यादि अनुमानें काढणें तर्कशास्त्रास सोडून आहे. कारण याच्या उलट वस्तुस्थिति असूं शकेल. विष्णूचा अपभ्रंश गौडी अथवा संस्कृतोत्पन्न भाषांतच 'विठु' असा असूं शकेल आणि तें नांव महाराष्ट्रांतून इ. स. ११०० च्या पूर्वीं कर्नाटकांत गेलें असेल. तात्पर्य, कानडा मुलुखांतील एका लेखांत 'विठ्ठल' हें नांव सांपडतें याजवरून तें नांव महाराष्ट्रांतून कानड्या मुलखांत गेलें किंवा कानड्या मुलखांतून महाराष्ट्रांत आलें याविषयीं कोणताच निकाल लागूं शकत नाहीं; किंवा हें कानडी अपभ्रंशाचें रूप आहे किंवा महाराष्ट्री अपभ्रंशाचें आहे याचाहि निकाल लागूं शकत नाहीं. याचा निकाल इतर प्रमाणांनींच लावला पाहिजे आणि तो असा लागतो.

"विष्णु" शब्दाचा 'विठु' हा अपभ्रंश गौडी भाषांच्या म्हणजे संस्कृतोत्पन्न गौडी भाषांच्या प्रकृत्यनुसार आहे, यांत द्राविडी भाषांचा कांहीं संबंध नाहीं, ही गोष्ट युरोपियन विद्वानांनीं पूर्वींच दाखविली आहे. पंडित भगवानलाल इंद्राजी याच्या कालीं त्यास 'विठ्ठल' शब्दाची व्युत्पत्ति कळली नव्हती असें दिसतें; पण त्याच सुमारास किंवा त्याच्या थोडें नंतर 'विठ्ठल' शब्दाची व्युत्पत्ति बीम्स या विद्वान् गौडीभाषाकोविदानें 'A Comparative Grammar of the Indo-Aryan Languages' या आपल्या प्रसिद्ध ग्रंथांत लाविली आहे. बीम्सचें पुस्तक डॉ. भांडारकर यांच्या नजरेंत आलें नाहीं असें मानणें संभवनीय नाहीं. तेव्हां हें एक गूढ

आहे. असो, बीम्सनें लाविलेली व्युत्पत्ति सर्वांस मान्य होण्यासारखी आहे. पान ३४७ भाग १ यांत तो अशी व्युत्पत्ति देतो. विष्णु=( बंगाली आणि ऊरिया ) विष्टु=( मराठी ) विठु. 'ष्ट' चा ठ आर्यप्राकृतभाषांत होतो हें वररुचीच्या प्राकृत व्याकरणावरून सिद्ध आहे. जसें पृष्ठ=पाठ, मुष्टि=मुट्टि मूठ ( ष चा प्रथम स व नंतर ह होतो आणि मग ह ट च्या जागीं ट ह=ठ होतो. उदा०– महाराष्ट्री=महाराटी=वर्णव्यत्यासानें महाराटी=मराठी. ) सारांश, विष्णूचा विठु हा अपभ्रंश आर्य प्राकृत भाषांच्या प्रकृतीनुसार होतो, हें उघड आहे. बीम्स आपल्या पुस्तकाच्या उपोद्घातांत पृष्ठ ८० वर म्हणतो " In the words कृष्ण and विष्णु the Bengalis and the Uriyas in speaking substitute ष्ट for ष्ण so that these words in Bengali sound किष्ट and विष्ट and in Uriya किष्टु and विष्टु. ' गोमांतकी भाषेंतील याच शब्दांच्या उच्चाराचा दाखला रा. जोशी यांनीं दिला आहे, पण गोमांतकी ही आर्यभाषा आहे, द्राविडी नव्हे. सारांश, वरील उपपत्ति मान्य करण्यासारखी असून " विष्णु " चें विठु ' हें रूप आर्य भाषांच्याच अनुरोधानें झालें आहे. स्वार्थी किंवा प्रेमार्थी ल हा वर्ण मराठींत लागतो त्यावरून, बाबू–बाबुल प्रमाणें, विठ्ठल हें रूप झालें आहे. बा हें आदरार्थी मराठींत लागतें त्यावरून कान्होबा, निळोबा इत्यादिकां-प्रमाणें, विठोबा हें रूप झालें आहे. कानडी भाषेंत ष्ण उच्चारितां येत नाहीं किंवा ष्ट उच्चारतां येत नाहीं असें दिसत नाहीं; कानडींत संस्कृत शब्द अपभ्रष्ट करून घेण्याचा प्रघात दिसत नाहीं इत्यादि कारणांवरून असें ठरवितां येतें कीं विठु, विठ्ठल, विठोबा हीं रूपें मराठीच आहेत. प्राकृत भाषांच्या स्वभावानुरूप विष्णु या संस्कृत शब्दावरून आलेलीं आहेत. सह-जच विठ्ठलरूप महाराष्ट्रांतून कानडच्या मुलुखांत इ. स. ११०० चे पूर्वीं गेलें असावें असेंच अनुमान केलें पाहिजे.

यापुढचें रा. जोशी यांचें विधान केवळ सुतावरून स्वर्गास जाण्या-सारखें आहे. " ही विष्णुभक्ति कानडी प्रांतांतून आली. बाराव्या शतकाच्या अखेरीस प्रख्यात वैष्णव आचार्य रामानुज त्या प्रांतांत उदयास आला. आणि त्याच्या प्रयत्नानें इकडलीं शैव आणि जैन मतें मागें पडून विष्णु-भक्तीला उत्तेजन आलें, ही गोष्ट इतिहासावरून सिद्ध आहे. " असें रा. जोशी पान १२८ वर म्हणतात. विठ्ठल हें रूप एका कानडी लेखांत इ. स. ११०४ च्या पूर्वीं दिसून आलें. त्याजवर ही एवढी प्रचंड इमारत रचली

आहे. विष्णुभक्ति महाराष्ट्रांत बाराव्या शतकाच्या अखेरीपूर्वी नव्हती, असें विधान कोणत्या आधारावर केलें आहे ? इकडे पूर्वी शैव व जैन मतें होतीं, मग वैष्णवच मत तेवढें कां नव्हतें ? रामानुजानें वैष्णवभक्ति प्रचारांत आणली त्यापूर्वी ती येथें नव्हती हें कोणत्या इतिहासावरून सिद्ध आहे तें लक्षांत घेतलें पाहिजे. हें कारण म्हटलें म्हणजे रामानुजापूर्वी शंकराचार्यांचें अद्वैत मत प्रचलित होतें आणि शांकर अद्वैत मत आणि विष्णुभक्ति विरोधी आहेत, ही द्वैतवादी प्रार्थनासमाजाची साहजिक कल्पना होय. ही कल्पना पुढें पुन्हा आली आहे व तिचा आपण तेथें जास्त ऊहापोह करूं. पण महाराष्ट्रांत पूर्वी म्हणजे बाराव्या शतकापूर्वी वैष्णवभक्ति नव्हती हें म्हणणें निराधार आहे हें येथें सांगितलें पाहिजे. पंढरपूरचा आरंभ बाराव्या शतकापुढें रामानुजाच्या यत्नानें झाला ही कल्पना त्याहून निराधार आहे. ती कशी तें आपण पाहूं.

येथेंहि तोच शिलालेखांतील उल्लेखावरील प्रेमाचा अतिप्रसंग नजरेस पडतो. "शिलालेखांत पंढपूरचा पहिला उल्लेख तेराव्या शतकांत सांपडतो." ( रा. जोशी ). झालें, पंढरपुराचा प्रारंभ तेराव्या शतकांत झाला हें अनुमान निघालें. पण या मागील शिलालेख सांपडला नाहीं म्हणून यामागें पंढरपुर नव्हतें असें न्यायविरुद्ध अनुमान कसें निघूं शकेल ? तेराव्या शतकांत पंढरपुरचा उल्लेख सांपडला यावरून तर्कशास्त्रास धरून अनुमान निघतें तें एवढेंच कीं पंढरपुरचा आरंभ तेराव्या शतकापूर्वी आहे, नंतर नाहीं. यापेक्षां जास्त अनुमान काढणें म्हणजे तर्कशास्त्र सोडणें आहे. पंढरपुरचा आरंभ तेराव्या शतकापूर्वी पांच वर्षे असूं शकेल, किंवा पांचशें वर्षें असूं शकेल. या शिलालेखांतील उल्लेखावरून एवढेंच अनुमान वाजवी आहे कीं, पंढरपुर तेराव्या शतकानंतरचें नव्हे. तें पूर्वी किती आहे याचा निश्चय अन्यप्रमाणांनीं केला पाहिजे; आणि असें प्रमाण उपलब्ध न झालें तरीहि असें अनुमान काढतां येणार नाहीं कीं पंढरपुरचा आरंभ तेराव्या शतकांतच झाला.

पण पंढरपुर तेराव्या शतकाच्या फार पूर्वीपासून आहे असें अनुमान काढण्यास येथील शिलालेखांतील उल्लेखांत आधार आहे. हे शिलालेख रा. जोशी यांनीं सांगितले आहेत, पण त्यांतील शब्दांवरून निघणारें अनुमान काढण्याकडे त्यांनीं कानाडोळा केला आहे. सन १२३७ तील देवळाच्या

खास स्तंभावरील लेख त्यांनीं उल्लेखित केला आहे. पण त्यांतील शब्द अस्पष्ट म्हणोन शेरा मारून त्याविषयीं मुग्धता स्वीकारली आहे. हा पंढरपुर येथील प्रथमचा लेख होय. त्यांतील मजकूर पंडित भगवानलाल इंद्राजी यांनीं सोलापूरच्या गॅझेटीयरमध्यें दिला आहे. त्यांतील अक्षरें कोठें कोठें अस्पष्ट आहेत; पण जी गोष्ट निर्विवाद आहे, ती पंडित भगवानलालनीं दिली आहे, आणि ती रा. जोशी यांनाहि मान्य व माहीत आहे असें दिसतें. ही गोष्ट अशी. हा लेख **देवनागरी** लिपींत संस्कृतांत असून शक ११५९ ( अथवा इ. स. १२३७ ) चा आहे. सोमेश्वर या यादववंशी राजानें हा मुलूख जिंकून भीमरथीच्या तीरीं पंढरिगे **महाग्रामीं** वसती केली असतां **पुंडलीक मुनीला वर देणाऱ्या** श्रीविठ्ठलाच्या पूजेकरितां एक गांव इनाम दिला, असा या लेखाचा इत्यर्थ आहे. यावरून हें स्पष्ट अनुमान निघतें कीं पुंडलीक वरद श्रीविठ्ठलाचा महिमा सन १२३७ च्या पूर्वीचा आहे. हा तेथें नवीनच सुरू झालेला नव्हता. महाग्राम या शब्दावरून पंढरीचा महिमा फार जुना होता असें दिसतें. पंडित भगवानलाल इंद्राजीनें हेंच अनुमान काढलें आहे " This proves that in the 13th century, Vithal was already a god of long standing " रा. जोशी यांना पंढरीचा विठोबा रामानुजाच्या नंतर पाहिजे आहे, अगोदरचा नको आहे. कारण अगोदरचा असेल तर तो अद्वैतमताशीं संबद्ध होईल. म्हणून त्यांनीं या लेखांतील मुख्य माहितीस आपल्या विचारसरणींत थारा दिला नाहीं, व अस्पष्ट लेख आहे असें लिहून उडवाउडवी केली आहे. या लेखांत सांगितलेला हिरिया गांव पंढरपुरापासून पंधरा मैलांवरील पुळुंज गांव असून तेथें एका विहिरींत यादव राजा सिंधण याचा एक लेख आहे, अशी आणखी माहिती पंडित भगवानलालनें दिली आहे.

यानंतरचा शिलालेख पंढरपुरासच आहे तो चौऱ्याशींचा. त्याचा उल्लेख रा. जोशी यांनीं केला आहे पण तो अपुरा आहे. देवाच्या पूजेला आचंद्रार्क दांडे, फुलें, नैवेद्य मिळावा, यासाठीं सर्व देशांत विशेषतः महाराष्ट्र देशांत कोंकणापासून तों पैठणापर्यंत वर्गणी झाली. ती या इ. स. १२७३ च्या शिलालेखांत नमूद आहे. हा शिलालेख रा. राजवाडे यांनीं सविस्तर छापला आहे व त्यांत मुख्यतः हीच गोष्ट मान्य केलेली आहे. यावरून " तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत बरीच चळवळ होऊन पुष्कळ

नवीन गोष्टी झाल्या. अर्थात् सांप्रतचें जें पंढरीचें देवस्थान आहे त्याची **प्रथमची** किंवा **नक्की** स्थापना झाली. लोकांपासून वर्गण्या घेतल्या. राजांकडून इनामें वगैरे घेतलीं. कित्येक धार्मिक अनुष्ठानेंहि झालीं तेव्हां हा पंढरीच्या भक्तीचा मूळारंभ दिसतो. याच्यापूर्वी शेंदोनशें वर्षं येथें कदाचित् विष्णुभक्ति असूं शकेल, पण तिला कायमचें स्वरूप नसावें" अशीं विलक्षण व विरोधी अनुमानें रा. जोशी यांनीं स्वमताला अनुकूळ अशीं दिलीं आहेत. वर्गणीच्या शिलालेखाचा उल्लेख करते वेळीं इ. स. १२७५ च्या सुमारास देवळाच्या **जीर्णोद्धाराचें** काम जारी होतें, असें रा. जोशी स्वतःच म्हणतात. मग शेवटचें अनुमान काढतांना देवस्थानाची **प्रथमची** किंवा नक्की स्थापना झाली, असें कां म्हणतात तें समजत नाहीं. पंढरीच्या भक्तीचा मूळारंभ आतां झाला हें कसें म्हणतां येईल ? सर्वच आश्चर्यकारक होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.

इ. स. १२३७ चा पहिला देवळावरील शिलालेख नीट समजून घेण्याचा प्रयत्न न केल्यामुळें किंवा त्याजकडे कानाडोळा केल्यामुळें तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत बरीच चळवळ काय झाली हें रा. जोशी यांच्या लक्षांत आलें नाहीं. या शिलालेखावरून जी गोष्ट या चळवळीच्या स्वरूपासंबंधें माझ्या नजरेस येते, ती अशी. इ. स. १२३७ त देवगिरीच्या यादवांनीं हा प्रांत कर्नाटकांतील होयसळ यादवांपासून जिंकून आपल्या राज्यास जोडला असा इत्यर्थ पहिल्या लेखाचा आहे. महाराष्ट्राचें एक मोठें पूज्य स्थान इतके दिवस कर्नाटकी लोकांच्या ताब्यांत होतें. अर्थात् त्याजकडे विशेष लक्ष तेथील राजाचें नव्हतें. तें जेव्हां महाराष्ट्राच्या राजाच्या ताब्यांत आलें तेव्हां साहजिकच राजानें त्या क्षेत्रास एक गांव इनाम दिला, राजाधिकाऱ्यानें दुसरा गांव दिला व महाराष्ट्रांतील धार्मिक व धनाढ्य लोकांनीं देवस्थानाच्या पूजेकरितां वर्गणी केली. या वर्गणींत नांवें व गांवें खोदलीं आहेत तीं कोंकणासून पैठणापर्यंत आहेत; म्हणजे महाराष्ट्राच्या व्याप्तीभर आहेत. अर्थात् हा देव सर्व महाराष्ट्राचा यापूर्वीं-पासून असला पाहिजे हें उघड दिसतें. या वेळच्या चळवळीचें हें स्वरूप सहज दिसून येणारें असून तें रा. जोशी यांच्या लक्षांत आलें नाहीं, आणि हा पंढरपूरच्या विठ्ठलभक्तीचा मूळारंभ त्यांनीं कायम केला. पण जर हा देव या वेळीं किंवा यापूर्वीं थोडाच, कर्नाटकांतून येथें आला असता, तर

महाराष्ट्रांतील दूरदूरच्या लोकांत यासंबंधानें चळवळ उडणें शक्यच नव्हतें. सारांश, ही चळवळ नव्या भक्तीच्या आरंभाची असूं शकत नाहीं. हा मुलूख इ. स. १२३७ त यादवांच्या ताब्यांत आला तेव्हां १२७३ म्हणजे केवळ ३६ वर्षांत त्याची सर्व देशभर एवढी प्रसिद्धि होणें शक्य नाहीं. अर्थात् हें स्थान महाराष्ट्रीयांचें पूर्वींचेंच असून तें १२३७ इ. स. पूर्वीं कित्येक वर्षें कर्नाटकी राजांच्या ताब्यांत होतें असें दिसतें, व तें महाराष्ट्र राजाच्या ताब्यांत आल्यावर त्याची लोकांनीं चांगली जोपासना केली हेंच अनुमान योग्य दिसतें.

येथें एका अवांतर मुद्यासंबंधानें थोडक्यांत ऊहापोह केला पाहिजे. पंढरपूरचा प्रांत हा कर्नाटकाचा भाग किंवा महाराष्ट्राचा हा एक मुद्दा येथें उद्भवतो. हा मुलूख महाराष्ट्र व कर्नाटक यांच्या सरहद्दीवर असून याबद्दल वारंवार दोघांमध्यें तंटे होत असत, व कधीं कर्नाटकाच्या तर कधीं महाराष्ट्राच्या ताब्यांत तो असे असें दिसतें. मुसलमानी अमदानींतहि असाच प्रकार राहिला. विजापूर म्हणजे कर्नाटक, व अहमदनगर म्हणजे महाराष्ट्र, येथील बादशहा या प्रांतावरून वारंवार भांडत असत हें प्रसिद्ध आहे. पण हा प्रांत मेहमीं म्हणजे प्रारंभापासून महाराष्ट्राचा ही गोष्ट निर्विवाद दिसते. केसरींत एका विद्वान् लेखकानें गोदावरीपासून दक्षिणेकडे कृष्णेपर्यंतचा मुलुख कर्नाटक होता; व दुर्गादेवीकृत दुष्काळाच्या वेळीं तो मुलुख उजाड पडून महाराष्ट्रीयांनीं तेथें प्रथम वसति केली असा मुद्दा स्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे; पण तो ठीक नाहीं. मराठे आर्योत्पन्न असून त्यांची वस्ती विदर्भांतून गोदावरी—पैठणापर्यंत ज्या प्राचीनकाळीं झाली, त्याचकाळीं किंवा नंतर लवकरच त्यांचा प्रसार कृष्णेपर्यंत झाला असें माझें मत आहे. सारांश हल्लीं जी महाराष्ट्राची व्याप्ति आहे तीच ख्रिस्ती सनापूर्वींपासून आहे. पंढरपूरचा प्रांत पूर्वींपासून महाराष्ट्रीयांचा. अमुक देश अमक्यांचा याचा निर्णायक पुरावा म्हटला म्हणजे तेथील शेतकरी लोक कोण आहेत व कोणती भाषा बोलतात हा मुद्दा होय. हल्लीं मुंबईंत पारशी वगैरे गुजराथी बोलणारांची संख्या मराठी बोलणारांहून अधिक निघूं शकेल. पण मुंबईजवळचे शेतकरी मराठे व मराठी बोलणारे आहेत; यामुळें मुंबई महाराष्ट्रांत आहे असेंच ठरेल. पंढरपुराभोंवतालच्या प्रदेशांतील शेतकरी लोक मराठे असून मराठी भाषा बोलणारे आहेत. तेव्हां

हा प्रांत महाराष्ट्र होय हें निर्विवाद दिसतें. दुर्गादेवी दुष्काळाच्या वेळीं हा मुलूख उजाड पडला आणि मग मराठे येथें येऊन राहिले असा कोठें उल्लेख नाहीं किंवा पुरावा नाहीं. किंबहुना याविरुद्ध पुष्कळ पुरावा सांपडतो. इ. स. १२७३ तील चोऱ्यायशींचाच लेख या दुष्काळापूर्वींचा आहे आणि तो मराठींत आहे. येथील सभोंवतालची लोकभाषा व वस्ती कानडी असती तर हा लेख कानडींत खोदला गेला असता. याशिवाय केसरींतील लेखकास माझें असें उत्तर आहे कीं टालमीनें जी माहिती ख्रिस्तीसनाच्या पहिल्या शतकांत हिंदुस्थानासंबंधानें दिली आहे त्यांत या देशास त्यानें महाराष्ट्र म्हटलें आहे, म्हणजे Ariake अशी संज्ञा दिली आहे. या Ariake चे तीन भाग त्यानें दिले असून ते—उत्तरेकडील घाटावरचे महाराष्ट्र, दक्षिणेकडील महाराष्ट्र व कोकण असे तिन्हीमिळून दिले असून पैठण, तगर व कल्याण ( कोकणचें ) हीं तीन शहरें या Ariake चीं दिलीं आहेत. पैठण गोदावरीच्या उत्तरतीरावर आहे. तगर हें कोणतें हें जरी अद्याप निश्चित नाहीं, तरी तें गोदावरी आणि कृष्णा यांच्या दरम्यान होतें हें निश्चित आहे. सारांश टालमी तसेंच हुएनसंग या प्राचीन परदेशस्थ लोकांच्या माहितीवरून व राजशेखरानें कुंतलासह विदर्भ म्हणजे महाराष्ट्र आहे असें सांगितलें आहे याजवरून, महाराष्ट्राची व्याप्ति कृष्णेपर्यंत पूर्वीपासून आहे. हा प्रांत ज्यावेळीं म्हणजे १२३७ त देवगिरीच्या यादवांनीं कर्नाटकाच्या यादवांपासून घेतला त्यावेळीं कित्येक दिवस तो कर्नाटकाच्या ताब्यांत असल्यानें गांवचें मूळचें पंढरी हें महाराष्ट्र नांव पंढरीगे या कर्नाटकी वेषानें असणें संभवनीय आहे. आणि तसें तें इ. स. १२३७ च्या शिलालेखांत दिसतें. मुंबईचें जसें बॉंबे किंवा शिवचें जसें सायन् असें इंग्रेजी स्वरूप दिसतें तसें हें दिसतें. केसरींतील लेखकानें मराठी भाषेंत किंबहुना ज्ञानेश्वरींत कर्नाटकी शब्द सांपडतात याजवर बराच जोर दिला आहे, पण ही गोष्ट उलट त्याजविरुद्ध जाते असेंच म्हटलें पाहिजे. कोणत्याहि मुलुखावर परराज्य असलें म्हणजे त्यांतील कित्येक शब्द त्या भाषेंत घुसतात. किंबहुना राज्य नसलें तरी परदेशांशीं वारंवार दळणवळण असेल तरी परकी शब्द येतात. एखाद्या भाषेंत असे जुजबी परकी शब्द असल्यानें हेंच सिद्ध होईल कीं त्या परकी लोकांचें राज्य तरी तेथें असावें किंवा त्यांशीं दळणवळण असावें. पण तेथील रहिवाशीच मूळ परकी होते असें कधीं सिद्ध

होणार नाहीं. भाषेवरून जर कांहीं अनुमान काढावयाचें असेल तर तें भाषेच्या मुख्य स्वरूपावरून म्हणजे व्याकरण, वाक्यरचना इत्यादि गोष्टींवरून काढलें पाहिजे. सारांश, मराठींत पांचपन्नास कानडी शब्द आहेत किंवा पंढरीला पंढरीगे असें स्वरूप आलें आहे त्याजवरून महाराष्ट्रांत प्राचीन काळीं कर्नाटकी लोकांची वस्ती होती किंवा पंढरपुर प्रांत कर्नाटक होता असें सिद्ध सागतां येणार नाहीं. येथील लोकांच्या भाषेच्या व्याकरणावरून व प्रकृतीवरून ही भूमि प्राचीन काळापासून मराठ्यांची होय असेंच अनुमान निघतें.

तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत पंढरपुर येथें जी चळवळ झाली, ती पंढरपुर येथें विष्णुभक्तीची प्रथम स्थापना नसून केवळ जीर्णोद्धार स्वरूपाची होती, हें १२७३ तील चौऱ्यायशींच्या लेखावरून स्पष्ट आहे. पंढरपुरास जी विठोबाची भक्ति होती ती या वेळीं नव्यानें सुरू झाली आणि ती रामानुजाच्या प्रयत्नानें किंवा त्याच्या मताच्या प्रसारानें झाली असें दाखविण्याचा रा. जोशी यांनीं केलेला प्रयत्न चुकीचा आहे हें अन्य रीतीनेंहि दाखवितां येईल. रामानुजाच्या वैष्णव मताच्या स्वरूपामध्यें आणि पंढरपुरच्या विष्णुभक्तीच्या स्वरूपामध्यें जमीनअस्मानाचें अंतर आहे. पंढरीच्या विठोबाची भक्ति पुंडलिकानें सुरू केली हें सर्वांस मान्य आहे. १२३७ इ. स. तील शिलालेखांतहि तेंच आहे. हा पुंडलिक बाराशें सदतीसच्या किती पूर्वीं होता हें नक्की जरी सांगतां येत नाहीं तरी तो बराच पूर्वीं होता हें उघड दिसतें. तो रामानुजानंतरचा खास नव्हे. कारण रामानुजाच्या वैष्णवभक्तीचें स्वरूप फार भिन्न आहे. रामानुजाच्या मतास श्रीवैष्णव मत म्हणतात. त्यांत सोंवळ्याचें बंड अति आहे. विष्णु लक्ष्मीशिवाय त्यांत दिसावयाचा नाहीं. देवास शूद्रादि स्पर्श करणार नाहींत, इतकेंच नव्हे, तर ब्राह्मणहि सोवळ्याशिवाय गाभाऱ्याच्या आंत जावयाचे नाहींत. अशी कडकडीत वैष्णवभक्ति ज्या रामानुजाच्या मतांत आहे त्या मताचा पंढरीचा विठोबा खास नाहीं. कर्नाटकांत कोणत्याहि ठिकाणीं अशी वैष्णवभक्ति नाहीं. येथें केवळ अतिशूद्राखेरीज सर्वच लोक खास विष्णूच्या पायाशीं जातात आणि त्यास आलिंगन देतात. महाराष्ट्रांत जसे मराठे—ब्राह्मण एकमतानें फारसा भेद न मानतां व्यवहारांत वागतात, तसेंच विठोबाच्या भक्ति व पूजेसंबंधानें वागतात. महाराष्ट्रांतील

वैष्णवभक्तीचें स्वरूप कर्नाटकांतील किंवा एकंदर रामानुजमताच्या स्वरूपाहून फार भिन्न आहे, हें देवाच्या स्वरूपावरूनहि निश्चित होतें. विठोबाच्या डोक्यावर शिवलिंगाचें चिन्ह आहे, ही गोष्ट सर्वतो मान्य आहे. किंबहुना याचा उल्लेख भक्तांच्या अभंगांतहि आहे. प्रसिद्ध ह. भ. विष्णुबोवा जोग यांनीं मला जुन्या अभंगाचा एक आधार याबद्दल काढून दिला तो येथें देतों.

**" रूप पाहता तरी डोळसु । सुंदर पाहतां गोपवेषु ।**
**महिमा वर्णितां महेशु । जेणे मस्तकीं वाह्य ॥**
**भक्तिसुखें लाचावला । जाऊं नेदी उभा केला ॥**
**निवृत्तीदास म्हणे विठ्ठला । जन्मोजन्मीं न विसंबें ॥**

असें स्वरूप रामानुजाच्या मतावरून कधींहि निष्पन्न होऊं शकणार नाहीं. हें स्वरूप स्मार्तमतालाच धरून आहे. शिवविष्णूचा जेथें तंटा माजला नाहीं अशा ठिकाणचेंच हें स्वरूप आहे. महाराष्ट्रीयांत शिवविष्णूचा तंटा मुळींच नाहीं. येथील लोक बहुश: स्मार्त आहेत. येथें मराठे–ब्राह्मण यांचा सोंवळयाओवळयाचा फारसा तंटा नाहीं. येथें मराठे–ब्राह्मणांत तें अंतर नाहीं, जें कृष्णेच्या दक्षिणेस ब्राह्मण व इतर वर्गांत दिसतें. सारांश; स्मार्तमताच्या, शिव–विष्णु–भेद–कल्पनेनें उत्पन्न होणाऱ्या असूयेनें विरहित असलेल्या, ब्राह्मण, क्षत्रिय, शिंपी, माळी इत्यादि सर्व वर्गांस सामान्यत: समान मानणाऱ्या, महाराष्ट्रीयांचाच हा देव आहे. हा कर्नाटकांतून आलेला नाहीं. रामानुजाच्या मताचा नाहीं. किंबहुना ठिकठिकाणीं शालिग्रामपूजेचा आदरानें उल्लेख करणाऱ्या शंकराचार्यांच्या मताला धरून असणारा हा देव आहे असेंच म्हणतां येईल.

पांडुरंग म्हणजे शंकर असें हेमचंद्र म्हणतो. या एवढ्या आधारावर रा. जोशी यांनीं एक कल्पित व्यूह रचला आहे. हें पूर्वीं शंकराचें **प्रख्यात** स्थान होतें, तें मोडकळीस आलें, तेव्हां पुंडलिकानें विष्णूची स्थापना केली आणि या गोष्टीची पूर्णता तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत झाली, असें पान १२८ वर रा. जोशी म्हणतात. पण हें **प्रख्यात** शिवाचें क्षेत्र होतें, याला दुसरा कांहीं पुरावा ? शिलालेख पाहिजे आहे, पण तो नसेल तर दंतकथा एखादी ? पुंडलिक स्मार्त होता हें त्याचें देऊळ शिवालय आहे

यावरून उघड आहे. शिवाचा एक नंदी पंढरपुरच्या विठ्ठलाच्या देवळा-जवळ सांपडतो याचेंहि तात्पर्य हेंच आहे व विठोबाच्या खास डोक्या-वर शिवलिंग आहे. शिवाय शिलालेखांत " पंढरीगे " व " पौंडरी कपुरे " अशीं नांवें आहेत, पांडुरंगपुर असें नांव नाहीं. जमीन पांढरी असल्यामुळें 'पंढरपुर' या कल्पनेंत अर्थ कांहींच नाहीं असें रा. जोशी म्हणतात, पण कां तें समजत नाहीं. पौंडरीकपुर हें नांव पौंडरीक किंवा पुंडलीक याजवरून असावें. येथें कांहीं शिवालयाचीं चिन्हें दिसतात असें जोशी म्हणतात, पण तीं कोणतीं हें त्यांनीं सांगितलें नाहीं. सारांश, हें जुनें शिवक्षेत्र होतें या म्हणण्याला शिलालेखाचा, दंतकथेचा, किंवा नांवाचा आधार नाहीं. ही कल्पना तेराव्या शतकांत विष्णुभक्तीला आरंभ झाला, या कल्पनेला केवळ जोड देण्यासाठीं उत्पन्न केलेली आहे. शिवाय पांडुरंग हें विठोबाचें नांव शंकराच्या नांवावरून पुढें पडणें शक्य नाहीं हें निराळेंच. तें नांव विरुद्ध लक्षणेनें विठ्ठलाचें असूं शकेल.

आतां आपण पुढील एका विलक्षण विधानाकडे वळूं. किंबहुना हें विधान रा. जोशी यांच्या लेखाची किल्ली आहे. तिच्यावरून सर्व लेखाला सध्याचें स्वरूप कां आलें आहे तें कळेल. भागवतधर्माचा इतिहास सांगतां सांगतां, रा. जोशी (पान १२९) म्हणतात. "अशा रीतीनें वासुदेव कृष्णाचा वैष्णव धर्म आपल्या देशांत चालू होता; आणि त्या योगानें भगवंताच्या भक्तीचें साम्राज्य चालू होतें. परंतु इ. स. आठव्या शतकांत त्याला विघ्न उत्पन्न झालें. त्या वेळीं शंकराचार्यांनीं आपलें अद्वैत मत स्थापन केलें. या मताप्रमाणें सर्व संसारमायेचा पसारा आहे. अर्थात् भग-वंत आणि त्याचा भक्त असा भेद रहात नाहीं. शंकराचार्यांचें मत पुढें अप्रियच होत चाललें. वैष्णवभक्तीचे जे निरनिराळे पंथ आहेत त्यांचे संस्थापक आचार्य आहेत. तसेंच त्या मताची आचार्यपरंपरा चालू आहे. पंढरीच्या पंथाचे ग्रंथ नाहींत आणि आचार्यपरंपरा नाहीं. वारकरीपंथाचे आचार्य म्हटलें तर नामदेव, एकनाथ आणि तुकाराम आणि ग्रंथ नाम-देवाचे व तुकारामाचे अभंग. त्यांत तात्विक विचारांचें फारसें महात्म्य नसून मुख्य भिस्त भगवद्भक्तीवर आहे आणि यामुळें मतभेदाचे वाद नाहींत." या उताऱ्यावरून रा. जोशी यांनीं शांकरमतासंबंधें व वारकरी पंथासंबंधें जीं विधानें केलीं आहेत त्यांचा रोख लक्षांत येईल. तीं विधानें वाचन

बहुतेक महाराष्ट्रीयांस आश्चर्य वाटेल आणि ज्या वारकरीपंथासंबंधानें बोलण्याचा जोशी यांनीं आव घातला आहे, त्यांतील प्रत्येकास सखेदाश्चर्य वाटेल. शांकर मत अद्वैत मत असल्यानें भक्तीमार्गाच्या आड येतें हा नवीन अजबच शोध आहे. तो वारकऱ्यांना तरी ठाऊक नाहीं. दुसरें वारकरीपंथाचा पहिला ग्रंथ म्हटला म्हणजे ज्ञानेश्वरी, तो अद्वैत–शांकरमतानुयायी असल्यानें रा. जोशी यांनीं बिलकुल गाळला आहे. पण आपल्याकडील पंढरीचा पंथ ( जोशीहि हें कबूल करतात ) ज्ञानेश्वरीला अग्रस्थान देतो. जो ज्ञानेश्वरीला मानीत नाहीं तो वारकरीच नव्हे असें म्हटलें तरी चालेल. ही गोष्ट मी बाहेरून रा. जोशी याप्रमाणें स्वकपोलकल्पनेनें लिहीत नाहीं, तर वारकरी पंथाचे एक हल्लींचे अग्रणी पूज्य विष्णुबोवा जोग यांस विचारून लिहीत आहें. वारकरी पंथाला ज्ञानेश्वरी मान्य आहे, किंबहुना हजारों वारकऱ्यांना ज्ञानेश्वरी मुखोद्गत असते. ज्ञानेश्वरीला मागें सारून नामदेवतुकारामांच्या अभंगांस पुढें करणें हा प्रार्थनासमाजी लपंडाव आहे. तुकारामाला खुद्द ज्ञानेश्वरी अत्यंत मान्य व पूज्य होती. एकनाथाला तर होतीच. आपल्या महाराष्ट्रांतील वैष्णवभक्तीचा हाच विशेष आहे कीं, ती अद्वैतमताला धरून आहे. आपल्या इकडील यच्चयावत् साधु अद्वैतमताचे आहेत. " तुकाराम म्हातारपणीं अद्वैती बनला. असलीं मतें विद्वन्मणींनीं काढलीं आहेत परंतु त्यांत अगदीं अर्थ नाहीं " असें रा. जोशी लिहितात. पण हें केवळ स्वमतविधान आहे. " त्यांत अगदीं अर्थ नाहीं " असें ठासून सांगितलें म्हणजे कार्यभाग होत नव्हतो. असो, या वादांत मी पडत नाहीं. मीहि असें मत ठासून सांगतों कीं, एकनाथ, तुकाराम, ( नामदेव सुद्धां ) वगैरे सर्व महाराष्ट्र साधु अद्वैती होते आणि महाराष्ट्रांतील पंढरीच्या वैष्णवभक्तीचा विशेष कांहीं असेल तर तो हाच कीं ही भक्ति अद्वैत तत्वज्ञानास धरून आहे; आणि शिवविष्णूचा अभेद मानणारी आहे. सारांश, ऐतिहासिक दृष्ट्या बोलावयाचें तर तिचा राजानुजमताशीं कांहीं संबंध नाहीं. शांकरमताच्याहि ती पूर्वींची असूं शकेल; पण शांकरमतानंतरची असल्यासहि कांहीं आश्चर्य नाहीं. कारण तिजवर त्याच मताची छाप आहे. म्हणजे ती भक्ति इ. स. ११०० च्या फार पूर्वींची आहे. हीच गोष्ट शिलालेखांतील उल्लेखाचा प्रारंभीं जो विचार केला आहे त्याशीं जुळून आहे.

ज्ञानेश्वरीला वारकरीपंथाच्या ग्रंथांतून वगळावयाचा रा. जोशी यांचा गर्भित प्रयत्न नसून उघड आहे. विठ्ठलभक्तीचे मूळ प्रवर्तक कोण? या सद्राखालीं पान १२९ वर ते म्हणतात, (विठोबाच्या भक्तीची सुरवात पुंडलीकानें केली, हें सर्वमान्य आहे. त्याच्यानंतर ऐतिहासिक व्यक्ति या बाबतींत ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ व तुकाराम. असें म्हणून पुढें रा. जोशी लिहितात.) "ज्ञानेश्वरीचा कर्ता ज्ञानदेव विठ्ठलभक्तीचा प्रवर्तक असेल असें वाटत नाहीं. त्याच्या ज्ञानेश्वरीग्रंथांत विठोबाचा संबंध नाहीं. त्या ग्रंथांतील प्रतिपादन अद्वैतमताला धरून आहे. त्याच्या वेळीं पंढरीचा विठोबा प्रख्यात नव्हता. आणि तेथील देवस्थानाच्या माहात्म्यास आरंभहि झाला नव्हता." ही चुकीची एकापेक्षां एक चढती कमान आहे असें म्हटल्यावांचून रहावत नाहीं. ज्ञानेश्वरींत विठोबाचा संबंध नाहीं या म्हणण्यापासून निष्पन्न काय? ज्ञानेश्वरी भगवद्गीतेची टीका आहे, तींत विठोबाचा संबंध न आला तर आश्चर्य नाहीं. तींत उज्जनीचा महाकाळेश्वर नाहीं म्हणून ज्ञानेश्वर–कालीं महाकालेश्वर नव्हता असें म्हणावयाचें कीं काय? विधानाचा अभाव हें भुरळ पडणारें प्रमाण मोठ्या विद्वानांना सुद्धां चकवतें. पण विधान आलेंच पाहिजे असें असेल तरच विधान नसणें यापासून कांहीं अनुमान निघूं शकेल, हें नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे. भगवद्गीतेचा एखादा श्लोक जर ज्ञानेश्वरींत नसेल तर असें कदाचित् म्हणतां येईल कीं हा श्लोक ज्ञानेश्वरकालीं गीतेंत नव्हता. कारण ज्ञानेश्वरी भगवद्गीतेवरील टीका आहे. पण गीतेवरील टीकेंत विठोबाचें नांव आलेंच पाहिजे असें मुळींच नाहीं. तेव्हां तें नाहीं आलें यावरून कांहींच अनुमान निघूं शकत नाहीं. दुसरें प्रमाण पुढें दिलें आहे तें असें. ज्ञानेश्वरी अद्वैत मतवादी आहे म्हणूनच ती विठ्ठलभक्तीची एक प्रवर्तक नव्हे. याला उत्तर एवढेंच कीं म्हणूनच ती विठ्ठभक्तीच्या प्रवर्तकांत आहे. विठ्ठलभक्ति अद्वैत मताला धरून आहे; द्वैत मताला नाहीं. आतां तिसऱ्या प्रमाणाकडे वळूं. "ज्ञानेश्वरकालीं पंढरीचा विठोबा प्रख्यात नव्हता व देवस्थानाच्या माहात्म्यास आरंभहि झाला नव्हता." हें म्हणणें रा. जोशी यांनीं स्वतः ज्या तारखा दिल्या आहेत त्यांवरूनच खोटें ठरतें. सन १२३७ चा पहिला शिलालेख, सन १२४९ मध्यें पौंडरीक–पुरांतील विष्णु देवाला एक ग्राम दिल्याबद्दलचा ताम्रपट आणि सन १२७३ ते ७५

पर्यंत कोकणापासून पैठण-देवगिरीपर्यंत हेमाडपंतासुद्धां लोकांनीं वर्गण्या केल्याबद्दलचा चौऱ्याशीचा लेख याजवरून रा. जोशी खुद्द पा. १२८ वर लिहून चुकले कीं " तेराव्या शतकाच्या उत्तरार्धांत बरीच चळवळ उडून पंढरपुरच्या देवस्थानाची प्रथमची किंवा पक्की स्थापना झाली." मग ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरी 'शक' बाराशें बारोत्तरें म्हणजे इ. स. १२९० त लिहिली म्हणजे पंढरीचें महात्म्य महाराष्ट्रभर रा. जोशी यांच्या मताप्रमाणें प्रकट झाल्यावरच लिहिली. असें असून ज्ञानेश्वरीचे वेळीं विठोबाच्या देवस्थानाचा आरंभ नव्हता असें रा. जोशी धडधडीत स्वतः दिलेल्या आकड्यांच्या व माहितीच्या विरुद्ध लिहितात हें आश्चर्य नव्हे काय ? तात्पर्य येथें हा मूळ पायाच चुकला आहे तेव्हां, "ज्ञानेश्वर देवगडाकडे होता, तो मेल्यावर तेथें मुसलमानी झाल्यानें त्याच्या पंथाचे लोक आळंदीस आले आणि नंतर त्यांतील कोणी एकानें ज्ञानदेवाच्या नांवानें अभंग विठोबाच्या भक्तीवर केले," ही कल्पना चूक आहे यांत संशय नको. पण या कल्पनेंत एक आणखी चूक आहे. मूळचा ज्ञानेश्वर जर अद्वैती तर त्याच्या पंथांतील पुढचा एखादा ज्ञानदेव द्वैती कसा असूं शकेल ? विठ्ठल-भक्ति द्वैतवादाला अनुसरून असेल असाच सिद्धांत बनवावयाचा तर ज्ञानेश्वरीकार ज्ञानदेव व अभंगकार ज्ञानदेव अगदीं भिन्न मानले पाहिजेत. एक पंथाचे सुद्धां उपयोगी नाहींत. तात्पर्य प्रचलित सर्व वारकऱ्यांच्या समजुतीविरुद्ध असलेला हा किंवा इतर सिद्धांत मान्य करण्यासारखा नाहीं एवढें म्हणणें पुरें आहे.

यापुढें विठोबाच्या मूर्तीचें जें वर्णन दिलें आहे त्याजवरून निघणारीं अनुमानें रा. जोशी यांनीं काढलीं नाहींत. विठोबाची मूर्ति जैन किंवा बौद्ध नाहीं हें तर निर्विवाद आहे, पण अशी विष्णूची मूर्ति इतरत्र कोठें नाहीं. " फक्त उत्तरेस भेलशाजवळ एका ब्राह्मणी कोरीव लेण्यांत अशा दोन मूर्ति आहेत " यांजवरून हें अनुमान निघण्यासारखें आहे कीं हा देव कानडी नसून उत्तरेकडील आर्य लोकांच्याच सांप्रदायाचा आहे. दुसरे शिल्पशास्त्रज्ञांच्या मतावरून ही मूर्ति दहाव्या शतकांतील आहे असें रा. जोशी लिहितात. पंडित भगवानलाल इंद्राजी यानें याहून प्राचीनकाळ दिला आहे. " The general workmanship of the image is earlier than the Rajput style of A. D. 943-1240 and a little later than the Guptas and therefore is not later than the 6th centu-

ry. This form of the image represents Vishnu only in the form of Hari. There are only two images of this kind in the Udayagiri Brahmanical cave near Bhelsa " या उताऱ्यावरून रा. जोशी यांनीं दिलेली माहिती येथूनच घेतली आहे असें दिसतें. मग मूर्ति दहाव्या शतकांतील असल्याबद्दलचें मत त्यांनीं कोठून उद्धृत केलें आहे तें समजत नाहीं. तेंहि घेतलें तरी पंढरीचें स्थान दहाव्या शतकापर्यंत मागें जाऊं शकतें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. तिसरी गोष्ट रुक्मिणीची मूर्ति पुष्कळ अलीकडची आहे असें पंडित भगवानलाल यांनीं लिहिलें आहे. ती कर्नाटकी तऱ्हेची आहे असेंहि त्यांनीं नमुद केलें आहे. याजवरून हें अनुमान निघतें कीं रुक्मिणीला सोडून विठोबाची भक्ति, ही महाराष्ट्रांतील फार जुनी आहे. ती कर्नाटकांतून आली नाहीं. कर्नाटकांत लक्ष्मीशिवाय विष्णु नाहीं यामुळें ही रुक्मिणीची निराळया देवळांत स्थापना मागून झाली आहे. पंडित भगवानलालच्या मतें ती १६ व्या शतकांतील आहे. असो, ही मूर्ति विजयानगरच्या राजानें येथोन नेली, ती एकनाथाच्या पणजानें परत आणली ही ऐतिहासिक गोष्ट मान्य करण्यासारखी असून, ह्याहि कथेचा विपर्यास करून रा. जोशी एक भलताच तर्क करतात कीं कदाचित् ही मूर्ति विजयानगरच्या राजांनीं मिळविलेली असेल; आणि भानुदास तिकडे गेला असतां त्यास हें विष्णचें ध्यान आवडलें म्हणोन त्यानें ती तिकडून पंढरपुरास प्रथम आणली असेल. रा. जोशी आपणच दिलेल्या तारखा वारंवार विसरतात आणि चमत्कारिक तर्क करीत बसतात याचें हें आणखी उदाहरण आहे. इ. स. १२३७–इ. स. १२४९, इ. स. १२७३ हीं सालें पंढरपुरच्या शिलालेखाचीं–ताम्रपटाचीं–वर्गणीच्या शिलालेखाचीं–आहेत. यावेळीं जीर्णोद्धार नसून विठोबाच्या भक्तीस सुरवात झाली असें रा. जोशी यांनीं पान १२८ वर लिहिल्याप्रमाणेंच आपण मानूं. पण विजयानगरची स्थापना याहि नंतरची. मग ही मूर्ति विजयानगरच्या राजांनीं कोठें तरी संपादन केली आणि भानुदासांना तें ध्यान आवडलें म्हणून त्या बलाढ्य राजापासून केवळ मागून त्यास मिळाली हा तर्क वेडा नव्हे काय ? यापेक्षां या कालानंतर स्थापन झालेल्या विजयानगरच्या एका राजानें ही मूर्ति त्यास आवडली म्हणून जबरदस्तीनें पंढरपुराहून नेली व ती मूर्ति आमची म्हणून आम्हांस परत दिली पाहिजे असा महाराष्ट्रीय संत भानुदास यानें आग्रह धरल्यामुळें

राजानें त्यास परत दिली, ही महिपतीनें दिलेली आख्यायिकाच इतिहासां-तील तारखांना व तर्काला जास्त धरून आहे असें कोणीहि कबूल करील. सारांश मूर्ति कर्नाटकांत प्रथम होती असें दाखविण्याचा प्रत्येक प्रयत्न रा. जोशी यांचा फुकट आहे, असें स्पष्ट ठरतें. " मूर्ति कर्नाटकांतून कोणी तरी आणलेली असेल " असें शेवटीं रा. जोशी विधान करतात. पण हाच मुख्य प्रश्न ते कां टाळतात हें समजत नाहीं. ही मूर्ति कर्नाटकी तऱ्हेची नाहीं. ही इकडूनच तेथें गेली असली पाहिजे हें अनुमान चुकत नाहीं. ज्ञानदेवांनीं आपल्या अभंगांत देव **कानडी** आहे असें एके ठिकाणीं म्हटलें आहे असें जोशी एक प्रमाण ( पा. १२८ ) पुढें करतात, तें तर वारकरी पंथाच्या लोकांस हसूं आणण्यासारखें आहे असें म्हटल्यास चालेल. हा देव **कानडा** आहे या म्हणण्याचा सांप्रदायसंमत अर्थ, हा देव समज-ण्यास कठिण आहे, असा आहे. ह. भ. परायण विष्णुबोवा जोग यांनीं तोच अर्थ सांगितला; व " श्रुतीशीं जो कानडा " वगैरे वचनें आधारास दिलीं. ज्ञानेश्वर महाराजांनीं या अर्थी हा शब्द ज्ञानेश्वरींत वापरल्याचें आणखी समग्र ओळीचें उदाहरण विष्णुबुवांनीं कळविलें तें असें

" **अवतरली गाडग्या घटा । पृथ्वी अनोळखी झाली मूढा ।**
**वन्ही झाला कानडा । दीपत्वासाठीं ॥** "

कानडा या शब्दाचा अर्थ लबाड असाहि होऊं शकेल असें म्हणतां येतें. " कानडा गोविंद " असें एक पद ऐकिल्याचें मला स्मरतें व त्यांत हा अर्थ आहे. प्रत्येक जातीचे कांहीं विशिष्ट दुर्गुण लोकप्रवादांत ठरलेले असतात व त्याप्रमाणें जातिवाचक शब्द मराठींत त्या गुणार्थी वापरतात. कोंकणस्थ म्हटला म्हणजे चिक्कू असा लोकप्रवाद आहे. " पक्का कोंकणस्थ आहे " असें कोठें म्हटलें असेल तर तेथें जात विवक्षित नाहीं तर एक धर्म विवक्षित आहे. तेलंगा म्हटला म्हणजे जबरदस्तीनें आंत घुसून मागणारा, असा आपण वारंवार उपयोग करतों. तसाच कानडा म्हणजे लबाड असा प्रवाद दिसतो. पण या अर्थापेक्षां विष्णुबोवा जोग यांनीं सांगितलेला अर्थ विशेष मान्य करण्याजोगा आहे. कोणी कानडी भाषा बोलूं लागलें म्हणजे आपल्यास कांहीं समजत नाहीं. यामुळें जो समज-ण्यास कठिण तो कानडा असा प्रयोग होऊं लागला असावा. महाराष्ट्रीयांचें व कानड्यांचें हें दळणवळण कांहीं आजचें नाहीं; हजारों वर्षांचें आहे.

तेव्हां ज्ञानदेवानें विठ्ठलास कानडा ( अभंगांत शब्द **कानडा** आहे **कानडी** नाहीं असें वाटतें. कानडी शब्दानें देशाचा बोध होणें शक्य आहे. पण कानडा शब्दानें लोकांचा किंवा त्यांच्या गुणाचा बोध होतो. ) म्हटल्याचें आश्चर्य नाहीं. अमुक देशांतला हा देव आहे अशा अर्थानें त्यांनीं शब्द वापरलेला नसावा. कोणत्याहि देशांतला देव कां असेना तो भक्तांस सारखाच पूज्य आहे. देवाचा देश त्यांना कधींहि विवक्षित असूं शकत नाहीं. ऐतिहासिक दृष्टि त्यांना नको होती व नव्हती. (ही वस्त्रमूल्याची अरसिक चिंता आमची अलीकडील आहे. यासाठीं वारकरीपंथाचे लोक जरी या वादांत पडणारे नाहींत तरी ती चिंता आमच्यासारख्या अरसिक ऐतिहासिकांस केली पाहिजे, आणि म्हणून ती आम्ही करीत आहों.) तात्पर्य एकंदर विवेचनावरून विठोबा हा देव आमचा महाराष्ट्रीयांचा आहे असें ऐतिहासिक दृष्ट्या स्पष्ट ठरतें.



# समुद्रयाननिषेध.

द्विजांनीं समुद्रांतून परदेशास जाऊं नये, या समजुतीला काय आधार आहे हें पाहूं गेलें असतां खालीं दिलेलें कलिवर्ज्य वचन पुढें उभें राहतें. "द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्यापि संग्रहः॥." सामान्य दृष्टीनें या वचनाचा अर्थ असा दिसतो कीं, द्विज-म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय वैश्य—हे समुद्रांत, नावेंत बसून गेले असतां त्यांनीं प्रायश्चित्त घेतल्यावर त्यांचा संग्रह—म्हणजे त्यांशीं जातींतील व्यवहार—कलींत वर्ज्य आहे (वर्ज्य आहे हें पुढील संदर्भावरून घ्यावयाचें ). हा सामान्य दृष्टीला दिसणारा अर्थ चुकीचा असला पाहिजे असें प्रत्येक विचारी मनुष्यास वाटल्यावांचून राहणार नाहीं. नौकेंत बसून समुद्रांतून जाणें पातक असेल,—म्हणजे आपल्या नित्यकर्मांचा कांहीं ना कांहीं लोप होतो यामुळें हें पातक मानिलें असेल, हें आपल्या समजुतीला येईल. पण केवळ नौकेंत बसून समुद्रांत जाणें यांत असें कोणतें घोर पातक आहे कीं तद्विषयक प्रायश्चित्त घेतलें असतां शुद्ध झालेला मनुष्य व्यवहार्य होत नाहीं ? हें विचारी मनुष्याच्या लक्षांत येत नाहीं. कलिवर्ज्य वचनें हीं ऋषींचीं वचनें नाहींत हें खरें. पण तीं जरी स्मृतिवचनें नाहींत, पुराणवचनें आहेत, तरी त्या वचनांतील नियम विद्वान मनुष्यांनीं घालून दिलेले आहेत, अज्ञांनीं नाहींत. तेव्हां वरून दिसणाऱ्या अर्थाहून वरील वचनाचा कांहीं तरी निराळा अर्थ असला पाहिजे असें कोणाहि प्रांजल बुद्धीनें विचार करणाऱ्या मनुष्यास वाटल्यावांचून राहत नाहीं. कारण नौकेंत बसून समुद्रांतून जाणें हें ब्रह्महत्या, सुरापान, गुरुतल्पगमन यांसारख्या घोर पातकांच्या कोटींत आपल्या समंजस व विद्वान् पूर्वजांनीं नेऊन बसविलें असेल हें संभवत नाहीं.

वरील वचनाचा खरा अर्थ सामान्यदृष्टीला दिसणाऱ्या अर्थाहून भिन्न आहे हें खालील विवेचनावरून दिसून येईल. या वचनांतील 'नौयातृ' हा शब्द 'ताच्छील्यार्थी तृनन्त' असून त्याचा वास्तविक अर्थ नौकेनें एखादे वेळीं जाणारा असा नाहीं, तर नौकेनें नेहमीं जाणारा किंवा नौकेनें जाण्याचा धंदा करणारा असा आहे. तृच् व तृन् असे दोन प्रत्यय पाणिनीनें सांगितले असून त्यांजपासून होणारीं धातुसाधित रूपें सारखींच होतात, यामुळें हा भ्रम उत्पन्न होतो. 'या' धातूपासून 'तृच्' व तृन्' असे

निरनिराळे प्रत्यय होऊन यातृ असें एकच रूप उत्पन्न होतें. मात्र दोन्ही प्रत्ययांचा अर्थ एक नसल्यामुळें यातृ या शब्दाचा अर्थ निरनिराळा होतो म्हणजे कधीं नुसता " जाणारा " असा होतो, व कधीं "नेहमीं जाणारा" किंवा " जाण्याचा धंदा करणारा " असा अर्थ होतो. वरील वचनांतील, " नौयातृ " या पदाचा अर्थ "नौकेनें जाण्याचा धंदा करणारा" असा आहे. यामुळें एखादे वेळीं प्रसंगोपात्त उतारूच्या नात्यानें समुद्रांतून जाणाऱ्या द्विजास प्रायश्चित्तोत्तर जातींत घेऊं नये असें वरील वचनावरून निघत नाहीं, व तसा त्याचा आशय नाहीं.

वरील वचनाचा हा अर्थ मीं केलेला नसून मोठमोठ्या विद्वान शास्त्री लोकांच्या संमतीनें श्रीमद्‌जगद्गुरु शंकराचार्य संकेश्वर मठाधिपति यांच्या अनुशासनावरून कायम केला गेला आहे. रा. रा. गणेशशास्त्री गोळवलकर इंदूर संस्थानांतील एक सुभे, सरकारी कामाकरितां विलायतेस गेले होते. ते परत आल्यावर त्यांनीं प्रायश्चित्त घेतलें. त्यांस पंक्तींत घ्यावें किंवा नाहीं हा प्रश्न गोळवलकर दक्षिणी ब्राह्मण असल्यानें संकेश्वर मठाकडे गेला. कारण, महाराष्ट्र व तद्देशस्थ लोक यांजवर संकेश्वर मठाचा अधिकार आहे, ही गोष्ट सर्वमान्य आहे. श्रीनीं जें अनुशासन दिलें त्यांत सदरहू वचनाचा वरप्रमाणें अर्थ त्या वेळेस केला गेला, त्याचे संमत्यर्थ ज्या ज्या काशीस्थ व इतर ठिकाणच्या प्रसिद्ध विद्वानांनीं सह्या केल्या आहेत त्यांचीं नांवें परिशिष्टांत दिलीं आहेत.

याच प्रकारचें संग्राह्यत्व सिद्ध करणारें दुसरें अनुशासन नुकतेंच मुंबईतील एका वणिग्जातीय गृहस्थाच्या प्रायश्चित्तासंबंधानें द्वारकाधीश मठाकडून सादर झालें आहे तें प्रसिद्धच आहे. सारांश, मुंबई इलाख्यांतील महाराष्ट्र व गुजराथ या प्रांतांतील धर्माधिकाऱ्यांनीं या प्रश्नाचा वर दर्शविल्याप्रमाणें निकाल केला आहे. तेव्हां आतां या प्रश्नावर निराळा लेख लिहिण्याची आवश्यकता काय, असा प्रश्न सहाजिक उत्पन्न होतो. पण अशा लेखाची उपयुक्तता दोन तीन तऱ्हेनें आहे. एक तर असा निर्णय झाल्याचें पुष्कळ लोकांस माहीत नाहीं, तेव्हां तो निर्णय पुन्हा लोकांपुढें मांडणें फायदेशीर होणार आहे. दुसरें, ह्या निर्णयांत दाखविल्याप्रमाणें ' द्विजस्याब्धौ तु नौयातुः ' हें कलिवर्ज्य वचन केवळ नौकेचा धंदा करणाऱ्या लोकांस लागतें, इतरांस नाहीं, हें माहीत नसल्यामुळें कित्येक धर्माभिमानी लोकांस

असें म्हणावें लागत आहे कीं, अग्निहोत्र व संन्यास जसे कलिवर्ज्य असूनहि शंकराचार्यांनीं पुन्हा सुरू केले, तसेंच हें कलिवर्ज्य वचन शंकराचार्यांनीं रद्द करावें, किंवा आपद्धर्म म्हणून लोकांनीं ह्या वचनाच्या विरुद्ध आचरण करावें. वरील वचनाचा खरा अर्थ माहित असता तर अशा प्रकारानें त्याची व्यवस्था लावण्याची जरूरी पडली नसती. तिसरें, या दोन्ही वर्गांच्या लोकांहून अधिक समुदायाचा असा एक वर्ग आहे कीं, त्यास दोन शंकाराचार्यांनीं दिलेला हा ठराव मान्य नाहीं. त्यांच्या मतें व्याकरणशास्त्राच्या जोरावर हा केलेला अर्थाचा लपंडाव आहे; व खरा शास्त्रार्थ व पूर्वीपासूनचा व्यवहार समुद्रयानाच्या विरुद्ध आहे. या तिसऱ्या वर्गाच्या सर्व लोकांचें जरी समाधान या लेखानें होणें शक्य नाहीं, तत्रापि बऱ्याच लोकांस शास्त्रदृष्ट्या व विशेषतः ऐतिहासिक दृष्ट्या सामान्य समुद्रयान करणारा कधींहि असंग्राह्य मानला जात नव्हता असें मानण्यास या लेखापासून साधन होईल.

प्रथम ही गोष्ट वाचकांच्या स्पष्ट लक्षांत आली पाहिजे कीं, समुद्रयान आणि प्रत्यंतदेशगमन ह्या गोष्टी अगदीं भिन्न आहेत. धर्मशास्त्रांत काय आणि कायद्यांत काय, प्रत्येक वचनाची शक्ति त्यांत सांगितलेल्या विषयापुरतीच असते. विशेषतः जीं वचनें सामान्य नसून कांहीं विशेष अपवादक असतात, त्यांची शक्ति कधींहि जास्त फैलावली जात नाहीं. प्रत्यन्तदेश म्हणजे आर्यावर्ताच्या सीमेबाहेरील देश, जे बहुतेक म्लेंच्छ आहेत, त्यांत द्विज गेला असतां त्याला पुनः संस्कार करावा लागतो. पण पुनरुपयन किंवा तत्तुल्य प्रायाश्चित्त केल्यावर तो मनुष्य जातींत घेतला जातो; त्याचा संग्रह वर्ज्य नाहीं. सारांश ज्या म्लेच्छ देशांस स्थलमार्गानें जातां येतें तेथें जाऊन आलेल्या मनुष्याला प्रायश्चित्तोत्तर जातींत घेतलें जाणें शास्त्रसिद्ध आहे. प्रत्येक प्रायश्चित्ताची साधारणपणें ही शक्ति आहे कीं, प्रायाश्चित्तानें शुद्ध झालेला मनुष्य पंक्तिव्यवहार्य होतो. परन्तु कांहीं पातकें अशीं भयंकर आहेत कीं त्या पातकांस प्रायश्चित्त दिलें तरी पातक करणारे व्यवहार्य म्हणजे संग्राह्य होत नाहींत. अशी स्थिति असेल तेथें धर्मशास्त्रांत साधारण नियमाचें संकोचन करणारें स्पष्ट अपवादक वचन असतें. ब्रह्महत्या वगैरे महापातकें या कोटींतील आहेत; पण प्रत्यंतदेशगमन या कोटींतील नाहीं, म्हणजे त्याजविषयीं कोठेंहि असें वचन

नाहीं कीं, म्लेच्छ देशांत जाणाऱ्यास प्रायश्चित्तोत्तर संग्रहांत घेऊं नये. सबब प्रत्यंतदेशगमनाचा विषय अगदीं निराळा आहे, हें आपण प्रथम लक्षांत आणिलें पाहिजे.

'द्विजस्याब्धौ तु नौयातुः' हें वचन कलिवर्ज्यांत कां घालावें लागलें याची उपपत्ति वरील विवेचनावरून सहज लक्षांत येईल. या वचनानें असंग्राह्यत्वाचें भय घातलेलें पातक खरोखर मोठेंच असलें पाहिजे. नुसतें समुद्रयान करणें म्हणजे घोर पातक करणें आहे हें समजुतीस येत नाहीं. तेव्हां या वचनांतील नौयातृ शब्दाचा "समुद्रांत नावेनें जाण्याचा धंदा करणारा" असा जो अर्थ केला आहे, तोच युक्तीनें प्रशस्त दिसतो हें निर्विवाद आहे. समुद्रांत नावाड्याचा धंदा करणाऱ्या द्विजास द्विजधर्म मुळींच पाळतां येत नाहींत हें स्पष्ट साहजिक आहे. अशा समुद्रांतील नावाड्याचा धंदा करणाऱ्याचे द्विजधर्म अगदीं लुप्त हातात म्हणून त्यास प्रायश्चित्त दिल्यानंतरहि संग्रहांत घेऊं नये असें कलिवर्ज्य नियमानें ठरविलें. हें कांहीं अंशीं सयुक्तिक दिसतें. आतां हें कलिवर्ज्यांत सांगितलें याजवरून हें साहजिक निष्पन्न होतें कीं, कलीपूर्वीच्या काळीं समुद्रांत जाण्याचा धंदा करणारा प्रायश्चित्तोत्तर संग्राह्य होत होता. तसेंच हें उघड आहे कीं, कलीपूर्वीं समुद्रांत जाण्यायेण्याचा धंदा करणाऱ्यासच विशेष पातक आहे असें मानलें जात असलें पाहिजे. नुसतें समुद्रांतून जाणें पातक गणलें जात नसावें, किंवा तें साधारण पातक समजलें जात असावें, हें उघड आहे. याकरितां कलिवर्ज्यापूर्वीची स्थिति काय होती हें पाहणें जरूर आहे; तसेंच कलिवर्ज्य सुरू झाल्यानंतर आजपर्यंत कसा व्यवहार होता हें पाहणें इष्ट आहे. सबब आपण ऐतिहासिक दृष्ट्या वरील विषयाचा विचार करूं.

सर्व स्मृतींत मुख्य मानिलेल्या मनुस्मृतींत श्राद्धप्रकरणांत या विषयाचा प्रथम उल्लेख दृष्टीस पडतो. श्राद्धास उत्तम ब्राह्मण सांगावे, निंद्य ब्राह्मण सांगूं नये, असा नियम सांगून निंद्य ब्राह्मण कोणकोणते याची सविस्तर यादी मनुस्मृतींत दिली आहे. त्यांत खालील श्लोक आहे:—

अगारदाही गरदः कुन्डाशी सोमविक्रयी ।

समुद्रयायी बंदी च तैलिकः कूटकारकः ३।१५८.

म्हणजे समुद्रयायी, बंदी, तैलिक, सोमविक्रयी, कूटकारक हे ब्राह्मण श्राद्धास सांगूं नयेत. या वाक्यांत सदरहू प्रकारचे धंदे करणाऱ्या ब्राह्मणांचा बोध

होतो हें स्पष्ट आहे. बंदी ( म्हणजे स्तुतिपाठक ), तैलिक ( म्हणजे तेल काढणारा ), सोमविक्रयी ( म्हणजे सोम विकणारा ) इत्यादि शब्दांत जो प्रत्यय आहे तो ताच्छील्यार्थी आहे, हें कोणीहि कबूल करील. अर्थात् त्या त्या प्रकारचे धंदे करणारे ब्राह्मण श्राद्धयोग्य नाहींत हें या वचनावरून निघतें. बंदी, तैलिक इत्यादि प्रवाहांत पडलेला ' समुद्रयायी ' शब्द, साहचर्यानें, समुद्रांत जाण्याचा धंदा करणारा अशाच अर्थी असला पाहिजे. सारांश, या वचनांतील समुद्रयायी हा शब्द ताच्छील्यार्थी णिन्यंत आहे हें स्पष्ट आहे.

मनुस्मृतींतील व इतर स्मृतींतील श्राद्धवर्ज्य ब्राह्मणांची यादी पाहिली म्हणजे, जे ब्राह्मण अप्रशस्त मानलेले धंदे करितात तेच वर्ज्य मानिले आहेत, हें सहाजिक लक्षांत येणार आहे. ( कुशीलव, वैद्य, नक्षत्रसूचक, इत्यादि हल्लीं प्रशस्त झालेले उद्योग करणारेहि या यादींत आहेत. असो. ) मयूखकारानें सुद्धां ' अनापदि वैशवृत्या जीवतो ब्राह्मणस्य दोषः ' असा निष्कर्ष काढला आहे. सारांश, दोष धंद्यावर आहे, एखाद्या क्रियेवर नाहीं. कांहीं कारणानें एखादी गोष्ट करणें भाग पडलेल्या एखाद्या व्यक्तीवर तो दोष लागू होऊं शकत नाहीं. उदाहरणार्थ, एखाद्या ब्राह्मणानें आपल्या उपयोगाकरितां बदामाचें तेल काढिलें, किंवा कधीं एखाद्या प्रसंगीं राजाची स्तुति केली, तर त्याजवर बंदी किंवा तैलिक अशी संज्ञा लादून श्राद्धास अनुपयोगित्वाचा दोष येऊं शकत नाहीं. तद्वत् एखादे वेळेस समुद्रयान करणाऱ्या द्विजास समुद्रयायी हा शब्द लागूं शकत नाहीं. तर तो शब्द ताच्छील्यार्थिप्रत्ययान्त असून त्याचा अर्थ समुद्रानें जाण्याचा धंदा करणारा असा आहे, व त्याच अनुमानानें ' नौयातुः ' येथेंहि ताच्छील्यार्थी तृन्नन्त शब्द घेऊन नौकेनें जाण्याचा धंदा करणारा असा त्याचा अर्थ केला पाहिजे.

अमुक एक वचनाचा अमुक अर्थ आहे हें जसें व्याकरणावरून व मागील पुढील संगतीवरून सांगतां येतें, त्याचप्रमाणें यासंबंधानें पूर्वापार आचार कसा आहे हें पाहिल्यानेंहि सांगतां येईल हें निर्विवाद आहे. प्रसंगोपात्त समुद्रांतून जाणें जरूर पडल्यास ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य वैदिक काळापासून जात होते ही गोष्ट सप्रमाण सिद्ध करून देतां येईल. ऋग्वेदांतील पहिल्या अष्टकाच्या आठव्या अध्यायाच्या आठव्या वर्गांत खालीं दिलेली ऋचा आहे.

तुग्रो॑ह भु॒ज्युम॑श्विनोदमे॒घे

र॒यिं न कश्चि॑न्ममृ॒वाँ नवा॑हाः

तमू॑हतु॒र्नौभि॑रात्म॒न्वती॑भि-

र॑न्तरिक्ष॒प्रुद्भि॒रपो॑दकाभिः ॥ ३ ॥

**भाष्यः**– 'अत्रेयमाख्यायिका। तुग्रो नाम अश्विनोः प्रियः कश्चिद्राजर्षिः। स च द्वीपान्तरवर्तिभिरत्यंतसमुद्रुतः सन् तेषां जयाय स्वपुत्रं भुज्युं सेनया सह नावा प्राहौषीत्। सा च नौः मध्ये समुद्रमतिदूरं गत्वा वायुवशेन भिन्नासीत्। तदानीं स भुज्युः शीघ्रमश्विनौ तुष्टाव। तौ च स्तुतौ सेनयासहितं तं आत्मीयासु नौष्वारोप्य पितुस्तुग्रस्य समीपं **त्रिभिरहोरात्रैः** प्रापयामासतुरिति.'

तुग्र नांवाच्या अश्विनीभक्त राजाचा पुत्र भुज्यु हा सेनेसह जहाजांतून समुद्रमार्गानें शत्रुपराजयार्थ द्वीपान्तरास जात असतां त्याचें जहाज समुद्रांत फुटलें. तेव्हां त्यानें अश्विनींची स्तुति केली असतां त्यांनीं त्यास संकटांतून सोडवून आपल्या नौकेंत घालून तीन अहोरात्रांनीं बापाजवळ सुरक्षित पोचाविलें. या कथेवरून वैदिककालीं क्षत्रिय नावेनें परदेशास जात होते हें स्पष्ट होतें. समुद्रांतून नावेनें जाणें स्मृतिकालीं प्रचलित होतें, हें खुद्द मनुस्मृतींतील दुसऱ्या एका श्लोकावरून सिद्ध होतें. मनुस्मृतीच्या आठव्या अध्यायांत पुढील श्लोक आहेः–

समुद्रयानकुशला देशकालार्थदर्शिनः

स्थापयंति तु यां वृद्धिं सा तत्राधिगमं प्रति ॥ १५७॥

या श्लोकावरील मेधातिथीची टीका लक्षांत घेण्यासारखी आहेः–

'स्थलपथिका वारिपथिका वणिजो यां वृद्धिं स्थापयन्ति सा तत्राधिगमनं प्रति निश्चयनं प्रति। देशकालार्थदर्शिनः अस्मिन् देशे इयानर्थलाभो अस्मिन्नियान् इति ये पश्यन्ति जानन्ते। न तु समुद्रयाने एव कुशलाः कर्णधारादयः।'

कर्ज घेतलेल्या रुपयांवर अदालतीनें काय व्याज देववावें याविषयीं नियम सांगतांना वरील श्लोक दिला आहे. समुद्रयान करून जे व्यापारी लोक इतर देशाला माल नेतात, त्यांनीं कर्ज काढून माल नेला

असतां काय व्याज द्यावें ? कारण निरनिराळयां देशांशीं व्यापार करण्यात निरनिराळया प्रकारचे फायदे, कांहीं ठिकाणीं फार, कांहीं ठिकाणीं मध्यम होतात. तेव्हां अशा प्रकारचे तंटे न्यायाधीशापुढें आले असतां समुद्रयान करणारे कुशल, व देश व अर्थ म्हणजे व्यापाराची वस्तु व काल जाणणारे वाणी जें वृद्धि म्हणजे व्याज योग्य सांगतील, तें निश्चय करावें. ‘समुद्रयानकुशल’ म्हणजे कर्णधार नव्हत, तर समुद्रयानाचे देश काल व अर्थाचे माहितगार ‘वणिक्’ असा मेधातिथींनें शेरा मारिला आहे. कुल्लूक भट्टाचीहि टीका विशेष भिन्न नाहीं. ‘स्थलपथजलपथयाने इयद्देशपर्यंतमियत्कालपर्यंतमूह्यमाने सति एतावॉल्लाभो गृहीतुं युक्तः इत्येवं देशकालार्थदर्शिनः वणिगादयः यां वृद्धिं तथाविषये चावस्थापयंति सैव तत्र व्यवस्थाधिगमं प्रति धनप्राप्तिं प्रति।’ यांत फक्त ‘अधिगम’ या शब्दाचा अर्थ निराळा केला आहे, बाकी मजकूर तोच आहे. जलपथयानाचा विषय असून स्थलपथयानावरहि अतिदेश दोघां टीकाकारांनीं केला आहे, तो योग्यच आहे. म्हणजे दूर देशाशीं व्यापार केला असतां कशी वृद्धि देववावी याजविषयीं हा नियम आहे. समुद्रयान शब्द प्रतिपदोक्त आहे, तेव्हां तो तर सुटतच नाहीं. सारांश, समुद्रावरून ( व खुषकीनेंहि ) दूर देशांशीं व्यापार करण्याची प्रवृत्ति मनुस्मृतीपूर्वींपासून फार रूढ होती; इतकेंच नव्हे, तर व्यापाराचें प्रमाण इतकें अधिक होतें कीं कर्ज काढूनहि लोक व्यापार करीत होते. व त्यांचे तंटे अदालतींत आले असतां समुद्रावरच्या व्यापारांतील अग्रणींच्या मताप्रमाणें, जसा Mercantile Community च्या मताप्रमाणें हल्लीं निकाल होतो तसा, पूर्वींहि होत होता यांत संशय नाहीं. ‘समुद्रयानकुशलाः’ या पदावरून वणिक् लोक समुद्रावर जात असत, नुसते येथें बसून व्यापार हांकीत नव्हते, हेंहि सिद्ध आहे. समुद्रयानकुशला म्हणजे समुद्रयानाचा धंदा करणारे कर्णधार म्हणजे नावाडी तांडेल नव्हत, तर समुद्रांतून निरनिराळया देशांत जाऊन आल्यानें माहितगार झालेले वणिक् हेंही मेधातिथीच्या टीकेवरून स्पष्ट आहे. समुद्रयानाचा प्रचार मनुस्मृतीच्या पूर्वींपासून जारी होता हें आणखी एका मनुस्मृतींतील श्लोकावरून स्पष्ट आहेः——

दीर्घाध्वनि यथादेशं यथाकालं तरो भवेत्
नदीतीरेषु तद्विद्यात्समुद्रे नास्ति लक्षणं ॥ ४०६

त्याच आठव्या म्हणजे व्यवहारविषयक अध्यायांत जेथें उतार घेण्याविषयीं नियम सांगितला आहे तेथें हा श्लोक आहे. याचा अर्थ " जसा देश व काल लागला असेल, त्या मानानें तर म्हणजे उतार घ्यावा पण ही गोष्ट नदीतीराला लागू आहे. समुद्राचे संबंधानें तराविषयीं नियम सांगतां येत नाहीं. " कारण किती देश जाईल किंवा किती काळ लागेल याचा निश्चयच होऊं शकत नाहीं. यावरूनहि नौकेनें समुद्रांतून जाण्याचा प्रघात पूर्वकाळीं चांगला प्रचलित असावा असें दिसतें, व याचमुळें ताम्र-लिप्ति, द्वारसमुद्र, चंपावती, मरुकच्छ, पटल वगैरे शहरें पूर्व, दक्षिण व पश्चिम समुद्रावर प्राचीन काळीं भरभराटीस आलेलीं होतीं.. त्या शहरचे व्यापारी वैश्य परदेशांत समुद्रांतून जात असत हें स्पष्ट आहे. अशा लोकांना पोंचविण्याकरितां कर्णधारवृत्ति करून राहणारे किंवा नौकेवर पाणी, अन्न इत्यादि तयार करून देणारे ब्राह्मण असलेच पाहिजेत. अशा धंद्याचे ब्राह्मण साहजिक समुद्रयायी या नांवानें परिगणित होऊन तेली किंवा बंदी ब्राह्मणांप्रमाणें श्राद्धवर्ज्य समजले जात होते, ही गोष्ट सयुक्तिक दिसते.

मनुस्मृतीच्या वेळीं समुद्रावरून आर्य लोकांचें जाणें येणें होतें, व तेव्हां प्रायश्चित्त घेऊन ते शुद्ध होऊन पुन्हा जातींत येत असत. पण कलिवर्ज्य प्रकरण उपस्थित झाल्यावर तसा प्रघात दृष्टोत्पत्तीस येतो कीं काय, असा प्रश्न उद्भवतो. तसा प्रघात असेल तर ही गोष्ट कबूल करावी लागेल कीं, हा कलिवर्ज्यनियम केवळ समुद्रावरून जाण्यायेण्याचा धंदा करणारासच लागू आहे. इतिहासाच्या आलोचनानें कलींतहि समुद्रांतून सामान्यरीत्या जाण्यायेण्याचा प्रचार पूर्वीप्रमाणें चालू होता व आहे हें सिद्ध करितां येईल. सिंहलद्वीपाच्या राजाशीं समुद्रांतूनच दळणवळण होऊं शकतें, व मालविका ही सिंहलद्वीपाच्या राजाची मुलगी समुद्रांतूनच आली अशाविषयीं मालविकाग्निमित्रांत उल्लेख आहे; व ती पुढें अग्निमित्र राजाची बायको झाली. ज्योतिर्विदाभरणांत नौकासहस्रानें विक्रमराजा परदेश जिंकण्यास गेला असें वर्णन आहे. मग तें खरें जरी नसलें तरी कवीस तें अयुक्त दिसलें नाहीं एवढें पुरे आहे. जावा बेटांत रामायण ग्रंथ व रामाचीं देवळें सांपडतात, तेव्हां जावा बेटांत आर्य लोक समुद्रांतूनच गेले होते. जावा बेटाच्या रानटी लोकांनीं इकडे येऊन रामायण तिकडे

नेलें हें संभवत नाहीं. सारांश, आपल्या येथील ऐतिहासिक पुराव्यानें समुद्रांतून जाण्यायेण्याचा प्रचार कलीनंतरच्या काळांत होता यांत शंका नाहीं.

कलिवर्ज्यवचन उत्पन्न झाल्यावर द्विज–म्हणजे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य–उतारूंच्या नात्यानें समुद्रानें परदेशास जात असत ही गोष्ट आपल्या ग्रंथांवरून वरप्रमाणें शाबित होते, तशीच परकीय लोकांच्या इतिहासावरूनहि ती शाबित आहे. हें कलिवर्ज्य वचन जर साधारणपणें समुद्रांतून जाणाऱ्यास लागू असतें, तर कर्मनिष्ठ ब्राह्मण समुद्रांतून परदेशीं कधींहि न जाते हें निर्विवाद आहे. हें वचन समुद्रयानाचा धंदा करणाऱ्यास लागू आहे हें त्यावेळेस स्पष्ट असल्यामुळें पाश्चात्य देशांत आपल्या इकडील आर्य लोक जात असत असा दाखला त्यांच्या इतिहासांत सांपडतो. परद्वीपस्थ लोकांच्या इतिहासांतील ही प्रसंगोपात्त लिहिलेली माहिती फार मनोरंजक आहे. येशू ख्रिस्ताचा अपासल् म्हणजे प्रेषित **सेंट टामस** या देशांत आला होता, त्याजविषयीं ज्यू लोकांच्या इतिहासांत लिहून ठेविलेली हकीगत येणेंप्रमाणें आहेः–“ येशू ख्रिस्ताच्या प्रेषितांनीं कोणत्या देशांत कोणी जावें हें ठरविण्याकरितां चिठ्या टाकिल्या तेव्हां हिंदुस्थान देश सेंट टामसच्या नांवावर निघाला; व त्यानें आनंदानें तिकडे जाणें पत्करिलें. त्या वेळेस हरभान नांवाचा एक हिंदु वणिक् मेसोपोटेमियांत आला होता व तो आपल्या राजाकरितां उत्तम राजगृह बांधण्यासाठीं राजाज्ञेनें कारागिराचा शोध करीत होता. सेंट टामस यानें राजाकरितां एक उत्तम प्रासाद बांधून देईन असें कबूल केलें व तो दुसरे दिवशीं हरभानबरोबर गलबतांत बसून निघाला व चांगल्या वाऱ्याच्या साहाय्यानें ते सुंदरक बंदरांत येऊन दाखल झाले ( हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास.–स्मिथ ). सिंध व गुजराथच्या बंदरांतून समुद्रानें मेसोपोटेमियाशीं पूर्वकालीं व कलियुगांतव चांगलें दळणवळण होतें हें प्रसिद्ध आहे. ‘ हिंदुस्थानचा परदेशाशीं प्राचीन काळचा व्यापार ’ या विषयावरील गस्टाव्ह आपर्ट यांनीं लिहिलेला लेख ( मद्रास लिटररी जर्नल, व्हाल्यूम १८ ) फार महत्त्वाचा आहे. त्याजवरूनहि यासंबंधानें पुष्कळ माहिती मिळते. पांड्य राजे दक्षिणेंत कन्याकुमारीपासून पूर्वसमुद्राकडे राज्य करीत होते हें इतिहासप्रसिद्ध आहे. त्यांच्या किनाऱ्यावर मोत्यें सांपडत असत व

हर्लीहि तेथें सांपडतात. या मोत्यांच्या व्यापारासंबंधानें रोमन राष्ट्रांशीं प्राचीन काळीं आर्यांचें फार दळणवळण होतें, हें दळणवळण आरबी समुद्रानें तांबडया समुद्रांतूनच होतें हें सुप्रसिद्ध आहे. कारण दुसरा मार्ग म्हटला म्हणजे खुषकीचा पेशावरावरून इराणांतून होय. हा फार दूर पल्ल्याचा असून त्या वेळेस अगदीं बंद होता. एका पांडय राजानें **आगस्टस सीझर** याजकडे मोठीं मौल्यवान् रत्नें देऊन एक वकील पाठविला होता, असा रोमन इतिहासांत स्पष्ट दाखला आहे. ( स्मिथ,–पान ३३६ ). या वकिलांत एक ब्राह्मण होता असें स्ट्रेबो यानें दिलेल्या हकीकतीवरून दिसतें. हा ब्राह्मण आथेन्स शहरीं आजारी पडला, तेव्हां अलेक्झांडर बरोबर गेलेल्या कलनास ब्राह्मणाप्रमाणें त्यानें आपल्यास चितेवर जाळून घेतलें. कलींत समुद्रयानाचें पातक असंग्राह्यइतकें घोर गणलें गेलें असतें तर हा ब्राह्मण समुद्रयान करून परदेशीं गेला नसता. अलेग्झांड्रा शहरांत पुष्कळ हिंदु असून, कांहीं ठिकाणीं त्यांचीं देवालयेंहि होतीं. कस्तुंतुनिया येथें ब्राह्मण गेल्याचा स्पष्ट दाखला त्या वेळच्या इतिहासांत सांपडतो ( गस्टाव्ह आपर्ट, मद्रास जर्नल व्हा. १८ पान २१० ). यानंतर पर्शियाचें राज्य पुन्हां उदयास आलें व हिंदुस्थानचा बराच व्यापार व दळणवळण तिकडे फिरलें. खुश्रु नौशीरवान नांवाचा एक मोठा न्यायी व पराक्रमी बादशहा झाला. त्याजकडे महाराष्ट्राचा राजा पुलकेशी यानें एक वकील पाठविला होता, व त्याजकडून परत वकील येथें आले होते. त्यांनीं पुलकेशीची भेट घेतली त्या वेळचा देखावा आजिंठा लेण्यांमधील एका गुंफेंत एका कोरींव चित्रांत दाखविला आहे. पुलकेशी हाहि एक मोठा बलाढ्य राजा असून त्याचें राज्य कोंकणांत पश्चिम किनाऱ्यापर्यंत होतें व या किनाऱ्यावरील बंदरांतून इराण, अरबस्थान वगैरे देशांशीं समुद्रावरून ख्रिस्ती शकाच्या सातव्या शतकापर्यंत दळणवळण होतें व आर्य लोक समुद्रांतून परदेशीं जात असत, याजविषयीं ऐतिहासिक सबळ प्रमाण सांपडतें.

ख्रिस्ती सनाच्या सातव्या शतकांत अरबस्तानांत मुसलमानी धर्म उत्पन्न होऊन मुसलमानांनीं आसपासची पृथ्वी पादाक्रांत केली व परधर्मीयांस जबरदस्तीनें बाटविण्याची प्रथा चालू केली, त्यानंतर हिंदुस्थानांत हा समुद्रयानासंबंधीं गैरसमज उत्पन्न झाला असावा असें वाटतें. यापूर्वीं

हिंदुस्थानचे लोक समुद्रांतून परदेशांशीं म्हणजे अरबस्तान, इराण, मलाका, जावा, चीन वगैरे ठिकाणांशीं व्यापार करीत असत, व तेथें येथल्याप्रमाणेंच धर्मव्यवस्था असल्यामुळें किंबहुना कित्येक ठिकाणीं आर्यधर्मीयांना विशेष मान मिळत असल्यामुळें आर्यांचें समुद्रांतून जाणें चालू होतें. परंतु मुसलमानी धर्माचा प्रबल अम्मल परदेशीं बसला व त्या लोकांकडून जबरदस्तीनें बाटविण्याचा प्रघात पडूं लागला, तेव्हां हळू हळू समुद्रांतून परदेशीं जाणें बंद पडलें असावें, व यामुळें शास्त्रवचनाच्या अर्थाच्या संबंधानें गैरसमजूत होत गेली असावी.

मुसलमानी धर्माचा प्रबल अम्मल परदेशीं झाल्यापासून हळूहळू समुद्रयानाचा प्रघात बंद पडला व सर्वच समुद्रयान कलियुगांत वर्ज्य आहे असा लोकसमज होऊं लागला, याचें प्रत्यंतर रघुवंशांतील एका श्लोकावरील मल्लिनाथाच्या टीकेवरून दिसून येतें. रघूच्या दिग्विजयवर्णनांत खालीं दिलेला श्लोकार्द्ध चवथ्या सर्गांत आहे:—

पारसीकांस्ततो जेतुं प्रतस्थे स्थलवर्त्मना ।

यांतील ‘स्थलवर्त्मना’ या सरळ शब्दावर टीका करतांना ‘समुद्रयानस्य निषिद्धत्वात्’ असे शब्द मल्लिनाथानें घातले आहेत. परंतु स्थलवर्त्मना या शब्दांतून हा अर्थ काढण्यास कालिदासाच्या मागच्या पुढच्या किंवा या श्लोकांत कांहींच आधार नाहीं. कालिदासाच्या वेळेस समुद्रयानाचा दोष गणला जात नव्हता हें विक्रमराजा नौकेनें परदेश जिंकण्याला गेला असें त्याच्याच वर्णनावरून सिद्ध आहे. अपरान्त देशांतून पारसीक देशास जाण्यास (या वेळेस पारसीक सिंध देशांत आले असावे असें स्पष्ट वाटतें) दोन रस्ते होते. जसे हल्लीं मुंबईहून कराचीस जाण्यास दोन मार्ग—एक जलमार्ग व एक स्थलमार्ग—आहेत, तसेच त्या वेळेस होते हें या श्लोकावरून उघड आहे. यांतील स्थलमार्ग रघूनें पत्करिला या कालिदासाच्या वाक्यांत कारण मुळींच दर्शविलेलें नाहीं. तें कारण बहुधा गजसैन्याचें असावें. कालिदासास समुद्रयाननिषेधाची कल्पना नव्हती; पण मल्लिनाथ हा मुसलमानी धर्माचे प्रसारानंतरचा असल्यामुळें त्याच्या वेळेस ही कल्पना रूढ झालेली दिसते.

ही समजूत अगदीं अलीकडच्या काळापर्यंत वाढत गेली आहे हें उघड आहे. पण असें असूनहि पूर्वीचा स्वदेशांतच समुद्रांतून जाण्याचा

प्रघात कायम आहे ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. मुंबईहून कराचीस किंवा कोकणाकडे किंवा सिलोन बेटांत लोक समुद्रांतून जातात त्यांस तीन दिवसांहूनहि अधिक काळ लागतो, असें असून त्यांस प्रायश्चित्त देण्याचेंहि कोणाच्या मनांत येत नाहीं, मग प्रायश्चित्त देऊन असंग्रह ठेवण्याची गोष्टच नको. आतां हें कलिवर्ज्य वचन जर 'अब्धौ नौयातुः' या शब्दांनीं समुद्रांत नावेंत बसून जाणाऱ्या सर्वांस लागू आहे, तर वरील व्यवहार कसा चालू आहे हें गूढ सोडविणें कठिण आहे. कारण यांत स्वदेशांत किंवा म्लेच्छ देशांत जाणें असा भेद नाहीं. हें वचन दोन्ही गोष्टींस सारखेंच लागू आहे. सारांश कलिवर्ज्य उत्पन्न झाल्यानंतरची आजपर्यंतची वहिवाट पाहिली तरी सुद्धां हें कलिवर्ज्य फक्त समुद्रयानाचा धंदा करणारांस लागू आहे, इतरांस नाहीं, असेंच म्हणावें लागतें.

येथें कांहीं विरोधाभासी वचनांचा विचार करणें जरूर आहे. पूर्वींपासून म्हणजे कलिपूर्वींपासून समुद्रयानाचा धंदा करणें जर विशेष गर्ह्य समजलें जात होतें तर नुसतें समुद्रयान पातित्य उत्पन्न करणारें आहे असें बौधायनानें म्हटलें आहे, तें कसें ? नुसतें समुद्रयान कां पातक असावें हें कधींहि तर्कास जुळून येणारें नाहीं. पण बौधायनाच्या वचनाचा बारीक विचार केला तर त्यानें 'समुद्रसंयानम्' असें पद घातलें आहे, 'समुद्रयानम्' असें घातलें नाहीं. 'संततं यानं संयानम्'—असाच अर्थ केला पाहिजे. नाहीं तर सम् उपसर्ग व्यर्थ होईल. सारांश या पदांतहि समुद्रयानाचा धंदा करण्याचा बोध उत्पन्न होतो. दुसरें विरोधाभासी वचन हेमाद्रींत—

मासं कारागृहे वासो नौभिर्यातो दिनत्रयम्
म्लेच्छावासो तथा पक्षं यो वर्तेत स पातकी ॥

असें एक दिलें आहे. हें कोणत्या स्मृतींतलें अगर ग्रंथांतलें आहे याचा दाखला हेमाद्रींत नाहीं. तथापि तें मान्य आहे असें धरून चाललें पाहिजे. या श्लोकांत समुद्र शब्द मुळींच नाहीं म्हणजे हा दोष सामान्यतः सांगितला आहे. तीन दिवसपर्यंत नौकेवर राहिलें असतां द्विज प्रायश्चित्तीय होतो,—मग तो नदीवर तीन दिवस असो किंवा समुद्रावर असो. याशिवाय तो पातकी एवढाच शब्द येथें वापरलेला आहे; म्हणजे हें पातक उपपातकांतील आहे, पातित्य उत्पन्न करणारें नाहीं, असें म्हटलें पाहिजे. येथें पूर्वीं दिलेल्या ऋग्वेदांतील मंत्राच्या भाष्याची आठवण वाच-

कांस दिली पाहिजे. त्यांत अश्विनींनीं तीन अहोरात्रांनीं आपल्या नांवांनीं भुज्यूस त्याच्या बापाकडे पोंचविलें असा उल्लेख आहे. जर दैवी नावांनीं तीन दिवस लागले, तर भुज्यु हा तिहींहून अधिक दिवसांच्या प्रवासाच्या पल्ल्यावर समुद्रांत गेला असला पाहिजे हें स्पष्ट आहे. जर तीन दिवसांहून अधिक दिवसांवर भुज्यु समुद्रांत गेला होता, तर तो पातित्य उत्पन्न करणारें कृत्य करण्यास कसा धजला असावा हा प्रश्न उद्भवतो. सारांश वरील वाक्यांत सांगितलेलें पाप उपपातक आहे; पातित्य उत्पन्न करणारें महापातक नव्हे असेंच मानलें पाहिजे. अशी व्यवस्था लागली म्हणजे भुज्यु हा नौकेंत बसून कसा गेला किंवा रघुराजा दिग्विजयाकरितां अंग, वंग, कलिंग, पारसीक, यवन इत्यादि म्लेच्छावासांत कसा गेला याचाहि योग्य उलगडा लागतो.

व्यवहारमयूखांत आणखी एक विरोधाभासी वचन आहे. "यश्च स्यादपयात्रितः" या वाक्यांतील अपयात्रित या पदाचा अर्थ मयूखकारांनीं "व्यवसायार्थं नावादिना समुद्रमध्ये द्वीपान्तरं गंता" असा दिला आहे. यांतहि व्यवसायार्थं हें पद दिलेलें आहे. दुसरीं सर्व पदें बाजूला ठेविलीं तरी या पदानें धंद्यासंबंधाचा बोध होतो.

वरील विवेचनावरून वाचकांस इतकें व्यक्त झालें असेल कीं, कलिवर्ज्य उत्पन्न होण्यापूर्वीं मुख्य दोष समुद्रयानाचा धंदा करण्यांत होता. प्रसंगोपात्त नावेंत बसून समुद्रांतून परदेशीं जाणें हें स्वतः पातक नसून नौकेंत तीन दिवस किंवा अधिक लागल्यामुळें उपपातक उत्पन्न होत होतें. कलिवर्ज्यानें पहिल्या पातकासंबंधानें पुढें विशेष असा कडकडीत नियम केला कीं, त्या पातकाबद्दल प्रायश्चित्त घेतलें तरी तो प्रायश्चित्ती संग्रहांत घेऊं नये. यामुळें द्विजांना समुद्रयानाचा धंदा अगदीं त्याज्य झाला. परंतु प्रसंगोपात्त समुद्रांतून परदेशीं किंवा स्वदेशीं जाणें कलिवर्ज्यानंतर कधीं त्याज्य झालें नाहीं. किंबहुना ही वहिवाट अजून चालू आहे. मात्र मुसलमानी धर्माच्या करड्या अमलामुळें म्लेच्छदेशांत आर्यांचें जाणें बंद पडलें. पाश्चात्य राष्ट्रांची सुधारणा कोणत्या कारणांनीं झाली आहे, त्यांचे आचारविचार कसे आहेत, त्यांच्यापासून कोणत्या कला शिकावयाच्या आहेत व कोणत्या नाहींत, इत्यादि गोष्टींची माहिती प्रत्यक्ष पाश्चात्य देशांत गेल्यावांचून कधींहि आपल्यास होणार नाहीं. कूपमंडूकाप्रमाणें जर आपण

आपल्याच देशांत अडकून बसलों, तर आपल्याहून सुसंपन्न कोण व कां आहेत हें कधीं आपणास कळावयाचें नाहीं. प्रत्यक्ष परदेश पाहिल्याशिवाय सामान्य स्थितीच्या तुलनेनें मिळणारी अत्यंत उपयुक्त माहिती आपल्यास मिळावयाची नाहीं. इंग्लंड देशांत राहून जपानच्या पुढाऱ्यांनीं आपल्या देशाचा कसा फायदा केला हें प्रत्यक्ष ढळढळीत उदाहरण डोळ्यांसमोर असून आम्ही आपल्या गाढ निद्रेंतून जर जागे होणार नाहीं तर आमचें दुर्दैव असेंच म्हटलें पाहिजे.

आपल्या देशाची राजकीय स्थिति सुधारण्यास जसें इंग्लंडादि परदेशगमन अवश्य आहे, त्याप्रमाणें आमची औद्योगिक स्थिति सुधारण्यास समुद्रयानाशिवाय आपणांस गत्यंतर नाहीं. पाश्चात्य देशांची राजकीय स्थिति जशी उन्नत दशेला पोहोंचली आहे, त्याप्रमाणें त्या देशांची औद्योगिक स्थिति बहुतेक परमावधीस जाऊन पोहोंचली आहे. मनुष्याच्या सुखसाधनाच्या वस्तु कशा उत्पन्न कराव्या, रसायनशास्त्रादि अर्वाचीन शास्त्रांचे नवीन नवीन शोध मनुष्यसुखाकडे कसे लावावे, तयार केलेल्या वस्तूंचा ज्या ठिकाणीं खप असेल त्या ठिकाणीं पुरवठा कसा करावा व या तऱ्हेनें देशाची संपात्ति समृद्ध दशेस कशी पोहोंचवावी, याचें अनुमान व कल्पना येथें बसल्यानें होणार नाहीं. व याकरितां पिढ्यानुपिढ्या एकच काम करीत आल्यानें स्वभावनिपुण झालेले व्यापारी व बुद्धिमान् शास्त्रज्ञ यांनीं परदेश अवश्य पाहिला पाहिजे, धनिक लोकांनीं त्यांस समुद्रांतूनहि परदेशास पाठविण्याचीं साधनें सुलभ करून दिलीं पाहिजेत, व धर्मगुरूंनीं धर्मसंबंधीं वाटणारी त्यांची भीति कमी केली पाहिजे.

राजकीय दृष्ट्या पाश्चात्य देश जसे उच्च स्थितींत आहेत, व्यापार, कलाकौशल्य, व शास्त्रीय यांत्रिक साधनें हीं त्याच देशांत ज्याप्रमाणें उन्नत दशेला दिवसेंदिवस जात आहेत, त्याचप्रमाणें पाश्चात्य देश हे हल्लीं विद्यावृद्धीच्या मानानें सर्व देशांचे अग्रणी आहेत यांत शंका नाहीं. कोणतीही विद्या किंवा शास्त्रें असोत त्या विद्या शिकणारे व त्या विद्या शिकण्याचीं साधनें पाश्चात्य देशांत अत्युत्तम स्थितींत आहेत असें म्हटल्यावांचून राहवत नाहीं. विशेषतः अर्वाचीन शास्त्रांचा अभ्यास परदेशांत म्हणजे इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, अमेरिका व हल्लीं जपान या देशांत गेल्यानें जसा चांगला होईल, तसा येथें होणार नाहीं. प्रो. गज्जरांसारखे महान बुद्धिवान् लोक याहि

देशांत बसून शास्त्रीय शोध करूं शकतात हें खरें आहे. पण हेंहि कबूल केलं पाहिजे कीं, त्यांचें अध्ययन पाश्चात्य भाषेंत व पाश्चात्य साधनांनीं झालेलं आहे; व त्या गृहस्थांस पाश्चात्य देशांत जाऊन स्वतंत्रतेनें आधिभौतिक शास्त्रें शिकण्यास सांपडलें असतें, तर ते याहूनहि उपयुक्त झाले असते, यांत शंका नाहीं. लाखों रुपयांचीं यंत्रें विलायतेहून इकडे येतात, काचेचें सामान, औषधी, निरनिराळें कापड हीं सर्व विलायतेहून बनून येऊन तीं इकडे आपण आयतीं घेतों; तीं कशीं बनवितात, तीं तयार करण्याच्या व्यवस्था काय आहेत, हिंदुस्थानांत तीं बनवितां येतील किंवा नाहींत, येथें काय होऊं शकतें, व काय तयार करणें योग्य आहे, वगैरे गोष्टींची माहिती व विचार पाश्चात्य देशांत जाऊन त्या त्या विद्या शिकल्याशिवाय कधींहि प्राप्त होणार नाहींत. विद्या शिकणें हें प्रत्येक उन्नतीस जाऊं इच्छिणाऱ्या समाजानें आपलें पहिलें कर्तव्य समजलें पाहिजे. विद्या नीचापासूनहि शिकावी असें जर शास्त्र आहे, तर समुद्रयान करून परदेशांत जाऊन विद्या शिकणें प्रशस्त व प्राप्त आहे असें कोण म्हणणार नाहीं ? संजीवनी विद्या असुरगुरूपाशींच आहे असें जाणून कचानें असुरगुरूच्या गृहीं जाऊन वास केला; इतकेंच नव्हे तर तो सुरेंन भस्म होऊन मिसळून गेला व त्यानें शुक्राचार्यांच्या पोटांत जाऊन संजीवनी विद्या प्राप्त करून घेतली. या गोष्टीच्या समर्थनाकरितां पुराणांतरीं जाण्याची जरूरी नाहीं. केशव दैवज्ञ, नीलकंठ वगैरे ज्योतिर्विदांनीं पाश्चात्य देशांत समुद्रानें जाऊन ज्योतिर्विद्या प्राप्त करून घेतली व ताजिक वगैरे अरबी ज्योतिष ग्रंथ आपल्या देशांत प्रचलित केले, हें सर्वविश्रुत आहे.

समुद्रयान करून विलायत वगैरे प्रत्यन्तदेशांत गेल्यावांचून आपणास गत्यन्तर नाहीं हें जर खरें आहे तर “ समुद्रयातुः ” व “ नौयातुः ” या शब्दांचा जो संकुचित अर्थ केला गेला आहे, तो अगदीं यथायोग्य आहे, हें “ स्वस्य च प्रियमात्मनः ” या धर्ममूलावरून सिद्ध होतें. जेथें अमुक अर्थ आहे किंवा नाहीं अशी शंका उत्पन्न होते, तेथें या धर्ममूलाचा उपयोग करणें प्रशस्त आहे. सदाचार हेंहि धर्ममूल याच अर्थाला अनुकूल आहे. मागील आचार काय होता व तो वरील संकुचित अर्थाला धरून कसा होता हें पूर्वीं दाखविलें आहे. हल्लींचा आचारहि तसाच आहे. हल्लींसुद्धां तीन दिवस किंवा त्याहून अधिक प्रवास गलबतानें करून आपण कराची सिंहलद्वीप वगैरे देशांस जातों.

म्लेंच्छ देशांत समुद्रानें जाण्यानें आम्ही असंग्राह्य होणारें नाहीं अशाविषयीं प्रत्यक्ष आचारानें हल्लीं उदाहरण घालून दित्याचें श्रेय जयपुरचे महाराज यांनीं घेतलें आहे. जयपूरचे महाराज हे हल्लींच्या क्षत्रिय लोकांत अग्रगण्य आहेत. त्यांनीं विलायतेस जाऊन हें स्पष्ट करून दाखविलें कीं सदरहू कलिवर्ज्य प्रसंगोपात्त जाणाऱ्या द्विजास मुळींच लागू पडत नाहीं. जयपुरचे महाराज यांनीं आपल्या आचरणानें हेंहि व्यक्त करून दाखविलें आहे कीं, समुद्रयान करून प्रत्यंत देशास जाणारा द्विज बाटलाच पाहिजे असें नाहीं. पाश्चात्य देशांत हल्लीं मद्यपाननिषेधक लोक आहेत व वनस्पत्याहार करणारे लोक आहेत. स्वधर्म पाळणें हें हल्लीं ज्याच्या त्याच्या खुशीवर, इच्छेवर व प्रयत्नावर अवलंबून आहे. धर्मसंबंधीं जुलूम हल्लीं कोणावर कोठेंहि नाहीं आणि धर्मचाराचें परिपालन प्रत्येक मनुष्याचे हातांत आहे. त्यास कोणाची भीति नाहीं. जे लोक खरोखरच धर्मभ्रष्ट आहेत ते राजरोस स्वदेशांतच राहून आपल्या धर्माला पराङ्मुख होऊं शकतात, त्यांस समुद्रयानाची जरूरी नाहीं. जे लोक स्वधर्मनिष्ठ आहेत ते समुद्रयान करूनहि पाश्चात्य देशांत आपला धर्म पाळूं शकतात. याचें धडधडीत उदाहरण आपल्या सोज्वळ आचरणानें जयपुरचे महाराजांनीं घालून दिलें. त्यांच्याहून जे कमी द्रव्यशक्तीचे लोक आहेत त्यांस सुद्धां अभक्ष्यभक्षण किंवा अपेयपान न करितां परदेशांत राहणें शक्य आहे; व याप्रमाणें अनेक लोक राहतात हें सिद्ध आहे;

"द्विजस्याब्धौ तु नौयातुः" या वचनाचा अर्थ मुसलमानांच्या जुलमी अमलामुळें लोकसमजुतींत निराळा बनला याचें प्रत्यंतर दुसऱ्या एका गोष्टीवरून दिसून येतें, व त्या गोष्टीसंबंधानें जयपुरच्या महाराजांच्या पूर्वजांनीं योग्य निराकरण केलें होतें हें नमूद करण्यास मोठा आनंद वाटतो. अटकेच्या पलीकडे हिंदूंनीं जाऊं नये असा समज कित्येक वर्षें हिंदुस्थानांत होता व अजूनहि कांहींसा आहे. या समजाचें बीज काय आहे हें पाहूं लागलें तर यासंबंधानें स्पष्ट वचन कोठेंच आढळत नाहीं. किंबहुना अलेक्झांडरच्या पूर्वीं व नंतर गांधारादि आर्य देश अटकेपलीकडे होते तेथें लोक जात. उपनिषदांत सुद्धां, गांधार देशांतून डोळे बांधून मनुष्य दुसरीकडे नेला असतां डोळे सोडल्यावर खुणेखुणेनें जसा गांधार देशास जातो, असा दाखला घेतला आहे. प्राचीन इतिहास पाहतां, अटकेपलीकडे आर्य लोकांची

वस्ती मुसलमानी होईपावेतों होती. मुसलमानी झाल्यावर जबरदस्तीनें बाट-विलें जाण्याच्या भीतीनें हिंदु लोक अटकेपलीकडे जाईनातसे झाले. अशी स्थिति सरासरी सहाशें वर्षें राहिल्यामुळें, अटकेपलीकडे जाणें पाप आहे असा राजा मानसिंगाच्या वेळेसहि समज होता. राजा मानसिंग याची जहांगीर बादशहानें काबुलाच्या सुभ्यावर नेमणूक केली. तो निश्चयी पुरुष आपल्या शूर क्षत्रियांनिशीं काबुलास जाऊं लागला, तेव्हां त्याच्या भोळया शिपायांनीं अटकेची अटक आहे असा जेव्हां राजा मानसिंगास प्रश्न केला, तेव्हां त्यानें जें मार्मिक उत्तर दिलें तें नमूद करण्यासारखें आहे:—

सब है भूम गोपालकी इसमें अटक कहां ।
जाके दिलमें अटक है सोही अटक रहा ॥

जयपुरचें घराणें गोपालकृष्णाचें भक्त आहे, हें प्रसिद्धच आहे. हेंच उत्तर पुढें रणजितसिंगानें आपल्या शूर शीख शिपायांस दिलें आहे. भूमि सर्व परमेश्वराची आहे, त्यांत अटक कोणीकडून उत्पन्न होईल? ज्याच्या मनांत अटक आहे, स्वधर्माची श्रद्धा ज्याच्या मनांत कमी आहे त्याचा धर्म बाटण्यास अटकेपलीकडे जावयास नको, तो येथेंच बाटूं शकतो. असो, या गैरसमजावरून समुद्रयानासंबंधानें गैरसमज कसा उत्पन्न झाला असावा याची कल्पना होईल. पण धर्मशास्त्रवचनांचा योग्य अर्थ, व्याकरण व इतिहासांतील आचार यावरून, लावला असतां समुद्रानें जाण्यायेण्याचा धंदा करणारा ( नाविक ) यासच प्रायश्चित्तोत्तर कलिवर्ज्यानें असंग्राह्यत्व सांगितलें आहे, इतरांस नाहीं.



# विद्यापीठांचा इतिहास.

ज्ञान ही एक अत्यन्त पवित्र वस्तु आहे हें 'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते' या भगवदुक्तींत सांगितलेलें सर्वांस अवगतच आहे. हा पवित्रपणा मुख्यत्वें वेदान्त तत्त्वज्ञानाला उद्देशून जरी सांगितलेला असला, तरी सर्व ज्ञान त्याच मुख्य ज्ञानाचें अंग व त्याच ज्ञानाला परिपोषक असल्यानें पवित्र आहे, हें निर्विवाद आहे. पशुकोटीहून मनुष्यकोटींत जास्त चिदंश आहे तो हाच. पशूंना जरी इंद्रियजन्य ज्ञान असलें, तरी बुद्धिगम्य ज्ञान त्यांस नाहीं. हें ज्ञान—परमेश्वराचें यथार्थ स्वरूप अवगत करून देणारें ज्ञान—मनुष्यजन्मांतच असल्यानें मनुष्यजन्माची थोरवी आहे. चिच्छक्तीनें मनुष्यानें प्रारंभापासून आपली बुद्धि चालवून ज्ञान संपादन करण्याचा प्रयत्न अव्याहत सुरू ठेवला आहे. असें निरनिराळ्या प्रकारचें ज्ञान निरनिराळ्या दिशेनें संपादन करीत आज मनुष्यप्राणी अत्यंत उच्च प्रतीच्या संस्कृतीस येऊन पोहोंचला आहे. या ज्ञान--संपादनाचे कामास अनेक देशांतील अनेक बुद्धिमान् लोकांनीं हातभार लाविलेला असून या सर्व गतकालीन बुद्धिवान् लोकांच्या संपादित ज्ञानाचा फायदा आज आपण घेत आहोंत. आजपर्यंत संपादलेलें ज्ञान संगृहीत करून जागृत ठेवणें आणि शक्य ती त्या ज्ञानांत भर टाकणें हें विद्यापीठाचें पवित्र कर्तव्य आहे, अशी माझी समजूत आहे. आणि जगताच्या इतिहासाकडे पाहिलें तर विद्यापीठासारख्या संस्था निरनिराळ्या देशांत निघून त्यांतील अनेक विद्वानांनीं ज्ञानसंग्रह व ज्ञानसंपादन म्हणजे आजवर मिळविलेल्या ज्ञानाचें जोपासन व पुढें आणखी ज्ञानसंपादन करण्याचा प्रयत्न सतत चालू ठेविला आहे; आणि यामुळेंच आज एकंदर मनुष्यसमाजाची जी उन्नति, जी संस्कृति, जी सुखसंपत्ति दिसत आहे, ती साध्य झाली आहे.

अशा संघटित प्रयत्नांत भारती आर्यांनीं फार प्राचीन काळापासून भाग घेतला आहे, ही गोष्ट आपणांस अभिमानास्पद आहे. भारती आर्य हिंदुस्थानांत आले त्याच वेळीं त्यांची ज्ञानविषयक प्रगति बरीच झालेली होती आणि यामुळें ऋग्वेदासारखे आपणांस आजहि आश्चर्यानें चकित

करून सोडणारे ग्रंथ इतक्या प्राचीन काळीं निर्माण झाले. त्या वेळचे ऋषि अर्थात् विद्वान् लोक, यांचें घर म्हणजे कॉलेजच असे. इतक्या प्राचीन काळापासून त्यांनीं विद्यार्जनाचें व विद्यावृद्धीचें काम चालविलें होतें. जरी युनिव्हर्सिटीसारखी संस्था म्हणजे विद्वत्समूहाची संतत चालणारी संस्था तेव्हां होती किंवा नाहीं हें सांगतां येत नाहीं, तरी ऋषि आपल्या घरांत शिष्यांस विद्या शिकवीत, आणि विद्येची प्रगति करीत. पंजाब आणि सरस्वतीतीर हीं विद्येचीं त्या वेळचीं माहेरघरें होतीं. किंबहुना सरस्वती म्हणजे विद्या ही अर्थसंगति तेव्हांपासून उत्पन्न झाली असावी. इतक्या प्राचीन काळीं आर्य–कालेजांतून म्हणजे गुरुकुलांतून कोणकोणत्या विद्या शिकवीत याची यादी इ. स. पूर्वी दोन हजार वर्षांच्या सुमारास झालेल्या छांदोग्योपनिषदांत दिलेली आढळते. नारद म्हणतो, ‘ ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, इतिहास, पुराण, व्याकरण, राशि ( गणित ), दैव, निधि, न्याय, देवविद्या, ब्रह्मविद्या, क्षत्रविद्या, नक्षत्रविद्या ( ज्योतिष ), सर्पदेवजनविद्या मी शिकलों आहे.’ तात्पर्य, केवळ वेदविद्या, व वेदान्तविद्याच त्या वेळेस शिकत नसून व्याकरण, न्याय, गणित, ज्योतिष, धनुर्विद्या इत्यादि विद्या शिकत असत हें वाचून आपल्यास आश्चर्य वाटतें. एक हजार वर्षांच्या अभ्यासानंतर इ. स. पूर्वी १०००–८०० च्या सुमारास पाणिनीनें व्याकरणशास्त्र आपल्या विलक्षण बुद्धिमत्तेनें इतकें परिपूर्ण निर्माण केलें कीं, तें आज हिंदुस्थानांतच नव्हे, तर जगतांत वंद्य झालें आहे आणि पाश्चात्यांस भाषाशास्त्रांत मार्गदर्शक झालें आहे. ज्योतिषांतहि बरीच प्रगति झालेली असून चंद्रसूर्यांच्या गतीचें गणित–ज्ञान त्या वेळीं झालें होतें. पाणिनि हा शालातुरीय या विशेषणानें प्रसिद्ध आहे. त्याचें शालातुर हें निवासग्राम गांधार देशांत होतें. आणि तो बहुधा तक्षशिला किंवा कुरुक्षेत्र येथील प्राचीन आर्य विद्यापीठांत व्याकरणाचा प्रोफेसर असावा, असें अनुमानिल्यास वावगें होणार नाहीं. आर्यांची भरतखंडांत जसजशी वस्ती वाढत गेली, तसतशी त्यांचीं ऋषिकुलें, अर्थात् विद्यापीठेंहि प्रसृत झालीं. पंजाबापासून पूर्वबहारपर्यंत तक्षशिला, सरस्वतीतीर, नैमिषारण्य, काशी, मिथिला इत्यादि मोठमोठ्या राजधान्यांच्या आश्रयानें किंवा रम्य व पुण्य नद्यांच्या सान्निध्यानें हीं विद्यापीठें उत्पन्न झालीं यांत आश्चर्य नाहीं. अशा ठिकाणीं शेंकडों किंबहुना

हजारों ब्रह्मचारी म्हणजे विद्यार्थी विद्या शिकत आणि गुरुकुलांतच राहात. आरंभापासूनच हीं गुरुकुलें किंवा आश्रम रेसिडेंशल युनिव्हर्सिट्या असत. गुरुकुलीं वास करणें हें प्राचीन आर्य विद्यापीठाचें मुख्य तत्त्वच होतें. येथें राहणारे विद्यार्थी व ऋषि आपला चरितार्थ आपल्याच परिश्रमानें चालवीत असें दिसतें. महाभारतांत कण्वाश्रमाचें जें वर्णन आहे, तें अशाच विद्यापीठाचें आहे. हा आश्रम म्हणजे एकांतांत वास करणाऱ्या व तपश्चर्या करणाऱ्या एकाकी मुनीचा आश्रम नसून येथें हजारों द्विज राहात, यज्ञयागादि क्रिया करून वेदांचें अध्ययन करीत व इतर शास्त्रांचेंहि समालोचन करीत. 'नानाशास्त्रैश्च मुख्यैश्च शुश्राव स्वनमीरितम् । लोकायतिकमुख्यैश्च ।' इत्यादि वर्णनावरून सर्व शास्त्रांचा व नास्तिक व आस्तिक मतांचा ऊहापोह येथें होत असे. या आश्रमवर्णनावरूनच कुलपति हा शब्द आपण घेतला आहे. महाभारतकाळीं म्हणजे इ. स. पूर्वी ३०० च्या सुमारास अशीं मोठमोठीं विद्यापीठें उत्तर हिंदुस्थानांत होतीं आणि त्यांत तत्त्वज्ञानविषयक अनेक मतांचा अभ्यास होत असे. आर्यांचा प्रसार दक्षिणेकडे झाला तेव्हां अशीं विद्यापीठें त्या भागांतहि निर्माण झालीं. त्यांत उज्जनी हें अशा विद्वत्समूहाचें मोठें प्रख्यात केंद्र बनलें. वेदविद्या व धनुर्विद्या शिकण्याकरितां श्रीकृष्ण व बळराम मथुरेहून उज्जनीस आले, ही पौराणिक कथा प्राचीन काळीं उज्जनीच्या विद्यापीठाच्या ख्यातीची साक्ष देते. याच उज्जनींत महाकालयात्राप्रसंगीं विद्वज्जनसमूहापुढें कवि आपलीं काव्यें व नाटकें वाचून व करवून दाखवीत. याच उज्जनींत इ. सनाच्या प्रारंभीं व त्यापूर्वी ज्योतिषाचा अभ्यास उत्तम प्रकारें केला जाऊन ज्योतिषसिद्धान्तग्रंथ निर्माण झाले.

आर्यांचा प्रसार उत्तरेकडे काश्मीरांत बऱ्याच प्राचीन काळीं झाला व दक्षिणेकडे महाराष्ट्रांत झाला व दोन्ही ठिकाणीं प्रसिद्ध विद्यापीठें उत्पन्न झालीं. दक्षिणेकडे शातवाहनांच्या अमलाखालीं प्रतिष्ठान अथवा पैठण या शहरास अत्यंत महत्त्व चढलें, व हे राजे विद्याप्रिय असल्यानें पैठण जें एकदां विद्वानांचें माहेरघर व विद्येचें पीठ बनलें तें, पैठण येथून राजधानी उठली तरी हजारों वर्षें तसेंच कायम राहिलें, हें आश्चर्य आहे. चालुक्य, राष्ट्रकूट व यादव यांच्या अमदानींत बदामी, मालखेड, कल्याण, देवगिरि, या राजधान्या झाल्या, तरी विद्येचें माहेरघर पैठणच होतें; किंबहुना

मुसलमानांच्या अमदानींत सुद्धां कलबुर्गें, बेदर वगैरे ठिकाणीं राजमहत्त्व चमकलें तरी, किंवा मराठे–पेशवे यांच्या अमदानींत पुणें–सातारा या राजधान्या झाल्या तरी, विद्येचें स्थान पैठणच होतें, हें प्रसिद्ध आहे; आणि मुसलमान आणि मराठे शास्त्रार्थ पैठणाहूनच मागवीत. काश्मीरचेंहि विद्यापीठ इ० सनाच्या प्रारंभापासून मुसलमानांच्या अमदानीपर्यंत प्रसिद्ध होतें. तेथून शेंकडों पंडित बाहेर देशीं जाऊन कीर्ति मिळवीत. श्रीमच्छंकराचार्यांना काश्मीरांत जाऊन आपली परीक्षा द्यावी लागली, आणि काश्मीरच्या प्रसिद्ध शारदामंदिराचा बंद असलेला दक्षिण दरवाजा त्यांनीं उघडला. शारदामंदिर इतिहासांत काश्मीरांतच असल्याचें दिसतें, इतरत्र असल्याचें माझ्या वाचनांत तरी मला आढळलें नाहीं.

पैठण किंवा प्रवरपुर यापेक्षां काशीची महती विद्वज्जननिवासस्थान या दृष्टीनें फार प्राचीन काळापासून अधिक आहे हें सांगणें नको. उपनिषत्कालापासून तों तहत आजपावेतों सुमारें चार हजार वर्षें काशी पंडितांचें व आर्यविद्यांच्या सर्व शाखांच्या अध्यापनाचें निवासस्थान आहे. बुद्धानें इ. स. पूर्वीं ५०० च्या सुमारास आपलीं मतें प्रथम येथें पंडितांपुढें मांडलीं आणि शंकराचार्यांनीं इ. स. ८०० त आपला नवीन वेदान्तसिद्धान्त प्रथम येथें पंडितांसमोर मांडून मान्य करविला. सर्वांत अत्यंत पवित्र क्षेत्र या नात्यानें सर्व भारतीयांचा धार्मिक खर्च काशीस होत असल्यानें साहजिकच येथें विद्येस नेहमीं मान व पारितोषिक मिळे व मिळतें आणि समर्थ, शास्त्रपारंगत पंडित साहजिकच येथें निर्माण होत व होत आहेत.

पण बौद्धकाळीं बौद्धांचे विहार हे त्यांच्या धर्मशिक्षणाचें व तत्त्वविचारांचें निवासस्थान बनले यांत आश्चर्य नाहीं; किंबहुना हल्लींच्या कल्पनेप्रमाणें कित्येक बौद्ध विहार खऱ्या युनिव्हर्सिट्या या काळीं बनल्या. हे विहार मोठ्या विस्तृत प्रमाणावर बांधलेले असून, तेथील भिक्षूंच्या चरितार्थाकरितां राजेलोकांनीं गांव लावून दिलेले असत आणि येथें बौद्ध पंडित व विद्यार्थी रहात असून आपल्या सर्व कालाचा उपयोग तत्त्वविचाराकडे व विद्याव्यासंगाकडे करीत. येथें पूर्वींच्या ऋषींच्या आश्रमाप्रमाणें विवाहित गृहस्थधर्मी ऋषि किंवा हल्लींच्या रेसिडेन्सींतील रेक्टरप्रमाणें कोणी विवाहित कुटुंबें रहात नसत. यामुळें कित्येक विहार केवळ विद्यापीठेंच बनलीं होतीं.

बौद्धकालांतील नालंदा येथील विद्यापीठाची माहिती बहुतेकांस आहे. हिचें विस्तृत वर्णन प्रसिद्ध चिनी प्रवाशानें लिहून ठेविलें असून, तो स्वतः या विद्यापीठांत संस्कृत भाषा, अनेक शास्त्रें, व बौद्ध तत्त्वज्ञान शिकला. उज्जनीजवळील विंध्यारण्यांत राहणाऱ्या एका बौद्ध भिक्षूच्या आश्रमाचें जें विस्तृत रसभरित वर्णन बाणानें आपल्या हर्षचरित या ऐतिहासिक ग्रंथांत केलें आहे त्यावरून हे बौद्ध विहार निरनिराळया अनेक विद्यांच्या अध्ययनाचें स्थान कसे झाले होते याची कल्पना होते. नालंदा युनिव्हर्सिटी नष्ट किंवा अवनत झाल्यानंतर विक्रमशीला या नांवाची बौद्ध विद्यापीठ—संस्था बंगाल्यांत प्रख्यातीस आली असें इतिहासावरून दिसतें. बौद्धांनीं तत्त्वज्ञानाचा विषय अनेक तऱ्हेनें विवेचित केला हें तर खरेंच; पण त्यांनीं न्यायशास्त्र व वैद्यकशास्त्र यांचीहि चांगलीच प्रगति केली. एका बाजूनें—शस्त्रक्रियेच्या बाजूनें—बौद्धांनीं वैद्यकाची हानि केली, तर दुसऱ्या बाजूनें म्हणजे रसायनौषधाच्या बाजूनें त्यांनीं बरीच प्रगति केली असें माझें मत आहे.

असो, यानंतरच्या मध्ययुगांत हिंदुकालांत विद्यांची विशेष प्रगति झाली नसली आणि एक दोन अपवादांसेरीज नवीन विद्यास्थानें अस्तित्वांत आलीं नसलीं, तरी या काळांतहि आर्यांचा विद्याव्यासंग पूर्वीप्रमाणेंच अव्याहत होता. काशी, पैठण इत्यादि पूर्वीचींच विद्यापीठें चाललीं होतीं व विद्यार्जनाच्या बाबतींत थोडीबहुत प्रगति चालू होती, ती केवळ वेदान्तादि तत्त्वज्ञानांतच नव्हे, तर इतर शास्त्रांत विशेषतः वैद्यक व ज्योतिषांत चालू होती. अनेक ज्योतिषग्रंथ या काळांतले असून शेवटचा सिद्धान्तशिरोमणि हा प्रसिद्ध ज्योतिषग्रंथ दाक्षिणात्य भास्कराचार्य यानें या कालांतच लिहिला. भास्कराचार्याचा नातु लक्ष्मीधर यानें ह्या ग्रंथावरून ज्योतिषविद्या शिकविण्याकरितां एक स्वतंत्र कॉलेज स्थापन केलें, असें खानदेशांतील चाळिसगांवाजवळील पाटण गांवीं सांपडलेल्या एका शिलालेखावरून कळतें. त्याचप्रमाणें बंगाल्यांत नवद्वीप अथवा नडिया या शहरीं न्यायशास्त्राचा अभ्यास या काळांत सेनराजांच्या अमदानींत विशेष झाला. हें शहर गंगाकिनारीं असून बेटासारखें असल्यानें त्यास नवद्वीप असें नांव आहे. तेथें संस्कृत शाळा अद्याप टोल या संज्ञेनें प्रचलित आहेत. तेथील विद्यापीठ इ. स.

१०६५ ते १२०३ पर्यंत राज्य करणाऱ्या सेनराजांच्या वेळीं प्रसिद्ध झालें व स्मृतिशास्त्र व न्यायशास्त्र यांचा तेथें विशेष अभ्यास होऊन न्यायाचे प्रसिद्ध ग्रंथकर्ते दीधितिकार रघुनाथशिरोमणि वगैरे येथें झाले. तात्पर्य, आर्यावर्तांत मध्यकाळांत उत्तरेस व दक्षिणेस कांचीपर्यंत निरनिराळया विद्या शिकविणाऱ्या संस्था चालत होत्या किंवा नवीन अस्तित्वांत येत होत्या आणि मुसलमानांचा धर्मविरोधी करडा अम्मल चालू होईपावेतों धर्मशिक्षणाबरोबर इतर शास्त्रें, ज्योतिष, वैद्यक, न्याय, व्याकरण वगैरे शिकविलीं जात होतीं व त्यांची प्रगति होत होती, असें त्या त्या शास्त्रांतील ग्रंथांवरून व ऐतिहासिक लेखांवरून सिद्ध होतें.

हा प्रकार मुसलमानांचा अम्मल हिंदुस्थानांत स्थापन झाल्यानंतर बंद पडला हें साहजिक आहे; पण सृष्टीचा नियमच असा दिसतो कीं, ज्ञानवृद्धीच बंद पडूं नये. इतिहासांत ही एक मौजेची गोष्ट दृष्टीस पडते कीं, प्राच्य देशांत मुख्यतः भरतखण्डांत, विद्याव्यासंग इ. स. च्या १२ व्या शतकांत बंद पडला, तर त्याच सुमारास पाश्चात्य देशांत तो व्यासंग सुरू झाला. हें विद्यार्जनाचें व विद्यासंरक्षणाचें लोण पाश्चात्य देशांत अरबांनीं पोंचविलें असें दिसतें. अरब लोक आपल्यास असंस्कृत व अशिक्षित वाटतात; परंतु खरी गोष्ट तशी नसून त्यांनीं आपल्या अमदानींत विद्येचा व्यासंग चांगलाच चालविला. केवळ तत्त्वविचारांतच ते गुंगून राहिले नाहींत, तर भारती आर्यांचें गणित, ज्योतिष व वैद्यक यांचा अभ्यास त्यांनीं केला व ग्रीक तत्त्वज्ञानाचाहि त्यांनीं पुष्कळ फायदा घेतला. बगदाद व कार्डोव्हा येथील अरबी युनिव्हर्सिट्यांची प्रसिद्धि सकारण प्रस्थापित झाली आहे आणि या विद्यापीठांमार्फतच प्राच्य भारती व युनानी लोकांचें ज्ञान पश्चिमेस पोंचलें. पाश्चिमात्य देशांत या ज्ञानाच्या पायावर फारच पुढें प्रगति झाली ही गोष्ट मान्य करावी लागेल. पाश्चात्य देशांत प्रथम विद्यापीठें इ. स. च्या १२ व्या शतकांत स्थापन होऊन संघटित विद्यार्जन होऊं लागलें असें इतिहासावरून दिसतें. युरोपखंडांत प्रथम युनिव्हर्सिट्या इटालींत बोलोना शहरीं व फ्रान्सांत पारीस येथें इ. स. च्या १२ व १३ व्या शतकांत स्थापन झाल्या असा इतिहास आहे. यानंतर इंग्लंड देशांत आक्सफोर्ड व केंब्रिज या शहरीं विद्यापीठें स्थापन झालीं व हळूहळू जर्मनी, ऑस्ट्रिया वगैरे सर्व युरोपीय देशांत विद्यापीठें

निर्माण झालीं. यांचा प्रारंभ प्रथम एका कॉलेजापासूनच होत गेला व ह्या संस्था त्या त्या ठिकाणच्या सरकारनें स्थापन केलेल्या नसून तेथील निरनिराळ्या शिक्षकांनीं हा संघटित संघ अथवा Corporation स्वरूपाचा प्रकार कायम केला हें लक्षांत ठेविलें पाहिजे. आपल्या इकडील प्राचीन ऋषिकुलांची ही द्वितीय आवृत्ति होय. या विद्यापीठांतून शिकविले जाणारे विषयहि इकडच्या प्राचीन विद्यापीठांतील अभ्यासासारखे होते. ग्रामर, लॉजिक व ऱ्हेटोरिक अर्थात् व्याकरण, न्याय, अलंकार ही एक त्रयी म्हणजे विदग्धविषय आणि गणित, भूमिति आणि ज्योतिष व संगीत ही एक चतुष्टयी म्हणून तिकडे प्रसिद्ध शास्त्रीय विषय होते व यावर पुढें आणखी Law, Theology and Medicine म्हणजे धर्म व धर्मशास्त्र हे विदग्धविषय व वैद्यक हा शास्त्रीय विषय जोडला गेला. या यादींत आणि नारद जे विषय शिकला त्या यादींत फारसा फरक नाहीं. पण हळुहळू पुढें धार्मिक विषय मागें पडून ऐहिक विद्यांवरच पाश्चात्य विद्यापीठांनीं भर दिला आणि त्यांतहि वाङ्मयात्मक विषयांवरील भर कमी होऊन, सायन्स म्हणजे आधिभौतिक शास्त्रांवर पाश्चात्य विद्यापीठांतून जास्त भर दिला जाऊं लागला. हल्लीं पाश्चात्य लोकांचा जो इतका उत्कर्ष—आधिभौतिक उत्कर्ष—आपल्यास दिसत आहे त्याचें मुख्य बीज या भौतिक शास्त्रांच्या प्रगतींतच आहे, हें निर्विवाद आहे; आणि अलीकडे अलीकडे ज्या युनिव्हर्सिट्या इंग्लंड, अमेरिका वगैरे ठिकाणीं स्थापन झाल्या आहेत, त्यांचा कल अधिभौतिक शास्त्राभ्यासाकडे किंबहुना आधिभौतिक कलाज्ञान देण्याकडे जास्त आहे, आध्यामिक अथवा Metaphysical म्हणजे अतिभौतिक विषयाकडे कमी आहे. अशीं विद्यापीठें १९ व्या शतकांत इंग्लंड, वेल्स, स्कॉटलंड वगैरे देशांत अनेक प्रस्थापित झालीं आहेत; व त्यांचा उगम एका कॉलेजापासूनच झालेला आहे. १८२८ त लंडन येथील एका कॉलेजापासून तेथील युनिव्हर्सिटी उत्पन्न झाली; ओवेन्स कॉलेज—मँचेस्टर १८५१, युनिव्हर्सिटी कॉलेज—ब्रिस्टल १८७६, युनिव्हर्सिटी कॉलेज—लिव्हरपूल १८८१, वगैरे संस्था प्रथम निर्माण होऊन त्या त्या ठिकाणीं विद्यापीठें स्थापन झालीं आहेत. हीं कॉलेजें स्थानिक गरजांनीं उत्पन्न झालीं आणि स्थानिक वर्गण्यांनींच चाललीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. निरनिराळे प्रचंड यांत्रिक कारखाने व उद्योग

आणि व्यापार त्या त्या ठिकाणीं चालत असल्यानें त्या त्या कारखान्यांस व उद्योगव्यापारास अवश्य लागणारें शिक्षण देणाऱ्या संस्थांची जरुरी भासणें साहजिक आहे आणि अशा गरजा भागविणारीं कॉलेजें स्थापन झालीं यांत नवल नाहीं व त्यांस पुढें युनिव्हर्सिटीची इभ्रत प्राप्त झाली. पाश्चात्य देशांतील आधिभौतिक शास्त्रांची प्रगति याच कारणामुळें होऊन या शास्त्रांच्या प्रगतीनें कारखान्यांची व उद्योगधंद्यांची प्रगति झाली असा हा अन्योन्य– उपकारसंबंध आहे. प्राचीनकाळीं इकडे १४ विद्या आणि ६४ कला परिगणित असत आणि त्यांचें ज्ञान एकाच गुरूपाशीं किंवा विद्यापीठांत मिळणें शक्य होतें; पण हल्लीं पाश्चत्यांनीं एवढी प्रगति केली आहे कीं, विद्या व कला यांची संख्या दसपट झाली आहे असें म्हटलें तरी चालेल. १४० शास्त्रें म्हणजे विद्या व ६४० कला म्हणजे applied sciences जेथें उत्पन्न झालीं आहेत तेथें नारदासारखा बुद्धिवान मनुष्य सुद्धां सर्व शास्त्रें व कला शिकूं शकत नाहीं हें उघड आहे. तेव्हां श्रमविभागाच्या तत्त्वानें, युनिव्हर्सिटी म्हणजे सर्व विद्यांचें स्थान असा संकेत असला तरी, निरनिराळया विद्यापीठांतून निरनिराळया विद्या शिकविण्याची व्यवस्था अमलांत येणें साहजिक आहे. या दिशेनें पाश्चात्य देशांत शेंकडों कॉलेजें व अनेक विद्यापीठं ज्ञानैकदेश देणारीं स्थापन झालीं आहेत व तीं प्राचीन विद्यापीठांहून भिन्न कार्यक्रमानें विशिष्ट उद्योगधंद्यास अनुकूल असें विशिष्ट गणिताचें व भौतिकशास्त्रांचें ज्ञान पाश्चात्य देशांतून देत आहेत.

यांपैकीं वेल्समधील कार्डिफ येथील कॉलेज व विद्यापीठ इ. स. १८८४ त स्थापन झालेलें असून तें केवळ गरीब लोकांच्या वर्गण्यांवर, विशेषतः चर्चमधून निघणाऱ्या मजुरांपासून मिळविलेल्या धर्मादायावर चालविलें आहे, हें ऐकून आपल्यास आश्चर्य वाटतें आणि आशाहि उत्पन्न होते. टिळक महाविद्यालय ही संस्था अशाच परिस्थितींत स्थापन झालेली असून ती केवळ लोकांच्या–विशेषतः गरीब लोकांच्या–राष्ट्रप्रेमानें दिलेल्या वार्षिक वर्गण्यांवर चालणें शक्य आहे असा या हकीकतीवरून आपणांस भरंवसा वाटतो.

इंग्लंड, स्काटलंड वगैरे ग्रेटब्रिटनमधील जुन्या व नव्या युनिव्हर्सिट्या स्वयंशासित असून सरकारला त्यांच्या कारभारांत कोणताच अधिकार नाहीं, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. किंबहुना या संस्था

प्रारंभीं सरकारनें स्थापलेल्या नसून लोकांनींच स्थापिलेल्या आहेत व त्यांचा सर्व कारभार लोकांनीं व कॉलेजांनीं नेमलेल्या अधिकृत संस्थांकडे सोंपविलेला असतो. यांतील कॉलेजांना सरकारांतून अलीकडे कांहीं देणगी मिळत असते. पण यापूर्वीं म्हणजे एकोणिसाव्या शतकाच्या प्रथमारंभापर्यंत या सर्व संस्था विद्यार्थ्यांच्या फीच्या उत्पन्नावर व धनिक गृहस्थांनीं दिलेल्या स्थायिक उत्पन्नावरच चालत आल्या आहेत. अशा प्रकारची मोठी देणगी विद्यावृद्धीकरितां देणारे लोकांत लॉर्ड कार्नेजी यांचें नांव चिरस्मरणीय राहील यांत शंका नाहीं. त्याचप्रमाणें इतर कित्येक विद्याप्रेमी धनसंपन्न गृहस्थांनीं मोठमोठ्या देणग्या दिल्यानें कित्येक विद्यापीठें ग्रेटब्रिटनमध्यें व अमेरिकेमध्यें अस्तित्वांत येत चाललीं आहेत. त्यांचा सर्वांचा कारभार लोकनियुक्त म्हणजे विद्यार्थिनियुक्त व दातृवर्गनियुक्त सेनेटकडे सोंपविलेला असतो आणि त्याचा मुख्य व जमाखर्चावर देखरेख करणारा अधिकारी चॅन्सेलर, कोठें रेक्टर या संज्ञेनें निवडलेला असतो.

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत प्राच्य देशांत म्हणजे भरतखंडांत व जपान देशांत विद्यापीठें स्थापन झालीं आणि पूर्वेकडे पुन्हा या ज्ञानसंस्था अस्तित्वांत आल्या हें समाधानकारक आहे. पण हिंदुस्थानांत स्थापन झालेल्या युनिव्हर्सिट्या सरकारी नियंत्रणाखालीं असल्यानें, विशेषतः परकीय सत्तेच्या नियंत्रणाखालीं असल्यानें, याच संस्था जपानांत जें कार्य करीत आहेत तें कार्य करण्यास क्षम नाहींत, ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाहीं. परकीय सत्ता साहजिकच राष्ट्रीय भावना उत्पन्न करणाऱ्या किंवा पोषण करणाऱ्या ज्ञानाला विरोधी असणार. तसेंच ज्या उद्योगवृद्धीच्या किंवा भौतिकशास्त्रांच्या ज्ञानावर त्या सत्तेचें बल अवलंबून आहे तें ज्ञान अंकितांस देण्यास– निदान उत्तम रीतीनें देण्यास– त्या सत्तेनें तयार नसावें हेंहि साहजिक आहे. या कारणांनीं सरकारी नियंत्रणाखालीं असलेलीं या देशांतील विद्यापीठें आपलें काम उत्तम रीतीनें करूं शकत नाहींत, यांत आश्चर्य नाहीं. आज हीं साठसत्तर वर्षें अस्तित्वांत असलेलीं विद्यापीठें ज्ञानवृद्धि करण्यास असमर्थ दिसतात, इतकेंच नव्हे, तर योग्य व उत्तम ज्ञान संगृहित करण्यास तितकीं शक्तिमान् नाहींत.

आतां ज्ञान अग्निसमान असून तें पाण्यास सुद्धां जाळून टाकील ही गोष्ट वेगळी; पण ज्ञानसंग्रहास व ज्ञानवृद्धीस अनुकूल अशाच परिस्थितींत विद्यापीठें उत्तम कार्य करूं शकतात. आणि वर दिलेल्या आजपर्यंतच्या जगांतील विद्यापीठांच्या त्रोटक इतिहासाकडे पाहिलें तर सरकारी नियंत्रणाच्या बाहेर असलेलीं, निर्बंध परिस्थितींत लोकांच्या गरजेप्रमाणें लोकांच्या सत्तेखालीं असणारीं, विद्यापीठेंच आपलें कार्य योग्य रीतीनें करूं शकतील हें उघड आहे. अशाच अनेक विविध स्थितीमुळें राष्ट्रीय विद्यापीठें हिंदुस्थानांत या विसाव्या शतकाच्या प्रथमपादाच्या शेवटींशेवटीं निर्माण झालीं असून काशी, अलिगड, अहमदाबाद आणि पुणें या ठिकाणीं तीं प्रस्थापित झालीं आहेत. त्यांतील महाराष्ट्राचें विद्यापीठ लोकमान्य टिळक यांच्या पुण्यस्मृतीस वाहिलेलें सन १९२१ सालीं स्थापन झालें हें प्रसिद्ध आहे.



# वैद्य यांचे

# ऐतिहासिक निबंध

## खंड ३ रा.

# अर्वाचीन काळ

## १ मराठे आर्य आहेत किंवा शक आहेत ?

सर एच्. रिस्ले, सन १९०१ सालच्या सेन्ससचे मुख्य अधिकारी, यांनीं सदर सालच्या खानेसुमारीच्या रिपोर्टांत Race, Caste and Tribe म्हणजे वर्ण, जात आणि कुळ या विषयांवर एक अत्यंत महत्त्वाचा भाग लिहिला आहे. त्यांत अनेक प्रमाणांच्या आधारानें, विशेषत: मनुष्यशीर्षमापनशास्त्राच्या अनुरोधानें हिंदुस्थानच्या प्रत्येक प्रांतांतील लोकांच्या डोक्यांचीं मापें घेऊन त्या मापांवरून हिंदुस्थानांतील लोकांचे त्यांनीं सात वर्ग केले आहेत. त्यांत पश्चिमेकडील भाग म्हणजे पंजाबच्या नैऋत्य कोनापासून सिंध, काठेवाड, गुजराथ, महाराष्ट्र, कोंकण, व त्याच्याहि खालीं मद्रास इलाख्यांतील कुर्ग संस्थानापर्यंतच्या भागांतील लोक हे 'स्किथो द्रविडियन' म्हणजे शक आणि द्रविड यांच्या मिश्रणापासून उत्पन्न झाले आहेत, असा सिद्धांत नमूद केला आहे. "इंपीरियल गझेटीयर" प्रसिद्ध झालें आहे, त्यांत वरील सिद्धांतच कायम धरून त्याप्रमाणें पश्चिम भागांतील लोक—मराठे, गुजराथी वगैरे—शकजातीय आहेत 'हेंच प्रतिपादन केलें आहे. तेव्हां सरकारी रीत्या प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत मराठ्यांची उत्पत्ति वर दर्शविल्याप्रमाणें बहुतक सिद्धांतरूपच ठरली गेली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. पण १९२१ च्या सेन्सस रिपोर्टांत हा सिद्धान्त सोडलेला दिसतो.

या विषयासंबंधानें मीं थोडासा विचार केला असून माहितीहि मिळविली आहे, व माझें मत सदर सिद्धांताच्या अगदीं विरुद्ध आहे. मराठे व

इतर पश्चिम भागांतील लोक हे शक नसून आर्य आहेत असें माझें मत आहे. या विषयावर मीं एक स्वतंत्र निबंध इंग्रजींत लिहिला असून तो मीं मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीपुढें वाचला होता व तो माझें तिसरें पुस्तक " Epic India " प्रसिद्ध झालें आहे त्यांत पहिला भाग म्हणून सामील केलेला आहे. सदर विषयाच्या संबंधानें मराठींत लोकांस माहिती व्हावी ह्या हेतूनें मीं हा विषय घेतला आहे. या विषयाचीं साधक बाधक प्रमाणें जितकीं मला उपलब्ध झालीं आहेत तीं मी वाचकांसमोर यथाशक्ति सरळ व सोप्या रीतीनें ठेवीत आहें.

प्रथमत: ही गोष्ट नमूद केली पाहिजे कीं, सर एच्. रिस्ले यांनीं पश्चिम हिंदुस्थानच्या लोकांसंबधें जरी चूक केलेली आहे, तरी त्यांनीं एकंदर हिंदुस्थानच्या लोकांवर एक महदुपकार केला आहे असें म्हटलें तरी चालेल. नेसूफील्डसारखे कांहीं चमत्कारिक लोक यापूर्वी असें स्पष्ट म्हणत असत कीं, हिंदुस्थानांत आर्य लोक आहेत कीं नाहींत याचीच शंका आहे. " रस्त्यांतील झाडणारा भंगी आणि बनारस संस्कृत कॉलेजमध्यें उच्च प्रतीचें संस्कृत शिक्षण घेणारा एखादा कुलीन ब्राह्मण यांच्यामध्यें, मनुष्य-प्राणिमापनशास्त्रदृष्ट्या, कांहीं फरक आहे असें वाटत नाहीं. " हें नेसूफी-ल्डचें वाक्य आतां अगदीं खोटें ठरलें आहे, असें सर एच्. रिस्ले यांनीं दिलेल्या आंकड्यांवरून व त्यांनीं केलेल्या विभागांवरूनच स्पष्ट आहे. पंजाब, काश्मीर व राजपुताना येथील लोक अस्सल आर्य आहेत व त्यांस त्यांनीं " Indo-Aryans " 'हिंदुस्थानांतील आर्य' अशी संज्ञा दिली आहे. त्यांचीं शरीराचीं व चेहऱ्याचीं मापें पाश्चात्य जर्मन वगैरे आर्यलोकांच्या मापाशीं जुळतात हें आंकड्यांवरून त्यांनीं दाखविलें आहे. सारांश आपल्या वेदादि अनेक जुन्या ग्रंथांवरून हजारों वर्षांपासून जी समजूत आहे कीं हिंदुस्थानांतील लोक आर्य आहेत, ती आधुनिक शास्त्रांच्या आधारानेंहि सिद्ध झाली आहे. पूर्वीं पाश्चात्य विद्वानांच्या नाना प्रकारच्या कल्पना होत्या. रजपूत हे शक आहेत, कारण त्यांच्यांत सतीची चाल आहे, पंजाबांतील जाट लोक हे "जीटी" म्हणून पाश्चात्य इतिहासांत सांगितलेले शक आहेत, कारण दोघांचें नामसादृश्य आहे; वगैरे कल्पना आतां नाहींशा झाल्या किंवा होतील; व नेसूफील्डसारखे चमत्कारिक विधानें करणारे लोक तरी यापुढें तीं करण्यास धजणार नाहींत.

पण हें शकाचें खूळ हल्लीं पंजाब व राजपुताना ह्या प्रांतांवरून निघून त्याहून खालीं महाराष्ट्रावर येऊन पडलें आहे; व तेंहि केवळ कल्पनामूलक नसून त्याजला इतिहासाचा व मनुष्यप्राणिमापनाचाहि आधार दाखविला जात आहे. यामुळें हें शकाचें ओझें मराठ्यांवर व पश्चिम भागाच्या इतर लोकांवर जास्त वजनानें दडपण घालील असा संभव दिसतो.

मनुष्यप्राणिशास्त्रवेत्ते मनुष्याच्या तीन, व कोठें चार, मुख्य जाति मानतात. १ आर्यन, २ मोंगोलियन, ३ इथियोपियन; ४ कांहीं आस्ट्रेलिआईड किंवा आमेरिकन अशी चौथी जात मानतात. पृथ्वीच्या खंडांकडे पाहिलें तर स्थूलदृष्ट्या युरोपांत आर्य जाति आहेत, एशियाखण्डांत मोंगोलियन आहेत, आफ्रिकेंत इथिओपियन आहेत व अमेरिका व आस्ट्रेलिया यांत चौथी जात आहे. प्रत्येक जातीचा वर्ण भिन्न आहे, पण वर्णावर विशेष भिस्त नाही. या निरनिराळ्या जातींच्या मनुष्यांच्या चेहेऱ्याच्या व डोक्याच्या भागाचा आकार भिन्न भिन्न असतो व मनुष्यप्राणिशास्त्रकारांनीं त्यांचीं नवीन मापें बसविलीं आहेत, त्या मापांवरून अमुक लोक अमुक मुख्य जातीचे आहेत असें साधारण स्थूल मानानें सांगतां येतें. अशा तऱ्हेनें हिंदुस्थानच्या सर्व भागांतील मुख्य मुख्य जातींच्या कांहीं व्यक्तींचीं मापें गेल्या सेन्ससच्या वेळीं घेतलीं गेलीं व त्याजवरून सर एच. रिस्ले यांनीं असा सिद्धांत काढला कीं, पंजाब व राजपुतान्यांतील लोक आर्य आहेत; संयुक्त प्रांतांतील लोक आर्यो-द्रविडियन म्हणजे आर्य व द्रविड यांचें मिश्रण आहेत; पश्चिम भागांतील लोक सिथोद्रविडियन आहेत. मद्रास व मध्यहिंदुस्थानांतील लोक द्रविडियन आहेत; आणि बंगाल्यांतील लोक मोंगलो-द्रविडियन म्हणजे मोगल व द्रविड मिश्रणाचे आहेत. तात्पर्य, मराठे व बंगाली यांच्यांत आर्य रक्त नसून शक किंवा मोंगोलियन यांचें रक्त आहे असें रिस्लेसाहेब म्हणतात.

येथें हें सांगितलें पाहिजे कीं, आम्ही आर्य नसलों तरी आमची कांहीं नामोशी जाते अशी गोष्ट नाहीं. जगाचा इतिहास पाहातां आर्य लोक तेवढे शूर, बुद्धिवान् व साहसी असतात अशी गोष्ट नाहीं. कदाचित् असा कित्येकांचा समज असेल तर तो चुकीचा आहे. जगाच्या इतिहासांतील अत्यंत प्राचीन व अत्यंत अर्वाचीन अशा दोन्ही गोष्टींनीं हा समज खोटा ठरतो. बाबिलोनिया येथील अत्यंत प्राचीन सुधारणा सुमेरियन लोकांची

होती, अर्थात् सुमेरियन लोक हे सर्व जगांतील भावी सुधारणेचे उगम होत, असें म्हटलें तरी चालेल. ते लोक ट्युरेनियन म्हणजे शक जातीचे होते. अगदीं अर्वाचीन गोष्ट म्हटली म्हणजे जपानची होय. शहाणपणाचा, ज्ञानाचा, शौर्याचा, एकीचा, राजनीतीचा, शास्त्रीय शोधांचा मक्ता आजपर्यंत यूरोपियन–आर्य राष्ट्रें आमचाच आहे असें समजत होतीं. परंतु या कल्पनेस जपाननें रूसो–जपानी युद्धांतील आपल्या अलौकिक कर्तबगारीनें, पोर्ट आर्थरच्या किल्ल्याप्रमाणें, जमीनदोस्त केलें आहे. तात्पर्य हें कीं, आमचे पूर्वज आर्य होते असें मानलें किंवा शक होते असें मानलें तरी दोन्ही गोष्टींत आमच्या कर्तबगारीच्या शक्यतेंत कमतरता येते असें मुळींच नाहीं. मात्र, हल्लीं कोणत्याच प्रकारची कर्तबगारी आम्हांत नसून केवळ वडिलांच्या फुशारकीवर स्वस्थ बसणें असेल तर आम्ही नालायक आहों यांत शंका उरणार नाहीं.

पण हा प्रश्न नामोशीचा नाही, ऐतिहासिक सत्यसंशोधनाचा आहे. हिंदुस्थानांतील प्राचीन ग्रंथ आम्हांस आर्य म्हणत आले. "अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन" "स्त्रीणामार्यस्वभावानां परमं दैवतं पतिः" इत्यादि अनेक ग्रंथांतील वचनांतून किंबहुना वैदिक ऋचांतून आम्हीं आपल्यास आर्य म्हणवून आपली थोरवी गाइली आहे. तेव्हां या आर्य शब्दांत फक्त पंजाब राजपुतान्यांतील ब्राह्मण-क्षत्रिय वैश्यच येतात, किंवा गुजराथ-महाराष्ट्रांतील येतात' हा एक मोठा महत्वाचा प्रश्न आहे. तिकडील लोकांस युरोपियन लोक व इंग्रज आपले बंधु म्हणावयास तयार आहेत; परंतु गुजराथ, महाराष्ट्र, बंगाल व मद्रास या ठिकाणच्या द्विजांस बंधु म्हणावयास ते तयार नाहींत. असें म्हणणें इतिहासाच्या व मनुष्यप्राणिमापनशास्त्राच्या आधारें शक्य नाहीं असें जें सर एच्. रिस्ले यांणीं प्रतिपादन केलें आहे, या म्हणण्यांत कितपत तथ्य आहे हें पाहाणें जरूर आहे. ज्या प्राचीन ऋषींचे वंशज पंजाब राजपुतान्यांतील लोक आहेत, त्यांचेच वंशज आम्ही आपल्यास समजतों. तेव्हां हें आमचें समजणें निर्मूल आहे किंवा आधारभूत आहे हें पाहिलें पाहिजे. प्रथम आपण रिस्ले साहेबांनीं कोणत्या पायावर हा सिद्धांत उभारलेला आहे तें पाहूं.

शकांचा इतिहास सर एच्. रिस्ले यांणीं थोडक्यांत १९०१ च्या "सेन्सस रिपोर्टाच्या" ४१२ व ४१३ पृष्ठांवर दिला आहे, तो येणेंप्रमाणें:—

शक लोक प्रथम इराणाचा बादशाह कायरस याचे वेळेस इतिहासांत दृष्टीस पडतात. दारिउसनें त्यांच्यावर स्वारी केली होती. अलेक्झांडरनें (इ. स. पूर्वी ३२३) इराणी लोकांस आराबेलाच्या लढाईंत जिंकलें त्या वेळीं शक लोक इराण्यांचे मदतीस आले होते. इ. स. पू. २१७ त बाक्ट्रि-यन राज्य स्थापन झालें, त्या वेळेस शकांस यूची लोकांनीं आपल्या स्थानांतून हाकून दिलें. तेव्हां ते पारोपामिसस पर्वत उतरून अलीकडे आले व तेथें वसाहत करून राहिले. त्या प्रदेशास अजून शकस्तान किंवा सेजिस्तान म्हणतात. तेथूनहि त्यांस यूची लोकांनीं इ. स. पू. २५ चे सुमारास हांकून लाविलें. तेव्हां ते पंजाबच्या पश्चिमेकडील भागांत एके ठिकाणीं राज्य स्थापून राहिले. या टोळीचा पुढें इतिहास दिलेला नाहीं.

यूची लोक हे मोंगोलियन जातीचेच होते. त्यांनींहि हिंदुस्थानाच्या वायव्य कोपऱ्यांत बरींच वर्षे राज्य भोगिलें. ते तेथें इ. स. पू. १३५ पासून इ. स. ४२५ पर्यंत राज्य करीत होते. त्यांच्या राजांस कुशान ही संज्ञा होती. हिंदुस्थानचे लोक त्यांस शक किंवा तुरुष्क (तुषार) म्हणत असत.

यानंतरची तिसरी टोळी इफ्थालाईटस किंवा हिंदु लोक ज्यांस हूण म्हणत त्यांची होय. ती इ. स. ४५२–४८० पर्यंत हिंदुस्थानांत येऊन पोंचली व गुप्त राज्याचा तिनें उच्छेद केला. लख्खन उदयादित्य हा त्यांचा राजा होता. त्यानें कुशान लोकांपासून गांधार देश हिसकून घेतला व आपली राजधानी शाकल येथें केली. त्याचा पुत्र तोरमाण ४९० पासून ५१५ पर्यंत राज्य करीत होता. त्यानें गुजराथ, राजपुताना आणि गुप्त राज्य यांचा पाडाव केला. त्याचा पुत्र मिहिरकुल यानें काश्मीर जिंकिलें; परंतु शेवटीं माळवा व मगध यांच्या हिंदु राजांनीं एकत्र होऊन हूणांचा पराभव केला.'

या ऐतिहासिक गोष्टींवरून सर एच्. रिस्ले असें अनुमान काढतात कीं, पंजाबांत प्रथम आलेले शक हे इतर लोकांनीं खालीं ढकलल्यामुळें हळूहळू महाराष्ट्रांत कुर्ग देशापर्यंत पसरले. पूर्वीचें अनुमान असें होतें कीं, हेच शक लोक म्हणजे रजपूत किंवा जाट असावे; परंतु ज्या अर्थीं रज-पूत व जाट हे उंच शरीराचे व लांब डोक्याचे आहेत, त्या अर्थीं त्यांचा संबंध शकांकडे लागत नाहीं. तेव्हां हे शक कोठें गेले याजविषयीं एवढाच तर्क दिसतो कीं, ते मराठ्यांचे पूर्वज होते. मराठे ठेंगणे व रुंद डोक्याचे

असून शकांप्रमाणेंच घोडयावर बसणारे पटाईत आहेत. याशिवाय मराठ्यांच्या इतिहासाचें स्वरूपहि शकांच्या गुणांशीं जुळतें आहे. येथील इंग्रेजी वाक्य सदर रिपोर्टांतून उतरून घेण्यासारखें आहे. सर एच्. रिस्ले म्हणतातः– "Nor is it wholly fanciful to discover some aspects of Maratha history which lend this theory incidental support. On this view the wide-ranging forages of the Marathas, their guerilla methods of warfare, their unscrupulous dealings with friend and foe, their genius for intrigue and their consequent failure to build up an enduring dominion and finally the individuality of character and tenacity of purpose which distinguish them at the present day, all these may be regarded as parts of an inheritance which has come to them from their Scythian ancestors."

वरील उताऱ्यावरून वाचकांच्या लक्षांत हें सहज येईल कीं, मराठ्यांविषयीं व त्यांच्या राज्याविषयीं प्रतिकूल ग्रह सर एच्. रिस्ले यांच्या मनांत पूर्वीपासून वसत असल्यामुळें मराठ्यांच्या उत्पत्तीविषयींचा हा चुकीचा सिद्धांत त्यांनीं केला असावा. वरील विधानांत दोन गोष्टी सिद्ध धराव्या लागतात. १ शक लोक अशा वाईट गुणांचे होते, व २ मराठे लोक अशा प्रकारचे होते व आहेत. शकांविषयीं प्रतिकूल मत कायम करण्यास इतिहासांत कांहीं सुद्धां आधार सांपडलेला नाहीं. दारिउसनें आपल्या प्रचंड सैन्यानिशीं स्किथियावर स्वारी केली, त्या वेळेस शकांनीं 'ग्वेरिला वारफेर' म्हणजे पळती लढाई करून त्यास जेरीस आणलें हेंच जर आधारभूत धरणें असेल, तर एवढ्यावरून ते लोक लुच्चे किंवा भित्रे होते असें समजतां येत नाहीं. अवरंगजेबाच्या प्रचंड सैन्याशीं झगडतांना मराठ्यांनीं याच तत्त्वाचा अवलंब केला हें त्यांच्या स्वभावामुळें नव्हे तर दोन्ही सैन्यांच्या संख्येच्या अंतरामुळें होय. अशाच प्रकारच्या गनिमी काव्याचा अवलंब बोअर लोकांनीं केला; व तो याच कारणामुळें, म्हणजे शत्रूचें सैन्य प्रचंड व आपलें थोडें म्हणून, हें नुकतेंच आपल्या समोरचें उदाहरण आहे. यावरून बोअर लोक लबाड आहेत असें कदाचित् इंग्रज म्हणत असतील, पण जग तसें म्हणणार नाहीं; आणि ते शक तर नाहींतच. आर्य युरोपीय आहेत. किंबहुना बलाढ्य शत्रूशीं अशा प्रकारचा सामना करून त्यास जेरीस

आणिलें याजबद्दल शकांची, मराठ्यांची व बोअर लोकांची इतिहासांत तारीफच केलेली आढळते. मराठ्यांच्या इतिहासांतील unscrupulous dealings with friend and foe चें उदाहरण सर एच्. रिस्ले यांच्या कोणतें लक्षांत होतें हें समजत नाहीं. परंतु एखादें उदाहरण असलें तर तेवढ्यावरून त्या सर्व लोकांचा हा गुण आहे असें कोणी समजणार नाहीं. अशा प्रकारच्या unscrupulous dealings with friend and foe चें उदाहरण इंग्रजांच्या इतिहासांत लार्ड क्लाईवचेंच धडधडीत आहे. असें आहे तरी सरसकट इंग्रजांच्या स्वभावाबद्दल अशा प्रकारचा आरोप न्याय्य होणार नाहीं हें उघड आहे. सारांश, मराठ्यांविषयींच्या अप्रशस्त व निराधार वाईट कल्पना सर एच्. रिस्ले यांच्या डोक्यांत असल्याकारणानें त्यांची विचारदिशा चुकली आहे हें उघड आहे.

पण मी मराठा आहें, या कारणानें वर दिलेलें मराठ्यांच्या तर्फेचें समर्थन बाजूला ठेवूं, आणि शक लोकांच्या कल्पित स्वभावाप्रमाणें मराठ्यांचाहि स्वभाव खराब होता किंवा आहे, हें सर एच्. रिस्ले यांचें म्हणणें कबूल करूं. पण या विचारसरणीनें सर एच्. रिस्ले यांच्या सिद्धांतास केवढा धक्का बसतो आहे हें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं. शकांचा संबंध नुसता मराठ्यांशीं असता तर हें अनुमान ठीक होतें. परंतु हिंदुस्थानांतील पश्चिम भागांतील गुजराथी, सिंधी, कच्छी, तसेंच कोंकणी, कुर्गी वगैरे सर्वत्र लोकांची उत्पत्ति सर एच्. रिस्ले यांच्या सिद्धांताप्रमाणें जर शकांपासून आहे, तर शकांचे दुष्ट स्वभाव या सर्व लोकांत आले पाहिजे होते. मग ते एकट्या मराठ्यांतच दिसतात याचें कारण काय? गुजराथी, कच्छी, सिंधी हे तर घातकी स्वभावाचे नाहींत ना? मग त्यांना ही शकांची पूर्वपीठिका कशी लागू पडते, याचा विचार सर एच्. रिस्ले साहेबांनीं करावयास पाहिजे होता.

दुसरी गोष्ट अशी कीं, मनुष्यस्वभाव बदलतो अशींहि उदाहरणें इतिहासांत सांपडतील. कदाचित् गुजराथी पूर्वीं वाईट स्वभावाचे होते ते आतां बदलले असें कोणी म्हणेल, तर मराठे पूर्वीं अशा स्वभावाचे नव्हते असें म्हणतां येईल. इतकेंच नव्हे, तर या मराठ्यांच्या कल्पित स्वभावाविरुद्ध हुएन सँग या चिनी प्रवाशाच्या वेळेस त्यांचा स्वभाव होता असें त्यानें लिहिलेल्या वर्णनावरून स्पष्ट दिसतें. हें वर्णन सर एच्. रिस्ले

यांनींहि आपल्या लेखांत उतरून घेतलें असून त्याचा विरोध त्यांचे लक्षांत कसा आला नाहीं हें आश्चर्य आहे. हुएन संग महाराष्ट्रांत आला होता त्या वेळेस पुलकेशी नांवाचा राजा तेथें राज्य करीत होता. त्याच्या सैन्याविषयीं त्यानें असें वर्णन केलें आहे कीं 'हे लोक शत्रूवर चालून गेले असतां परत फिरणें त्यांस ठाऊकच नाहीं. मदोन्मत्त होऊन ते शत्रूवर तुटून पडतात व जय किंवा मृत्यु याशिवाय तिसरी गोष्ट ते जाणत नाहींत' "शत्रूवर एकाएकीं घाला घालणें त्यांस आवडत नाहीं. उलट, हल्ला करण्यापूर्वीं शत्रूस ते आगाऊ जागे करितात." हें मराठ्यांचें स्वभाववर्णन अगदींच उलट आहे. इतकेंच नव्हे, तर मराठे शरीरानें उंच व धिप्पाड असतात असेंहि त्यानें वर्णन केलेलें आहे. जसा स्वभाव बदलतो तशी मनुष्याची उंची कमीजास्त होते. मराठे ठेंगणे असतात ही कल्पना हल्लींहि चुकीची आहे असें मला वाटतें. मराठे शिपायांत उंच शिपाई गडी कांहीं थोडे नसतात असें फौजेंत पाहिलें असतां दिसतें.

असो, याप्रमाणें मराठ्यांच्या उत्पत्तीच्या सिद्धांताची इमारत ज्या तीन पायांवर उभी केली आहे त्यांपैकीं पहिला पाया, म्हणजे शकांचें व मराठ्यांचें स्वभावसाम्य, तो पाया खचून जातो. याहिपेक्षां इतिहासाचा दुसरा पाया लंगडा व डळमळित आहे. शक लोक हिंदुस्थानांत कसे, केव्हां व किती टोळ्यांनीं आले याबद्दल सर एच्. रिस्ले यांनीं दिलेली हकीकत वर थोडक्यांत दिली आहे. पहिली टोळी इ. स. २५ च्या सुमारास प्रथम पंजाबच्या वायव्य कोपऱ्यांत आली. दुसरी टोळी यूची इ. स. १३५ पासून ४३५ पर्यंत वायव्य कोणांत राज्य करीत होती. तिसरी हूणांची टोळी ही इ. स. ४९५ पासून ५१५ पर्यंत उत्तर हिंदुस्थानांत होती. यांपैकीं कोणती टोळी महाराष्ट्रांत आली हें सर एच्. रिस्ले हे ऐतिहासिक प्रमाणांवरून दाखवूं शकत नाहींत. केवळ अनुमानानें पहिली टोळी किंवा पहिल्या दोन इकडे उतरल्या असतील असें त्यांचें म्हणणें आहे. सर एच्. रिस्ले यांनीं प्राचीन इतिहासाची माहिती पुरी दिली नाहीं; किंवा त्यांस अलीकडचे शोध माहीत नसावे. काठेवाड व उज्जनी येथें क्षत्रपांचें राज्य होतें तें शकांचेंच होतें असें डाक्तर भांडारकरांचें मत आहे, व तें ठीक आहे. हें राज्य खिस्ती शकाच्या पहिल्या शतकाच्या दुसऱ्या भागांत शकांनीं स्थापित केलें असें त्यांचें मत आहे. तें शके ३१० म्हणजे इ. स.

३८८ पर्यंत उज्जनीस असून पुढें आर्यलोकांच्या गुप्त राजांनीं नाहींसें केलें असें डा. भांडारकर, स्मिथ वगैरे सर्व पंडितांचें मत आहे. ख्रिस्ती शकाच्या पहिल्या शतकाच्या शेवटीं क्षत्रपांनीं महाराष्ट्रावर स्वारी करून शातकर्णी अथवा शातवाहन नांवाचे राजे येथें राज्य करीत त्यांस जिंकिलें. परंतु फिरून लागलीच गौतमीपुत्र शातकर्णी यानें शकांचा पराभव करून त्यांस महाराष्ट्रांतून हाकून लाविलें 'The Shakas ruled in Deccan for about one generation only' असें डाक्तर भांडारकर यांनीं आपल्या लेखांत स्पष्ट लिहिलें आहे. असो. ग्रिस्ले साहेबांनीं दिलेल्या इतिहासावरून व डा. भांडारकर व स्मिथ वगैरेनीं दिलेल्या हकीकतीवरून शकांचा हिंदुस्थानांत प्रादुर्भाव इसवी सनाच्या पहिल्या शतकाच्या पूर्वीं जात नाहीं हें उघड आहे. व महाराष्ट्रांत ते इ. स. ७८ किंवा त्या सुमारास फक्त ३० वर्षे होते. त्यांना येथून शातवाहनांनीं हाकलून लाविलें ही गोष्ट सिद्ध आहे.

पण मराठ्यांचें नांव व महाराष्ट्रांत आर्यांची वस्ती यापूर्वीं कित्येक शतकें असल्याचें ऐतिहासिक साधनांवरून स्पष्ट दिसत आहे. ख्रिस्ती सनानंतर शक हिंदुस्थानांत आले, पण ख्रिस्ती शकापूर्वीं २५० वर्षे होऊन गेलेल्या अशोक राजाचे जयस्तंभ ठिकठिकाणीं रोविलेले हल्लीं उभे आहेत; त्यांत पैठनिक व रठी या दोन लोकांचा उल्लेख केलेला आहे. हेच महाराष्ट्रीयांचे पूर्वज होत, हें डाक्तर भांडारकर यांनीं, आपल्या दक्षिणच्या इतिहासांत दाखविलें आहे. रठी, महारठी व मराठे अशी परंपरा प्रसिद्ध आहे राष्ट्रिक याचेंच नांव पुढें राष्ट्रकूट पडलें. पण महाराष्ट्र हें नांव सर्व देशाला यापूर्वींच लागू झालेलें होतें. महाराष्ट्री ही एक स्वतंत्र प्राकृत भाषा होती हेंहि प्रसिद्ध आहे. या भाषेंतील सप्तशती हा ग्रंथ इ. स. ६० त हाल राजाच्या वेळेचा आहे, असें स्मिथनें आपल्या इतिहासांत स्पष्ट म्हटलें आहे. या भाषेंत ग्रंथ पैठण येथें इ. स. ६० त झाला, याजवरून महाराष्ट्री ही भाषा इ. स. च्या पूर्वींपासूनच प्रचलित असली पाहिजे, हें निर्विवाद आहे. सारांश, अशोकापासून म्हणजे इ. स. पू. २५० पासून इसवी सनाच्या प्रारंभापर्यंत जर ऐतिहासिक दाखल्यानें महाराष्ट्र लोक व महाराष्ट्री भाषा यांचें अस्तित्व स्पष्टपणें शाबित होत आहे, तर इ० सनाच्या पहिल्या शतकांत आलेल्या शकांपासून मराठ्यांची उत्पत्ति आहे हें म्हणणें इतिहासाच्याच आधारावरून किती वेडेपणाचें आहे हें सहज लक्षांत येईल.

महाराष्ट्रांत आर्य लोकांची वसति केव्हांपासून व कशी झाली याजबद्दल डाक्तर भांडारकर यांनीं आपल्या ग्रंथांत उत्तम रीतीनें वर्णन केलेलें आहे. त्यांच्या मतें इ० स० पूर्वींच्या सातव्या शतकांत महाराष्ट्रांत आर्यांची वसति झाली असावी. गौतम बुद्धाच्या वेळेस महाराष्ट्रांत आर्यांची वसति खास होती हेंहि, मला वाटतें, निर्विवाद आहे. विदर्भदेश, पैठण व सोपारा हीं शहरें बुद्धाच्या वेळेस ठाऊक होतीं, आणि या देशांत ब्राह्मणधर्म सर्वत्र प्रचलित होता हेंहि 'पूर्ण' याच्या बौद्ध कथेवरून स्पष्ट आहे. पूर्ण हा सोपारा अथवा शूर्पारक येथील राहणारा असून त्या वेळेस तेथें ब्राह्मण धर्माचे लोक होते व शिव, विष्णु, इंद्र, ब्रह्मा इत्यादिकांची ते भक्ति करीत. बनारसेहून आलेल्या कांहीं बौद्ध व्यापाऱ्यांकडून पूर्णास बुद्धाची हकीगत समजली व त्यानें बनारसेस जाऊन बुद्धापाशीं उपदेश घेतला व आपल्या सौजन्यानें व वादशक्तीनें बौद्ध धर्माचा प्रसार शूर्पारक देशांत केला ही दंतकथा फार महत्त्वाची आहे. अशोकानेंहि या अपरान्त म्हणजे शूर्पारक देशांत एक यवन भिक्षु उपदेशाला पाठविला व त्यानें एक हजार पुरुष व एक हजारांहून अधिक स्त्रिया अशा सर्व क्षत्रिय जातीच्या लोकांस धर्मांतर करावयास लावलें, अशी कथा महावंशांत आहे. शूर्पारक येथें अशोकाचा स्तंभहि सांपडला आहे. 'The carving of Ashoka's edict ( B. C. 225 ) remains the earliest known fact in the history of the Thana district.' इ. स. २२५ चे पूर्वीं उत्तर कोंकणांत ब्राह्मण धर्म होता व ब्राह्मण व क्षत्रिय त्यापूर्वीं इकडे आले होते, एवढी गोष्ट येथें निर्विवाद आहे. महाभारतांत जरी महाराष्ट्राचें नांव नाहीं तथापि या लोकांस त्या वेळेस दाक्षिणात्य ही संज्ञा होती असें दिसतें; महारट्ठ ही संज्ञा राष्ट्रिकावरून अशोकानंतर व खिस्ती सनापूर्वीं अमलांत आली हें पूर्वीं दाखविलेंच आहे. महाभारतावरून विदर्भ देश दाक्षिणात्यांत मोडत होता हें सिद्ध होतें. विदर्भ देश म्हणजे वऱ्हाड. येथें आर्य लोकांची प्रथम वस्ती झाली असें वाटतें. रुक्मिणी ही विदर्भ देशाच्या राजाची मुलगी होती. "रुक्मिणं दाक्षिणात्येषु योधयामास सूतजः" असें महाभारतांत म्हटलें आहे. तसेंच " आकूतीनामधिपतिर्भोजस्यातियशस्विनः। दाक्षिणात्यपतेः पुत्रो दिक्षु रुक्मीति विश्रुतः" या श्लोकांतहि रुक्मी याजला दाक्षिणात्यपति म्हटलें आहे. हे आर्य भोजकुळांतले होते असें दिसतें. दक्षिणेंत यदुकुलांतले लोक येऊन त्यांनीं तीन देश स्थापिले अशी हकीकत हरिवंशांत आहे. यदूचे नागकन्यांपासून उत्पन्न झालेले दोन पुत्र पद्मवर्ण

आणि सारस यांणीं करवीर आणि क्रौंच या दोन राजधान्या स्थापन केल्या. करवीर ही राजधानी पद्मावती देशाची असून हा देश वेणानदी भोंवतालचा प्रदेश होय व क्रौंच ही राजधानी वनवासी देशाची असून हा देश तुंगभद्रानदीच्या कांठीं होता. सारांश, असें अनुमान करण्यास हरकत नाहीं कीं, बुद्धाच्या पूर्वीं भोज, यादव वगैरे आर्यांनीं माहाराष्ट्रांत येऊन विदर्भ, पैठण, करवीर वगैरे ठिकाणीं वसाहती केल्या. हे लोक बहुधा पश्चिम किनाऱ्याकडून व नर्मदा उल्लंघून आले असावे.

महाराष्ट्रांत मूळ आर्यांनींच वसाहत केली याजला याहून एक भक्कम पुरावा आहे. टालमीच्या भूगोलांत या देशाला Ariake किंवा आर्यस्थान असेंच नांव दिलेलें आहे. टालमीनें या आर्य देशाचें जें वर्णन केलें आहे तें तंतोतंत महाराष्ट्राशीं जुळतें. मॅकक्रिडल म्हणतो " Ariake corresponded nearly with Maharashtra, the country of the Marathas. It may have been so called because its inhabitants being chiefly Aryans and ruled by their princes were thereby distinguished from their neighbours. " दक्षिण भागांत पांड्य, चोल, केरल वगैरे सर्व म्लेंच्छ देश किंवा द्रविड देश होते, फक्त महाराष्ट्र हाच आर्य देश होता. याजवरूनच महाराष्ट्राला महाराष्ट्र हें नांव मिळण्यापूर्वीं आर्यदेश असें म्हणत असत. Ariake याचें जें वर्णन टालमीनें दिलें आहे तें फार महत्त्वाचें व मनोरंजक आहे. Ariake याचे त्यानें तीन भाग केले आहेत. १ कल्याण, सोपारा, २ समुद्र-किनाऱ्यवरील व ३ घांटावरील. समुद्रकिनाऱ्यावरील पहिला भाग कल्याणचा होय. येथें सॉडेनीस राज्य करीत होता. या भागांतील मुख्य बंदर सोपारा म्हणून दिलें आहे. दुसरा भाग चांच्यांचें Ariake, म्हणजे कुलाबा, रत्नागिरी किंवा दक्षिण कोकण समजलें पाहिजे. या भागांतील लोक चांचे तेव्हांपासून होते व दर्यावर्दीपणाबद्दल मराठ्यांच्यापर्यंत त्यांची ख्याति होती. तिसरा भाग घाटावरील. यांतील मुख्य शहरें पैठण व तगर हीं होत. हे निरनिराळे भाग Ariake या एकाच नांवानें प्रसिद्ध होते, यावरून असें अनुमान निघतें कीं, हे लोक एक भाषा बोलणारे व एक वंशाचे असावे. मराठी भाषेस कानडी लोक अद्याप आर्यमात या नांवानें निर्दिष्ट करतात. याजवरून वरील अनुमानास विशेष बळकटी येते. टालमीला माहिती Alexander चे वेळेपासून म्हणजे ३२० पासून मिळत गेली होती व त्याचा ग्रंथ इ. स. १५० चा आहे याजवरून महाराष्ट्र देश आर्यांनीं वसविला होता व तोहि शकाच्या पूर्वीं हें निर्विवाद आहे.

सारांश, बौद्धांच्या ग्रंथांतील पूर्ण याच्या दंतकथेवरून, अशोकाच्या जयस्तंभांत सांगितलेल्या राष्ट्रिक व पैठनिक या लोकांच्या नांवांवरून, इ० स० ३८ त हाल राजानें केलेल्या महाराष्ट्री भाषेंतील ग्रंथावरून, महाभारत व हरिवंश यांतील दंतकथांवरून व टालमीच्या भूगोलावरून रिस्लेचा सिद्धान्त खोटा ठरतो. शकांचा महाराष्ट्राशीं संबंध इ. सन ७८ नंतर सरासरी २५।३० वर्षे होता, त्यापूर्वींच जर महाऱ्यांचा माग लागतो व जर या देशास आर्य देश ही संज्ञा टालमीनेंहि दिली आहे, तर मराठ्यांच्या अंगांत आर्यरक्त नसून शकांचें रक्त आहे हें म्हणणें इतिहासदृष्ट्या कितपत टिकण्यासारखें आहे याचा वाचकांनींच विचार करावा. शक लोक महाराष्ट्रांत इ० स० ७८ चे नंतर २५–३० वर्षेच होते व नंतर शातवाहानांनीं त्यांस येथून हाकलून दिलें या गोष्टीचा विचार केला म्हणजे शकांचा येथें मागमूसहि राहिला नसावा असेंच म्हणावें लागतें. हा देश प्रथम अरण्य होता, तेथें आर्यांनीं वसति केल्यावर नवीन लोक त्यांत फैलावतील व जुन्या वसाहत करणाऱ्यांचा पत्ता राहणार नाहीं हें मुळींच संभवत नाहीं.

आतां आपण सर एच्. रिस्ले यांच्या सिद्धान्ताच्या इमारतीच्या तिसऱ्या पायाचा विचार करूं. स्वभाव किंवा इतिहास या दृष्टीनें शकांचा आणि मराठ्यांचा कोणताहि संबंध नसला, तरी मराठ्यांच्या डोक्याच्या आकारावरून व इतर अवयवांच्या ठेवणीवरून ते आर्य नाहींत किंबहुना शक आहेत असेंच जर सिद्ध होत असेल, तर मग आपल्यास पळावयास वाट नाहीं ही गोष्ट खरी आहे. याकरितां मनुष्यप्राणिमापनशास्त्राच्या अनुमानावर जी सर एच्. रिस्ले यांणी भिस्त ठेविली आहे, त्या दृष्टीनें विचार करणें अत्यावश्यक आहे. सर एच्. रिस्ले यांनीं आपल्या लेखांत या शास्त्राची थोडीबहुत माहिती दिली आहे; व तेवढीच या विषयाच्या समजुतीकरितां पुरे आहे, असें मी समजतों. प्रथमारंभीं मीं सांगितलेंच आहे कीं, मनुष्यप्राण्यांत आर्यन व मोंगोलियन ह्या दोन मुख्य जाती आहेत व त्यांच्याशींच आपल्या विषयाचा संबंध आहे. शक हे इराणियन असावे अशी कांहीं लोकांची समजूत आहे; व या दृष्टीनें ते प्रतिपादन करतात. कदाचित् तें तसें असूं शकेल. पण सर एच्. रिस्ले हे त्यांस इराणियन समजत नाहींत, कारण इराणियन म्हणजे आर्यनच होत. शक लोक मूळचे मोंगोलियन जातीचेच असावे असें मला वाटतें व रिस्ले साहेबांनींहि तीच गोष्ट गृहीत धरली आहे.

शकांची जात हल्लीं शिल्लक नाहीं; तथापि मोंगोलियन जातीच्या ज्या कांहीं खुणा आहेत, त्या शकांच्या होत्या असें सर एच्. रिस्ले साहेब समजतात, व मीहि समजतों. आतां आर्यन लोकांच्या व मोंगोलियन लोकांच्या शीर्षरचनेंत काय फरक हल्लीं आहे हें पाहूं. Brachycephale and Dolichocephale म्हणजे रुंद डोकें व लांब डोकें असे डोक्याचे दोन भेद मनुष्यप्राणिमापनशास्त्रवेत्ते करितात. त्यांचीं मापेंहि डोक्याची लांबी १०० कल्पून कायम केली आहे. युरोपांतील बहुतेक आर्यन समजलेल्या जाति लांब डोक्याच्या आहेत व आशियांतील मोंगोलियन जाति बहुतेक रुंद डोक्याच्या आहेत. पण या नियमास कांहीं अपवाद आहेत. फ्रान्स व स्पेन देशांतील व आयर्लंदांतील कांहीं केल्ट जाति आर्यन असून रुंद डोक्याच्या आहेत; आणि आशियांतील मांचू वगैरे कांहीं मोंगोलियन जाति लांब डोक्याच्या आहेत. सारांश, नुसतें डोकें रुंद असल्यानें अमुक जात मोंगोलियन आहे असा सिद्धांत काढतां येत नाहीं. ही गोष्ट सर रिस्ले यांच्या ध्यानांत राहिली नाहीं. मराठ्यांच्या संबंधाच्या पूर्व कल्पनांनीं भ्रम उत्पन्न झाल्यामुळें सर एच्. रिस्ले यांची चूक येथेंच झाली आहे. मराठ्यांचीं व गुजराथ व इतर पश्चिम भागांतील वरिष्ठ जातींचीं डोकीं रुंद असतात ही गोष्ट खरी मानली तत्रापि तेवढ्यावरून हे लोक आर्य नाहींत असें म्हणणें चुकीचें होणार आहे. याबरोबर हीहि गोष्ट येथें नमूद केली पाहिजे कीं द्रविडियन लोकांचींहि डोकीं लांब असतात, व आपल्या इकडील कातकरी, भिल्ल वगैरे लोक लांब डोक्याचे आहेत, असें सर एच्. रिस्ले यांनीं परवां सेन्ससच्या वेळेस घेतलेल्या मापांवरूनच सिद्ध आहे. सारांश, नुसतें डोकें लांब आहे एवढ्यावरून अमुक लोक आर्य आहेत हें सांगतां येत नाहीं. जातीचें मुख्य दर्शक नाक आहे असें मनुष्यप्राणिशास्त्रवेत्ते मानतात. अमुक एक लोक मोंगोलियन आहेत किंवा आर्यन आहेत हें ठरविण्यास नाकाचा भाग पाहिला पाहिजे. ही गोष्ट सर एच्. रिस्ले यानींहि आपल्या 'Study of Ethnology in India' ह्या निबंधांत यापूर्वीं कबूल केली आहे. तेथें त्यांनीं प्रोफेसर फौलर यांचे मताचा उतारा घेतला आहे तो महत्वाचा असल्याकारणानें येथें देतों:— "For the supposed affinity of a people with the Mongolian races, I would prefer this to any other measurement, as platyopy is far more characteristic of these races than brachycephale." 'अमुक लोक मोंगोलियन आहेत किंवा

नाहींत हें समजण्यास रुंद डाक्यापेक्षां बसकें नाक हें विशद लक्षण आहे.' असें या वाक्याचें मथित आहे. बसकें नाक कसें असतें हें समजण्यास जें माप घेतलें जातें तें असें:—तोंडाच्या सपाटीपेक्षां नाकाच्या मुळाची उंची किती आहे हें पाहिलें जातें; व याचें दर्शक जें माप त्यास Orbito-nasal index किंवा Naso-malar index असें म्हणतात. अगदीं नाकाचें मूळ तोंडाच्या सपाटीबरोबर असेल तेव्हां इंडेक्स १०० कल्पून तें मूळ जसजसें उंच होत जाईल तसतसा इंडेक्स वाढत जातो. १०७ पर्यंत Platyopy म्हणजे बसकें नाक; १०७ पासून ११३ पर्यंत Mesopy मध्यम नाक; ११३ चे वर Proopy उंच नाक असें म्हणतात. साधारण लोकांच्या समजुतीकरितां इतक्या खोल पाण्यांत जाण्याची जरूर नाहीं. चिनी किंवा जपानी लोकांच्या चेहऱ्याचा सर्वसाधारण प्रकार कसा असतो हें कोणत्याहि मनुष्याच्या लक्षांत आल्यावांचून राहात नाहीं. चेहरा थबकडा असतो, नाक उभार नसतें, हें सर्वांस ठाऊक आहेच. खुद्द सर एच्. रिस्ले आपल्या रिपोर्टांत म्हणतात कीं, 'The peculiar flatness of the Mongolian face must strike the most casual observer,' अशी जर गोष्ट आहे तर मराठ्यांचा चेहरा बसका असतो किंवा उभार असतो हें पाहिलें पाहिजे.

सर एच्. रिस्ले यांनींच दिलेले आंकडे आपण येथें प्रमाणभूत घेऊं. Orbito-nasal Index १०७ किंवा आंत असला तर तो मनुष्य मोंगोलियन जातीचा असतो; १०७ पासून ११३ पर्यंत असला तर मिश्र समजावा, व ११३ वर इंडेक्स असेल तर ते लोक आर्य आहेत असें समजावें, असें सर एच्. रिस्ले साहेबांनींच ठरविलें आहे. आणि हिंदुस्थानच्या पश्चिम भागांतील लोकांच्या Orbit-nasal Index ची सरासरी त्यांनींच ११३.१ पासून १२० पर्यंत आहे, असें दिलें आहे. तेव्हां हें एक अत्यंत गूढ आहे कीं पश्चिम भागांतील लोकांस सर एच्. रिस्ले आर्यन न म्हणतां स्किथोद्रविड्यन कसें म्हणतात? कुर्ग प्रांतांतील लोकांचीं नाकें फारच उंच असतात असें दिसतें; म्हणजे त्यांचा इंडेक्स सरासरीनें १२० असतो; क्वचित् १३० ही होतो. Ethnographic Appendices म्हणून या सेन्सस रिपोर्टास जोडलेलें एक परिशिष्ट आहे; त्यांत निरनिराळ्या लोकांचा हा Index दिला आहे, त्यांत रजपुतांचा ११७ आहे; नागर ब्राह्मणांचा ११६. ७ आहे, प्रभूंचा ११३. ४ असा दिलेला आहे. सारांश सर्व जातींचा

इंडेक्स ११३ वर आहे. तात्पर्य पाश्चिम भागांतील वरिष्ठ जातींतील लोक उंच नाकांचे आहेत—बसक्या नाकांचे नाहींत, इतकेंच नव्हे तर मध्यम नाकांचेहि नाहींत, असें असून ह्या इंडेक्सकडे दुर्लक्ष करून केवळ डोक्याच्या रुंद आकारावरून सर एच्. रिस्ले यांनीं मराठे व इतर पाश्चिम भागांतील लोकांबद्दल जें अनुमान काढलें आहे तें चुकीचें आहे असेंच म्हणावें लागतें. डोक्याच्या आकाराकडे लक्ष न देतां नाकाच्या मुळाकडे लक्ष दिलें पाहिजे असें प्रो. फौलर यांचें मत सर एच्. रिस्ले यांनींच पसंत केलें असून त्यांची अशी चूक झाली आहे, याजबद्दल सखेदाश्चर्य वाटतें.

येथें एक प्रश्न उपस्थित होतो तेवढ्याचें निराकरण करून हा लेख आटपूं. आर्यन लोक बहुधा लांब डोक्याचे असतात, पण कांहीं जाती रुंद डोक्याच्याहि आहेत. रजपुताना व पंजाब या प्रांतांतील आर्य लोक लांब डोक्याचे आहेत. तेव्हां दक्षिणेंत आलेले आर्य लोक या लोकांहून भिन्न आहेत कीं काय हा प्रश्न साहाजिक उत्पन्न होतो. याचें उत्तर हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासाची माहिती कमी असल्यामुळें जरी पूर्णपणें देतां येत नाहीं, तथापि हिंदुस्थानांत आर्य लोक दोन टोळ्यांनीं आले असें आतां अनेक पाश्चात्य ग्रंथकारांचें मत आहे. त्यांत विशेषतः डाक्तर ग्रीयरसन यांनीं हिंदुस्थानांतील भाषांच्या तुलनेवरून अशा दोन प्रकारच्या टोळ्या निरनिराळ्या वेळीं हिंदुस्थानांत आल्या असाव्या असें सिद्ध केलें आहे. एक फार प्राचीन काळीं खायबर खिंडींतून पंजाबांत उतरून रजपुताना काश्मीर येथें पसरली. दुसरी त्यानंतर गिल्गिटच्या रस्त्यानें गंगाद्वारावरून संयुक्त प्रांतांत उतरून खालीं आली असावी असा त्यांचा तर्क आहे. याच तर्काचें समर्थन मी आपल्या Epic India या पुस्तकांत महाभारताच्या आधारें केलें आहे. त्याजविषयीं सविस्तर विवेचन येथें करणें शक्य नाहीं. परंतु एवढी गोष्ट निर्विवाद आहे कीं हिंदुस्थानांतील भाषांच्या परिशीलनावरून आर्य लोक हिंदुस्थानांत दोनदां आले असें जें दिसतें, तीच गोष्ट महाभारताच्या पुराव्यानें सिद्ध होते. पूर्व टोळीचे लोक सूर्यवंशी व दुसरे चंद्रवंशी होते या दुसऱ्या टोळीच्या लोकांपैकीं यादव व भोज हे लोक प्रमुख होते, व तेच लोक दक्षिण हिंदुस्थानांत येऊन त्यांनीं महाराष्ट्रांत वस्ती केली हें मीं पूर्वीं सांगितलें आहे. याच संबंधामुळें शौरसेनी व महाराष्ट्री या भाषांचा निकट संबंध जुळतो. सारांश, उत्तरेचे यादव

व दक्षिणचे जाधव हे एकवंशी असून पूर्वापार इतिहासानें व भाषेनें संबंधी आहेत, असें मानण्यास हरकत नाहीं.

या दुसऱ्या टोळीचे आर्य—यादव भोज वगैरे—केल्ट लोकांप्रमाणें रुंद डोक्याचे असावे असें अनुमान केलें असतां महाराष्ट्रादि पश्चिम भागांतील लोक रुंद डोक्याचे असून उंच नाकाचे कां आहेत याचें योग्य कारण दिसून येतें. दुसऱ्या टोळीचे आर्य लोक रुंद डोक्याचे होते असें अनुमान निघण्यास दुसरें एक सबळ प्रमाण आहे. किंबहुना असें मानल्यानें सर एच. रिस्ले यांची दुसरी एक मोठी चूक झाली आहे तिचीहि दुरस्ती होते. संयुक्त प्रांतांतील लोक मध्यम डोक्याचे आहेत असें सर एच्. रिस्ले यांनीं सेन्ससच्या वेळीं घेतलेल्या मापांवरून सिद्ध झालें आहे. या मध्यम डोक्यावरून सर एच्. रिस्ले यांनीं या प्रांतांतील लोकांस आर्यो—द्रविडियन मानलें आहे; म्हणजे, ते आर्यन व द्रविडियन यांच्या मिश्रणापासून झाले आहेत असें ते मानतात. आतां आर्यन जर लांब डोक्याचे आहेत आणि द्रविडियनहि लांब डोक्याचे आहेत तर त्यांच्या मिश्र संततीचें डोकें मिश्र परिमाणांचें कसें होईल, ही गोष्ट सर एच्. रिस्ले यांच्या लक्षांत आली नाहीं असेंच म्हणावें लागतें. द्रविडियन सर्व जाति लांब डोक्याच्या आहेत, तेव्हां संयुक्त प्रांतांत म्हणजे गिल्गिटवरून गंगाद्वारानें आलेले आर्य रुंद डोक्याचे होत असेंच मानावें लागतें. सारांश, संयुक्त प्रांतांतील लोकांच्या मध्यम डोक्यावरून हाच सिद्धांत ठरतो कीं दुसऱ्या टोळीचे आर्य रुंद डोक्याचे होते. हे आर्य मथुरेहून द्वारकेस व तेथून गुजराथ महाराष्ट्र वगैरे ठिकाणीं पसरले हें पूर्वीं दाखविलेंच आहे.

याप्रमाणें सर एच. रिस्ले यांचा मराठ्यांविषयींचा शकोत्पत्तिसिद्धांत ज्या तीन पायांवर उभा झालेला आहे ते तिन्ही पाय लंगडे आहेत; म्हणजे स्वभाव, इतिहास व डोक्याचें व नाकाचें माप, यांच्या दृष्टीनें विचार केला तरी सुद्धां मराठे आर्य आहेत, शक म्हणजे मोंगोलियन नाहींत हेंच सिद्ध आहे.



# मराठ्यांचें क्षात्रियत्व.

( वि. वि. )

नाब्रह्म क्षत्रमृध्नोति नाक्षत्रं ब्रह्म वर्धते।

ब्रह्मक्षत्रं च सम्पृक्तमिह चामुत्र वर्धते ॥ मनु. अ- ९,३२२

" क्षत्रिय आणि त्यांचें अस्तित्व " या विषयावर रा० वासुदेवराव लिंगोजी बिरजे, बडोदें येथील महाराज गायकवाड यांच्या पुस्तकालयाचे लायब्ररियन, यांनीं एक माहितीनें भरलेलें पुस्तक लिहिलें असून तें हल्लींच अभिप्रायास्तव आमचेकडे आलें आहे. सदरहू पुस्तकाच्या विषयाचा, कोल्हापूर येथील चालू असलेल्या वेदोक्त प्रकरणाशींही निकट रीतीनें संबंध आहे. श्रीमंत छत्रपति कोल्हापूरचे महाराज यांस वैदिक कर्माचा अधिकार आहे व त्यांच्या ब्राह्मण आश्रितांनीं वेदोक्त कर्मे त्यांचे येथें करण्यास हरकत नाहीं, असा निर्णय श्रीशिष्य जगद्गुरु संकेश्वर मठाधिपतींकडून देण्यांत आला होता. सदरहू निर्णय शास्त्राविरुद्ध असल्यानें पुन्हा विचार करण्यास पात्र आहे, अशाविषयीं तपासणीअर्ज वांई येथील ब्रह्मवृंदाकडून गेला. ( हा अर्ज पुणें येथील जगद्धितेच्छु वर्तमानपत्राचे भाद्रपद वद्य २ चे अंकांत छापला गेला आहे ). त्या अर्जावरून मुख्य श्रींनीं वरील निकालाची अम्मलबजावणी प्रथम तहकूब ठेवून, हल्लीं तो रद्द केल्याचेंहि प्रसिद्ध झालें आहे. प्रत्येक विचारी मनुष्यास या निकालापासून अत्यंत असमाधान होईल असें वाटतें. कलींत वैदिक कर्माचा अत्यंत लोप होण्यास या निकालानें अधिक वाव मिळेल; इतकेंच नव्हे तर क्षत्रिय व ब्राह्मण यांमधील दुही वाढण्यास व देशाच्या विभागलेल्या आधुनिक स्थितीस प्रबलता येण्यास यामुळें कारण उत्पन्न झालें आहे, असें म्हणावें लागतें. ब्रह्मक्षत्रामध्यें ज्या ज्या वेळेस बेबनाव उत्पन्न होतो तो तो वेळ देशाच्या अवनतीचा आहे, व ज्या ज्या वेळीं ब्रह्मक्षत्रांत ऐक्य होतें तो तो वेळ उन्नतीचा आहे, असें मथळ्यांत दिलेल्या मनूच्या श्लोकांत म्हटलें आहे, व महाभारतांतहि अनेक जागीं स्पष्ट लिहिलें आहे. या दृष्टीनेंहि हा झालेला निकाल असमाधानकारक आहे, असें म्हणावें लागतें. असो; सदरहू दोन्ही विषयांसंबंधानें इतर दृष्टि बाजूस ठेवून, इतिहास व धर्मशास्त्र यांच्या दृष्टीनें आपणांस काय काय सांगावें लागतें याचा विचार करूं.

कलींत क्षत्रिय नाहींत असा पूर्वपक्षाचा आग्रह 'कलावाद्यंतयोः स्थितिः' या वचनावर आहे. त्या वचनाविषयीं बिरजे यांनीं आपल्या पुस्तकांत चांगलें विवेचन करून तें अनेक प्रकारच्या विरुद्ध प्रमाणांनीं खोडून काढलें आहे. बिरजे यांच्या पुस्तकांतील पहिलीं तेरा चौदा प्रकरणें आपण सध्या सोडून देऊं, कारण वर्णव्यवस्था व जातिव्यवस्था हीं निराळीं आहेत असें आमचें मत नाहीं. यांजविषयीं पुढें आणखी एखाद्या प्रसंगानें विचार करूं. तसेंच ब्राह्मण, क्षत्रिय यांच्या दरम्यान वैषम्य उत्पन्न करण्याकडे ज्या विधानांचा कल आहे तीं विधानें आपण सोडून देऊं. कारण ब्रह्मक्षत्राचें जेणेंकरून ऐक्य होईल तेंच कर्तव्य आहे. परंतु विवादाचा, मुख्य विषय "कलावाद्यंतयोः स्थितिः" हें वचन आहे, व हें वचन हल्लीं कोल्हापूरच्या वेदोक्त प्रकरणांतील निकालाचें मूळ आहे. तेव्हां या वचनाविषयीं आपण केवळ धर्मशास्त्रदृष्ट्या विचार करूं. हें वचन शूद्रकमलाकरांत पठित आहे व त्याचा मागील पुढील संदर्भ 'जगद्धितेच्छू'त दिला आहे. उतारा सविस्तर घेतल्याशिवाय वाचकांस या विषयाची नीट कल्पना होणार नाहीं.

"ननु कलौ क्षत्रियवैश्याभाव उक्तः भागवते नवमस्कन्धे । इक्ष्वाकूणामयं वंशो सुमित्रांतो भविष्यति । यतस्तं प्राप्य राजानः संस्थां प्राप्स्यन्ति वै कलौ । देवापिर्योगमास्थाय कलापग्राममास्थितः । सोमवंशं कलौ नष्टं कृतादौ स्थापयिष्यति ॥"

विष्णुपुराणेऽपि । देवापिः पौरवो राजा मरुश्चेक्ष्वाकुवंशजः । कृते युगे इहागम्य क्षत्रप्रावर्तकौ हि तौ ॥

पुराणांतरेऽपि । ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः शूद्रवर्णास्त्रयो द्विजाः । युगे युगे स्थिताः सर्वे कलावाद्यन्तयोः स्थितिः ॥"

या प्रकारचा पूर्वपक्ष घेऊन नंतर—

"मैवं । कलौ तु बीजभूतास्तु केचित्तिष्ठन्ति भूतले । तथैव देवापिपूरू संप्रतं समवस्थितौ ॥ इति विष्णुपुराणात् । ब्रह्मक्षत्रविशः शूद्रा बीजार्थं य इह स्थिताः । कृते युगे हि तैः सार्धं निर्विशेषास्तदाभवन् ॥ इति मात्स्योक्तेश्च प्रच्छन्नरूपाः स्वकर्मभ्रष्टाः क्षत्रिया वैश्याश्च संत्येव क्वचिदिति अस्मत्पितृचरणाः ॥"

वरील उताऱ्यावरून शूद्रकमलाकरानेंच 'कलावाद्यन्तयोः स्थितिः' या वचनाचें निराकरण स्पष्ट केलें आहे, व आपल्या पूज्य वडिलांचेंहि क्षत्रियांच्या अस्तित्वाबद्दलचें मत स्पष्ट दिलें आहे. याच मताचा ऊह करून कलियुगांत क्षत्रिय बीजभूत आहेत, असें मानून श्रीशिष्य जगद्गुरूंनीं प्रथम निर्णय दिला होता; तेव्हां वास्तविक पाहतां या प्रश्नाचा योग्य निकाल लागला आहे, असेंच म्हणावें लागतें. पण कित्येक हट्टवादी वरील मत कबूल करीत नाहींत, सबब या वचानचा आणखी विचार करणें जरूर आहे.

'कलावाद्यन्तयोः स्थितिः' या वचनाचा उतारा घेतांना 'पुराणान्तरे ऽपि' असें कमलाकरकार अवतरण देतात. पण हें वचन कोणत्या पुराणांतलें आहे याचा अद्याप पत्ता लागला नाहीं. असो; कदाचित कमलाकरानें वचन घेतलें आहे, तेव्हां तें कोणत्या तरी पुराणांत आहे असें मानून चाललें, तरी तें पुराणवचन आहे, हें प्रथम लक्षांत घेतलें पाहिजे. हें वचन कोणत्याहि श्रुतीचें नाहीं किंवा स्मृतीचें नाहीं, यामुळें ऋषिप्रणीत वचनाप्रमाणें तें मान्य धरतां येत नाहीं. पुराणवचनें हीं कांहीं कांहीं ठिकाणीं घेतलीं जातात हें खरें आहे, तत्रापि जो मान ऋषिप्रणीत वाक्यांस आहे तो पुराणवचनांस नाहीं, पुराणवचनें हीं

श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः
सम्यक्संकल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतम् ॥

या याज्ञवल्क्यानें दिलेल्या धर्ममूल गणनेंत मुळींच येत नाहींत. तेव्हां हें वचन फार अल्प मोलाचें आहे, हें सकृद्दर्शनीं म्हणावें लागतें.

श्रुतिस्मृतींनंतर सदाचाराची गणना धर्ममूलांत आहे व सदाचारांत पुराणादि ग्रंथांत जो सन्मान्य लोकांचा आचार दिसतो त्याचा अन्तर्भाव होतो, या धोरणानें पुराणांतील वचनांचा शास्त्रार्थ करतांना विचार होतो. या दृष्टीनें पाहिलें तरीहि 'कलावाद्यन्तयोः स्थितिः' या वचनांत कोणताहि विधि सांगितलेला नाहीं किंवा अमुक एक निषेधहि सांगितलेला नाहीं. तेव्हां या वाक्याला धर्मशास्त्रदृष्ट्या कोणताच अधिकार नाहीं, असें स्पष्ट म्हणावें लागतें. अमुक एक गोष्ट करणें इष्ट आहे, किंवा अमुक एक गोष्ट करणें योग्य नाहीं, अशा प्रकारचें हें वाक्य नाहीं; अशा रीतीनें उदाहरणानेंहि विधिनिषेधप्रतिपादक हें वाक्य नाहीं. सारांश, धर्मशास्त्राच्या प्रश्नांत या वाक्याचा मुळींच अंतर्भाव होत नाहीं असें म्हणावें लागतें...

मद्गृह्य वचनांत ऐतिहासिक रीतीचें एक विधान केलेलें आहे हें स्पष्ट आहे. पण त्याचाहि अर्थ ऐतिहासिक दृष्टीनेंच लाविला पाहिजे. चंद्रवंशी राजांचें वर्णन करितांना नंदापर्यंत क्षत्रिय राजे झाले. पुढें महानंदचंद्रगुप्तादि शूद्र राजेच सार्वभौम झाले, हा इतिहासाचा पूर्वापर संबंध मनांत आणला म्हणजे, क्षत्रिय राजांचें सार्वभौमत्व हिंदुस्थानांत नाहींसें झालें एवढाच पिण्डितार्थ सांगण्याचा हेतु कमलाकरानें दिलेल्या भागवतादि पुराणांतील उताऱ्यांचा आहे, असें म्हणावें लागतें. ऐतिहासिक रीतीनें हिंदुस्थान देशांतील राजकीय घडामोडींचा विचार केला असतां वरील भागवतादि पुराणवचनांचा हाच खरा अर्थ आहे, असें दृष्टीस येईल. नंदराजानंतर हिंदुस्थानांत क्षत्रियांचें सार्वभौमत्व नाहींसें झालें हें खरें आहे. कलियुगानंतर येणाऱ्या कृतयुगांत मरु व देवापि हे सूर्यवंशाचें व सोमवंशाचें पुनः स्थापन करतील या म्हणण्याचा तरी हाच अर्थ आहे. या दृष्टीनें ‘कलावाद्यन्तयोः स्थितिः’ हें वचन केवळ अर्थवाददृष्टीनें लिहिलें आहे, असें म्हणावें लागतें. कलींत क्षत्रियांचा व वैश्यांचा अत्यन्ताभाव झाला असें जर मानलें, तर प्रत्यक्ष इतिहासाशीं विरोध येतो, हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे.

‘कलावाद्यन्तयोः स्थितिः’ हें वचन श्रुतीचें नाहीं, स्मृतीचें नाहीं, पुराणांतलें आहे; तेंहि विधिनिषेधरूपी नाहीं, केवळ ऐतिहासिक कथन आहे, असें स्पष्ट आहे. तेव्हां हें ऐतिहासिक कथन इतर ऐतिहासिक वचनांशीं व प्रत्यक्ष हिंदुस्थानच्या उपलब्ध असलेल्या इतिहासाशीं जुळेल असेंच लाविलें पाहिजे. कलियुगांत क्षत्रियांचें सार्वभौमत्व नष्ट झालें व अनेक क्षत्रियकुळांनीं तसेंच वैश्यकुलांनीं द्विजसंस्कार सोडले, ही गोष्ट आपण ऐतिहासिक दृष्ट्या पाहतों. याची सिद्धता करण्याकरितां अनेक प्रमाणें आणण्याचें कारण नाहीं. चंद्रगुप्तानंतर अशोकाचें प्राबल्य झालें, बौद्ध धर्म सर्वत्र प्रसृत झाला, अनेक क्षत्रिय वैश्य त्या धर्मांत शिरले, व ब्राह्मणांनींहि आपली बाजू जशी संभाळावयास पाहिजे होती तशी संभाळली नाहीं. यवन, शक, हूण इत्यादि लोकांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या, तेव्हां कांहीं कर्मठ ब्राह्मणांशिवाय व कांहीं क्षत्रिय कुलांशिवाय इतरत्र कर्मलोप झाला. अशा प्रसंगानें ‘नंदान्तं क्षत्रियकुलं’ किंवा ‘कलावाद्यन्तयोः स्थितिः’ इत्यादि वचनें लिहिलीं गेलीं

म्हणून या वचनांचा अगदीं अक्षरशः अर्थ करावयाचा कीं काय? —व कलींत क्षत्रिय, वैश्य मुळींच नाहींसे झाले, असें मानावयाचें कीं काय? यापेक्षां सदरहू वचनें अर्थवादपर आहेत, असेंच मानणें योग्य होईल. ही गोष्ट उदाहरणांवरून वाचकांच्या लक्षांत येईल. दुर्गादेवीकृत दुष्काळ बारा वर्षें महाराष्ट्रांत चालू असल्यामुळें देश ओसाड पडला, मनुष्य राहिलें नाहीं, असें जर ऐतिहासिक विधान एखाद्या ग्रंथांत असलें, तर त्याचा अर्थ खरोखरच महाराष्ट्रांत एकहि जिवंत मनुष्य राहिलें नाहीं, असा होऊं शकत नाहीं. तर ह्या म्हणण्याचा अर्थ एवढाच घ्यावयाचा कीं, महाराष्ट्रांत मनुष्यहानि फार झाली. असा न घेतला तर महाराष्ट्रांत पुनः कोणी महाराष्ट्रीय उत्पन्न होऊं शकणारच नाहीं. याच न्यायानें कलींत नंदानंतर शूद्र व म्लेच्छ राजांचें इतकें प्राबल्य झालें, व बौद्ध धर्मामुळें क्रियालोप इतका झाला, कीं पुराणकारांनीं 'कलावाद्यन्तयोः स्थितिः' इथपर्यंत लिहून ठेविलें. पण याचा अर्थ, क्षत्रिय वैश्यांचें बीजहि नाहींसें झालें असा मानला तर देवापि व मरु हे कलीनंतर पुनः क्षत्रारोपण कसें करतील हें लक्षांत येत नाहीं.

कलींत क्षत्रिय व वैश्य नष्ट झाले, या म्हणण्याचा अर्थ ते नष्टप्राय झाले असाच घेतला पाहिजे, हें वरील ऐतिहासिक विचारसरणीनें स्पष्ट आहे. नाहीं तर पुष्पमित्रादि क्षत्रिय राजांपासून तों तहत जयपुरच्या जयसिंह राजापर्यंत ज्या ज्या क्षत्रिय राजांनीं अश्वमेधासारखीं मोठमोठीं श्रौतकर्में केलीं व ब्राह्मणांनीं करविलीं तीं सर्व अस्थानीं केलीं व ते ब्राह्मण व क्षत्रिय दोघेहि धर्मभ्रष्ट होते, असें म्हणणें प्राप्त होतें. आज हिंदुस्थानांत जीं क्षत्रिय कुलें आहेत व ज्यांच्या क्षत्रियत्वाबद्दल आपणास कधींहि शंका नाहीं तीं केवळ थोतांडें आहेत, असें म्हणावें लागेल.

'कलावाद्यन्तयोः स्थितिः' या पुराणवचनाचा कलींत क्षत्रिय, वैश्य अत्यंत नष्ट नसून, नष्टप्राय आहेत असाच अर्थ घेतला पाहिजे, ही गोष्ट इतिहासावरून प्राप्त आहे, इतकेंच नव्हे, तर इतर पुराणवचनांवरूनहि प्राप्त आहे. कमलाकरकारांनीं खुद्द अशीं वचनें दिलीं आहेत. 'कलौ तु बीजभूतास्तु केचित्तिष्ठंति भूतले' हें वचन त्यांनींच दिलेलें आहे. तसेंच

ब्रह्मक्षत्रविशः शूद्रा बीजार्थं य इह स्थिताः ।
कृते युगे हि तैः सार्धं निर्विशेषास्तदाभवन् ॥

हें मत्स्यपुराणांतलें वचनहि कमलाकरकारांनीं दिलें आहे. व याच वचनाच्या आधारें वरील वाक्याशीं मेळ घालतांना क्षत्रिय वैश्य अत्यंत नष्ट नसून बीजरूपानें कलींतहि ठिकठिकाणीं आहेत, हें कमलाकरकारांच्या वडिलांचें मत अत्यंत प्रशस्त व इतिहासाला व वस्तुस्थितीला धरून आहे, असें कोणीहि समंजस मनुष्य कबूल करील. याशिवाय वरील ' कलावाद्यन्तयोः स्थितिः । ' या वचनाचा खरा अर्थ केवळ अर्थवादपर आहे असें स्पष्ट दाखविणारीं महाभारतांतहि वचनें आहेत.

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्याः संकीर्यन्तः परस्परम् ।
शूद्रतुल्या भविष्यन्ति तपः सत्यविवर्जिताः ॥

कलियुगांत क्षत्रिय–वैश्यच काय, पण ब्राह्मण सुद्धां, आचारविहीन होऊन केवळ शूद्रतुल्य होतील, असें वनपर्व, अध्याय १९०, यांत म्हटलें आहे याची वाट काय ? याचाहि अर्थ अक्षरशः खरा मानला म्हणजे कलियुगांत एकच वर्ण बाकी राहतो, दोन राहत नाहींत. मग ब्राह्मण कोठून राहणार ? कदाचित कोणी म्हणेल कीं, ब्राह्मणक्षत्रियवैश्य शूद्रतुल्य होतील असें म्हटलें आहे, तेव्हां शूद्र होणार नाहींत हें सिद्ध आहे. पण यापुढें आणखी कलियुगाच्या महात्म्याचें वर्णन केलें आहे, तेथें एकच वर्ण कलियुगांत राहील असें स्पष्ट म्हटलें आहे.

ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्या नशिष्यंति जनाधिप ।
एकवर्णस्तदा लोको भविष्यति युगक्षये ॥

यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य हे तिन्ही वर्ण नाहींसे होऊन सर्व लोक एकवर्ण होतील, असें साफ म्हटलें आहे. तेव्हां कलियुगांत ' आद्यन्तयोः स्थितिः ' असें म्हणणें कितपत किमतीचें आहे ? वरील वचन महाभारतांत असून ' कलावाद्यन्तयोः स्थितिः ' हें एका अनिर्दिष्ट पुराणाचें आहे. तेव्हां ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे तिन्ही वर्ण नष्ट होतील, किंवा क्षत्रिय वैश्य दोघेच नष्ट होतील, या गोष्टीचा निवाडा कसा करावा ?

वस्तुतः धर्मशास्त्राच्या दृष्टीनें पाहिलें तर हीं दोन्ही वचनें अर्थवादपर आहेत असेंच मानावें लागतें. कलींत कर्मलोप होईल, ही गोष्ट भविष्यकथनाच्या स्वरूपानें मानिली म्हणजे, जसा क्षत्रियवैश्यांत आरंभीं कर्मलोप होईल, तसाच कांहीं काळानें कां होईना, ब्राह्मणांतहि कर्मलोप होईल.

हेंहि मानावें लागेल. इतकेंच नाहीं, पण प्रत्यक्ष अनुभवासहि येऊं लागलें आहे. तेव्हां दोन्ही वचनें अर्थवाददृष्टीनें खरीं आहेत, हाच सिद्धांत योग्य आहे. या वचनांची अर्थवादापलीकडे गति नाहीं. म्हणजे या वचनांवरून धर्मगुरूंनीं कोणत्याहि प्रश्नाचा धर्मशास्त्रदृष्ट्या विचार करतांना असें गृहीत धरितां कामा नये कीं, आतां ब्राह्मणहि राहिले नाहींत, क्षत्रिय व वैश्यहि राहिले नाहींत, तर जोंपर्यंत धर्मश्रद्धा जागृत आहे, जोंपर्यंत वैदिक संस्कार चालू आहेत व होत आहेत, तोंपर्यंत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य या तिन्ही वर्णांचे लोक बीजरूपानें आहेत, असेंच मानिलें पाहिजे. नाहीं तर कलियुगाचें घोरतम स्वरूप आतांच प्रकट झालें आहे, असें गृहीत धरावें लागेल. कलियुगांत संन्यास वर्ज्य आहे, असें कलिवर्ज्यपुराणवचनांत नुसतें ऐतिहासिक रीतीनें नव्हे, तर प्रत्यक्ष निषेधरूप वचनानें स्पष्ट सांगितलें आहे. पण तें जर खरें मानलें, तर जगद्गुरु संकेश्वर स्वामींचीच काय पण जे स्वास श्रीशंकराचार्य आदिसून आहेत त्यांची वाट काय? सारांश, जोंपर्यंत वैदिक धर्मश्रद्धा आहे, तोंपर्यंत चारी वर्ण व चारी वर्णांचे धर्महि कलियुगांत आहेत, असेंच स्पष्ट आहे.

असो, येथवर 'कलावाद्यन्तयोः स्थितिः' या वचनाचें वास्तविक महत्त्व व पर्यवसान दाखविलें. हें वचन श्रुतिस्मृतींतील नव्हे व पुराणांतील असून विधिनिषेधकरूपहि नव्हे. तें केवळ ऐतिहासिक गोष्टीचा विचार करितां केवळ अर्थवादपर आहे, व हाच अर्थ इतर पुराणवचनांचा व महाभारतांतील वचनांचा मेळ घातला असतां योग्य ठरतो, हेंहि दाखविलें. सारांश, वरील वचनाचा खरा अर्थ पाहिला तर कलींत क्षत्रियवैश्य नष्ट नसून नष्टप्राय आहेत, एवढाच आहे. वस्तुतः क्षत्रियवैश्य बीजरूपानें ठिकठिकाणीं आहेत हें जें कमलाकरकारांच्या पित्याचें मत आहे तें सर्वथैव योग्य आहे, हें सिद्ध आहे.

कलींत क्षत्रिय आहेत कीं नाहींत या मुख्य वादग्रस्त विषयाचा निकाल आमचे मतें अस्तिपक्षीं आला, तेव्हां जास्त लिहिण्याची जरूरी दिसत नाहीं. असें आहे तरी आणखी मुद्यांसंबंधानें विशेषतः स्मृत्याधारें विचार करूं. प्रथम कोल्हापूरकर भोंसले हे क्षत्रिय आहेत किंवा नाहींत, याचा विचार केला पाहिजे. श्रीमंत छत्रपति शिवाजी महाराज हे

मेवाडच्या शिसोदे रजपूत घराण्यांपैकीं असून मेवाडच्या शिसोदे घराण्याच्या क्षत्रियत्वाविषयीं कोणासहि शंका नाहीं. कलींत दोनच वर्ण आहेत असा वादग्रस्त वचनाचा ढोबळ अर्थ घेऊन चालणारे लोक सोडून द्या. आज सर्व हिंदुस्थानांत उदेपुरचे राणे हे क्षत्रियोत्तम आहेत असा सर्व लोकांचा समज आहे, व याच कारणानें जेव्हां शिवाजी महाराजांस गागाभट्टानें राज्याभिषेक करून छत्रपतित्व प्राप्त करविलें, तेव्हांहि विशेष कोणी तकरार केली असें वाटत नाहीं. वैदिक कर्माला अधिकार येण्या-करितां गागाभट्टानें शिवाजीची प्रथम मुंज लाविली ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. आतां आक्षेपकांचें असें म्हणणें आहे कीं, तीन विवाह झाल्यावर व अपत्येंहि झाल्यावर मोठेपणीं शिवाजीमहाराजांची मुंज लाविली, हें संभवत नाहीं. जसा वैश्यांना वल्लभसांप्रदायी गुरु श्रीकृष्णमंत्राचा उपदेश करतात, त्याप्रमाणेंच गागाभट्टानें शिवाजीस शिवमंत्राचा उपदेश करून मुंज लाव-ल्याचें प्रसिद्ध केलें. मुंज या शब्दाचा रूढ अर्थ उपनयन एवढाच घेणें आहे. शिवाजीचें उपनयन झालें नाहीं, केवळ शिवमंत्राचा उपदेश गागा-भट्टानें त्यांस केला, या विधानाबद्दल कांहीं पुरावा नाहीं. इतिहासांत किंवा बखरींत याजविषयीं कोठें उल्लेख माझ्या पाहण्यांत नाहीं. याशिवाय गागाभट्टानें शिवाजीस राज्याभिषेक केला ही गोष्ट जर खरी आहे, तर हा वैदिक संस्कार उपनयन झालें नसल्यास होऊं शकणार नाहीं, असें वाटतें. सर्व संस्कारांचें आदिस्थान व मूळ उपनयनसंस्कार आहे. गायत्री-मंत्राचा उपदेश झाल्याशिवाय द्विजत्व प्राप्त होत नाहीं, व द्विजत्व उत्पन्न झाल्याशिवाय पुढील कोणतेहि संस्कार होऊं शकत नाहींत. तेव्हां हें गृहीत धरिलेंच पाहिजे कीं, शिवाजीमहाराजांस गायत्रीमंत्राचा उपदेश होऊन नंतर त्यांचा राज्याभिषेकसंस्कार झाला. गागाभट्टानें कदाचित् ठकबाजी केली असें जरी मानिलें, तरी तें आतां ग्राह्य नाहीं. कारण शिवाजीस राज्याभिषेक झाला ही गोष्ट सर्वांस मान्य आहे, आणि राज्या-भिषेक झाल्यापूर्वीं उपनयन झालेंच असलें पाहिजे.

आतां मोठेपणीं लग्न झाल्यावर व मुलें झाल्यावर उपनयन कसें झालें. या प्रश्नाचा विचार केला पाहिजे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांचा उप-नयनकाल स्मृतींत प्रसिद्ध आहे, व अतीतकालमर्यादाहि स्मृतींत दिलेली आहे. या वयोमर्यादेनंतर ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य उपनयनरहित राहिले, तर

व्रात्य होतात. व्रात्य हे शूद्रतुल्य आहेत, पण शूद्र नव्हेत, ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. मुख्यतः जातीचा संबंध बीज म्हणजे पित्याचे परंपरेशीं आहे ही गोष्ट धर्मशास्त्रदृष्ट्या सिद्ध आहे. अर्थात क्षत्रिय उपनयनरहित राहिल्यानें व्रात्य होतात; पण त्यांस व्रात्यप्रायश्चित्त करून पुन्हा संस्कार होऊं शकतो. शूद्रास व्रात्यप्रायश्चित्त व उपनयनसंस्कार कधींहि होऊं शकणार नाहीं. हा भेद मुख्यतः लक्षांत घेतला पाहिजे. उपनयनसंस्कार झाला नाहीं तरी क्षात्रियत्व बीजरूपानें कायम राहतें, व असे बीजभूत क्षत्रिय असतील त्यांस व्रात्यस्तोम करून उपनयनसंस्कार करून घेण्यास संधि आहे. जशी ही गोष्ट क्षत्रियांची आहे तशीच वैश्यांचीहि आहे. "क्षत्रिय आणि त्यांचें अस्तित्व" या पुस्तकांत बिरजे यांनीं इंदूर येथें संवत् १९४२ त वैश्याचे येथें वैदिक कर्म करावें किंवा नाहीं याबद्दल मोठा वाद झाला, त्याची अत्यंत महत्त्वाची हकीकत दिली आहे. ती या विषयासंबंधानें मोठी महत्त्वाची आहे. तेथें पंच व मध्यस्थ कायम होऊन त्यांजसमोर नानुराम यांनीं अस्तिपक्षीं व हरशास्त्री यांनीं नास्तिपक्षीं साधकबाधक प्रमाणें मांडलीं. त्या सर्वांचा विचार करून पंचांनीं जो अभिप्राय दिला आहे तो वाचण्यासारखा आहे. आपाशास्त्री यांनीं व्रात्यप्रायश्चित्त करून उपनयनादि संस्कारांनंतर वेदोक्त कर्म करण्यास आमचे संमतीनें कांहीं बाध नाहीं असें स्पष्ट मत दिलें आहे. तेंच मत बापूभट्ट भवाळकर यांचें आहे. गोपाळराव किबे यांनीं, ज्यांचे येथें वेदोक्त कर्म होत आलें आहे त्यांस पुढें करण्यास हरकत नाहीं, व बाकीच्यांनीं जगद्गुरूंस अर्ज करून करावें असें मत दिलं. व श्रीनिवासराव कारभारी देवास यांनींहि तसेंच मत सविस्तर रीतीनें दर्शविलें आहे. यथोक्त प्रायश्चित्तानें शुद्ध झालेल्या व उपनयन संस्कारांनीं संस्कृत अशा वैश्याच्या येथें वेदोक्त मंत्रांनीं कर्म करावयास शास्त्राची मुळींच हरकत नाहीं, असें मत भय्याशास्त्री व हरिहर शास्त्री यांनीं दिलें, व त्याच मताचा अंगीकार विश्वनाथ दीक्षित यांनीं केला. वरील अनेक अभिप्रायांवरून इंदूर सरकारांनीं, कर्म बंद ठेविलें होतें तें चालू करण्यास शिवजी शालिग्राम वैश्य यांस परवानगी दिली. या वादाच्या निकालाचा व पंचमध्यस्थांच्या अभिप्रायाचा निष्कर्ष हाच आहे कीं, कलींत क्षत्रियवैश्य बीजरूपानें आहेत इतकेंच नव्हे, तर यथोक्त व्रात्यप्रायश्चित्त करून उपनयन–संस्कारोत्तर त्यांच्या येथें वेदोक्तकर्म करण्यास मुळींच हरकत नाहीं.

श्रीशिवाजी महाराज हे उत्तम क्षत्रिय कुलोत्पन्न असून त्यांस वरील निर्णयांत निर्दिष्ट झालेल्या शास्त्रवचनार्थांचा अभिप्राय मनांत घेऊन गागाभट्टानें व्रात्यप्रायश्चित्तोत्तर उपनयनसंस्कार केला असावा असें अनुमान करण्यास हरकत दिसत नाहीं; व नंतर त्यांस वैदिक मंत्रानें राज्याभिषेक केला असावा, हें स्पष्ट आहे. तेव्हांपासून छत्रपतीची पदवी श्रीशिवाजी महाराजांच्या घराण्यास प्राप्त झाली. शिवाजी महाराजांनंतर जे पुरुष उत्पन्न झाले त्यांस गायत्रीमंत्राचा उपदेश झाला किंवा नाहीं, व त्यांच्या घराण्यांत वेदोक्त कर्मे होत आलीं किंवा नाहींत, याविषयींची माहिती किंवा पुरावा जसा असेल त्याप्रमाणें त्याचा निकाल होणार आहे. पण जरी यदाकदाचित् आपण असें धरून चाललों कीं साताराच्या हल्लींच्या घराण्यांत वेदोक्त क्रिया नाहींत, तत्रापि ज्या कारणांनीं व ज्या शास्त्राधारें गागाभट्टानें शिवाजीमहाराजांस यथोक्त प्रायश्चित्तोत्तर गायत्रीमंत्रोपदेश देऊन त्यांच्या येथें वैदिक कर्म केलें त्याच शास्त्ररीतीनें श्रीजगद्गुरूंच्या आज्ञेवरून हल्लींच्या कोल्हापूरच्या महाराजांच्या येथेंहि वेदोक्त कर्मे करण्याची पद्धति सुरू होण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. त्यांतहि या राजघराण्यांत पहिल्यापासून हा सांप्रदाय सुरू असल्यास व्रात्यप्रायश्चित्ताचीहि जरूरी दिसत नाहीं.

येथें एक महत्त्वाची गोष्ट सांगणें जरूर आहे. उत्तर हिंदुस्थानांत कित्येक ब्राह्मणांच्या जाती अशा आहेत कीं, त्यांत उपनयनसंस्कार सविधि होत नाही, हें अनेकांच्या पाहण्यांत आलेंच असेल. माळव्यांतील उज्जनी येथील गुर्जर गौड ब्राह्मण जातींतील लोक शंभर वर्षांपूर्वी इतके संस्काररहित व विद्याहीन होते कीं, त्यांस ब्राह्मण म्हणण्याचीच पंचाईत होती. हळूहळू दाक्षिणात्य लोकांच्या सहवासानें त्यांच्यांत उपनयनसंस्कार सुरू झाले, इतकेंच नव्हे, तर कांहीं दाक्षिणात्य वैदिक गुरूंच्या मेहनतीनें हल्लीं त्यांच्यांत वेदविद्या चांगली जागृत झाली आहे. पण हें मागील उदाहरण सुद्धां नको आहे. हल्लीं प्रत्यक्ष उत्तर हिंदुस्थानांत ग्वाल्हेर वगैरे प्रांतीं कांहीं ब्राह्मण असे आहेत कीं, त्यांस गायत्रीमंत्र म्हणजे काय याची माहिती सुद्धां नाहीं. उपनयनसंस्कार म्हणजे केवळ जानवें घालणें व तेंहि केव्हां तरी लग्नापूर्वीं किंवा लग्नाच्या वेळेस घालणें, एवढेंच ते लोक जाणतात. अशा स्थितींतल्या लोकांचें ब्राह्मण्य नष्ट झालें आहे कीं काय?

व नष्ट झालें असल्यास तें पुन्हा समंत्र उपनयन–संस्कार होऊन गायत्री-मंत्रोपदेश करतां येत नाहीं अशा अपरिहार्य रीतीनें नष्ट झालें आहे कीं काय? झालें म्हणावें तर ते लोक इतके अभिमानी असतात कीं, दाक्षिणात्य ब्राह्मणाचे घरीं ते कच्ची रसोई म्हणजे घृतपरिपक्वाशिवाय इतर अन्न व जेवणाचे पदार्थ खात नाहींत. सारांश, अनेक ऐतिहासिक कारणांनीं समाजाच्या चालीरीतींचा ओघ फिरला, त्याप्रमाणें त्या त्या लोकांत संस्कार बीजरूपानें राहिले. मुख्यतः ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांचें जातिबंधन बीजावर अवलंबून आहे ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे.

येथें मराठे हे क्षत्रिय आहेत कीं नाहीं हा प्रश्न उपस्थित होतो. शिवाजी महाराज क्षत्रियवंशापैकीं उत्तम मानलेल्या उदेपुरच्या वंशांत उत्पन्न झालेले आहेत असें जरी मानलें, तरी त्यांनीं गायकवाड, जाधव व मोहिते या घराण्यांतील बायका केल्या. अशा हीन जातींतील स्त्रिया केल्यामुळें शिवाजी महाराजांची संतति क्षत्रिय राहिली नाहीं. हा आक्षेप मुख्यतः—मराठ्यांच्या कुलांत उत्पन्न झालेली स्त्री हीनजाति आहे कीं काय?— या प्रश्नावर अवलंबून आहे. गायकवाड, पाटणकर, जाधव इत्यादि घराण्यांत कधींहि समंत्रक गायत्रीचा उपदेश होत नाहीं, व या घराण्यांत असा कधींहि दाखला सांपडत नाहीं, हें म्हणणें खरें आहे असें आपण धरून चालूं. ९६ कुळींचे मराठे हे क्षत्रिय आहेत किंवा नाहींत या वादग्रस्त विषयासंबंधानें बिरजे यांनीं आपल्या पुस्तकांत अनेक ऐतिहासिक प्रमाणें दाखविलीं आहेत, तीं विचार करण्यासारखीं आहेत. क्षत्रिय शब्दानें आर्य जातीचा बोध होतो, व हिंदुस्थानांत जे ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आहेत, तेच आर्य आहेत असा सर्वत्र समज आहे. हल्लीं सेन्सस रिपोर्ट सन १९०१ चा प्रसिद्ध झाल्यापासून मुंबई इलाख्यांत आर्य मुळींच नसून येथील लोक, ब्राह्मण असोत किंवा मराठे असोत, स्किथियन म्हणजे शक व द्रविडियन म्हणजे द्राविड लोक, यांच्या मिश्रणापासून झाले आहेत, असें रिस्ले यांनीं चेहऱ्याच्या व डोक्याच्या मोजमापीवरून आपलें मत दिलें आहे. असें असेल तर महाराष्ट्र ब्राह्मण व महाराष्ट्र क्षत्रिय म्हणविणार मराठे हे दोघेहि एका पंक्तीस बसणार आहेत. व बिरजे यांच्या प्रयत्नाची आवश्यकता राहणार नाहीं. ही गोष्ट सोडून देऊन (रिस्लेच्या मताविषयीं मी स्वतंत्र लेख पूर्वीं प्रसिद्ध केला आहे) आपण या विषयाचा केवळ धर्मशास्त्र-

दृष्ट्या विचार करूं. मराठे हे मूळचे क्षत्रिय आहेत ही गोष्ट धर्मशास्त्रदृष्ट्या स्पष्ट आहे.

शनकैस्तु क्रियालोपादिमा क्षत्रियजातयः ।
वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥ ४३ ॥
पौंड्रकाश्चौड्रद्रविडाः कांबोजा यवनाः शकाः ।
पारदाः पल्हवाश्चीनाः किराता दरदाः शशाः ॥ ४४ ॥

याचा अर्थ—" संस्कारलोप व ब्राह्मणाचें अदर्शन झाल्यानें पुढील **क्षत्रिय** जाति वृषलत्वाप्रत म्हणजे शूद्रत्वाप्रत पावल्याः–पौंड्रक, औंड्र, द्रविड, कांबोज, यवन, शक, पारद, पल्हव, चीन, किरात, दरद व शश." कांहीं इतिहासकार व मनुष्यशास्त्रवेत्ते मराठे हे आर्य आहेत असें मानतात व कांहीं ते द्रविड आहेत असें समजतात. कोणताहि समज खरा धरला तरी धर्मशास्त्रदृष्ट्या मराठे हे मूळचे क्षत्रिय असून क्रियालोपानें शूद्र झाले आहेत, असें म्हणावें लागतें. मराठ्यांत उपनयनादि संस्कार जरी लुप्त झाले आहेत, तरी त्यांच्यांत उपनयन संस्काराची आठवण अद्यापि कायम आहे; म्हणजे, ते जानवें घालतात व श्रावणीहि करतात. समंत्रक वेदोक्त संस्कारानें जरी अशी गोष्ट होत नाहीं, तत्रापि तो विधि त्यांच्यांत अद्यापि कायम आहे. सारांश, मराठे मूळचे क्षत्रिय आहेत ही गोष्ट मनुस्मृतीस कबूल आहे व ते जरी क्रियालोपामुळें व ब्राह्मणादर्शनानें शूद्रत्वाप्रत पावले आहेत, तत्रापि ते खरे शूद्र नव्हत, ही गोष्ट धर्मशास्त्रदृष्ट्या कबूल केली पाहिजे. जातीचें खरें स्वरूप सांगणें फार कठिण व वादग्रस्त आहे. परंतु एवढें निर्विवाद आहे कीं, बीजानुरूप जाति असते. प्रत्यक्ष शूद्र, व मूळचे क्षत्रिय असून क्रियालोपानें वृषलत्वाप्रत पावलेले मराठे, यांत महदंतर आहे. शिवाजी महाराजांनीं मराठ्यांच्या मुली केल्या तरी त्या शूद्रकन्या होत्या असें म्हणतां येत नाहीं. क्षत्रियकुलोत्पन्नानें मूळचे क्षत्रिय वर्गाचे असून क्रियालोपानें केवळ व्रात्य झालेल्या क्षत्रियांच्या मुली बायका केल्या असल्या तरी त्यांपासून झालेल्या संततीस उग्राबरोबर गणितां येत नाहीं; म्हणजे क्षत्रियापासून शूद्रकन्यांबरोबर झालेल्या विवाहापासून उत्पन्न झालेल्या संततीप्रमाणें त्यांस मानणें ठीक होणार नाहीं. हा विषय फार बारकाईचा आहे. सबब त्याजविषयीं अधिक खोल पाण्यांत जाण्याची जरूरी दिसत नाहीं. शिवाजी महाराजांनीं

मराठ्यांच्या मुली केल्या व मराठ्यांत वेदोक्त संस्कारानें उपनयनादि विधि होत नाहींत, यामुळें शिवाजी महाराजांस जरी वेदोक्त कर्माचा अधिकार होता, तरी त्यांच्या संततीस तो नाहीं, असा जर आपण कोटिक्रम कबूल केला तर श्रीशिवाजी महाराजांची आई, आजी वगैरे याहि मराठ्यांच्याच मुली होत्या. उदेपूरच्या शाखेपैकीं जे कोणी प्रथम क्षत्रिय दक्षिणेंत आले, त्यांनीं मराठ्यांच्याच मुली केल्या व त्यांपासूनच दोन, तीन, चार पिढ्यांनंतर शिवाजीची उत्पत्ति आहे, तेव्हां गागाभट्टांनीं शिवाजी महाराजांस वैदिक कर्मानें राज्याभिषेक कसा केला? श्रीशिवाजी महाराजांनन्तर जशा मराठ्यांच्या मुली शिवाजीच्या वंशजांनीं केल्या, तशाच त्यांच्या पूर्वजांनींहि जाधव वगैरे घराण्यांतील मुली केल्या होत्या. तेव्हां जर अशा मुली करण्यापासून शिवाजीचें क्षत्रियत्व नष्ट झालें नव्हतें, तर त्यानन्तरहि मराठ्यांच्या मुली केल्यानें शिवाजीच्या वंशजांचें क्षत्रियत्व नष्ट होत नाहीं. सारांश, मराठे हे मूळचे क्षत्रिय असून क्रियालोपानें ते व्रात्य झाले आहेत हें जरी खरें धरलें तत्रापि ते शूद्र नव्हत; शूद्राहून त्यांची योग्यता जास्ती आहे. हीच गोष्ट गागाचार्यांनीं लक्षांत आणून शिवाजीच्या राज्याभिषेकास अडचण नाहीं, असें मानलें. ही गोष्ट मनुस्मृतीवरूनहि स्पष्ट होते, व वहिवाट व सांप्रदाय पाहिला तरीहि तसाच नजरेस पडतो. उत्तर हिंदुस्थानांत कित्येक ब्राह्मणजाति वेदोक्तसंस्कारहीन झाल्या आहेत हें पूर्वीं निर्दिष्ट केलेंच आहे. त्या जाति अजून ब्राह्मण आहेत हें निर्विवाद आहे. ते आपल्यास ब्राह्मण म्हणवितात, इतकेंच नव्हे, तर इतर लोकहि त्यांस ब्राह्मणच मानितात. त्याचप्रमाणें ते नुसतीं जानवीं घालतात, इतकेंच नव्हे, पण संस्कारयुक्त उपनयनादि विधि करणाऱ्या पंचद्रविड ब्राह्मणांपेक्षां ते आपल्यास जास्त कुलीन समजतात. अशीच स्थिति महाराष्ट्रक्षत्रियांची आहे असें मानण्यास हरकत नाहीं. संस्कारलोप झाल्यानें मराठे मूळचे क्षत्रिय असून जरी व्रात्य झाले आहेत, तरी त्यांस आपल्या मूळच्या जातीचा अभिमान व स्मरण आहे, व त्यांच्यांत सर्व प्रकारचे शुद्ध आचार व जानवें घालण्याचा प्रघात सुरू आहे. जरी इतर क्षत्रियांच्या मानानें ते हीन समजले जातात, तत्रापि ते शूद्र नाहींत हें निःसंशय आहे. मनुस्मृतीवरूनहि हीच गोष्ट प्राप्त होते.

द्विजातयः सवर्णासु जनयन्त्यव्रतांस्तु यान् ।
तान् सावित्रीपरिभ्रष्टान् व्रात्यानिति विनिर्दिशेत् ॥ २० ॥
व्रात्यात्तु जायते विप्रात्पापात्मा भूर्जकण्टकः
आवन्त्यव्रातधानौ च पुष्पधः शैख एव च ॥ २१ ॥
झल्लो मल्लश्च राजन्याद्व्रात्यान्निच्छिविरेव च ।
नटश्च करणश्चैव खसो द्रविड एव च ॥ २२ ॥

अ. १० मनु.

येथें व्रात्य द्विजातिकोटि मनूनें जातिप्रकरणांत स्वतंत्र दिली आहे, ही गोष्ट महत्त्वाची आहे. विशेषतः नंदन टीकाकारानें 'विप्रादिति विशेषणं व्रात्यत्वेऽप्यस्य विप्रत्वमूलच्छेदो नास्ति इति सूचयितुम्।' असा शेरा दिला आहे. यावरून व्रात्य विप्र, व्रात्य क्षत्रिय हे विप्रत्वक्षत्रियत्वाच्या मुळापासून सुटले नाहींत ही गोष्ट निर्विवाद आहे. अर्थात त्यांची कोटि शूद्रकोटीहून भिन्न आहे, इतकेंच नव्हे, तर पुष्कळ वरिष्ठ दर्ज्याची आहे, हें मानलें पाहिजे. सारांश, मराठे हे शूद्र नव्हत, मूळचे क्षत्रिय आहेत; व हल्लीं जरी संस्कारहीन आहेत, तरी त्यांच्या मुली अस्सल क्षत्रियांनीं केल्या असतां शूद्रमुलीच्या विवाहापासून जे दोष उत्पन्न होतात ते दोष त्यांच्या संततीस लागू नाहींत. यामुळेंच गागाभट्टानें शिवाजी महाराजांस गायत्रीचा उपदेश केला असावा, व शिवाजी महाराजांचे वंशज जे कोल्हापुरचे महाराज त्यांस पूर्वीची परंपरा लक्षांत आणून श्रीशिष्य जगद्गुरूंनीं वेदोक्त कर्मे करण्याविषयीं आज्ञा दिली होती ती शास्त्रास व वहिवाटीला धरून होती, असें म्हणावें लागतें.

कोल्हापुरच्या महाराजांच्या येथें वेदोक्त कर्म करण्याविषयीं शिष्य स्वामींनीं जी अनुज्ञा दिली होती, तिचा शास्त्रार्थाच्या दृष्टीनें इतर मराठ्यांस कितपत उपयोग आहे, हा एक प्रश्न मोठा महत्त्वाचा आहे. मराठे हे मूळचे क्षत्रिय असून क्रियालोपानें व ब्राह्मणादर्शनानें वृषल झाले, ही गोष्ट मनुस्मृतीच्या आधारावरून सिद्ध होते. दक्षिणेंत बौद्धधर्म बराच पसरला, त्या वेळेस अनेक ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं जातिधर्म सोडले. पण जातीचें बीज हिंदुसमाजाच्या हृदयांत फार खोल गेलें असल्यामुळें विवाहनिर्बंध सुटले असतील असें वाटत नाहीं. हल्लीं सुद्धा हा चमत्कार

खिस्ती झालेल्या लोकांत दृष्टीस पडतो. म्हणजे कित्येक मद्रास इलाख्यां-तील खिश्चियन लोकांत जातीचें बंड कायम आहे व उच्चनीच जातींमध्यें आपसांत विवाह होत नाहींत. त्याचप्रमाणें हिंदु लोकांकडे नजर केली तर त्यांतहि धर्मशास्त्राच्या अडचणी नसतांहि व शंकराचार्यांची परवानगी असतांहि, कोंकणस्थ, देशस्थ व कऱ्हाडे ब्राह्मण यांच्यांत एकमेकांत विवाह होत नाहींत; कुडाळे ब्राह्मण व सारस्वत ब्राह्मण हेहि आपसांत विवाहसंबंध करीत नाहींत. सारांश, जातीचें निर्बंधन क्रियालोप किंवा धर्मलोप झाल्यावरहि पूर्वी मराठ्यांत कायम राहिलें असावें, यांत आश्चर्य नाहीं. यामुळें ९६ कुळींचे मराठे ही संख्या अद्याप लोकांत कायम आहे. या कुळांत पल्लव, शिलार, सेंद्रक ( शिंदे ), चालुक्य वगैरे जीं राजघराणीं दक्षिणेंत होतीं तीं सर्व सामील असून यांशिवाय जाधव, भोंसले, पवार इत्यादि बहुतकरून मूळचीं उत्तर हिंदुस्थानचीं क्षत्रिय घराणींहि सामील आहेत. त्यांतल्या त्यांत पांच घराणीं आपल्यास उच्च समजतात. तीं बहुधा उत्तर हिंदुस्थानांतून आलीं असावींत. तथापि परस्पर शरीरसंबंध झाल्यानें ९६ कुळींचे मराठे ही एकच जात आहे असें गृहीत धरिलें जातें. क्रियालोपानें व ब्राह्मणांशीं संसर्ग न राहिल्यानें मराठ्यांत प्रत्यक्ष शूद्रांच्या एकदोन चाली घुसल्या आहेत ही गोष्ट मराठ्यांसहि कबूल केली पाहिजे.

[ पुरवणी ]

विविधज्ञानविस्ताराच्या दिसेंबर सन १९०५ च्या अंकांत "मराठ्यांचें क्षत्रियत्व" या मथाळ्याखालीं मीं लेख लिहिला आहे. त्याजवर 'दीनबंधु' ता. २० जानेवारी, व 'धर्म' मिति पौष वद्य १ शके १८२७ यांत कडकडीत टीका आली आहे. निःपक्षपातानें लेख लिहिला असतां दोन्ही पक्षांचें समाधान न होतां उलट दोहींकडून कसा मारा होतो याचें हें चांगलें उदाहरण आहे. कदाचित् येथें निःपक्षपातानें हा शब्द अयोग्य वाटेल, याकरितां तो माघारा घेऊन, कोणत्याहि पक्षाचा स्वीकार न करितां वटवाघुळाप्रमाणें इकडेहि नाहीं व तिकडेहि नाहीं अशा स्थितींत राहण्यापेक्षां एका पक्षाचा बळकट अभिमान धरणें हेंच हल्लीं प्रशस्त आहे, यांत संशय नाहीं. तत्रापि विविधज्ञानविस्तारांत दोन्ही बाजूंचा विचार होतो हें मनांत घेऊन, वरील टीकेंतील सुशिक्षित व सुधारलेल्या शिरस्त्यांच्या वर्षावांतून जें कांहीं विषयासंबंधानें धर्मकार व दीनबंधुकार यांनीं विवेचन

केलेलें दिसत आहे त्याजवर उत्तर देणें जरूर आहे, असें वाटून हा लहान लेख लिहीत आहें.

प्रथम 'धर्म'कारांच्या लेखाविषयीं विचार करूं. शूद्रकमलाकर यांनीं जो निर्णय केला आहे तो धर्मकारांना सिद्धांत म्हणून मान्य आहे, व मीहि तो मान्य म्हणून पसंत केलाच आहे. तेव्हां आतां वादाचा विषय फार थोडा राहिला आहे. तथापि धर्मकार म्हणतात, "क्षत्रियवैश्यांचा अत्यंताभाव नाहीं. परंतु कांहीं बीजभूत क्षत्रिय भूतलावर राहतील आणि त्याचप्रमाणें देवापि आणि मरु हे सांप्रत बीजभूत म्हणून राहिले आहेत असें विष्णुपुराणांत सांगितलें असल्यामुळें व अशाच प्रकारचा मजकूर इतर पुराणांत असल्यामुळें, स्वकर्मभ्रष्ट होऊन गुप्तरूपानें राहिलेले क्षत्रिय व वैश्य कोठें तरी आहेतच किंवा असतीलच हा सिद्धांत आहे." यांत प्रश्न एवढाच आहे कीं, हल्लीं जे क्षत्रिय वैश्य आहेत ते गुप्त आहेत कीं काय, व ते गुप्त आहेत असा शुद्रकमलाकरकारांचा अभिप्राय आहे कीं काय? ह्याचें विशेष स्पष्टीकरण धर्म, पान ३३८, यांत केलें आहे. "क्षत्रिय स्वकर्मभ्रष्ट होऊन गुप्तरूपानें राहिले आहेत हा कमलाकरभट्टांचा सिद्धांत आहे. परंतु त्याचा आमच्या मताशीं विरोध येत नाहीं. कारण गुप्तरूपानें असणें म्हणजे व्यवहारांत नसणें;—भूमींत गुप्त असलेलें धन जसें व्यवहाराला नसल्यासारखेंच आहे. ब्रह्मांडांत क्षत्रिय कोठेंच नसतील असें आमचें म्हणणें नाहीं. अश्वत्थामा, बलि वगैरे आठ महात्मे अद्यापि आहेत. परंतु ते गुप्त आहेत. अर्थात् त्यांचा व्यवहारांत कांहीं उपयोग नाहीं म्हणजे व्यवहारदृष्ट्या ते नाहींत. जसे हे आठ असामी आहेत तसे क्षत्रियहि कोठें बियाणापुरते गुप्त आहेत, ही गोष्ट आम्हांला सर्वथैव मान्य आहे"

"प्रच्छन्नरूपाः स्वकर्मभ्रष्टाः क्षत्रियवैश्याः संत्येव क्वचित्" या शूद्रकमलाकरकारांच्या वाक्याचा मी केलेला अर्थ खोटा ठरवून धर्मकारांनीं वर दिल्याप्रमाणें अर्थ केला आहे. म्हणजे 'प्रच्छन्नरूपाः' म्हणजे जसे अश्वत्थामा वगैरे गुप्त आहेत तसे क्षत्रिय वैश्य गुप्त आहेत असा अर्थ त्यांनीं केला आहे. पण हा अर्थ योग्य नाहीं. कारण पुढचें पद स्वकर्मभ्रष्ट हें लक्षांत आणलें पाहिजे. जर ते स्वकर्मभ्रष्ट आहेत तर अश्वत्थामा किंवा देवापिमरुसारखे गुप्त राहूं शकत नाहींत. गुप्त राहणें हें योगबलानें साध्य आहे.

तसे योगबलानें स्वकर्मभ्रष्ट क्षत्रिय आणि वैश्यहि गुप्त आहेत हें म्हणणें संभवत नाहीं. प्रच्छन्नरूप याचा अर्थ असा आहे कीं—ज्याचें स्वरूप झांकलें आहे. जसा विस्तवावर राखेचा थर बनला म्हणजे विस्तव प्रच्छन्नरूप होतो, परंतु बीजरूपानें तो आंत असतो,—त्याप्रमाणें कर्मभ्रष्ट झाल्यानें क्षत्रियत्व व वैश्यत्व ज्यांचें झांकलें आहे, परंतु बीज शुद्ध असल्याकारणानें बीजरूपानें आहे. कांहीं ठिकाणीं असे शुद्ध बीजाचे क्षत्रियवैश्य आहेत, व त्यांच्याचपासून पुढें सत्ययुगांत देवापि—मरु उत्पत्ति करतील. वरील शूद्रकमलाकरकारांच्या वाक्याचा सदरप्रमाणें अर्थ माझ्या मतें होतो. तो योग्य आहे किंवा धर्मकारांनीं केलेला अर्थ योग्य आहे हें वाचकांनीं ठरवावें.

दुसरें, महाभारतांतील विरोधी दिसणाऱ्या वचनांसंबंधानें ‘युगक्षये’ म्हणजे युगाच्या अंतीं असा अर्थ घेण्याविषयीं धर्मकार आग्रह दर्शवितात. ‘युगक्षये’ या पदाचा अर्थ—कलियुगांत—एवढाच होतो असें मला वाटतें. युग शब्दानें चतुर्युगाचा बोध होतो. महाभारत वनपर्व १८८ अध्यायांत कलियुगाचें वर्णन आहे, त्यांत ‘युगक्षये’ हा शब्द कित्येक ठिकाणीं आला आहे, व तो वर दिलेल्या अर्थीं आहे. असो, मी आपला आग्रह धरीत नाहीं. पण युगक्षये याचा अर्थ ४ लक्ष ३२ हजार वर्षांपैकीं शेवटल्या वर्षांतील शेवटल्या दिवशीं असा तर नाहीं ना? कारण तसा अर्थ घेतला तर एक क्षण शेवटला घेऊन त्यावेळेस सर्व एकवर्ण होतील असें म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तेव्हां कित्येक वर्षें तरी प्रजा एकवर्ण होतील या वचनाचा विरोध आलाच. तात्पर्य सर्व वाक्यांचा समन्वयानें असा अर्थ होतो कीं, कलीचें जसजसें घोर रूप प्रकटित होत जाईल तसतसें वर्णधर्म कमी होऊन पहिल्यानें दोन वर्ण राहतील व पुढें एकच राहील. सारांश, सध्यां कलीचें घोर रूप प्रकट झालें आहे असें मानण्यास आधार नाहीं. कलीचा प्रथमपाद नुकताच लागला आहे. वेदाविषयीं तसेंच वर्णश्रमाविषयीं श्रद्धा बाकी आहे तोंपर्यंत चारी वर्ण आहेत असें मानलें पाहिजे; व असें मानलें तरच संन्यासाचें अस्तित्व व उपयोगित्व आहे. सारांश “यावद्वर्णविभागोऽस्ति यावद्वेदः प्रवर्तते” तोंपर्यंतच क्षत्रियांचे अस्तित्वाविषयीं भांडण आहे. व ‘बीजभूताः प्रच्छन्नरूपाः स्वकर्मभ्रष्टाः क्षत्रियवैश्याः संत्येव’ म्हणजे कर्मभ्रष्ट झाल्यानें झांकलेल्या स्वरूपाचे शुद्ध बीजाचे शिसोद्यासारखे क्षत्रिय आहेत हें म्हणणें प्राप्त आहे.

तिसरी शंका अशी आहे कीं, शुद्ध बीजाचे क्षत्रिय हल्लीं प्रत्यक्ष पाहिले तर नाहींत, कारण शिसोदे घराण्यानें जरी आपल्या मुली मुसलमानांस दिल्या नाहींत, तत्रापि जयपूर जोधपूरवाल्यांनीं दिल्या; तेव्हां "मुसलमानांशीं समजून उमजून विवाहसंबंध केलेलीं रजपुतांचीं घराणीं धर्मशास्त्रदृष्ट्या शुद्ध राहिलीं नाहींत." ही धर्मकारांची शंका ठीक नाहीं. मुली दिल्यानें शुद्धता बिघडत नाहीं. मुसलमानांच्या मुली कोणत्याहि क्षत्रियांनीं केल्या नाहींत, किंबहुना ज्या ज्या घराण्यांनीं मुली खुषीनें किंवा जबरदस्तीनें मुसलमानांस दिल्या त्या, त्या त्या घराण्यांतसुद्धां पुन्हा अन्नव्यवहारांतहि घेतल्या गेल्या नाहींत ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. तेव्हां हा आक्षेप योग्य नाहीं. आणि शुद्ध बीजाचीं क्षत्रियघराणीं अद्याप आहेत यांत शंका नाहीं.

चवथा आक्षेप असा कीं "पैसे उपटण्याकरितां कांहीं तरी गडबडगुंडा करून, त्या गडबडगुंड्याला उपनयन ही संज्ञा गागाभट्टांनीं दिली असें फार तर म्हणतां येईल. मुंज जर लावली तर मुंजीनंतरचे व लग्नाचे पूर्वींचे जे संस्कार त्यांची वाट काय? देशाचें किंवा प्रांताचें आधिपत्य प्राप्त होण्याचे वेळीं राज्याभिषेक जरी होत असला तरी तो वेदमंत्रांनीं व्हावयाचा किंवा पुराणोक्त मंत्रांनीं व्हावयाचा हें गादीवर बसणाऱ्याच्या जातीवर अवलंबून असतें. शिवाजीला जो राज्याभिषेक झाला तो पुराणोक्त मंत्रांनीं न होतां वेदमंत्रांनींच झाला असें सिद्ध करण्यास जर कांहीं आधार असले तर ते प्रसिद्ध करावे." शिवाजीच्या राज्याभिषेकाची सविस्तर हकीकत मल्हाररामरावकृत शिवछत्रपतीच्या सप्तांकी बखरींत दिलेली आहे व सदरहू पुस्तक विविधज्ञानविस्तारांतच छापलें आहे. त्यांतील उतारे खालीं दिले आहेत त्यावरून या आक्षेपांचें निरसन होईल.

"राज्याभिषेक करावा असें सिद्ध झालें. शिष्टसंमतें विचार करितां 'राज्याभिषेक करण्यास आदौ व्रतबंध होऊन सर्व विधि झाले पाहिजेत. यास श्रीकाशी व पैठण व सर्व क्षेत्रांची शिष्टमंडळी यांचे विचारावांचून येथें सिद्धता कैशी करावी?' असा विचार पडला. ते समयीं बाळाजी आवजी चिटणीस यांणीं उठोन विनंति केली जे,—"चार वेद सहा शास्त्रें असें ज्यांचें अध्ययन असे श्रीकाशींत मुख्य भटांचें घर आहे. त्यांतील धर्मप्रवृत्तिग्रंथ ज्यापासून उत्पन्न होतात तेच धुरीण पंडित गागाभट्ट

अनायासें पैठण येथें महाराजांची कीर्ति श्रवण करून आले आहेत. त्यांस व पैठणचे पंडितांस येथें बोलावून सर्वांचे विचारें सिद्धता करावी. " तेव्हां सर्वांचें संमत आणावें असें झालें. तेव्हां केशव पंडित व भालचंद्र भट पुरोहित......आणावयास रवाना केले. त्यांणीं जाऊन महाराजांचा उद्देश व मनोरथ त्यांस समजावून त्यांशीं व पैठणकर पंडितांशीं एकवाक्यता केली. आणि उदेपूर, जयपूर, येथें राज्याभिषेकविधि होतो त्याप्रमाणें करावें असें सिद्ध करून घेऊन आले...इकडील सर्व थोरथोर ब्राह्मण व मुत्सद्दीसहवर्तमान सभा केली...हे उदाजीचे राणाजीचे घराणेंतील वंश, शिसोदे कुळ परंपरा पुरुष पिढ्या लावून या प्रांतीं हिंदुस्थानांतून आले. रजपूत राजवंश महाराष्ट्र देशीं मराठे म्हणवितात. जयपूर उदेपूर येथें राज्याभिषेक, सिंहासन, व्रतबंध होतात. जयसिंग यांणीं श्रीकाशीक्षेत्रादि ब्राह्मण नेऊन अश्वमेध केला. त्या अन्वयें राज्याभिषेकांग व्रतबंध करून अभिषेक करावा. हे त्यांचे कुळींचे, यांस छत्रसिंहासन अधिकार चाललाच आहे " असें ठरलें. महाराजांचें वय शेचाळीस वर्षांचें, पुत्र दोन जाहले असतां अभिषेकाचे पूर्वांगीं व्रतबंध करावा असें सिद्ध करून, सर्व पंडित जन, ब्राह्मण यांचें संमत झालें, आणि लक्षणयुक्त अभिषेकसंभारसाहित्य समुद्रोदकें व महानद्यांचीं पुण्योदकें वगैरे आणवावीं.–इत्यादि.

यापुढें एकंदर समारंभाची हकीकत सविस्तर दिली आहे:–

" प्रथम ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीस व्रतबंधाचे समारंभास प्रारंभ होऊन पंचमीपर्यंत यथाविधि व्रतबंधन झालें...षष्ठीस प्रथम पट्टबंधनविधि करून ऋत्विजवरण पुण्याहवाचनपूर्वक यज्ञास प्रारंभ करून...सात दिवस अग्नीचीं चिन्हें वगैरे पाहणें करविलीं. सर्वहि कार्य निर्विघ्न होतें झालें. महाराज व ऋत्विज निरशन, व्रतस्थ, घृत, पय, फळें आहार करून नक्षत्रशांति, ऐंद्रीशांति व पौरंदरीशांति यथाक्रमें करून राज्याभिषेकांग विधि सांगितले तसे करवित झाले...त्रयोदशीचा दिवस प्राप्त झाला असतां महाराजांनी शुभ्र वस्त्रं, अलंकार, पुष्प परिधान केलें, आणि क्षीरवृक्षाचें आसन सवा हात उंच व रुंद असें करून सुवर्णेंकरून मढवून त्याजवर आरोहण केलें. पट्टबंधन करून पट्टराणी सईबाई बसली. संभाजी महाराज सन्निध बसले; सेनापति पेशवे वगैरे निरनिराळया बाजूनें उभे राहिले. मध्यें शिष्ट, ब्राह्मण, पंडित,

वैदिक, श्रोत्री वगैरे उभे राहिले, आणि अभिषेकास प्रारंभ झाला. यथाविधि मंत्रोक्तप्रकारें प्रधान, ब्राह्मण व पुरोहित ऋत्विजसह सुवर्णपात्र शतच्छिद्र करून त्यांत स्थापित उदकें करून...अभिषेक केला. ते समयीं मंगळवाद्यें, भेरी गायनादि समारंभें सर्वहि आकाशपृथ्वी शब्दें करून पूर्ण झाली." यापुढें संभाजी व राजाराम यांच्याहि मुंजी झाल्याचा उल्लेख आढळतो.

उतारा फार लांब झाला, परंतु विषय महत्त्वाचा आहे म्हणोन घेणें भाग पडलें. वरच्या वाक्यांत 'मंत्रोक्त प्रकारें' असा शब्द आहे, तो वैदिक मंत्रोक्तप्रकारें किंवा पुराणोक्त मंत्रोक्त प्रकारें हा प्रश्न कोणी केल्यास एकंदर हकीकत कां दिली आहे याचें कारण समजून येईल. उदेपूर येथें राज्याभिषेक जसा होतो तसा व्रतबंधपूर्वक करण्याचा शिवाजीमहाराजांचा उद्देश व त्याप्रमाणें गागाभट्टांची व इतर विद्वान् ब्राह्मणांची संमति. परंतु प्रत्यक्ष करतांना गागाभट्टानें गडबडगुंडा करून व्रतबंध नांव ठेविलें व अभिषेकाच्या वेळेस जीं मंगलवाद्यें वाजलीं त्यांच्या ध्वनींत वैदिक मंत्रांचे ऐवजीं पौराणिक मंत्र म्हणोन सर्वांस व इतिहासकारांसहि फसविलें, असें मानणें म्हणजे चांगल्या विद्वान् ब्राह्मणाच्या पदरीं महाकपट घालणें आहे. एकंदर हकीकतीचा यथासांग विचार केला तर वैदिक मंत्रांनीं अभिषेक झाला असा बोध होतो.

येथवर धर्मकारांचें मत योग्य नाहीं असें म्हणण्याचीं कारणें दिलीं. आतां 'दीनबंधु' कारांच्या मताकडे वळलें पाहिजे. त्यांच्या मताविषयीं फार लिहिणें जरूर नाहीं. कारण माझा विशेष कटाक्ष माझ्या जातिबंधूंच्या विरुद्ध लिहिण्याकडेसच आहे, व त्यांचेंच यथाशक्ति समाधान करणें माझें कर्तव्य आहे असें मी समजतों. दीनबंधुकारांच्या मताशीं माझें फारसें विरुद्धत्वाहि नाहीं. प्रौढविधवाविवाह हा द्विजाचार आहे व त्यास शास्त्रांत साधक प्रमाणें सांपडतील, हें त्यांचें म्हणणें खोडणें म्हणजे एक विषयावर स्वतंत्र निबंध लिहिणें आहे. पण एवढी गोष्ट 'दीनबंधु' कार कबूल करतीलच कीं क्षत्रियांच्या बहुतेक जातींत–उदाहरणार्थ उदेपूर व जयपूर व जोधपूर वगैरे ठिकाणच्या रजपुतांत–तो रूढ नाहीं, व यामुळेंच ते लोक मराठ्यांत व आपणांत फरक समजतात. कदाचित् शास्त्रदृष्ट्या त्यांची चूक असेल, पण त्यांची समजूत हल्लीं तशी आहे. पण विधवाविवाहाचा वादग्रस्त विषय आपण सोडून देऊं. बहिणीचा किंवा मुलीचा मुलगा दत्तक

घेणें हा शूद्राचार आहे, द्विजाचार नाहीं ही गोष्ट सर्व हायकोर्टांनीं ठरविली आहे, तेव्हां आतां त्यांत मतभेद राहिला नाहीं. हा आचार मराठ्यांनीं घेतला आहे. सारांश, मूळचे अस्सल क्षत्रिय असून मराठ्यांनीं कांहीं शूद्राचार उचलले ही गोष्ट सिद्ध आहे.

पण याजवर दीनबंधुकार म्हणतात कीं, जसे मराठ्यांनीं शूद्राचार उचलले तसे ब्राह्मणांनीहि उचलले नाहींत काय? मराठे तेवढे आज शूद्रतुल्य झाले आहेत, आणि महाराष्ट्रीय ब्राह्मण तितके मात्र खरे ब्राह्मण अजूनहि आहेत. असा भलताच हट्ट धरणें योग्य आहे काय? या प्रश्नास माझें एवढेंच उत्तर आहे कीं, असा हट्ट मीं धरिला नाहीं व असें माझें म्हणणेंहि नाहीं. ब्राह्मणांच्या ब्राह्मण्यांत कलियुगाच्या महिम्याप्रमाणें अंतर पडलेंच आहे हें मीं आपल्या लेखांत कबूल केलें आहे. "नित्यं ब्राह्मणानाम्" म्हणून नित्य वर्ज केलेली सुरा कित्येक ब्राह्मण आज पीत आहेत. सुरापानापासून ब्राह्मण पतित होतो हें जर खरें आहे, आणि पतिताशीं संसर्ग करणारा तोहि पतित आहे हें जर शास्त्रसिद्ध आहे, आणि अशा ब्राह्मणाशीं बाकीचे ब्राह्मण खुशाल अन्नपानादि व्यवहार करीत आहेत, तर ब्राह्मणांचें ब्राह्मणत्व पूर्व युगाप्रमाणें शुद्ध आहे असें कसें म्हणतां येईल? पण जोंपर्यंत ब्राह्मणांनीं दारू प्यावी असें प्रत्यक्ष उघडपणें ब्राह्मण म्हणत नाहींत, जोंपर्यंत वेदांचा मान अद्याप कायम आहे, तोंपर्यंत 'प्रच्छन्नरूपाः कर्मभ्रष्टाः क्षात्रियवैश्याः संत्येव' त्याचप्रमाणें 'ब्राह्मणाः संत्येव' एवढें मानिलें पाहिजे. शिवाय कंदर्प-भक्षण आणि मातुल-कन्या-परिणय हे शूद्राचार दक्षिणी ब्राह्मणांत प्रत्यक्ष शिरले आहेत हें मी मागील लेखांत लिहिलें आहेच. परंतु हे शूद्राचार असूनहि जसे दक्षिणी ब्राह्मण आहेत तसेंच विधवाविवाह, भगिनीपुत्र दत्तक हे शूद्राचार चालू असले तरी मराठे हे क्षत्रिय आहेत. हा सिद्धान्त मीं मान्य केला आहे.

---

# मराठ्यांच्या क्षत्रियत्वाविषयीं श्रीद्वारकामठ शंकराचार्यांचा ठराव.



मराठे क्षत्रिय आहेत कीं नाहींत या प्रश्नासंबंधानें महाराष्ट्रजनसमूहांत हल्लीं बराच महत्त्वाचा वाद असून, या वादाचे समाजस्थितीवर व समाजाच्या ऐक्यावर फारच अनिष्ट परिणाम घडून येत आहेत, हें प्रत्येक विचारी पुरुषास दुःखद होत आहे. या वादाचा योग्य निकाल होऊन समाजाला चांगलें वळण मिळावें असें प्रत्येक महाराष्ट्रहितेच्छु मनुष्यास वाटणें साहजिक आहे. विविधज्ञानविस्ताराच्या १९०५ चे डिसेंबर महिन्याचे अंकांत 'मराठ्यांचें क्षत्रियत्व' या मथळ्याखालीं मीं एक लेख लिहिला होता. त्याचे आरंभींच--

"नाब्रह्म क्षत्रमृध्नोति नाक्षत्रं ब्रह्म वर्धते ।

ब्रह्मक्षत्रं च संपृक्तमिह चामुत्र वर्धते"

हा मनूचा श्लोक घेतला होता. ब्राह्मणांचें आणि क्षत्रियांचें ज्या देशांत वैर असतें तो देश हतभागी समजला पाहिजे. ब्राह्मणांवांचून क्षत्रियांचें चालावयाचें नाहीं, क्षत्रियांवांचून ब्राह्मणांचें चालावयाचें नाहीं. ब्राह्मण व क्षत्रिय एक मतानें चालतील तरच तो देश समृद्धस्थितीस पोंचेल असा निसर्गसिद्ध नियम मनूपासून प्रसिद्ध असतां हल्लीं महाराष्ट्रांत याच्या उलट स्थिति आहे हें पाहून कोणास वाईट वाटत नाहीं! ब्राह्मण व क्षत्रिय एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढून "तुम्ही ब्राह्मण नाहीं," "तुम्ही क्षत्रिय नाहीं," असा परस्परांचा मोठ्या द्वेषबुद्धीनें निषेध करीत आहेत. अशा स्थितींत श्रीमच्छंकराचार्य द्वारकामठाधिकारी यांणीं श्रीमंत तुकोजीराव पवार, देवास संस्थान थोरली पातीचे महाराज, यांचें क्षत्रियत्व कबूल करून त्यांचे व्रात्यप्रायश्चित्तोत्तर उपनयनादि संस्कार वैदिक मंत्रांनीं करावे अशी देवास येथील ब्रह्मवृंदास आज्ञा केली आहे, ही अत्यंत समाधानाची गोष्ट होय. अशा प्रकारें धर्मगुरूंनीं समाजांतील द्वेष मिटवून समाजाला योग्य वळण लावण्याचा प्रयत्न केल्यास समाजावर त्यांचे अत्यंत उपकार होतील इतकेंच नव्हे, तर धर्मगुरूंचें योग्य कर्तव्य त्यांनीं बजाविलें असें होईल. शारदापीठाच्या निकालाची नक्कल मला मिळाली आहे ती मी लोकांच्या माहितीकरितां खालीं देत आहे.

सदरहू निकाल श्रींनीं मोठ्या विचारानें साधकबाधक सर्व प्रमाणांचा ऊहापोह करून दिला आहे, हें वाचकांच्या लक्षांत येईलच. "कलियुगांत क्षत्रिय नाहींत," "नंदान्तं क्षत्रियकुलम्" या वचनांच्या विरुद्ध किती तरी वचनें आहेत, हें या निर्णयांत फार सविस्तर रीतीनें दाखविलें आहे. खुद्द आद्य श्रीमच्छंकराचार्यांच्या मुखानें क्षत्रियांचें अस्तित्व सिद्ध होत आहे हें या निर्णयावरून दिसेल. अशा स्थितींत कलियुगांत क्षत्रिय नाहींत, म्हणजे 'नंदान्तं क्षत्रिय–कुलम्' ह्या पुराणवचनाचा अर्थ गौणत्वानें अर्थवादपर घेतला पाहिजे असा श्रींनीं निकाल दिला आहे तो योग्य आहे, हें प्रत्येक समंजस मनुष्य कबूल करील. इतिहास पाहतांहि हाच अर्थ योग्य दिसतो. अलेक्झांडरच्या वेळेला हिंदुस्थानांत मगध राजे सार्वभौम होते, हें प्रसिद्ध आहे. यांना नंद अशी संज्ञा होती. हे नवनंद मोठे बलाढ्य होते. किंबहुना यांच्या सामर्थ्याच्या हकीगती ऐकूनच शिकंदराचे ग्रीक लोक पंजाबाच्या अलीकडे आले नाहींत. यांतील शेवटल्या नंदानें क्षत्रियांचा व ब्राह्मणांचा फार छळ व नाश केला असावा. कारण चाणक्यानें अखेरीस चंद्रगुप्तास हातीं धरून या नंदाचा नाश केला. चंद्रगुप्त हा एका शूद्रीपासून झालेला नंदाचा मुलगा होता, व तो मोठा पराक्रमी होता. चंद्रगुप्तानें चाणक्याच्या मदतीनें मगधाची गादी संपादन केली इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानचें सार्वभौमत्वहि त्यानें मिळविलें. चंद्रगुप्ताचा वंश मौर्यकुल या नांवानें इतिहासांत प्रसिद्ध आहे, व त्यांत अशोक हा मोठा बलाढ्य व धार्मिक राजा झाला. परंतु त्यानें बौद्धधर्म स्वीकारून सर्व हिंदुस्थानांत बौद्धधर्माच्या प्रसारास फार मदत केली. हें मौर्यकुल दोन अडीचशें वर्षे हिंदुस्थानांत सार्वभौमत्व भोगीत होतें. अशा स्थितींत 'नंदांतं क्षत्रियकुलम्,' असें साहाजिकच म्हणणें रूढ झालें असावें. परंतु जरी क्षत्रिय सार्वभौम नाहींसे झाले तरी क्षत्रिय मांडलिक राजे नाहींसे झाले किंवा सर्व राजपुत्र नाहींसे झाले, असें म्हणणें म्हणजे अर्थाचा अनर्थ करणें होय. विक्रमादि क्षत्रिय राजे अवन्ति वगैरे देशांत होऊन महान् पराक्रमानें हिंदुस्थानांत पुढें बहुतेक सार्वभौम झाले त्यांची वाट काय, असा जो प्रश्न या निर्णयांत आहे तो फार महत्त्वाचा व ऐतिहासिक दृष्ट्या विचारणीय आहे. सारांश, द्वारकामठाचा हा निर्णय फार विस्तृत व सर्व रीतीनें विचार केलेला असून समाधानकारक आहे. या निर्णयानें हल्लीं व्यर्थ माजून राहिलेल्या वादास बराच आळा पडेल अशा आशेनें हा समग्र निर्णय प्रसिद्धीकरितां देत आहें. याचा स्वीकार बहुजनसमाज शांतपणानें व हितैकबुद्धीनें करो अशी परमेश्वराजवळ माझी प्रार्थना आहे.

श्री महेश्वरापरावतार श्रीमच्छंकरभगवत्पूज्यपादाचार्याणामाद्यैकांतिकास्थान शारदापीठसंस्थानद्वारका.

---

# व्रात्यक्षत्रियसंस्कारनिर्णय.

देवासनिवासी ब्रह्मवृंद व वे० शा० सं० रा० रा० कृष्णाचार्य शास्त्री कर्नाटक, देवास येथील श्री शारदापीठाचे धर्माधिकारी, मुक्काम देवास.

या कामाची हकीगत अशी आहे कीं:--संस्थान देवास, प्रांत-माळवा, राज्याधिपति श्री तुकोजीराव बापूसाहेब परमार व त्यांचे राजकुटुंबी परमार क्षत्रिय यांचा उपनयनसंस्कार करण्याकरितां आज्ञा मिळावी म्हणून देवास येथील ब्रह्मवृंद व वे० शा० सं० कृष्णाजी गणेश सरकार-उपाध्ये, व वे० शा० सं० रा० रा० दिवाण सखाराम गंगाधर सुपेकर वगैरे गृहस्थ मंडळी, मिळून (१२४) एकशें चोवीस सह्यांचा अर्ज श्रीशारदा-पीठ कार्याधिकारी स्व० भु० रा० रा० मल्हार अनंत प्रयागी यांचे मार्फत ता. १६ माहे नवंबर सन १९०७ रोजीं श्री गुरुस्थानीं स्वारी मुक्काम बडोदें येथें सादर झाला. ते निशाणी १ व २ या कामांत दाखल आहेत.

अर्जदारांनीं आपल्या मागणीच्या पुष्ट्यर्थ श्रीसंकेश्वरमठाधीशांनीं कोल्हापुर सरकारास वेदोक्त कर्म करण्याकरितां दिलेल्या ठरावाची नक्कल; श्रीक्षेत्र काशी येथील कैवल्यधामनिवासी स्वामी श्रीकृष्णानंद सरस्वती यांनीं सदर कोल्हापूर प्रकरणास सम्मति दिली त्याची नक्कल; कलियुगा-मध्यें क्षत्रिय आहेत, त्यांचे संस्कार विच्छिन्न झाले तरी यथोक्त व्रात्यप्रायश्चित करून उपनयन संस्कार करण्यास व उपनयन संस्कार केल्यानंतर वेदोक्त कर्म करण्यास बाध नाहीं अशाबद्दल वे० शा० सं० रा० रा० कृष्णाचार्य शास्त्री कर्नाटक धर्माधिकारी यांचा शास्त्रार्थसंग्रह; कलियुगांत वैश्यांचें अस्तित्व व त्यांचेकडे ब्राह्मण-द्वारा वेदोक्तकर्म करण्यास हरकत नाहीं याबद्दल श्रीमंत होळकर सरकारच्या हुकुमान्वयें वे० शा० सं० पण्डित नानू रामचंद्र भानू-मुंबई सनातन-धर्म-सभाध्यक्ष व इंदूर येथील वे० शा० सं० हरीशास्त्री वगैरे विद्वन्मंडळीमध्यें झालेल्या विवाहांत पंचमार्फत झालेल्या निर्णयाची नक्कल; आणि श्रीशिवछत्रपति शिवाजीमहाराजांच्या उपनयन संस्काराच्या वेळीं श्रीशिवछत्रपति शिवाजीमहाराज क्षत्रिय आहेत, व त्यांस संस्कार करण्यास बाध नाहीं अशाबद्दल ठिकाठिकाणच्या विद्वन्मंडळीच्या संमतिपत्रांच्या नकला सात फाईल एक कैवल्यधामनिवासी कृष्णानन्द सरस्वती यांच्या "चातुर्वण्य

सनातनत्व-परामर्ष" या नांवाच्या पुस्तकाची प्रत; परमारकुल क्षत्रिय कुल आहे याबाबत अग्निपाल राजापासून हल्लींच्या श्रीमंत महाराज तुकोजीराव बापूसाहेब यांच्यापर्यंतच्या वंशावळीचा इतिहास; वगैरे पुराव्यांत रुजू आहेत ते निशाणी नं० ३-४-५-६-७ ८ व ९ या कामांत दाखल आहेत.

या कामांत विचार करण्यायोग्य मुद्दे निष्पन्न होत आहेत ते:-

१. कलियुगांत क्षत्रियांचें अस्तित्व आहे काय?

२. परमार किंवा पवार कुल हें क्षत्रिय कुल आहे काय?

३. असेल तर तें केव्हांपासून संस्काररहित झालें?

४. सध्या उपनयन-संस्कारपूर्वक वेदोक्त कर्म चालू करण्यास बाध आहे काय?

पहिल्या मुद्याचें विवेचन:-

१. हल्लीं कलियुगामध्यें क्षत्रिय व वैश्य नाहींत अशाविषयींची चर्चा सर्व हिंदुस्थानभर जोरानें चालू आहे, ती इतकी कीं एकतर्फे क्षत्रिय वंश निर्मूलन झालें असें दाखविण्याच्या हेतूनें अनेक ग्रंथांचें निरीक्षण होत आहे. त्यांत कांहीं एकदेशीय प्रमाणें सांपडतात, त्यांवरून क्षत्रिय नाहींत असें प्रसिद्ध करण्यांत येत आहे. व दुसऱ्या बाजूनें ब्राह्मणांच्या वर्तनाविषयीं अत्युग्र हृदयवेधक टीकेसह क्षत्रियास्तित्व सप्रमाण दाखविण्यांत येत आहे.

२. या परस्पर वादरूपी द्रुपदावानलापासून निघालेल्या स्पर्धारूपी धुरानें विवेकबुद्धीचें आच्छादन होऊन गेलें आहे.

३. साधकबाधक उभयपक्ष इदमनिदं, इत्थमनित्थं या विवादांत आरूढ होऊन गेला आहे. तो येथपर्यंत कीं——त्याची हद्द किंवा मर्यादा बिलकुल राहिली नाहीं. ही तक्रार याज्ञवल्क्यस्मृतीवर मिताक्षराग्रंथ निर्माण झाला त्यावेळीं उत्पन्न झाली होती असें वाटत नाहीं. परंतु त्यानंतरच्या बहुतेक निबंधकारांनीं सपरिकर क्षत्रिय-वैश्य जातींचा कलियुगामध्यें अभाव दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचप्रमाणें नागोजीभट्टांनींहि व्रात्यनिर्णय पुस्तकामध्यें उभयवर्णांचा अभावच दाखविला आहे.

४. "इक्ष्वाकूणामयं वंशः सुमित्रान्तो भविष्यति । एतं संप्राप्य राजानः संस्था प्राप्स्यंति वै कलौ ॥ देवापिर्योगमास्थाय कलापग्राममा-

स्थितः। सोमवंशं कलौ नष्टं कृतादौ स्थापयिष्यति ॥ एतेषां नामलिंगानां पुरुषाणां महात्मनाम्। कथामात्रावशिष्टानां कीर्तिरेव स्थिता भुवि ॥ देवापिः शंतनोर्भ्राता मरुच्चेक्ष्वाकुवंशजः। कृते युग इहागत्य क्षात्रमावृत्तकौ हि तौ॥ महापद्मपतिः कश्चित् नंदक्षत्रविनाशकृत्। इत्यादि वाक्यें प्रमाण दाखवितात. विरुद्ध पक्षानें वर दाखविलेल्या प्रमाणांच्या विरुद्ध बाधप्रदर्शनपूर्वक 'व्रात्यसंस्कारमीमांसा' वगैरे पण ग्रन्थ दिलेले आहेत.

५. वर दर्शविलेल्या क्षत्रियाभाववाक्यांचा अम्मल कलियुगामध्ये अद्याप पावेतों झाला आहे काय? याचा विचार करितां नंद राजानंतर सुधन्वापासून भर्तृहरि, विक्रम, भोज, पृथ्वीराज चव्हाण, जयचंद राठोडपर्यंत महाप्रतापी राजे होऊन गेले. ते क्षत्रिय होते किंवा नाहीं, व क्षत्रिय असतील तर क्षत्रिययोग्य वैदिकसंस्कारयुक्त होते किंवा नाहीं याविषयीं पाहतां कोणासहि असें म्हणण्याचें सामर्थ्य नाहीं कीं ते क्षत्रिय नसून वैदिकसंस्काररहित होते.

६. कारण कनोजचा जयचंद राठोड यानें राजसूययज्ञ आरंभिला होता ही गोष्ट इतिहासांत सर्वत्र प्रसिद्ध आहे. त्यावेळीं जयचंद्रास तुम्हीं क्षत्रिय नाहीं व तुम्हांस वेदोक्त (वैदिक) कर्म करण्याचा अधिकार नाहीं अशी तक्रार त्या वेळच्या ब्राह्मणांनीं घेतल्याचा कोठेंहि उल्लेख नाहीं

७. त्यानंतरच्या क्षत्रियराजांनीं वैदिक याग केले आहेत काय? याचा विचार करितां जयपूरचा राजा सवाई जयसिंग यानें अश्वमेध याग केल्याचें प्रसिद्ध आहे. त्याबद्दल प्रत्यक्ष प्रमाण जयपुरामध्यें बावडी असून ती यज्ञशाळेची बावडी या नांवानें प्रसिद्ध आहे. त्या ठिकाणीं यज्ञशाळेचें स्थान अद्याप कायम आहे. इतकेंच नाहीं तर १९२४ सालीं रेवा संस्थानाधिपति रघुनाथसिंहजी यांनीं ब्राह्मणद्वारा वाजपेय केला होता. त्यावेळीं काशी येथील विद्वान् जगन्नाथ पाठक सप्तर्षि हे अध्वर्यु होते व रेवानरेश हे सोळंकी वंशांतील क्षत्रिय आहेत. संवत् १९५२ सालीं वैशाख मासीं कृष्णगडराजपति शार्दूलसिंहजी बहादुर जी. सी. आइ. ई. यांचे अनुज श्रीजवानसिंहजी यांनीं सोमयाग केला होता. त्यावेळीं काशीक्षेत्रस्थ सप्तर्षी या उपनांवाचे विद्वान् महाराष्ट्र ब्राह्मण हरीराम गौरीशंकर भट्ट हे अध्वर्यु होते व इतर ऋत्विज वगैरे दक्षिणी ब्राह्मणच होते.

८. याप्रमाणें संवत् १९५२ पर्यंत कलियुगामध्यें वैदिकसंस्कारयुक्त क्षत्रिय आहेत हें जवानसिंहांनीं सोमयागापर्यंत केलेल्या श्रौतकर्मावरून सिद्ध होत आहे.

९. जवानसिंहजी यांनीं सोमयाग केल्यावरून त्यांस दीक्षितजी अशी पदवी प्राप्त झाली होती. ती व सदरहू सोमयागाची सगळी हकीगत "वैष्णवतोषक प्रत्यक्ष पशुवाद" या नांवाचें पुस्तक राज्यज्ञानसागर छापखाना कृष्णगढ सं० १९५२ फाल्गुन वद्य ३ चें छापलेलें आहे. त्यावरून स्पष्ट आहे.

१०. नंद राजापर्यंत क्षत्रिय होते अशी एक तक्रार आहे. या तक्रारीस आधार "नन्दान्तं क्षत्रियकुलम्" व "महापद्मपतिः कश्चित् नंदः क्षत्रविनाशकृत्" हीं वाक्यें होत. परंतु या वाक्यांचा भोगवटा ( अम्मल ) झाला नाहीं ही गोष्ट संवत् १९५२ सालच्या सोमयागावरून सिद्ध होत आहे.

११. कलियुगारंभापासूनच क्षत्रियांचा अभाव आहे असें म्हटलें, तर कौरव, पांडव व श्रीकृष्ण वगैरे महाभारतांत सांगितलेले सर्व राजे क्षत्रिय नव्हते असें म्हणण्याची पाळी येईल. कारण कीं--

त्रेतायुगे प्रसुप्तोऽसि विदितो मेऽसि नारदात् ॥
इदं कलियुगं विद्धि किमन्यत्करवाणि ते ॥

हें वाक्य श्रीकृष्णांनीं मुचकुंदाप्रत सांगितलें आहे. यावरून कृष्णावतार कलियुगामध्यें झाला असें सिद्ध होत आहे. याचें विवेचन पुढें करण्यांत येईल.

१२. या प्रकरणामध्यें विचार करण्यासारखी दुसरी एक अशी गोष्ट आहे कीं, कलियुगामध्यें क्षत्रियाभावबोधक वाक्यांत कांहीं अपवाद-वाक्यें आहेत कीं काय याचा विचार करितां--

अचंद्रार्कग्रहा भूमिर्भवेदपि न संशयः ।
अपौरवा न तु मही भविष्यति कदाचन ।

हरिवंश, विष्णुपुराण.

हें वाक्य ययाति राजानें पूरूला राज्य देऊन त्यास वरदान दिलें त्याविषयींचें आहे. यावरून पूरुवंशी क्षत्रियांचा सर्वथा नाश झाला असें मानणें शक्य नाहीं. आणखी,

उद्भिज्जो नाम भविता सेनानी: कश्यपो द्विजः ।
अश्वमेधं कलियुगे पुनः प्रत्याहरिष्यति ॥
हरिवंश, विष्णुपुराण.

या वाक्यावरूनहि कलियुगामध्यें अश्वमेध पुनः होणार आहेत हें भगवान् व्यास महर्षींचें वाक्य आहे व अश्वमेध करण्याचा अधिकार क्षत्रियांशिवाय दुसऱ्या कोणास नाहीं; व कलियुगांत पुनः अश्वमेध होणार; तर त्यावेळीं क्षत्रिय अवश्य पाहिजेत; तर मग या उभय वाक्यांनीं नंद-राजानंतरहि कलियुगामध्यें क्षत्रियसद्भाव अवश्य मानला पाहिजे.

१३. याप्रमाणें वर दाखविलेल्या वाक्यांवरून कलियुगामध्यें क्षत्रिय-सद्भाव आहे, हें सिद्ध होतें.

१४. जगद्गुरुपीठ–मर्यादेचे ग्रंथ; भगवान् भाष्यकारांचें महानुशासन ("मठाम्नायचंद्रिका") ब्रीदावळी; अद्वैत सम्प्रदायाचे ग्रंथ; ताम्रपट, दस्तऐवज वगैरे पुराव्यावरूनहि कलियुगामध्यें क्षत्रियास्तित्व सिद्ध होतें, तें येणेंप्रमाणें–

वर्णाश्रमसदाचारा अस्माभिर्ये प्रसारिताः
रक्षणीयास्तएवैते स्वे स्वे भागे यथाविधि ॥
२३ ॥ ब्रह्मक्षत्रकुले भूत्वा भारतीपीठवंचकः
परार्थाच्च्यवते चांते पैशाचीं योनिमाप्नुयात् ॥ ३५
चातुर्वर्ण्यं यथायोगं वाङ्मनःकायकर्मभिः
गुरोः पीठं समर्चेत विभागानुक्रमेण वै ॥ ४०
महानुशासन मठाम्नायचंद्रिका.

या महानुशासन वाक्यांवरून असें सिद्ध होतें कीं **चातुर्वर्ण्य सनातनच** आहे. तसें नसेल तर चातुर्वर्ण्यानें यथाधिकार जगद्गुरुपीठाचें पूजाराधन करावें अशी भगवान् भाष्यकारांनीं आज्ञा केलीच नसती. "ब्रह्म-क्षत्रकुले भूत्वा" या वाक्यामध्यें श्रीमुखानेंहि क्षत्रियांचें ग्रहण करून जगद्गुरुपीठाशीं वंचना करणाऱ्या ब्रह्मक्षत्रियादिकांस "परार्थाच्च्यवते चान्ते" इत्यादि दंड होणार अशी आज्ञा केली आहे. आणि पीठाचार्यांनीं आप-आपल्या धर्मराज्यामध्यें वर्णाश्रमाचारांचें रक्षण करावें अशी आज्ञा केली आहे. इतकेंच नव्हे तर ब्रीदावलींतहि "**चातुर्वर्ण्यशिक्षणक गोमर्तातीरवास**" असा उल्लेख केला आहे; यावरून **चातुर्वर्ण्य सनातन** नसेल तर वरील सर्व वाक्य व्यर्थ होणार.

१५. श्रीदेवेश्वरपादपंकजरज:संपर्कपूताशय: ॥
सर्वज्ञानगिरांकितो मुनिवर: संक्षेपशारीरकम् ॥
चक्रे सज्जनबुद्धिवर्धनमिदं राजन्यवंशे नृपे ॥
श्रीमत्यक्षतशासने मनुकुलादित्ये भुवं शासति ॥

सं० शा० अ० ४ श्लो० ६२

वरील श्लोक संक्षेपशारीरकांत उत्तरार्धांतील अखेरचा आहे. हा श्लोक येथें लिहिण्याचा हेतु असा आहे कीं, त्या ग्रंथाचा काल सूचित करण्याकरितां मनुकुल ( मनुवंशी ) आदित्य या नांवाचा राजा त्या वेळीं राज्य करीत होता. यावरून या ग्रंथाचेवेळीं मनुवंशी क्षत्रिय राजे होते असें सिद्ध होतें. संक्षेपशारीरक ग्रंथकर्ते श्रीपूज्यपाद सर्वज्ञानात्मगिरि हे सुरेश्वरवार्तिकटीकाकार होत.

१६. सुधन्वा सार्वभौम यांचा युधिष्ठिर शक २६६३ आश्विन शु० १५ पौर्णिमेचा ताम्रपट आहे. त्यामध्यें लिहिलें आहे कीं, "श्रीमच्छंकरभगवत्पादपद्मयोः भ्रमरायमाणसुधन्वनो मम सोमवंशचूडामणियुधिष्ठिरपारंपर्यपरिप्राप्तभारतवर्षस्याञ्जलिबंधपूर्विकेयं राजन्यस्य विज्ञप्ति:" यापुढें "ब्रह्मक्षत्राद्यसमत्प्रमुख–निखिलविनेयलोकप्रार्थनां चतस्रो धर्मराजधान्य: संस्थापिता:" नंतर "सर्वे वयं तत्तन्मण्डलस्था ब्रह्मक्षत्रादय: तत्तन्मण्डलस्थस्यैवाचार्यास्याधिकाराधिकृता वर्तिष्यामहे" ह्या वाक्यांवरून भगवान् भाष्यकारांच्या स्थितीचे वेळीं सुधन्वा चक्रवर्ती युधिष्ठिरपरंपरेंतील सोमवंशी क्षत्रिय होता हें सिद्ध आहे.

१७. वर दाखविलेल्या पुराव्यावरून पाहतां कलियुगांत क्षत्रिय आहेत असें निर्विवाद सिद्ध होत आहे. असें असतां कलियुगामध्यें नंदानंतर क्षत्रिय मुळींच नाहींत असें म्हणणें अत्यंत साहस आहे असें सहज दिसून येईल.

१८. "ब्राह्मणोस्य मुखमासीत्" या मंत्रावरून विराट पुरुषाचें मुख ब्राह्मण, बाहू क्षत्रिय, मांड्या वैश्य, व पाय शूद्र, असा ह्या मंत्राचा अर्थ होतो. या मंत्राचा अर्थ भीष्मपितामहांनीं भीष्मस्तवराजामध्यें केला आहे, तो असा:–

ब्रह्म वक्त्रं भुजौ क्षत्रं कृत्स्नमूरूदरं विशः
पादौ यस्याश्रिताः शूद्राः तस्मै वर्णात्मने नमः

अर्थात् परमेश्वराचे मुखादि चार अवयव हे चार वर्ण आहेत; ते कलियुगामध्यें नाहींत असें म्हणणें म्हणजे कलियुगामध्यें विराट पुरुषाचे दोन अवयवच नाहींत असें म्हणण्याचा प्रसंग येणार. हें फार अनिष्ट आहे. ह्यावरून नंदानंतर क्षत्रिय नाहींत असें मानलें, तर नंदराजानंतर विराट पुरुषच नाहींसा झाला असें म्हणणें प्राप्त आहे.

२०. बौद्धांचे वेळीं चारी वर्णांपैकीं बहुतेक लोक बौद्ध होऊन गेले होते, त्यांस भगवान् भाष्यकारांनीं दिग्विजय करून सुधन्वा राजास सार्वभौम पद देऊन तद्द्वारा चातुर्वर्ण्यचातुराश्रम्यव्यवस्था स्थापन केली त्यावेळीं प्रायश्चित्त करविलें होतें. याविषयीं एक वाक्य प्रमाण आहे तें असें कीं:–

प्रायश्चित्तं ततः चक्रुः स्वस्वकर्मविशुद्धये
त्रैवर्णिका द्विजा सर्वे माथुरं मागधं विना ॥

हें वाक्य प्राचीदिग्विजयांतील आहे हें प्रसिद्धच आहे. या वाक्यावरून असें सिद्ध होतें कीं:—ततः दिग्विजयानंतर आपापल्या वर्णाश्रमधर्मानुष्ठानशुद्ध्यर्थ ब्राह्मणादि त्रैवर्णिकांनीं प्रायश्चित्त केलें होतें. परंतु माथुर ( चोबे ) व मागध ( गयावळ ) यांनीं प्रायश्चित्त घेतलें नाहीं. म्हणून हल्लींहि ते दशविध ब्राह्मणांमध्यें नाहींत. सारांश असा कीं:–भगवान भाष्यकारांनीं दिग्विजय केल्यानंतर बौद्ध झालेल्या त्रैवर्णिकांनीं आपल्या शुद्ध्यर्थ प्रायश्चित्त केलें होतें. सदर्हू त्रैवर्णिकांत वैश्यहि आहेतच. तरी वैश्यहि नाहींत हें म्हणणें आग्रहाचें आहे, हें सहज दिसून येईल.

२१. क्षत्रिय आणि वैश्य आहेत, परंतु ते पुष्कळ वर्षांपासून द्विजसंस्काररहित व्रात्य झाले आहेत, सबब आतां त्यांस द्विजसंस्कार होऊं शकत नाहीं, असा क्रम कोणी पुढें आणतात. परंतु तो सर्वदेशीय नाहीं. या बाबतींत प्रमाण सं० १९५२ पर्यंत उत्तरहिंदुस्थानामध्यें द्विजसंस्कारयुक्त क्षत्रियांनीं सोमयागापर्यंत श्रौतकर्म केल्याचा पुरावा मागें दाखविलाच आहे.

२२. कलियुगांत अद्यापपावेतों जर क्षत्रियसद्भाव आहे तर कलियुगामध्यें नंदानंतर क्षत्रियासद्भावबोधक वाक्यें वर दाखविण्यांत आलीं आहेत त्यांची काय गती ?

२३. या बाबतींत श्रीगुरुस्थानाचा असा अभिप्राय आहे कीं, जसें लोकांचे म्हणण्यांत येतें कीं अमुक अमुक गांव मरामारीनें उजाड करून टाकला, किंवा अमुक गांव अग्निनारायणानें भस्म करून टाकला,–या वाक्यांचा अर्थ, गांवांत एकहि मनुष्य जिवंत राहिलें नाहीं किंवा एकहि घर अवशिष्ट राहिलें नाहीं असा नाहीं, मात्र बरींच मनुष्यें मेलीं किंवा बरींच घरें जळून गेलीं असा अर्थ होतो, त्याचप्रमाणें नंदांनीं क्षत्रिय कुलाचा बहुतेक नाश केला–तसेंच " इक्ष्वाकूणामयं वंशः सुमित्रान्तो भविष्यति " याचाहि असा अर्थ केला पाहिजे कीं, सूर्यवंशी क्षत्रियांचा राज्याधिकार सुमित्रापर्यंत राहिला, परंतु सूर्यवंशी क्षत्रियजाति नष्ट झाली असें होत नाहीं. असा अर्थ लावण्याची उपपत्ति अशी आहे कीं **श्रुतिस्मृतिमध्यें कोठेंहि कलियुगामध्यें क्षत्रियाभावबोधक वाक्य मिळत नाहीं.** इतकेंच नव्हे तर सर्व स्मृतिकार स्मृतींमध्यें, व कलियुगांत झालेले सर्व निबंधकार आपआपल्या ग्रन्थांमध्यें, **क्षत्रियांचे संस्कार व सर्व धर्मकृत्यें करण्याचा** प्रकार लिहितात. जेथें श्रुतिस्मृतींचा विरोध येतो तेथें पुराणवाक्य दुर्बल असल्यानें " गौण्या वृत्या " गति लाविली पाहिजे. आणि दुसरी उपपत्ति अशी आहे कीं, परशुरामांनीं पृथ्वी निःक्षत्रिय करण्याची प्रतिज्ञा करून एकवीस वेळ पृथ्वी निःक्षत्रिय केली अशी कथा पुराणांत आहे, तरी परशुरामाच्याच वेळीं दशरथादि क्षत्रिय राजे होते, याप्रमाणें क्षत्रियाभावबोधक वाक्यांची योजना केली पाहिजे.

२४. पश्चिम हिंदुस्थानामध्यें ब्रह्मक्षत्रिय म्हणून एक जाति आहे, त्या जातीमध्यें गर्भाधानादि संस्कार व धर्मकृत्यें ब्राह्मणासारख्या वेदोक्त पद्धतीनेंच होतात, ह्यावरून ते क्षत्रिय आहेत असा निश्चय होतो.

२५. पश्चिमहिंदुस्थानांत राजवंशीय इतर क्षत्रिय आहेत, ते द्विजसंस्काररहित आहेत; तसेंच दक्षिणहिंदुस्थानांतहि राजवंशीय व इतर क्षत्रिय संस्काररहित आहेत; याचें कारण काय तें समजत नाहीं.

२६ यासंबंधांत असें अनुमान निघतें कीं, वर्तमानकाळीं सुधारक म्हणविणारे कित्येक संभावित लोक राजप्रिय होण्याकरितां पेहरवेश बद-

लून शिखा काढून हल्लींच्या राजकर्त्यांच्या अनुकरणानें वागतात, तसेंच मुसलमानी राजांचे वेळींहि राजप्रीति संपादन करण्याकरितां उपवीत काढून टाकून त्यांचा पोषाख व दाढी राखून मुसलमानी रिवाजांचें अनुकरण केलें असलें पाहिजे. परंतु सर्वच क्षत्रियवंशी राजे व इतर क्षत्रिय द्विजसंस्काररहित झाले नव्हते ही गोष्ट निर्विवाद आहे.

२७. कांहींहि असो, हल्लीं कित्येक देशांमध्यें राजवंशीय व इतर क्षत्रिय आहेत व कित्येक देशांमध्यें राजवंशीय व इतर क्षत्रिय द्विजसंस्काररहित आहेत, याप्रमाणें पहिल्या मुद्याचा विचार झाला.

२८. दुसऱ्या मुद्याचा विचार करितां, अर्जदारांकडून परमार घराण्याचा इतिहास पुराव्यांत दाखल करण्यांत आला आहे, त्यावरून **देवास येथील परमार राजघराणें हें मूळ क्षत्रिय आहे हें सिद्ध होतें.**

२९. तिसऱ्या मुद्याचा विचार करितां पुष्कळ ऐतिहासिक पुराव्यावरून दिसून येतें कीं—जयचंद राठोड तेराव्या शतकांत होऊन गेला त्यावेळीं त्यानें राजसूय यज्ञ आरंभिला होता. त्यांत जेतसिंह वगैरे परमार व बुंदेलखंडचा चंदेलबुंदेला–सोळंकी वगैरे त्यांचे सामंत सामिल होते. परमार कुलांत द्विजसंस्कार नसता तर राजसूययज्ञांत भाग घेण्याचा अधिकारहि त्यांस प्राप्त झाला नसता. यावरून त्या वेळीं परमारकुल वैदिकक्षत्रियसंस्कारयुक्त होतें असें सिद्ध होतें. त्यानंतर परमार कुलांत क्षत्रिय संस्कार केव्हांपासून विच्छिन्न झाला त्याचा पुरावा अर्जदारांनीं कांहींच दिला नाहीं. तरी परमारकुल क्षत्रिय आहे असें अर्जदारांनीं दिलेल्या पुराव्यांत सिद्ध केलें आहे.

३०. चवथ्या मुद्याबाबत श्रीगुरुस्थानाकडून असा निर्णय देण्यांत येतो कीं,

## निर्णय.

श्रीमंत सरकार तुकोजीराव बापूसाहेब, संस्थानदेवासनरेश, यांचे घराण्यांत व त्यांचे परमार क्षत्रिय घराण्यांतहि धर्मशास्त्रानुसार यथावत् प्रायश्चित्त देऊन उपनयनसंस्कार करावा. उपनयनसंस्कार झाल्यावर

गर्भाधानादि क्षत्रियोचित यावत्संस्कार व गृहस्थाश्रमोचित सर्व धर्मकृत्यां-मध्यें ब्राह्मणांनीं वेदमंत्र म्हणून वैदिक विधीनें कर्म करणें व करविणें याविषयीं शास्त्रबाध नाहीं.

३१. या बाबत काशीपुरीस्थ कैवल्यधामानिवासी परमहंसपरिव्राजकाचार्य स्वामी श्रीकृष्णानंदसरस्वती यांचें, संकेश्वर मठाचें, शारदापीठ धर्माधिकारी वे० शा० सं० कृष्णाचार्य शास्त्री कर्नाटक वास्तव्य देवास यांचें व अर्जदार ब्रह्मवृंद देवास यांचें एकमत आहे इति शिवम् । श्रीमच्छंकरभगवत्पूज्यपादाचार्याणामवतारशकाब्दाः २३७७ संवत् १९६४ मिति मार्गशीर्ष शुद्ध ६ मंगळवार शके १८२९ ता० १०-१२-०७ स्वारी मुकाम बडोदें. (॥ श्री ॥)



*

# मराठ्यांचें क्षत्रियत्व आणि भोसल्यांचें क्षत्रियकुलावतंसत्व.



शिवाजीमहाराजांनीं राज्यारोहणानंतर क्षत्रिकुलावतंस ही पदवी धारण केली आणि ती पुढें त्यांच्या सनदेंतून तसेंच त्यांच्या पुढील वंशजांच्या सनदेंतून वापरलेली आपल्या दृष्टीस पडते. ही पदवी योग्य आहे कीं नाहीं, याविषयीं अनेकांस शंका आहे. माझ्या मतें ती अगदीं योग्य आहे. दक्षिणेंतील शहाण्णव कुलींचे मराठे हे क्षत्रिय असून त्यांत भोसल्यांचें कुल क्षत्रियोत्तम आहे व भोसल्यांतहि शिवाजीमहाराजांस व पुढील पिढीस वेदोक्त उपनयन–संस्कार झाल्यानें त्यांस क्षत्रियकुलावतंस म्हणणें सार्थ आहे, असें माझें मत आहे. विरुद्ध आक्षेपक वाईचे लेले व कलकत्त्याचे सरकार असें म्हणतात कीं, ‘शहाण्णव कुलींचे मराठे हेच अगोदर क्षत्रिय नाहींत; आणि गागाभट्टानें पुष्कळ दक्षिणा उकळून शिवाजीमहाराजांस उत्तरवयांत वेदोक्त उपनयन करण्याचा फार्स केला.’ परंतु हे दोन्ही आक्षेप कुत्सित असून खोटे आहेत. ते कसे हें मीं या लेखांत दाखविण्याचें योजिलें आहे.

प्रथम कलियुगांत दोनच वर्ण आहेत, या कल्पनेचा निरास थोडक्यांत केला पाहिजे. ही कल्पना शूद्रकमलाकरांत एका अनिर्दिष्ट पुराणांतील ‘कलावाद्यंतयोः स्थितिः’ या वचनावर बसाविलेली आहे. ही कल्पना चुकीची आहे. कारण त्याविरुद्ध पुराणांतच अन्य वचनें आहेत आणि ‘आमच्या पूज्य वडिलांच्या मतें कलियुगांत क्षत्रिय, स्वकर्मभ्रष्ट कां असेनात, आहेत’ असें खुद्द कमलाकरभट्टानें शूद्रकमलाकरांत लिहिलें आहे. दुसरें, कलियुगास लागू असलेल्या पराशरस्मृतींत क्षत्रियवैश्यांबद्दल विधानें आहेत. तेव्हां कलियुगांत क्षत्रिय आहेत असा निर्णय दोनतीन शंकराचार्यांनीं दिला आहे. तिसरें, कित्येक हायकोर्टांच्या ठरावांत कलियुगांत क्षत्रिय आहेत हें मान्य केलें गेलें आहे. चवथें, हिंदुमहासभेच्या अनेक अधिवेशनांनीं ही गोष्ट मान्य केली आहे. पांचवें, कित्येक शिलालेखांतून, हुएनत्सांगच्या वर्णनांत, कुमारिलभट्टाच्या वार्तिकांत, त्या त्या वेळीं क्षत्रिय असल्याचा उल्लेख आहे. आणि शेवटीं, इ. स. १२९० च्या ज्ञानेश्वरींत रामदेवाचें

क्षत्रियोत्तम म्हणून ज्ञानेश्वरानें वर्णन केलेलें आहे. अशा ऐतिहासिक, व अन्य कारणांवरून इ. स. १२९० नंतर ही कल्पना निघाली असावी असें ठरतें. आणि तीहि दक्षिणेंत निघाली असें वाटतें. कारण, उत्तरेस रजपूत हे क्षत्रिय आहेत ही गोष्ट सर्वथा मान्य झालेली आहे.

दक्षिणेंतील क्षत्रियांनीं म्हणजे मराठ्यांनीं खाण्यापिण्याच्या बाबतींत, चालीरीतींत व धार्मिक आचरणांत मुसलमानी काळांत क्षत्रियधर्म सोडले, किंबहुना अशी परिस्थिति अद्यापि चालू आहे, यामुळें लोकांत मराठे क्षत्रिय नाहींत ही कल्पना रूढ झाली असावी. आणि या कल्पनेचा परिणाम कित्येक वेळां न्यायाधीशांच्याहि निकालावर झालेला दिसतो. मराठे शूद्रांच्या हातचें खातात, तसेंच निषिद्ध कुक्कुटादि मांस खातात, उपनयनादि संस्कार त्यांच्यांत होत नाहींत, भागिनेय दत्तक घेण्याची त्यांच्यांत चाल आहे, दासीपुत्राला वारसा त्यांच्यांत मिळतो; इत्यादि कारणांनीं मराठे शूद्र आहेत असा ठराव तंजावरच्या सबजज्जानें एका प्रसिद्ध मुकदम्यांत दिला हें सर्वविश्रुत आहे. पण अशा चालीरीतींनीं किंवा संस्कारलोपांनीं मराठ्यांचें क्षत्रियत्व नष्ट होत नाहीं ही गोष्ट लोक विसरून जातात. हा धर्मशास्त्राचा प्रश्न असून त्याचा योग्य विचार धर्मशास्त्रानुरूप प्रथम केला पाहिजे, तो असा.

वर्ण केवळ बीजावर अवलंबून आहे; तो चालीरीतींवर अवलंबून नाहीं, असाच धर्मशास्त्राचा पक्का सिद्धांत आहे. ‘ सर्ववर्णेषु तुल्यासु पत्नीष्वक्षतयोनिषु । आनुलोम्येन संभूताः जात्या ज्ञेयास्त एव ते ॥’ ( मनु १०, ४५ ). नवरा आणि बायको एकाच वर्णाची असून त्यांच्यापासून जी प्रजा उत्पन्न होईल, ती जातीनें त्या वर्णाची असा मनूचा व इतर शास्त्रकारांचा सिद्धांत आहे. हा वर्ण हीन आचारानें किंवा संस्काराभावानें नष्ट होत नाहीं. अशा परिस्थितींत वर्ण कमी होऊन मनुष्य शूद्र होतो, अशीं जीं वचनें दिसतात, तीं ‘ मनुष्य **शूद्रतुल्य** होतो ’ अशा अर्थानेंच लावलीं पाहिजेत. उदाहरणार्थ—‘यस्य कायगतं ब्रह्म मद्येनाप्लाव्यते सकृत् । तस्य व्यपैति ब्राह्मण्यं शूद्रत्वं च स गच्छति॥’ असें मनूचें (११ अ. ९७) वचन आहे. पण मैथिल ब्राह्मण उघडपणें दारू पितात, त्यांचें ब्राह्मण्य कोणी अमान्य केलेलें नाहीं. शिवाय एखादा ब्राह्मण दारू पिणारा शूद्र वर्णाचा झाला असें मानलें तर, त्यास प्रायश्चित्त देऊन पुन्हां ब्राह्मण करणें शक्य

होणार नाहीं. तात्पर्य, शूद्रांचे आचार घेतल्यानें मराठ्यांचें क्षत्रियत्व नष्ट होत नाहीं. पलांडुभक्षण, व मातुलकन्यापरिणय हे दोन अनाचार किंवा शूद्राचार महाराष्ट्र ब्राह्मणांत राजरोस चालू आहेत, तथापि त्यांचें ब्राह्मण्य नष्ट झालेलें नाहीं.

आतां कदाचित् उपनयनसंस्कार न झाल्यानें 'जन्मना जायते शूद्रः संस्कारात् द्विज उच्यते।' या वचनानुरूप मराठे क्षत्रिय राहिले नाहींत असें कदाचित् कोणी म्हणेल, तर तेंहि टिकणार नाहीं. कारण, मनुष्य जन्मना शूद्र असतो, या म्हणण्याचा अर्थ शूद्रसम असतो असाच घेतला पाहिजे. नाहीं तर सर्वांचेंच उपनयन अप्राप्त होईल. अर्थात् ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यांचीं मुलें जन्मतःच त्या त्या वर्णाचीं असतात, आणि म्हणूनच शूद्रेणहि समस्तावत् यावत् वेदे न जायते। असें मनूनें म्हटलें आहे. ( २-११२ ) म्हणजे हीं मुलें प्रत्यक्ष शूद्र नाहींत. आतां शूद्रसम असलेलीं हीं मुलें योग्य कालांत उपनयन न झालें तर पुढें तीं शूद्रवर्णाचीं होतील असें कोणी म्हणेल, तर तेंहि म्हणणें बरोबर नाहीं. अशा अतीतकाल पुरुषांना पुढें व्रात्य ही संज्ञा येते आणि हे व्रात्य शूद्रसम असले तरी प्रत्यक्ष शूद्र नसून आपापल्या वर्णाचे व्रात्य असतात, असें मनूवरून स्पष्ट दिसतें. मनूनें अ. दहामध्यें २० पासून ते ३० पर्यंत श्लोकांत व्रात्य ब्राह्मण, व्रात्य क्षत्रिय, व्रात्य वैश्य निरनिराळे परिगणित केले आहेत. हा भेद मानणें अत्यंत अवश्य आहे. कारण योग्य ते प्रायश्चित्तविधि केल्यानंतर हे व्रात्य आपापल्या वर्णांत जातात, म्हणजे क्षत्रिय व्रात्य योग्य प्रायश्चित्तानंतर क्षत्रिय होतील, ब्राह्मण किंवा वैश्य होणार नाहींत. तात्पर्य, उपनयन-संस्कार एक पिढींतच नव्हे, तर पिढ्यानुपिढ्या लुप्त झाला तरी मूळ वर्ण नष्ट होत नाहीं, असें धर्मशास्त्र सांगतें. आणि ही गोष्ट प्रत्यक्ष अंमलांतहि आहे. उत्तर हिंदुस्थानांत-विशेषतः हिमालयांत-कित्येक ब्राह्मण पोटजातींत उपनयन-संस्कार वास्तविक होत नाहींत. म्हणजे लग्नाच्या वेळीं ते लोक नुसतें जानवें घालतातः आणि तेंहि अमंत्रक. वेदपठणाची कथा काय, त्यांस गायत्री सुद्धां येत नाहीं. तरी हे लोक ब्राह्मण मानले जातात; इतकेंच नव्हे, तर ते आपणांस दाक्षिणी ब्राह्मणांहून उच्चतर समजतात. माळवा पेशव्यांनीं जिंकला त्या वेळीं असे आचारहीन ब्राह्मण तेथें त्यांना पुष्कळ दिसले. त्यांचा वैदिक आचार पुन्हां सुरू कर-

ग्याकरितां पहिले बाजीराव पेशवे यांनीं आनंदराव पवार यांस आज्ञापत्र पाठविलेलें धारचे लेले यांनीं प्रसिद्ध केलेंच आहे. या पत्रांत ' यवनांचा अंमल होता त्यामुळें ब्राह्मणांचा कित्येक आचारलोप झाला ' असे स्पष्ट शब्द आहेत. सारांश, आचार–लोपानें जसें ब्राह्मणांचें ब्राह्मण्य नष्ट होत नाहीं, त्याचप्रमाणें क्षत्रियांचें क्षत्रियत्व नष्ट होत नाहीं. वर्ण वंशशुद्धीवर अवलंबून आहे हा धर्मशास्त्राचा सिद्धांत आहे.

तेव्हां या प्रकरणांत एकच प्रश्न उपस्थित होतो. तो हा कीं, शहाण्णव कुळींचे मराठे आपणांस क्षत्रिय म्हणवितात त्याप्रमाणें ते वंशानें क्षत्रिय आहेत किंवा नाहींत ? हा प्रश्न अर्थात् इतिहासाचा आहे. अमुक एक लोक अमुक वंशाचे आहेत कीं नाहींत, याचा पुरावा त्या लोकांचा आत्मविश्वास आणि त्या लोकांविषयीं इतर लोकांची समजूत. या दोन्ही गोष्टी इतिहासानें ठरणाऱ्या आहेत, तेव्हां यासंबंधाचा इतिहास कसा आहे हें आपण पाहूं. पण हें पाहण्यासाठीं स्टील, व्हिन्सेन्ट, डफ व इतर पाश्चात्य ग्रंथकार त्यांच्या वेळेच्या लोकसमजुतीप्रमाणें काय लिहितात हें पहाण्याची अवश्यकता नाहीं. कारण, या ग्रंथकारांच्या वेळीं मराठे क्षत्रिय नाहींत असा वाद उपस्थित झालेला होता. त्याचप्रमाणें वादी–प्रतिवादी मराठ्यांनीं आपापल्या मुकदम्यांत, अलीकडच्या कोर्टांत, आपापल्या फायद्यानुरूप, कधीं आम्ही शूद्र आहोंत तर कधीं आम्ही क्षत्रिय आहोंत असें लिहून दिलें आहे. तात्पर्य, पेशवाई काळापासून तों तहत आतांपर्यंत जें कोणी अनुकूळ किंवा प्रतिकूळ लिहून ठेविलें आहे त्याकडे दुर्लक्ष केलें पाहिजे, आणि या काळाच्या पूर्वींच्या शतकांत, किंबहुना शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाच्या पूर्वीं, मराठ्यांनीं व इतरांनीं याबद्दल काय लिहून ठेविलें आहे त्याकडे आपल्यास नजर दिली पाहिजे. शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाच्या पलीकडे आपल्यास गेलें पाहिजे असेंच आम्ही म्हणतों याचें कारण, राज्याभिषेकाच्या वेळीं मराठे क्षत्रिय आहेत कीं नाहीं हा वाद प्रथम उपस्थित झाला. सुदैवानें प्राचीन कोरीव लेखांत या विषयासंबंधानें आपल्यास मुबलक पुरावा मिळतो. त्याचप्रमाणें इतर अनेक प्राचीन लेखांतहि मिळतो. तो आपण कालानुक्रमें पाहूं.

कै० वि. का. राजवाडे ( राधामाधव–विलासचंपू प्रस्तावना ) आणि डॉ. रा. गो. भांडारकर ( दक्षिणचा इतिहास ) यांनीं ऐतरेय ब्राह्मण, पाणि-

निसूत्र आणि कात्यायनाचें वार्तिक यांवरून असें सिद्ध केलें आहे कीं, महाराष्ट्रांत (जें पूर्वी दंडकारण्य होतें) इ. स. पू. ६०० च्या सुमारें आर्यांनीं वस्ती केली. श्रीकृष्णाची रुक्मिणी 'दाक्षिणात्यांचा' राजा रुक्मी याची मुलगी होती असें महाभारतांत (इ. स. पू. ३००) वर्णन आहे. त्याचप्रमाणें दमयंतीही विदर्भ म्हणजे वऱ्हाड येथील राजाची मुलगी होती असेंहि महाभारतांत वर्णन आहे. अर्थात् महाभारतकाळीं वऱ्हाडांत भोज क्षत्रिय होते. यानंतर नाशिक येथील गौतमीपुत्र शातकर्णी याच्या शिलालेखांत त्याचें वर्णन 'खतिय-दप्प-मान-दमनस' असें आहे (इ. स. पू. १५०). यांतील क्षत्रिय शब्द राजपुतान्यांतील रजपुतांना उद्देशून आहे अशी समजूत होती (इं. अं. ३३). परंतु गोतमीपुत्र राजपुतान्यांत कधींहि गेला नाहीं हें निश्चित. तेव्हां हे क्षत्रिय महाराष्ट्रांतीलच क्षत्रिय होते, आणि त्यांजवर आंध्रांच्या शातवाहनांनीं आपली सत्ता बसविली होती. हे क्षत्रिय अर्थात् अशोकाच्या शिलालेखांत आलेले राष्ट्रिक होत. राष्ट्रिक, महारथी आणि महारथिनी, हीं नांवें नाशिक व इतर ठिकाणच्या लेण्यांत अनेकदां आलीं आहेत. हेच गोतमीपुत्राच्या लेखांतील मराठे क्षत्रिय होत. याच वेळच्या हरिवंशांत नाशिक, कोल्हापूर आणि वनवासी येथें तीन राज्यें यदूच्या नागस्त्रियांपासून झालेल्या पुत्रांनीं स्थापलीं असें वर्णन आहे. मराठे क्षत्रिय महाराष्ट्रांत प्रथम आले ते चंद्रवंशीय यादव होते असें ठरतें. हे नागकन्यांपासून मुळांत उत्पन्न झाले असले तरी, वैदिक म्हणजे मनुस्मृतिपूर्व काळांतील पितृसावर्ण्याच्या नियमाप्रमाणें क्षत्रिय वर्णाचे होते असेंच ठरतें. (नागांविषयीं पुढें जास्त लिहूं). तात्पर्य महाराष्ट्रांत प्रथम वसाहत करणारे भोज, राष्ट्रकूट आणि यादव क्षत्रिय होते.

यानंतरचा महत्त्वाचा पुरावा म्हणजे शबरभाष्य (इ. स. तिसरें शतक) यांतील पुढील वाक्य होय. 'ननु जनपदपुररक्षणवृत्तिमनुपजीवत्यपि क्षत्रिये राजशब्दमांध्राः प्रयुंजते.' यावर कुमारिलानें (सातवें शतक) पुढील टिप्पणी जोडली आहे. 'दाक्षिणात्यसामान्येन आंध्राणामिति भाष्यकारेणोक्तम्' (मध्ययुगीन भारत भाग २). शबराच्या वेळीं महाराष्ट्रांत आंध्रांचें राज्य होतें, यामुळें शबर नुसतेंच म्हणतो कीं, 'आंध्रामध्यें क्षत्रियकर्म करीत नसलेले म्हणजे देश किंवा पुर यांचें रक्षण न करणारे क्षत्रिय सुद्धां आपल्यास राजा असा शब्द लावतात. कुमारिलाच्या वेळीं महाराष्ट्र

स्वतंत्र झाला होता, म्हणून त्यानें असें लिहिलें कीं, दाक्षिणात्य सामान्यतः ( आंध्र सुद्धां ) राज्य न करणारे क्षत्रिय आपल्यास राजा ही पदवी लावितात. ही चाल आज हजार बाराशें वर्षे महाराष्ट्रांत व आंध्रांत चालु आहे हें पाहून आश्चर्य वाटतें. महाराष्ट्रांत भोसले, महाडिक, शिर्के वगैरे प्रत्यक्ष राज्य करीत नसले तरी आपणांस राजे म्हणवितात; आणि आंध्रांत सामान्य क्षत्रिय आपल्यास राजु म्हणवितात.

याच्या पुढचा व तितकाच महत्त्वाचा पुरावा चिनी प्रवासी हुएन-त्सांग याचा आहे. यानें महाराष्ट्रांत आणि दक्षिण हिंदुस्थानांत इ. स. ६०० च्या सुमारास विस्तृत प्रवास केला. त्यानें लिहून ठेविलें आहे कीं, महाराष्ट्राचा राजा पुलकेशिन् चालुक्य बदामी येथें राज्य करणारा क्षत्रिय होता; आणि कांची येथें राज्य करणारा पल्लव राजा हाहि क्षत्रिय होता. तेव्हां इ. स. च्या ७ व्या शतकाइतक्या जुन्या काळीं चाळके आणि पालवे हे क्षत्रिय आहेत, असें लोकांत मान्य होतें. किंबहुना यांचे कोरीव लेखहि, आपण क्षत्रिय आहोंत हा त्यांचा आत्मविश्वास, क्षत्रचूडामणि इत्यादि शब्दांनीं व्यक्त करतात. या लेखांत त्यांचें गोत्र नेहमीं सांगितलेलें असतें. चालुक्यांचें मांडव्य आणि पल्लवांचें भारद्वाज. ( हेंच भारद्वाज गोत्र अद्यापहि पालव्यांचें आहे. म. यु. भा. भाग १ ). पुलकेशी पहिला यानें अश्वमेध यज्ञहि केल्याचा उल्लेख कोरीव लेखांत आहे. अश्व-मेध करण्याचा अधिकार राजा आणि क्षत्रियराजा यांसच असतो, शूद्रास नाहीं. उत्तर चालुक्यांच्या लेखांवरून ते चंद्रवंशी क्षत्रिय दिसतात. चालु-क्यांनंतर महाराष्ट्रावर राज्य करणारे राष्ट्रकूट हेहि क्षत्रिय होते. ते सात्यकीचे वंशज आहेत असें त्यांच्या लेखांत सांगितलेलें आहे. हे अस्सल मूळचे मराठे होत. महाराष्ट्रांत येऊन प्रथम राज्य करणारे अशोकाच्या वेळचे राष्ट्रिक हेच होत. यांस चालुक्यांनीं येऊन जिंकिलें, पण चालुक्यांस त्यांनीं जिंकून पुनः आपलें राज्य स्थापिलें. यांचीं नांवें कृष्ण, गोविंद वगैरे हल्लींच्या मराठ्यांप्रमाणें साधीं आहेत. यांनीं इ. स. ८०० सुमारें हल्लींच्या मराठ्यांप्रमाणेंच उत्तरेस जाऊन हिंदुस्थानची राजधानी कनोज जिंकली. यांचेच वंशज हल्लींचे खंडागळे वगैरे मराठे आहेत.

इ. स. १००० पासून १३०० पर्यंत मराठ्यांच्या क्षत्रियत्वाबद्दल अधिक विस्तृत पुरावा मिळतो. या काळांत उत्तर चालुक्यांनंतर देवगिरीचे

यादव हे महाराष्ट्रांत राज्य करीत होते. यांच्या कोरीव लेखांत हे क्षत्रिय असल्याचें स्पष्टपणें लिहिलें आहे. कोंकणांत शिलाहारांचें राज्य होतें; यांच्याहि लेखांत ते क्षत्रिय असल्याबद्दल स्पष्ट विधान आहे. यांपैकीं एक राजा अपरादित्य धर्मशास्त्रांत विद्वान् असून त्यानेंच याज्ञवल्क्यस्मृतीवर अपरार्क नांवाची टीका लिहिली आहे. ती काश्मीरसारख्या दूर देशांत अजून प्रमाणभूत मानितात. याहिपेक्षां विशेष गोष्ट ही कीं या काळांत क्षत्रियांचीं ३६ कुळें परिगणित झालीं, त्यांत महाराष्ट्रांतील राजकुळांचा समावेश आहे. ही संख्या इ. स. ११५० च्या राजतरंगिणींत सांगितलेली आढळते. कनोजच्या चंद्र गाहडवालाच्या वेळीं त्यावेळच्या राजकुळांची गणती केली गेली, त्यांत शिलाहारांचें नांव आहे. शिलाहार ( शेलार ) हे शुद्ध मराठे आहेत; आणि राष्ट्रकूट, चालुक्य, यादव हींहि नांवें त्यांत आहेत.

आम्ही मध्ययुगीनभारत ( भाग २ पान १७६ ) मध्यें दाखविलेंच आहे कीं, सुमारें इ. स. ११०० च्या पूर्वीं हिंदुस्थानांत ब्राह्मण व क्षत्रिय यांची एक एकच जात होती. या जातींत पोटभेद यानंतर उत्पन्न झाले आणि रोटी आणि बेटी व्यवहार त्या त्या पोटजातींतच नियमित झाला. अशा प्रत्येक पोटजातीची कुलगणना केली गेली; आणि या प्रवृत्तीस अनुसरून राजपुतान्यांतील व हिंदुस्थानांतील रजपुतांनीं आपल्या ३६ कुळांची गणना करून विवाह व अन्नसंबंध याच कुळांत मर्यादित केला. पण या कुलगणनेंत महाराष्ट्रांतील क्षत्रिय यांचा समावेश वर दाखविल्याप्रमाणें होता, अर्थात् मराठे या वेळपर्यंत सर्वत्र क्षत्रिय समजले जात होते.

तेव्हां उत्तरेकडील रजपूत आणि मराठे क्षत्रिय राजवंश यांच्यांत परस्पर विवाहसंबंध होत असत यांत नवल नाहीं. कोरीव लेखांवरून हैहय चेदि राजघराण्यांतील राजकन्या महाराष्ट्र चालुक्यांनीं वरल्याचा दाखला आहे. तसेंच मेवाडांतील गुहिलोत राजवंशांतील अल्लटाची माता महालक्ष्मी राष्ट्रकूट होती असें आटपुरा शिलालेखांत सांगितलें आहे ( भाग २ ). ही दक्षिणच्या राष्ट्रकुटाचीच मुलगी असावी. गुजराथच्या चालुक्याची शूर राणी दक्षिणची मराठी राजकन्या होती म्हणजे गोव्याच्या कदंबवंशांतील होती. हिनें शाबुद्दिन गोरीचा पराभव केला. गुजराथचा कर्ण याचीहि एक राणी कदंबवंशांतील होती; पृथ्वीराज चव्हाणाची एक राणी

देवगिरीच्या यादवांची राजकन्या होती. या उदाहरणांवरून उत्तरेकडील रजपूत आणि महाराष्ट्रांतील मराठे क्षत्रिय यांचे परस्पर विवाहसंबंध होत असत हें निर्विवाद ठरतें. असे संबंध इ. स. १३०० नंतर बंद झाले असें दिसतें. देवगिरीच्या एका यादव राजास कर्ण वाघेला आपली मुलगी देण्यास कांकूं करीत होता असें विधान इतिहासांत आढळतें. असें वाटतें कीं उत्तरहिंदुस्थान व महाराष्ट्र मुसलमानांनीं जिंकल्यामुळें विवाह-संबंध बंद पडले. तसेंच उत्तरेचे ब्राह्मण म्हणजे पंचगौड आणि दक्षिणेचे ब्राह्मण पंचद्राविड हे जसे भिन्न झाले, त्याचप्रमाणें उत्तरेचे रजपूत आणि दक्षिणचे मराठे क्षत्रिय भिन्न पडले. तेव्हां पोटजातींच्या नियमाप्रमाणें आपल्या कुलांची गणना करून आपली निराळी क्षत्रिय पोटजात मराठ्यांस मोहोरबंद करावी लागली, आणि मराठे क्षत्रियकुलांची परिगणना केली जाऊन त्यांच्यांतच रोटीबेटीव्यवहार मर्यादित झाला. ही ९६ कुळींची याद इ. स. १३०० नंतर झाली असावी. शिवाजीमहाराजांच्या पूर्वीं ही ९६ कुळांची गणना झालेली होती, याचा निर्विवाद पुरावा महाळुंगदासाच्या सिंहासनबत्तिशींत ( सुमारें इ. स. १५३० ) आपल्यास मिळतो. हा पुरावा लोकांसमोर ठेवण्याचें श्रेय कै. गो. म. चांदोरकर ( धुळें ) यांस आहे, ( भा. इ. मं. वृत्त शके १८३५ पान १४२, १४७). ही यादी पहातां मला असें दिसलें कीं या ९६ कुळींच्या गणनेंत प्रथम पूर्वींच्या ३६ राजकुळांचाच उल्लेख आहे; किंबहुना रासांत चंदानें दिलेल्या अनुक्रमानेंच आहे. रवि, शशि, जाधव, परमार, सदावर, चाहमान, चालुक्य, चंदेल, शिलार, अभींयर अशीं अनुक्रमानें पहिलीं ३६ नांवें देऊन पुढें ६० उपकुळें आणखी आहेत, असें म्हटलें आहे. ( ही यादी येथें पुरी दिलेली नाहीं आणि त्यांत भोंसल्यांचें नांव नाहीं ). रजपुतांच्या ३६ कुलसंख्येप्रमाणेंच मराठ्यांची ९६ कुलसंख्या परंपरा बनली आहे. दोन्हींत नांवें कमीजास्ती होतात, पण संख्या कायम राहते हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मराठ्यांनीं आपले विवाहसंबंध अशा रीतीनें निर्विवाद क्षत्रिय ९६ कुळांतच चालू ठेविल्यानें धर्मशास्त्रवचनांच्या आधारानुरूप, त्यांच्या कांहीं चालीरीती बदलल्या असल्या तरी, त्यांचें क्षत्रियत्व अबाधित आहे.

या विचारांत जी मुख्य अडचण उपस्थित होते, ती अशी. येथें ९६ कुळांच्या यादींत अनेक निर्विवाद रजपूत कुळें आहेत, पण कित्येक कुळें

नागवंशाचीं आहेत. मराठे क्षत्रिय तीन वंश मानितात. प्राचीनकालापासून चालत आलेले सूर्य व चंद्र मानून शिवाय तिसरा नागवंश मानितात. हा उत्तरेकडील रजपुतांत नाहीं. पण उत्तरेकडील क्षत्रियांत तिसरा अग्निवंश मानिला आहे. या तिसऱ्या वंशामुळें सर्व पाश्चात्य आणि कित्येक देशी विद्वानांनीं, 'रजपुतांत शकवंशाची भेसळ आहे, ब्राह्मणांनीं शकहूणांना अग्निकुंडांत घालून अग्निकुल क्षत्रिय करून घेतलें' असें अनुमान काढलें. ही रजपुतांतील अग्निवंशाची अडचण आतां निघून गेलेली आहे. कारण, या अग्निवंशी मानलेल्या कुलांचे पृथ्विराजरासापूर्वींचे कोरीव लेख मिळाले, त्यांत ते सूर्य किंवा चंद्रवंशीच आहेत. अर्थात् अग्निवंश ही चंदाची काव्यकल्पना आहे, असें आतां सिद्ध झालें आहे ( मध्ययुगीनभारत भाग २ पा. १२, १७ ). याचप्रमाणें मराठ्यांच्या ९६ कुळींमध्यें नागवंशीय कुळें असल्यानें मराठ्यांत द्रविडवंशाची भेसळ आहे अशी अडचण उत्पन्न होते आणि असेंच पुष्कळ लोक मानतात. पण हीहि अडचण वरील अग्निवंशाच्या अडचणीप्रमाणेंच निघून जाते असें माझें मत आहे. ती कशी हें आपण विस्तारानें पाहूं.

नागवंशांत मुख्य कुळ शिंद्यांचें आहे. हें कुळ प्राचीनकाळापासूनच ग्वालेरच्या शिंद्यांपर्यंत लढवाई मराठे म्हणून प्रसिद्ध आहे. बदामीच्या पूर्वचालुक्यांच्या वेळेस तें सेंद्रक म्हणून प्रसिद्ध होतें. आणि पुलकेशी दुसरा याचा मामा सेनानंदराज याचा शिलालेख प्रसिद्ध आहे ( सातवें शतक ). उत्तर चालुक्यांच्या वेळेस शिंदे दोन तीन राजकुलाचे प्रसिद्ध आहेत. ( शिंदे हा शब्द सेंद्रकाचा प्राकृत उच्चार आहे ). यांच्या लेखांत त्यास नागवंशतिलक ' भोगावतीपुरवराधीश्वर ' असें म्हटलेलें आहे, म्हणूनच, नागवंशाची कल्पना निघालेली असावी. हे नाग कोण आणि ही केवळ कविकल्पना आहे कीं काय, याचा येथें आपल्यास प्राचीन लेखांच्या आधारें विचार करावयास पाहिजे.

नागलोक हिंदुस्थानचे प्राचीन शूर रहिवासी दिसतात. काबुलापासून कुमारीपर्यंत सर्व हिंदुस्थानभर त्यांची तुरळक वस्ती असून आर्य हिंदुस्थानांत येण्यापूर्वी त्यांचेंच येथें राज्य होतें. कांहींनीं आर्यांस विरोध केला आणि कांहींनीं त्यांशीं सख्य केलें. विरोध करणारे सर्प अशी संज्ञा पावले ( अनंतश्चास्मि नागानां सर्पाणामास्मि वासुकिः । ). पांडवांनीं खांडवव-

जाळून तेथें वस्ती केली, तेव्हां तक्षक तेथून निघून तक्षशिलेस गेला. पुढें त्यानें सूड उगवून परिक्षितास असावध मारिलें, तेव्हां जन्मेजयानें तक्षशिला जिंकून सर्पांचें बिजन केलें, इत्यादि पौराणिक कथा हेंच सांगते. पण पुष्कळ नागकन्यांशीं आर्यांनीं विवाह केला; संयुक्तप्रांत आणि महाराष्ट्र यांतील लोक आर्यद्रविडमिश्रणाचे आहेत असें चेहरेपट्टीवरूनहि ठरलें आहे. हल्लीं नाग नांवाचे द्रविडवंशी लोक बंगालच्या पूर्वेकडील डोंगरांत आहेत. दंतकथा आणि चेहरेपट्टीवरून मराठ्यांत ( ब्राह्मण व क्षत्रिय ) द्रविडवंश-मिश्रण आहे, या निश्चित गोष्टीमुळें पुष्कळांस मराठ्यांस क्षत्रिय म्हणतां येईल कीं नाहीं याचें गूढ पडलें आहे. विशेषतः शिंदे हे क्षात्रिय आहेत कीं नाहींत हा प्रश्न आहे. शिंदे हे प्रसिद्ध राजकुल असल्यानें त्यांचा विवाह-संबंध अनेक महाराष्ट्रांतील राजकुलांशीं सातव्या शतकांतील पुलकेशिन्‌-पासून अठराव्या शतकांतील शाहूपर्यंत किंबहुना आतांपर्यंत होत आहेत. तेव्हां मराठे हे शुद्ध क्षत्रियवंशी आहेत कीं नाहींत असा प्रश्न उपस्थित होतो.

धर्मशास्त्राचा योग्य विचार करतां मराठे शुद्ध क्षत्रिय आहेत, असेंच याचें उत्तर दिलें पाहिजे. कारण, द्रविड हे व्रात्य क्षत्रिय आहेत असें मनुस्मृतीनें ठरविलें आहे. आर्यांच्या येण्यापूर्वी हिंदुस्थानांतील शूर राज्य करणारे लोक व्रात्य क्षत्रिय आहेत असें ठरवून मनूनें त्या जातींचीं नांवेंहि परिगणित केलीं आहेत. ( झल्लो मल्लश्च राजन्यात् व्रात्यान्निच्छिविरेव च । नटश्च करणश्चैव खसो द्राविड एव च ॥ ). शाक्यवंशी लिच्छवीकुलोत्पन्न बुद्ध हा क्षत्रिय होता, असेंच मानलेलें आहे. व्रात्य क्षत्रिय स्त्रिया आणि शुद्ध क्षात्रिय यांची संतति पूर्वोक्त नियमाप्रमाणें क्षात्रियच होईल हें निर्विवाद आहे. अर्थात् नागस्त्रियांपासून उत्पन्न झालेले ययातीचे पुत्र हे क्षत्रियच होते. तेव्हां नागवंशमिश्रणानें मराठ्यांचें क्षत्रियत्व हीन ठरत नाहीं. ग्वालेरचे शिंदे याप्रमाणें निःसंशय क्षत्रिय आहेत. प्रो. पाठक यांनीं दाखविल्या-प्रमाणें ( इंडियन अँटिक्करी १४ पा. १३ ) हे शिंदे प्रथम कर्नाटकांत राज्य करीत होते. कदंबांचें राज्य झाल्यावर ते त्यांचे मांडलिक झाले. दुर्गशक्ति व इतर राजे, लक्ष्मेश्वर देवळांतील शिलालेखांत सांगितलेले, सेंद्रक आणि नंतरचे शिंदे हें एकच कुळ होय ( टीप पृ. सदर पहा. ). शिंदे शब्दाचा मराठींत दुसरा हीन अर्थ उत्पन्न झाला आहे, त्याच्याशीं या शिंदे नांवाचा कांहीं संबंध नाहीं. ( राजपुतान्यांत राजपूत शब्दाचाहि

असाच दुसरा अर्थ झाला आहे ). हें शिंदे कूळ चालुक्यांच्या बरोबरीचें होतें, हें मागें सांगितलेलेंच आहे. त्याशीं त्यांचा शरीरसंबंध झालेला आहे. त्याचप्रमाणें अलीकडे जाधव, मोहिते वगैरे प्रसिद्ध कुळांशीं त्यांचा संबंध झाला आहे. ते नागवंशकुलोत्पन्न म्हणजे द्रविडवंशी होते असें मानिलें तरी, मनुवचनानें ते व्रात्य क्षत्रियच ठरतात.

पण त्यांच्या लेखांत त्यांस नागवंशकुलोत्पन्न म्हटलें असलें तरी, ते द्रविडवंशीच मानले पाहिजेत असें ठरत नाहीं. कर्नाटकचे शिंदे आणि कऱ्हाडचे शिंदे अशा दोन शाखांचे शिलालेख उपलब्ध झाले आहेत. या लेखांत, वंशाला नांव देणारा मूळपुरुष शिंद नांवाचा सांगितला असून त्याची उत्पत्ति भिन्न रीतीनें सांगितली आहे. पाताळांतील भोगावती येथील एक प्रत्यक्ष नाग उत्तर हिंदुस्थानांतील अहिच्छत्र येथें आला व तेथें त्यास शिंद हा पुत्र झाला ( एपि. इंडि ३ पा. २३० ). भाट लोक नांवावरून किंवा ध्वजावरून काल्पनिक उत्पत्तिकथा बनवीत असतात, हें प्रसिद्धच आहे. शिंद्यांच्या मुद्रेंत साप आहे, आणि कुलाचें नांव शिंदे आहे. तेव्हां मूळपुरुष सिंधुनदीजवळ एका नागापासून उत्पन्न झाला असें भाटांनीं ठरविलें. याचप्रमाणें शिलाहार आपल्यास विद्याधराचा वंश मानतात. नागास गरुडापासून सोडविणारा हा विद्याधर होता. ( शिलाहार शिंद्यांचे मदतगार असावेत ). कदंबांनी आपली नामोत्पत्ति एका कदंब झाडामुळें पहिल्या वंशधरापासून मानली. असल्या वंशोत्पत्तीच्या भाटांच्या कथा बाजूस टाकल्याच पाहिजेत. शिंद्यांचा संबंध प्रारंभापासून कदंब वगैरे कुळांशीं झालेला आहे, यामुळें वरील गोष्टींत पहिला वंशधर शिंदे याचें लग्न एका कदंब राजकन्येशीं झाल्याचें वर्णन आहे ( एपि. इंडि. ३ सदर ). कऱ्हाड शिंदे शाखेच्या शिलालेखांत त्यांची उत्पत्ति निराळी सांगितली आहे. पहिला वंशधर नागापासून उत्पन्न न होतां सिंधुनदीजवळ प्रत्यक्ष शिवापासून उत्पन्न झाला आणि तेथून कऱ्हाडास आला असें वर्णन आहे.* या दोन्ही कथांचा ऐतिहासिक रीतीनें मेळ घालतां, असें म्हणतां येतें कीं, अहिच्छत्राजवळच्या देशांतून शिंदे हे उत्तरेकडून आलेले आर्य क्षत्रिय आहेत. तेव्हां शिंदे वंशानें द्रविड आणि हल्लींच्या काळांतील नागलोकांचे पूर्वज यांचे सजातीय होते असें मानण्याचें कांहीं कारण नाहीं. किंबहुना शिंद्यांच्या मुद्रेंत

* ना. जाधव यांच्या मतें शिंद्यांच्या देवकांत समुद्रवेल आहे यावरून ते सिंधांतून कोकणांत समुद्रानें आले असावे.

नागाबरोबर सूर्य दाखविला जातो, तेव्हां हे मूळचे सूर्यवंशी क्षत्रिय असावे, असें अनुमान निघूं शकतें.

शहाण्णव कुळी मराठे मूळचे सूर्यवंशी किंवा चंद्रवंशी क्षत्रिय असून ते उत्तरेकडून दक्षिणेंत आले असा आपल्यास एकंदर इतिहास मिळतो. या क्षत्रियांत मधून मधून उत्तरेकडील क्षत्रिय–वंश येऊन मिळत आले आहेत, तरी पण ९६ ही संख्या परंपरेनें मान्य झालेली कायम रहात आली आहे. दक्षिणेकडून मराठे क्षत्रिय उत्तरेकडे गेल्याचाहि दाखला आपल्यास इतिहासांत मिळतो. बंगालचे सेन यांच्या लेखांत आम्ही दाक्षिणात्य क्षत्रिय आहों असें स्पष्ट म्हटलेलें आहे. त्याचप्रमाणें कनोजचे गाहडवाल म्हणजे हल्लींचे जोधरपूरचे राठोड हेहि दक्षिणचे क्षत्रिय आहेत असें स्पष्ट सिद्ध होतें ( मध्ययुगीन भारत भाग ३ ). हीं दोन्ही कुळें हल्लीं प्रसिद्ध ३६ रजपूत कुलांत गणलीं जातात. तात्पर्य, इ. स. १२०० पर्यंत उत्तरेकडील रजपूत आणि महाराष्ट्रांतील मराठे यांचा मुळींच भेदभाव नव्हता. तो उत्पन्न होऊन पुढें जसे उत्तरेचे ब्राह्मण आणि दक्षिणेचे ब्राह्मण निराळे पडले, तसे राजपुतान्यांतील रजपूत आणि महाराष्ट्रांतील ९६ कुळीचे मराठे हे भिन्न पडले. परंतु यासाठीं मराठ्यांच्या क्षत्रियत्वाविषयीं शंका घेण्यास वरप्रमाणें मुळींच जागा नाहीं. आतां आपण भोसले कुळाकडे वळूं आणि ते क्षत्रियकुलावतंस कसे आहेत तें पाहूं.

भोंसले हे उदेपूरच्या शिसोदिया वंशाचे आहेत असें प्रसिद्ध आहे. उदेपूरचा राजवंश सर्वत्र उत्तम रजपूत म्हणविला जातो; अर्थात् भोंसले हे क्षत्रियकुलावतंस आहेत असा सिद्धांत योग्यच ठरतो. तेव्हां मराठी लेखकांनीं शिवाजीचा उदेपुराशीं लावलेला संबंध खरा किंवा खोटा, खरा असेल तर गागाभट्टानें मोठी दक्षणा लाटून राज्याभिषेकाचा वैदिक गडबडगुंडा केला हें म्हणणें खोटें ठरेल. अर्थात् आपल्यास उदेपूरच्या घराण्याशीं शिवाजीचा असलेला संबंध ऐतिहासिक पुराव्यानें सिद्ध होतो कीं नाहीं हें पहाणें आहे.

शिवाजीमहाराजांच्या वंशाचा उदेपूरच्या शिसोदियाशीं संबंध असल्याचा पुरावा, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें, त्यांच्या कुलाचा आत्मविश्वास आणि लोकांची त्याविषयीं समजूत अशाच प्रकारचा असावयाचा. हा आत्मविश्वास शहाजीच्या एका पत्रावरून दिसतो. त्यांत त्यानें आपल्यास रजपूत म्हटलें आहे ( रामदास–रामदासी भाग १५ पान २११ ). अशी

कल्पना केली गेली आहे कीं रजपूत शब्द येथें वीर ह्या अर्थी आहे. त्यावेळीं रजपूतांशिवाय वीर नव्हतेच काय ? पण अशी कल्पना करण्याचें कारण नाहीं. कारण, लोकांत प्रसिद्धि शहाजीची रजपूत म्हणून होती. शहाजीचा दरबार कवि जयराम यानें लिहिलेल्या राधामाधवचंपू काव्यांत शहाजीस शिसोदिया रजपूत स्पष्ट म्हटलें आहे. या काव्यांत मराठींत आणखी एक श्लोक आहे, तो तर फारच महत्त्वाचा आहे. त्यांतील एक शब्द वि. का. राजवाडे यांनीं चुकीनें भलत्याच अर्थानें लाविल्यामुळें या श्लोकाचें महत्त्व अद्याप लोकांच्या लक्षांत आलें नाहीं. हा श्लोक असा—
‘ महीच्या महेंद्रामधें मुख्य राणा । वलीपास त्याच्या कुळीं जन्म जाणा । तयाचे कुळीं माल भूपाल झाला। जयानें जलें शंभू संपूर्ण केला ॥’ (रा. मा. वि. चंपू पा. २६७ ). यांतील पहिल्या चरणाचा अर्थ असा–‘ पृथ्वीवरील राजांमध्यें मुख्य राणा आहे. राणा म्हणजे उदेपूरचे राणे हें प्रसिद्धच आहे. दुसऱ्या राजास राणा ही संज्ञा लावीत नाहींत. दुसऱ्या चरणाचा अर्थ राजवाड्यांनीं असा लाविला कीं, राण्याच्या वंशांत ‘वलीपास’ जन्मास आला. तिसऱ्या चौथ्या चरणांचा अर्थ- ‘ त्याच्या कुळांत मालोजी भूप उत्पन्न होऊन त्यानें शंभुमहादेव डोंगरावर पाणी बांधून पूर्णता केली. ’ वलीपास हा कोण, हें गूढ राजवाड्यांस पडलें आणि त्यांनीं ‘ अवनीपाश्व ’ या संस्कृत शब्दाचें तें प्राकृतरूप आहे असें ठरविलें. पण अडचण अशी कीं, अश्वांत नांवें सूर्यवंशांत आहेत, तथापि बाप्पा रावळ यानें चितोड येथें स्थापिलेल्या गुहिलोत कुलांत अश्वांत नांव एकहि नाहीं ( म. यु. भारत भा. २ पा. ८१ व ३ पान १५३ पहा ). याशिवाय राणा या शब्दाचें महत्व राजवाड्यांच्या लक्षांत आलें नाहीं असें दिसतें. राणा ही संज्ञा उदेपूरच्या अलीकडच्या राजांची आहे. तिसरें; चिटणिसानीं जी वंशावळी मालोजीची उदेपूरशीं जमविली आहे त्यांत अवनीपाश्व हें नांव नाहीं. ( सरदेसाई म. रियासत भाग १ )

मला वाटतें वलीपास हें अवनीपाश्व याचें रूप नसून तें वलीप याचें चतुर्थ्यंत रूप आहे. ‘ वलीपास त्याच्या कुळीं जन्म जाणा ! ’ या वाक्यांत चतुर्थीच पाहिजे. वलीप हें मोडी किंवा बाळबोधींत मूळ दलीप याबद्दल वाचलें गेलें आहे. मोडी किंवा बाळबोध द पुष्कळदां व सारखा दिसतो. राजवाड्यांपुढची मूळ प्रत पाहण्याची अवश्यकताच नाहीं. कारण, प्रत लिहिणारानेंहि कदाचित् चुकी केली असेल. दलीपाबद्दल वलीप असें चुकीनें

निःसंशय लिहिलें किंवा वाचलें गेलें आहे. जी वंशावळी उद्देपूर घराण्यापासून भोंसल्यांची हल्लीं मान्य झाली आहे, त्यांत उद्देपूरचा राणा लछमनसिंग याचा धाकटा पुत्र दलीप याजपासून भोंसल्यांचा वंश निघाला आहे. दलीपाचा पुत्र भोसाजी होता कीं नाहीं हें निश्चयानें सांगतां येत नाहीं. कारण, कुलनाम भाटलोक वंशावळींत घालतात हें प्रसिद्ध आहे. शिवाय जयरामानें भोसाजीचें नांव दिलें नाहीं; आणि शिवभारतांत 'भृशवल' असें भोसल्यांचें संस्कृत रूपांतर केलें आहे. भोंसले शब्दाची राजवाड्यांनीं लाविलेली व्युत्पत्ति ( भोजले ) मान्य करण्यासारखी नाहीं. असो, हा प्रश्न बाजूस ठेवूं. वरील जयरामाच्या श्लोकांत राणाच्या वंशांतील दलीप नांवाच्या पुरुषापासून भोंसले कुल उत्पन्न झालें ही परंपरा दिली आहे. यावरून भोंसले उद्देपूर वंशांतले आहेत, ही गोष्ट सिद्ध होते. शिवभारतांत ही उत्पत्ति दिलेली नाहीं. त्यांत मालोजीपासूनच वर्णन असून मालवर्मा सूर्यवंशांत उत्पन्न झाला इतकेंच वर्णन आहे. शिवभारतांत उदेपूर घराण्याचा उल्लेख नसला तरी सूर्यवंशाचा आहे. आणि उल्लेखाभाव, उल्लेख अवश्य असल्याशिवाय, महत्त्वाचा नसतो, हें ध्यानांत धरलें पाहिजे. जयरामाच्या वरील श्लोकावरून शहाजीच्या काळींच भोंसले कुळाचा उद्देपुराशीं संबंध असल्याचें लोकांत मान्य होतें. अर्थात् शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या वेळीं हा संबंध काल्पनिक जमवला गेला, आणि गागाभट्टानें पुष्कळशी दक्षणा उपटून शिवाजीमहाराजांना क्षत्रिय ठरविलें, हें म्हणणें निराधार ठरतें.

मालोजीच्या पूर्वींची ९६ कुळीची यादी मिळाली तर या विषयावर चांगलाच प्रकाश पडेल. महाळुंगदासाच्या सिंहासनबत्तिशीवरून अशी पूर्वकालची यादी आहे यांत शंका नाहीं. पण महाळुंगदासानें दिलेलीं नांवें संपूर्ण नाहींत. तेव्हां भोसल्यांचें नांव या यादींत होतें कीं नाहीं हें निश्चित नाहीं. पण भोंसले नांव त्यावेळीं महत्त्वाचें नसावें हें मात्र त्याच्या अनुल्लेखावरून निश्चित आहे. शिवाय भोसल्यांचें महत्त्व मालोजीपासूनच वाढलें हें इतिहासावरून सिद्ध आहे. यावरून असेंहि अनुमान निघेल कीं, भोसल्यांचें कुल महाराष्ट्रांत मुसलमानी काळांत नवीन आलेलें असावें. महाराष्ट्रांतील प्रसिद्ध दुष्काळानंतर १४ व्या शतकांत महाराष्ट्रांत रजपूत कुळांस येण्यास बराच अवसर सांपडला. त्याप्रमाणें हें शिसोदिया कुल येऊन त्यानें

नगर जिल्ह्यांत कांहीं गांवांची पाटिलकी मिळविली असावी. क्षत्रिय बहुधा पाटिलकीशिवाय, ' ईश्वरभाव ' त्यांचा सहज असल्यानें, कोठेंहि वसती करणार नाहींत, हें उघड आहे. येथें हें सांगण्यासारखें आहे कीं, पाटील हा शब्दहि महाराष्ट्रांत बाहेरून आलेला आहे. हल्लीं घाट व कोंकण येथें तो सर्वत्र रूढ असला तरी, तो मूळचा महाराष्ट्राचा नव्हे. मुसलमान व रजपूत जेत्यांबरोबर तो महाराष्ट्रांत आला असें दिसतें. १२ व्या शतकांत माळव्यांतील लेखांत हा शब्द दिसतो आणि त्या शतकापर्यंत महाराष्ट्रांत ग्रामपति किंवा महत्तर हे शब्द वापरीत. हे दोन्ही शब्द हल्लीं कोंकणांत गामोट आणि म्हात्रे या रूपांत अद्याप अवशिष्ट आहेत ( म. यु. भा. भाग ३ ).

शिसोदिया वंशांतला लछमनसिंगपुत्र दलीप माळव्यांत होता, त्यांचा कोणी वंशज महाराष्ट्रांत आला. त्याचा पांचवा सहावा वंशज बाबाजी असावा. याचें नांव पांडेपेडगांव ( नगर जिल्हा ) येथील जागीरदार म्हणून एका लेखांत सांपडलेलें आहे ( रा. खंड १५ ). बृहदीश्वर शिला-लेखांत मालोजीच्या बारा पूर्वजांचीं नांवें दिलीं आहेत; पण तीं बरींच काल्पनिक आहेत. त्यांत तंजावर घराण्यांतील एकोजी हें नांव वारंवार मुद्दाम आणलें आहे; असो.

येथें एक अडचण अशी उत्पन्न होते कीं, भोसल्यांचें गोत्र कौशिक असून मेवाडच्या शिसोदियांचें गोत्र वैजवाप आहे. तसेंच भोंसले ऋग्वेदी असून शिसोदे यजुर्वेदी आहेत. या अडचणीचा परिहार असा कीं, भोंसले कुल महाराष्ट्रांत आल्यावर त्यानें जे प्रथम पुरोहित केले ते ऋग्वेदी आणि कौशिकगोत्री असावे. महाराष्ट्रांत विज्ञानेश्वराचा " क्षत्रि-यांना गोत्र नाहीं त्यांनीं पुरोहितापासून गोत्र घ्यावयाचें " हा चुकीचा सिद्धांत चालू आहे. महाराष्ट्रांतील क्षात्रिय याचमुळें आपलीं गोत्रें विसरले आहेत. भोंसल्यांना राजैश्वर्य आल्यामुळें त्यांचे दुसरे पुरोहित राजोपाध्ये म्हणून प्रसिद्ध आहेत. चौकशीअंतीं असें कळलें कीं, यांचें गोत्र कौशिक नसून शाकल्य आहे, सूत्र मात्र आश्वलायन आहे. यांचें मूळ गांव आर्वी आहे. आणि ते भोंसल्यांबरोबर उदेपुराहूनच आम्ही आलों असें म्हणतात; पण हें शक्य नाहीं. त्यांचें गोत्र भिन्न असल्यानें आणि ते दाक्षिणी ब्राह्मण असल्यानें माळव्यांतून भोंसल्यांबरोबर आले हें संभवनीय नाहीं.

उत्तर हिंदुस्थानांतून रजपूत कुलें महाराष्ट्रांत मधून मधून येऊन ९६ कुळी मराठ्यांत सामील होत होतीं, हें वर सांगितलें आहे. पवार हे याप्रमाणें सामील झाले. तसेंच बागलाण येथील राठोड ( राष्ट्रौढवंश काव्य पहा ), कऱ्हाडचे सोळंखी वगैरे आणखी उदाहरणें आहेत. हे नवीन आलेले रजपूत ९६ कुळी मराठ्यांशीं संबंध करीत. मालोजीची पत्नी निंबाळकर घराण्यांतील होती. आणि शहाजीची जाधव घराण्यांतील होती. ९६ कुळी मराठे क्षत्रिय असल्यानें या संबंधामुळें भोसल्यांच्या क्षत्रियत्वांत कोणताहि हीनपणा येत नाहीं.

आतां मराठ्यांनीं द्विजांना उक्त असलेला 'असगोत्रविवाह' नियम पाळला नाहीं, अशी जी कित्येक शंका घेतात त्याचें उत्तर दिलें पाहिजे. प्रथम उत्तर हें कीं उत्तरेकडील रजपुतांतहि हा असगोत्रविवाह-नियम फार करून पाळला जात नाहीं. उत्तरेकडील रजपुतांनीं आपल्या गोत्राची स्मृति बरीच कायम ठेविली आहे, तथापि गोत्र आपलें नसून पुरोहिताचें आहे, ही कल्पना इ. स. १३०० नंतर तिकडे प्रचलित झाल्यानें तिकडेहि कुलांचीं गोत्रें बदललेलीं आहेत. यामुळें तिकडेहि गोत्राचें महत्त्व कमी झालें आहे. पण क्षत्रियांनीं उत्तरेकडे आणि दक्षिणेकडे गोत्राच्या ठिकाणीं कुळाचा नियम पाळला आहे. म्हणजे कुळांतील मुलगीचा त्याच कुळांत विवाह होऊं शकत नाहीं, हा जास्त कठीण नियम त्यानीं चालविला आहे. अर्थात् त्यांना कुळ म्हणजेच गोत्र झालें आहे. रजपुतांत ३६ कुळांतील नांवें या रीतीनें गोत्र म्हणून कोरीव लेखांत येतात. ऋषिगोत्राच्या ऐवजीं गुहिलगोत्र, प्रतिहार-गोत्र इत्यादि शब्द येतात. मराठ्यांच्या ९६ कुळींच्या यादींतहि जेथें ऋषिगोत्र विसरलें गेलें आहे, तेथें कुळांचेंच नांव गोत्र म्हणून दिलेलें असतें. याप्रमाणें भोसल्याची मुलगी भोंसले कुळांत किंवा जाधवाची मुलगी जाधव कुळांत कधीं दिली जात नाहीं. अशा रीतीनें रजपुतांत आणि मराठ्यांत असगोत्रविवाह-नियम कुलनियमानें पाळला जातो असेंच म्हणावें लागतें. कित्येक ठिकाणीं यामुळें ऋषिगोत्रदृष्टीनें सगोत्र विवाह झाले असतील, पण ही अडचण सुद्धां वर्णाला हीनपणा आणणारी नाहीं; क्षत्रियवर्ण निराबाध राहतो.

९६ कुळी मराठ्यांत मुसलमानी अमदानींत उपनयनसंस्कार बंद झाले असावेत. अर्थात् भोंसल्यांतहि ते रूढ नव्हते. शिवाजीच्या राज्याभि-

पेकाच्या वेळीं ही अडचण उपस्थित झाली, तेव्हां भोसले मूळचे क्षत्रियोत्तम असल्यानें गागाभट्टानें व्रात्य संस्कार करून अतीतकालानंतरहि शिवाजीचें उपनयन केलें. चिटणीसांनीं क्षत्रियत्व नवीन प्रस्थापित केलें नाहीं. उदेपुरास जाऊन भोसल्यांचा शिसोदियाशीं प्रसिद्ध असलेला संबंध उदेपूरवाल्यांकडून मान्य करवून घेतला, हेंच त्याचें उदेपुरास जाण्याचें खरें प्रयोजन. आत्मविश्वासाबरोबर परविश्वासहि पाहिजे; आणि उदेपूरची साक्ष घेऊन गागाभट्टानें पूर्ण चोकशीअंतीं शिवाजीचा वेदमंत्रांनीं व्रतबंध केला, दक्षणा उपटून गडबडगुंडा केला नाहीं, असेंच ठरतें. ९६ कुळीचे मराठे व भोसले शूद्रांच्या हातचें जेवतात, यानेंहि त्यांच्या क्षत्रियत्वांत फरक येत नाहीं. शूद्राच्या हातचें खाऊं नये, हा नियम कलिवर्जांत उत्पन्न झाला आहे. तसेंच श्राद्धाचा आचार मराठे हे बरोबर पाळतात कीं नाहीं इत्यादि प्रश्न क्षत्रियवर्णाच्या विचारांत गौण आहेत. कारण, विवाह शुद्ध होऊन क्षत्रियवर्णाच्याच पतिपत्नीपासून वंशोत्पत्ति होणें हें क्षत्रियवर्णाचें एकच लक्षण आहे. या दृष्टीनें पहातां मराठ्यांत विवाहसंबंध योग्य रीतीनें पाळला जातो, असेंच इतिहासदृष्ट्या म्हणतां येतें. कट्यारीशीं किंवा खांडेशीं लग्न लावण्याचा प्रघात मराठ्यांत कोठें दिसतो. तेव्हां खांडा राणी ही योग्य पत्नी आहे कीं नाहीं हा प्रश्न महत्त्वाचा आहे. सवर्णविवाहांत धर्मशास्त्रानें पाणिग्रहण सांगितलें आहे; आणि असवर्णविवाहांत क्षत्रियेनें शर घ्यावा, वैश्येनें प्रतोद घ्यावा, आणि शूद्रानें वस्त्राचे अंचल धरावे, असें धर्मशास्त्रवचन आहे. तेव्हां कट्यारीशीं लग्न लावणें म्हणजे शूद्र स्त्री किंवा वैश्य स्त्रीशीं लग्न लावल्याचें द्योतक नाहीं. हा सवर्ण स्त्रीशींच विवाह करण्याचा अन्य प्रकार आहे असें ठरतें. राजेलोकांत ही चाल रूढ असून सोईची आहे. कारण जावई राजास घरीं बोलावून पाणिग्रहण करविणें अत्यंत खर्चाचें असतें. तेव्हां कट्यारीबरोबर लग्न लावण्याची चाल राजे लोकांत पडली असावी. अर्थात् खांडा राणी म्हणजे राख नसून विवाहिता स्त्रीच मानली पाहिजे. राखेची संतति विवाहिता स्त्रीच्या संततीबरोबर मानण्याची चाल मराठ्यांत नाहीं. महादजी शिंद्यास पेशव्यांनीं राज्याधिकार दिला, तो शिंद्यास शूद्र समजून शूद्रांत दासीपुत्रांना औरसाच्या अभावीं पूर्ण हक्क मिळतो अशा समजुतीनें दिला असेल. किंबहुना महादजी शूर आणि हुशार असल्यानें राज्याच्या दृष्टीनें त्यासच वारस ठरविणें राजकीय धोरणास योग्य असेल.

पण अशी वारसाची पद्धति क्षत्रियकुलांत होऊं शकत नाहीं ही शंका उपस्थित होते. माझ्या मतें महादजी हा दासीपुत्र नसून योग्य वारस होता. त्याची आई रजपूत जातीची असून क्षत्रियवर्णाची होती, आणि तिचा विवाह खांडाराणी या पद्धतीनें झाला असावा, असें दिसतें. तेव्हां महादजी हा वर्णानें पूर्ण क्षत्रिय होता असेंच ठरतें.

असो; ९६ कुळीच्या मराठ्यांना आपलें क्षत्रियत्व अबाधित ठेवणें तर त्यांनीं क्षत्रियवर्णाच्याच स्त्रिया ( रजपूत किंवा मराठा ) कराव्या. आणि त्याहि पाणिग्रहण विधीनें कराव्या, हेंच उचित आहे. अनिंदितैः स्त्रीविवाहैः अनिंद्या भवति प्रजा । निंदितैर्निंदिता नृणां तस्मात् निंद्यान् विवर्जयेत् । हें मनूचें वाक्य ( अ. ३–४२ ) मराठ्यांनीं लक्षांत ठेवावें.



# राजवाडेकृत शहाजींचें उत्कृष्ट चरित्र.

जयराम पिंड्ये नांवाचा एक शहाजी–समकालीन अनेक भाषा जाणणारा दक्षिणी कवि शहाजीच्या पदरीं असून त्यानें केलेला राधामाधव विलास चंपू नांवाचा ऐतिहासिक काव्यग्रंथ राधामाधवाच्या आरंभीं स्तुतिपर असला तरी मुख्यतः शहाजीच्या चरित्रवर्णनपर असलेला, सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक रा. वि. का. राजवाडे यांस संशोधनांत सांपडला; तो त्यांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीस अनुसरून एका विस्तृत प्रस्तावनेसह लोकां समोर यंदांच्या वर्षीं ( श. १८४४ ) ठेविला आहे, याजबद्दल महाराष्ट्राच्या इतिहासाविषयीं प्रेम बाळगणाऱ्या लोकांस खरोखरच धन्यवाद दिला पाहिजे असे अत्यंत महत्त्वाचे ग्रंथ राजवाड्यांसच कसे सांपडतात हें एक आश्चर्य आहे. एका चिंचवडच्या गृहस्थाच्या घरीं माडीवर भिजत पडलेल्या अनेक संस्कृत–प्राकृत पोथ्यांच्या गळाठ्यांत राजवाड्यांस हें ग्रंथरत्न मिळालें; यावरून जुने गळाठे सुद्धां तपासणें किती महत्त्वाचें आहे हें दिसून येतें. पण गळाठे तपासण्यास लागणारी चिकाटी फारच थोड्या लोकांत असून ती राजवाड्यांत आहे आणि म्हणूनच परमेश्वर तिचें चीज करतो. असो, राजवाड्यांनीं या ग्रंथास जी प्रस्तावना सुमारें २०० पृष्ठांची जोडली आहे त्यांत त्यांनीं पहिल्या १२५ पानांत जें शहाजीचें चरित्र अत्यंत रसभरित, इतिहासाला धरून व अनेक ग्रंथकारांच्या साक्षींची संगति जुळवून दिलें आहे तें मननीय व वाचनीय आहे. किंबहुना शहाजीचें चरित्र म्हणून या १२५ पानांचा एक निराळाच ग्रंथ कांहीं थोडासा मजकूर बदलून चित्र-शाळा काढील तर महाराष्ट्राच्या इतिहासांत एक अतिशय महत्त्वाची भर पडेल, आणि तीहि राजवाड्यांच्या हातची. आज महाराष्ट्रांत महाराष्ट्राच्या इतिहासाचा निःसीम संशोधक व जाणकार राजवाड्यांसारखा नाहीं आणि गिबन, मेकॉले वगैरे इंग्रजी इतिहासग्रंथलेखकांसारखा महाराष्ट्रांत सरस व चिकित्सक पण साधा इतिहासलेखक कोणी असेल तर तो राजवाडेच होय. तेव्हां त्यांच्या हातचा हा पहिला इतिहास निःसंशय अतिशय आद-रणीय आहे. महाराष्ट्रांतील वाचकांची भूक या अल्प खाद्यानें तृप्त न होतां वाढली आहे हें आश्चर्य नव्हे. याचसारखें शिवाजी महाराजांचें चरित्रपर,

मग तें एखाद्या पिंड्याच्या चंपूला प्रस्तावनारूपानें कां होईना, एक हजार पृष्ठांचें पुस्तक राजवाड्यांकडून महाराष्ट्रास लवकरच मिळावें अशी परमेश्वराची प्रार्थना केल्याशिवाय मला राहवत नाहीं. असो, अशा नामांकित चरित्रलेखावर टीका करणें फारच कठिण आहे व अयोग्यहि आहे. तथापि हा ग्रंथ शहाजीचरित्राचा निराळा केल्यास त्यांत एकदोन कोणते फेरफार करणें मला अवश्य वाटतें हें मी केवळ नम्र सूचना म्हणून राजवाड्यांच्या पुढें प्रथम ठेवीत आहें, त्याचा ते योग्य विचार करतील आणि वाचकही करतील. पण मुख्यत: हा लेख राजवाड्यांच्या प्रस्तावनेच्या उत्तर भागांत म्हणजे पुढील ७५ पानांत त्यांनीं जो मराठ्यांचा प्राचीन इतिहास दिला आहे त्यासंबंधानें मी लिहीत आहें व त्यासंबंधानें लिहिण्याचा मला जास्त अधिकारहि आहे. तो लिहिण्यापूर्वी शहाजीचरित्रासंबंधानें ज्या एकदोन सूचना मला कराव्याशा वाटतात त्यांचा प्रथम मी ऊहापोह करतों.

शहाजीचें मूळ संस्कृतांत नांव सिंहजित असावें व शरफोजीचें शरभाजित् असावें ही राजवाड्यांची कल्पना चूक असली तरी शहाजीचें कुळ भोसले व वंश शिसोदिया होय, हें जें जयरामकवीनें लिहिलें आहे त्यावरून शिवाजीच्या राज्याभिषेकाच्या वेळीं हा उदेपुरवाल्यांशीं संबंध जोडला गेला ही कल्पना खोटी ठरते हीहि गोष्ट राजवाड्यांनीं योग्य प्रकारें दाखविली आहे. शिवाजी भोसल्याचा संबंध उदेपूरच्या शिसोदियांशीं आहे ही गोष्ट आतां विवादांत राहिली नाहीं (पृ. ३७). ही परंपरा शिवाजीच्या पूर्वीची आहे. शहाजी आपल्यास रजपूत म्हणवितो. जयसिंगहि त्यास रजपूत मानतो. तात्पर्य, या विषयावर आतां शंका राहिली नाहीं. पण येथें एक अडचण उपस्थित होते. शिसोदियाचें गोत्र बैजवाप आहे आणि भोसल्याचें कौशिक हें कसें? मला याचा एकच परिहार दिसतो तो असा. जो शिसोदिया मूळ पुरुष दक्षिणेंत प्रथम आला त्यानें नवीन पुरोहित करून त्या पुरोहिताचें गोत्र स्वगोत्र विसरल्यानें घेतलें; किंवा क्षत्रियांना गोत्र स्वतःचें नाहीं पुरोहिताचें गोत्र घ्यावें लागतें अशी दक्षिणच्या पण्डितांची भ्रान्त समजूत असल्यानें दक्षिणच्या भोसल्यांच्या पुरोहितांनीं गैरसमजुतीनें लावलें. याबद्दल राजवाड्यांनीं विचार करावा. जास्त विस्तृत विवेचन क्षत्रियांस स्वतःचीं गोत्रें आहेत याजबद्दल मध्ययुगीन भारत भाग २ यांत मीं केलें आहे. शिवभारतांत अवलियाच्या नांवावरून हीं

नांवें ठेविलीं असेंच वर्णन आहे. शिवाजीचें कुळ भोसले याचा संबंध जर शिसोदियाशीं आहे तर भोसले शब्दाची व्युत्पत्ति भोज+ले अशी लावणें शक्य नाहीं. आणि भोसले कुळ महाराष्ट्रांत अडीच तीन हजार वर्षांपूर्वी आलें असेंहि मानणें शक्य नाहीं. किंबहुना १३०० च्या सुमारास तें महाराष्ट्रांत आलें हाच पक्ष मान्य करावा लागतो असें मला वाटतें. याजविषयींहि राजवाड्यांनीं पुन्हा विचार करावा ( पृ २८–३९ ). बाप्पा रावळ गुहिलोत वंशाचा संस्थापक हाच मुळीं इ. स. ७५० च्या सुमाराचा; त्याचा पुत्र गुहिल याजवरून गुहिलोत नांव पडलें. ते पुढें शिसोदे गांवीं राहिले म्हणून शिसोदिये. त्या वंशांतील भोसले महाराष्ट्रांत दोन अडीच हजार वर्षांपूर्वी येणें शक्य नाहीं. आतां भोसले नांव शूद्रातिशूद्रांत पसरलें आहे तर तें शिवाजीच्या पराक्रमानन्तर ५०।१०० वर्षांत पसरणें अशक्य नाहीं. भोसले नांव मराठ्यांत इ. स. १४०० पूर्वी आढळत नाहीं. शिवपूर्वकालीन मराठ्यांच्या ९६ कुळींची याद मी शोधीत आहें; परंतु अद्याप मिळाली नाहीं. तथापि प्राचीन एका मराठी कवीचा एक उतारा भावे यांनीं दिलेल्या एका जुन्या पत्रकावरून यापूर्वी मीं प्रसिद्ध केला आहे, त्यावरून भोसले नांव फार प्राचीन नाहीं असें वाटतें. असो, या गोष्टीचा उलगडा इ. स. १४०० च्या सुमाराची मराठे कुळींची यादी सांपडेल तेव्हांच होईल. तोंपर्यंत भोसले शब्दाची व्युत्पत्ति अनिश्चित आहे. भोसार्जचे वंशज म्हणून भोसले किंवा भोसगांवीं प्रथम आले म्हणून भोसले ( उ० शिसोदिये, पाटणकर ). मात्र त्यांचा संबंध शिसोदे घराण्याशीं निश्चित आहे. जसें पाटणकर सोळखी आहेत व बागुल राठोड आहेत त्याप्रमाणें भोसले शिसोदे आहेत हें निःसंशय.

दुसरा महत्त्वाचा मतभेदाचा मुद्दा असा कीं, शहाजीराजांचा पराक्रम व त्यांचें ऐश्वर्य, त्यांची बुद्धिमत्ता व सुसंस्कृतता, कितीही असली तरी स्वराज्य स्थापन करण्याच्या शक्यतेची कल्पना, स्वराज्य खरोखर स्थापन करण्याच्या श्रेयाबरोबर शिवाजीमहाराजांच्याच डोक्यांत आली; शहाजी राजांच्या नव्हे असें माझें मत आहे. राजवाड्यांनीं या मुद्यावर विवेचन बरेच ठिकाणीं केलें असून आपल्या चातुर्यानें स्वराज्याचें " प्रकट स्वराज्य, प्रच्छन्न स्वराज्य, मांडलिकी स्वराज्य व स्वतंत्र स्वराज्य स्थापण्याची उत्तरोत्तर दिशा शहाजीच्या प्रयत्नांची होती. " असें म्हणून

( पृ. ११३ ) अनेक प्रकार दाखविले आहेत. परंतु स्वराज्याचा खरा प्रकार याहून भिन्न आहे. स्वराष्ट्रांत स्वतंत्र राज्य स्थापणें हाच त्या वेळचा खरा स्वराज्याचा अर्थ आणि तो अर्थच मनांत धरून शिवाजीनें स्वराज्य स्थापिलें. मांडलिकी स्वराज्य आणि प्रच्छन्न स्वराज्य म्हणजे स्वराज्यच नव्हे आणि प्रकट स्वराज्य किंवा स्वतंत्र स्वराज्य शहाजीनें कधींहि स्थापिलेंच नाहीं. बेंगलूर, कर्नाटक मुलुख येथें केवढीहि सत्ता शहाजीची असली तरी ती मांडलिकी स्वरूपाची परमुलखांत होती यांत बिलकूल शंका नाहीं. जयरामकवीनें कविसंप्रदायास अनुसरून शहाजीची कितीहि प्रशंसा केली आणि राम, विक्रम, शालिवाहन किंवा शहाजहान यांच्या तोडीस त्यास नेऊन बसविलें तरी तो विजापुरकर यवन बादशाहाचा अंकितच होता हें केव्हांहि विसरतां येत नाहीं. आणि माझ्या दृष्टीनें तर कोणाहि हिंदु पराक्रमी सरदारास यापेक्षां जास्त करतां येईल असें शहाजीस कधींहि वाटलें नसावें. ब्रिटिश सत्ता हल्लीं ज्याप्रमाणें प्रबल असून सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी कांग्रेसलाहि जी सत्ता झुगारतां येईल असें वाटत नव्हतें किंबहुना इच्छा नव्हती, ज्याप्रमाणें सर भालचंद्र भाटवडेकरांसारखे बुद्धिवान्, कर्तृत्ववान् लोक सुद्धां इंग्रजांची उत्तम मनसबदारी मिळविणें हेंच आयुष्याचें इतिकर्तव्य व हीच शक्यता कांहीं वर्षांपूर्वी मानीत होते, त्याचप्रमाणें शहाजीच्या काळीं मुसलमानी सत्ता हिंदुस्थानांत प्रबळ असून ती उलथून पाडतां येईल ही कल्पना मोठमोठ्या पराक्रमी पुरुषांच्या सुद्धां डोक्यांत येत नव्हती. शिवाजीमहाराजांच्या वेळीं काळ बदलला. म्हणून तो थांबूं शकत नाहीं; त्यास कारणपरम्परा दाखविणें भाग आहे. या दृष्टीनें विचार करतां व हल्लींच्याच इतिहासाचें उपमान घेतां हल्लीं जें आपणांपैकीं कित्येकांस ब्रिटिश ब्यूराक्रसीची सत्ता उलथून पाडणें शक्य आहे असें वाटतें त्याचें कारण हल्लीं सर फेरोझशाह किंवा सर भालचंद्र यांपेक्षां जास्त शहाणे व जास्त स्वदेशभक्त आहेत हें नसून नुकत्याच झालेल्या युरोपीय युद्धांत लोकसत्ता किती प्रबळ झाली आहे आणि त्या सत्तेपुढें रशियाची प्रचण्ड झारशाही आणि जर्मनीची पुराण केसरशाही कशा क्षणांत नष्ट झाल्या हें आपण पाहिलें आहे, हेंच मुख्य कारण होय. कॉंग्रेसनें सुद्धां १९०७ सालीं सुरतेस कांग्रेस मोडल्यावर आपल्या कर्तव्याची दिशा ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत स्वराज्य स्थापणें अशीच ठरविली होती. अनेक शहाण्या स्वदेशभक्तांस ब्रिटिश साम्राज्यांतच राहणें

शक्य व इष्ट वाटलें. १९२० सालीं पाश्चात्य प्रचण्ड युद्धानंतर सर्व अनियंत्रित बादशाह्या धडाधड पडल्यानंतर व लोकमताचें प्रचण्ड सामर्थ्य व स्वयंनिर्णयाचें तत्त्व प्रस्थापित झाल्यावर काँग्रेसचें ध्येय ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत **असो वा नसो** स्वराज्य स्थापणें हेंच ठरलें. यासाठीं कालगतीचा आश्रय घ्यावा लागतो आणि म्हणूनच खरें स्वराज्य स्थापण्याच्या शक्यतेच्या कल्पनेचें श्रेय शिवाजीमहाराजांसच द्यावें लागतें, शहाजीस देतां येत नाहीं. शिवाय कोणत्याहि अचाट कल्पना तरुणपणांत येतात, पुढें येऊं शकत नाहींत. शहाजीच्या लहानपणीं व तरुणपणीं मुसलमानी सत्ता हिंदुस्थानांत व दक्षिणेंत प्रबळ असून ती सत्ता उलथून टाकितां येईल अशी शहाजीस कल्पना आली नाहीं याचें नवल नाहीं. शिवाजीनें लहानपणीं निजामशाही छिन्न झालेली पाहिली व बरीदशाही केवळ नामशेष होती. विजापुरची आदिलशाही व हैदराबादची कुतुबशाही डळमळूं लागल्या होत्या. अशा स्थितींत हिंदुपदपातशाही स्वतंत्र स्थापितां येईल ही कल्पना शिवाजीमहाराजांस आली आणि त्यांच्या पराक्रमाची शर्थ हीच कीं ती त्यांनीं खरी करून दाखविली. तात्पर्य, माझ्या मतें शिवाजीमहाराजांच्या मोठेपणाचा हा मोठा भाग काढून घेऊन त्यांच्या वडिलांस देणें योग्य होणार नाहीं. शहाजी बहुतेक स्वतंत्र होता परंतु विजापुरकरांस शेवटपर्यंत खाविंद म्हणत होता. शिवाजीमहाराजांची इच्छा कोणासहि खाविंद म्हणण्याची नव्हती आणि त्यांनीं कोणास म्हटलेंहि नाहीं. आतां तत्कालीन अनेक निंबाळकरादि मराठे सरदारांपैकीं कोणीहि "मुसलमानी सत्ता उलथून पाडण्याचा किंवा खिळखिळी करण्याचा प्रयत्न केला नाहीं" या प्रश्नाचा ऊहापोह फारच उत्कृष्ट रीतीनें राजवाड्यांनीं केला आहे. परंतु त्यांत एकच गोष्ट मला विवादास्पद वाटते ती ही कीं, या संस्थानिकांत राष्ट्रभावना किंवा तेज नव्हतें असें नाहीं. हे मराठे अधम संस्कृतीचे होते म्हणून नव्हे तर जवळ असलेलें जड ओझें घालविण्याची भीति व संभाळण्याची साहजिक इच्छा ही नेहमींच जाहागीरदारांस व मांडलिक राजांस पारतंत्र्यपंकांत रुतून धरत्ये. हा हल्लींचाहि अनुभव आहे. हल्लींहि मोठमोठे रजपूत मांडलिक राजे किंवा निजामासारखे मुसलमानी सत्ताधारी दोस्त व तालुकेदार वगैरे जहागीरदार यांचें वजन ब्रिटिश साम्राज्याच्या पारड्यांत पडलेलें आहे. स्वराज्याकरितां जहागिरीवर पाणी सोडणारा

प्रचण्ड स्वार्थत्याग एखाद्याच्याच ठिकाणीं मिळणें शक्य आहे; आणि म्हणून शिवाजीमहाराजांच्या कार्याची प्रचण्ड थोरवी. राजकीय हेतु आणि वृत्ति यांचें ऐतिहासिक विवेचन राजवाडे अप्रतिम करतात हें त्यांच्या या लेखावरूनहि स्पष्ट दिसत आहे. त्यांत कमी अधिक दाखविणें शक्य नाहीं. तथापि स्वराज्य स्थापनेचें श्रेय शहाजीस देण्याचा त्यांचा प्रयत्न सिद्धीस जाण्यासारखा नाहीं एवढें सांगून या लेखाच्या मुख्य विषयाकडे मी वळतों.

पाणिनीच्या सूत्रांवरून आणि कात्यायनाच्या वार्तिकावरून पाणिनिकालीन देशपरिस्थितींत ( इ. स. पू. ८०० ) आणि कात्यायनकालीन परिस्थितींत ( इ. स. ३०० ) वर्णव्यवस्थेंत शूद्रस्त्रियांच्या संसर्गानें कसें परिवर्तन झालें याचें अत्यन्त मार्मिक विवेचन राजवाड्यांनीं १२८ पासून १३६ पर्यंत साधार केलें आहे तें नेहमींच वाचनीय राहील. पाणिनिकालीं मिश्रजाति नव्हत्या, मिश्रजाति शूद्रस्त्रीमुळें हळुहळू उत्पन्न झाल्या. चंडाळ, वैदेह, मागध वगैरे त्यांचीं नांवें देशपरत्वानें पुढें उत्पन्न झालीं वगैरे अनुमानें साधार आहेत आणि राजवाड्यांच्या सूक्ष्म चौकस बुद्धीची व विस्तृत शोधाची साक्ष देतात. प्रथम शूद्रा स्त्री केली तरी तिचीं अपत्यें पित्याच्या वर्णाचीं मानीत, पण तीं पुढें फारच कमी संस्कृतीचीं होऊं लागल्यानें निराळ्या उपजातीचीं मानूं लागले व शास्त्रकार शूद्रास्त्रीविवाहाची बंदी करूं लागले आणि यामुळें जैन बौद्धादि पाखण्डें विशेषतः शूद्रांनीं काढलीं हें अनुमान योग्य वाटतें.

राजवाड्यांनीं आपल्या प्रस्तावनेच्या उत्तरार्धात पान १२६ पासून व कलम ६३ पासून मराठे हे लोक कोण आहेत, ते महाराष्ट्रांत कधीं आले, त्यांचा वैदिक कालीन क्षत्रियांशीं संबंध असून ते हीनसंस्कृति कसे बनले, वगैरे कित्येक प्रश्नांची चर्चा मोठ्या मार्मिकपणानें व अनेक प्राचीन आधार देऊन केली आहे. त्यांतील कित्येक महत्त्वाचीं विधानें चुकीचीं आहेत असें मला वाटतें आणि म्हणूनच हा लेख मुख्यतः मी लिहात आहे. सामाजिक परिवर्तन कसें होत जातें या विषयावरील राजवाड्यांचीं मतें व त्यांची विचारपद्धति फार सूक्ष्म व मान्य करण्यासारखी आहे ही गोष्ट मान्य करूनहि त्यांच्या कित्येक सिद्धान्तांत चुका झाल्या आहेत असें म्हणावें लागतें. मतभेदाचे अनेक मुद्दे आहेत पण ते सर्वच अनुक्रमानें मांडण्याची अवश्यकता नाहीं. जेवढे अत्यन्त महत्त्वाचे मुद्दे आहेत, ते वढेच:

मांडणें युक्त आहे. राजवाड्यांनीं प्राचीन वाङ्मयाचा विशेषतः पाणिनीय व्याकरणाचा चांगलाच अभ्यास केला आहे याजबद्दल शंका नाहीं, तथापि वैदिक ऋचांचा अर्थ परंपरागत आलेला सोडून त्यांनीं जो नवीन बसविला आहे त्याजवर चर्चा करणें अनवश्यक होय हें उघड आहे. पुरुषसूक्ताचा किंवा 'गणानां त्वा गणपतिं हवामहे' इत्यादि ऋचांचा पारमार्थिक अर्थ सोडून त्यांजवर राजकीय अर्थ बसविणें शक्य असलें तरी धार्मिक दृष्ट्या प्रमाण नाहीं; किंबहुना एकंदर मीमांसादृष्टीनें शक्यहि नाहीं. 'पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि' सारख्या ऋचा केवळ पारमार्थिक आहेत त्या राजकीय अर्थानें लागू शकत नाहींत वगैरे अनेक कारणें सांगतां येतील. पण तीं सांगण्याची किंवा त्याजवर जोर देण्याची आवश्यकता नाहीं. पाणिनीच्या वाक्यांच्या विचारापासून आपण ऐतिहासिक प्रांतांत उतरतों. पाणिनीचा काळ पाश्चात्य मतें इ. स. पू. ३०० असला तरी इकडील ऐतिहासिकांच्या मतें तो इ. स. पू. १००० किंवा ८०० सुमारें आहे आणि राजवाड्यांनींच तो प्रथम योग्य रीतीनें सिद्ध केला आहे. त्या पाणिनीच्या वाक्याच्या विचारापासून वर्णव्यवस्थेचा व मराठ्यांचा जो इतिहास राजवाड्यांनीं काढला आहे त्याजविषयीं माझा कोठें मतभेद आहे, हें मला विस्तारानें सांगावयाचें आहे. यापूर्वींच्या काळाच्या संबंधानें मी विवाद करीत बसत नाहीं. प्रथम ब्राह्मणांच्या टोळीला एक लाल वर्णाची टोळी पामीर प्रांतांत भेटली, ते दोघे मिळून ब्रह्मक्षत्र झाले, पुढें एक पिवळ्या रंगाची कृषिगोरक्ष्य करणारी टोळी भेटली ती पणि जातीची होती हें जें पान १४०–१४१ वर वेदकालीन त्रैवर्णिक आर्यांचें मूळ दाखविलें आहे तें चुकीचें आहे. पांढरा, तांबडा, पिंवळा रंग केवळ काल्पनिक आहे, ऐतिहासिक नव्हे. कविकल्पना आणि इतिहास हे निराळे केले पाहिजेत; त्रैवर्णिक आर्य पंजाबांत आले ते एक जातीचे व वंशाचे लोक होते हें अनेक प्रमाणांवरून सिद्ध करतां येतें एवढें नमूद करून मी आपल्या मुख्य म्हणण्याकडे वळतों.

महाराष्ट्रांत महाराष्ट्रिक लोक कां व केव्हां आले याचा जास्त खुलासा 'महाराष्ट्राचा वसाहत काळ' या लेखांत राजवाड्यांनीं केला आहे त्याचाच अनुवाद करून व जास्त खुलासा देऊन ते असें म्हणतात कीं "महरट्ट लोक महापद्मादि दुष्ट शूद्र राजांच्या, तसेच बौद्धजैनादि

पाखंडाच्या व व्रात्यशूद्रादि उत्पथाच्या, जुलुमास कंटाळून स्वधर्म, स्वराज्य, व स्ववृत्ति यांचा अनुभव घेण्यास बौद्धकालाच्या प्रथम ज्वानींत म्हणजे शक 'पूर्व साहा' शेंच्या सुमारास दक्षिणारण्यांत वसाहती करण्यास शिरले." या वाक्यांतच एक मोठी चूक निदर्शनास येते ती ही कीं, शकपूर्व ६०० च्या सुमारास बौद्धजैनांचा जुलमहि नव्हता आणि महापद्मनंदाचा राजकीय जुलमहि नव्हता. किंबहुना बुद्ध आणि महावीर यांचा जन्म मुळीं या सुमाराचा, मग त्या वेळीं त्यांच्या धर्मीयांचा जुलूम कोणीकडून होईल? अशोकाच्या वेळीं बौद्धधर्म प्रबळ झाला असें म्हणतां येतें, म्हणजे इ. स. पू. २५० किंवा शकपूर्व ३००; तेव्हां बौद्धजैनांच्या जुलमामुळें महाराष्ट्रीय लोक दक्षिणेंत उतरले ही कल्पना चूक. महापद्मनन्दाचा काळ बुद्धानंतर ३१२ इ. स. पू. चंद्रगुप्त, त्याच्यापूर्वीं शंभरवर्षें महापद्मनंद धरला तर ४१२ इ. स. पू. अथवा शकपूर्व ५००. मग त्याच्या जुलमानें महाराष्ट्रीय लोक दंडकारण्यांत येऊं शकत नाहींत. मिती चुकली, कारणें बरोबर असें मानावें तर आर्यांचा दण्डकारण्यांत येण्याचा काळ शकपूर्व ३०० मानावा लागेल. पण तसें दिसत नाहीं. महाभारतांत भीष्मपर्वांत हिंदुस्थानांतील सर्व देशांची माहिती दिली आहे ती कन्याकुमारीपर्यंतची आहे आणि हल्लींचा महाराष्ट्र आर्यदेशांत आंध्रांसह त्यांत मोजला आहे. याशिवाय अलेक्झांडरला पंजाबांत इ. स. पू. ३२० च्या सुमारास तद्देशीयांनीं सबंध हिंदुस्थानची खडान्खडा माहिती दिली होती असें अरायन म्हणतो व इराटास्थेनीसनें दिलेली अंतराची किनाऱ्याचीं मापें बिनचूक आहेत असें कनिंगह्यामनें म्हटलें आहे. अर्थात् शकपूर्व ४०० च्या सुमारास दक्षिणेंत आर्यांची वसाहत होती; व मेग्यास्थेनीसच्या लेखावरून पांड्य, केरळ वगैरे सर्व देश ज्ञात होता. पाणिनि आणि कात्यायन यांच्या दरम्यान म्हणजे इ. स. पू. १००० पासून ३०० पर्यंत दक्षिणेंत आर्यांचा प्रवेश झाला हें निश्चित. पण तो बुद्धपूर्व असावा असें अनुमान होतें. आतां तो कां झाला हें जरी सांगतां येत नाहीं तथापि तो बौद्धांच्या धार्मिक जुलमामुळें खास नव्हे किंवा महापद्माच्या राजकीय जुलमामुळें नव्हे. तो व्रात्यशूद्रादिकांच्या सामाजिक जुलमामुळेंहि नव्हे. कारण महाराष्ट्रांत जे आर्य ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आले ते शूद्राविवाह करूं नये असें शास्त्र उत्पन्न होण्यापूर्वीं आले असें वाटतें. कारण मध्यदेशाच्या लोकांत जितकें

आर्यद्रविडवंशाचें मिश्रण हल्लीं दिसत आहे, तितकेंच महाराष्ट्रांतील ब्राह्मण व क्षत्रिय या दोघांतहि दिसत आहे असें चेहेरेपट्टीवरून शीर्षमापनशास्त्राप्रमाणें स्पष्ट दिसतें. तात्पर्य, दण्डकारण्यांत आर्य शकपूर्व ६०० म्हटलें तरी चालेल किंवा त्या पूर्वी आले. राजवाड्यांनीं नमूद केलेल्या एकहि कारणानें नव्हे. बुद्धपूर्व इतिहास अद्याप बहुतेक अज्ञात आहे. केवळ वसाहतीच्या इच्छेनें आर्य दक्षिणेंत आले असतील किंवा अन्य राजकीय आपत्तीनें आले असतील.

दुसरा महत्वाचा मतभेदाचा मुद्दा म्हटला म्हणजे, मगधांतून प्रथम महाराजिक ऊर्फ महाराष्ट्रिक लोक दण्डकारण्यांत आले असें जें राजवाडे म्हणतात ( पृ. १५९ ) तें चुकीचें आहे, असें माझें मत आहे. मुळांत महाराष्ट्र हा शब्दच इ. स. पू. अस्तित्वांत नव्हता. " अशोक महाराष्ट्रिकांचें नांव काढीत नाहीं राष्ट्रिकांचें काढतो " असें राजवाडे खुद्द म्हणतात ( पृष्ठ१६० ). यावरून ते इतकेंच अनुमान काढतात कीं, महाराष्ट्रिक अशोकाच्या अमलाखालीं नव्हते. पण ही गोष्ट शक्य नाहीं. सबंध दक्षिण–हिंदुस्थान मद्रासेपर्यंत त्याच्या अमलाखालीं होतें. याशिवाय महाभारताच्या देशांच्या यादींत महाराष्ट्र देश नाहीं आणि लोकहि नाहींत. माझ्या समजुतीनें ही गोष्ट निश्चित आहे कीं, महाराष्ट्र हा शब्द मागूनचा आहे. महाराष्ट्री भाषा हा शब्द अगोदर उत्पन्न झाला. पांडुराष्ट्र, गोपराष्ट्र, अश्मक, पैठण वगैरे दक्षिणच्या अनेक देशांत आलेले आर्य एका संस्कृतीचे असून शूद्राविवाह करणारे होते. त्यांच्यांत जी प्राकृत भाषा उत्पन्न झाली ती एकस्वरूपाची असल्यानें तिला प्रथम महाराष्ट्री हें नांव मिळालें. प्राचीन काळीं दक्षिणेंत महाराष्ट्राचें एक राज्य नसल्यानें प्रथम देशवाचक महाराष्ट्र शब्द उत्पन्न झाला नाहीं. महाराष्ट्री भाषावाची शब्द वररुचि प्रथम उपयोगितो (इ. स. पू. ५७). महाराष्ट्री बोलणारे ते महारट्टी आणि हा शब्द नाशिकच्या लेण्यांत आपल्यास सांपडतो (इ. स. १०० ). जर महाराष्ट्रिक हा शब्दच प्राचीन काळीं नाहीं तर महाराष्ट्रिक लोक मगधांत होते ते तेथोन इकडे आले अशी कल्पना करणें अयुक्त होय. महाराष्ट्रिक, राष्ट्रिक आणि वैराष्ट्रिक असे तीन प्रकारचे लोक मगध, कुरुपांचाल, व उत्तर कुरु या देशांतून दण्डकारण्यांत आले ही कल्पना राजवाड्यांची मौजेची आणि बुद्धिमत्तेची आहे खरी;

पण ती ऐतिहासिक पुराव्यानें चुकीची वाटते. आणि महाराष्ट्रिक उत्तरेस, वैराष्ट्रिक मध्यभागीं व राष्ट्रिक दक्षिणेस अशी वसाहत झाली ही कल्पनाहि महाराष्ट्राला अनुकूल असली तरी अनैतिहासिक आहे. अगोदर महाराष्ट्र देशवाची शब्द इ. स. ५०० च्या नंतरचा. त्रिमहाराष्ट्रहि नंतरचेच आहेत. अशोककाळीं महाराष्ट्री भाषा बोलणारांचे अनेक लहान लहान देश होते आणि म्हणूनच राष्ट्रिकांना किंवा त्या काळच्या मराठ्यांना अशोकानें जिंकलें हें लक्षांत ठेविलें पाहिजे. महाराष्ट्री भाषेवर मागधी भाषेचा जो थोडाबहुत परिणाम झाला आहे तो अशोकानंतरच्या मगधाधिपतींचें साम्राज्य असल्यामुळें झाला आहे. महाराष्ट्री लोक मूळचे मगधांतील म्हणून नव्हे. किंबहुना महाराष्ट्रिक लोक मूळचे मगधाचे असते तर दक्षिणेंत उत्पन्न झालेली महाराष्ट्री प्राकृत मागधीच्या स्वरूपाची असती. महाराष्ट्री, मागधी, शौरसेनी आणि पैशाची अशा चार प्राकृत भाषा चार दिशांना उत्पन्न झाल्या आहेत ह्याचें कारण चार दिशांचे एतद्देशीय रहिवाशी भिन्न भाषा बोलणारे असून त्यांच्या भिन्न लकबांप्रमाणें संस्कृताच्या या प्राकृत भाषा झाल्या आहेत. असो तर, प्राकृत भाषा उत्पन्न झाल्या बुद्धपूर्व, त्या होण्याच्या अगोदर आर्य महाराष्ट्रांत आले हाहि सिद्धांत येथें दृढ होतो.

ब्राह्मणांच्या वेदांवरून व आडनांवांवरून जें अनुमान राजवाडे काढूं चाहतात तेंहि असेंच अनैतिहासिक आहे. मुळीं ब्राह्मणांत आडनांवें इ. स. दहाव्या शतकानंतर उत्पन्न झालीं असें शिलालेखांवरून ठरतें. प्राचीन काळीं नुसतीं गोत्रें भिन्नकुलदर्शक होतीं. मला वाटतें ही गोष्ट राजवाड्यांनीं मान्य केली आहे. तसेंच महाराष्ट्रीयांत वाजसेनीयांचें प्रमाण जास्त आहे असें राजवाडे म्हणतात, पण महाराष्ट्रांत विशेषतः पैठण वगैरे मुख्य महाराष्ट्रांत, ऋग्वेदी लोक जास्त आहेत. किंबहुना सर्व हिंदुस्थानांत महाराष्ट्रांतच ऋग्वेदी जास्त आहेत. आणि महाराष्ट्रीयांचा ळकारयुक्त ऋग्वेदी पाठच आज हिंदुस्थानांत शिल्लक आहे, आणि मॅक्सम्युलरनेंहि तोच छापला आहे. प्राचीन आर्यसंस्कृतीचें जतन करणारे जर कोणी असतील तर ते ऋग्वेदी महाराष्ट्रीयच होत. अर्थात् ते फार प्राचीन काळीं महाराष्ट्रांत आले असावेत. वाजसनेयी ब्राह्मणांचा येथें मागाहून माळव्यांपासून भरणा झाला आहे, ही गोष्ट त्यांच्या णकारवियुक्त शौरसेनी उच्चारावरून दिसते. याज्ञ-

वल्क्य स्मृति येथें मानतात याचें कारण चालुक्याच्या साम्राज्याचा दिवाण विज्ञानेश्वर यानें तिजवर उत्तम टीका केली आणि ती राजाश्रयानें चालली. ही इ. स. १२०० च्या सुमाराची गोष्ट होय. तात्पर्य, वेदांवरून जर कांहीं अनुमान निघत असेल तर तें उलटच निघतें. असो, यापुढील गणराज्यासंबंधीं व गणपतिशब्दासंबंधीं जी चर्चा पृष्ठ १७०–१७३ पर्यंत केली आहे, ती आपण सोडून देऊं. कारण हा विषय वैदिकवचनांच्या अर्थासंबंधानें आहे. महाराष्ट्रांत छोटीं छोटीं गणराज्यें होतीं म्हणजे बहुजनसत्ताक राज्यें होतीं हा राजवाड्यांचा निगम मान्य आहे. हिंदुस्थानांत बुद्धकाळीं किंबहुना अलेक्झांडरच्या वेळीं सुद्धां अनेक गणराज्यें ऊर्फ republics होतीं ही गोष्ट ग्रीक इतिहासकारहि सांगतात, बौद्धग्रंथहि सांगतात, आणि महाराष्ट्राच्या स्वतंत्रतेस ती शोभणारीहि आहे. आणि येथें लहान लहान राज्यें होतीं म्हणूनच महाराष्ट्रावर अशोकाची सत्ता झाली. पण यावरून महाराष्ट्रांतील ब्राह्मण किंवा क्षत्रिय हीनसंस्कृतीचे उत्तरेकडच्या लोकांपेक्षां कमी बुद्धिमत्तेचे व सामर्थ्याचे होते असें ठरत नाहीं. उत्तर हिंदुस्थानच्या उच्च क्षत्रियांपेक्षां किंवा अशोकादि उच्च वृषलांपेक्षां दक्षिणचे क्षत्रिय म्हणजे मराठे सुधारणेच्या बऱ्याच खालच्या पायरीवर होते हें राजवाड्यांचें विधान आश्चर्यकारक आहे ( पृ. १७३ )

पण याहीपेक्षां आश्चर्यकारक विधान " आन्ध्रभृत्यापासून शिवाजी महाराजांपर्यंत म्हणजे सुमारें १६०० वर्षें महाराष्ट्र लोकांना उत्तरेकडील उच्च संस्कृतीच्या लोकांच्या अंमलाखालीं रखडावें लागलें " हें आहे ( १७३ ). ' तब्बल सोळाशें वर्षें महाराष्ट्रिक लोक परकीयांच्या अमलाखालीं होते ' असें राजवाडे म्हणतात, व तेच लिहितात कीं, "आन्ध्रभृत्य, चालुक्य, यादव इत्यादि महाराष्ट्रावरील राज्यकर्त्यांना परकीय म्हटलेलें पाहून वाचकांना आश्चर्य वाटेल; परंतु वस्तुस्थितिच तशी आहे. " मला वाटतें हा सिद्धांत निश्चित करतांना राजवाड्यांनीं घाई केली आहे. जें विधान भांडारकरांनीं सुद्धां केलें नाहीं तें खुद्द राजवाड्यांनीं केलें हें पाहून सखेदाश्चर्य वाटतें; नुसतें आश्चर्य नव्हे ! मुख्यतः याच मुद्यावर माझा मतभेद नमूद करावयाचा आहे, आणि आन्ध्रभृत्य किंवा शातवाहन हे मराठे नसले तरी चालुक्य, राष्ट्रकूट व यादव हे राज्यकर्ते अस्सल महाराष्ट्री म्हणजे मराठे होते ही गोष्ट वाचकांच्या मनावर ठसवावयाची आहे.

चालुक्य, राष्ट्रकूट, यादव हे उत्तरेकडचे क्षत्रिय होते हें सिद्ध करण्यासाठीं राजवाड्यांनीं फारसा पुरावा पुढें आणला नाहीं. तसें म्हटलें तर सर्वच मराठे हे उत्तरेकडोन आलेले ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य होते; तेव्हां ते उत्तरेकडून आले असें म्हणण्यांत तात्पर्यच नाहीं. ज्या उत्तरेकडच्या आर्यांनीं पाणिनीनंतर आणि कात्यायनापूर्वीं दण्डकारण्यांत येऊन वसाहत केली, नुसतीं राज्यें स्थापिलीं— नव्हे तर जमिनी आक्रमण करून गांवें स्थापिलीं—त्यांचें नांव मराठे. त्यांचें कोठें उत्तरेकडोन आल्याचें वर्णन असल्यास त्यांचें मराठेपण नष्ट होत नाहीं. माझ्या मतें चालुक्य, राष्ट्रकूट आणि यादव हे खरे मराठे होते. चालुक्य हे उच्च वैदिकधर्मी क्षत्रिय अयोध्याप्रांतांतील होते असें राजवाडे म्हणतात. पण सर्वच मराठे सूर्यवंशी किंवा चंद्रवंशी असून उत्तरेकडील वैदिकधर्माभिमानी होते आणि महाराष्ट्रांत प्राचीन काळीं किंबहुना बौद्धधर्माच्या उदयापूर्वीं आलेले होते. प्रश्न असा आहे कीं, चालुक्य हे मराठे नसून नूतन आलेले उत्तरेकडचे क्षत्रिय होते कीं काय ? म्हणजे ज्या वेळेस त्यांचें अधिराज्य येथें ५०० इ. स. च्या सुमारास प्रस्थापित झालें त्या वेळीं ते नूतन आलेले होते कीं काय ? माझ्या मतें ते अस्सल मराठे म्हणजे प्रारंभीं बुद्धपूर्व काळीं आलेले आर्य असून नूतन नव्हते. प्रथम गोष्ट ही कीं हे चालुक्य आणि उत्तर हिंदुस्थानांतील रजपूत चालुक्य हे निराळे आहेत. दक्षिणचे मराठे चालुक्य सूर्यवंशी असून मानव्यगोत्री आहेत. रजपूत चालुक्य चन्द्रवंशी असून भारद्वाजगोत्री आहेत. दुसरी गोष्ट ह्या मराठे चालुक्यांना— पुलकेशि वगैरे राजांना— आम्ही उत्तरेकडून आलेले आहों आणि अयोध्येचे आहों ही गोष्ट आठवत नव्हती. ते महाराष्ट्राचेच असें आपल्यास समजत. पुलकेशी वगैरे प्रारंभींच्या चालुक्याच्या लेखांत नुसते मानव्यसगोत्राणां चालुक्यानां एवढेंच उल्लेखित आहे. अयोध्येकडून आम्ही आलों हा उल्लेख त्यांच्या लेखांत दोन तीनशें वर्षांनंतर येऊं लागला. ज्यावेळीं पुराणांचे नवीन लेख प्रचलित होऊन सर्व हिंदुस्थानचे राजे, पाण्ड्यचोलकेरलांसह, सूर्यचंद्रवंशांत दडपून दिले गेले, त्या वेळेस प्रत्येक राजवंशास आम्ही पौराणिक सूर्यचंद्रकुलांपैकीं अमुक राजांचे वंशज असें सांगणें जरूर वाटूं लागलें. तेव्हां अयोध्येहून आम्ही आलों ही गोष्ट चालुक्य, विशेषतः पूर्वचालुक्य म्हणजे वेंगीचे चालुक्य, म्हणूं लागले. महाराष्ट्रांतील प्रथम चालुक्यांच्या लेखांत आम्ही सूर्यवंशी आहों

याचाहि उल्लेख नाहीं आणि आम्ही अयोध्येचे आहों याचाहि उल्लेख नाहीं. तात्पर्य, प्रथम चालुक्य अस्सल महाराष्ट्रीय होत यांत मला तर शंका नाहीं. त्यांचे शरीरसंबंधहि पल्लव, कदम्ब, सेंद्रक वगैरे मराठे कुळांतच झालेले दिसतात; त्यांचा उत्तर क्षत्रियांशीं लग्नसंबंधहि नाहीं; आणि ते आपल्यास मराठ्यांहून भिन्न असें लेखीतहि नाहींत. दुसरें राजघराणें राष्ट्रकूटांचें. ते तर माझ्या मतें अस्सल निःसंशय मराठे होत. एक तर यांच्या नांवांत राष्ट्र शब्द असून तोच मराठ्यांचा किंवा महाराष्ट्राचा विशिष्ट शब्द आहे. दुसरें अशोकापूर्वी याच राष्ट्रांचीं राज्यें लहान लहान महाराष्ट्रांत होतीं आणि शातवाहनानंतर हेच पुन्हां महाराष्ट्रांत मुख्य राजे होते. एका राष्ट्रकूट राजाला जिंकूनच चालुक्य अधिराजे झाले. हे आपल्यास सात्यकीच्या वंशातले मानतात म्हणून ते नवीन आलेले क्षत्रिय नव्हते तर हरिवंशांत सांगितल्याप्रमाणें ज्या यादववंशीयांनीं प्रथम महाराष्ट्रांत वसति केली त्यांपैकींच हे असावे. "चालुक्याप्रमाणेंच राष्ट्रकूट चेदिदेशांतील लत्तनूर ऊर्फ रतनपूर शहरांतील क्षत्रिय होत" असें राजवाडे म्हणतात ( पृ. १८० ). पण लत्तनूर म्हणजे रतनपूर आणि तेंहि चेदिदेशांतलें याला आधार नाहीं. राष्ट्रकूटांच्या लेखांत लत्तनूर हें नांव आहे पण तें ठिकाण कोणतें हें अद्याप निश्चित नाहीं. तात्पर्य, राष्ट्रकूटांना उत्तरेकडून आलेले नूतन क्षत्रिय कधींच म्हणतां येणार नाहीं. यादव अथवा जाधव यांजबद्दलहि राजवाडे मथुरेहून आलेले क्षत्रिय एवढेंच म्हणतात. पण ही गोष्ट मान्य केली तरी जाधव हे अस्सल मराठे हें विधान चुकत नाहीं. पूर्वी म्हटल्याप्रमाणें हे त्यांचें आधिराज्य होण्यापूर्वी थोड्याच अवधींत आलेले उत्तरेकडचे क्षत्रिय होते. किंवा महाराष्ट्राच्या इ. स. पू. ५०० च्या सुमारें आलेल्या आर्यक्षत्रियांपैकीं होते ? हा प्रश्न आहे. यादव नुकतेच आलेले निःसंशय नव्हते, अर्थात् यादवांचें महाराष्ट्रीयांचें राज्य म्हणजे परकीयांचें राज्य नव्हे.

चालुक्य, राष्ट्रकूट, यादव हे खरे मराठे महाराष्ट्रीय क्षत्रिय असून त्यांस राजवाडे परकी उत्तर हिंदुस्थानचे क्षत्रिय मानतात आणि महाराष्ट्रावर इ. स. पू. १०० पासून शक १५६१ पर्यंत परकीय अम्मल होता असें म्हणतात. पण यांत एक मोठी चूक होते ती अशी कीं, मग शिवाजी किंवा शहाजीला सुद्धां राजवाडे मराठे मानून त्यांनीं महाराष्ट्रांत स्वराज्य स्थापिलें असें कां म्हणतात ? हे तर बोलून चालून उत्तर हिंदुस्थानचे

शिसोदे क्षत्रिय आणि तेहि निःसंशय नूतन आलेले म्हणजे माझ्या मतें १३०० शकाचे सुमारास आलेले. पण राजवाड्यांच्या मतें ते पूर्वी आलेले असले तरी चालुक्य–राष्ट्रकूटांप्रमाणेंच केव्हांहि आलेले असले तरी ते परकीयच. मग महाराष्ट्राच्या पारतंत्र्याची मर्यादा शके १५५१ त संपत नसून ती आतांपर्यंत लांबते आणि महाराष्ट्र दोन हजार वर्षें परकीय अंमलांखालींच आहे असें म्हणावें लागतें. कारण शिवाजी, शाहू हे शिसोदिये रजपूत परकीच. आणि त्यांच्यानंतर साम्राज्यपदाला हात घालणारे पेशवे हे चित्तपावन ब्राह्मण हे कोंकणांतले व मराठे नव्हत. आणि तेहि परकी म्हणजे पर्शियामधून आलेले परशुजातीचे !!! तेव्हां महाराष्ट्रांत आतांपर्यंत स्वराज्य नाहींच. मला वाटतें मराठ्यांची हीन संस्कृति दाखविण्याच्या भरांत राजवाड्यांची ही चूक झाली आहे. योग्य विचार करितां चालुक्य, राष्ट्रकूट व यादव यांचें राज्य म्हणजे परराज्य नव्हे स्वराज्यच असें म्हणावें लागेल. परराज्याचें मोठें लक्षण म्हणजे तें राज्य चालविणारे सत्ताधारी, नुसते राजे नव्हे, तर त्याचे अधिकारी, हे त्या देशांत नेहमीं बाहेरून येतात आणि त्यांचा पुरवठा बाहेरून होत असल्यानें देशांतील संपत्ति बाहेर जात असते. एकंदर मुसलमानांचीं उत्तरेकडील किंवा दक्षिणेकडील राज्यें अशाच तऱ्हेचीं होतीं. त्यांतील मुत्सद्दी व मुख्य मुख्य शिपाई व नेते ह्यांचा पुरवठा नेहमीं खुरासान, इराण व अरबस्तान यांतून होत असे व हे लोक आपली संपत्ति परदेशांत नेत. येथें राहून येथेंच उपभोगीत नसत. हल्लीं इंग्रजांचें राज्य तर निर्भेळ परदेशी आहे. कारण मुसलमान लोक येथें कधीं कधीं राहत व स्थायिक होत. पण इंग्रजांचा सर्व बंदोबस्त या उलट आहे. येथें कोणी राहूं नये अशी त्यांची नीति आहे. त्यांचे मुलकी व फौजी मुख्य अधिकारी नेहमीं विलायतेहून येतात व विलायतेस परत जातात. त्यांची भिस्तहि मुख्यतः विलायती शिपायांच्या पलटणीवर आहे. आणि हिंदुस्थान देश विलायतेच्या फायद्यासाठीं जितका चुंफतां येईल तितका सतत चुंफला जात आहे. तात्पर्य, हल्लींचें इंग्रजांचें राज्य मुसलमानी राज्याहून निर्भेळ पारराज्य आहे. इंग्लंदांतील राजा जर्मनवंशी आहे. पण इंग्लंदचें राज्य पक्कें स्वराज्य आहे. आतांपर्यंत हानोवर घराण्याचे शरीरसंबंध जर्मनींत होत असले तरी सुद्धां इंग्लंदचें राज्य स्वराज्य आहे. याचें कारण इंग्लंदच्या राज्यकारभारांत व सैन्यांत जर्मनचा एक हि मनुष्य नाहीं. तीच

स्थिति चालुक्य, राष्ट्रकूट, यादवांच्या राजांची होती. क्षणभर राजवा-ड्यांच्या मताप्रमाणें हीं राजकुलें परकी उत्तरहिंदुस्थानी क्षत्रियांचीं मानलीं तरी सुद्धां त्यांचीं राज्यें परराज्यें नव्हतीं. कारण मुलकी व फौजी सर्व राज्यांतील अधिकारी महाराष्ट्रीय होते व देशांतील पाटिलक्या सर्व मराठ्यांच्या होत्या. शिवाजीचें भोंसले कुल जरी नूतन आलेलें शिसोदिया-वंशी होतें तरी तें तत्त्वतः मराठे कुलच झालेलें होतें. त्यांचे शरीरसंबंध मराठ्यांशींच झाले होते. त्यांचे फौजी व मुलकी मदतगार मराठेच होते. ते महाराष्ट्रांतील पाटीलच झाले होते. त्यांची दृष्टि महाराष्ट्राबाहेर कधींहि गेली नाहीं. आमचा मूळ देश राजस्तान तेथें आम्ही जाऊन राहूं किंवा तेथें संपत्ति नेऊं असें कधींहि त्यांच्या स्वप्नीं देखील आलें नाहीं. तात्पर्य, भोंसले कुल जरी दोनतीनशें वर्षे आलेलें नवीन शिसोदिया कुल होतें तरी तें पूर्ण मराठे बनलें होतें. आणि त्यांचें अधिराज्य म्हणजे स्वराज्यच होय हें जसें निःसंशय, त्याच रीतीनें चालुक्य, राष्ट्रकूट आणि यादव हे पूर्ण महाराष्ट्री बनलेले असून त्यांचे साथीदार सर्व महाराष्ट्री, त्यांचें कायमचें राहणें महाराष्ट्रांत, त्यांची दृष्टि कधींहि महाराष्ट्राबाहेर गेलेली नाहीं. तेव्हां त्यांचें राज्य म्हणजे महाराष्ट्रांत पूर्ण स्वराज्यच होतें असेंच समजलें पाहिजे.

आतां येथें कदाचित् कोणी म्हणेल कीं, चालुक्य, राष्ट्रकूट, यादव, भोंसले, जरी पूर्ण महाराष्ट्री झालेले असले तरी त्यांचें बीज उत्तरेकडील क्षत्रियांचें, त्यांची बुद्धिमत्ता व राजकीय सत्ता गाजविण्याची शक्ति हा वरिष्ठ संस्कृतीची, मराठ्यांच्या हीनसंस्कृतीची नव्हे; तर हेंहि म्हणणें इतिहासाला पटण्यासारखें नाहीं. राणोजी शिंदे, मल्हारराव होळकर इत्यादि अस्सल निर्भेळ मराठे सरदार जबरदस्त राजकीय धोरणाचे होते; आणि महादजी शिंदे तर सर्वांत अग्रणी. शिवाजीमहाराजांच्या वेळीं कित्येक मराठे सरदार पूर्ण धोरणी आपल्यास दिसतात. मराठे लोक जात्या शूर आहेतच, पण राजधोरणीहि आहेत यांत शंका नको. मराठे देशस्थ ब्राह्मणांनीं राजकीय धोरण उत्कृष्ट दर्जाचें शिवाजीमहाराजांच्या वेळीं व राजारामाच्या वेळीं दाखविलें आहे. नांवनिशी देण्याची आवश्यकता नाहीं. तात्पर्य, मराठे, दक्षिणचे आर्य ब्राह्मणक्षत्रियवैश्य, उत्तर हिंदुस्था-नच्या क्षत्रियांपेक्षां कमी बुद्धिमत्तेचे, राजकीय धोरणाचे किंवा धार्मिक संस्कृतीचे ही गोष्ट सर्वथैव चुकीची. कदाचित् पारडें झुकलें तर मराठ्यां-च्याच बाजूला झुकेल. गुरखे, रजपूत, शिख इत्यादि ज्या शूर जाति हिंदु-

स्थानांत आहेत त्यांच्याशीं मराठ्यांची तुलना केली, तर मराठे शहाणपणांत, बुद्धिमत्तेंत, राजकीय धोरणांत वरचढच आहेत अशी खातरी सर्वांची आहे. शिवाय उत्तरहिंदुस्थानच्या क्षत्रियांनीं स्वराज्यस्थापनेच्या बाबतींत काय शंख वाजविला आहे ? उत्तरहिंदुस्थान पारतंत्र्यांत महाराष्ट्रा-इतकेंच लोळत पडलें आहे. पंजाब तर कधींच स्वतंत्र असलेला व स्वराज्य भोगणारा शिकंदराच्या वेळेपासून दिसत नाहीं, आणि पंजाब तर आर्यक्षत्रियांचें माहेर आहे. राजपुतान्यांत स्वतंत्र स्वराज्य ज्या वेळीं होतें त्या वेळीं महाराष्ट्रांतहि होतें. रजपूत आपलीं स्वराज्यें मुसलमानी व इंग्रजी अमलांत संभाळून आहेत ही गोष्ट मान्य व त्यांस भूषणावह आहे. पण ह स्वराज्य मांडलिकी स्वराज्य आहे; राजवाडे यांच्या भाषेनें पाहिजे तर त्यास स्वराज्य—म्हणावें पण तें खरें स्वराज्य नव्हे आणि रजपुतांनीं मुसलमानी अम्मल झुगारून खरें स्वराज्य स्थापन करण्याचा कधीं प्रयत्न केला किंवा वरिष्ठ संस्कृति गाजविली ! इतिहास हा मान एकट्या महाराष्ट्रीयांसच देत आहे. शिवाजीच्या मराठ्यांनींच स्वदेशांत स्वधर्म आणि स्वराज्य—खरें स्वराज्य—स्थापन केलें. तात्पर्य, महाराष्ट्रीय आर्यांची हीन संस्कृति आहे किंवा होती हा सिद्धान्त बरोबर नाहीं. महाराष्ट्रांतील काय आणि उत्तरेकडील काय, आर्यलोक राजकीय क्षेत्रांत जगताच्या मागें कां पडले आहेत आणि परराज्य झुगारून देण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत कां राहिलें नाहीं हा प्रश्न निराळ्या रीतींनें सोडविला पाहिजे. तसा प्रयत्न मध्ययुगीन भारत भाग १ व २ यांत करण्याचें धाडस मीं केलें आहे. त्यांतील मथितार्थ इतकाच कीं, राजा म्हणजे विष्णूचा अंश, जो पूर्वजन्मांत तपश्चर्या करितो तो पुढें राजा होतो, राजा नियत करण्याचा अधिकार प्रजेचा नाहीं इत्यादि ज्या भ्रान्त कल्पना लोकांत हळुहळू रूढ झाल्या त्याचें हें फळ आहे. असो; याचा विस्तार मी येथें करीत बसत नाहीं. मुख्य मतभेदाचा मुद्दा राजवाड्यांच्या विवेचनांत दिसून आला तो मीं वाचकांसमोर ठेविला आहे. आणखी अनेक लहानसहान मुद्दे आहेत, उदाहरणार्थ—महाराष्ट्रांतील आर्य क्षत्रिय—ब्राह्मण—वैश्य हे नागवंशीयांशीं मिश्रित शहाजीच्या कालानंतर झाले, ही राजवाड्यांची कल्पना ( पा. १९७ ) ठीक नसून हें मिश्रण प्रारंभींच शकपूर्वकालांतच झालें असें माझें मत आहे.



# अहल्याबाईचें चरित्र.

## ' पुरुषोत्तम ' कृत



इतिहास म्हणजे अनेक मनुष्यांच्या कृत्यांची समष्टि होय. इतिहास म्हणजे कांहीं निराळी वस्तु नाहीं. राष्ट्रांत सुष्ट किंवा दुष्ट मनुष्यें निर्माण होतात, त्यांच्या मानवी कृतींनीं राष्ट्राचा इतिहास बनतो. राष्ट्राचा उदय-काळ आला म्हणजे पराक्रमी, तेजस्वी आणि विशेषतः नीतिमान् मनुष्यें उत्पन्न होतात. तोच राष्ट्राच्या अवनीतीचा काळ आला म्हणजे तेजोहीन, पराक्रमहीन व विशेषतः नीतिहीन माणसें राष्ट्रांत वावरूं लागतात. महा-राष्ट्राच्या अर्वाचीन इतिहासाकडे पाहिलें असतां या विधानाची सत्यता आपल्या मनावर चांगली ठसते. इसवी सन १६२७ त शिवाजीमहाराजांचा जन्म झाला तेव्हांपासून महाराष्ट्र उदय पावूं लागलें. त्यावेळचीं माणसें कितीतरी निग्रहाचीं, स्वार्थत्यागाचीं, न्यायप्रियतेचीं व धर्मपरायणतेचीं होतीं ! त्यांचें नांव उच्चारल्याबरोबर त्यांचें उदात्त चरित्र आपल्या डोळयां-समोर उभें राहतें; आणि आपल्या देशांत, आपल्या जातींत अशीं माणसें पूर्वीं निर्माण झालीं होतीं हें पाहून अभिमान, आनंद व तदुत्तर खेद यांनीं अंतःकरण भरून जातें. शिवाजीमहाराज सर्व व्यक्तींत शिरोमणि होतेच, पण त्यांच्या समकालीन इतर माणसेंहि अलौकिक तेजाचीं व नीतीचीं होतीं. शिवाजीची आईच डोळयांपुढें आणली तर निश्चय, अभिमान करारीपणा, शहाणपणा, स्वजातिप्रेम, व उज्ज्वल धर्मपरायणता यांची मूर्ति आपल्यापुढें उभी राहते. श्रीविष्णूनें अवतार घेतल्याबरोबर इतर देव-ताहि निरनिराळ्या योनींत अवतार घेतात असें जें पुराणांत वर्णन आहे, तें अक्षरशः खरें आहे. महान् विभूतीच्या समकालीनच इतर दिव्य विभूति निर्माण होतात आणि परमेश्वराचे ईप्सित हेतु सिद्धीस नेतात. शिवाजीमहाराजांबरोबरच अनेक लोकोत्तर माणसें महाराष्ट्रांत निर्माण झालीं व तीं सर्व जातींत आणि स्त्रीपुरुषांत उत्पन्न झालीं. त्यावेळीं मराठे, ब्राह्मण, प्रभु, मावळे, कोळी इत्यादि सर्व जातींत तेजस्वी व नीति-मान् स्त्री व पुरुष निपजले हें आश्चर्यकारक नव्हे काय ? साधुवर्य रामदास व तुकाराम, दादोजी कोंडदेव, आबाजी सोनदेव, तानाजी मालुसरे, येसाजी

कंक, हंबीरराव मोहिते, प्रतापराव गुजर, बाजी प्रभु, जिजाबाई, सईबाई, रामचंद्रराव हणमंते, प्रल्हाद निराजी, गागाभट्ट, इत्यादि महान् महान् निरनिराळया शक्तीच्या व्यक्ति त्या वेळेस निर्माण झाल्या, आणि त्यांनीं महाराष्ट्राच्या स्वराज्याचा पाया मजबूत व खोल घातला. शिवाजीमहाराजांच्या मृत्यूनंतर म्हणजे १६८० पासून पुढें कित्येक वर्षें हिंदुस्थानचा सार्वभौम कपटपटु औरंगजेब यानें मराठ्यांच्या स्वराज्याची ही इमारत ढांसळून पाडण्याचा जीवापाड प्रयत्न केला, पण तो सिद्धीस गेला नाहीं. या काळांतहि लोकोत्तर पुरुष निर्माण होऊन त्यांनीं स्वराज्याचें रक्षण केलें. राजाराम महाराजांस प्रल्हाद निराजी, रामचंद्रपंत अमात्य, धनाजी जाधव, संताजी घोरपडे, इत्यादि स्वदेशाभिमानी मुत्सद्दी व वीर पुरुषांचें पाठबळ मिळाल्यानें सत्तावीस वर्षांची आपत्ति महाराष्ट्र–स्वराज्यानें तगून काढली; अर्थात् औरंजेबाच्या सामर्थ्याच्या प्रचण्ड लाटेनें मराठी स्वराज्याच्या इमारतीचा पाया ढांसळला नाहीं.

इ. स. १७०७ त औरंगजेब मरण पावला आणि महाराष्ट्राचा ग्रीष्मकाळ संपला. औरंजेबाच्या प्रखर आगींतून महाराष्ट्री स्वराज्याचा वृक्ष तगून राहिला तो पुढील वर्षाऋतूंत जोरानें इतका फोफावला कीं, त्याच्या जोरदार शाखा सर्व हिंदुस्थानाभर पसरूं लागल्या. या वेळेस नवीन माणस उदयास आलीं व त्यांनीं आपल्या पराक्रमानें, शहाणपणानें, व कर्तृत्वानें महाराष्ट्राचा अम्मल सर्व हिंदुस्थानभर बसविला. यावेळचे मध्यवर्ति पुरुष ह्मणजे पेशवे होते. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव बल्लाळ, बाळाजी बाजीराव ही कर्तृत्ववान् पुरुषांची परंपरा पाहून सानंदाश्चर्य वाटल्यावांचून राहत नाहीं. चिमाजीआप्पा व सदाशिवरावभाऊ हीहि शाखा जोरदार, स्वामिनिष्ठ व धर्मनीतिपरायण होती. यांजबरोबर नवीन उदयास आलेले सरदारहि असेच पराक्रमी व परंपरायुक्त झाले. राणोजी, जयाजी, दत्ताजी व जनकोजी शिंदे; मल्हारराव व तुकोजीराव होळकर; उदाजीराव व यशवंतराव पवार; इत्यादिकांची नांवें ऐकिल्याबरोबर पराक्रम व स्वामिनिष्ठा यांच्या मूर्ति डोळयांसमोर उभ्या राहतात आणि प्रत्येक महाराष्ट्रीयांचें हृदय प्रेमानें उचंबळून येतें. बाळाजी विश्वनाथाची पेशवाई सन १७१४ त सुरू झाली. सन १७६० पर्यंत मराठे दिल्लीचे मालक होऊन अटकेपर्यंत घोडे दौडत गेले. व चौथाई व सरदेशमुखी वसूल करूं लागले. सारांश, सुमारें पन्नास वर्षांतच मराठी राज्याचा विस्तार हिंदुस्थानास

व्यापून गेला. या राज्यरूपी वृक्षास सन १७६१ त पानपतच्या लढाईनें मोठा धक्का बसला. कित्येकांच्या मतें या धक्यानें मराठी राज्य ढांसळूं लागलें, पण मला तसें वाटत नाहीं. पानपताचा धक्का महाराष्ट्रास जबरदस्त बसला, ही गोष्ट खरी; पण त्यानें मराठी राज्याची बळकटी भंग पावली नाहीं. किंबहुना मराठी राज्य किती जोरदार होतें याची या वेळेस परीक्षाच झाली. मराठ्यांच्या राष्ट्रांत अद्याप सत्पुरुष निर्माण होत होते, यामुळें मराठ्यांचें राज्य पानपपतचा धक्का खाऊनहि पुन्हा जसेंच्या तसेंच राहिलें. या वेळेस माधवराव पेशवे यांनीं आपल्या जोरदार प्रकृतीनें मराठी राज्य-वृक्ष सांवरून धरला; व त्यांनीं त्या वृक्षास महादजी शिंदे, अहल्याबाई होळकर, नानाफडणीस, हरिपंत फडके, परशरामभाऊ पटवर्धन इत्यादि खांबांचा टेका लावून दिल्यानें हा वृक्ष आणखी पन्नास वर्षें टिकून राहिला. दुर्दैवानें किंवा—गोविंदराव काळयानें म्हटल्याप्रमाणें—सुकृतांश सरल्यामुळें, कर्तृत्ववान् मनुष्यांची परंपरा सन १७९० पासून १८०० या दशकांत खपून गेली, आणि नवीन पुरुष निर्माण झाले ते धर्म, नीति, तेज इत्यादि सर्व बाजूंनीं हीन झाले. सन १७९३ त महादजी मेला, हरिपंत तात्या सन १७९४ त, सन १७९५ त अहल्याबाई, सन १७९६ त परशरामभाऊ पटवर्धन, सन १७९७ त तुकोजी होळकर. शेवटचे नाना फडनीस राहिले, तेहि दुष्ट लोकांच्या संगतींत फार दिवस टिकले नाहींत. तेहि सन १७९९ त पितरांत जमा झाले. सारांश, चमत्कार हा कीं एकोणविसाव्या शतकाच्या प्रारंभाला महाराष्ट्रांत कर्तृत्ववान्, करारी व नीतिमान् मनुष्यांची जाजमझाड झाली आणि महाराष्ट्रराज्यरूपी वृक्ष आळशी, चैनी, लोभी व दुष्ट लोकांच्या जोपासणीस आला.* अर्थातच तो वृक्ष उन्मळून पडण्यास फार काळ लागला नाहीं. १८ वर्षांच्या अवधींतच त्याचें मध्यवर्ती खोड उपटून पडलें. त्याच्या शाखा आज ठिकठिकाणीं जिवंत आहेत ही केवळ त्यांच्या स्थापनकर्त्यांची पुण्याई होय.

असो, महाराष्ट्रांत इसवी सनाच्या सतराव्या व अठराव्या शतकांत ज्या अनेक पराक्रमी व नीतिमान् व्यक्ति—पुरुष व स्त्रिया—निर्माण झाल्या

---

* या पुरुषांविषयीं महाराष्ट्रांत इतका तिटकारा असे कीं, बाजीराव रघुनाथ, दौलतराव शिंदे व यशवंतराव होळकर यांचें नांव प्रातःकाळीं उच्चारूं नये असा कित्येक वर्षें लोकांत समज असे.

व ज्यांचें नांव निघाल्याबरोबर महाराष्ट्रीयांच्या नेत्रांतून प्रेमाश्रु उत्पन्न झाल्याशिवाय रहात नाहींत, त्या सर्वांत शिवाजीमहाराज अग्रणी होते यांत कोणास शंका नाहीं. दुसरें स्थान कोणास द्यावें याचा विचार केला तर माझ्या मतें अहल्याबाई होळकर हीच या स्थानास पात्र व योग्य आहे. हिच्यासारखी सर्वतोपरी सद्गुणी व तेजस्वी मूर्ति महाराष्ट्रांत निर्माण झाली नाहीं. मराठ्यांत शिवाजीमहाराज, धनगरांत अहल्याबाई, आणि तिसऱ्या नंबरावर, पुष्कळ अंतरावर, ब्राह्मणांत श्रीमंत माधवराव पेशवे, असाच क्रम लागेल असें मला वाटतें. शिवाजीमहाराजांनंतर याप्रमाणें परिनालिका लागूं शकेल याजविषयीं खातरी पटण्यास एकच प्रमाण दिलें असतां पुरें होईल असें मला वाटतें. राजकर्त्यांच्या परमोदारत्वाचें एकच प्रमाण आहे, आणि तें हें कीं, राज्यांतील लोकांनीं त्यांच्या पश्चात् पिढ्यानुपिढ्या त्यांच्या चांगुलपणाबद्दल उद्गार काढावे व त्यांस धन्यवाद द्यावा. असा प्रजेचा धन्यवाद मिळविणें किती कठीण आहे हें येथें लक्षांत आणलें पाहिजे. असा धन्यवाद मिळविण्यासाठीं ज्यास परमेश्वरानें राज्य दिलें आहे त्यानें आपल्या मनास व शरीरास तरवारीच्या धारेवर धरलें पाहिजे. राज्यमदापासून प्रबलतेनें उत्पन्न होणारे दुर्गुण आपल्यापासून दूर ठेविले पाहिजेत. राज्यमदाचे सहज साथी काम, क्रोध व लोभ यांस पायाखालीं तुडविलें पाहिजे. राज्याचा शिरजोर दोष जो अभिमान तो भाजीसारखा चिरून जिरविला पाहिजे. माझा हुकूम फुकट जातो हा गर्व राजानें सोडला पाहिजे. मीं केलें तें यथान्याय आहे काय,—धर्मास अनुसरून आहे काय,— ज्या प्रजा देवानें माझ्या स्वाधीन केल्या आहेत त्यांच्या कल्याणास अनुसरून आहे काय, हाच विचार प्रधानतेनें राजानें आपल्यासमोर जागृत ठेविला पाहिजे आणि "स्वसुखनिरभिलाषः खिद्यसे लोकहेतोः" या कविकुलगुरूच्या उक्तीप्रमाणें प्रजेचें हित नेहमीं डोळ्यांसमोर ठेवून, आपल्या सुखाची पर्वा न करतां, आपलें तन–मन–धन प्रजाकार्यीं लाविलें पाहिजे. तरच हें सर्टिफिकिट प्रजेकडून राजास मिळेल ही गोष्ट निर्विवाद आहे. या जगताच्या इतिहासांत आजवर हजारों किंबहुना लाखों राजे झाले, पण अशा प्रकारचें प्रजेकडून प्रमाणपत्र फारच थोड्यांस लाधलें. मग ज्या शिवाजीमहाराजांस, अहल्याबाईस व नानासाहेस पेशव्यांस असें भलावणपत्र प्रजेकडून मिळालें, त्यांची योग्यता महाराष्ट्रांत काय पण जगताच्या इतिहासांत मोठी नाहीं काय? अशा प्रकारचा लायकीचा दाखला या राज्य-

कर्त्यास प्रजेकडून मिळाला ह्याची साक्ष **पाश्चत्य** इतिहासकारहि देतात. माळव्याचा सन्मान्य इतिहासकार सर जॉन मालकम यानें अहल्याबाई-विषयीं असा दाखला नमूद करून ठेविला आहे. ज्याप्रमाणें ग्रँट डफ साहेबानें नानासाहेबांविषयींचें प्रजेचें शिफारसपत्र नमूद करून ठेविलें आहे त्याप्रमाणेंच अहल्याबाईस ब्राह्मण–क्षत्रिय, हिंदु–मुसलमान, सुष्ट–दुष्ट, सावकार व चोर सर्वच अद्यापि माळव्यांत दुवा देतात आणि तिचें नांव अद्याप अत्यंत आदरानें व पूज्यबुद्धीनें घेतात, असें मालकम साहेबानें लिहून ठेवलें आहे.* सारांश, कविश्रेष्ठ मोरोपंतानें–ज्यानें कोणत्याहि मानवी प्राण्याची हांजी हांजी केली नाहीं त्यानें–अहल्याबाईविषयीं जें मत नमूद केलें आहे तेंच इतिहासाच्या समालोचनानें कायम व दृढ होतें, व " न न्यायधर्मनिरता अन्या **कलिमाजि** ऐकिली कन्या " हाच सिद्धांत खरा ठरतो. अशा सर्वमान्य व सर्वपूज्य अहल्याबाईचें चरित्र जितके वेळ आमच्यासमोर येईल तितके वेळ आमच्या ठिकाणीं आमच्या पूर्वजांविषयीं अभिमान व आमच्या भावि सुधारणेविषयीं आशा जागृत होईल. या दृष्टीनें, श्रीमंत **तुकोजीराव होळकर** व त्यांच्या सुशील पत्नी श्रीमंत **चंद्रावती महाराणीसाहेब** यांच्या प्रोत्साहनानें ' पुरुषोत्तम ' कृत **अहल्याबाईचें चरित्र** नवीन तयार होऊन मराठी वाचकांसमोर आलें आहे हा एक अत्यंत अभिनंदनीय लाभ होय. त्यांतहि हें चरित्र उपलब्ध झालेली सर्व माहिती एकत्र करून ग्रंथकर्त्यानें आदरानें व प्रेमबुद्धीनें लिहिलें आहे, त्यामुळें तें विशेष मनोहर झालें आहे यांत शंका नाहीं. पण अहल्याबाईचें चरित्र याहूनहि मनोहर आहे असें आम्हांस वाटतें. तिच्या सद्गुणांचा आस्वाद याहून मधुर आहे यांत आम्हांस तरी शंका नाहीं. यासाठीं व अहिल्याबाईचें चरित्र इतकें रसभरित आहे कीं त्याची पुनरुक्ति कधींहि कंटाळवाणी होणार नाहीं असें वाटल्यावरून, आम्ही तें चरित्र वाचकांपुढें पुन्हां मांडण्याचें धाष्टर्य करतों. " महेश्वर दरबारचीं पत्रें " हा एक अमूल्य पत्रव्यवहार रा. ब. पारसनीस

---

* She was blest by every tongue, by stern and gentle, by old and young ( Mrs. Jone Welby. )

पुरुषोत्तमकृत अहल्याबाईचें चरित्र, पान २७७.

यांनीं महाराष्ट्रापुढें ठेविला आहे. त्यांत तत्कालीन विभूतींचें चित्र इतक्या हृद्यंगम रीतीनें रेखाटलेलें दृष्टीस पडतें कीं जणूंकाय आपण अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत स्वतंत्र व विजयशाली महाराष्ट्रांत वावरतों आहों असा आपल्यास भास होतो. दुर्दैवानें या पत्रव्यवहारावरून रा. ब. पारसनीस यांचा अहल्याबाईसंबंधानें बराच विपर्यासयुक्त प्रतिकूल ग्रह झाला आहे असा त्यांच्या विविधज्ञानविस्तारांतील लेखावरून* भास होतो. असा प्रतिकूल ग्रह होण्याचें कांहींच कारण नाहीं, असें आम्हांस वाटतें. याच पत्रव्यवहाराच्या लक्षपूर्वक अध्ययनानें अहल्याबाईचें उज्ज्वल चरित्र उज्ज्वलतर कसें दिसतें आणि आजपर्यंतच्या तिच्या लौकिकास आणि इतिहासकारांच्या ऐकमत्यानें केलेल्या तिच्या स्तुतीस कसा जोर येतो हें आमच्या प्रस्तुत लेखावरून दिसून येईल अशी उमेद आहे.

अहल्याबाईचा जन्म इ. स. १७२५ त+ मोंगलाईतील बीडतालुक्यांतील चोंढें गांवच्या शिंदे उपनामक एका धनगर पाटलाच्या कुळांत झाला, ही गोष्ट इतिहाससंशोधकांच्या परिश्रमावरून आतां निश्चित झाली आहे.* इतिहासकारांस बहुधा मोठ्या व्यक्तींसंबंधानें परिस्थिति व वंश हें दाखविण्याचा मोठा नाद असतो. अमुक एक विलक्षण व्यक्ति उत्पन्न झाली ती अमुक मोठ्या कुळांत उत्पन्न झाली, किंवा अमुक अनुकूल परिस्थितीमुळें उत्पन्न झाली, असें बहुधा इतिहासकार मोठ्या प्रयासानें दाखवितात, व त्या प्रयासानुरूप त्यांस तसें दाखविण्यास आनंदहि वाटतो. पण आमच्या मतें अशी धडपड करण्याचें मुळींच कारण नाहीं. अद्भुत व्यक्ति निर्माण होतात त्या परिस्थिति व वंश यांना झुगारून उत्पन्न होतात. नेपोलियन ज्या कुळांत उत्पन्न झाला त्या कुळांतील कोणत्या पुरुषांनीं पूर्वीं किंवा नंतर लढाया मारून सेनापतित्व गाजविलें ? येशूख्रिस्त ज्या कुळांत व ज्या जातींत अवतीर्ण झाला त्या कुळांत व

---

* वि. ज्ञा. विस्तार, पु० ३८ अं० ५

\+ हा जन्म सन रा. ब. पारसनीस यांनीं ठरविला आहे, तो योग्य आहे. त्यांचें अनुमान चुकीस पात्र होतें असें जें 'पुरुषोत्तमा'नें लिहिलें आहे तेंच वास्तविक चुकीचें आहे. "पारसनिसांचें अनुमान चुकीचें असूनहि खरें ठरलें आहे" असें जें 'पुरुषोत्तमा'नें पान ३४-वर लिहिलें आहे तें आमच्या मतें जास्त बरें दिसतें.

त्या जातींत अमानुष शांति व परोपकार हीं कोठें दिसून आलीं होतीं ? सारांश, अशा दिव्य विभूति पाहिजेल त्या ठिकाणीं परमेश्वराच्या इच्छेनेंच उत्पन्न होतात व त्याच्या इच्छेनुरूप जगताचें अनन्यसाधारण कार्य करून देतात. परिस्थिति व वंश हे सामान्य विभूतींच्या चरित्राच्या विचाराच्या वेळीं लक्षांत घेण्यासारखे असतील, परंतु ह्यांचा विचार अलौकिक विभूतींस मुळींच लागू पडत नाहीं, असें आमचें ठाम मत आहे. चोंढें गांवचे शिंदे धनगर पाटील कांहीं विशेष बुद्धिमान्, पराक्रमी, कारस्थानी किंवा धर्मशील होते असें मुळींच नाहीं. त्यांच्या घरांत उत्पन्न झालेलें हें दिव्य स्त्रीरत्न पुढें विलक्षण उदयास येईल आणि आपल्या धर्मशीलतेनें, बुद्धिमत्तेनें व पराक्रमानें जगतास दिपवून टाकील असेंहि कोणास वाटलें नाहीं. धनगराच्या कुळाप्रमाणें व त्यावेळच्या समाजस्थितीप्रमाणेंच तिला साधारण शिक्षण शिंद्यांचें घरीं लहानपणीं मिळालें असावें; यापेक्षां जास्त मिळालें असेल असें आम्हांस वाटत नाहीं. अहल्याबाईचें माहेरचें नांव काय होतें हें जाणण्याची लालसा साहजिकच तिच्या संबंधाची हरएक गोष्ट पूज्य वाटते या कारणानें प्रत्येकास उत्पन्न होते; पण ती पुरी होईल असें आम्हांस वाटत नाहीं.

त्या वेळच्या देशरिवाजाप्रमाणें अहल्याबाईचें लग्न आठव्या वर्षी मल्हारराव होळकराच्या खंडेराव नामक पुत्राशीं इ. स. १७३३ त झालें. हा सुयोग केवळ तिच्या भाग्यांत परमेश्वरानें अपार संपत्ति, स्वतंत्र राज्योपभोग व दिगंत कीर्ति लिहिली होती म्हणूनच जुळून आला. मल्हारराव या वेळीं धनगराचा राजा झाला होता, व त्याजजवळ पैकाहि पुष्कळ होता. यद्यपि त्याच्या बरोबरीची सोयरीक करण्यास धनगर राजे कोणी नव्हते, तथापि त्यास आपल्या एकुलत्या एक मुलास बायको करण्यासारखें अहल्याबाईचें रूप तरी अप्रतिम होतें असेंहि नाहीं. ती एक साधारण स्वरूपाची, संभावित परंतु विशेष श्रीमंत नव्हे, अशा धनगर घराण्यांतील एक मुलगी होती. कदाचित् अशीच मुलगी त्या वेळेस मल्हाररावास साध्य असेल. तें कसेंहि असो, अहल्येच्या नशिबानें तिच्या बुद्धिमत्तेची, पराक्रमाची व धर्मनिष्ठेची जेथें कसोटी लागेल अशा ठिकाणीं सुदैवानें ती पडली. तिच्या घराण्याच्या साधारणपणें बरोबरीच्या एखाद्या धनगर पाटलाच्या घरीं ती पडली नाहीं हें तिचेंच नव्हे तर आमचें—

म्हणजे महाराष्ट्राचेंहि भाग्य होय. नाहीं तर या दिव्य स्त्रीरत्नाचे अलौकिक गुण भाकऱ्या भाजण्यांत किंवा नवऱ्यास शेतावर भाकरी नेऊन पोंचवण्यांत किंवा मेंढरांची लोकर साफ करण्यांत मातीच्या मोलानें व्यर्थ गेले असते. अशा प्रसंगांतून अहल्याबाईच्या व महाराष्ट्राच्या नशीबानें तीस बाहेर काढलें, व ती मल्हारराव होळकराची ज्येष्ठ सून झाली.

होळकरांच्या घरीं आल्याबरोबर तिच्या अलौकिक गुणांचें तेज झळकूं लागलें. ती इतकी बुद्धिवान् होती कीं, तिला कोणत्याहि कामांत घाला ती तें काम उत्तम समजूं लागली व करूं लागली. हिशोब तिला लवकरच समजूं लागले, व मल्हारराव होळकराच्या खजिन्याची किल्ली लवकरच तिच्या हातांत पडली. सरंजामाच्या व संस्थानाच्या उत्पन्नाशिवाय मल्हाररावास लुटींत व भेटींत अगणित द्रव्य मिळत असे. त्याची योग्य जोपासना करण्याचें काम अहल्याबाईकडे आलें, व तें तिनें इतक्या चोखपणानें व हुशारीनें संभाळलें कीं तिच्या सासऱ्याचा तिच्यावर लवकरच पूर्ण विश्वास बसला. दुसरें, मल्हारराव व खंडेराव बहुधा लढायांवर जात तेव्हां तिच्या स्वाधीन राज्य करून जात; तेंहि काम ती उत्तम रीतीनें करूं लागली. धनगर पाटलाच्या घरीं तिचा जन्म झाला होता, पण राजतेज तिच्या अंगीं सहज होतें, यामुळें तिची छाप सर्वांवर आपोआप पडे. तिचा हुकूम कोणी तोडला असें कधींच झालें नाहीं. तिची जरबच अशी कांहीं विलक्षण होती कीं सर्व लोक मुकाट्यानें तिच्या हुकमांत चालत. होतां होतां मल्हाररावहि तिच्या कह्यांत आला. मल्हारराव म्हणजे प्रसिद्ध हूड. पण अस्वल जसा आपल्या पालकाच्या मर्जीनुरूप वागतो त्याप्रमाणें मल्हाररावहि तिच्या सल्ल्याच्या विरुद्ध वागेनासा झाला. सारांश, आपल्यामागें संस्थानाचें काय होईल याची काळजी मल्हाररावास लवकरच नाहींशी झाली. बरें, फौजेबरोबर अहल्याबाईस घेतली तरीहि तिची बुद्धिमत्ता व राजतेज त्या बाबतींतहि पुढेंच. तिला लढाईचे सर्व डावपेंच लवकरच समजूं लागले, व घोड्यावर बसून खांद्यावर बांसडा टाकून सैन्याच्या पुढें होण्यास अहल्या कचरेनाशी झाली. हिशोब, राज्यव्यवस्था व लढाई या तिन्ही कसबांत ती प्रवीण झाली, ह्यांत कदाचित् कोणास आश्चर्य वाटणार नाहीं; कारण अशा बुद्धिमान् व्यक्ति इतिहासांत आपण पुष्कळ पाहतों. पण या गुणांबरोबर तिची

धर्मशीलता अलौकिक होती, हें पाहून खरोखरच आश्चर्य वाटतें. तिची धर्मावरची श्रद्धा आणि तिचा सदाचरणाविषयींचा कटाक्ष हे गुण लहानपणापासून स्पष्टपणें लोकांपुढें दिसूं लागले; आणि या गुणांमुळें ती सहस्रावधि ऐतिहासिक व्यक्तींच्या शिरस्थानीं अधिष्ठित झाली. तिच्या धर्मशीलतेचें तेज जो जो मनुष्य तिच्यासमोर किंवा तिच्या सांनिध्यास येई त्याजवर पडूं लागलें. तिचा स्वच्छंदी व नशेबाज नवरा सुद्धां तिच्या या धर्मशीलतेच्या तेजामुळें तिच्याशीं नमून वागूं लागला. अहल्याबाईची व नवऱ्याची ज्या दिवशीं गांठ पडे तेव्हां तो मोठ्या बेतानें राहात असे, आपले सर्व फंद बाजूस ठेवी; त्या दिवशीं अहिल्याबाईच्या येथील ताट त्याच्या भोजनास जात असे, इत्यादि वर्णन वाचलें म्हणजे अहल्याबाईच्या धर्मशीलतेच्या तेजाचें आश्चर्य वाटल्यावांचून राहात नाहीं.* तिच्या सद्गुणांचें व भावि कीर्तीचें खरें हृद्गत तिच्या या शापादपि व शरादपि सामर्थ्यांत होतें. तिच्या थोरवीचें खरें स्वरूप होळकरांच्या कैफियतकारांनीं एका लहान वाक्यांत नमूद केलें आहे. "अहल्याबाई पुण्यवान् व कारस्थानी, दोन्हीं अंगें एकसारखीं.–" या लहानशा वाक्यांत तिच्या खऱ्या मोठेपणाचें वर्णन त्यानें मार्मिक रीतीनें केलें आहे. जगतांत अशा व्यक्ति फारच थोड्या असतात. जो पुण्यवान् असतो तो कारस्थानी असत नाहीं; जो कारस्थानी असतो तो पुण्यवान् असत नाहीं. अशी स्थिति सर्व जगताच्या इतिहासभर आपल्यास सांपडल. आणि म्हणूनच असा जेथें अमानवी योग जमलेला दृष्टीस पडतो तेथें आपल्या लोकांत अवताराची कल्पना जागृत होते. अमानुष पराक्रम व अलौकिक नीतिमत्ता यांची दुर्मिळ जोड जेथें असेल तेथें ईश्वरांश कांहीं तरी जागृत आहे असा भास होणें साहजिक आहे. अशा प्रकारचा अवतार मानले जाण्याचा मान महाराष्ट्राच्या इतिहासांत दोघांच व्यक्तींस मिळाला

---

* या गोष्टीचें वर्णन केल्यावर पृष्ठ ७६ वर 'पुरुषोत्तमा'नें जे उद्गार काढले आहेत ते असंबद्ध दिसतात. त्यांचा अर्थ आम्हांस तरी लागत नाहीं. आधुनिक लोकांच्या सामाजिक स्थितीवर व कल्पनांवर या ग्रंथकर्त्यानें ठिकठिकाणीं टीका केली आहे ती असंबद्ध व वृथा वाटते एवढें आम्हांस येथें नमूद केल्यावांचून राहवत नाहीं. असे उद्गार या पुस्तकांत नसते तर फार बरें झालें असतें असें आम्हांस वाटतें.

आहे. त्या दोन्ही व्यक्ति या लहानशा सूत्रांत येतात. कारस्थानी व पुण्यवान् हीं दोन्हीं विशेषणें फक्त शिवाजी महाराज व अहल्याबाई यांसच लागू होतात; अर्थात् या दोघांसच हे देवाचे अवतार आहेत असें लोक मानूं लागले. शिवाजीमहाराजांस ज्याप्रमाणें लोक शिवाचा अवतार मानीत, त्याप्रमाणें अहल्याबाईस लोक अहल्येचा अवतार मानीत, हें सुप्रसिद्ध आहे. यांत नामसादृश्य मुख्यतः आहेच, पण गुणसादृश्यहि कारणीभूत कसें आहे याची फोड पुढें होईल. येथें एवढेंच सांगणें आहे कीं पुण्यवत्ता आणि कारस्थानीपणा हे दोन विरुद्ध गुण अहल्याबाईच्या ठिकाणीं होते, व त्या दोन्ही गुणांस प्रकाशित होण्यास मल्हाररावाचें स्नुषात्व तिच्याकडे आल्यानें अवसर सांपडला. मल्हाररावाच्या व त्याच्या सुशील व करारी बायकोच्या शिक्षणाखालीं हे गुण चरकावर चढले व तिच्यावर भावि आलेल्या आपत्तींमुळें ते गुण चांगलेच कसोटीस लागले. अहल्याबाईचें चरित्र म्हणजे तिच्या पुण्यवत्तेचें व कारस्थानीपणाचेंच वर्णन होय, असें पुढील हकीकतीवरून कोणाच्याही ध्यानांत येईल.

अहल्याबाईस संसारसुखाचा उपभोग थोडींच वर्षें लाधला असें म्हणण्यास हरकत नाहीं. स्त्रियांस मुख्य सुख म्हणजे सद्गुणी व स्वाधीन पति; तें सुख तिला बहुतेक नव्हतेंच. विवाहित स्त्रियांना पुत्रजन्म हें एक मोठें सौख्य असतें. तें तिला इ. स. १७४५ त मिळालें. तिला जो पुत्र झाला त्याचें नांव मालेराव ठेवलें. तिला नंतर एक मुलगी झाली, तिचें नांव मुक्ताबाई होतें. तिचें लग्न यशवंतराव फणसे या सरदाराशीं झालें. याप्रमाणें मुलगा, मुलगी व जांवई हीं स्त्रियांचीं तीन सौभाग्यें व सौख्यचिन्हें तिला प्राप्त झालीं. पण अहल्याबाईस संसाराचें सुख फार दिवस लाधलें नाहीं. इ. स. १७५४ त कुंभेरीच्या वेढ्यांत तिचा पति खंडेराव एका जंबुऱ्याच्या गोळीनें ठार झाला; आणि तिला वयाच्या २९ व्या वर्षीं वैधव्यदशा प्राप्त झाली.

यावेळीं अहल्याबाई सती जावयास निघाली यांत आश्चर्य नाहीं. तिच्या पुण्यवत्तेस व करारी स्वभावास हें तिचें करणें अनुरूपच होतें. पण अठरा वीस वर्षांच्या अनुभवानें राज्यास तिच्या जीविताची किती आवश्यकता होती हें मल्हाररावाच्या या वेळच्या शोकावरून व्यक्त होतें. पुत्रशोकानें तप्त झालेला म्हातारा उघडा बोडका होऊन तंबूबाहेर पडला होता.

त्यास जेव्हां अहल्येचा बेत कळला तेव्हां त्याचें धाबें पक्केंच दणाणलें. राज्याचा व संपत्तीचा बंदोबस्त अहल्याबाईनें इतका चोख ठेविला होता कीं, तिचें नाहींसें होणें म्हणजे राज्यावर एक भयंकर आपत्तिच येणें असें त्यास वाटलें. तो अगदीं गयावया झाला व अहल्येच्या ओटींत डोकें घालून आपल्या धनगरी भाषेंत म्हणाला:—"बाई, मला उन्हाळा करत्येस काय ? तूं माझ्या पाठीवर आहेस तर अहल्या मेली व खंडू जिवंत आहे हा मला भरंवसा ! माझी सारी दौलत व राज्य संभाळण्याचें काम तूंच माझा खंडू असें समजून तुझ्यापासून मी घेत होतों, व स्वतः उत्पन्नाचीच काळजी वाहत होतों ! माझें सारें सौभाग्य कायम ठेवणें तुझ्या हातीं आहे ! ह्या म्हाताऱ्याची तुला कींव येऊं दे !" अहल्याबाईनें म्हाताऱ्याचें म्हणणें ऐकिलें. तिच्या पश्चात् एक नऊ वर्षांचें मूल होतें, व तेंहि धड नव्हतें. ती सती गेली असती, तर मल्हाररावाच्या संपत्तीची व राज्याची अत्यंत अव्यवस्था झाली असती. म्हाताऱ्याच्या मर्जीसाठीं व राज्याच्या सुव्यवस्थेसाठीं तिनें आपला सती जाण्याचा बेत रहित केला. यांत तिनें आपली धर्मशीलता कमी केली असें मुळींच नाहीं. परोपकार हेंच तिनें आपल्या भावि आयुष्याचें कर्तव्य आपल्या मनांत कायम केलें; व विधवा स्त्री जिवंत राहिली असतां जें कडकडित व्रताचरण धर्मशास्त्रानें सांगितलें आहे तें तिनें आमरणान्त पाळण्याचा आपल्या हृदयाशीं निश्चय केला. खरोखर पाहिलें असतां सती जाणें एकवेळ सोपें आहे, पण वैधव्याचें धार्मिक व्रत आमरणान्त कडकडित रीतीनें पाळणें अत्यंत कठिण आहे. हें व्रत तिनें किती निश्चयानें शेवटपर्यंत पाळलें हें तिच्या भावि दिनचर्येवरून व्यक्त होतें. मोठेमोठे महादजी शिंद्यासारखे पाहुणे आले तरी तिचें प्रातः—स्नान, जप व पुराणश्रवण हें कधींहि टळलें नाहीं, व तिनें वनस्पत्याहार कधींहि सोडला नाहीं. यापुढें अनेक व्रतें वैकल्यें करून तिनें आपल्या शरीरास कृश व जर्जर केलें, व 'आसीदामरणात्क्षांता नियता ब्रह्मचारिणी' या मनुस्मृतीच्या आज्ञेप्रमाणें ती अक्षरशः वागली, हें महेश्वर दरबारच्या पत्रव्यवहारावरून चांगलें व्यक्त होतें.

मल्हाररावाच्या आज्ञेप्रमाणें राज्य संभाळण्याचें काम तिनें आपल्या अंगावर घेतलें, तें दहा वर्षांनंतर तिच्या अंगावर पूर्णपणें येऊन पडलें. इ. स. १७६५ त मल्हारराव एकाएकीं अलमपुराजवळ वारला. साहजिकच

राज्याचा वारस तिचा पुत्र मालेराव झाला. तो अगदीं वेडसर व दुष्ट असल्यानें पेशव्यांनीं त्यास सरदारीचीं वस्त्रें देतांना राज्याचा सर्व भार अहल्याबाईवर सोंपविला, हें उघड व रास्तच आहे. मालेरावही आपल्या दुष्टपणाच्या व वेडसरपणाच्या चाळयांत एका मनुष्याचा खून करून त्या खुनाबद्दल पश्चात्ताप करीत लवकरच मेला. तो पश्चात्तापच म्हणायाचा; कारण खून केलेला मनुष्य भूत होऊन आपला प्राण घेत आहे असें ओरडत ओरडत मालेराव मेला ! यावेळीं अहल्याबाईस फारच दुःख झालें. सर्व शोकांत पुत्रशोक फार कठिण आहे. पुत्र मूर्ख, वेडा, व्यसनी, त्रास देणारा कसाहि असला तरी मातेस तो नेहमीं हवाच असतो. त्याच्या मरणानें तिला जें दुःख होतें तें अमर्याद असतें. मालेरावास सरदारी मिळाल्यापासून एका वर्षाच्या आंतच त्याचा अंत झाला, यामुळें अहल्याबाईस अतिशयच दुःख झालें. त्यास संतान नसल्यानें मल्हाररावाचा सरळ वंश खुंटला, हें पाहून तिला अधिक दुःख झालें असावें. सारांश, तिच्या आयुष्यांतील सर्वांत दुःखद प्रसंग यावेळीं तिच्यावर कोसळला.

पण एवढ्यानेंच थांबलें नाहीं. हा प्रसंग तिच्या आयुष्यांतील खरोखरच सर्वांत अति कठिण प्रसंग झाला. श्री व स्त्री उघडी पडलेली पाहून भल्याभल्यांची अब्रू जाण्याची वेळ येते. गंगाधर यशवंत ऊर्फ गंगोबा तात्या मल्हाररावाचा आमरणान्त दिवाण, याशिवाय त्याजवळ कोट,–पाऊणकोट रुपया खासगी, पण द्रव्यतृष्णा व अधिकारतृष्णा कधींहि तृप्त होत नाहीं. उलट ती नेहमीं वाढतच असते हेंच खरें. गंगोबास ही संधि आपला अधिकार व द्रव्यसंचय वाढविण्यास त्यास चांगली वाटली. सरदारी बिनवारशी झाल्यानें खालसा करवावी किंवा कोणी अज्ञान मालेरावास दत्तक देऊन राज्य आपण चालवावें अशा दुष्ट वासनेनें त्यानें राघोबादादांकडे प्रेष लावला. राघोबाच्याहि तोंडास पाणी सुटलें. तो यावेळीं हिंदुस्थानांतच होता. राघोबानें इंदुरावर चाल केली. अहल्याबाईच्या तेजाची, कारस्थानाची व पुण्यवत्तेची यावेळीं पूर्ण परीक्षा झाली. व्यवहारदृष्ट्या व धर्मशास्त्रदृष्ट्या यावेळीं संस्थानाचें व सरदारीचें काय करावयाचें या बाबतींत अहल्याबाईचा विचार घेणें जरूर होतें. पण गंगोबा व राघोबा या दोघांनींहि परभारें बेत ठरवून तिच्यावर घाला घालण्याचा निश्चय केला. तो तीस समजतांच तिनें आपला शोक बाजूला ठेवला. मल्हाररावानें होळ-

करांचें राज्य तिच्या स्वाधीन केलें होतें; तें चालवण्यासाठीं तर तिनें सती जाण्याचें सुद्धां रहित केलें होतें. ही संपत्ति खासगी असती तर मल्हाररावाची सून व मालेरावाची आई या नात्यानें ती वारस होती. याशिवाय राज्याची व्यवस्था तिनें पहावी, व तुकोजी नांवाचा होळकरांच्या कुळांतील एक शूर मनुष्य मल्हाररावानें पुत्राप्रमाणें पाळला होता—इतकेंच नव्हे तर मरतांना त्यानें आपल्या अल्पवयी नातवाचे हात त्याच्या हातांत दिले होते—त्यानें सन्याचें काम करावें, असें ठरलें होतें. मालेराव पिशाच्चवत् होता हें मल्हाररावास ठाऊक होतें, व त्याच्या पश्चात् किंवा त्याच्या नादानींत सरदारीची व्यवस्था कशी चालवावी हें वरप्रमाणें त्यानें ठरविल्यासारखें होतें. सारांश सरदारीची तजवीज ठरलेली असून हा गंगोबा—राघोबांचा कुटिल प्रयत्न केवळ लोभमूलक होता हें निःसंशय आहे. तो तिनें सिद्धीस जाऊं दिला, नाहीं. तिनें पेशव्यांच्या इतर सरदारांस म्हणजे शिंदे, भोंसले, पवार, गायकवाड इत्यादिकांस पत्रें पाठवून आपल्या मदतीस बोलाविलें. मल्हाररावाचा ज्यावर उपकार नव्हता, असा एकही सरदार नव्हता. याशिवाय आज हा माझ्यावर प्रसंग, उद्यां तुमच्यावर येईल' असा तिनें निरोप पाठविला. दुसरें, आपली फौज तयार करून तुकोजी उदेपूरच्या मसलतीवर होता तेथोन त्यांस ताबडतोब बोलाविलें. व तिसरें, माधवराव पेशव्यांच्या न्यायप्रियतेवर तिचा भरवंसा होता व त्याजवर होळकराचे उपकारहि होते. राघोबाच्या कैदेंत असतां त्यास मल्हाररावानें म्हणजे अहल्याबाईनेंच पैका पुरविला होता—त्याजकडे तिनें आपलें गाऱ्हाणें नेलें. सारांश, स्वतांच्या हिमतीनें व मित्रांच्या साह्यानें तिनें राघोबा—गंगोबास नामोहरम केलें. "तुम्हीं फौजेसुद्धां इंदुरास याल तर तलवार चालेल" असा राघोबास तुकोजीचा निरोप पोहोंचतांच त्याचे डोळे उघडले. त्यास विरुद्धपक्षाची सर्व तयारी समजली, तेव्हां तोंडघशीं पडल्यासारखें होऊन त्यानें शेवटीं, आम्ही मातंपुरशीस म्हणजे दुखवस्यासाठीं येत आहों असा बहाणा केला. "असें असेल तर एकटे या, आम्ही आपले नोकर आहोंत" असा त्यास तुकोजीकडोन जाब मिळाला. त्याप्रमाणें त्यानें शेवटीं सोंगाची बतावणी केली व अखेरीस माधवराव पेशव्याच्या हुकूमाप्रमाणें तुकोजीस सरदारीचीं वस्त्रें देऊन, तुकोजीनें लष्करची नोकरी करावी व अहल्याबाईनें राज्य करावें अशी पूर्वींचीच व्यवस्था कायम केली व तो इंदूर सोडून निघोन गेला.

इंदूर संस्थानावर आलेलें संकट याप्रमाणें अहल्याबाईनें आपल्या तेजस्वितेनें व कारस्थानीपणानें टाळलें. तिची अगाध पुण्यशीलता याच वेळेस व्यक्त झाली असा आमचा अंदाज आहे. मल्हारराव होळकरानें आपल्या हयातींत १५।१६ कोटींचा ऐवज जमा केला होता अशी समजूत आहे. गंगोबा तात्याजवळ कोट पाऊण कोट रुपया खाजगी होता हें जर खरें धरलें तर त्याचा यजमान मल्हारराव याजवळ एवढा पैसा असणें अशक्य नाहीं. मल्हाररावाच्या कंजूष स्वभावामुळें व त्याजला लुटीच्या व भेटीच्या अनेक अमोल संध्या मिळाल्यानें त्यानें अपार संपत्ति जमा केली होती ही गोष्ट खरी दिसते. त्या संपत्तीपैकीं कांहींतरी भाग अहल्याबाईनें आपल्यास द्यावा असा राघोबाचा हेतु होता. पण या पैशावर मी तुळशीपत्र ठेविलें आहे असा अहल्याबाईनें त्यास जबाब दिला. शेवटीं या बाबतींतहि निराश होऊन राघोबानें 'तुम्ही खुशाल धर्म करा, आम्ही पैका अन्यत्र मिळवूं,' असा तिला निरोप पाठविला, अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. ही आख्यायिका खरी आहे असा आमचा पक्का समज आहे. अहल्याबाईनें जो प्रचंड दानधर्म सर्व हिंदुस्थानभर केला व ज्याचीं स्मारकें अद्याप हयात आहेत त्यांस लागणारा ऐवज तिनें कोणीकडून खर्च केला? तिनें संस्थानच्या उत्पन्नांतून खर्च केला नाहीं हें उघड आहे. ती हिशेबांत इतकी चोख असे कीं संस्थानच्या जमाखर्चाचा खर्डा पेशव्याकडे पाठवी त्यांत हा खर्च तिनें दाखविला असता, तर नानानें व तुकोजीनें तीस कधींच हटकलें असतें. याच पैशाच्या लोभानें आणखी तिघां ब्राह्मणांनीं तिच्यावर कारस्थानाचें शस्त्र चालविलें (प्रत्यक्ष शस्त्र चालविलें नाहीं) असें आम्हांस वाटतें. हरिपंततात्या फडके, नारो गणेश व नाना फडणीस हे तिघेहि याच समजास बळी पडून त्यांनीं तिच्याशीं त्यांचा हात चालला तेव्हां विरोध केला असें दिसतें. अहल्याबाईजवळ कांहींतरी प्रचंड खजिना आहे असें त्यांस वाटे व ती एवढा दानधर्म करते तो कोठून करते याचें त्यांस गूढ पडे असें दिसतें. महेश्वर दरबारच्या पत्रांवरून तुकोजीचें व अहल्याबाईचें भांडण यामुळेंच होतें असा अंदाज आहे. भाग एक, पान २६, यांतील खालील मजकूर मनन करण्यासारखा आहे.

"तुकोजी होळकर इंदुरास आल्यावर लोकांचे समजाविशीस कांहीं मागणार. आधीं तो सुलतानजी लांबहाते मातबर मनुष्य. उभयपक्षीं आप्त.

त्यास बाईकडे पाठवून विचाराच्या वाटेनें बाईस चार गोष्टी सामोपचारें सांगून अर्थ साध्य होय तो अर्थ करावा. ज्यापक्षीं बाई ऐकेनातच, त्यापक्षीं जेणेंकरून बाईजवळील जडपेड आपले हातीं लागे ते समयोचित प्रसंग करावे, अशा आवाया येथें कितीक प्रकारें ऐकिवांत येतात. ते अर्थ बाई गोविंद कृष्ण यांशीं एकांतीं बोलली जे, ' मागें माझे विद्यमानें दौलतीचा महालमुलकी कारभार मीं केला आहे. त्याचे हिशोब सर्व कारकुनाजवळ आहेत. दिवाणागरीस माझेजवळ नागो गणेश यांचे भाचे मुकुंदराव आहेत. आपला हिशोब पाहावा. यांचे दौलतीच्या जमेंतील एक कवडी मजकडे लागली, तर एक कवडीच्या पांच कवड्या देईन. मी आपले पोटें अन्न भक्षितें तें दुर्खाल याचें नाहीं. असें असतां यांणीं आम्हांभोंवतें विपर्यासकर्मच आरंभिलें, तर दारुगोळा मजजवळहि सिद्धच आहे. ”

हा सन १७८० मधील प्रसंग आहे. त्याचें वर्णन पुढें करावयाचें आहे. पण वरील उताऱ्यावरून एवढी गोष्ट स्पष्ट दिसते कीं, सन १७६६ त सर्व राज्याचा कारभार तिच्या हातांत आला तेव्हांपासून सन १७८० पर्यंत चौदा वर्षांत दौलतीचा कवडीनकवडी हिशोब तिच्यापाशीं होता तो नानाफडनिसासारख्या हिशोब जाणणाऱ्यापुढें टाकण्यास तिला कधींच भीति वाटली नाहीं. तिनें राज्य इतक्या निरपेक्ष रीतीनें चालविलें होतें कीं दौलतींतील एक कवडीहि तिनें आपल्याकडे खर्च केली नाहीं. ती खात होती तेंहि दौलतीचें नव्हतें. मग ती आपला धर्म दौलतींतून कसा करील? सारांश, तिणें जो प्रचण्ड दानधर्म हिंदुस्थानभर केला तो दौलतींतून नव्हे, तर तिच्याजवळ दौलतीव्यतिरिक्त मल्हाररावाची जी संपत्ति होती तींतून तिनें धर्म केला असें दिसतें. बायजाबाई शिंदे इनेंहि अहल्याबाईचें अनुकरण करून असाच पुष्कळ दानधर्म केला; किंबहुना मरतांनाहि तिणें जें द्रव्य जयाजी महाराजांच्या स्वाधीन केलें, त्याचाहि विनियोग दानधर्माकडे करण्याविषयीं त्यांस तिनें आज्ञा केली होती व त्याप्रमाणें त्यांनीं दानधर्म केला असें ऐकिवांत आहे. सारांश मल्हाररावाच्या खासगी संपत्तीचा अहल्याबाईनें धर्मार्थ विनियोग केला ही आख्यायिका खरी व विश्वसनीय दिसते.

पंधरा सोळा कोट रुपयांच्या द्रव्यावर अहल्याबाईनें तुळशीपत्र ठेविलें हें तिचें कृत्य खरोखर विलक्षण दानशीलतेचें होय. आजवर इति-

हासांत एवढा दानधर्म कोणीं केल्याचें आम्हांस स्मरत नाहीं. कदाचित् राघोबाच्या प्रसंगांतून राज्य व खजिना वांचल्याबद्दल तिला आनंद झाला असेल, किंवा उद्वेगाच्या तडाक्यांत तिनें त्या खजिन्यावर तुळशीपत्र ठेविलें असेल, अशी कोणाच्या मनांत शंका येईल. तरी सुद्धां हा निश्चय तिनें शेवटपर्यंत सिद्धीस नेला ही गोष्ट आश्चर्यकारक आहे. स्मशानवैराग्य फार थोडा वेळ टिकतें हा सर्वत्र अनुभव आहे. एवढी अपार संपत्ति तिज-जवळ असूनहि तिची धर्मशीलता काडीभर ढळली नाहीं हें नवल होय. दहापांच हजार रुपये जवळ असले तर साधारण मनुष्य किती उन्मत्त होतो व बदफैलीपणा करतो हें आपण नेहमीं पाहतों. राज्य व संपत्ति हातीं आली असतां मनुष्य किती बेफाम होतो याचें उदाहरण होळकरांच्याच वंशांत अहल्याबाईनंतर थोड्याच वर्षांत तुळसाबाईच्या वेळेस दृष्टीस पडलें. सारांश, अहल्याबाईची पुण्यवत्ता व धर्मशीलता अगाध होय हेंच खरें.

अपार संपत्ति व स्वतंत्र राज्य या उन्मादक वावटळींनीं तिची मेरू-सारखी धर्मशीलता हलली नाहीं. अशा स्थितींत मनुष्यास बहुधा अनन्वित सुखोपभोग सुचतात. काम, क्रोध व लोभ यांच्या कचाटींत राजे लोक सांपडले नाहींत असें बहुधा होत नाहीं. तपाअंतीं राज्य आणि राज्याअंतीं नरक, अशी जी आपल्या लोकांत समजूत आहे ती अनेक राजेलोकांच्या वर्तनावरूनच झालेली आहे. राज्यावर येऊनहि ज्यांचें तप कायम राहिलें त्याच विभूति धन्य होत. अशा धन्य विभूतींमध्यें अहल्याबाई अग्रणी होती. तिणें अतुल तप केलें होतें म्हणून ती राज्यावर आली होती. पण राज्या-वर असतांही तिनें आपली तपश्चर्या चालूच ठेविली; आणि म्हणूनच तीस लोक अहल्येचा अवतार मानतात. रा. देव यांस "या अवतारकल्पनेंत मोठेंसें स्वारस्य आहे असें वाटत नाहीं." व त्यांनीं त्या दोघींमधील अंतर बऱ्याच विस्तारानें विस्तारांतील एका लेखांत दाखविलें आहे.* हा त्यांचा लेख वाचून "अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख" असें कोणासहि वाटल्यावांचून राहणार नाहीं. पौराणिक अहल्या राज्यावर कोठून असणार? आणि तिचें पाऊल वांकडें पडलें होतें तसें अहल्याबाईचें नव्हतें हें उघड आहे. पण असें असूनहि गोतमपत्नी अहल्या पांच पतिव्रतांच्या मालिकेंत प्रातःस्मरणांत येते हें ते विसरले काय? असो, मुख्य दोघांमधलें साम्य जें

* वि० ज्ञा० विस्तार, पु० ३६ अं० ९.

दीर्घतप त्याजकडे रा. देवांची दृष्टि गेली नाहीं आणि अशा बुद्धिवान् व माहितगार लेखकानें या हजारों लोकांच्या कल्पनेची अशी पारख केली हें केवळ आमचें दुर्दैव होय. अहल्याबाईनें राज्यावर असूनहि उग्र तप केलें ही अत्यंत आश्चर्याची गोष्ट होय आणि यामुळेंच तिला लोक पौराणिक अहल्येचा अवतार समजतात.

असो, मल्हाररावाच्या १५।१६ कोटी रुपयांच्या शिल्केंतून अहल्याबाईनें जो प्रचण्ड धर्म सर्व हिंदुस्थानभर केला तो चिरस्थायी स्वरूपाचा केला हें लक्षांत घेण्यासारखें आहे. यांतहि तिचें शहाणपण दिसून येतें. केवळ ब्राह्मणभोजनांत हें द्रव्य तिनें उडविलें नाहीं किंवा साधुसंतफकिरांकडून एकदम लुटविलें नाहीं. सर्व हिंदुस्थानच्या लोकांस तिनें दानधर्म स्थायि स्वरूपाचा केला. विशेषतः हिंदुधर्माच्या पवित्र ठिकाणीं तिनें मोठमोठ्या इमारती बांधविल्या व गरीबगुरिबांची व यात्रेकरूंची अन्नपाण्याची सोय केली. अमुक पुण्यक्षेत्रांत अहल्याबाईच्या धर्मानें उत्पन्न झालेली इमारत किंवा धर्मसंस्था नाहीं असें नाहीं. त्यांत काशी, प्रयाग, गया, हरिद्वार, अयोध्या, रामेश्वर इत्यादि ठिकाणीं तिनें बांधविलेले घाट व मंदिरें आहेत तीं प्रसिद्ध आहेत. गयेचें विष्णुपदाचें देवालय, सोमनाथाचें देवालय व रामेश्वराचें देवालय हीं तिनें बांधलेलीं असून तीं फार सुंदर व प्रचण्ड कामें आहेत. यांपैकीं आह्मीं गयेचें देऊळ प्रत्यक्ष पाहिलें आहे व त्याची प्रशंसा यथार्थ आहे. हीं सर्व कामें तिचा विश्वासू व तिच्याचसारखा पुण्यशील व पापभीरु कारभारी गोविंदपंत गानु याच्या हातून झालीं असें वाटतें. *असा मनुष्य न मिळता तर इतक्या दूर दूर ठिकाणीं अशीं कामें अशा तऱ्हेनें झालीं नसतीं. असो, महेश्वर दरबारच्या बातमीपत्रांतील एक उल्लेख येथें देण्यासारखा आहे. नाशकास रामकुंडाचें काम श्रीमंत गोपिकाबाई पेशवीण येथें राहावयास गेली होती तिनें करविलें होतें; पण तें बेताचेंच होतें. तें काम चांगलें करावें अशी अहल्याबाईस इच्छा झाली; पण त्या कामास गोपिकाबाईच्या परवानगीची जरूर होती. ती तिनें मिळविण्याचा प्रयत्न केला. गोपिकाबा-

* म. द. बा. पत्रें भा. २ पा. ८३ वरून समजतें की गोविंदपंत गानु खासगी कारभारी हा इ. स. १७८५ त गयेच्या देवळाची व काशीतील घाटांची अर्चा करण्यासाठी गेला. यावरून हेंही सिद्ध होतें की ह्या दानधर्माचें काम बाईच्या खाजगींतून होत असे, दौलतींतून नसे. दौलतीचा दिवाण मुकुंदराव हरी होता.

ईहि एक तेजस्वी व करारी बाई असल्यानें तिची परवानगी मिळाली नाहीं. या दोघां तेजस्वी व तपस्वी बायांचा हा संबंध आलेला पाहून एक प्रकारचें कौतुक वाटतें. असो, अहल्याबाईनें बांधविलेल्या देवळांची, घाटांची, व इतर इमारतींची तसेंच तिनें चालविलेल्या अन्नछत्रांची व इतर धर्मकृत्यांची यादी कोणी तयार करील तर या पुण्यात्म्या बाईनें सर्व हिंदुस्थानभर किती, कसा व कधीं दानधर्म स्थायिस्वरूपाचा केला याचें चित्र वाचकांच्या समोर उभें राहील. अशी यादी होळकर सरकारच्या हुकुमावरून त्यांचा कोणी विद्वान् कामदार तयार करूं शकेल असें ( पुरुषोत्तमाच्या विरुद्ध ) आम्हांस वाटतें.

अहल्याबाईच्या दानधर्माचें आह्मी येथवर सविस्तर वर्णन केलें. तिच्या कारकीर्दीच्या प्रारंभींच तिची पुण्यवत्ता व तिचा कारस्थानीपणा कसा व्यक्त झाला हें या सविस्तर हकीकतीवरून कळेल. पहिल्या रात्रींच बिल्ली मारल्याच्या गोष्टीप्रमाणें या प्रथम सलामींतच तिची जी छाप बसली ती तिच्या सर्व आयुष्यभर कायम राहिली. रघुनाथरावास तिनें नामोहरम करून परतवलें व आपलें राज्य सांभाळलें. तेव्हांपासून म्हणजे इ. स. १७६६ पासून तों ती मरेपर्यंत—म्हणजे इ. स. १७९५ पर्यंत २९ वर्षें तिनें राज्याचा कारभार स्वतंत्र केला. त्यांत हीच तिची पुण्यवत्ता व हाच तिचा कारस्थानीपणा सारखा दिसून आला. तिच्या कारकीर्दीच्या गुणांचें वर्णन करावयाचें म्हणजे पहिली सांगण्याची गोष्ट ही कीं, राज्य प्रजेच्या सुखाकरितां करावयाचें, आपल्या सुखाकरितां परमेश्वरानें तें आपल्यास दिलें नाहीं, ही जी उच्च भावना नामांकित राजांच्या ठिकाणीं असते ती अहल्याबाईच्या ठिकाणीं सदैव जागृत असे. प्रजेचें काम पाहण्याकरितां निरसलपणें ती रोज कचेरींत बसे. प्रजेस यथायोग्य न्याय देण्यासाठीं ती मनापासून झटे व त्यांचा तंटा बहुधा पंचायतीनें तोडी. प्रजेवर कोणी जुलूम करूं लागला तर त्यास ती तात्काळ शिक्षा देई. प्रजेपासून तिणें कराशिवाय अन्यरीतीनें कधींहि पैसा घेतला नाहीं. मराठी राज्यांत जमिनीवरचा कर मुख्य असे, तो तिणें फार माफक ठेविला होता. जमिनीचा महसूल घेण्याची पद्धति तिणें नवी सुरू केली. राज्यांत चोरा—चिरटांचा बंदोबस्त तिणें पक्का केला. कोणास शासन द्यावयाचें तें ती कडक देत नसे. प्राणांतिक शिक्षा तर ती सहसा देत नसे, पण प्रसंगविशेषीं तिणें प्रजेच्या हितासाठीं कित्येकांस तोफेच्या तोंडींहि दिलें आहे. राज्य करणाऱ्याचें हृदय जसें नेहमीं मृदु

पण कधीं कधीं कठोर असावयास पाहिजे त्याप्रमाणें तिचें होतें. सारांश, राज्य करण्याच्या ज्या ज्या उत्तम व्यवस्था आहेत त्या त्या सर्व तिला माहीत होत्या इतकेंच नव्हे तर त्याप्रमाणें वागण्याविषयीं तिच्या मनाच्या ठिकाणीं सामर्थ्य व निग्रह होता. सारांश, तिच्या राज्यांत रामराज्याचें सुख नांदत होतें असें म्हटलें असतां चालेल. तिच्या राज्यांत जें सुख होतें तें नाना-फडणिसाच्या अमलाखालीं पुण्यास नव्हतें, असें आम्हांस नमूद करण्यास शंका वाटत नाहीं. नानाफडणीस सर्व तऱ्हेनें शहाणा व त्यानें मराठी राज्य कमालीनें संभाळलें ही गोष्ट खरी. पण तुलनेंत नानाचें पारडें अहल्याबाईच्या पारड्याहून वरच जाईल. पुण्यांतील या वेळच्या अव्यवस्थेसंबंधानें खुद्द अहल्याबाईनें प्रतिकूल उद्गार काढल्याचें या पत्रसंग्रहांत वर्णन आहे. त्यांतील एक उतारा येथें दिल्यावांचून राहवत नाहीं. नानाफडणीसाच्या वेळेस श्रीमंत नानासाहेबांच्या काळापेक्षां पुण्याची स्थिति वाईट झाली होती हें प्रत्येकास त्यावेळीं वाटत होतें प्रजेच्या कल्याणाकरितां मला राज्य मिळालें आहे ही भावना शिवाजीमहाराजांस तर होतीच, पण त्याच्यानंतर मराठी राज्यांत अहल्याबाईच्या ठिकाणीं व तिच्या खालोखाल श्रीमंत नानासाहेब पेशव्यांच्या ठिकाणीं ती दृष्टीस पडते. पान १५७–१५८ वर अहल्याबाईचे व तिच्या दरबाऱ्यांचे उद्गार नमूद आहेत ते असे:—

"कोणी आपले आप्ताजवळ बाई बोलत होती जे, 'धनी प्रबुद्ध नाहीं. दरबारांत कोणी समविषम गोष्टी सांगतो तेंच प्रभूस सत्य भासतें. खऱ्या लटक्याची छान नाहीं. आदिपश्चादीचा विचार राहिला नाहीं. अब्रूच्या मनुष्याची अब्रू राहणें कठीण.' ...जवळ कोणी एक दोन भले मनुष्य होते त्यांनीं उत्तर केलें जे, 'श्रीमंत कैलासवासी नानासाहेब भाऊ साहेबापासून श्रीमंत रावसाहेब अखेरपर्यंत दुनिया यथास्थित पर्यंत नांदली. प्रस्तुत पुण्याच्या खबरा ऐकितों. आपल्याहि कानावर आल्या आहेत. कोणाची घरलूट, वाड्यास खाणत्या लावतात. अनेक रीतींच्या खपल्या जुन्या काढून लोकांजवळून दंडद्रोह करतात. जेथें गाऱ्हाणें सांगावयास जावें तेथें अशी रीत झाली. तिकडे हैदरनाईकानें ब्राह्मणांचीं ( अग्रहारें ) लुटलीं. एकुण काळ कठिण आला."

हे तत्कालीन उद्गार अगदीं अलिप्तपणाचे आहेत. म्हणजे कोणी आपल्या नुकसानीमुळें, रागानें किंवा द्वेषानें काढलेले नाहींत. याजवरून

सर्व हिंदुस्थानांत अहल्याबाईच्या राज्यांत या वेळीं सुख नांदत होतें हें उघड दिसतें. 'पुरुषोत्तमा' नें अहल्याबाईचें राज्य म्हणजे सत्ययुगाचें राज्य असें जें म्हटलें आहे तें यथार्थ होय. पुण्यांत जसा नाना फडणिसाच्या वेळीं धाशीराम कोतवाल उन्मत्त झाला होता तसा अहल्याबाईच्या वेळीं कोणीहि अधिकारी प्रबल झाला नाहीं. राज्यकर्त्यांचें हें एक मोठें सावधगिरीचें, शहाणपणाचें व मनोनिग्रहाचें लक्षण होय कीं, कोणत्याहि अधिकाऱ्याच्या ताब्यांत त्यानें जातां कामा नये. अहल्याबाईवर कोणाचाही पगडा नव्हता ही गोष्ट या बातमीपत्रांतून फारच नामी दिसते. ती सर्व मुत्सद्यांपासून सल्ला घेई पण आपल्या मर्जीनुरूप गोष्ट करी; आणि जी करी ती केवळ निर्लोभतेनें, न्यायानें व प्रजाहिताच्या दृष्टीनें करी, यामुळें तिच्या कारकीर्दीत राजवल्लभांचें बंड कधींहि माजलें नाहीं. तिची कारकीर्द केवळ शांततेची व सुखाची झाली, आणि म्हणूनच तिच्या कारकीर्दीस कलियुगांतील रामराज्य ही उपमा यथार्थ साजली.

पण हें तिचें सत्ययुगांतील राज्य चारी बाजूंनीं कलियुगांतील राज्यांनीं वेष्टिलेलें होतें ही गोष्ट विसरतां कामा नये, किंबहुना खुद्द अहल्याबाई कधींहि विसरली नाहीं. दुष्टांचीं दुष्ट कारस्थानें ती पक्की ओळखून असे व तीं हाणून पाडण्याचें सामर्थ्य व शहाणपण तिच्या अंगांत होतें. मुख्यतः राज्य केवळ धर्मावर चालत नाहीं, त्यास सैन्यबलाचा पाठिंबा पाहिजे, हें तत्त्व तिला पूर्णपणें अवगत होतें. तिच्या न्यायीपणाचा व धर्मशीलतेचा पगडा सर्वांवर पडे ही गोष्ट जरी खरी आहे तरी ती केवळ त्यांजवरच अवलंबून नव्हती हें उघड आहे. राज्याला बलाची आवश्यकता आहे हें राजनीतीचें तत्त्व तिला पूर्णपणें माहीत होतें. तिणें चोरापासून नारळ बचावण्याकरितां नारळाच्या झाडास सोवळें गुंडाळण्याचा वेडेपणा कधींहि केला नाहीं. तिनें आपले अन्तःस्थ व बाह्य शत्रु बलाच्या जोरावरच वांकविले. दोनदां चंद्रावतांचें बंड मोडून तिणें नानाफडणिसापासून सुद्धां " शापादपि शरादपि सामर्थ्यवान् " असे आपल्याविषयीं उद्गार काढविले. तुकोजीच्या भांडणांत तिनें नानांचें कारस्थान कसें लंगडें पाडलें तें आपणास पुढें पहावयाचेंच आहे. पण महादजीचा कारभारी, मित्र व मसलतगार राणेखां भाई यानें नानांस जें त्यावेळीं सांगून पाठविलें तें येथें मनन करण्यासारखें आहे. " तुम्ही म्हणाल कीं चारपांच हजार मनुष्य पाठवून

बाईस स्वस्थ बसवूं, तर तसें होणें नाहीं. बाईजवळहि दोन जागा मजबूत आहेत व हिमत व द्रव्य आहे. तेव्हां सामोपचाराच्या विचारानेंच जें होईल, तें करावें" असा त्यानें नानांस व तुकोजीस निरोप पाठविला. "मजजवळहि दारुगोळा आहे" हे बाईचे उद्गार पूर्वीं दिलेलेच आहेत. अहल्याबाई कधींहि या बाबतींत गाफिल नव्हती हें या पत्रव्यवहारावरून चांगलें व्यक्त होतें. तिनें मालेराव मेल्यानंतर इंदूर सोडून आपल्याच राज्यांतील महेश्वराच्या पुण्य-क्षेत्रांत नर्मदातीरीं क्षेत्रवास आमरणान्त पत्करला व तेथूनच ती राज्य करीत असे, हें प्रसिद्ध आहे. त्या ठिकाणीं महेश्वरच्या किल्ल्याची तयारी तिनें नेहमीं जय्यत ठेविली होती. किल्ल्यांत कोणी सरदार अधिक माणसें घेऊन येईल हें तर कधींच झालें नाहीं. एवढा महादजी, तुकोजी तर प्रत्यक्ष होळकर संस्थानचा मालक, पण त्यांसहि तिनें जास्ती जमाव घेऊन कधीं किल्ल्यावर येऊं दिलें नाहीं. तिच्या परवानगीवांचून कोणी नर्मदा उतरून इकडे येईल असेंहि कधीं झालें नाहीं. सारांश, तिनें राज्य चालविलें. तें धर्म व नीति यांस धरून चालविलें, पण त्यास सैन्याच्या बलाचा योग्य पाठिंबा देण्यासंबंधानें ती कधींहि निष्काळजी राहिली नाहीं, हें लक्षांत ठेवलें पाहिजे.

राज्याच्या बळकटीस फौजेची किती अवश्यकता आहे याजविषयीं अहल्याबाईनें नानाफडणिसासहि दोनचार वेळां समजाविलें होतें, ही गोष्ट या पत्रव्यवहारावरून दिसते.

भाग १, पा. २१—"अहल्याबाई दोनचार वेळां बोलली जे, श्रीमंत फौजेची उपेक्षा करतात. परंतु गोष्ट कार्याची नाहीं. फौज चांगली पंचवीस तीस हजार जवळ असावी. हे चहूंकडून गडबड उडाली आहे... आपण आपल्या फौजेनिशीं बळकट असावें."

भाग १, पान ६८. महादजी शिंदे पेशव्यापासून मदतीच्या मोबदल्यांत अशरीचा किंवा नगरचा किल्ला मागूं लागले. या विषयासंबंधानें—

"बाई बोलली जे, श्रीमंताचें असें व्हावें आणि यांनीं या अटी घालाव्या. वसईस इंग्रजांचा शह पडला आहे. त्या स्थळास उपद्रव करतात, आणि यांस श्रीमंतांच्या घरांत काय आहे तें घेण्याची हांव सुटली आहे, असा जमाना आला! बाई बोलली जें श्रीमंतांनीं कांहीं न केलें. संग्रहींची फौज व हुजुरात तोडली! असो, भगवादिच्छा!"

हे अहल्याबाईचे उद्गार ऐकून तिच्या पुण्यवत्तेची किंवा शहाणपणाची कशाची अधिक तारीफ करावी हेंच समजत नाहीं. महादजीनें जो लाभ या प्रसंगीं दाखविला त्याचा तिला जितका तिरस्कार आला तितकाच नानाच्या वेडेपणाचा तिला उद्वेग वाटला. नानाच्या राज्यधोरणावरची अहल्याबाईची ही टीका खरोखर मननीय आहे. नानानें फौजेकडे कां दुर्लक्ष केलें याचें गूढ आम्हांसहि आहे. कदाचित् गारद्यांनीं गाढवपणा केला, हिंदुस्थानी लोकांस दक्षिण्याविषयीं प्रेम व आदर नसता व वेळेवर ते अनावर होतात, इत्यादि कल्पनांनीं त्यांनीं गारदी तोडले असतील. पण हुजुरातहि कमी कां केली हें समजत नाहीं. नाना फडणीस केवळ मुत्सद्दी, राज्यधोरणाच्या अंगांपैकीं फौजी अंग त्यास कमी, असेंच आम्हांस वाटतें. कदाचित् नानास असेंहि वाटलें असेल कीं 'शिंदे, होळकर, पटवर्धन यांच्या सरंजामी फौजा आहेत त्या आमच्याच आहेत. त्यांस प्रसंगीं बोलावण्याचा आमचा हक्क आहे.' पण हक्कांचा हक्कपणा बळाच्या पाठिंब्यावर अवलंबून असतो हें तत्व राजकारणी पुरुषांनीं कधींहि विसरतां कामा नये. Right ला Might ची जोड नसेल, तर तो कागदांतच किंवा कल्पनेंतच राहतो. साधारण व्यवहारांत सुद्धां हा नियम अबाधित आहे; मग राजकारणांत तर आहेच आहे यांत शंका नाहीं. माझा हक्क अमुक एका मनुष्यापासून त्याच्या कराराप्रमाणें पैसा घेण्याचा आहे, तो सरकारी तोफांच्या जोरावर अखेर अवलंबून आहे, हें विसरतां कामा नये. त्या अमक्यानें रुपये न दिले तर मी कोर्टांत फिर्याद करीन अशी मी त्यास धमकी देतों. कोर्ट डिक्री करून हुकूमनामा देईल व बेलिफ हुकुमनाम्याची बजावणी करील. पण बेलिफाची ही शक्ति कशावर अवलंबून आहे ? त्याच्या मागें सरकारच्या सर्व सैन्यबलाचा पाठिंबा आहे हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. सारांश, Right अथवा हक्क ( हे शब्द दोन्ही भाषांत सत्यार्थींच आहेत. ) बलावर अधिष्ठित आहेत. त्या बलाची नानानें कां उपेक्षा केली ? इंग्रजांच्या मुकाबल्यासाठीं त्यानें शिंद्यास हक्कानें बोलाविलें. पण नानाच्या बोलावण्यामागे सामर्थ्याचा पाठिंबा नसल्यामुळें शिंद्यानें हक्कास न जुमानतां अशीरचा किल्ला मागितलाच ना ? भाऊसाहेबांस हें राजकीय तत्त्व पूर्ण माहिती होतें. भाऊसाहेबांचा हुकूम सरदार मानीत होते हें जितकें सरदारांचे वांपु-

लपणावर अवलंबून होतें तितकेंच भाऊसाहेबांजवळ हुजरात व तोफखाना कोणत्याहि सरदारास चिरडून टाकण्याइतका जय्यत होता या गोष्टीवरहि अवलंबून होतें. सारांश, पुण्यास पेशव्याजवळ यावेळीं खास हुजरात व कवायती फौज पंचवीस तीस हजार पावेतों—अहल्याबाईनें म्हटलें त्याप्रमाणें—जरूर पाहिजे होती. पूर्वीच्या हंगामी फौजांचा काळ जाऊन ठाणबंदी कवायती फौजांचा काळ येऊन पोहोंचला होता, ही गोष्ट नानाच्या लक्षांत आली नाहीं. युरोपांत काय आणि आशियाखंडांत काय, सुमारें अठराव्या शतकाच्या मध्यापासून जुन्या शिलेदारी किंवा हंगामी फौजांचा काळ बदलून standing disciplined armies चा काळ सुरू झाला. ह्या गोष्टींत ज्यानें कसूर केली तो अखेरीस मारला गेला. फ्रेडरिक धी ग्रेटच्या Military Genius अथवा फौजी बुद्धिमत्तेची दूरची गोष्ट पाहण्याची जरूर नव्हती. नानाच्या पुढें प्रत्यक्ष उदाहरणें होतीं. इंग्रज व फ्रेंच लोकांच्या गारदी फौजांनीं काय पराक्रम केले हें त्याच्यासमोर प्रत्यक्ष घडत होतें. भाऊसाहेबांनीं ही गोष्ट पाहूनच तो कित्ता तावडतोब उचलला होता, आणि मोंगलास दक्षिणेंत जेर केलें—इतकेंच नव्हे तर अहमदशाह अबदालीसही पानपतावर चांगलाच हात दाखविला होता. महादजी शिंद्यानेंहि तीच गुरुकिल्ली घेतली होती, व तुकोजी व अहल्याबाईनेंहि ती शक्त्यनुसार उचलली होती. राठोडांस व कछवायांस जें महादजीनें जेर केलें तें केवळ कवायती फौजा व तोफखाना यांच्या जोरावर. एरव्हीं ते कट्टे शूर लढवय्ये रजपूत मराठ्यांस हार जाते असें वाटत नाहीं. अहल्याबाईनेंहि चंद्रावतांस व झाबवेवाल्यास जेर केलें, तें तोफांच्या जोरावर. सारांश, हें प्रत्यक्ष पाहत असतां नानाफडणिसानें कवायती फौज व तोफखाना किंबहुना एकंदर फौज यांकडे दुर्लक्ष केलें ही मोठी चूक केली असें अहल्याबाईस वाटलें, व तसेंच आम्हांसहि वाटतें. रजपुतांनीं व पुण्याच्या मराठ्यांनीं या नवीन सुधारलेल्या फौजी पद्धतीचा अंगीकार केला नाहीं यामुळें ते दोघेहि रसातळास गेले, ह्याची साक्ष त्यांचा इतिहास देत आहे. वास्तविक पाहतां हे दोघे लोक या सुधारलेल्या फौजीपद्धतीस योग्य नव्हते असें मुळींच नाहीं. इंग्रजांनीं हिंदुस्थानांत पुरभैय्यांचीं पलटणें तयार केलीं तर मद्रासेस तेलंग्यांचीं पलटणें तयार केलीं. त्यांचें चातुर्य व त्यांची घटनाशक्ति हीं प्रशंसनीय आहेतच. पण शिवाजीमहाराजांनीं

मावळ्यांचीं पायदळ पलटणें तयार केलीं होतीं हें विसरतां कामा नये पुण्यांतून 'शिंदास' हांकून देणें जरी जरूर होतें आणि 'नाक्यांची' फौज ठेवणें मराठ्यांस शक्य नव्हतें, तरी कोंकणी व मावळी लोकांचीं पायदळ. पलटणें तयार होऊं शकतीं. निदान हंचवीस तीस हजार हुजरात स्वार व तोफखाना भाऊप्रमाणें नानानें ठेविला नाहीं हें उघड आहे आणि अहल्याबाईनें ही गोष्ट कित्येकदां नानाच्या नजरेस आणून दिली होती, यावरून तिच्या शहाणपणाची व राजकीय धोरणाची व राजनिष्ठेची कमाल वाटते.

येथें एक अत्यंत महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. सैन्याची उपेक्षा नानाफडणिसानें केली हें जर अहल्याबाईस समजत होतें, तर तिनें तरी फौजेची उपेक्षा कां केली? तिनें जो एवढा १५।१६ कोट रुपया दानधर्मात व दगडामातींत टाकला, त्यापेक्षां तिनें चांगली फौज तयार करून तिच्या जोरावर मराठी राज्यास बळकटी कां आणली नाहीं? 'पुरुषोत्तमा' नें या फौजेचे विषयासंबंधें असे उद्गार काढले आहेत:—

"यावरून सैन्याचें महत्त्व अहल्याबाईस उत्तम प्रकारें समजे. अशीं उत्तम उत्तम राजकर्त्यांचीं कांहीं कांहीं लक्षणें तिच्या कारकीर्दीत बीजरूपानें (बीजरूपानें कां?) सांपडतात. अहल्याबाईच्या या मताचा पुणें दरबारांत कांहीं परिणाम झाला नाहीं. यामुळें जे सरदार तेथील गादीचे पूर्ण अभिमानी होते त्यांचे वंशज पुणें लुटावयास तयार आले! (इतकेंच नव्हे तर भावि सर्व अनर्थांचें मूळ हेंच होतें असें आम्हांस वाटतें. इंग्रज पेशवाईत घुसले याचमुळें, बाजीराव गादीवर बसला याचमुळें, शिंद्याच्या पलटणांच्या जोरावर नानास कैद झाली याचमुळें). पुणें दरबारनें सैन्य न ठेवण्याची पद्धत स्वीकारली होती. तीबद्दल अहल्याबाईनें वारंवार नापसंती व्यक्त केली, पण ती स्वतः सैन्य ठेवण्याच्या भानगडीस पडली नाहीं, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे." (पान १४०)

पण असें कां?—हें येथें 'पुरुषोत्तमा' नें व्यक्त केलें नाहीं. ही तिनें चुकी केली अथवा हें योग्य केलें? आम्हांस असें वाटतें कीं अहल्याबाईस राजकारणी घटनात्मक शक्ति नव्हती असें जें त्यांचें मत आहे त्याचेंच हें पुष्टीकरण दिसतें. ग. देव यांनीं विस्तारांत लिहिलेल्या लेखांत लिहिलें आहे—"पण शिवाजीसारखी राष्ट्र घटनेची विधायक राजकार्यधुरंधरता

तिच्यांत होती असें दिसत नाहीं. तिची राजकीय दृष्टि, धोरण, नीति वगैरेंची मजल त्या काळाच्या कामगारांच्यापुढें मोठीशी गेली होती असं दिसत नाहीं." 'पुरुषोत्तम' ही आपल्या चरित्रांत लिहितो—"तिच्याकडे ही जी मंडळी येत त्यांची चिरकाल टिकणारी एकी करून त्यांचें मंडळ कसें तयार होईल व त्यांचें राष्ट्रीय घटनेच्या कामीं कसें महत्त्व आहे हें तिला शिवाजी, अकबर, बाळाजी विश्वनाथ किंवा थोरले माधवराव यांच्याप्रमाणें समजलें नाहीं, हें कबूल करणें भाग आहे." (पान १३६)

या मुद्यासंबंधानें आमचा मतभेद येथें नमूद करतांना प्रथम ही गोष्ट स्पष्टपणें सांगितली पाहिजे कीं, अहल्याबाईस अशा प्रकारचें उच्च राजकीय धोरण नव्हतें असें नसून, तिणें तें उच्चतर धोरणाच्या अनुसंधानानें मुद्दाम पत्करलें नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. खरा उदात्त राजकीय सिद्धान्त तर हा आहे कीं सैन्य जें ठेवावयाचें तें केवळ स्वराज्य संरक्षण करण्यासाठीं, परराज्य गिळंकृत करण्यासाठीं नव्हे. आजवर इतिहासाच्या समालोचनानें असेंच दिसतें कीं, बहुजनसमाजाची दृष्टि नेहमीं भव्य भव्य पराक्रमांनीं दिपली जाऊन खऱ्या उदात्त राजनीतीचा लोकांस नेहमीं विसर पडतो. अलेक्झांडरच्या वेळेपासून तों नेपोलियनपर्यंत ज्या ज्या पराक्रमी व्यक्तींनीं फौजेच्या जोरावर परराज्यें जिंकून आपल्या राज्यास जोडून राज्याचा विस्तार केला, त्यांस लोकांनीं ग्रेट अथवा मोठे ही संज्ञा दिली. अलेक्झांडर फ्रेडरिक, नेपोलियन, अकबर, बाळाजी विश्वनाथ, बाजीराव इत्यादि व्यक्तींनीं हेंच केलें; म्हणजे फौजेच्या जोरावर व आपल्या कारस्थानांच्या जोरावर त्यांनीं परराज्यें जिंकून आपल्या राज्याचा विस्तार केला. पण इंग्रजांनीं क्लाइव्ह व वारन हेस्टिंग्स यांस कितीहि वर नेऊन बसविलें, किंवा मराठ्यांनीं बाळाजीस व बाजीरावास कितीहि मान दिला, किंवा जर्मनांनीं फ्रेडरिक धि ग्रेट याचा, फ्रेंचांनीं नेपोलियनाचा किंवा मुसलमानांनीं अकबराचा कितीहि जयजयकार केला, तरी ह्या सर्व व्यक्ति उदात्त राजनीतितत्त्वाच्या दृष्टीनें अहल्याबाईच्या खालच्या पायरीच्या होत. शिवाजींची गोष्ट फारच निराळी होती. त्यानें मराठ्यांस स्वातंत्र्य मिळवून दिलें. औरंगजेबाच्या धर्मासंबंधीं तीव्र जुलमामुळें "शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते" या मनुवचनाप्रमाणें त्या वेळेस ब्राह्मणक्षत्रियवैश्यांनीं शस्त्र उचललें व शिवाजीनें आपल्या शौर्यानें, निश्चयानें व राजकीय धोरणानें त्यास स्वराज्य व स्वधर्म यांची प्राप्ति करून दिली. त्याची योग्यता मोठी व

आहे. पण अहल्याबाईवर तसा प्रसंग होता काय ? तिणें फौज ठेवून काय करावयाचें, तर त्याच्या जोरावर पेशव्यांनीं जसें सातारकरांस बाजूस सारलें, तसें तिणें पेशव्यांस सारून ठेवावयाचें ? किंबहुना महादजीनें हलुहल्ळ हेंच केलें तें तिनें करावयाचें ? अशा करण्यानें तिच्या अगाध पुण्यवत्तेस मात्र बट्टा लागला असता. तिणें आपलें राज्य सुरक्षित ठेविलें होतें. तिला त्यासाठीं अधिक सैन्याची जरूरी नव्हती. कदाचित् पेशव्यांशीं बेइमानी न करितां त्यांच्यासह तिनें वर निर्दिष्ट केलेलें " वरिष्ठ " राजकीय धोरण पत्करून सैन्याच्या जोरावर मुसलमानांस किंवा रजपुतांस पादाक्रांत करावयाचें होतें असें कोणी म्हणेल. रजपुतांची एकी करून राष्ट्रीय घटना करावयाची—याचें स्पष्ट मराठी हेंच कीं, त्यांस जिंकून मराठी राज्यांत सामिल करावयाचें.—म्हणजे जें महादजीनें थोडें बहुत केलें तें करायचें. पण हेंहि आमच्या दृष्टीनें न्याय्य नव्हतें. तें अहल्याबाईसारख्या विशाल पुण्यवत्तेच्या राज्यकर्त्रीनें केलें नाहीं, यांत कदाचित् सामान्यजनदृष्ट्या ग्रेट—पदास ती अंतरली असेल, पण ग्रेट—पदाहून जें अधिक महनीय देवीपद तें तिला तिच्या अगाध पुण्यवत्तेनें मिळालें आहे हें विसरतां कामा नये. सारांश, तिची राजकीय दृष्टि, धोरण व नीति तिच्या समकालीन किंवा एकंदर कालयुगीन राजकर्त्यांच्या फारच पुढें होती. तिनें परराज्याचा कधींहि अभिलाष केला नाहीं किंवा त्याकरितां धडपड केली नाहीं. जें मोंगल राज्य आज दोनशें वर्षे दिल्लीस कायम झालें होतें, जे रजपुत राजे हजार वर्षे राजस्तानांत नांदत होते, त्यांस सैन्याच्या जोरावर जिंकून महादजीप्रमाणें तिणें आपल्या वशाखालीं उतरविण्याचा प्रयत्न केला नाहीं. हें तिचें करणें राजकीय दृष्ट्या उदात्ततम नीतिचें होय असेंच म्हटलें पाहिजे.

प्राचीन इतिहासांत सशक्तांनीं अशक्तास खावें हाच न्याय—म्हणजे उघड मार्ग होता. मोंगल, मांचु, तुर्क, फारसी, शक, वगैरेंचा इतिहास जों जों मागें पाहत जावा तों तों ही राजनीति त्या वेळची ठराविक होती. पण अलीकडच्या सुधारणाकाळांत परराज्य हरण करणें हें न्याय्य नव्हे असें वाटूं लागलें आहे हें निर्विवाद आहे. यासाठीं परराज्य हरण करतांना कांहीं ना कांहीं सबब पुढें आणण्याचा अलीकडे प्रघात पडला आहे. कदाचित्, मुसलमान हे हिंदुस्थानांत जबरदस्तीनें घुसले आहेत तेव्हां त्यांस

पादाक्रांत करून हाकलून देणें रास्त आहे असें, हल्लीं जसें टर्कीसंबंधानें बाल्कन राष्ट्र म्हणतात तसें, अहल्याबाईस ह्मणतां आलें असतें. पण ही सबब किती लंगडी आहे हें मेकॉलेनें एका ठिकाणीं आपल्या वक्तृत्वशालि भाषनें चांगलें व्यक्त येलें आहे. आस्ट्रियाची राणी आणि जर्मनीची महाराणी मेरिया थेरसा ही अल्पवयींच राज्यावर आली. तेव्हां तिच्या अनाथतेची संधि साधून प्रशियाचा राजा फ्रेडरिक–हाच पुढें ग्रेट ही संज्ञा पावला–तिच्या प्रांताचा अभिलाष धरून तिच्याशीं लढावयास उठला, व तिच्या सायलीशिया प्रांतावर बेधडक चाल करून गेला. पण असें करतांना सुधारलेल्या राष्ट्रांच्या नवीन नीतीस अनुसरून त्यानें अशी सबब पुढें केली कीं, शंभर वर्षांपूर्वीं हा प्रांत आमचा असून तो ऑस्ट्रियानें आजवर अन्यायानें खाल्ला आहे. ही सबब किती पोकळ होती हें दाखवितांना मेकॉले ह्मणतो—

"Is it not perfectly clear that if antiquated claims are to be set up against recent treaties and long possession, the world can never be at peace for a day? The laws of all nations have wisely established a time of limitation after which titles however illegitimate in their origin can not be questioned. It is felt by every body that to eject a person from his estate on the ground of some iniquity committed in the time of the Tudors would produce all the evils which result from arbitrary confiscation and would make all property insecure. It concerns the commonwealth, so runs the legal maxim, that there be an end of litigation. And surely this maxim equally applies to the commonwealth of states, for in that commonwealth litigation means the devastation of provinces, the suspension of trade and industry, sieges and pitched battles.

**भाषांतर.**—"जर जुने पुराणे हक्क नवीन झालेल्या तहांच्या व दीर्घ भोगवट्याच्या विरुद्ध मांडतां येऊं लागतील तर जग एक दिवसहि शांततेनें नांदणार नाहीं हें उघड नाहीं काय? सर्व लोकांच्या कायद्यांनीं मुदतीचा निर्बंध मान्य केला आहे व अशा मुदतीनंतर सर्व हक्कसंबंध–मग ते मुळांत

किलीहि अन्यायाचे असोत, अमान्य करतां यावयाचे नालीन असें ठरविलें आहे. पूर्वी त्रेतायुगांत कोणी पूर्वीच्या मालकानें अन्याय केला म्हणून हल्लींच्या मालकास त्याच्या मिळकतीपासून दूर करूं लागले तर सर्व मालकी हक्क डळमळीत होतील आणि जबरदस्तीनें मिळकती जप्त होऊं लागण्यापासून जे अनर्थ उत्पन्न होतात ते उत्पन्न होऊं लागतील, ही गोष्ट प्रत्येकास समजण्यासारखी आहे. कायद्याचें एक तत्त्व असें आहे कीं सर्व विवादांचा कोठें तरी अंत असणें ही समाजाच्या सुखदुःखाची गोष्ट आहे. हें जर व्यक्तींच्या समाजासंबंधानें खरें आहे तर हेंच तत्त्व राष्ट्रांच्या समाजालाहि लागू असलें पाहिजे. कारण अशा समाजांत वाद भांडणें म्हणजे प्रांताचे प्रांत उध्वस्त होणें, व्यापारधंदा बंद पडणें, भयंकर वेढे व लढाया होणें, हेंच होय."

वरील उतारा अत्यंत महत्त्वाचा असून त्यांतील तत्त्व अज्ञ मनुष्याच्याहि समजुतींत येण्यासारखें आहे, "मागील खपल्या काढून दंडद्रोह करतात" या पूर्वी दिलेल्या अहल्याबाईच्या दरबारच्या वाक्यांत जो अन्यायाचा निषेध भरला आहे, तोच या मेकॉलेच्या विस्तृत विवेचनांत आहे. जुन्या पुराण्या सबबी काढून समाजांत व्यक्तीला त्रास देणें जितकें अन्यायाचें आहे तितकेंच राजांच्या समाजांत एका राजानें बळाच्या जोरावर कांहीं तरी सबबी लावून दुसऱ्यास त्रास देणें हें अन्यायाचें होय. अहल्याबाईची धर्मशीलता केवळ पुराण ऐकण्यापुरतीच किंवा व्रतनैकल्यें करण्यापूरतीच नव्हती, तर तिचा पुण्य अंतरात्मा सर्व विषयांत धर्मशीलतेनें भरलेला असून अन्यायाचा त्यास नेहमीं तिट्कारा असे. आपल्या प्रजेपासून काय किंवा इतर राजेलोकांपासून काय, अन्यायानें कांहीं घ्यावें असें तीस कधींच वाटलें नाहीं. सारांश, ज्या प्रकारची राजकीय विधायक बुद्धि तिला नव्हती असें टीकाकार ह्मणतात, त्याप्रकारची बुद्धि तिनें केवळ धर्मशीलतेनें धरली नाहीं असें आह्मांस वाटतें. रजपुतांचें व मराठ्यांचें एक राज्य बनविण्याचा प्रयत्न तिनें केला नाहीं, तो तिला राज्यविधायक सामर्थ्य नव्हतें म्हणून नव्हे; तर, असें करणें अन्यायाचें होय असें तिला तीव्रपणें भासत असावें. वास्तविक पाहतां तिचें तरी राज्य माळव्यांत नवीनच होतें, पण तें याच भोगवट्याच्या व तहांच्या पायांवर मजबूत होतें आणि तें जर मागण्याचा तिला हक्क होता, तर रजपूतांना व मुसलमानांना आपापलीं त्याहून

पुरातन राज्यें संभाळण्याचा पूर्ण हक्क होता हें तिच्या न्यायी बुद्धीस स्पष्ट दिसत असलें पाहिजे.

येथें आणखी एक बारीक विचार आहे. मुसलमान व रजपूत अधो-गतीस लागल्यानें बलहीन झाले होते. सत्ययुगांतील राजधर्मास अनुसरून अहल्याबाईनें जरी त्यांस खाल्लें नाहीं तरी इतर तत्कालीन राजे कलियुगाच्या धर्मानुसार त्यांस खाल्ल्यावांचून राहते ना हें उघड आहे. किंबहुना महादजी व इंग्रज यांच्यांत या काळीं हीच चुरस लागली होती. महादजी जर त्यांस खाताना तर त्यांस खाण्यास इंग्रज बसलेच होते. इंग्रजांनीं मोंगल व रजपूत यांस आपल्या पंखाखालीं घेतलें असतें तर ते शिरजोर होऊन पुढें मरा-ठ्यांसहि लवकर खाऊन टाकते. अशा आपत्तीपासून कांहीं दिवस तरी महादजीच्या नशिबानें, कर्तृत्वानें व फौजबंदीनं मराठ्यांस वांचविलें हें इति-हासप्रसिद्धच आहे. महादजीच्या व इंग्रजांच्या चढाओढींत महादजीस यश आलें व त्यामुळें मराठी राज्य कित्येक वर्षे बचावलें. या दृष्टीनं महादजीनें जें केलें तें अन्यायाचें नव्हे असें म्हणतां येईल. हा balance of power अथवा शक्तीच्या समतोलपणाचा विचार हल्लीं युरोपांत मुख्यतः व तदनुषं-गानें एशिया व अमेरिका खंडांतहि रूढ आहे. एवढा बारीक विचार जरी त्या वेळच्या मराठी मुत्सद्यांच्या डोक्यांत आला नसेल तरी तो स्थूल मानानें त्यांच्या डोक्यांत आला होता हें महेश्वरच्या पत्रव्यवहारावरून व इतर पुराव्यावरून सिद्ध होतें. दिल्लीस व दिल्लीपतीस आपल्या कबज्यांत घेण्याची महादजीची महत्त्वाकांक्षा या दृष्टीनें योग्य व न्याय्य होती हें उघड आहे. या महत्त्वाकांक्षेस अहल्याबाईची कधींहि आडकाठी नव्हती हें लक्षांत घेण्यासारखें आहे. तथापि तिनें नुसती सहानुभूतीची मदत केली; यापेक्षां ज्यास्त मदत केली असती तर वावगें झालें नसतें. लालसोटच्या लढाईंत महादजीस रजपुत–मुसलमानांनीं एकदां धक्का दिला. त्यावेळच्या त्याचा व अहल्याबाईचा पुष्कळदा पत्रव्यवहार झालेला या बातमीपत्रांत उल्लिखित आहे. त्यावेळीं तिनें फौज व पेंढारी तिजपाशीं थोडे असल्यानें महादजीकडे पाठविले नाहींत; पण दक्षिणेंतून तुकोजीस तातड-तोब मदतीस येण्याविषयीं लिहिलें. अखेरीस अलीबहादर व तुकोजी महा-दजीच्या मदतीस आले. पण हा विचार आमच्या दृष्टीनें गौण आहे. अ कला खातो म्हणून बनें कवर बसरून त्यास सर्वच स्वतः खावें किंवा

त्याचा कांहीं हिस्सा खावा हें उदात्त राजनीतिदृष्ट्या कधींहि न्याय्य होणार नाहीं हें आम्हीं पुढें मेरिया थेरेसाविषयीं बोलतांना दाखविणार आहों. स्वराज्य-संरक्षण-परराज्यापासून-रक्षण हाच मार्ग न्यायधर्मनिरत राजांस पूर्णपणें शोभतो. उदात्त राजनीतीच्या तत्त्वाच्या दृष्टीनें अहल्याबाई परराज्यें घेण्याच्या भानगडींत पडली नाहीं. हीच तिची थोरवी होय. मिसेस जोनबेलीनें* तिजविषयीं म्हटल्याप्रमाणें तत्त्ववेत्त्यांस हेंच वाटतें कीं राजांनीं परस्परांशीं तंटा न करतां धर्मनीतीनें आपापलें राज्य पाळावें हेंच सर्वतोपरी उत्तम.

अहल्याबाईस वरिष्ठदर्जाची राज्यविधायक शक्ति नव्हती हा आक्षेप घेतांना तीन चार गोष्टींचा आणखी विचार करावयास पाहिजे. प्रथम ती बायको माणूस होती ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे. अशा व्यक्तीस इतरांच्या व विशेषतः पुरुषांच्याच द्वारा अशा खटपटी करणें शक्य आहे. हें उघड आहे. ती जरी शूर व स्वतः लढाईस जाण्यास तयार असे तरी तिचें असें करणें केवळ प्रसंगोपात्त होतें हें उघड आहे. दुसरें, तिनें आपल्या सैन्याचें आधिपत्य तुकोजीच्या हवालीं केलें होतें. तिसरें, ती स्वतंत्र नसून एका संयुक्त राष्ट्राची घटक होती व त्या घटनेचीं मुख्य सूत्रें तिच्या हातीं नसून अंकितपणाचीं सूत्रें मात्र तिच्या हातांत होतीं हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. पेशव्यास-म्हणजे नानाफडणिसास-बाजूस सारून आपणच मराठी साम्राज्याचे पुढारी व्हावें हें तिला संभवनीयहि नव्हतें व न्याय्यहि नव्हतें. चवथें, अशा प्रकारची तजवीज करण्यांत महादजी गुंतलाच होता तेव्हां दोघांनीं हा मार्ग स्वीकारणें शक्य नव्हतें. अशा प्रकारची व्यवस्था एक पुढारी करीत असून त्याच्या अनुसंधानानें इतरांनीं वागलें तरच शक्य आहे हें उघड आहे. सारांश, अनेक दृष्टींनीं पाहिलें असतां ज्या प्रकारचें धोरण तिनें धरावयास पाहिजे होतें असें टीकाकारांस वाटतें, त्या रीतीचें धोरण स्वीकारणें तिला शक्य नव्हतें व न्याय्यहि नव्हतें, पण याजवरून तिला ती शक्ति नव्हती हें अनुमान मात्र निघूं शकणार नाहीं.

मराठी संयुक्त राष्ट्राची एक घटक या नात्याचें आपलें कर्तव्य अहल्याबाईनें उत्तम रीतीनें बजावलें, यांत संशय नाहीं. यासंबंधानें आपलें

---

* Oh ! that restless chiefs, by misery schooled
Would rule their state as that brave woman ruled.

कर्तव्य काय आहे हें तिला पूर्ण समजत होतें व तें तिनें शहाणपणानें व निरलसपणानें आमरणान्त बजावलें. इंग्रजांचा जेव्हां वसईवर शह बसला तेव्हां तिचा अंतरात्मा किती चडफडला हें या बातमीपत्रांवरून स्पष्ट आहे. भाग १, पान, ८६. "बाईचा मानस कीं कोण्याहि प्रकारें पाटीलबावांना हुजूरचाकरीस पाठवावें." "येथें बाईचें लक्ष हेंच कीं एकएक दिवस चाकरीचा जातो. उभयतांनींहि या समयास श्रीमंतांच्या जवळ चाकरीस असावें."..."येथें बाईचें मानस रात्रंदिवस गादीचें कल्याण असावें, त्यांचें थोर केल्यानें आम्ही थोर असें अंतःकरणपूर्वक बोलतात." बाईस महादजी येऊन भेटला तेव्हांचा समारंभ या पत्रव्यवहारांत फारच चांगला वर्णिला आहे. पण एवढी खटपट बाईनें केली ती यासाठींच कीं महादजीनें श्रीमंतांच्या मदतीस जावें पान ९५. "राजश्री पाटिलबोवा येथें आले होते. अहल्याबाई, राणेखान व पाटिलबावा या त्रिवर्गांशीं येथें दोन एकांत झाले. त्यांत बाईनीं पाटिलबोवांस बोध करून निश्चितार्थ ठरविला कीं... वसंतपंचमीचे मुहूर्तें निघून श्रीमंतांच्या दर्शनास जावें. याप्रमाणें करार ठरवून बाईनीं फार प्रकारें सांगितलें कीं आपण ये मसलतीस तेथें जात नाहीं तर जन्मपर्यंत श्रीमंतांचा व जघन्याचा शब्द आपणास लागेल. इकडील पलटणें आलीं आहेत त्या मसलतीची सरबराई मजकडे लागली. तुम्हीं तिकडे अंबाजी इंगळे पाठविले आहेत. आम्हीहि त्रिंबकजी इंगळे तयार केले आहेत. पांच सात हजार फौज त्यांजबरोबर देऊन तिकडे पाठवितों. परंतु तुम्ही आम्ही इकडील संधान राखणें मुख्य गोष्ट होय." तात्पर्य, ज्या वेळेस गोडर्डानें गर्दी करून वसई घेतली त्या वेळेस बाईचें अन्तःकरण पेशव्यांच्या राज्याविषयीं फार तळतळलें. यासंबंधाचे तिचे उद्गार 'पुरुषोत्तम'कृत चरित्रांत पान ११९ वर दिलेच आहेतः "वसईसाठीं कैलासवासी श्रीमंतांनीं फारच परिश्रम केले. पाण्यापरी पैसा खर्च केला. केवळ त्यांच्या वर मसलत पडली. आपणापैकीं तेथें कोणीच नाहीं." असो, पेशव्यांच्या साम्राज्याचें कोणतेंहि काम पडलें तरी तें ती निरलसतेनें करी. आजारी असली तरी तावडतोब करी. श्रीमन्तांविषयींची तिची स्वामिनिष्ठा विलक्षण होती. सवाईमाधवरावाच्या लग्नाच्या वेळीं तिनें जो आनंद प्रदर्शित केला तो या पत्रव्यवहारांत नमूद आहे. त्यास 'देणें' करावयाचा अधिकार नानांनीं दिला तेव्हांहि तिला फार आनंद झाला. सवाईमाधवरावानें

मोठें होऊन आपलें राज्य संभाळावें ही तिची फार इच्छा. त्याप्रमाणें पेशव्यांचा उत्कर्ष अव्याहत रहावा असा तिचा प्रयत्न असतां तिच्या व तुकोजीच्या तंट्यानें पेशवाईस नुकसान पोंचलें असा आक्षेप पारसनीस घेतात, तो गैरवाजवी आहे. त्याचें अधिक विवेचन पुढें येईलच. महादजीशिवाय पेशव्यांच्या इतर सरदारांशीं तिचे फारसे संबंध आले नाहींत, पण महादजीशीं वारंवार येत. महादजीची सत्ता हाणून पाडावी असा तिनें कधींहि प्रयत्न केला नाहीं, उलट महादजीचा जय होई तेव्हां तिला आनंद वाटे. पाटीलबावांनीं ग्वालेरकिल्ला फत्ते करून गोहदवाल्यापासून घेतल्याची खबर तिला पोंचली तेव्हां तिनें तोफा सोडल्या. महादजीच्या तक्रारी घेऊन राजेरजवाड्यांकडील वकील तिच्याकडे येत त्यांस तिनें आपल्या पाठीशीं घालून आपसांत तंटा उत्पन्न केला नाहीं किंवा साम्राज्यास धक्का पोंचविला नाहीं. अशा बाबतींत ती आपलें मत स्पष्टपणें महादजीस कळवी व त्याचें उत्तर आल्यावर वकिलास महादजीकडे पाठवी. या बाबतींत तिचें धोरण मल्हाररावाहून अधिक शहाणपणाचें व न्यायीपणाचें होतें असें आम्हांस वाटतें. मल्हाररावानें जसा शिंद्यांचा व साम्राज्याचा शत्रु नजीबखान आपल्या पाठीशीं पूर्वी घालून वांचविला व एकंदर मराठी राज्यास पानपतचा भयंकर धक्का बसविला, तशा प्रकारचें वर्तन तिनें कधींहि केलें नाहीं. साम्राज्याच्या शत्रूस तिनें कधीं आपल्या राज्यांत थारा दिला नाहीं. राघोबाचा साथीदार बाजीराव बर्वे यास तिनें थारा दिल्याचा उल्लेख पुरुषोत्तमानें केला आहे तेथें त्याची गैरसमजूत झाली आहे असें आम्हांस वाटतें. पान, १३५ वर "प्रसंग विशेषीं तिनें त्यांची दाद पुणें दरबारापर्यंत लावून त्यांस योग्य तो न्याय मिळवून दिला आहे"– याचें उदाहरण म्हणून ती बर्व्यांची गोष्ट त्यानें दिली आहे. पण ती तशी नाहीं असें आम्हांस वाटतें. बाजीराव बर्वे बंडखोर राघोबादादाचा साथीदार, त्यास तिनें कधींहि थारा दिला नसता; किंवा पुणें दरबाराकडे त्याजबद्दल शिफारस केली नसती. हा मनुष्य गोविंदपंत गानूचा व्याही होता. या स्वजनाच्या भिडेनें तिनें त्यास आपणापाशीं राहूं दिलें पण लागलीच त्याची हकीगत नानास कळवून त्यास नानाच्या मागणीप्रमाणें पुण्यास पाठविण्याचें तिनें ठरविलें, व आपला कारकून त्याजबरोबर देण्याची हमी घेतली. पण बाजीराव पक्का गुन्हेगार होता. राघोबा अद्याप

पुंढावा करूनच होता. शिवाय अहल्याबाईच्या वचनाचा त्यास भरंवसा होता पण त्यास नानाचा कोठें भरंवसा होता ? सारांश, नानाचें अभयपत्र आलें व बाईनें कारकून बरोबर देण्याचें कबूल केलें तरी, तो उघडा बोडका होऊन, मी मेलों पण येथोन जाणार नाहीं, असा त्रागा करून बसला. अन्न खाईना. तेव्हां बाईस संकट पडलें. यावेळेस बाईस फारच वाईट वाटलें. तिच्या तेजस्वी, सत्यशील व स्वाभिप्रिय स्वभावाची या वेळेस कसोटीच लागली. बाजीरावास पाठविण्याविषयीं तिचें वचन गेलें होतें. बाजीरावानें जाण्याचें कबूल केलें होतें, म्हणूनच तिनें हा उद्योग केला. तो आतां फिरून होऊन बसला. जबरदस्तीनें पाठवावा तर ब्राह्मण पडला. अशा पेंचांत बाईला संतापानें ज्वरच आला. भाग १, पान ११२. "तेंवर्तमान बाईसही रात्रीं कळलें. तेच रात्रीं बाईस संतापज्वर आला. दोन तीन पंधरवड्याचें दुखणें झालें. अद्याप ज्वर उतरला नाहीं." बर्‍यावर शेवटीं तिणें पाहारा ठेवला व त्याची सर्व हालचाल बंद केली. अखेरीस राघोबाचा तंटा मिटला व राघोबा गंगातीरीं बसला तेव्हां तो गेला. अहल्याबाई साम्राज्याच्या शत्रूस थारा देणारी नव्हती. केवळ गानूसाठीं ती या पेंचांत पडली हें उघड आहे. साम्राज्यासंबंधी हरएक बाबतींत ती मध्यवर्ती सत्तेस जोर देत असे. शिखांनीं तिच्याकडे परभारें प्रेष पाठविला, तेव्हां तिनें साफ जबाब दिलाः— "श्रीमंत धनी आहेत...सर्वांच्या मनसुब्यानें एकवाक्यतेचीं उत्तरें येतील त्या अन्वयें तुम्हांस लिहून पाठवूं." (भाग १, पान ११६) मात्र तिनें साम्राज्यसत्तेस आपल्या राज्यांत ढवळाढवळ करूं दिली नाहीं. एके प्रसंगीं तिनें कारकुनास स्पष्ट सांगितलें; "आमचें घेणें आम्ही वसूल करतों यांत नानास बोलावयाचा अधिकार काय ?" याप्रमाणें मराठी संयुक्त साम्राज्याचा एक घटक संस्थानिक या नात्यानें अहल्याबाईची राजकीय वर्तणूक अत्यंत चोख, इमानाची, इभ्रतीची व शहाणपणाची होती.

राघोबादादाच्या घरबुडव्या कृत्याविषयीं अहल्याबाईस अत्यंत तिटकारा असे हें येथं सांगावयास हरकत नाहीं. राघोबानें मराठ्यांच्या राज्याची कशी घाण केली हें तिला पूर्णपणें समजत होतें. तिनें त्यास आपल्या राज्यांत घुसूं दिलें नाहीं हें प्रसिद्ध आहे. राघोबाच्या वतीनें इंग्रज भांडूं लागले तेव्हां नानास दोघां सरदारांनीं मदत करावी असें तिचें नानाप्रमाणें पूर्ण मानस होतें. शेवटीं राघोबा पूर्ण नामोहरम होऊन कोपरगांवास स्वस्थ बसला

तेव्हां बाईस " दुनियेचा काच तुटला " असें समाधान झालें. राघोबादादांनीं घाण केली या अहल्याबाईच्या मतावर 'पुरुषोत्तमा'नें पान २२० वर टीका करून आपला मतभेद प्रदर्शित केला आहे. " दादासाहेब हे दुहीची परिस्थिति उत्पन्न करण्यास कारण मात्र झाले. पेशवाई जावयास ते किंवा त्यांचे पुत्र हे मूळ कारण नव्हत, हें कधीही विसरतां कामा नये " असा 'पुरुषोत्तमा' नें उपन्यास करून, एकंदर बिघडलेल्या परिस्थितीवर या अपेक्षांचें खापर फोडण्याचा प्रयत्न केला आहे. आमच्या मतें हें 'पुरुषोत्तमा' चें येथील विवेचन अप्रासंगिक आहे इतकेंच नव्हे तर चुकीचें असून एकंदर ग्रंथाच्या सुरसतेंत मातीच्या खड्यासारखें आहे. परिस्थितीच्या सबबीवर व्यक्तींचा दोष कमी करून दाखविणें हें इतिहासकारांस उचित नाहीं. व्यक्तीचे गुणदोष यथान्याय त्यांच्या पदरीं घालून तदनुरूप प्रशंसानिंदा स्पष्टपणें नमूद करणें हें इतिहासाचें आद्य कर्तव्य होय. राघोबाच्या बतीनें 'पुरुषोत्तमा' नें येथें कड घेतला आहे असें नाहीं हें खरें. पण परिस्थिति परिस्थिति, तरी काय पदार्थ आहे? लिस्बन शहरांत एकदम समुद्राची लाट धरणीकंपामुळें घुसली, किंवा व्हेसुवियस ज्वालामुखीचा स्फोट होऊन पाँपी शहर लाव्हाच्या व राखेच्या वर्षावांत बुडून गेलें, अशा प्रकारची स्थिति असती तर निराळी गोष्ट होती. 'पुरुषोत्तमा'नें जी परिस्थिति वर्णन केली आहे ती तरी व्यक्तीचीच होय. दादासाहेबांस साथी मिळाले म्हणून दादासाहेबांस बंडाळी करतां आली असें त्याचें म्हणणें आहे. पण हा तरी व्यक्तींचा—मनुष्यव्यक्तीचा—दोष ना? शिवाय अहल्याबाईंचे विरुद्ध तुकोजीनें खटपट चालवली तेव्हां तुकोजीचे सरदार—अर्थात् होळकरशाहीचे फौजी नोकर—तुकोजीस अनुकूल झाले नाहींत ही गोष्ट तो विसरला काय? या पत्रव्यवहारावरून असें दिसतें कीं, तुकोजीनें आपल्या लोकांचीं मनें पारखून पाहिलीं तेव्हां सर्वांनीं जबाब दिला " आम्ही शिंद्याशीं लढूं एकवेळ श्रीमंतांशीं लढूं. पण अहल्याबाईशीं कधींहि लढणार नाहीं ! " हा गुण कोणाचा? त्या लोकांचा कीं अहल्याबाईचा? जी वाईट परिस्थिति उत्पन्न होते ती व्यक्तीनें हा भ्रम आहे, असें 'पुरुषोत्तमा' स वाटतें. पण अहल्याबाईच्या एका पुण्यप्रताप व्यक्तीचें हें सामर्थ्य होतें कीं आजवर मराठी राज्यांत जो कोणी जबाब दिला नाहीं ( शाहूच्या वेळेस सुद्धां कोणी ताराबाईकडे झाले, कोणी शाहूकडे झाले ) तो जबाब अहल्याबाईतर्फे लोकांनीं दिला ! तेव्हां एका व्यक्तीच्या सद्गुणांत केवढें सामर्थ्य असतें हें

सिद्ध आहे. तर मग एका व्यक्तीच्या दुर्गुणांत किती सामर्थ्य असेल याची कल्पना सहजच होईल. राघोबादादा, आनंदीबाई व बाजीराव या तीन व्यक्तींनीं मराठी साम्राज्य रसातळास नेलें. त्यांचे दुर्गुण जितके निंदावे तितके थोडेच असें आमचें मत आहे. प्रत्येक समाजांत दुष्टांना कोणी तरी साथीदार मिळावयाचे हें ठरलेंच आहे. इंग्लंडांत काय आणि इतरत्र काय, Pretenders अथवा खोटे हक्कदार यांना साथी मिळाले नाहींत असें झालेंच नाहीं. पण जे मूर्ख किंवा दुष्ट लोक अभिमानास किंवा महत्त्वाकांक्षेस बळी पडून आपला पक्ष खोटा आहे हें समजत असून सुद्धां, घरभेदीपणानें, शत्रूच्या मदतीनें, स्वजनाचा–स्वदेशाचा–स्वराज्याचा नाश करण्यास मूळ कारणीभूत होतात ते अत्यंत निंद्य व दूष्य होत असें इतिहासानें स्पष्ट नमूद केलें पाहिजे. तरच मागच्यास ठेंच पुढचा शहाणा या न्यायानें इतिहासास सार्थकता आहे. नाहीं तर इतिहास आणि भाकड-कथा यांत अन्तर काय? असो, अहल्याबाईस राघोबादादाच्या मूर्खपणाची जी चीड येत असे ती अगदीं रास्त होती असें आम्हांस वाटतें.

ह्या प्रश्नाचा आम्हीं ज्यास्त ऊहापोह केला याचें आणखी कारण असें कीं राघोबाच्या व तुकोजीच्या वर्तनांत काय फरक होता हें वाच-कांच्या लक्षांत यावें. तुकोजीनें व अहल्याबाईनें घरांत भांडणें करून मराठी साम्राज्यास राघोबाप्रमाणेंच धक्का बसविला असें जें पारसनिसांचें मत आहे त्याचा येथें आतां आपण विचार करूं. तुकोजीच्या व राघो-बाच्या कृत्यांत कांहींसें साम्य आहे हें कबूल केलें पाहिजे, तुकोजी वास्त-विक अहल्याबाईचा केलेला मनुष्य. मालेराव वारला तेव्हां अहल्याबाईने राज्य करावें व तुकोजीनें सरदारी घेऊन सैन्यानिशीं पेशव्याची चाकरी करावी, ही अधिकाराची दुभाग व्यवस्था अहल्याबाई स्त्री असल्यानें जी कायम झाली ती त्यानें आमरणान्त मानिली पाहिजे होती. असें असून महत्त्वाकांक्षेस बळी पडून त्यानें १३, १४ वर्षांनंतर रूढमूल होऊन अह-ल्याबाईविरुद्ध खटपट चालविली हें त्यानें वाईट केलें. हें त्याचें करणें राघोबाच्या कृत्याप्रमाणेंच निंद्य होय. चार पांच वर्षें शिंदे व तुकोजी एके ठिकाणीं होते त्याचें हें फळ होय, असें अहल्याबाईचें मत एके ठिकाणीं या पत्रव्यवहारांत नमूद आहे तें खरें दिसतें. तुकोजीस असें वाटलें असावें कीं, महादजी शिंदे आपल्या संस्थानचे पूर्ण मालक झाले व मागील

शिंद्यांच्या बायका दरमहा खाऊन दक्षिणेंत स्वस्थ बसल्या, तसें माझें कां असूं नये? बायकांस राज्याचा अधिकार नाहीं. त्यांनीं अन्नवस्त्र घेऊन स्वस्थ बसावें. ही कल्पना त्याची असावी, किंवा महादजीची असावी, किंवा त्याचा कारभारी नारो गणेश याची असावी. कोणाचीहि असो, हा कोटिक्रम अहल्याबाईसंबंधानें अन्यायाचा होता, हें उघड आहे. एक तर अहल्याबाईनें राज्य करावें याच शर्तीवर त्यास सरदारी मिळाली होती. दुसरें, होळकरशाहींत हाच परिपाठ चालत आला होता. मल्हाररावाच्या वेळीं प्रथम गौतमाबाईनें राज्य केलें, मागून अहल्याबाईनें, असें महादजीनें एका पत्रांत नानास स्पष्ट कळविलें आहे. तिसरें, अहल्याबाई पहिल्यापासून राज्य करीत होती व तेंहि शहाणपणानें. चवथें व मुख्य कारण हें कीं, तुकोजी हा संपादकाच्या पुढील वंशांत जन्मला नव्हता. महादजीच्या व त्याच्या हक्कांत जमीन अस्मानाचें अंतर हेंच. महादजी मूळ संपादकाचा प्रत्यक्ष पुत्र होता. मराठ्यांत दासीपुत्र इतर पुत्रांच्या अभावीं पूर्ण मालक असतो असें शास्त्र आहे. शिवाय तो कर्तृत्ववान् आणि पानपतच्या लढाईंत हजर असून पराक्रम करून मोठ्या आपत्तींतून वांचून आलेला. राज्यावर जो हक्क त्याचा होता तो तुकोजीचा कसा असूं शकेल? सारांश, सर्व तऱ्हेनें आपली लंगडी बाजू असून तुकोजी महत्त्वाकांक्षेस बळी पडला. या बाबतींत त्यास कारभाऱ्याचें व बायकोचें पाठबळ होतें. सौ. रखमाबाईस राज्यकर्त्री होण्याची इच्छा उत्पन्न होणें साहाजिक आहे. सुनेस सासूपणा केव्हां येईल असें होऊन जावें हा मनुष्यस्वभाव आहे. भाग १, पान ६५ वर, "कारभाऱ्याची व रखमाबाईची चित्तप्रशस्तता उज्जनीचे मसलतीवर आहे" असें एक वाक्य आहे. यावरून महादजीचे मदतीनें अहल्याबाईपासून राज्य-कारभारांत ज्यास्त भाग आपल्यास मिळावा अशी जी तुकोजीची इच्छा होती तीस बायकोचें व कारभाऱ्याचें पाठबळ होतें असें दिसतें. नारो गणेश हा तर लुच्चा मनुष्य होता. नुसत्या फौजेच्या कारभारांत तो पैसे गिळंकृत करीत असे. तुकोजीस सर्व राज्याचा कारभार मिळाला असता म्हणजे त्याचें अधिकच पिकतें. अशी सर्वांची मसलत आपआपल्या फायद्याच्या दृष्टीनें दृढ होऊन, अहल्याबाईकडून राज्यकारभार काढण्यास सबब कोणती दाखवावी, तर फौजेस पैसा वेळेवर पोंचत नाहीं व पुरताहि मिळत नाहीं ही दाखवावी असें ठरलें. अहल्याबाईचा दानधर्माचा खर्च मोठा, शिवाय ती दौलतीचा कारभार करते, तिचें फौजेकडे लक्ष नाहीं,

इत्यादि मबबी त्यांनीं पुढें केल्या. शिवाय तिजजवळ मल्हाररावाची मोठी पुंजी आहे हा भ्रम होताच. तिच्याजवळची जडपेड काढून घेण्यास फौजेच्या देण्याचा गिल्ला करावयास पाहिजे होता, त्याप्रमाणें नारो गणेश व तुकोजी यांनीं सुरू केला आणि अहल्याबाईपासून राज्यकारभार काढून घेण्याची खटपट चालू केली. पण अहल्याबाई या सर्वांच्या बारशास जेवली होती, ती अशा लोकांना थोडीच दाद देणार होती! शिवाय तिचा कारभार चोख, जमाखर्च आरशाप्रमाणें, लोकांवर दाब सुभेदारापेक्षां ज्यास्ती, स्वतः पुण्यप्रताप, अद्वितीय, तिच्यापुढें तुकोजीचें हें कारस्थान प्रथम महादजीच्या मदतीनें, मागून नानाफडणिसाच्या मदतीनें, चाललें तरी तें यशस्वी झालें नाहीं हें निराळें सांगणें नको.

पण हा जी तुकोजीची व अहल्याबाईची घासाघीस इ. स. १७८० पासून पुढें कित्येक वर्षेपर्यंत चालू राहिली तिला कधींहि भीषणस्वरूप प्राप्त झालें होतें असें आम्हांस वाटत नाहीं. “पुणें येथें राघोबादादाच्या विग्रहामुळें महाराष्ट्र राज्यसत्तेच्या दिव्यमंदिरास अगोदरच अग्निस्पर्श झाला होता. तशांत होळकरांचा गृहकलह व शिंद्याचे स्वार्थसाधक डावपेंच ह्यांचें त्यास साह्य मिळाल्यामुळें ती सर्व टोलेजंग इमारत रसातळास जाण्यास फार अवकाश लागला नाहीं.”—हें जें भयंकर विधान पारसनिसांनी विस्तारानें (म १९०७) केलें आहे तें केवळ चुकीचें व अतिशयोक्तीचें आहे यांत तिळमात्र शंका नाहीं. तुकोजी—अहल्याबाईच्या गृहकलहावरून व ज्ञानां जातां महादजीच्या महत्त्वाकांक्षेवर हा जो पारसनिसांनीं अग्नीचा सर्थाद्वार वायु होण्याचा आरोप केला आहे तो केवळ अतिशयोक्तीचा आहे; म्हणजे त्या दोन्ही गोष्टी जरी खऱ्या आहेत तरी त्या मराठी साम्राज्यसत्तेला विघातक होण्याच्या स्वरूपास कधींच पोंचल्या नाहींत. महेश्वर—दरबारच्या पत्रव्यवहारावरून होळकरांसंबंधानें हा निष्कर्ष पारसनिसांनीं काढला आहे. पत्रव्यवहारावरून अनुमानें काढतांना दोन गोष्टींचें नेहमीं स्मरण ठेविलें पाहिजे. एक ही कीं एखादा पत्रव्यवहार म्हणजे एकंदर इतिहासाची एकच बाजू अथवा एकच गोष्ट होय. ती इतिहासाच्या इतर वृत्तांत आपल्या योग्य प्रमाणानें बसविली पाहिजे; नाहीं तर ‘सिनामेटोग्राफ’मध्यें जवळ बसलें असतां जशीं चित्रांतील माणसें व जनावरें अवाढव्य दिसतात किंवा ‘लाफिंग गॅलरी’मध्यें नाकच मोठें दिसतें, किंवा

हूनच मोठा दिसतो, त्याप्रमाणें पत्रांतील मजकूर तेवढाच सर्व मोठा दिसून बाकीचे इतिहासाचे भाग लहान दिसतील. किंवा दुसरा दृष्टान्त देणें तर वेदान्त्यांनीं दिलेला हत्तीचा दृष्टान्त येथें लागू पडेल. इतर बाजूंकडे लक्ष न देतां तें एकाच बाजूकडे दिलें म्हणजे चार आंधळयांनीं चार बाजूंनीं हत्तीला स्पर्श केला असतां प्रत्येकजण हत्तीचें निरनिराळें स्वरूप मानतो. हत्ती म्हणजे सोंड, हत्ती म्हणजे एक लोखंडी काठी, हत्ती म्हणजे जाडा खांब, किंवा एक मोठा नगारा, असें निरनिराळें वर्णन ते करतील. तात्पर्य, पत्रव्यवहारांतील मजकुरास योग्य आकार देऊन इतिहासाच्या इतर गोष्टींत त्यास योग्य स्थानीं बसविलें पाहिजे. असें न केलें तर कसा अनर्थ होईल याचें एक उदाहरण घेऊं. सर चार्लस बेरस्फर्डचा ब्रिटिश आरमार कुचकामाचें आहे यासंबंधाचा पत्रव्यवहार एकतर्फेचा वाचला असतां, ब्रिटिश आरमार सन १९०० त अगदीं कुचकामाचें होतें असेंच कोणी भावि इतिहासकार अनुमान काढील, तर तें चुकीचें होईल. कारण ही तक्रार आरमाराची सुधारणा व्हावी एवढ्याचसाठीं होती; वस्तुतः ब्रिटिश आरमार कुचकामाचें कधींच नव्हतें. दुसरें, पत्रांत जो मजकूर येतो तो लिहिणारानें त्रयस्थ बुद्धीनें लिहिला आहे किंवा स्वतःच्या क्षुब्ध वृत्तीनें लिहिला आहे हें पाहिलें पाहिजे. उदाहरणार्थ, या पत्रांतून जेथें कारकुनांच्या तापत्रयाचें वर्णन येतें त्यांत नानाकडून रुपये न पोंचल्याच्या वारंवार तक्रारी आहेत, यावरून नानाकडून कारकुनांस वेतन पोंचत नव्हतें किंवा त्यांची दैना होती असें मुळींच समजतां येत नाहीं. तें असो, अहल्याबाईच्याच राज्यव्यवस्थेसंबंधें एक प्रतिकूल वाक्य या पत्रव्यवहारांत आहे, तेंच खरें धरून पारसनीस अहल्याबाईचा कारभार ढिला होता असें मानतात. पण हें मत अगदीं चुकीचें आहे. जुन्या पत्रांत नमूद असलेलें वृत्त मान्य होय हें उघड आहे. पण जुन्या पत्रांत नमूद म्हणून एखादें मत वेदतुल्य मानतां येत नाहीं; तें वरील कसोशीनें पाहूनच घेतलें पाहिजे. "बाईचा कारभार पुढें तिखट मागें पोंचट" असें जें केसो भिकाजीनें मत दिलें आहे तें कोणत्या प्रसंगानें हें लक्षांत घेतलें पाहिजे. बाईबरोबर कँपमध्यें असतां त्याची चोरी झाली, तींतील वस्तभाव चोराचा सुगावा दिला असतांहि व कमविसदारास ताकिदी झाल्या तरी मिळाली नाहीं, या हकीकतीवर हें मत नमूद आहे; अर्थात् हें त्यानें रागावून उच्चारलेलें आहे, व यांत त्याचा स्वतःचा संबंध आहे. अशा कारणांनीं

जर अहल्याबाईचा कारभार पोंचट म्हणावयाचा तर इंग्रजांचा पोलिसचा बंदोबस्त त्याहून पोंचट म्हणावा लागेल. अशा चोऱ्या इंग्रेजींत शेंकडों होतात. आणि चोरीस गेलेला माल कितीकांचा परत मिळालेला आहे ? प्रत्येक देशांत लहानसहान चोऱ्या नेहमीं होणारच, आणि चोरीचा माल फार थोडा वेळ परत मिळणार. उत्तम बंदोबस्ताची परीक्षा याजवर नाहीं, एकंदर गुन्ह्याचें मान कमी पडण्यावर आहे, हें उघड आहे, या केसो भिकाजीच्या वाक्यावरून बनविलेलें, अहल्याबाईचा बंदोबस्त पोचट होता हें मत अगदीं चुकीचें आहे. 'अहिल्याबाई सुभेदाराहूनही ज्यास्त दाब ठेवून आहेत' हें केसो भिकाजीनेंच लिहिलें आहे. राजानें योग्य वेळीं कडकपणा कसा अमलांत आणावा हें अहल्याबाईस चांगलें समजत होतें, व त्याप्रमाणें ती अमलांतहि आणी. असो, पूर्वकालीन पत्रव्यवहारावरून सिद्धान्त ठरवितांना ज्या दोन गोष्टींची काळजी घेतली पाहिजे त्या आम्हीं मुद्दाम येथें विस्तारानें सांगितल्या. त्यांजवरून तुकोजीचें व अहल्याबाईचें भांडण पत्रव्यवहारांत जरी ज्यास्त दिसलें तरी तें मोठ्या स्वरूपाचें नव्हतें हें लक्षांत येईल. किंबहुना राघोबाच्या व तुकोजीच्या वर्तनांत जें मुख्य अंतर होतें तें हेंच कीं, हें भांडण कधींहि विकोपास गेलें नाहीं व त्याजपासून मराठी साम्राज्यास नुकसान पोहोंचलें नाहीं. हें कसें तें याच पत्रव्यवहारावरून दाखवितां येईल.

प्रथम गोष्ट ही कीं, अहल्याबाईचें व तुकोजीचें प्रेम कधींहि तुटलें नाहीं, ही गोष्ट विसाजी शामराज व केसो भिकाजी या दोघांसहि दिसून आली होती; ती पारसनिसांस कशी दिसली नाहीं याचें आश्चर्य वाटतें. भाग १, पान १५२ वर विसाजी शामराज लिहितो ( स. १७८१ ), " तुकोजीबाबाकडे येथोन बाईचे खिजमतगार अंतरंगें जात येत असतात. आग्रह विप्रांविषयींचा ( नारोगणेश ) फार आहे" भाग २, पान २२७ वर केसो भिकाजी लिहितोः ( स. १७९४ ) " बाह्यात्कार दाखवितात एक, आंतून चिरंजिवाशीं सूत्र खेळतात एक ! " तात्पर्य, अहल्याबाईनें वर्तणूक अशी ठेविली होती कीं तुकोजी तिच्यापासून कधींहि विलग झाला नाहीं. यांत तुकोजीचाहि सद्गुण घ्यावयाचा आहे. पण अहिल्याबाईचें शहाणपण, आत्मसंयमन, व एकंदर राजकीय धोरण लक्षांत घेण्याजोगें आहे. जसें एकादें वासरूं दाव्यानें बांधलेलें असलें म्हणजे त्यानें किती ओरड केली

तरी तें सुटून जात नाहीं त्याप्रमाणें अहल्याबाईनें तुकोजीस प्रेमरज्जूनें असें बांधिलें होतें कीं तो कधींही तिच्यापासून विलग झाला नाहीं. दुसरी गोष्ट ही कीं, वारन हेस्टिंगसनें अयोध्येच्या नबाबाकडून त्याच्या आईस व आजीस पिळून दोन कोट रुपये काढविले, तसा नारो गणेश तुकोजीकडून अहल्याबाईस पिळून काढण्याच्या विचारांत होता. पण त्यांत त्यास यश आलें नाहीं. याचें कारण, अहल्याबाईचा सावधपणा व फौजी जोर. तिच्यावर होळकरशाहीची फौज तिच्या अगाध पुण्यवत्तेमुळें चालून येण्यास कबूल नव्हती हें एक, आणि अहल्याबाई स्वतः मजबूत होती हें दुसरें. तिची फौजी तयारी कांहीं कमी नव्हती. तिसरी गोष्ट, ती जमाखर्चाच्या कामांत इतकी चोख होती व एकंदर जमाखर्ची बाजू इतकी उत्तम समजे कीं नारोगणेशाचीं सर्व कारस्थानें तिच्यापुढें लंगडीं पडत. " तुम्हीं आपल्या बायकांस सुपारीच्या खांडांसारखें खाऊन बसलां आहांत. तशी मी हार जाणारी नव्हे. तुम्हीं व सुभेदार दोघांनीं मिळून मजवर चालून यावें. मी पाहून घेईन. " अशी धमकी देण्याशिवाय तिनें आपले हिशोब महादजीस नीट समजावून देऊन घोटाळा कोठें होत आहे हें दाखवून त्यास लवकरच गप्प बसवलें. पण नारोगणेशानें नानाफडणिसास बरेच दिवस चकवलें व त्यास असें भासविलें कीं, राज्याचा लगाम एका हातीं आणि घोड्यावर बसणारा दुसरा अशा स्थितीमुळें फौजेस वेळेवर पैसा मिळत नाहीं. तेव्हां नानांनीं अहल्याबाईस दोन गोष्टी सांगितल्या व त्यापैकीं कोणतीहि एक कबूल करण्यास सांगितलें. " तुम्हीं दरमहा घेऊन नुसती दौलतीची अब्रू सांभाळावी आणि सर्व कारभार तुकोजीस द्यावा. किंवा सर्व कारभार तुम्हीं साभाळून फौजेस लागेल तो खर्च पुरवावा. " अहल्याबाईनें तत्काळ जबाब दिला, ' पहिली गोष्ट आम्हांस कदापि कर्तव्य नाहीं. दुसरी म्हणतां तर ती कबूल करण्यास हरकत नाहीं. पण एक अट तुम्हीं मान्य केली पाहिजे. ' येथील पत्रांतून प्रत्यक्ष उतारा घेणें जरूर आहे व तो फार महत्त्वाचा आहे. भाग १, पान १३२. " दुसरा मजकुर; बाई बोलली जे, तुकोजीबावांनीं फक्त चाकरी करून असावें आणि महालांचा बंदोबस्त करून खर्चाची सरबराई आम्हीं करावी, म्हणोन श्रीमंतांनीं लिहिलें. त्यास फार उत्तम आहे. ये गोष्टींचें संकट नाहीं. सुभेदारामागें इतके दिवस हाच कारभार करीत आलों आहों. प्रस्तुत मात्र कारभारी यांनीं उपहास मांडला आहे. श्रीमंतांचे मर्जीचा कल तसाच दिसून आला. अस्तु, इतकेंहि होईल. परंतु जी फौज

ठेवणें त्याची हजरगणती व लोकांच्या बोल्याचाल्या करणें त्या, व कोणास काय देणें व तगीरीबहाली लोकांची करणं येविषयीं हुकुम आमचा. माझा कारकून कवडीपासून लक्षावर खर्च करणें तो करील. हिशेब आम्हांस दाखवील. तुकोजीबावांनीं चाकरी करावी. पैसा खर्च ठायाठाया लागेल तो आमच्या कारकुनांनीं चौकशी करून खर्चावा. आपल्या मर्जीशिवाय खर्च-वेंच भलताच त्यांनीं करूं नये. हेंहि आम्हांस कबूल आहे असें बोलली. ” रुपाया कोणत्या खाड्यांत जातो हें तिनें येथें नानास स्पष्ट दाखविलें आहे. फौजेकरितां म्हणून घेतलेला रुपाया कोण कसा खातो हें तिनें नानास येथें समजाविलें आहे. या गोष्टी नानास कळत नव्हत्या असें नव्हतें, आणि म्हणूनच बाईनें कारभाऱ्यांनीं उपहास मांडला आहे असे निराशेचे उद्गार काढले आहेत. कागदावर फौज दाखवावयाची जास्त, ठेवायची कमी; फौजेकरितां रुपये मागावयाचे, खर्च आपल्या खाजगीकडे करायचा, हें तुकोजीचें खाणें. बोल्याचाल्या करतांना हिस्सा ठेवायचा; नोकरांची बदली उगीच करायची; पैसे प्रत्यक्ष वाटतांना हातीं एक द्यायचे, खर्चांत एक दाखवायचे, नैमित्तिक खर्चाचें बिल करतांना भलतेंच बिल करायाचें; या खायच्या जागा नारोगणेशाच्या. अशा लुच्चेगिऱ्यांनीं तुकोजी व नारोगणेश यांनीं आपल्या पुंज्या निरनिराळ्या बनविल्या होत्या. अहल्याबाईनें त्या वाटा बंद करण्याची अट घालतांच तीहि गोष्ट राहिली. ज्या बाईनें सर्व हिंदुस्थानभर मोठमोठीं इमारतीचीं कामें केलीं तिला कोठेंहि फौजेस पैसा पुरवायाचें कठिण पडलें असतें असें नाहीं. सारांश, थोरल्या सुभेदारापासून कारभार करीत आलेल्या त्या बुद्धिवान् व कर्तृत्ववान् बाईस नारो गणेश फसवील—हिशोबाच्या कामांत फसवील—हें शक्यच नव्हतें. सरशेवटीं नारो गणेश आपल्या दुष्ट कारस्थानांस बळी पडला हें येथें सांगितलें पाहिजे. त्याजजवळ फौजेच्या कामांत खाल्लेला रुपया अतिशय झाला तेव्हां तुकोजीनें त्यास लुटण्याचा प्रयत्न केला. तुकोजी त्याजवळ पैसा मागूं लागला; तो देईना. तेव्हां त्यास कैदेंत टाकलें; तरी तो देईना, तेव्हां हाल केले. पण जो कांहीं जप्तींत रुपया सांपडला तेवढाच, बाकी रुपाया नारोगणेशानें दिला नाहीं. रुपाया देऊन जन्माचें कार्य बिघडावें त्यापेक्षां त्यानें मरण कबूल केलें ! नारो गणेशाच्या हालअपेष्टांची कींव अहल्याबाईसच आली. तिणें ब्राह्मणास न छळण्याविषयीं तुकोजीस निरोप पाठविला. परंतु त्याचा उपयोग न होतां तो हालअपेष्टेंत मरण पावला. आपल्या कारभाऱ्यास खूप

चरू द्यावयाचें व त्याचें पोट ठरारलें म्हणजे जळूसारखें त्यास पिळून काढावयाचें व पैसा व यश दोन्हीं आपण मिळवावयाचें, ही एक इकडील संस्थानिकांची कोत्या दृष्टीची कुटिल नीति प्रसिद्ध आहे. असो.

नारोगणेशास कृतकर्माचीं व बाईच्या द्रोहाचीं चांगलींच फळें मिळालीं. परंतु त्याच्या लुच्चेगिऱ्यांनीं बाईची बाजू कधींच हीन दिसली नाहीं. नारोगणेशाच्या लुच्चेगिऱ्या व डावपेंच कसे असत याचें आणखी उदाहरण येथें देण्यासारखें आहे. सवाई माधवरावाच्या लग्नाच्या खर्चाची पट्टी होळकरांच्या संस्थानावर दोन लक्ष आली. ती देण्यास बाई तयार व खुषी होती. पण नारोगणेशानें एक कारकुनी फांदा मारला. सदर रुपये मागील बाकींपैकीं देणें, असा नानाकडून त्यानें निरोप पाठविला. बाईच्या लक्षांत तो पेंच ताबडतोब आला. मागील बाकी कोणती म्हणून तिनें लागलाच उलट प्रश्न केला. संस्थानचा हिशोब खडानखडा ती नानास देत असे व दौलतीच्या खर्चांतून राहिलेला रुपया तुकोजीस पाठवी. मागील बाकी कोणती हा प्रश्न आल्याबरोबर प्रकरण अडकून पडलें. बाईनें लग्नपट्टीचा रुपया आनंदानें द्यावा असें केसो भिकाजीस वाटे. पण बाईस त्याजविषयीं खंत नव्हती. तीस आपल्या अंगीं चुकून दोष लावायाचा नारोगणेशाचा प्रयत्न विफल करून त्याचे दांत त्याच्या घशांत पाडावयाचे होते. ( भाग १. पान १९७ ). सरशेवटीं शिरस्त्याप्रमाणें लग्नपट्टीची फाळणी सर्व माहालांवर झाली व तिनें रुपया वसूल करून पाठवून दिला. असे एक ना दोन कित्येक प्रकरणांत कारकुनींत व जमाखर्चांत बाईच्या अंगीं दोष लावावयाचा प्रयत्न नारोगणेशानें केला, पण तो फुकट गेला. या कारणानें या भांडणास उग्र स्वरूप देणें नानास शक्य झालें नाहीं.

चवथी व शेवटली गोष्ट ही कीं, जो प्रश्न या भांडणाचे वेळीं बाईनें नानास विचारला तोच आह्मी पारसनिसांस विचारतों. तुकोजीच्या व बाईच्या भांडणानें सरकारांत पेंच कोणते पडले, कोणत्या प्रसंगीं सरकारास नुकसान आलें आणि होळकराकडून सरकारचाकरी होण्यास कोठें आडकाठी आली, हें पारसनिसांनीं एक दोन उदाहरणांनीं दाखवावयास पाहिजे होतें. बाईनें राज्य करावें, तुकोजीनें फौजेची नोकरी करावी, या प्रथम स. १७६६ त ठरलेल्या व्यवस्थेनें कोणतें नुकसान झालें हें बाईनें स्पष्ट विचारलें आहे. ह्या ठिकाणचे बाईचे उद्गार किती तेजस्वितेचे, स्वार्थ-

त्यागाचे व स्वामिनिष्ठेचे आहेत! हें पत्र पारसनिसांनींच छापलें आहे व विस्तारांत उतरून घेतलें आहे. (पान १६७. मे, १९०७). "आमच्या केल्यामुळें त्यास (तुकोजीस) अगर सरकारांत पेंच कोणते पडले हें त्यास पुसावयाचें होतें. त्यास ऐसें तरी कैसीयास लिहितात? आह्मांमुळें सरकार चाकरीस अंतर पडतें ऐसें प्रत्ययास आलें असल्यास आह्मांस त्यांनीं साफ लिहावें कीं तुम्हांमुळें पेंच पडतात, तुम्हीं आमचे राज्यांतून जावें. ही गोष्ट आह्मांस कबूल आहे. कारण कीं आह्मांमुळें राज्यास पेंच पडतात, त्यास आमचे वडिसांपासून ही चाल नाहीं कीं राज्याचें अनिष्ट चिंतावें...." नुसतीं घरांतील भांडणें प्रत्येक घराण्यांत चालतात. पण त्यापासून गोष्ट विकोपास जाऊन अनिष्ट काय झालें हें दाखवावयास पाहिजे, तें पारसनिसांनीं दाखविलें नाहीं. ह्याच पत्रव्यवहारावरून आह्मांस तर स्पष्ट दिसतें कीं सरकारचाकरीच्या वेळीं अहल्याबाईनें कधींहि गोष्ट विकोपास जाऊं दिली नाहीं. उदाहरणार्थ, प्रथम तुकोजी भांडण करून नारोगणेशाच्या सल्ल्याप्रमाणें बाईस न भेटतां दक्षिणेंत नानास मदत करण्याच्या निमित्तानें गेला, तेव्हां बाईनें म्हटलें "आधीं सरकारकाम, तें करावें. आम्हांस न भेटून गेले येविषयींचा अन्यभाव आमचे चित्तांत नाहीं." (भाग १. पा. ९८.) दुसरें, तुकोजीनें बाईची अशी अप्रतिष्ठा केली तेव्हां सरंजामी लोकांनीं बाईस लिहून पाठविलें "आह्मी तुह्माकडे निघोन येतों." पण बाईनें त्यांस बोलाविलें नाहीं. "ते चाकरीचा बहाणा करून गेले आहेत. श्रीमंतांकडील अर्थ पुरतेपणीं आम्हांस कळल्यावर काय तुम्हास आज्ञा कर्तव्य ते करूं" असा तिणें त्यांस शहाणपणाचा, तडजोडीचा व स्वार्थत्यागाचा निरोप पाठविला (भाग १, पा, ८३.). तिसरें ज्या ज्या वेळेस तुकोजी खरोखर सरकारमसलतीवर होता त्या त्या वेळेस अहल्याबाईनें हें भांडण बाजूला ठेविलें आहे. तुकोजी १७८४-८५ सालांत टिपूच्या मसलतीवर होता, तेव्हां पैशाचा पुरवठा तिनें भांडण विसरून केला असें दिसतें. भाग २, पान ६३, "तीन लक्षांच्या हुंड्या केल्या." पान ६५, "दोन लक्षांचा भरणा करतील यांत उणें नाहीं." तसेंच पान ६७, पहा "अरबाचा कांहीं ऐवज राहिला नाहीं. सालमजकूरचे रसदेचा ऐवज जमा होईल, त्यांतून येथील खर्च वजा होऊन, बाकी ऐवजाची रवानगी होईल." पा. ७१, "नारो गणेश याचें म्हणणें आम्हांस ठाऊक नाहीं." (हें एक

प्रकरण पाहण्यासारखें आहे. त्याचे दांत बाईनें त्याचाच लेख पाठवून पुन्हा पाडले !). पा. ९९, " बोलली कीं हुताशनी झाल्यावर रुपये पाठवितों. " पा. १०७, " मी कोठून देऊं ?–मजजवळ काय आहे ?- हीं भाषणें सांप्रत नाहींत. तीन लक्ष रुपये राहिले, त्यांची रवानगी करतात.... छावणीचे उपयोगी ऐवजाची रवानगी व्हावी." पान १७३. सन १७९० त तुकोजी उत्तरहिंदुस्थानांत जयपुराकडे होता त्यावेळेस त्याचीं पत्रें आलीं कीं खर्चाची पोक्त बेगमी करून द्यावी. त्यास " त्या दिवशींच देशींचे महाल व इकडील महालांची याद करून सावकारास ऐवज लावून दिल्हा. श्रावण अखेरीस रवानगी करतील. " पान १९१, " सुभेदाराची निकड जाणोन वराता लिहोन महालोमहालींचे वकील जाबसालास येथें आहेत त्यांजकडोन निशा करवून घेतली. " पान २५१, " बाईनीं दोन लक्ष रुपये खासगी दिले. " या वेळेस शिलेदारांचा तंटा पडला होता तो बाईनें तोडला, आणि तुकोजीस सन १७९४ त दक्षिणेस रवाना केलें. पान २६२, तुकोजीनें पुणेदरबारापासून पैसा घेतला त्या वेळेस बाई म्हणाली, " सरकारचा पैसा कां घ्यावा ? अशी काय गांठ येऊन पडली होती ? लाख रुपये पाठविले होते. आणखी ऐवज पाहिजे म्हणून तजविजेंत असतां सरकारचा पैसा घ्यावा ही सल्ला चांगली न केली. ते जबरदस्त, त्यांचा पैसा न पावला तर महाल जप्त करून घेतील. ( दुसऱ्या व्याशतींचा पैसा घेण्यांत काय पेंच पडतात हें बाई चांगलें समजत होती. ) सरदार आपले पुंजीत हात लावीत नाहींत. " येथें एक गोष्ट सांगण्यासारखी आहे. खासगी व दौलत असे दोन भाग होळकरशाहींत असत. ह्या व्यवस्थेवर 'पुरुषोत्तमा'नें प्रतिकूल टीका केली आहे. पण या व्यवस्थेचा स्तुत्य हेतु हा आहे कीं, राजानें आपल्या खासगी चैनीकडे किंवा इच्छेकडे ठराविक रकमेपेक्षां किंवा उत्पन्नापेक्षां ज्यास्त पैसा खर्च करूं नये. दौलतीचा पैसा सर्व दौलतीकडे म्हणजे राज्याकडे व प्रजेकडे खर्च व्हावयाचा, असा निर्बंध असल्यानें राज्याची निश्चित व्यवस्था होऊं शकते. आतां कोणत्याहि व्यवस्थेची अव्यवस्था करणें हें व्यवस्थापकांच्या हातीं असतें हें उघड आहे. दौलतीच्या खर्चांत लुच्चेगिरी करून बचत काढून खानगींत टाकणें हें सर्वथैव गैर होय. जसें तुकोजी करीत होता. फौजेंत बचत करून व इतर रीतीनेंहि त्यानें आपली पुंजी बनविली होती. दुसरी गोष्ट ही कीं, दौलतींतून खासगी खर्च करावयाचा नाहीं खरें, पण प्रसंगविशेषीं खासगींतून दौलतीकडे खर्च केला

पाहिजे. "आत्मानं सततं रक्षेद्दारैरपि धनैरपि." जर राज्यासच आपत्ति होईल तर खानगी कोणत्या उपयोगास येणार ? या न्यायानें बाईनें शिलेदारांचा प्रसंग पडला तेव्हां खानगींतून दोन लक्ष रुपये दिले, व तुकोजीनें आपल्या पुंजीस हात न लावतां सरकारचें कर्ज काढलें. सारांश, हरएक बाबतींत अहल्याबाई राज्यव्यवस्थेचीं मर्में कशी जाणत होती हें यावरून स्पष्ट होतें. तिनें याच मार्गास अनुसरून तुकोजीबाबाच्या व आपल्या भांडणास कधींहि उग्र स्वरूप येऊं दिलें नाहीं व तुकोजीस किंवा राज्यास किंवा मध्यवर्ती साम्राज्यसत्तेस तिच्या या भांडणानें कधींहि नुकसान पोंचलें नाहीं. इतिहासमर्मज्ञ पारसनिसांनीं अशाप्रकारचा सिद्धान्त पुढे मांडावा याचें आम्हांस राहून राहून आश्चर्य वाटतें. आमच्या मतें मालकम साहेबानें या गोष्टींत पूर्ण चौकशी करून जो अभिप्राय नमूद केला आहे, तोच या पत्रव्यवहारावरूनहि दृढ होतो.

पण येथें एक गोष्ट कबूल केली पाहिजे. तुकोजी महत्त्वाकांक्षि बनो पडून अहल्याबाईपासून राज्यकारभार काढून घेण्याविषयीं प्रयत्न करी या गोष्टीस जरी विशेष स्वरूप अहल्याबाईच्या शहाणपणानें आलें नाहीं, आणि मराठीराज्याची नुकसानी कोणतीच झाली नाहीं, तत्रापि तो असें न करता आणि आपल्या पहिल्या कराराप्रमाणें केवळ फौजेची चाकरी करून अहल्याबाईशीं निष्कपटपणें वागता, तर होळकरशाहीस फारच निराळें स्वरूप प्राप्त झालें असतें. महादजीनें जसें शिंदेशाहीस नांवारूपास चढविलें तसें अहल्याबाईनें होळकरशाहीस राजकीय बाबतींतहि लौकिकास चढविलें असतें हें निःसंशय आहे. राज्याचीं चार मुख्य अंगें, Finance, Administration, Foreign relations, and Military म्हणजे फडनिसी, दिवाणी, परराज्य व फौज; या चारी अंगांत अहल्याबाई कुशल होती. जमाखर्चांत ती इतकी तरबेज होती कीं रयतेपासून तिनें ज्यास्त किंवा अन्यायानें कांहीं न घेतां तिला खर्चाची कधींच ददात पडली नाहीं. दिवाणीचा तिचा अम्मल म्हणजे केवळ रामराज्याचा अम्मल हें पूर्वीं सांगितलेंच आहे. परराज्यांशींहि तिचे संबंध अप्रतिम होते. सर्वांवर तिची छाप होती. सर्वांकडे तिचे वकील किंवा कारकून असून ती प्रत्येक चालू विषयांत जागृत असे व ती सर्वांशीं न्यायानें व सलोख्यानें वागे. राहिली फौज, तिची व्यवस्था तुकोजीकडे होती. त्यानें निष्कपटपणानें सर्व व्यवहार

मल्हाररावाप्रमाणें अहल्याबाईस समजाविला नाहीं. उत्तरहिंदुस्थानांत असतां लूट काय मिळाली, खर्च काय झाला, वगैरे गोष्टी त्यानें तीस न कळविल्याबद्दल तिनें दिलगिरीचे उद्गार काढले आहेत. असेंच दक्षिणेंत असतां दोघांचा पत्रव्यवहार नेहमीं चाले व लढायांच्या हालचालीची तिला सर्व खबर वारंवार पोंचे व परराज्यप्रकरणीं सर्व गोष्टी तुकोजी तिच्या सल्ल्यानें करी. पण फौजी खर्च व बंदोबस्त यासंबंधानें त्यानें नेहमीं अंतर ठेविलें. यामुळें होळकरशाहीची फौज म्हणजे एक नमुनेदार फौज असें अहल्याबाईनें करून दाखविलें असतें तसें झालें नाहीं, व मराठी राज्यांत शिवाजीनंतर पेशवाईचा अन्त होईपावेतों, फौजेची बाकी हा जो एक धांगडधिंगा चाले (आरबांनीं तनख्याच्या बाकीकरतां नानाफडणिसाचें प्रेत कित्येक तास अडकवून ठेवलें होतें ही गोष्ट प्रसिद्ध आहे) तो होळकरशाहींतहि मिटला नाहीं. फौजेला वेळच्यावेळेवर पगार मिळणें हें किती अगत्याचें आहे, हें सुज्ञ राज्यकर्त्यांस ठाऊक असतें. महाभारतांत नारदानें धर्मास राज्यासंबंधी उपदेश केला आहे, त्यांतहि हीच आज्ञा मुख्य आहे व हल्लीं इंग्रजी फौजेंत जी करामत आहे तीहि याचमुळें आहे. अहल्याबाईस हें सर्व समजत असलेंच पाहिजे. परंतु सैन्याची बाब तुकोजीच्या हातांत असल्यानें तीस सैन्याची नमुनेदार व्यवस्था ठवतां आली नाहीं, याजबद्दल खेद वाटल्यावांचून राहत नाहीं.

अहल्याबाई व मेरिया थेरेसा यांच्या राजकीय चरित्रांत जो मोठा फरक दिसतो तो हाच. समान दिसणाऱ्या राजकीय व्यक्तींची तुलना करणें हा इतिहासकाराचा एक मौजेचा खेळ आहे. या दृष्टीनें 'पुरुषोत्तमा'नेंहि हिंदुस्थानांतील कित्येक राज्यकर्त्रींची व अहल्याबाईची तुलना केली आहे. (पा. ३२०) या तुलनेंत चांदबिबीचें नांव 'पुरुषोत्तमा'नें कसें दिलें नाहीं याचें नवल वाटतें. चांदबिबीचा दिवाणी व फौजी कारभार चांगला न्यायाचा, शहाणपणाचा व शूरत्वाचा होता. असो, हिंदुस्थानांतील ऐतिहासिक स्त्रियांपैकीं कोणीहि अहल्याबाईच्या उच्चपदास पोंचत नाहीं, हें 'पुरुषोत्तमा'चें म्हणणें वाजवी आहे; किंबहुना "न न्यायधर्मनिरता अन्या कलिमाजि ऐकिली कन्या" हा मोरोपंताचा सिद्धान्तच खरा. पाश्चात्य देशांतील राजकर्त्यांत इलिझाबेथचें नांव आपल्यापुढें प्रथम साहजिक येतें. प्रॉटेस्टंट धर्माची व इंग्लंडच्या आरमारी वर्चस्वाची स्थापना इलिझा-

बेथच्या कारकीर्दींत झाली, यामुळें इंग्लिश लोकांस तिच्याविषयीं अभिमान वाटतो हें योग्यच आहे. पण अहल्याबाईचा दर्जा इलिझाबेथहूनहि ज्यास्त होय, असें कित्येक इंग्रेज सुद्धां कबूल करतात.* आमच्या मतें अहल्याबाई व मेरिया थेरेसा यांचें अधिक साम्य आहे. मेरिया थेरेसा ही अहल्याबाईची समकालीन होती. तिचा व अहल्याबाईचा जन्म दहा वर्षांच्या अंतरानें होता. ती इ. स. १७४० त आस्ट्रियाच्या गादीवर आली तेव्हां तिचें वय २४ वर्षांचें होतें. तिची त्यावेळची अनाथ स्थिति पाहून, अहल्याबाईवर ज्याप्रमाणें राघोबानें स्वारी केली त्याप्रमाणें फ्रेडरिक धि ग्रेट यानें प्रारंभींच तिच्यावर चाल केली. परंतु तिनें धैर्यानें व पराक्रमानें आपलें राज्य संभाळलें; तें शेवटपर्यंत चांगल्या स्थितींत संभाळलें. ती स्त्री असल्यामुळें तिच्या अधिकारांत प्रथम तिचा नवरा व नंतर तिचा पुत्र जोसेफ हे विभागी होते. तुकोजीहि राज्यांत विभागी असून अहल्याबाईचा जरी प्रत्यक्ष पुत्र नव्हता तथापि तो तिला आई मानीत असे. अहल्याबाईची व तुकोजीची जशी घासाघासि होत असे, तशीच राज्यव्यवस्थेच्या बाबतींत मेरिया थेरेसा व जोसेफ यांची होत असे. पण त्यांचें भांडण कधींहि विकोपास गेलें नाहीं. मेरिया थेरेसा ही जोसेफची प्रत्यक्ष आईच होती. पण राज्याच्या भांडणांत पिता, माता, बंधु, पुत्र इत्यादि संबंध सुद्धां बाजूस राहतात हें इतिहासावरून व्यक्त आहे. तेव्हां मेरिया थेरेसा व जोसेफ यांचें भांडण विकोपास गेलें नाहीं ही तारफेचीच गोष्ट होय. तुकोजी तर मानलेला पुत्र. मातीचे लावलेले कुले कोठपर्यंत टिकणार? तथापि अहल्याबाईनें त्याचें व आपलें भांडण विकोपास जाऊं दिलें नाहीं, हें अहल्याबाईचें मोठेंच कर्तृत्व होय. सर्वांत मोठें साम्य हें कीं, मेरिया थेरेसा अहल्याबाईइतकी कदाचित् नव्हे तरी उच्च दर्जाची धर्मात्मा होती. तिचा आपल्या धर्मावर पूर्ण विश्वास होता, तरी

* इलिजाबेथ सनदशीर राज्यव्यवस्थेची पुरस्कर्त्री होती असें मानून तिची व अहल्याबाईची तुलनाच होऊं शकत नाहीं असें 'पुरुषोत्तम' म्हणतो, पण तें आम्हांस बरोबर वाटत नाहीं. इलिजाबेथनें प्रजापक्षाचा पुरस्कार केला नाहीं; किंबहुना युरोपच्या सर्व इतिहासांत सनदशीर राज्यव्यवस्थेचा जो पुरस्कार झाला तो राजेलोकांच्या अनुग्रहानें नव्हे तर विग्रहानेंच होय. प्रजापक्षास संमति देऊन जगाच्या इतिहासांत जपानचा बादशाह मिकाडो यानेंच आपलें नांव अजरामर केलें.

ती इतरांचा द्वेष करीत नसे. तिचें आचरण निर्दोष होतें. तिचा दानधर्महीं मोठा होता. She never went anywere without a handful of gold coins to distribute among beggars. The consequence was that the Empress yearly spent about six millions of florins,--*Historians' History of the World*, Vol. XIV.

तसेंच अहल्याबाईप्रमाणेंच मेरिया थेरेसा हिला गरीबांची व दीनांची दया येत असे व त्यांचें दुःख निवारण करण्यास ती मनोभावानें झटे. That in which Maria Theressa stood alone, was the rich emotional life of this wonderful woman. There had been kindly men among her forefathers, but to none of them had it occurred to step beyond the family to go down in thought if not in person to the people and out of pure humanity to strive without intermission to improve their lot. याप्रमाणें या दोन्ही बायांचें खासगी वर्तन उदात्त धार्मिकतेनें भरलें होतें. हीच धार्मिकता त्यांच्या राजकीय वर्तनांतहि दिसून येते. अहल्याबाईनें राज्यकारभार स्वीकारला व शेवटपर्यंत चालविला तो महत्त्वाकांक्षेनें नव्हे, तर ही जबाबदारी परमेश्वरानें आपल्यावर सोंपविली आहे, ही आपल्यास बजावलीच पाहिजे, या भावनेनें. मेरिया थेरेसा इचेहि उद्गार असेच आहेत.

" With joy would I have been insignificant and remained Archduchess of Tuscany had I believed that God had so willed it; but as He has chosen me to bear the great burden of government; I hold it on principle and consider it my duty to apply all my resources to the task. "

भाषांतरः--" जर परमेश्वराची मर्जी अशीच आहे असें मला वाटलें असतें, तर मी आनंदानें खालच्या स्थितींत वागून केवळ टस्कनीची जहागिरदारीणच राहिलें असत्यें. पण ज्या अर्थी परमेश्वरानें राज्याचा भार वाहण्यास मला पसंत केलें आहे त्या अर्थी मी हा भार केवळ धर्म म्हणून वाहत्यें, आणि त्याच्या कामास माझी सर्व शक्ति लावणें माझें कर्तव्यकर्म समजत्यें. "

दुसरें, अहल्याबाईप्रमाणेंच परराज्याचा कांहीं हिस्सा आपल्याकडे यावा अशी मेरिया थेरेसा इचीहि इच्छा नव्हती. ती हा अन्याय आहे

असें समजे. पोलंडची प्रथम विभागणी झाली व आस्ट्रियान पोलंडचा काहीं भाग घेतला; तेव्हां तिला वाईट वाटलें.

Maria Theressa even went further and contested the justice of the principle which had been laid down, that if two states were in the act of enriching themselves by dishonest means, a third must necessarily be driven for weighty political reasons to do the same. For this cause she declared afresh she would take no part of the Polish dominions.

सारांश, तिचा राजकीय अंतरात्मा अहल्याबाईप्रमाणेंच धार्मिकतेनें भरला होता. तिनें राज्यहि बरींच वर्षे केलें. १७४० पासून १७८० पर्यंत ती आस्ट्रियाची राणी व जर्मनीची एंप्रेस अथवा महाराणी होती. मरणसमयीं तिचें वय ६५ वर्षांचें होतें. अहल्याबाईचेंहि वय मरणसमयीं पुष्कळ म्हणजे याहूनही ज्यास्त, सुमारें ७० वर्षांचें होतें.

याप्रमाणें या दोन उदात्त अंतःकरणाच्या व आचरणाच्या बायांचें बरेंच साम्य होतें. पण दोन गोष्टींत मेरिया थेरेसा अहल्याबाईहून अधिक होती. मेरिया थेरेसा हिनें आपल्या सैन्याची जशी सुधारणा केली तशी अहल्याबाईस करतां आली नाहीं. ठाणबंदी कवाईत शिकलेल्या फौजेच्या जोरावर फ्रेडरिक धि ग्रेटनें तिच्याशीं प्रारंभींच टक्कर देऊन तिचा सायलीशिया प्रांत खाल्ला. ही गोष्ट लक्षांत घेऊन तिनें आपल्या फौजेची सुधारणा केली व आपलीहि फौज जय्यत तयार केली. She did much for her army. The little force of about 15000 men with which her general opposed the Prussians at Mollwitz, bears no proportion to the army of 1,70,000 men which met the same foe 37 years later. म्हणजे, प्रारंभीं तिजजवळ १५,००० सैन्य होतें तें ३७ वर्षांनंतर एक लक्ष सत्तर हजार झालें. यामुळें तीस प्रशियाशीं व इतर राष्ट्रांशींहि टक्कर देतां आली. या बाबतींत तिच्या पुत्राचें तीस साह्य होतें. अहल्याबाईची स्थिति याच्या उलट असल्यानें तीस सैन्यासंबंधानें कांहीं करतां आलें नाहीं हें वर सांगितलेंच आहे.

दुसरी फरकाची गोष्ट ही कीं, मेरिया थेरेसा हिचे एकंदर दिवस सुखांत गेले; अहल्याबाईचे एकंदर दिवस दुःखांत गेले. मेरिया थेरेसाचा नवरा तिजवर प्रीति करणारा असून तो बरेच दिवस जिवंत होता. तसेंच

तिला प्रेम करणारी पुत्रपौत्रादि संतति असून मरे तोंपर्यंत त्यांचें तिला सुख मिळालें. या उलट अहल्याबाईचा नवरा व्यसनी व छंदी असून लवकरच वारला. तिचा पुत्र वेडसर व दुष्ट असून तोहि लवकर मेला. तिला मुलीकडून नातू होता तो तिच्या मोठ्या प्रेमांतला असे, व तोहि आज्ञाधारक होता. आपल्या नातवास राज्य द्यावयाचें तिच्या मनांत आहे असें वाटून तुकोजी व तुकोजीची बायको नेहमीं असंतुष्ट असत. पण ही गोष्ट खोटी आहे असे अहल्याबाईचे प्रत्यक्ष उद्गार या पत्रव्यवहारांत नमूद आहेत. होळकराचें राज्य होळकराच्या वंशांत राहणें धर्मशास्त्रदृष्ट्या रास्त होतें. तें मुलीच्या वंशाकडे जावें असें धर्मशील अहल्याबाई कसें इच्छील?* आम्हांस असें वाटतें कीं हा संशय दूर करण्याकरितांच तिनें कांहीं दिवस तुकोजीचा मुलगा मल्हारराव यास हाताशीं धरलें व आपल्या वडील बंधूच्या लेकीच्या लेकीशीं त्याचें लग्न केलें. लग्न करतांना तिनें वंशाचा उच्चार मुद्दाम मल्हारराव, पुत्र खण्डेराव, पुत्र मालेराव, पुत्र मल्हारराव असा करविला. हा मुलगा पुढें अति उन्मत्त निघाला; शेवटीं त्यास अहल्याबाईनें कैदेंत टाकलें. तथापि गर्भाधानाचा विधि तिनें त्याचा उन्मत्तपणा सहन करून आपल्या येथें उरकून घेतला, हें या पत्रव्यवहारावरून दिसतें, व त्यावरून तडजोडीचें धोरण व तिची सहनशीलता हीं लक्षांत येतात. असो. नथ्याबा फणशे तिचा नातू तिच्यासमोर १५९० त वारला. त्यानंतर एका वर्षानें तिचा जांवई मरून तिची एकुलती एक मुलगी मुक्ताबाई ही सती गेली. यावेळेस तिला अतोनात दुःख झालें. आपलीं सर्व अपत्यें आपल्यासमोर मरणें यासारखें आईस दुसरें दुःख कोणतें? मुक्ताबाईचा नवरा यशवंतराव फणशे (नथ्याबाचा बाप) कालऱ्यानें एकाएकीं वारला तेव्हां मुक्ताबाई सती जावयास निघाली. अहल्याबाईनें तीस आपलें उदाहरण देऊन माघारें फिरवण्याचा यत्न केला. पण अहल्याबाईच्या व मुक्ताबाईच्या स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर होतें, तें त्या शहाण्या मुक्ताबाईनें दाखवून दिलें. अहल्याबाई मागें राहिल्यानें राज्यभार तिच्यावर पडून जगताचें कल्याण झालें. मुक्ताबाई मागें राहिल्यानें कोणाचें कल्याण

* त्यास होळकराची गादी द्यावयाचा तिचा बेत होता असें 'पुरुषोत्तम' पान २४७ वर लिहितो तें कशावरून? तें आम्हांस खरें दिसत नाहीं.

व्हावयाचें ? याशिवाय अहल्याबाई वृद्ध झाल्यानें लवकरच मरणार. तिच्या पश्चात् तुकोजी व रखमाबाई यांच्याच कचाट्यांत मुक्ताबाई सांपडणार ना ? यापेक्षां नवऱ्याबरोबर सहगमन करण्याचा हा पुण्य व मंगल प्रसंग तिनें साधावा हेंच श्रेयस्कर. सारांश, मुक्ताबाई नवऱ्याबरोबर सती गेली; व त्या प्रेमळ पुण्यात्मा म्हातारीनें तो दुःखद प्रसंग प्रत्यक्ष पाहत असतां आपल्या किंकाळ्यांनीं आकाशपाताळ एक केलें. ही दुःखकारक हकीकत मालकम वगैरे इतिहासकारांनीं वर्णिलीच आहे; व 'पुरुषोत्तमा' नेंहि ती सरसतेनें व सहानुभूतीनें वर्णन केली आहे. ती वाचून 'दुःखसंवेदनायैव रामे चैतन्य-मर्पितम्' ह्या भवभूतीच्या उक्तीची आठवण होते. अशो, त्या देवतास्वरूपी स्त्रीचें मनुष्यत्व या ठिकाणीं व्यक्त झालें. मानवी स्वभावानुरूप झालेला तिचा परम शोक वाचून आपल्याहि डोळ्यांतून पाणी येतें. त्या देवीचें मनुष्यत्व यावेळीं अन्य रीतीनेंहि व्यक्त झालें. रखमाबाई व अहल्याबाई यांचें परस्परांविषयीं अंतःकरण शुद्ध नव्हतेंच. यांत दोष रखामाबाईचाच होता हें पूर्वी सांगितलेंच आहे. रखमाबाई इंदुराहून या प्रसंगीं अहल्याबाई-च्या समाचारास निघाली. पण अहल्याबाईनें तीस समाचारास येऊं दिलें नाहीं. नथ्याबा मेला त्यावेळेस ती समाचारास गेली नाहीं. ही तिनें मोठीच चूक केली होती. कदाचित् मुक्ताबाईस दुसरा पुत्र होऊन त्यास अहल्याबाई गादीचा वारस करील असें तिला वाटलें असावें. शेवटीं मुक्ता-बाई व तिचा नवरा दोघेहि गेले; वंशक्षय झाला; तेव्हां अंतर्यामीं आनंदानें आतां समाचारास येत आहे असें अहल्याबाईस साहजिक वाटलें. तिनें तीस महेश्वरांत पाय ठेवूं दिला नाहीं. रखमाबाईनें व तिच्या तर्फेच्या माणसांनीं गयावया करून पुष्कळ प्रयत्न केले. परंतु म्हातारीनें आपला हेका सोडला नाहीं. शेवटीं रखमाबाई दर्शन न होतां खिन्न होऊन इंदुरास परत गेली.* अहल्याबाईसारख्या पुण्यवान् देवतुल्य स्त्रीनें जीस झिडकारलें तिची सर्व लोकांत अप्रतिष्ठा झाल्याशिवाय कशी राहणार! यानंतर रखमाबाई ( बहुतकरून याच दुःखानें असें वाटतें ) लवकरच मरण पावली, असें या पत्रव्यवहारावरून दिसतें. रखमाबाईविषयींचा हा अत्यंत त्वेष व मुक्ता-बाईविषयींचा हा अत्यंत शोक, या वृत्ति पाहून—वज्रादपि कठोराणि मृदूनि कुसुमादपि । लोकोत्तराणां चेतांसि को हि विज्ञातुमर्हति ॥ असेंच भवभूतीच्या शब्दांनीं म्हणावें लागतें !

* रखमाबाईस जायगावापुढें येऊं दिलें नाही वगैरे मजकूर महेश्वरदरबारचीं पत्रें, भाग २, पान १९९ व २०१ वर आहे तो वाचण्यासारखा आहे.

यानंतरचा अहल्याबाईचा वृत्तांत थोडा आहे. मुक्ताबाईच्या सती जाण्यानें अत्यंत उद्विग्न होऊन तिनें तुकोजीस येऊन आपलें राज्य संभाळ-ण्याविषयीं पत्रावर पत्रें पाठविलीं, व पुण्यासहि नानास आपल्यास काशी-यात्रेस जाण्याची परवानगी मिळण्याविषयीं लिहिलें. पण तिला काशी-यात्रेस कोण जाऊं देणार? दोघांनींहि काकळूत करून तिचें समाधान केलें व तीस पुन्हां संसारांत गुंतवलें. अहल्याबाईचें व तुकोजीचें पैशाच्या संबं-धांत पुन्हां यापुढें पुष्कळ भांडण झालें. फौजेनेंहि बाकीसाठीं पुष्कळ तगादा केला. नानास निजामाची खोड मोडण्याकरितां तुकोजीची दक्षिणेंत जरूर होती. त्यानें हा बखेडा मोडण्याकरितां देवराव हिंगणे—सबंध एक शहाणे—यास पाठविलें. 'आतां कशास येतात?'—असे अहल्याबाईचे उद्गार एके ठिकाणीं या पत्रांत नमूद आहेत. त्यावर सफाई झाली काय, असें केसो भिकाजीनें विचारलें. 'तेव्हां नवरा नवरी दोन्हीं—'असें अपुरें वाक्य या पत्रांत आहे ( भाग २, पान २११ ). त्याचा अर्थ केसो भिकाजी-सही समजला नाहीं, व आतां आपल्यासहि समजावयाचा नाहीं; पण हें सर्व भांडण बाह्यात्कारी होतें असें दिसतें. 'चिरंजिवाशीं सूत्र खेळवतात एक आणि बाह्यात्कारी दाखवतात एक.' असे त्याचे उद्गार येथेंच आहेत. बहुधा फौजेच्या देण्याचा फडशा थोडक्यांत पाडण्याचा हा एक रस्ता होता. अहल्याबाई सर्व राजकारणांत चतुर होती, याचें हें एक उदाहरणच आहे. असो, देवराव हिंगणे—शाहाणे—येऊन नाना प्रकारच्या युक्तीनें सफाई करून तुकोजीस बाईचे पायावर घालून त्यांस दक्षिणेंत घेऊन गेले. सर्व 'होळकरशाहींत अहल्याबाईशिवाय कोणी एक माणूस नाहीं,' असे देव-राव येथें उद्गार काढतात, व पारसनिसांस तें वाक्य मोठं महत्त्वाचें वाटतें. हल्लींचा काळ कठिण आला—या नेहमींच्या गेरसमजुतीच्या उद्गाराप्रमाणेंच हे उद्गार आहेत हें उघड आहे. कदाचित् ते खरे आहेत असें मानल्यास आमचें म्हणणें हें आहे कीं ही गोष्ट या वेळीं सर्व महाराष्ट्रास लागू होती. शहाण्या माणसांची परंपरा सर्वच ठिकाणीं संपली होती आणि म्हणूनच मराठी राज्यास सन १७९५ नंतर उतरती कळा लागली. असो; खर्ड्याच्या लढाईच्या वेळीं महाराष्ट्राची फत्ते झाली. परशराम भाऊ, तुकोजी, जिऊबा दादा, अशीं पूर्वीच्या पिढीचीं कर्तृत्ववान् माणसें अजून शिल्लक होतीं म्हणून या लढाईंत मराठ्यांचा विजय झाला. तो अहल्या-

बाईनेंहि ऐकिला. यापुढील दुर्भाग्याचा काळ तिनें पाहिला नाहीं व या पुण्यवान् सतीनें या लढाईनंतर लवकरच म्हणजे इ. स. १७९५ च्या आगष्ट महिन्यांत ता. ४ रोजीं आपली इहलोकींची यात्रा संपविली. तिचें देहावसान तिच्या पुण्यमय जीवनाप्रमाणेंच झालें. श्रावण महिन्यांत नेहमीं-प्रमाणें रोज ब्राह्मणभोजन बारा तेरा हजार पात्र जेवावयाचें. त्याचा संकल्प ( श्रावण व॥ १४ ) सोडून, "मोक्ष धेनु, उत्क्रांत धेनु धर्माची प्रवृत्ति होऊन नामघोषाचे स्मरणांत देहावसान झालें." 'तुकोजी होळकर सुभेदार दक्षिणेंत पुण्यास होते त्यांचे धाकटे बंधु संताजी होळकर सेंद्-व्यास नेमाडांत होते त्यांनीं समयास येऊन उत्तरकार्य केलें. याप्रमाणें हा महाराष्ट्र भूमीचा दुसऱ्या तेजस्वितेचा दिव्य तारा सुमारें तीस वर्षें आपल्या तेजानें तपून अस्तास गेला व सर्व महाराष्ट्रास किंबहुना सर्व भरत-भूमीस त्यानें दुःखांत टाकलें.

अहल्याबाईचे पुण्य गुण वर्णितांना आमच्या लेखणीस कधींच शीण वाटणार नाहीं. ही लोकोत्तर स्त्री आपल्या अनेक सद्गुणांनीं महाराष्ट्रासच नव्हे तर सर्व मानव जातीस भूषण झाली आहे. तिची बुद्धिमत्ता इतकी व्यापक होती कीं ती प्रत्येक कामांत जाणकार व हुशार असे. तिची धर्म-शीलता इतकी उदात्त होती कीं धर्माच्या व नीतीच्या प्रत्येक बाबतींत तिनें आपलें नांव अजरामर करून ठेविलें आहे. तिचा दानधर्म इतका प्रचण्ड होता कीं असा दानधर्म आजवर हिंदुस्थानांत कोणीं केला नाहीं. याबरोबरच अव्यवस्थित खर्च होऊं न देण्याविषयींची तिची खबरदारी इतकी पक्की होती कीं तिचे कारकून "एवढा दानधर्म होत आहे म्हणोन कोणी गवताची पेंडी फुकट नेईल तर तें शक्य नाहीं" असें म्हणत. तिचा न्याय इतका चाख असे कीं सावकार व चोर दोघेहि तिला दुवा दत. तिचा फौजदारी बंदोबस्त इतका मजबूत, शहाणपणाचा व न्यायाचा असे कीं, जंगलांतील भिल्ल सुद्धां अहल्याबाईनें केलेलें अद्याप मान्य कर-तात. तिची लीनता इतकी विलक्षण होती कीं ती कोणासहि आपली प्रशंसा करूं देत नसे, किंबहुना तिनें आपली तसबीर सुद्धां काढूं दिली नाहीं. तिची जरबहि इतकी कठीण होती कीं तिच्या हुकुमाशिवाय कोणी कांहीं करील किंवा तिची कोणी अप्रतिष्ठा करील, असें कधींच झालें

नाहीं. तिची मराठी साम्राज्यसत्तेविषयीं इतकी पूज्यबुद्धि असे कीं, त्या सत्तेचें तिनें कधींहि नुकसान केलें नाहीं, उलट तिजला नेहमीं तिनें जोरच दिला. तिचें आपल्या समान दर्जातील सरदारांविषयीं इतकें निर्मत्सर प्रेम असे कीं तिनें त्यांचें सदैव अभीष्टच चिंतन केलें.* तिची निर्लोभता इतकी विशाल होती कीं तिनें परराज्याची स्पृहा कधींहि केली नाहीं व आपल्या रयतेपासून किंवा अधिकाऱ्यांपासून तिनें अन्यायानें कधीं कांहीं घेतलें नाहीं.† तिची भूतदया इतकी व्यापक होती कीं पशु पक्षी सुद्धां तिच्या व्यापारांतून वगळले नव्हते. तिचें आपल्या प्रजेवर इतकें प्रेम असे कीं त्यांस ती केवळ आपल्या पोटच्या पोरांप्रमाणें लेखी व त्यांचें दुःख परिहरण करण्याच्या कामीं अत्यंत परिश्रम करी. याप्रमाणें अनेक

---

* महादजी दक्षिणेंत सन १७९२-३ त गेला. त्यावेळेस त्यानें होळकरशाहीचें सत्वास ठाणें आपल्या कबज्यांत जबरदस्तीनें घेतलें. यावरून अहल्याबाईनें त्यास "हा मेला दक्षिणेंतून जिवंत परत येत नाहीं—" असा शाप दिला, अशी एक गोष्ट होळकराच्या कैफीयनकारानें दिली आहे. पण ती आमच्या मतें असंभवनीय आहे. याचीं कारणें अशीं. प्रथम तर शाप खरा झाल्याच्या गोष्टी बहुतकरून मागाहून बनविलेल्या असतात. दुसरें, अहल्याबाईच्या उदात्त चरित्रास कोणासहि शाप देणें शोभत नाहीं. तिसरें, महादजीवर अहल्याबाईचें पुत्रवत् प्रेम होतें, त्यास तर ती कधीच शाप न देती. चवथें महादजीहि अहल्याबाईस इतका मान देत असे की तिचें राज्य अबाधित चालविण्याविषयीं त्यानें नानास पत्रें लिहिलीं आहेत. या पत्रांवरून त्याचें अहल्याबाईच्या व होळकरशाहीच्या विषयींचें बन्धुप्रेम चांगलें व्यक्त होतें. तो अशा प्रकारचा जबरदस्तीचा प्रकार अहल्याबाईसंबंधें करणारा नव्हता. 'महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें' भाग २, पान २०३ यांत या प्रकरणाची जी हकीकत दिली आहे तिजवरून "नेमावर महाल होळकर शिंदे यांजकडे **समाईक** होता. महादजीस दक्षिणेस जाण्यास एक स्वतंत्र घाट पाहिजे होता. त्यानें ही जागा खाली करून घेतली. त्याचे बदली दुसरें स्थळ यांस दिलें—" अशी हकीकत दिसून येते. यांत महादजीचा मोठासा अन्याय दिसत नाहीं. पांचवें, केसो भिकाजी याजवर 'येथेंही त्याजवरून श्रमीच आहेत' एवढेंच लिहितो. कैफियतकारांनी सांगितलेला शाप बाईनें उच्चारला असता तर तो केसो भिकाजीचे कानीं आला असता व त्यानें निःसंशय तो नमूद केला असता.

† केसो भिकाजी लिहितो (भाग २, पा. ५७) "चार रुपये वाजवी कमाविसदाराचे अंगीं लागू असतां घ्यावे हें मानस नाहीं. उत्पन्न करून चार रुपये दौलतीस मिळवावे हें लक्ष नाहीं."

टळक टळक लोकोत्तर गुण तिच्याठायीं होते इतकेंच नव्हे तर तिचे इतर लहानसहान गुणहि लक्षांत घेण्याजोगे आहेत. ती भाषण करण्यांत मोठी चतुर असे. धमकावणी देणें, हिम्मत वाढविणें, लुच्चे लोकांची खरड काढणें, प्रसंगविशेषीं सन्मान्यांचा गौरव करणें, या सर्व गोष्टी तिला चांगल्या साधत. राघोबाची व महादजीची तिणें बहुतेक धमकावणीनेंच समजूत पाडली. शिंद्यांच्या स्त्रियांस हिमतीच्या गोष्टी सांगून लालसोटच्या लढाई-नंतर त्यांचें उज्जनीतून पळून जाणें तिनें बंद केलें. तुकोजीस व आपल्या फौजेस तिनें वारंवार हिम्मत दिली आहे. शिंद्याकडून बाळाराव तिच्या व तुकोजीच्या भांडणांत मध्यस्थीसाठीं आला होता, त्याची खरड तिनें कशी काढली हें वाचलें असतां तिची निर्भीडता लक्षांत येते. एवढा हरि-पंत तात्या, पण त्याची दोन चार वाक्यांतच तिणें अशी खरड काढली कीं, त्याच्या पोटांत कळच उठली व तो ताबडतोब रजा घेऊन निघून गेला. श्रीमंत सवाई माधवराव यांच्यासंबंधानें तिणें जे उद्गार काढले आहेत ते किती गौरवयुक्त आहेत ! प्रसंगीं थट्टेचेंहि भाषण करण्यांत ती कुशल होती. “ एवढ्या दूरची चिठी एवढी लहान ! कोऱ्या कागदाची चौकशी फार आहे असें वाटतें. ” हें वाक्य वाचून हंसूं आल्यावांचून राहात नाहीं. तिची व्यवहारदक्षताहि इतकी मोठी होती कीं कोणताहि प्रसंग असो, ती योग्य व्यवहारास कधींच चुकली नाहीं. स्वजनांस लग्न, मुंज, गर्भाधान, इत्यादि प्रसंगीं द्रव्याची मदत दिल्यावांचून ती राहिली नाहीं. पाहुणे, परराज्यांचे वकील, आप्त मंडळी व बरोबरचे सरदार येत; पण कोणीहि योग्य सत्कारावांचून तिच्यापासून गेला नाहीं; शास्त्री, भिक्षुक, गृहस्थ यात्रेच्या कारणानें वारंवार येत, तेव्हां शास्त्री—भिक्षुकांस शें दोनशें रुपये दक्षिणा किंवा गृहस्थांस शिधा, सामान, मेजवानी दिल्याशिवाय तिनें त्यांस पुढें किंवा परत जाऊं दिलें नाहीं. अशा प्रसंगीं तिला जो आनंद होत असे तो मनापासून होई. केसो भिकाजी कांहींसें निंदेनें लिहितो ( भाग २, पान ११५ ) “ सांप्रत बाईस अराणूक यात्रेची रवानगी व दानधर्माचा विनियोग, या हर्षामुळें क्षणभर अवकाश नाहीं. ” पण असा धन्य प्राणी जगतांत फारच विरळा, हें त्या कुटिल व्यवहारांत दंग झालेल्या कारकु-नास कळलें नाहीं. धर्मसंबंधीं कामांत दुसऱ्याची हरएक तऱ्हेनें मदत करतांना व दानधर्म करितांना ज्या धन्य व्यक्तीस आनंदाच्या उकळ्या

येतात असा खरा धर्मात्मा प्राणी या पृथ्वीतलावर विरळा होय! अशा विरळा व धन्य व्यक्तींत अहल्याबाई अग्रणी होती आणि यामुळेंच तिचें नांव सर्व भरतखंडांत, गांवोगांवीं व शहरोशहरीं तिच्या हयातींतच झालें व तिच्याविषयीं सर्व लोकांच्या मनांत अत्यंत पूज्य भाव उत्पन्न झाला.

अहल्याबाईच्या दानधर्मासंबंधानें व धार्मिक आचरणासंबंधानें नापसंती व्यक्त करणारे लोक त्यावेळींहि होते व हल्लींहि आहेत. त्यास कित्येक लोक bigotry किंवा superstition अर्थात् अंधश्रद्धा समजतात. तिची स्नानसंध्या, तिचा जप, तिचें पुराणश्रवण, तिचें ब्राह्मणसंतर्पण इत्यादि गोष्टी वाचून व तिनें बांधिलेलीं शिवालयें व घाट पाहून पुष्कळांस असें वाटतें कीं तिचा वेळ व तिचा पैसा अनाठायीं गेला. पण आमच्या दृष्टीनें तिची धर्मश्रद्धा अन्ध नव्हती. तिच्या धर्मशीलतेची योग्य कल्पना मनांत आणिली पाहिजे. तिचा सर्वांत श्रेष्ठ गुण म्हणला तर हाच होय. तिची सर्वव्यापक धर्मशीलता हेंच तिचें उत्तम भूषण होय. महाभारतकार

ऊर्ध्वबाहुर्विरौम्येष न च कश्चित् शृणोति मे ॥
धर्मादर्थश्च कामश्च स धर्मः किं न सेव्यते ॥

" मी हात वर करून ओरडून सांगत आलों, पण कोणी माझें ऐकत नाहीं. धर्मापासूनच अर्थ व काम दोन्ही साध्य आहेत. मग तो धर्म कां सेवन करीत नाहीं ?" असें आपल्या भारततात्पर्यांत म्हणतो. तें त्याचें म्हणणें तिनें ऐकलें होतें व अक्षरशः पाळलें होतें. धर्मापासून अर्थ व काम दोन्ही कसे प्राप्त होतात हें तिच्या चरित्रावरून दिसतें. अधर्माचें सेवन करणारास अर्थ मिळत नाहीं; मिळाला तरी काम तर साध्य होतच नाहीं. अधर्मी मनुष्याजवळ हजारों रुपये असले तरी तो आपल्या कर्मानें त्यांचा उपभोग घेऊं शकत नाहीं, हा अनुभव शेंकडों ठिकाणीं आहे. असो, पण येथें धर्मशब्दाची व्याख्या नीट केली पाहिजे. व्यासानें धर्माचीं आठ अंगें सांगितलीं आहेत तीं येथें लक्षांत घेतलीं पाहिजेत.

इज्याध्ययनदानानि तपः सत्यं क्षमा दमः ।
अलोभ इति मार्गोयं धर्मस्याष्टविधः स्मृतः ॥

धर्माचे शारीरिक व मानसिक असे दोन मुख्य वर्ग असून शारीरिक धर्ममार्गांत इज्या ( भजन पूजन ), अध्ययन ( पठणश्रवण ), दान आणि तप ह्मणजे शरीरकर्षण इतके भाग आहेत; व मानसिक मार्गांत

सत्य, क्षमा, इंद्रियदमन व निर्लोभता हे चार भाग आहेत. यानंतर व्यवहारज्ञ व्यासानें आणखी लिहून ठेवलें आहे तें लक्षांत ठेविलें पाहिजेः—

तत्र पूर्वश्चतुर्वर्गो दंभार्थमपि सेव्यते ।
उत्तरस्तु चतुर्वर्गो नामहात्मसु तिष्ठति ॥

गोमुखींत हात घालून जप करीत बसणें व इकडे हजारों लोकांचे गळे कापणें— अशा मनुष्यास खरा धर्म समजला नाहीं व त्यास धर्माचें फळहि प्राप्त होणार नाहीं. शारीरिक धर्मकार्य पुष्कळ मनुष्यें दंभानें करूं शकतील; पण सत्य, क्षमा, दम व निर्लोभता हे मानसिक धर्ममार्ग महात्म्याशिवाय इतरत्र दिसावयाचे नाहींत. हे दोन्ही मार्ग अहल्याबाईच्या ठिकाणीं पूर्णपणें वसत होते. धर्माचें खरें स्वरूप काय आहे हें तिला चांगलें समजलें होतें. लहानपणापासून तिला पुराणश्रवणाचा नाद असे. पण पुराणाचें खरें रहस्य सांगणारा अंबादास नांवाचा एक विद्वान् रसिक मर्मज्ञ वक्तृत्ववान् पुराणिक तिला होळकरांच्या येथें आल्यापासून मिळाला होता, हा एक उत्तम सुयोग होय. खऱ्या धर्माचरणास शारीरिक व मानसिक दोन्ही धर्ममार्गांची जोड कशी पाहिजे हें त्यानें तिच्या मनावर चांगलें ठसविलें असावें. आणि तिची धर्मशीलता जात्याच विशाल असल्यामुळें तिनें आमरणान्त खऱ्या धर्माची परिपूर्ण सेवा केली. येथें कोणी म्हणेल कीं उदात्त आचरणास शारीरिक धर्ममार्गाची आवश्यकता नाहीं. जप करण्यांत हांशिल काय ? पुराणांतील किंवा वेदांतील भाकडकथा ऐकून फायदा कोणता ? हजारों ब्राह्मणांस अन्नसंतर्पण देऊन किंवा दगडामातींत पैसा घालून परोपकार तो कोणता ? व्रतवैकल्यांनें, उपासतापासानें, शरीर जर्जर करण्यांत शहाणपणा तो काय ? हा एक निराळा विषय आहे. याचें सांगोपांग विवरण करणें म्हणजे विषयांतर होईल. पण आमच्या मतें या शारीरिक धर्ममार्गाची कोणत्या तरी रूपानें आवश्यकता आहे. अहल्याबाईचें शारीरिक धर्माचरण व्यर्थ नव्हतें. अशा शारीरिक धर्माचरणाशिवाय मानसिक धर्ममार्ग साध्य होणार नाहींत असें आमचें मत आहे. उदाहरणार्थ, पुराणश्रवण केल्याशिवाय—किंवा इतर शब्दांनीं म्हणावयाचें तर धर्मपुस्तकांच्या अध्ययनाशिवाय सत्य, क्षमा, दम, निर्लोभ हे धर्ममार्ग कायम राहावयाचे नाहींत. कोणी म्हणेल आमच्या पुराणांत भाकडकथा आहेत. त्यांचा काय उपयोग ? पण भाकडकथा

कोणत्या धर्मांत नाहींत ? भाकडकथा ह्या टाकावयाच्याच आहेत, पण त्यांचा खरा उपयोग करून घेऊन मग त्या टाकावयाच्या आहेत. आंब्याची साल किंवा बदामाचें टरफल टाकावयाचेंच आहे. पण तें रसास्वाद किंवा फलास्वाद घेतल्यावर. तोंपर्यंत त्याचा उपयोग आहे. तोंपर्यंत त्याचा उपयोग शोभा व जपणूक या दृष्टीनें फार मोठा आहे. आंब्याच्या सुंदर व रंगीत सालीनें त्याजकडे आपलें मन ओढतें व तिच्याआंत मधुर रसाचा परिपाक होऊं शकतो. बदामाला कठीण साल नसती तर तें पौष्टिक फळ झाडावर तयारही झालें नसतें किंवा देशोदेशीं शेंकडों कोसांवर नेतां आलें नसतें. सारांश, पुराणांचें टरफल शेवटीं टाकावयाचेंच आहे पण त्याचा उपयोग नीतितत्त्वें मोठक करण्याकडे व मनावर कायमचीं ठसविण्याकडे फार आहे. महाभारतादि पुराणश्रवणानें शिवाजीस किती उपयोग झाला ! तोच किंवा त्याचप्रकारचा उपयोग अहल्याबाईनें करून घेतला. पुराणश्रवणानें तिनें आपलें सत्य, क्षमा, दम व विशेषतः अलोभ हे धर्ममार्ग दृढ करून घेतले. महात्म्यांतच दिसून येणाऱ्या ह्या धर्ममार्गांनीं तिच्या शारीरिक धर्ममार्गांस शोभा आली आहे व तिच्या जप, तप, पुराणश्रवण इत्यादिकांस अंधश्रद्धेंतून काढून दिव्य धर्मजीवनांत नेऊन बसविलें आहे. असो, या बाबतींत कसाहि मतभेद असला तरी तिचें उदात्त धर्माचरण मानसिक सर्व विषयांत इतकें भरून गेलेलें दिसतें कीं पाश्चात्य इतिहासकारसुद्धां तिची निर्व्याज स्तुति केल्याशिवाय राहात नाहींत. तिचा हा चरित्रलेख सर जान मालकमनें लिहून ठेविलेल्या वक्तृपूर्ण स्तोत्राशिवाय कधींहि पुरा करतां येणार नाहीं, असें 'पुरुषोत्तमा' प्रमाणें आम्हांसहि वाटतें. या मालकमच्या अभिप्रायाचा उतारा पुनरुक्तासारखा कधींहि वाटणार नसल्यानें तो आम्हीं येथें देतों.

"It is an extraordinary picture,—a female without vanity; a bigot without intolerance; a mind imbued with the deepest superstition, yet receiving no impressions, except what promoted the happiness of those who were under her influence; a being exercising in the most active and able manner despotic power not merely with sincere humility, but under the severest moral restraint that a strict conscience could

impose on human action; and all this combined with the greatest indulgence for the weakness and faults of others."
या अत्यंत अलंकारिक पण अक्षरशः खऱ्या वाक्यांत मालकम साहेबानें जी अहल्याबाईची थोरवी वर्णन केली आहे त्या थोरवीस नवीन उपलब्ध झालेल्या महेश्वर-दरबारच्या पत्रव्यवहारानें यत्किंचित्‌हि बाध आलेला नाहीं. किंबहुना ही तिची थोरवी या पत्रव्यवहारावरून अधिकच उज्ज्वल दिसून येते असें आमचें मत आहे.



# मराठेशाही कशानें बुडाली ?



रा. नरसोपंत केळकर यांच्या नवीन पुस्तकाचा महत्त्वाचा भाग म्हटला म्हणजे वरील प्रश्न होय; व तो त्यांनीं एका स्वतंत्र प्रकरणांत विवेचिला आहे. याचीच मीमांसा रा. वासुदेवशास्त्री खरे यांनीं उपोद्धातांत आणखी आपल्या विस्तृत माहितीच्या आधारें केली आहे. दोन्ही विवेचनांत मथितार्थ एकच आहे आणि मी या विषयावर थोडेंफार लिहिण्याचा विचार करीत आहे त्यांतहि तात्पर्यार्थ तोच आहे. तथापि कांहीं निराळी दृष्टि लावून तो विषय मी लिहिणार आहें; यामुळें वाचकांस कदाचित् अधिक कल्पना सुचतील किंवा अधिक माहिती मिळून मनोरंजन होईल. शास्त्रीबुवा म्हणतात त्याप्रमाणें राज्य गेल्यावर मग ते कशानें गेलें हा विचार व्यर्थ होय. कदाचित् भावि नूतन तऱ्हेचें स्वराज्य मिळाल्यास सर्व हिंदी लोकांच्या दृष्टीनें या विषयाला प्रत्यक्ष उपयुक्तता येणें शक्य आहे; आणि याच हेतूनें मी या विषयाला थोडेंसें निराळें रूप देणार आहें.

रा. केळकर म्हणतात मराठेशाही बुडाल्याची जबाबदारी ब्राह्मणांवर पडत नाहीं. सरळ रीतीनें पडत नाहीं ही गोष्ट मान्य आहे; पण अन्य रीतीनें परंपरेनें ती ब्राह्मणांवर येऊन पडते असें मला वाटतें. मराठेशाही बुडाल्याचीं दोन कारणें त्यांनीं दिलीं आहेत तीं प्रत्यक्ष खरीं आहेत. तीं पान १७ उत्तरार्धावर दिल्याप्रमाणें १ मराठ्यांत जुटीचा, शिस्तीचा व राष्ट्राभिमानाचा अभाव आणि २ सुधारलेलें लष्कर आणि सुधारलेली युद्धसामुग्री यांचा अभाव. हीं कारणें जो कोणी निःपक्षपातानें १८१८ पर्यंतच्या इतिहासाचें पर्यालोचन करील त्यास कबूल करावीं लागतील. पण या कारणांची मीमांसा आणखी केली तर त्यांची जबाबदारी ब्राह्मणांवर येऊन पडते. ती कशी हें मी विस्तारानें दाखविणार आहें. ब्राह्मणक्षत्रिय अशा वर्णविभागानें बद्ध झालेल्या समाजांत त्याचा दोष ब्राह्मणांवरच जातो. जेथें असा वर्णविभाग नाहीं तेथें तो दोष समाजाच्या बुद्धिमान् घटकांवर जातो एवढाच फरक. याचें विशदीकरण आपण दुसऱ्या कारणापासून करूं.

कवायती शिस्त व सुधारलेलीं युद्धशस्त्रें यांच्या सहाय्यानें हिंदुस्थानच्या बेकवायती व तलवारभाल्यांनीं लढणाऱ्या फौजांचा फार जलदी नाश करतां येईल ही गोष्ट हिंदुस्थानांतील प्रत्येक युरोपियन प्रवाशाच्या लक्षांत येऊन चुकली होती. याचे दाखले इतिहासांत अनेक सांपडतात. ज्या वेळेस कवायती फौजा इकडे मुळींच नव्हत्या त्या वेळेस मनूची यानें लिहून ठेवलें आहे कीं, मोगलांचें हिंदुस्थानांतील साम्राज्य उलथून पाडण्यास ३० हजार युरोपियन शिपाई हुशार सेनापतींच्या हाताखालीं पुरे आहेत. अर्थात् कवायत शिकलेली फौज हिंदुस्थानांतील फौजांस मारण्यास सहज शक्तिमान् आहे हा सिद्धान्त युरोपियनांच्या लक्षांत येऊन त्याप्रमाणें फ्रेंच व इंग्रज यांनीं कवायती पलटणें तयार करण्यास आरंभ केला. व प्रत्यक्ष त्यांचा उपयोग होऊन अनुभवहि तसाच येत चालला हें पाहून ब्राह्मण कां जागे झाले नाहींत? मी ही जबाबदारी ब्राह्मणांवर टाकतों याचें कारण बुद्धिमत्तेचीं कामें करण्याचें काम त्यांचें आहे. समाजांत याबद्दल जबाबदारी त्यांच्यावर आहे. ही जबाबदारी युद्धासंबंधानेंहि आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. ही आजपासूनच नव्हे तर हजारों वर्षांपासून आहे. एकंदर युद्धशास्त्राला आपण धनुर्विद्या म्हणूं, धनुर्विद्या शिकविण्याचें काम ब्राह्मणांचें हजारों वर्षांपासून आहे. युद्धशास्त्रांतील व्यूहादि सर्व रचनेची माहिती मिळवून त्याची प्रगति करून ती क्षत्रियांस व इतर लढवय्यांस शिकविण्याचें काम ब्राह्मणांनीं केलें आहे. मुळांत युद्धशास्त्राचे प्रवर्तक ब्राह्मण–बृहस्पति व शुक्र हे–होत. यांनींच व्यूहादि सर्व नियम व विचार घालून दिले आहेत. धनुर्विद्या शिकविणारा परशुराम आणि पुढें द्रोण हे प्रसिद्ध आहेतच. या गोष्टी काल्पनिक व पुराणांतील वाटतील पण तसें नाहीं. धनुर्विद्येस व त्यांतील अस्त्रांस हल्लीं पुराणांतून भाकड व काल्पनिक स्वरूप दिलें आहे ही गोष्ट खरी; पण इतिहासदृष्ट्या विचार करतां युद्धशास्त्र ब्राह्मणांनींच निर्माण केलें असलें पाहिजे आणि त्यांनींच नेहमीं तें शिकविण्याचें काम केलें असलें पाहिजे हें उघड आहे. ब्राह्मणांनीं हें आपलें कर्तव्य भारतीय युद्धकालापर्यंत केलें, पण ते पुढें बहुतेक विसरले. ग्रीकांच्या वेळेस तर ते कर्तव्य विसरले होते असें कदाचित् म्हणतां येईल इंग्रजांच्या वेळेस तर ते पक्केच विसरले होते.

शिस्त व फौजी कवायत ग्रीक स्पार्टन लोकांपासून प्रथम सुरू झाली. ती थीबन लोकांचा सेनापति एपामिनांडास यानें उत्पन्न केली.

फॅलॉक्स अथवा पलटण ही प्रथम त्यानें बनविली. फिलिप व त्याचा पुत्र अलेक्झांडर यानें त्या कवायतीस पूर्णतेस आणलें आणि त्याच्याच जोरावर त्यानें इराणी बादशहाच्या व भारती आर्य पोरसासारख्या शूर योद्ध्याच्या सैन्याचा पराभव केला. रोमन लोकांनीं याच शिस्तीची सुधारणा करून त्या वेळचें बहुतेक ज्ञात जग जिंकलें. हिंदुस्थानांत या कवायतीचा परिचय ग्रीकांच्या वेळीं घडला असून ब्राह्मणांनीं पुरस्कार केला नाहीं हें आश्चर्य होय. असो. हा प्राचीन इतिहास झाला. अर्वाचीन काळीं फौजेची कवायत, मांडणी व एकंदर युद्धांतील फौजांची हालचाल यांचें नवीन शास्त्र व तऱ्हा इतालियन लोकांत निघाली. Strategy व Tactics म्हणजे एकंदर युद्धांतील व लढाईतील हालचालीचें शास्त्र अथवा व्यूहरचना वगैरे शास्त्र ब्रासेली व स्फोर्झा यांच्या शाळांत प्रथम उत्पन्न होऊन तेथून तें इतर युरोपियन लोकांनीं उचललें. स्पानिश लोकांनीं अमेरिकेंत जे जय संपादन केले व युरोपांतही केले त्यांत त्यांची शिस्त,—प्रवीणता चांगलीच दिसून आली. याप्रमाणें Disciplined armies म्हणजे शिस्तीच्या फौजा पाश्चात्य देशांत १७ व्या शतकापासून सर्वत्र तयार झाल्या व त्यांच्या बळावर त्यांनीं इतर खण्डांतील लोकांस पादाक्रांत केलें असा इतिहास दिसतो.

ही शिस्त व ही कवायत कशी शिकवतात व लढाईत कशी पाळतात व त्याजपासून काय उपयोग होतो, हें मराठ्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें तेव्हां तरी त्यांनीं त्याजविषयीं शोध करून ती विद्या आपल्या हस्तगत करावयास पाहिजे होती. आणि हें काम विशेषतः ब्राह्मणांचें होतें. कवायतीची व व्यूहरचनेची कला इतालियन लोकांनीं काढली हें पूर्वीं सांगितलें. त्याचें तात्पर्य हेंच कीं, कला इंग्रजांची किंवा फ्रेंचांची मूळची नाहीं. किंबहुना ज्यांची मूळची ते लोक हल्लीं युद्ध-शास्त्रांत मागेंच आहेत. इतरांची विद्या असून ती इंग्रज, फ्रेंच व जर्मन यांनीं आपलीशी करून ऊर्जित दशेस नेली त्याप्रमाणें हिंदुस्थानांतील ब्राह्मणांनीं ती आत्मसात् कां केली नाहीं ? कांहीं थोडेंसें ह्या बाबतींत डोकें सदाशिवराव भाऊ या ब्राह्मणसेनापतीस होतें आणि त्यानें इब्राहिमखा-नाच्या पलटणांस हातीं धरलें; पण इतरांनीं त्याची थट्टाच केली. पेश-व्यांच्या पदरीं हरिपंत फडके होते व म्हैसूरच्या लढाईत इंग्रजांच्या पलट-

णांचा प्रभाव त्यांनीं पाहिला होता. महादजी शिंद्याच्या पदरीं गोपाळराव चिटणीस, जिवबा दादा वगैरे ब्राह्मण द्रोणाचार्य होते; पण त्यांच्याच बरोबर असलेल्या पलटणांच्या शिस्तीचें त्यांनीं अनुकरण केलें नाहीं व त्यांतलें मर्म समजून घेतलें नाहीं. कवायती पलटणी शिकवावयास युरोपियन अमलदाराच कां ठेवीत ? एकदां प्रारंभीं शिकवावयास ते पाहिजे होते. पण ब्राह्मण सेनापतींनीं ही तऱ्हा कां उचलली नाहीं ? मराठ्यांचा केवळ परावलंबीपणा ह्या बाबतींत पाहून हिंदु लोकांच्या हीन संस्कृतीची खरोखर सखेद जाणीव उत्पन्न होते आणि या बाबतींत ब्राह्मणांची पूर्वापार लायकी असून आम्ही हल्लीं अगदीं नालायक बनलों आहों असेंच वाटतें. कदाचित् आशियाखंडांतील लोकांस हा गुण व ही शिस्त यावयाचीच नाहीं असें कांहीं पाश्चात्य ग्रंथकार पूर्वीं म्हणत होते तसेंच वाटलें असतें. पण ही गोष्ट जपान्यांनीं खोटी ठरवली आहे. जपानी प्रथम युरोपियनांपाशींच शिकले पण आतां ते युरोपियनांस शिकवतील. जें स्वराज्याच्या वेळीं आम्हांस करतां येण्यासारखें असूनहि आम्हीं केलें नाहीं तें आतां होणें कितपत शक्य आहे हें दिसतेंच आहे. पण जपान्यांना शिस्तीचा कटु अनुभव येतांच ते जागे झाले; आम्हांस कटु अनुभव आला असून व स्वराज्याचें साधन अनुकूल असून आम्ही जागे झालों नाहीं. याचा सर्व दोष आम्हांवर आहे म्हणजे मराठ्यांवर आहे आणि मुसलमानांवरहि आहे; पण ब्राह्मणांवर विशेष आहे. ब्राह्मण समाजाचें डोकें आहे आणि तें डोकें सर्व कलांत व शास्त्रांत पूर्वीं चालत होतें तसेंच चाललें पाहिजे होतें; पण ब्राह्मणांचें डोकें या वेळेस कोणत्या कल्पनांनीं भरलें होतें हें आपण पुढें पाहूं.

जी गोष्ट वर शिस्ती व कवायतीसंबंधानें सांगितली ती सुधारलेल्या युद्धास्त्रासंबंधानें तर विशेष लागू आहे. पाश्चात्य ग्रीक व रोमन लोकांस प्राचीनकाळीं सुधारलेल्या अस्त्रांचें साहाय्य नव्हतें. ते व त्यांचे शत्रु पर्शियन, इंडियन किंवा जर्मन यांच्यांत हत्यारें बहुतेक सारखीं होतीं; निदान पाहिजेल तें हत्यार दोघांस लभ्य होतें. त्या वेळेस ग्रीकरोमनांनीं शिस्त व पलटणी सैन्याच्याच योगानें प्रतिपक्ष्यांस जिंकलें. हल्लींच्या काळीं पाश्चात्य फौजांच्या कवायतीस दारूगोळा व बंदुकतोफ या भयंकर अस्त्रांची जोड मिळाली आहे. यांच्या जोडीनें स्पॅनिश लोकांनीं मेक्सिकन लोकांस किंवा

इंग्रजांनीं हिंदुस्थानी लोकांस हां हां म्हणतां पादाक्रान्त केलें यांत आश्चर्य नाहीं. या अग्न्यस्त्राचा उत्कर्ष सारखा होत आहे व पाश्चात्य देशांतील प्रत्येक युद्धप्रसंगीं या अस्त्रांचें सामर्थ्य वाढत जात आहे. येथपर्यंत हल्लीं मजल येऊन पोंचली आहे कीं ७० मैलांवर तोफेचा गोळा जाऊन पडत आहे. सारांश, मराठ्यांच्या स्वराज्याच्या वेळेस पाश्चात्यांच्या व त्यांच्या-मध्यें जें अंतर होतें त्याच्या शतपट अंतर हल्लीं आमच्या परतंत्रस्थितींत पडलें आहे. तेव्हां हल्लींच्या पाश्चात्य युद्धसामर्थ्याच्या मागें आम्ही किती आहों हें वाचकांच्या लक्षांत येईलच. हें अस्त्र केवळ बुद्धिमानास व शास्त्रीय शोध करणारासच समजण्यासारखें आहे. त्यांत पदोपदीं रसायनशास्त्र व गणितशास्त्र यांचा उपयोग पडतो. हल्लींच्या परिस्थितींत हीं दोन्हीं शास्त्रें परमोच्च स्थितीस पोंचलीं आहेत व हल्लीं केवळ भास्कराचार्यांचें गणित किंवा रसशास्त्राचें रासायनिक ज्ञान उपयोगी पडावयाचें नाहीं. जे अत्यंत बुद्धिमान् शास्त्रज्ञ असतील त्यांचेंच या बाबतींत काम आहे. पण १८ व्या शतकाच्या वेळचा विचार केला तर हिंदुस्थानांतील त्या वेळच्या बुद्धिमान् लोकांनीं यांत लक्ष घालण्यासारखें होतें. परंतु ब्राह्मणांनीं यांत मुळींच लक्ष घातलें नाहीं आणि ही विद्या काय आहे हें समजून घेण्याचा प्रयत्नहि केला नाहीं. दैव हें सर्वत्र अनुकूल पाहिजे हा सिद्धांत चोहोंकडे अबाधित आहे. जपान्यांना अमेरिकेच्या आरमारांतील तोफांनीं जेव्हां जागें केलें तेव्हां त्यांचा देश उद्योन्मुख होता व त्यांच्यांत इतर राष्ट्रांच्या एवढी समज नव्हती हें खरें; त्यांच्यांतहि अनेक अंतस्थ अडचणी होत्या. तथापि जपान्यांनीं शास्त्रीय अभ्यास पाश्चात्य शाळेंत करून Explosive चें शास्त्र संपूर्ण हस्तगत केलें तसें, १८ व्या शतकांत आपल्या ब्राह्मणांस पाश्चात्य देशांत करतां आलें नसतें असें नाहीं. त्यांस फ्रेंच–जर्मनांनीं हें शास्त्र शिकविलें असतें. पण मराठेशाहींतील ब्राह्मणांनीं हा प्रयत्नच केला नाहीं; किंबहुना त्या दिशेला ढुंकून पाहिलें नाहीं. या शास्त्राचा आपण थोडासा ऐतिहासिक विचार करूं.

अग्न्यस्त्र महाभारतांत उल्लेखित असून तें अश्वत्थाम्यानेंच सोडलें होतें; पण हें मंत्रशास्त्रांतील अग्न्यस्त्र भौतिक शास्त्रांतील नव्हे. सबब तें आपण सोडून दिलें तरी अग्न्यस्त्र मूळ आशियाखंडांतलें असा इतिहास दिसतो. चिनी लोकांस लढाईची दारू ठाऊक होती. तोफांचा पहिला उप-

योग आरबांनीं केला असा इतिहास लागतो. The Arabs invented, at least made proper use of paper, compass and gunpowder" ( Historian's History of the World Vol. VIII ). आरबांनंतर फ्रेंचांनीं दारूगोळयाचा उपयोग केला. हळुहळु हा उपयोग सर्वत्र प्रसृत होऊन मुसलमान व खिश्चन पाश्चात्य देश, या दोन्हींतील लोकांनीं तोफा व बंदुका लढाईंत चालू केल्या. मुसलमानांचा हिंदुस्थानांत विशेष जय झाला याचें एक कारण तोफखाना हें आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. दक्षिणेकडच्या मुसलमानी राज्यांतहि तोफांचा व बंदुकांचा उपयोग होत असल्याचा दाखला इतिहासांत आहे. विजापूरची मोठी तोफ तालिकोटच्या लढाईंत उपयोगांत आणली होती. ही तोफ चिलेबीरूमीखान यानें हिंदुस्थानांतच पाडली होती असें लिहिलें आहे. नांवावरून हा रूमीखान तुर्कांपैकीं होता व तो कान्स्टँटिनोपलकडील होता. तेव्हां ही गोष्ट निर्विवाद दिसते कीं तोफा पाडण्याचें कसब हिंदुस्थानांत नव्हतें. हें कसब पाश्चात्य देशांत व विशेषतः खिस्ती राष्ट्रांतच दिसतें. याजवरून आशियाखंडांतील लोक यापुढें भौतिक शास्त्राच्या प्रगतींत मागें पडले असें दिसतें कीं काय हा एक महत्त्वाचा प्रश्न आहे. पोर्तुगीज १४९८ त हिंदुस्थानांत आले, त्यापूर्वीं इकडील मुसलमानांस तोफांची व बंदुकांची माहिती होती; पण यांतील तज्ज्ञ सर्व पाश्चात्य देशांतील लोक मुख्यतः युरोपियन होते; कांहीं मुसलमानही होते, पण तेहि पश्चिमेकडील. अकबर व त्याचे नंतरचे मोंगलपातशाहा यांचे पदरीं तोफखाना असे पण त्यांजवळ बहुधा युरोपियन आफिसर असत, असें मनूची यानें लिहून ठेवलें आहे. पोर्तुगीज लोकांपासून बंदुका, दारूगोळा, तोफा वगैरे सामान शिवाजीनेंहि व नंतर इतर मराठ्यांनीं इंग्रजांपापासून विकत घेतल्याचा दाखला इतिहासांत वारंवार दिसतो. सदाशिवरावभाऊंनी इब्राहिमखानाचा तोफखाना ठेवला. हा इब्राहिमखान मुसलमान असून त्यानें ही तोफखान्याची विद्या दुप्लीपासून हस्तगत केली होती. तो दुप्लीचा प्रारंभीं केवळ शिपाई होता; व नंतर गोलंदाज होऊन तोफखान्याचा आफिसर झाला. जेव्हां निजामानें हा दुप्लीचा तोफखाना काढून टाकला तेव्हां तो भाऊंनीं आपलेकडे ठेवून घेतला असा इतिहास आहे. यानंतर महादजी शिंद्यानें तोफखाना खूप वाढविला. त्याला हें मर्म पानिपतच्या लढाईंत समजलें होतें. त्यानें युरोपियन म्हणजे फ्रेंच आफिसर नेमून तोफखाना वाढविला. त्याजवळ शेवटीं शेवटीं हजार तोफा होत्या

असें म्हणतात. परंतु हा तोफखाना युरोपियनांच्या हातांत आणि त्यांचे चालवणारे युरोपियन व कांहीं मुसलमान; असा हा तोफखाना दौलतरावाच्या वेळेस निरुपयोगी झाला. कारण त्याचे बरेचसे लोक म्हणजे युरोपियन अधिकारी इंग्रजांस फितूर झाले आणि शिंद्यांचा तोफखाना मागें पडला. पेशव्यांकडेहि तोफखाना होता, आणि आनंदाची गोष्ट ही कीं या तोफखान्यावर एक ब्राह्मण आफिसर होता. त्याचें तोफखान्याचें ज्ञान यथातथा होतें असें खरे यांनीं लिहिलें आहे; असेल, पण तो ब्राह्मण होता ही गोष्ट ध्यानांत धरण्यासारखी आहे. ब्राह्मणांनीं या कामांत थोडेतरी डोकें घातलें एवढें पाहून आनंद होतो; पण एवढ्यानें काय होणार? ब्राह्मणांनीं या विद्येकडे एकंदर दुर्लक्ष केलें असेंच म्हटलें पाहिजे.

दारू तयार करण्याच्या विद्येकडे किंवा तोफा-बंदुका पाडण्याच्या विद्येकडे एकंदर इतिहासांत मराठ्यांनीं विशेषतः ब्राह्मणांनीं लक्षच दिलें नाहीं याचें आश्चर्य वाटतें. या अस्त्राचें सामर्थ्य त्यांच्या प्रत्ययास येत होतें. पोर्तुगीज व इंग्रज या विद्येंत आपल्याहून फार पुढें आहेत हें त्यांस प्रत्यक्ष दिसत होतें. असें असून त्यांनीं या विद्येचा शोध व व्यासंग केला नाहीं. मुसलमानांच्या वेळेला ही विद्या थोडीशी पाश्चात्य देशांतूनच आली होती. त्याचप्रमाणें मिरजेस तोफा करण्याचें शास्त्र लोक जाणत होते यांत आश्चर्य नाहीं. पण ही विद्या मुसलमानांच्या राजापासून आलेली होती आणि दारू करणारे लोक मुसलमानच होते. हिंदू कोणीहि यांत शिरले नाहींत. तोफा—बंदुका पाडण्याच्या कामांतहि मुसलमानच असावे असा अंदाज आहे; कदाचित् कांहीं कासार असतील. पण ही सर्व विद्या अंधाप्रमाणें जशी एकदां पूर्वीं प्रथम घेतली तशीच होती, त्यांत प्रगति मुळींच नव्हती. तोफांची व बंदुकांची जी प्रगति पाश्चात्य देशांत होत आली, तिचा इकडे गंधहि नव्हता; व कार्डाइट व लिडाईट इत्यादि दारू तर नांवानेंहि अज्ञात असलीच पाहिजे. सारांश, हिंदूंनीं या विद्येंत आपलें मन घातलें नाहीं व ती आत्मसात् केली नाहीं. याची जबाबदारी इतरांवर आहेच, पण ब्राह्मणांवर विशेष आहे. शिवाजीच्या ही गोष्ट लक्षांत आली नाही; याचें आश्चर्य वाटतें. पण पेशव्यांच्याहि आली नाहीं. आणि सातारा, रायगड किंवा पुणें येथें दारूचे व तोफा-बंदुकांचे कारखाने निघाले नाहींत. हिंदुस्थानांत लोखंड, सोरा किंवा इतर पदार्थ मिळण्यासारखे

नव्हते असें नाहीं. तेव्हां या गोष्टीचें कारण पाहतां हिंदूंच्या व ब्राह्मणांच्या बुद्धिमत्तेचा प्रवाह भौतिक शास्त्राकडे नाहींच असा जो आक्षेप आहे तोच खरा दिसतो. "ब्राह्मण अगोदर धार्मिक कर्मांतच निमग्न असतात. कदाचित् कांहीं शास्त्रांकडे वळले तर वैद्यक, ज्योतिष व गणित यांकडे वळतात," असें फेरिस्तानें लिहिलें आहे. पण प्राचीन काळची भौतिक विद्या हीच होती. ज्योतिष, वैद्यक व गणित याच मुख्य विद्या प्राचीन काळीं होत्या; आणि त्यांत ब्राह्मणांचें प्रावीण्य प्रसिद्ध होतें. याच विद्यांतून हल्लींच्या विद्या वाढल्या आहेत. पण हिंदुस्थानांत जी एकदा प्रगति झाली तिच्यापुढें जाण्याचें ब्राह्मणांनीं श्रेय घेतलें नाहीं. ते समुद्रावर पाय ठेवण्यास तयार नसत असें मनूची म्हणतो. प्रत्यक्ष तोफांचें व बंदुकांचें सामर्थ्य पाहत असून ब्राह्मण त्याकडे वळले नाहींत; बरें ब्राह्मणांनीं नाहीं तर इतर लोकांनीं व मुसलमानांनींहि यांत प्रवीणय संपादन केलें नाहीं. उत्तर हिंदुस्थानांत शिंद्यांच्या पदरीं तोफखाना होता व तोफाहि पडत आणि दारूहि बने. पण शिंद्यांच्या मराठे किंवा मुसलमान किंवा पूरबिया ब्राह्मण शिपायांनीं किंवा सरदारांनीं याची विद्या आत्मसात् केली नाहीं; केवळ कूपमंडूकवत् राहिले, किंबहुना परावलंबी राहिले. सत्तावनाच्या बंडाच्या वेळीं पूरबिया (यांस इकडे पुरभय्या म्हणतात) पलटणींतून नेटिव्ह तोफखानेहि होते असें दिसतें. इंग्रजांच्या हाताखालीं हीहि विद्या हिंदी लोकांना आपली करतां आली नाहीं. बंडांत सामिल झालेल्या लोकांनीं तोफांची करामत दाखविली नाहीं किंवा कारखानेहि चालविले नाहींत. बंडाचा मोड पुष्कळ अंशीं इंग्रजांच्या तोफखान्यानें केला. तात्पर्य, एकंदर विचार करतां तोफखान्याचें साधन हिंदुस्थानच्या लोकांस स्वतंत्रतेच्या वेळीं व नंतर, साधनें असून साध्य करतां आलें नाहीं याचा दोष सर्वांवर आहेच; पण ब्राह्मणांवर म्हणजे बुद्धिमान् लोकांवर विशेष आहे, हें उघड आहे.

येथवर आपण दुसऱ्या कारणाचा विचार केला. आतां पहिल्या कारणाकडे वळूं. सुधारलेले कवायती लष्कर आणि सुधारलेलीं युद्धशस्त्रें अथवा अग्न्यस्त्र हीं मराठ्यांना उचलतां येणें शक्य असतां त्यांनीं उचललीं नाहींत यामुळें त्यांचा नाश झाला हें जरी खरें, तरी हें एकटें कारण पुरें नाहीं. कितीहि हीन संस्कृति असो; जर लोकांत एकजूट व राष्ट्राभिमान असेल तर कोणतेंहि राष्ट्र—मराठ्यासारखें प्रचण्ड राष्ट्र—परकीयांस विशेषतः

मूठभर इंग्रजांस कधींहि हार गेलें नसतें हें निर्विवाद आहे. अर्थात् या कारणांच्या जोडगोळीनेंच मराठ्यांचा व इतर हिंदी राष्ट्राचा नाश झाला. एकजूट व खरा राष्ट्राभिमान मराठेशाहींत प्रारंभापासून नव्हता असें म्हटलें तरी चालेल. शिवाजी महाराजांच्या वेळीं किंवा पुढें राजारामाच्या वेळीं मराठ्यांनीं एकजूट व राष्ट्राभिमान दाखविला हें मान्य केलें पाहिजे. म्हणजे ऊर्जितदशेंत आणि विपत्तिदशेंत दोन्ही वेळींहि त्यांनीं हे सद्गुण दाखविले. पण सूक्ष्म विचार केला असतां ही एकजूट राष्ट्रीय भावनेनें नव्हती किंवा हा राष्ट्राभिमानही खरा नव्हता असेंच म्हटलें पाहिजे. शिवाजीमहाराजांनीं हिंदुधर्माचा बचाव करण्यासाठीं स्वराज्य स्थापन केलें व मराठ्यांनीं स्वधर्मरक्षणासाठीं त्यांना मदत केली असेंच दिसतें. खरी राष्ट्राभिमानाची ज्योत त्या वेळींहि पेटली नाहीं. हिंदुस्थानांत मुसलमानांचा धर्मच्छल या वेळेस कसा उग्र झाला होता याची पूर्ण कल्पना या वेळीं आपल्यास होत नाहीं. देवळें फोडणें, लोक बाटवणें व बायका धरून जनानखान्यांत टाकणें हा प्रकार सर्वत्र बोकाळला होता. रामदासांच्या दासबोधांत याचें चित्र चांगलें काढलें आहे. यांत अवरंगजेबाच्या क्रूर धर्मच्छळाची भर पडली. मनूचीनें वर्णन केलें आहे कीं, "राजा जयसिंग वारला तेव्हां अवरंगजेबानें उघड हिंदुधर्माचा छळ सुरू केला. त्यानें सर्व सुभेदारांस आपापल्या सुभ्यांतील प्रसिद्ध देवालयें पाडून टाकण्याची आज्ञा केली. याप्रमाणें दिल्लीजवळ लालता नांवाचें अतिसुंदर देवालय होतें तें उध्वस्त झालें. मथुरेंतील श्रीकृष्णाचें अतिउच्च मंदिर—ज्याचा सुवर्णशिखरकलश आग्र्याहून दिसत असे—जमीनदोस्त झालें. अयोध्येंतील रामजन्म—मंदिर व सरयूच्या गोप्रतार तीर्थावरील मंदिर तोडलें गेलें. काशींतील विश्वेश्वराचें व बिंदुमाधवाचें मंदिर ढासळून टाकलें व त्या तिन्ही ठिकाणीं मशिदी उठविल्या. होळीचा सण बंद करण्यांत आला. मथुरेंतील बैरागी हाकून लावले गेले. हिंदु नोकर ठेवलेले बरखास्त करून मुसलमान ठेवले गेले." या कृत्यांनीं सर्व हिंदुस्थानांतील हिंदूंच्या हृदयांत कशी धडकी भरली असेल याची कल्पना होईल. मनूची आणखी लिहितोः—

"जसवंतसिंग वारल्यावर अवरंगजेबानें आणखी हिंदूंचा छळ सुरू केला आणि डोईपट्टी हिंदूंवर बसविली. शेटसावकार वगैरेस १३॥ रुपये, मध्यम प्रतीच्या लोकांस आणि गरीब लोकांस ३॥ रुपये वर्षाचे द्यावे लागत." प्रयाग वगैरे ठिकाणीं यात्रेकरूंस ६ रुपये यात्रापट्टी द्यावी लागे. अशा भयंकर

जुलमापासून हिंदूंची मुक्तता करण्यासाठीं **हिंदूपद्पातशाही स्थापन** करण्याचा यत्न शिवाजीनें केला; आणि आपल्या पराक्रमानें, बुद्धीनें व चिकाटीनें सिद्धीस नेला. शिवाजीचा प्रयत्न **मराठेशाही स्थापन करण्याचा** नव्हता. जरी प्रत्यक्ष मराठेशाही स्थापन झाल्यासारखें दिसतें; तथापि ती मराठेशाही नव्हती. पंजाबांत शिखांनीं असाच धर्मच्छळप्रतिकार केला व कांहींसा सिद्धीस नेला. प्रत्यक्ष मध्यहिंदुस्थानांत बादशाही अम्मल कडक असल्यानें कांहीं झालें नाहीं.

शिवाजीनें हिंदुपद्पातशाही स्थापन केली आणि तिचें संरक्षण अवरंगजेबाच्याच विरुद्ध राजारामाच्या वेळीं मराठ्यांनीं मोठ्या शर्तीनें केलें, आणि महाराष्ट्रांत स्वराज्य पक्क्या पायावर कायम झालें. पण हें स्वराज्य म्हणजे हल्लींचें स्वराज्य नव्हे. लोकांचें राज्य अशी कल्पना त्या वेळीं मुळींच नव्हती. स्वराज्य म्हणजे आपल्या जातीच्या व धर्माच्या राजाचें राज्य असाच त्या वेळीं अर्थ होता. राष्ट्र म्हणजे लोकांचें ही कल्पना हिंदुस्थानांत हजारों वर्षांपासून लुप्तच आहे. भारतकाळांत ती कल्पना होती पण पुढेंपुढें ती गुप्त झाली. मुसलमानी अम्मलापासून ती तर मुळींच नाहींशी झाली. राज्य म्हणजे राजाचें आणि तें खासगी मिळकतप्रमाणें अशीच हीन समजूत हिंदुस्थानांतील लोकांची शेकडों वर्षांपासून आहे. राजा म्हणजे लोकांच्या इच्छेचा व सामर्थ्याचा एक मूर्तपुरुष अशी भावना हिंदुस्थानांत हजारों वर्षें नाहींच. ज्याच्या अंगांत शक्ति आहे आणि ज्यास परमेश्वरानें राज्य दिलें आहे तो राजा, आणि देश व प्रजा त्याची मिळकत अशी आमची सर्वत्र समजूत. यामुळें मराठेशाही मुळीं कधींच नव्हती मग ती बुडेल कशी? लोकांनाहि मराठेशाही आहे असा अभिमान असणें शक्य नाहीं. मराठेशाही, मोगलाई इत्यादि शब्द वापरीत; पण राज्य शिवाजीच्या वंशाचें किंवा बाबरच्या ( अथवा "चकत्याच्या" ) वंशाचें किंवा निजामच्या वंशाचें अशीच समजूत होती. मराठेशाहीची खरी कल्पना असती तर मराठे निजामातर्फे मराठ्यांशीं लढले नसते किंवा महाराष्ट्रांतील लोक इंग्रजांच्या फौजेंत नोकरी धरून महाराष्ट्रीयांशीं लढले नसते. लोकांचें राज्य ही कल्पनाच नाहीं. यामुळें अशी ही दुर्दैवी स्थिति हिंदुस्थानची फार वर्षांपासून आहे. पाहिजेल त्याची नोकरी धरून त्याच्यासाठीं निमकहलाली करून आपल्या स्वदेशबंधूंशीं लढाई करण्यास हिंदी लोकांनीं कधींहि मागें-

पुढें पाहिलें नाहीं, याचें कारण स्वराज्याची किंवा स्वदेशाची राष्ट्रीयभावना त्यांना कधींच नव्हती. निमकहलालीची मात्र त्यांना कल्पना आहे. आपण निजामाच्या राज्यांतील नोकर, त्याची भाकरी खातों तर त्याची नोकरी प्राण देऊनहि केली पाहिजे, ही भावना निंबाळकर वगैरे अनेक मराठे सरदारांची इतिहासांत दिसते. बाळाजीपंत नातू फितुरी असें आपणांस आतां वाटतें. पण मला वाटतें त्याच्या वेळीं वाटलें नसावें. तो राजरोस इंग्रजांचें अन्न खात होता. त्यानें त्यांचें राज्य इच्छिलें यांत आश्चर्य काय? आम्हा हिंदूंस आमचाच राजा पाहिजे अशी कल्पना केव्हांहि नव्हती. कोणीहि राजा चालेल. ईश्वरानें राज्य ज्यास दिलें तो राजा, ह्याच दृष्टीनें आम्ही मुसलमानी राज्यांत राहिलों. ह्याच दृष्टीनें गायकवाडाचें राज्य गुजराथेंत आहे; किंवा शिंद्यांचें बुंदेलखंडांत आहे. तात्पर्य; राज्य लोकांचें ही कल्पनाच नाहीं; राजा लोकांचा अशीहि कल्पना नाहीं. उलटपक्षीं राज्य राजाचें व लोकहि राजाचे. लोकांचें कर्तव्य निमकहलालीचें. निमकहराम म्हणजे ज्याची नोकरी करावयाची त्याच्याशीं किंवा ज्याच्या राज्यांत राहावयाचें त्याच्याशीं विश्वासघात करणारे लोक आपल्या इतिहासांत पुष्कळच आहेत. जेथें स्वराज्याची खरी कल्पना नाहीं तेथें ते पुष्कळ असावयाचेच. ते स्वराज्याच्या योग्य कल्पनेच्या मुलुखांत म्हणजे पाश्चात्य देशांतहि आहेतच. कारण बद्माष लोक प्रत्येक समाजांत आहेत. पण त्यांतल्यात्यांत ज्या देशांत असे राजद्रोही नसतात, त्या देशांतील लोकांचे राजकार्य सद्गुण वरिष्ठ होत हें उघड आहे. हल्लींच्याच युद्धांतहि आतिशय सुधारलेल्या पाश्चात्य देशांत राजद्रोही लोक निघाले याचें आश्चर्य वाटतें. बोलो या फ्रेंच राजद्रोह्यास नुकतेंच फांशीं दिलें. इतालींतहि कांहीं राजद्रोही सांपडले. रशियांत तर अनेक होते; मुख्य सेनापतीच होता. इंग्लंडांत मात्र अद्याप राजद्रोही सांपडला नाहीं. इंग्रजांचें राज्य पृथ्वीवर कां पसरलें आहे किंवा हिंदुस्थानांत अनेक पाश्चात्य लोक आले त्यांत इंग्रजच कां पुढें सरसावले याचें कारण इंग्रजांत राजद्रोही नाहींत हें आहे, हें कोण नाहीं म्हणेल? असो, निमकहरामी चोहींकडे आहे, पण आमचे इकडे निमकहलाली आहे, राष्ट्राभिमान नाहीं ही गोष्ट सांगावयाची आहे. हिंदुस्थानचा अद्यापहि राजकीय दृष्टिकोण बदलला आहे असें म्हणवत नाहीं. नुकत्याच दिल्लीच्या दरबारच्या प्रसंगीं व्हाइसरायसाहेब India is true to her salt

असेंच म्हणतात. "हिंदुस्थानें आपल्या निमकाला ( मिठाला ) जागृत किंवा सच्चें आहे." हिंदुस्थान अजून इंग्लंडचें मीठ खात आहे काय ? नाहीं म्हणावयास खरोखरच चेशायर व लॅंकेशायरचें मीठ आम्ही खात आहों आणि इंग्लंडशीं निमकहरामी हिंदुस्थान करणार नाहीं अशीच भाषा अजून चालू आहे. तथापि आमच्या निराळ्या बदललेल्या दृष्टीला हे शब्द केसेसेच लागतात. हिंदुस्थानचे बादशाह अशी आतां समजूत असली पाहिजे, बादशहाचें हिंदुस्थान अशी नसावी.

राजा–प्रजा यांच्यासंबंधांची कल्पनाच आमची हजारों वर्षांपासून चुकली आहे याला इलाज नाहीं. राजाचें राज्य व त्याची प्रजा ही आमची जुनी समजूत. मराठेशाही हा शब्द नसून शिवशाही हा शब्द पाहिजे असें खरे म्हणतात तें वाजवी आहे. शिवाजीच्या वंशाचें राज्य, तें शाहूनें पेशव्यांस दिलें म्हणून पेशव्यांचें झालें ! ! आणि पेशव्यांच्या शेवटच्या पुरुषानें, बाजीरावानें, तें इंग्रजांस दिलें म्हणून इंग्रजांचें झालें ! ! ! घरादाराच्या निर्जीव इस्टेटीप्रमाणें राज्य एकानें दुसऱ्यास दिलें आणि त्याचें झालें. बाजीरावानें बदफैली केली, इंग्रजांशीं युद्ध केलें त्यांत तो जिंकला गेला, याकरितां बाजीरावाचें राज्य आम्हीं खालसा केलें असें इंग्रजांनीं त्या वेळेस म्हटलें. म्हणजे गुन्हेगाराची जशी इष्टेट जप्त करावयाची तसें बाजीरावाचें राज्य इंग्रजांनीं जप्त केलें. पण आमचीहि समजूत अशीच म्हणून आम्ही स्वस्थ बसलों. १८७१ त फ्रेंचांचा राजा नेपोलियन लढाईंत हरला आणि जर्मनांच्या कैदेंत सांपडला म्हणून फ्रान्स खालसा झालें नाहीं. फ्रेंचांचा राजा कैद झाला म्हणून फ्रान्स जर्मनांचें झालें नाहीं. फ्रेंचांनीं दुसरी राजव्यवस्था करून पारिसशहरांत दुसरी राज्यव्यवस्था तात्काळ सुरू केली आणि जर्मनांस या राज्याशीं तह करावा लागला. मराठेशाही असती तर पेशवाई झाली नसती किंवा बाजीराव कैद झाला म्हणून मराठेशाही बुडाली नसती. मराठ्यांना स्वराज्याची किंवा राज्याचीच योग्य कल्पना असती तर सर्व मराठ्यांनीं मिळून बाजीराव पळाल्यावर दुसरा पेशवा केला असता किंवा दुसरी राज्यव्यवस्था करून इंग्रजांबरोबर युद्ध केलें असतें किंवा तह केला असता. तात्पर्य आमची राज्यकल्पनाच चुकीची. याचा दोष एकेपरी ब्राह्मणांवर आहे. कारण खरें राज्यनीतिशास्त्र सांगणें हें त्यांचें काम आहे.

राजाचें राज्य ह्या कल्पनेंत एखाद्या वंशावर भिस्त असते. अशी

भिस्त पाश्चात्य देशांतहि पुष्कळ काळपर्यंत होती व आहे. ह्या कल्पने-प्रमाणेंच प्रशियन होएनझोलर्न वंश किंवा आस्ट्रियन हाप्सबर्ग वंश किंवा इंग्लंडांतील विल्यम धि कांकररचा वंश अजून चालू आहे. हल्लींचें इंग्लंडचें राजघराणें याच वंशाच्या वारसदारीनें जर्मनींतून आलें आहे. पण या सर्व ठिकाणीं केव्हांहि राज्यांतील लोक किंवा राज्य याचें अस्तित्व नाहींसें झालें नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे. लोक व राज्य हें राजघराण्याची खासगी मिळकत असें कधींच कोणी मानलें नाहीं. किंग जार्जचें इंग्लंड अशीच समजूत नसून इंग्लंडचे किंग जार्ज अशीच समजूत आहे. तात्पर्य पाश्चात्य देशांत राजवंशनिबद्ध राजसत्तेच्या कल्पनेबरोबर लोकसत्तेचें अस्तित्व नेहमीं मान्य आहे. आमचे इकडे अशी स्थिति कधींच नव्हती. राजाचें राज्य हीच मुख्य, प्रारंभीं व शेवटची समजूत. यामुळें अनेक दुष्परिणाम झाले व होत आहेत. याच समजुतीमुळें निजामातर्फे मराठे मराठ्यांशीं लढले. इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानांत पाहिजेल त्याला पैसा देऊन स्वकीयांशीं व स्वबंधूंशींच लढण्यास लोक नेहमीं मिळत असत. पाश्चात्य लोकांना हा एक मोठा हिंदुस्थानांत ठेवाच सांपडला व ते आपल्या मनांत हिंदी लोकांच्या वेडगळ समजुतीविषयीं हांसतहि असतील. नेटिव्हांशीं लढावयास इंग्लंडांतून किंवा फ्रान्समधून मनूचीच्या लेखाप्रमाणें २० हजार युरोपियन सैन्य आणण्याचीहि जरूरी पडली नाहीं. हजार दोन हजार आपले लोक मजबुतीकरितां व भरवंशाकरितां आणून २५हजार लोक इकडचेच नेटिव्ह नेटिव्हांशीं लढावयास मिळूं शकतात हा पाश्चात्य देशांत कधींहि दृष्टीस न पडणारा देखावा येथें पाहून पाश्चात्य फ्रेंच, इंग्लिश वगैरे सेनापतींस गुदगुल्या झाल्या असतील. ही मनूचीहूनहि पलीकडची युक्ति प्रथम डुप्लीनें काढली आणि चालू केली. कारण स्वराज्याची खरी कल्पना हिंदुस्थानांत मुळींच नव्हती. मुसलमानांच्या वेळेस कदाचित् ही अडचण व कल्पना असावी. कारण मुसलमानांनीं जें हिंदुस्थान, उत्तर किंवा दक्षिण, प्रथम जिंकलें तें सर्व मुसलमानी सैन्याच्या आधारावर जिंकलें असेंच दिसतें. त्यांस त्या वेळीं कोणी हिंदु सैन्य साहाय्य नव्हतें. राज्य स्थापल्यावर त्यांनीं मांडलिकांचें किंवा आपल्या प्रजेपैकीं हिंदु सैन्य उपयोगांत आणलें ही गोष्ट निराळी. पण इंग्रजांनीं हिंदुस्थान जिंकतांनाच हिंदी सैन्याचा-च उपयोग केला हें प्रसिद्ध आहे. असा चमत्कार जगताच्या इतिहासांत

कोठेंच दृष्टीस पडत नाहीं. आशियाखंडांतील मुसलमान, इराणी, आरब, तुर्क वगैरे लोकांत नाहीं. आणि चिन्यांत किंवा जपान्यांत तर मुळींच नाहीं. याच दृष्टीनें प्रो. सीलेनें जें म्हटलें आहे कीं, हिंदुस्थान इंग्रजानें जिंकलें नाहीं, तर हिंदुस्थाननेंच हिंदुस्थान जिंकलें तें खरें आहे. रा. केळकर यानीं सीलेच्या म्हणण्याला निराळी दृष्टि लाविली आहे. ती चूक आहे असें मला वाटतें. इंग्रजानें हिंदुस्थान तलवारीनें जिंकलें पण हिंदुस्थानच्या लोकांच्याच तलवारीनें जिंकलें हें ध्यानांत ठेवलें पाहिजे. इंग्रजी फौजांनींहि जिंकतां आलें असतें हें खरें; पण स्वाराज्याची खरी कल्पना हिंदूंस किंबहुना मराठ्यांस असती तर त्यांचें राज्य जिंकण्यास फार मोठी फौज विलायतेहून आणावी लागती व त्या वेळच्या बिनवाफेच्या थोड्यशा गलबतांनीं एवढ्या दूर अंतरावर सैन्याचा पुरवठा इंग्रजांस करतां आला नसता. हिंदुस्थानच्या लोकांच्या हीन राजकीय कल्पनांमुळें पाहिजेल तितके हिंदूच शिपाई हिंदुस्थान जिंकण्यास इंग्रजांस मिळाले ही फार महत्त्वाची बाब होय. यामुळें हिंदुस्थाननें हिंदुस्थान जिंकलें असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा दुष्परिणाम केवळ योग्य व उच्च राजकीय कल्पनांच्या अभावाचा होय. यांत जातिभेदाचा संबंध नाहीं. इंग्रजांच्या पलटणींत बहुधा पुरबिये असत. यामुळें कदाचित् असें म्हणतां येईल कीं, पुरबिये व मराठे यांमधील जातिभेदानें एकास दुसऱ्याविरुद्ध लढतां आलें. पण खरी वस्तुस्थिति अशी नाहीं. मराठ्यांकडेहि पुरबिये लढणारे होते. बरें, महाराष्ट्रांतील कांहीं विशिष्ट जाति जाचामुळें इंग्रजांकडे झाल्या असेंहि म्हणतां येत नाहीं. वरिष्ठजातींनीं महारमांगांना छळलें म्हणून त्यांनीं इंग्रजांच्या फौजेंत नोकरी धरली असें म्हणतां येत नाहीं. महार पेशव्याकडच्याहि फौजेंत होते आणि इंग्रजांच्याहि फौजेंत होते. बरें, कोकणस्थांच्या द्वेषानें शेणवी, प्रभु इंग्रजांकडे गेले असेंहि दिसत नाहीं. मराठ्यांकडेहि शेणवी, प्रभु होते आणि खुद्द कित्येक कोकणस्थ ब्राह्मण इंग्रजांकडे होते. तात्पर्य, हा परिणाम जातिभेदाचा नव्हे. मराठ्यांचें हें राज्य आहे, मराठ्यांनीं इंग्रजांकडे मराठ्यांविरुद्ध लढतां कामा नये हें तत्त्वच आपल्यास माहीत नाहीं. किंबहुना सर्व हिंदुस्थानांत ही जाणीव नव्हती. जो पैसा देईल त्याची नोकरी करून स्वजातीयांशींहि लढण्यांत कांहीं अनीति नाहीं अशीच आमची समजूत. मग स्वदेश. स्वराज्याभिमान अस्तित्वांतच नव्हता. एका आयरिश

भुरट्या माणसानें दहा हजार सैन्य जमवून एक लहानसें राज्य दिल्लीजवळ थोडावेळ उभारलें होतें ( लायलचा ग्रंथ पहा ). असो, प्रथम प्रथम हें सैन्य इंग्रजांनीं आपल्या खर्चानें बाळगलें; पण पुढें त्यांच्या शहाण्या मुत्सद्यांनीं हें सर्व वाढतें सैन्य परभारें हिंदी राजांच्या खर्चानें त्यांच्या रक्षणासाठीं म्हणून ठेवलें; आणि हा खर्च वेळचेवेळेवर मिळणें जरूर म्हणून विस्तृत मुलूख तोडून घेतले. म्हणजे हिंदुस्थानच्या पैशानेंच बाळगलेल्या हिंदुस्थानी सैन्याच्या जोरावर हिंदुस्थान काबीज केलें ! ! तात्पर्य, एकंदर इंग्रजांच्या राज्य कमविण्याच्या मागें त्यांचा तो तोफखाना व शिस्त होती हें तर खरें. पण त्याहिपेक्षां त्यांचें शहाणपण, मुत्सद्दी धोरण व जूट आणि आमच्या मूर्ख राजकीय समजुतीमुळें मिळालेलें आमचेंच सैन्य होतें असें म्हटलें पाहिजे. आमच्या कोत्या राजकीय कल्पनांनीं हिंदुस्थानांत हा जगतांतील अद्वितीय चमत्कार घडून आला. राज्याची खरी कल्पना व खरा सिद्धान्त लोकांपुढें ठेवण्याचें काम ब्राह्मणांचें होतें तें त्यांनीं केलें नाहीं असें अप्रत्यक्ष रीतीनें म्हणतां येईल. पण राज्य म्हणजे राजवंशाचें ही तरी कल्पना योग्य व दृढमूल चालविली पाहिजे होती तसेंहि दिसत नाहीं. पराक्रमानें, धाडसानें, कल्पकतेनें मिळविलेलें स्वराज्य आपल्या वंशाचें आहे असें ठरविण्याकरितां आपल्यास वेदविहित राज्याभिषेक शिवाजीनें करवून घेतला. त्यांच्या वंशांत राजधर्माप्रमाणें राज्य चालविणें हें लोकांचें व ब्राह्मणांचें कर्तव्य होतें. शिवाजी मेल्यावर संभाजी दुष्ट म्हणून राजाराम हक्कदार कसा ठरतो? बरें हा तंटा कांहीं वाजवी होता, कदाचित् शिवाजीनें संभाजीस मुद्दाम कैदेंत ठेविलें असेल, पण संभाजी राजा झाल्यावर किंवा तो मेल्यावर शाहू कैदेंतून सुटून आला तेव्हां राज्याविषयीं तंटा काय म्हणून? पुष्कळ अधिकारी ब्राह्मण ताराबाईकडे झाले हा अन्याय नव्हे काय? शिस्त यानेंच बिघडते. धाकट्या शाखेस एखादें लहान संस्थान देऊन मांडलिक बनवावें आणि थोरल्या शाखेकडे राज्याधिकार चालावा हा शास्त्ररूढीनें चालत येणारा नियम रजपुतांत हजारों वर्षे पाळलेला असून हा तंटा मराठ्यांत काय म्हणून? कोल्हापुरचें राज्य स्वतंत्र न करतां सातारचें मांडलिक झालें असतें तर राज्यास फार बळकटी व एकजूट आली असती. प्रत्यक्ष ब्राह्मणांकडे पेशवाई आली तेव्हांहि हाच तंटा राघोबानें कां केला? माधवराव, नारायणराव हे खरे अधिकारी असून राघोबानें हा बंडावा काय म्हणून केला? तो स्वार्थानें

कदाचित् पुढें सरसावेल; पण राज्यांतील माणसें राघोबाच्या पक्षाला कशीं येतात याचें आश्चर्य वाटतें. जें निर्विवाद अन्याय्य आहे त्या पक्षाकडे लोक होतात कसे ? इंग्लंडांत असा तंटा एकदा झाला तेव्हां वार्स आफ धि रोजीस झाल्या; पण त्यांत एवढी हक्काची स्पष्टता नव्हती. यानंतर राज्याचा वारस कोण याजबद्दल कोठेंच प्रश्न किंवा तंटा इंग्लंडांत काय व इतर देशांत काय झालाच नाहीं. आपल्यांत वारसाचे नियम नाहींत म्हणून हा तंटा नव्हे तर लोभानें नियम धुडकावून लोक निरनिराळ्या पक्षाला मिळणें हेंच खरें कारण होय. राजवंशसत्तेच्या कल्पनेंतहि आपल्यांत सचोटी नाहीं. हा तंटा मुख्यतः ब्राह्मणांनींच माजविला आणि यामुळेंच विनाशक फूट मराठशाहींत पडली. ब्राह्मणपेशवाईंत तरी असला अन्याय होणें योग्य नव्हतें. त्यांचें उदाहरण पाहून भोसले व गायकवाड यांत तंटे माजले. सारांश, धर्मशास्त्र व रूढि स्पष्ट असतां ब्रह्मणांनीं सन्मार्गदर्शक होण्याच्या ऐवजीं स्वार्थाला भुलून मुसलमानांचें अनुकरण केलें हें खरोखर खेदजनक आहे.

हा प्रघात मुसलमानांनीं पाडला असें दिसतें. मुसलमानी राज्यांत राजा मेला कीं वारसांचा तंटा झाला नाहीं असें कधीं झालें नाहीं. याचें कारण मुसलमानांत राज्याच्या वारसाचे नियम नव्हते असेंच कदाचित् असेल. राजा मरण पावला कीं त्याच्या पुत्रांत मारामाऱ्या, खून व्हावयाचेच किंबहुना हयातींतहि व्हावयाचे. शेंकडो खून व रक्तपात झाल्याचें मोगल, बहामनी व इतर आदिलशाही, निजामशाही वगैरेंच्या इतिहासांत नमूद आहे. कान्स्टंटिनोपल येथें तर तुर्कांचा असाच नियम यामुळें पडला होता कीं बादशाहा गादीवर आल्याबरोबर त्यानें एकंदर वारस होऊं शकणाऱ्या सर्व राजपुत्रांची मग तीं लहान पोरें कां असतना, सरसहा कत्तल करावयाची. हा नियम क्रूर तर खरा; पण तंटा मिटून राज्यांत भावी बखेडे बंद होत. असो, हा सर्व मुसलमानांचा इतिहास डोळ्यासमोर असतां राघोबादादानें राज्यांत गोंधळ घालावा हें खरोखर दुर्दैव होय. ब्राह्मणांच्या हातून धर्माचें व न्यायाचें यापेक्षां जास्त पालन व्हावयास पाहिजे होतें. पण याहीपेक्षां राज्यांतील लोकांचा व विशेषतः ब्राह्मणमुत्सद्यांचा दोष मी समजतों. राजा एकटा कांहींच करूं शकत नाहीं हें उघड आहे. लोक जर धडधडीत अन्यायाला अनुकूल न होते तर राघोबा एकटा काय करूं शकत होता?

येथें मराठ्यांची एकंदर राजकीय नीति हीनसंस्कृतीची असेंच म्हणावें लागतें. बाजीरावाच्या वेळेलाहि असाच व्यर्थ तंटा होऊन कित्येक या तर कित्येक त्या बाजूस असे झाले. सरळ मार्ग म्हटला म्हणजे वडील शाखेंतील शेवटच्या राजाच्या विधवेच्या मांडीवर दत्तक द्यावयाचा होता. बरें तें न केलें तर बाजीराव सरळ वारस होता. सर्वांनीं मान्य करून योग्य वळणास लावावयाचा होता, तंट्याचें कारण नव्हतें. पण पुन्हा तंटा झाला. निरनिराळे पक्ष लोकांनीं स्वीकारले. असा पेशवाईचा नाश केला. एवंच राजवंश–निर्विवाद–राज्यपद्धति सरळ व न्यायानें जरी मराठ्यांनीं, विशेषत: ब्राह्मणांनीं, राखली असती तरी मराठी राज्यास धोका आला नसता.

मुसलमानी अनीतीच्या राजकीय दुर्गुणांचें आणखी एका बाबतींत अनुकरण ब्राह्मणांनीं व मराठ्यांनीं केलें हें सांगितलें पाहिजे. राजवंशांतलि एखादा हीनबळ राजा दिसला कीं त्याला प्रधानानें मुठींत ठेवून नामशेष करण्याचा संप्रदाय मुसलमानी अमदानींत फारच दिसून येतो. दक्षिणच्या बहामनी वंशाच्या व त्यांच्या शाखांच्या इतिहासांत हा खेळ पदोपदीं दृष्टीस पडतो. शेवटच्या बहामनीच्या राजपिढीस कासमअल्ली, अमीर बरीद, या कारभाऱ्यांनीं तर कायमचें प्रतिबंधांत बेदर येथें टाकलें व शेवटीं बरीदशाहीच कायम झाली हें प्रसिद्ध आहे. हा निंद्य प्रकार ब्राह्मणांनीं तरी करावयास नको होता म्हणजे त्यांच्या उच्च स्वार्थनिरपेक्ष शीलास शोभला असता. नानासाहेब पेशव्यांनीं शाहूपासून राज्यच सर्व लिहून घेतलें. असें न करतां एखादा कर्तृत्ववान् दत्तक शाहूला कां दिला नाहीं ? याहीपेक्षां माझ्या समजुतीनें अयोग्य वर्तन नाना फडणिसांचें होतें. सवाई माधवरावास पूर्ण कह्यांत ठेवण्याचें नानाचें धोरण होतें असें मला वाटतें. सवाई माधवराव नादान नव्हता. पेशव्यांच्या घराण्यांत नादान, कर्तृत्वशून्य निदान परावलंबी एकहि पुरुष झाला नाहीं. याच धोरणाचें अनुकरण करून शिंदे ( दौलतराव ) यांनीं बाजीरावास अंकित व कैचींत ठेवण्याचा विचार केला; पण बाजीरावाचे शेंकडो दुर्गुण होते तरी तो परावलंबी नव्हता एवढें खास दिसतें. शिंद्यांचें किंवा होळकरांचें किंवा नानाचें त्यानें पारतंत्र्य कबूल केलें नाहीं. यासाठीं त्यानें इंग्रजांला घरांत घुसवलें; पण त्यांचें दास्य त्यास सहन झालें नाहीं. तें झुगारून देऊन त्यानें राज्यच सोडलें. कित्येक म्हणतात बाजीरावानें थोडेंफार राज्य राखून शेवटीं इंग्रजांचे अंकित रहावयाचें होतें. पण तें त्यानें केलें नाहीं. दास्यांतलें

परावलंबी राज्य त्यास नको होतें. असें राज्य राहणार नाहीं हें तो जाणून होता. कित्येकांचीं राज्यें अशीं परावलंबी करून शेवटीं एक शिपाईसुद्धां खर्च न करतां इंग्रजांनीं पुढें खाल्लींच. हल्लीं जीं राज्यें राहिलीं आहेत तीं बंडामुळें हें विसरतां कामा नये. बंडामुळें इंग्रजांचे डोळे उघडले आणि अतितृष्णा उपयोगी नाहीं अशी त्यांनीं गांठ बांधली. असो; यजमानास अंकित ठेवून नोकरानें किंवा प्रधानानें अथवा सरदारानें राज्य भोगण्याची अन्यायाची तृष्णा ब्राह्मणांनाहि आवरतां आली नाहीं हें पाहून खेद होतो. मुसलमानी उदाहरणांचें त्यांनीं अनुकरण केलें व त्यांचें अनुकरण इतरांनीं केलें. शिववंशास पेशव्यांनीं खाल्लें, पेशव्यांस खाण्याचा यत्न नानानें व दौलतरावानें केला, होळकरांस खाण्याचा यत्न एका ब्राह्मण कारभाऱ्यानें केला, धारच्या पवारास एका कारभाऱ्यानें खाण्याचा यत्न केला, आंग्र्यास तर एकानें खाल्लें; पण या अनीतीच्या प्रचारामुळें सर्वांस इंग्रजांनीं खाल्लें हें लक्षांत घेतलें पाहिजे.

असो तर, या निरनिराळ्या दोषी कारस्थानांचें मूळ तत्त्वज्ञानदृष्ट्या शोधलें तर स्वराज्याची योग्य कल्पना आम्हांस नव्हती हेंच होय. राज्य लोकांचें ही कल्पनाच नाहीं. राज्य ज्यास साधलें त्याचें, असा गैरसमज असल्यानें मान्य राजवंशांत वारसाचे विनाकारण व अन्याय्य तंटे माजत व खोट्या वारसदारांना साथीदार मदतगार मिळत. कारभाऱ्यांच्या मनांत राज्याधिकार बळकावण्याची लालसा उत्पन्न होई व त्यांनाहि मदतगार मिळत. याच कल्पनेनें अनेक सरदारांनीं परकी फौजा ठेवल्या. परदेशी गारद व आरब सैन्य अनेक सरदारांनीं आणि नानाफडणिसानेंहि ठेवलें होतें. लोकांचे राज्यांत कांहीं हक्कच नाहींत असें मानल्यामुळें बालिश होण्यास वाटेल तें करण्यास सरदार व मुत्सद्दी तयार असत. राज्यांतील स्वाधिकार संभाळण्यास परकी भाडोत्री शिपाई ठेवूं लागले म्हणजे राज्य संपुष्टांत आलें असें समजावें. हे परकी, गारदी, अरब वगैरे, जेव्हांपासून मराठ्यांत घुसले तेव्हांच मराठ्यांचें शूरत्व व स्वावलंबित्व गेलें. हे परकी शिपाई सुटले किंवा इंग्रजांकडे गेले, तेव्हां मराठ्यांकडे शक्तिच उरली नाहीं. याच कल्पनेमुळें सरदारांस स्वतंत्र होण्यास फावतें व स्फूर्ति होते. राज्य आपलें ही लोकांत भावनाच नाहीं, तेव्हां जो तो सरदार आपलें स्वातंत्र्य कायम करण्याची खटपट करणारच. सरदारांनीं

व व्हॉइसरायांचे स्वतंत्र राजे बनण्याचा खेळ हिंदुस्थानच्या इतिहासांत नेहमीं आहेच. बेदर बुडून निजामशाही, आदिलशाही, इमादशाही, कुतुबशाही झाली. दिल्ली बुडून अयोध्या, बंगाल, हैद्राबाद वगैरे झाले. त्याचप्रमाणें मराठेशाही बुडून शिंदे, होळकर, गायकवाड, पटवर्धन झाले. या प्रवृत्तीला कधींच आळा बसावयाचा नाहीं. जोंपर्यंत लोकांत स्वराज्याची जाणीव होणार नाहीं तोंपर्यंत हे सर्व परिणाम मूळ एका कारणापर्यंत पोंचतात, आणि तें कारण म्हटलें म्हणजे राज्याच्या खऱ्या कल्पनेला आम्ही प्रारंभापासून पारखी आहों. स्वराज्य म्हणजे लोकांचें राज्य हें आम्हांस कधीं माहितच नाहीं; मग तें आमच्यांत वागणार कोठून ?

मराठ्यांत शिस्त नाहीं ही गोष्ट मान्य करावी लागेल आणि हा दुर्गुण कदाचित् वरच्याशीं संबद्ध नसेल. राजकारणाची जशी शिस्त इंग्रजांत दिसते तशी मराठ्यांत नव्हती. ज्यांचें चालेल तोच आपलें घोडें दामटी; पण मराठ्यांत जूट नव्हती हा दुर्गुण वरील योग्य कल्पनेच्या अभावाचा परिणाम होय. राज्य लोकांचें ही कल्पना ठाम असेल तर सर्व लोक जुटीनें वागतील हें उघड आहे; तथापि हाही एक दोष स्वतंत्र आहे हें मान्य केलें पाहिजे. हिंदू लोकांत जूट नाहीं, एकी नाहीं ही गोष्ट फार दिवसांची आहे. मनूचीनें असें लिहून ठेवलें आहे कीं राणा, राठोड, कच्छवाह व बुंदेला हे जर एक जूट करतील तर मोंगलांस हिंदुस्थानांतून हाकून देतील. त्याचप्रमाणें मराठा इतिहासकारास म्हणतां येईल कीं, शिंदे, होळकर, भोंसले, गायकवाड, हे एकजुटीनें वागते तर इंग्रजांसहि त्यांनीं नामशेष केलें असतें. असो, असे अनेक मराठ्यांत व हिंदूंत दुर्गुण एकपरीनें आहेत, त्यांच्या बुडाशीं एकच वरील कारण मानतां येईल. हिंदुस्थान हिंदूंचें ही कल्पनाच नाहीं मग हिंदुस्थानांत परकीयांना शिरकूं द्यावयाचें नाहीं ही कल्पना कोठून सुचणार ? शिवाय परकीय इंग्रज घुसले त्या वेळेस मोगल व विजापूरकरांचें राज्य होतें. ते परकीच होते. ते परकीयांस तुम्ही येऊं नका म्हणून म्हणणार नाहींत. असे अनेक प्रश्न एका कारणाखालीं येतात हें दिसून येईल.

तात्पर्य, इतिहासाचें पर्यालोचन व ऐतिहासिक चर्चा यांची उपयुक्तता भावी काळांत कार्यदिशा ठरविण्यांत आहे, हें प्रारंभींच सांगितलें.

मराठेशाही कां बुडाली याची मीमांसा करतां दोन कारणें दिसतात. कवायती फौज व सुधारलेलीं अस्त्रें यांचा अभाव आणि राष्ट्राभिमानाचा अथवा स्वराज्याच्या योग्य कल्पनेच्या अभाव. पहिल्या कारणाविषयीं मतभेद असण्याचा संभव आहे. British Dominion in India या ग्रंथांत या विषयाची चर्चा सर आल्फ्रेड लायल यांनीं पान २२५–७ वर केली आहे. त्यांच्या मतें हिंदुस्थानी लोकांनीं पाश्चात्य कवायत व तोफखाना उचलण्याची हाव धरली ही चूक केली. मराठे व शीख यामुळें दोनतीन ठाम लढायांनींच मारले गेले. पण मराठे मारले गेले याचें कारण मराठ्यांची कवायत आणि तोफखाना युरोपियनांच्या हातीं होता म्हणून. ते दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पीत होते हें त्यांचें हीनकर्तृत्व. शिखांनीं कवायती पलटणें व तोफखाना स्वतःच्या नेतृत्वाखालीं तयार केला व त्यांनीं इंग्लिशांस चांगलाच हात दाखविला. रणजितसिंगाच्या मृत्यूनंतर शिखांचा जो पाडाव झाला तो वारसांची आपसांतली दंगल व खून वगैरे नेहमींप्रमाणें जो गोंधळ माजला त्यामुळें झाला. नुसती guerilla warfare अथवा गनीमी युद्धपद्धत अवरंगजेबाविरुद्ध उपयोगी पडली तशी इंग्रजांविरुद्ध पडली असती कीं नाहीं याची शंका आहे. कारण एकजूट असूनहि बोअरांचें तोफखान्याच्या अभावामुळें इंग्रजांपुढें चाललें नाहीं. स्वराज्याची योग्य कल्पना असून मराठे एकजुटीनें इंग्रजांशीं भाल्यातलवारीनें लढते तरी चाललें असतें एवढी त्यांची प्रचण्ड सत्ता होती. बोअरांचें राष्ट्र इंग्रजांपुढें जितकें लहान तितके त्या वेळीं मराठ्यांपुढें इंग्रज होते असें कदाचित् म्हणतां येईल. असो, हा प्रश्न वादग्रस्त आहे आणि शिवाय हल्लींच्या काळीं निरुपयोगीहि आहे. कारण इंग्रज कितीहि तुष्ट व न्यायी झाला तरी हिंदुस्थानाला तो अग्न्यस्त्र देत नाहीं हें खास. आम्हीं अधिकच ओरड केली आणि जर्मन युद्धामुळें जरूरी पडली तर आमचीं कवायती पलटणें तयार होतील, पण तोफखाना आम्हांस कधींहि मिळणार नाहीं हें निश्चित होय. आणि ही गोष्ट आमच्या हातचीहि नाहीं. पण दुसरी गोष्ट आमच्या हातची व आमच्या करण्याची आहे. आम्हांत राष्ट्राभिमान नाहीं, याचें कारण राष्ट्राचें व स्वराज्याचें योग्य ज्ञान आम्हास नाहीं हें उघड आहे. याचमुळें आमच्यांत जूटहि नाहीं. ब्राह्मणांचें अर्थात् हल्लींच्या परिस्थितींत बोलावयाचें म्हणजे अमच्यांतील बुद्धिमान् लोकांचें हें कर्तव्य आहें कीं

स्वराज्याची योग्य कल्पना लोकांत भरवून देऊन हिंदुस्थान देशाचें एकजीव राष्ट्र बनवावयाचें. आतां मराठेशाही आणावयाची नाहीं. मराठे, शिख, पुरबिये, मद्रासी, तेलंगी आणि फारशी, ख्रिश्चन, ज्यू वगैरे सर्व हिंदुस्थानवासी हिंदीयांचें एक राष्ट्र बनलें आहे व बनूं शकतें हें लोकांस समजाविलें पाहिजे. राज्य राजाचें नव्हे तर लोकांचें हा सिद्धान्त लोकांस पूर्णपणें उमगला पाहिजे. इंग्रज किंवा पंचम जॉर्ज हाच आमचा राजा आहे, त्याशीं ताटातूट करून कधींहि हित होणार नाहीं; किंबहुना हिंदी राष्ट्राचें अस्तित्व राहणार नाहीं हें निर्विवाद आहे. पण इंग्रजांचें किंवा बादशहाचें हें राज्य खासगी मिळकतीप्रमाणें आहे ही कल्पना सुटली पाहिजे. कल्पना ही प्रचण्ड शक्ति आहे. धर्मविचारांत व आचारांत कल्पनांचें प्रचण्ड कार्य तर दिसून येतेंच. बौद्धाचे लाखों भिक्षु संसार सोडून कल्पनांच्या जोरावर अरण्यांत गेले. मुसलमानी धर्माच्या कल्पनांनीं प्रेरित होऊन आरबांनीं सर्व पृथ्वीवर पराक्रम केला. राजकीय बाबतींत कल्पनांचा जोर दिसून येतो. बलवानाचें राज्य असलेंच पाहिजे या कल्पनेनें भरलेले जर्मन हजारों नव्हे लाखों धारातीर्थीं पडत आहेत. पण आम्हांस लढावयाचें नसून शांततेच्या मार्गानें प्रत्येक राष्ट्राचे निसर्गसिद्ध हक्क म्हणजे स्वयंशासितपद्धतीचे हक्क मिळवावयाचे आहेत. स्वराज्याची योग्य कल्पना नसल्यानें राष्ट्राभिमान, एकजूट वगैरे आमच्यांत नव्हती, ती आमच्यांत येऊन स्वराज्याची योग्य कल्पनाच प्रत्येक हिंदी मनुष्याच्या अन्तःकरणांत बिंबली तर हिंदुस्थानास स्वराज्य इंग्रजांकडूनच मिळाल्याशिवाय राहणार नाहीं. हल्लींची लोकांची स्वराज्याविषयींची जागृति आम्हांस आशा उत्पन्न करीत आहे. आमच्यांतील आकुंचित स्वार्थबुद्धि नष्ट होऊन आपसांतील दुही मिटेल. स्वराज्याचें योग्य ध्येय लोकांपुढें बुद्धिमानांनीं नेटानें ठेवलें पाहिजे. हेंच ‘ मराठेशाही बुडाली कां ’ या प्रश्नाच्या मीमांसेवरून आम्हांस शिकावयाचें आहे.



# राजवाडे-संशोधन-मंदिराचा

## कोनशिलास्थापन-समारंभ ( २७।१२।२९ )

### ( अध्यक्षनात्यानें भाषण ).



वि. का. राजवाडे यांची विलक्षण बुद्धिमत्ता, त्यांची अभ्यासाची अविश्रांत चिकाटी, निष्कांचनवृत्तीनें राहून विद्याव्यासंग चालविण्याचा निश्चय आणि भारतेतिहासाविषयीं एकान्तिक भक्ति या गुणांमुळें ते लोकांना किती आदरणीय झाले होते याची साक्ष आजचा समारंभच देत आहे. शेंकडो विद्वान् झाले आहेत, इतिहासाचा व्यासंग करणारे अनेक आहेत व होतील. पण ज्यांच्या नांवानें मंदिर स्थापण्याचा असा उपक्रम आपण करितों असे पुरुष एखादे दुसरेच असतात. एखादा धनाढ्य देवाचें मंदिर बांधील, एखाद्या संताचा मठ तयार होईल, एखाद्या राजकीय क्षेत्रांतील देशाच्या पुढाऱ्याचें स्मारक-मंदिर बांधलें जाईल. पण केवळ विद्या-व्यासंगी इतिहास-संशोधकाचें स्मारक आपण-जनता-बांधीत आहों यावरून कै. राजवाड्यांची कामगिरी किती अप्रतिम आणि स्मरणीय झाली आहे याची आपल्यास कल्पना येईल. कै. राजवाड्यांच्या ठिकाणीं कांहीं स्वभाव-दोष होते. परंतु या अप्रतिम गुणामुळें ते सर्व लोपून जात, त्यांवर लोक प्रेमच ठेवीत व त्यांजविषयीं आदर बाळगीत. कालिदासानें म्हटल्याप्रमाणें " एको हि दोषो गुणसन्निपाते । निमज्जतीन्दोः किरणेष्विवांकः " अशी त्यांची स्थिति होती. कदाचित् दोष ज्यास्त होते असें कोणी म्हणेल तरी सुद्धां कै. राजवाड्यांच्या एका महान् गुणाचें इतकें पराकाष्ठेचें वैशिष्ट्य होतें कीं त्या गुणांत सर्व दोष लुप्त होऊन जात. हाहि उलट अनुभव वर-प्रमाणें जगतांत येतो आणि कवि असें हि म्हणूं शकतो कीं " एको गुणः कोटिगतो हि दोषान् । निहन्ति पापानि यथेशभक्तिः ॥ " एकच गुण जर पराकाष्ठेला पोंचला असेल तर ज्याप्रमाणें ईशभक्ति अनेक पापांना नष्ट करते त्या प्रमाणें तो गुण अनेक दोषांना नष्ट करतो. कै. राजवाड्यांच्या ठिकाणीं असा पराकाष्ठेचा लोकोत्तर गुण होता आणि त्याचें वर्णन आजच्या प्रसंगीं करणें अस्थानीं होणार नाहीं.

कै. राजवाड्यांची अत्यन्त श्रेष्ठ व महनीय कामगिरी म्हणजे महाराष्ट्राच्या इतिहासाचें संशोधन करून त्यांनीं अमोल सामग्री जमा करून ठेविली आणि मराठ्यांच्या इतिहासास निराळें वळण लावून दिलें ही होय. त्यांचा जन्म श. १७८६ मध्यें झाला व मृत्यु श. १८४८ त झाला. एकंदर ६२ वर्षांच्या आयुष्यांतील पहिलीं २४।२५ वर्षें वजा केलीं तर राजवाड्यांनीं ३८ वर्षे सतत आपल्यास याच कार्याला एकानिष्ठेनें वाहून घेतलें होतें. कॉलेजांतिल त्यांच्या स्वतंत्र वृत्तीच्या गोष्टी मीं पुष्कळ ऐकल्या आहेत; तथापि त्यांस इतिहासाची आवड तेव्हांपासून होती कीं नाहीं हें मला ठाऊक नाहीं. कॉलेजांतून निघाल्यावर त्यांनीं अनेक लेख लिहिले आणि कांहीं मासिकें चालविलीं; पण तीं निरनिराळ्या विषयांवर होतीं. परंतु असें दिसतें कीं त्यांच्या वेळीं मराठ्यांच्या इतिहासाची चिकित्सक चर्चा होण्यास सुरवात झाली होती. नीळकंठराव कीर्तने यांनीं ग्रँन्ट डफच्या इतिहासांतील कित्येक चुका दाखविल्या होत्या. मराठ्यांच्या इतिहासावर प्रकाश पाडणारे अस्सल कागदपत्र छापण्याचें काम मोडक व साने यांनीं सुरू केलें होतें. याच सुमारास विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचा इतिहासावरील निबंध प्रसिद्ध होऊन इतिहासापासून होणाऱ्या फायद्याचें उत्कृष्ट विवेचन व त्याचप्रमाणें आपल्या लोकांविषयीं आपली अनादरबुद्धि असल्यानें पाश्चात्याचे लेखक व आपलेकडील पश्चात्यांची री ओढणारे लोक मराठ्यांच्या इतिहासाचा कसा विपर्यास करीत याचें विशदीकरण, लोकांसमोर आलें होतें. मराठ्यांच्या कित्येक बखरी याच वेळीं प्रसिद्ध झाल्या. त्यांत कालविपर्यास व अतिशयोक्ति हे दोष स्पष्ट दिसून आल्यानें महाराष्ट्राच्या इतिहासाचें संशोधन होण्याची किती आवश्यकता आहे हें राजवाड्यांच्या ध्यानांत आलें असे दिसतें; आणि त्यांनीं महाराष्ट्राच्या इतिहासाच्या संशोधनाच्या कार्यास महाराष्ट्राच्या उत्कट प्रेमानें आपल्यास वाहून घेतलें. संसारत्याग केल्याशिवाय महत्कार्य होत नाहीं. बुद्धाला राज्य सोडल्याशिवाय नवीन धर्म शोधून काढतां आला नाहीं. डिग्री मिळविलेल्या लोकांस नोकरी, वकिली वगैरे द्रव्यार्जनाचें त्यावेळीं मुबलक मार्ग होते ते सोडून राजवाड्यांनीं या कार्यासाठीं निष्कांचन्य पत्करलें. पण नुसत्या संसारत्यागानें कार्य होत नाहीं. संसार सोडलेले बैरागी पुष्कळ आहेत. बुद्धिमत्ता हा दुसरा आवश्यक गुण आहे आणि जें कार्य हातीं घेतलें तें निश्चयानें

व चिकाटीनें शेवटपर्यंत चालविण्याचा निश्चय हा तिसरा गुणहि आवश्यक आहे. राजवाड्यांना हे दोन्ही गुण ईश्वरकृपेनें होते आणि म्हणूनच त्यांनीं आपल्या ३८ वर्षांच्या परिश्रमानें मराठ्यांच्या इतिहासाचीं किती साधनें मिळविलीं हें त्यांचे छापलेले २१ खण्ड आणि त्यांनीं स्वत: लावून ठेविलेल्या अप्रकाशित कागदांच्या मोठ्या दहा पेट्या साक्ष देत आहेत. हे कागदपत्र जमविण्यास त्यांना किती प्रयास पडले व त्यांनीं कसे हाल काढले याबद्दलच्या हकिकती प्रसिद्ध आहेत. सह्याद्रीच्या दऱ्याखोऱ्यांतून व महाराष्ट्राच्या वरघाटी रेल्वे नसलेल्या सपाट प्रांतांतून अनवाणी फिरणें, प्रसंगविशेषीं उपास काढणें, वगैरे त्रास तर त्यांनीं सोसलेच; पण कित्येकदां ज्यांचे जवळ कागद असत त्यांनीं साफ नाहीं म्हणून इनकार करणें वगैरे मानहानिकारक प्रसंग त्यांवर येत. परंतु त्यांची चिकाटी आणि नि:सीम इतिहासभक्ति पाहून हे एक इतिहासाचे फकीर आहेत अशी आदरबुद्धि लोकांत उत्पन्न होई आणि शेवटीं राजवाड्यांचें कार्य होत असे. याच्या पुढचा त्रासहि कमी नसे. एखादा जुन्या कागदाचा गठ्ठा मिळाला तरी तो तपासून त्यांतली उपयोगी सामुग्री बाहेर काढणें हें हि अत्यंत त्रासदायक काम आहे; तेंहि तितकेच चिकाटीनें ते करीत. अशा रीतीनें जमविलेला कागदांचा संग्रह फार महत्त्वाचा आहे आणि तो येथें धुळयास असल्यानें येथें राजवाडेस्मारकमंदिर तयार होऊन त्यांत ठेविला जावा आणि अभ्यासिला जावा हें अत्यंत इष्ट आहे. प्रत्येक खऱ्या फाकिरास सरळ अंत:करणाचे भक्त, दीक्षित किंवा बुटीसारखे, भेटतातच; त्याचप्रमाणें कै. राजवाड्यांस धुळें येथील देव व भट हे भक्त भेटल्यानें त्यांनीं हें मंदिर बांधण्याचा उपक्रम करावा हें सहाजिकच आहे. अर्थात् रा. देव व भट ह्याबद्दल महाराष्ट्रानें प्रेमपुर:सर आभार व्यक्त करावे हेंहि क्रमप्राप्त आहे.

कै. राजवाड्यांनीं संशोधनाच्या कामांत अतिशय व्यापकदृष्टि ठेविली होती हें प्रथम लक्षांत ठेविलें पाहिजे. इतिहास म्हणजे केवळ राजकीय वृत्त नसून त्यांत लोकस्थितीच्या सर्व बाबी येतात असा त्यांचा योग्य समज होता. सामाजिक वृत्तें, त्याचप्रमाणें राजशासनपद्धति, लोकांचे व्यापारव्यवहार, जमिनीच्या वसूलीच्या वगैरे व्यवस्था या सर्व बाबी फार महत्वाच्या आहेत आणि त्यांचा इतिहास समजणें आवश्यक असतें. या दृष्टीनें ते अनेक कागदांचा संग्रह करीत. जे कागदपत्र कित्येकांनीं गळाठा

म्हणून टाकले ते त्यांनीं आस्थेनें तपासून पाहिले आणि महत्त्वाच्या कागदांचा त्यांनीं संग्रह केला. दुसरी महत्त्वाची त्यांच्या संशोधनाची बाब म्हणजे समकालीन कागदपत्र शोधून काढून ते छापणें व संगृहीत करणें. बखरी वगैरे इतिहासाचीं साधनें आहेत, पण त्याहिपेक्षां ज्यास्त किंमतीचें साधन म्हणजे तत्कालीन लेख, मग ते कोणतेहि असोत. कारण खासगी पत्रें, यादी, जमाखर्च इत्यादिकांवरून अनेक गोष्टींचा पत्ता आपल्यास लागतो व इतिहासाचा मुख्य जीव म्हणजे कालानुक्रम यावर चांगला प्रकाश पडतो. बखरीचा प्रथम दोष राजवाड्यांनीं सांगितल्याप्रमाणें कालविपर्यास हा असतो. तो दुरुस्त केल्याशिवाय खरा इतिहास जगतासमोर मांडतां येणार नाहीं हें उघड आहे. बखरी माहितगार लोकांनीं, अखबारनवीसांनीं लिहिलेल्या वृत्तांवरून तयार केलेल्या असतात असें नसतें. किंबहुना अखबाराच्या उलट दिशेनें ऐकीव माहितीवरून लिहिल्या असल्यानें त्यास बखर असें वर्णव्यत्यासाचें नांव योग्य आहे. तेव्हां खरा इतिहास समजण्यास, हीं त्या त्या वेळीं लिहिलेलीं साधनेंच पाहिजेत आणि म्हणूनच समकालीन लेखांचें महत्त्व आहे. दुसरा बखरीचा दोष राजवाड्यांनीं सांगितल्याप्रमाणें अतिशयोक्ति हा आहे. वर्ण्यविषय वाढून फुगवून लिहावा, असें लेखकास साहजिक वाटतें आणि या वृत्तीमुळेंच हिंदुस्थानांत इतिहासाची थोडीशी अवहेलना झाली आहे, हें आपल्या देशांतील इतिहासाच्या इतिहासाकडे वळल्यानें आपल्यास दिसेल. तें कसें हें थोडक्यांत सांगतों.

इतिहासाची योग्य कल्पना मात्र हिंदुस्थानांत फार प्राचीन काळापासून आहे. इतिहास हा शब्दच याची साक्ष देतो. ‘ इतिह आस ’ ‘ याप्रमाणें झालें’ असा या शब्दाचा अर्थ आहे. झालेलें वृत्त या तऱ्हेनें झालें असें सांगणारा ग्रंथ तो इतिहास. अशा प्रकारचे ग्रंथ उपनिषत्कालाच्याहि पूर्वी असावेत आणि ते वाचले जात असावेत असें दिसतें. छान्दोग्य उपनिषदांत नारदास सनत्कुमारानें विचारलें ‘ तूं काय शिकला आहेस ’ तेव्हां त्यानें उत्तर दिलें, ‘ ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद, पांचवे इतिहासपुराण पञ्चमं ’ तेव्हांपासून इतिहासाला पांचवा वेद असें नांव पडलें आहे. इतिहास आणि पुराण असे दोन प्रकार तेव्हांपासून होते. पुराण म्हणजे जें प्राचीन कथानक ऐकीव सांगत तें, त्यास इतिहास याची किंमत नाहीं. इतिहास

बहुधा प्रत्यक्ष पाहून लिहिलेलें वृत्त असे. यांतच पुढें आख्यान आणि उपाख्यान असे दोन प्रकार झाले. पाणिनीच्या वेळेला कित्येक आख्यानें होतीं असें त्याच्या एका सूत्रावरून स्पष्ट दिसतें. रामायण आणि महाभारत हे मुळांत इतिहास होते व त्यांस हल्लींच्या ग्रंथांत इतिहास व आख्यान असेंच म्हटलें आहे. कारण व्यास आणि वाल्मीकि हे तें तें वृत्त प्रत्यक्ष पहाणारे होते. ‘ जयो नामेतिहासोऽयं–अस्याख्यानवरिष्ठस्य–ततो जयमुदीरयेत् ’ इत्यादि वाक्यावरून हे मूळचे इतिहास होते. हल्लीं धर्मशास्त्रांत याच ग्रंथांस इतिहास समजतात. पण या ग्रंथांची इतिहासदृष्ट्या जी किंमत उतरली आहे याचें कारण वर सांगितलेली अतिशयोक्तीकडे धावणारी लेखकांची वृत्ति ही होय. हे ग्रंथ मुळांत लहान असून पुढें इतके अनेक लेखकांनीं वाढविले कीं त्यांस हल्लीं इतिहासाची किंमत नाहीं. उपनिषत्कालानंतर भारतीयांचें इतिहासाकडे दुर्लक्ष झालें असें दिसतें. ज्या काळांत ग्रीस देशांत थुसिडायडीससारखा अप्रतिम इतिहासकार झाला त्या कालांत इकडे खरा इतिहास लिहिला गेला नाहीं हें खरें. तथापि इतिहास लिहिण्याची व त्याचीं साधनें लिहून ठेवण्याची परंपरा नष्ट झाली नव्हती. हिंदुस्थानांत प्रत्येक देशांत नीलमत संज्ञेचें इतिवृत्त लिहून ठेवीत असत असें ह्यूएनत्संगानें इ. स. ६४० च्या सुमारें नमूद केलें आहे. यालाच आपण Blue book म्हटलें तरी चालेल. काश्मीरचा इतिहास राजतरंगिणी कल्हणानें लिहिला, त्याचे प्रारंभीं, पूर्वीचे इतिहास व नीलमत पाहून मी हा ग्रंथ लिहितों असें त्यानें लिहिलें आहे. अर्थात इतिहाससंज्ञेस पात्र असे तेव्हा ग्रंथ होते हें उघड आहे. राजतरंगिणी, इतिहास या नांवास साजेल अशीच आहे. त्यांत अतिशयोक्तीचा मोह वावरत असलेला दिसत नाहीं. इ. स. ११०० च्या सुमाराचा दुसरा प्रसिद्ध असलेला इतिहास म्हणजे बिल्हणानें लिहिलेला विक्रमांकदेवचरित हा ग्रंथ आहे. हाहि चांगला इतिहास आहे. हम्मीरचरित वगैरे आणखी ग्रंथ उपलब्ध आहेत. ते सर्व संस्कृतांत आहेत. याच तऱ्हेचा इतिहाससंज्ञेस योग्य असा शिवाजी महाराजांच्या चरित्रावरील शिवभारत हा ग्रंथ उपलब्ध झालेला आहे. समकालीन लेखकानें, मग तो कवि कां असेना, लिहिलेला इतिहासग्रंथ बहुधा अतिशयोक्तीच्या कच्छीला बळी पडत नाहीं असें दिसतें. पण वर्ण्यवृत्तानंतर शंभर दोनशें वर्षांनीं जो ग्रंथ लिहिला जातो त्यांत अशा वृत्तीनें अयोग्य भर पडते आणि

सहजच त्याची किंमत कमी होते. पृथ्वीराजरासा पृथ्वीराजानंतर तीनशें वर्षांनीं तयार केलेला दिसतो. तो अशाच प्रकारचा आहे आणि महाराष्ट्रांत अलीकडे लिहिलेल्या कित्येक बखरी याच कारणानें विश्वसनीय नाहींत. त्यांतील कित्येक विधानें अतिशयोक्तीचीं कशीं असतात याची कल्पना शहाजी आणि त्याचा सासरा लुकजी जाधव यांच्या संबंधाच्या कथांवरून स्पष्ट होते. त्यांच्यांत पुढें द्वेष उत्पन्न झाला हें खरें. पण याचीच अतिशयोक्ति करून शिवाजीच्या जन्मापूर्वी ते कसे भांडले, शहाजीनें गर्भार बायकोस कशी टाकली वगैरे बखरींतील असंभाव्य वर्णनावरून हें आपल्या प्रत्ययास येतें. अशा रीतीनें हिंदुस्थानांतील इतिहास समकालीन नसेल तर तो कसा दूषित होत आला आहे हें मीं आपल्यास थोडक्यांत सांगितलें. इतिहास संज्ञेस योग्य असा ग्रंथ लिहिणें झाल्यास त्यास समकालीन लेखांचें साधन जरूर पाहिजे आणि याच दृष्टीनें कै. राजवाडे यांनीं जिवापाड संशोधन केलें. किंबहुना अजून पुष्कळ संशोधन बाकी उरलें आहे, असा त्यांचा समज होता आणि मराठ्यांचा खरा व संपूर्ण इतिहास लिहिण्याचा अद्याप काळ आला नाहीं असें ते मानीत.

बखरी, तसेंच परस्थांनीं लिहिलेल्या हकीकती व इतिहासग्रंथ, निर्दोष नसण्याचें कारण माझ्या दृष्टीनें आणखी एक आहे. लेखकाचे पूर्वापग्रह सत्य दिसण्याच्या बरेच आड येतात असें म्हणतां येईल. Pre-existing-bias याला आपण पूर्व अपग्रह असें म्हणूं. या अपग्रहांमुळें वृत्तांचा विपर्यास होतो इतकेंच नव्हे तर साधनें तींच असली तरी तीं निराळीं दिसूं लागतात. याचसाठीं त्या देशाचा इतिहास तेथील लोकांनींच लिहिला असतां चांगला व माननीय होतो असा पाश्चात्य विद्वानांचाहि समज आहे. याकारणानें कांहीं गैरसमजुती प्रचलित होतात आणि इतिहासांत नमूद होतात. शिवाजी लुटारू होता, एक आदरणीय स्वराज्यस्थापक नव्हता, असा गैरसमज प्रचलित होता तो आतां सुदैवानें नष्ट झाला आहे. मराठ्यांनीं फ्रान्सच्या रणभूमीवर सर्वांत श्रेष्ठ असें शौर्य दाखविलें तेव्हां मराठ्यांविषयींचा इंग्रजांचा वरील अपग्रह गेला व ठिकठिकाणीं 'मराठा तितुका मेळवावा' अशा जाहिराती इंग्रजांनीं लाविल्या व शिवाजी महाराजांच्या पुतळ्याचा उद्‌घाटनसमारंभ राजपुत्रानें केला. रामदास राजकारणी साधु नव्हते असें एक दुसरें वेडसर मत अलीकडे उत्पन्न झालें आहे. साधनें तींच पण अप-

ग्रहानें त्यांचा अर्थ कसा भिन्न दिसतो याचें हें एक उदाहरण आहे. या गोष्टी वृत्ताच्या आहेत, केवळ मताच्या नाहींत आणि जसजसें संशोधन ज्यास्त होईल तसतसे स्पष्ट साधनांनीं हे अपग्रह दूर होतील. कै. राजवाड्यांनीं शिवाजीला लिहितां वाचतां येत नव्हतें ही भ्रान्त समजूत निर्मूळ केली. त्यांच्या संशोधनाचा दीर्घप्रयत्न तसाच चालू ठेविला पाहिजे आणि अशा मंदिराच्या स्थापनेनें हें कार्य चालू ठेवण्यास निःस्वार्थी इतिहासप्रेमी विद्यार्थी मिळतील अशी मला आशा वाटते.

असो, कै. राजवाड्यांनीं इतिहासाच्या संशोधनाच्या दिशेनें किती उत्तम कामगिरी केली याचें विस्तारपूर्वक वर्णन करण्याचें माझें सामर्थ्य नाहीं. कोणकोणते प्रश्न त्यांच्या संशोधनानें उत्तम रीतीनें सुटले हें सांगणें मला कठिण आहे. त्यांनीं प्रसिद्ध केलेलें वाङ्मय इतकें विस्तृत आहे आणि अजून अप्रकाशितहि इतकें विस्तृत आहे कीं तें समग्र पाहणें दीर्घाभ्यासाचें काम आहे. तथापि कै. राजवाड्यांनीं इतिहासाच्या संशोधनांत क्रान्ति घडवून आणली, ही गोष्ट आतां सर्वत्र मान्य झाली आहे. आणि परप्रान्तीय सरकारसारखे इतिहासप्रेमी विद्वान किंबहुना इतर देशांतील विद्वान् राजवाड्यांनीं केलेल्या कामगिरीचा गौरव करतात व त्यांनीं जमविलेलीं साधनें उपयोगांत आणतात. महाराष्ट्राच्या इतिहासाच्या या अत्यंत महनीय कामगिरीशिवाय राजवाड्यांनीं दुसरी एक अत्यंत महनीय कामगिरी केली आहे तिचा उल्लेख करणें जरूर आहे. मराठीचा भाषा—दृष्ट्या इतिहास त्यांनीं फारच चांगला लावला आहे. भाषाशास्त्राकडे अलीकडे त्यांचें फारच लक्ष गेलें आणि या बाबतींत त्यांच्या बुद्धिमत्तेनें आणि निदिध्यासानें फारच मोठी कामगिरी त्यांनीं केली आहे. ज्ञानेश्वरीची जुनी प्रत, म्हणजे एकनाथानें ज्ञानेश्वरीस अर्वाचीनरूप दिल्यापूर्वीची प्रत, त्यांस संशोधनांत सांपडली हा एक त्यांनीं अपूर्व शोध लाविला. त्या ज्ञानेश्वरीला जी त्यांनीं प्रस्तावना जोडली आहे ती मराठीच्या अभ्यासकांस एम. ए. च्या परीक्षेंत वाचण्यास ठेवली आहे, यावरून तिचें महत्त्व लक्षांत येईल. पिशेल, हर्नेल, स्टेनकोनाऊ, ग्रीयर्सन इत्यादि पाश्चात्य भाषाकोविदांनीं मराठीचा इतिहास संशोधिला आहे हें पाहून पाश्चात्यांची ज्ञानलालसा किती दांडगी आहे याचें कौतुक वाटतें. स्टेनकोनाऊ हा तर स्वीडिश विद्वान आहे. कोठें स्वीडन आणि कोठें महाराष्ट्र.

अशा या विद्वानांच्या जोडीला बसविण्यास हिंदुस्थानांतील विद्वान मला राजवाड्यांशिवाय दुसरा दिसत नाहीं. त्यांनीं मानभावांच्या ग्रंथांतील अनेक संकेत उकलून काढले. नामांचीं व क्रियापदांचीं रूपें मराठींत कशीं झालीं आहेत, याजवर त्यांनीं विचार केला. खोल इतिहास जसा लोकांचा जिज्ञासूस मनोहर वाटतो, तसा शब्दांचाहि वाटतो आणि म्हणून इतिहाससंशोधक राजवाडे शब्दांच्या इतिहासाकडे वळले. ह्या विषयांत किती मनोरंजक प्रश्न उपस्थित होतात याचें एकच उदाहरण देतों. मराठींत रामाचा, रामाची, रामाचें अशीं षष्ठीचीं रूपें होतात. पण संस्कृतांत फक्त रामस्य असें रूप आहे आणि महाराष्ट्रींतहि रामस्स असें आहे. हा चकार कोठून आला आणि विभक्ति विशेषण कशी झाली ? हिन्दींत रामाका—रामाकी आहे, गुजराथींत रामाना, रामानी, रामानु आहे, मारवाडींत रामारा, रामारी असें आहे, बंगालींत विशेषण स्वरूप नसून नुसतेंच रामेर आहे. तुळसीकृत रामायणांत केर व केरी असे प्रत्यय आढळतात. तेव्हां हा च, क, न, र आला कोठून हा एक मनोरंजक प्रश्न आहे. याचा अद्याप भाषाशास्त्रज्ञांस चांगला उलगडा लागला नाहीं. कै. राजवाड्यांनीं षष्ठी 'त्य' प्रत्ययान्त तद्धित आहे, असें प्रतिपादिलें आहे. एका ११०० च्या सुमाराच्या शिलालेखांत 'सत्क' प्रत्यय आला आहे असें मी राजवाड्यांस कळविलें तेव्हां त्यांनीं हें प्रत्ययान्तरूप चचें निगमक होऊं शकेल असें त्यांनीं मला लिहिलें होतें. असो, सांगण्याची गोष्ट ही कीं, या विषयांत त्यांनीं फार परिश्रम करून कित्येक नवीन सिद्धांत आपल्यापुढें मांडले आहेत. महाराष्ट्राचा वसाहतकाल या लेखांत त्यांनीं महाराष्ट्रांतील शेंकडों खेड्यांचीं नांवें घेऊन तीं कशीं संस्कृतोत्पन्न आहेत हें तपशीलवार दाखविलें आहे. ते कोणताहि सिद्धान्त किती बारीक तपशिलाच्या पुराव्यासह मांडीत असत याची यावरून कल्पना होईल. ब्राह्मण—मराठ्यांचीं आडनांवें कशीं गोत्रोत्पन्न आहेत हें त्यांनीं एका दुसऱ्या लेखांत फार मार्मिकतेनें दाखविलें आहे. राजपुतान्यासंबंधीं इतिहास लिहित असतां मी, खोंमाण रजपुत राजाचें नांव आलें, त्याची व्युत्पत्ति मला लागेना म्हणून राजवाड्यांना विचारली, तेव्हां त्यांनीं विचार करून ककुद्मान् शब्दापासून खोंमाण नांव आलें आहे असें सुचविलें. प्रथम वर्णांत हकार घालण्याची कित्येक

वेळां अशिष्टाच्चारांत पद्धत असते हें नंतर माझ्या लक्षांत आलें. उदाहरणार्थ खोटें हें संस्कृतांतील कूट शब्दावरून झालेलें आहे. अशिष्ट लोकांस कंदिलाबद्दल कंदील, तर्पणाऐवजीं थर्पण म्हणण्याची प्रथा असल्याचें आपण पाहतों, त्याची व्युत्पत्तिहि अशीच लागते.

कै. राजवाड्यांचा भाषाशास्त्राचा व्यासंग येथेंच थांबत नाहीं. त्यांनीं अलीकडे संस्कृताचाहि या शास्त्राच्या दृष्टीनें फार खोल विचार केला. वैदिक संस्कृताच्याहि पलीकडे त्यांची विशाल बुद्धिमत्ता जाऊन वेदांच्या पूर्वकालीं कसे शब्द असावे याचा त्यांनीं छडा लाविला असें समजतें. संस्कृत धातु एकत्र करून त्यावरून एक विशिष्ट सिद्धान्त ते काढणार होते. त्यांचे हातचे धातूंच्या अकारविल्हे याद्री व त्यावरून निघणारे सिद्धांत विशद करणारे प्रस्तावना वगैरे लेख त्यांच्या वाडांत असून अप्रकाशित पडले आहेत. दुर्दैवानें या विषयींचा आपला भाषासंशोधनात्मक ग्रंथ जगताच्या समोर आणण्यापूर्वीं ते दिवंगत झाले. ही सामुग्री तितक्याच बुद्धिमत्तेनें समजून घेऊन जगापुढें मांडण्याचें श्रेय एखाद्या भावि राजवाड्यानें घेतलें पाहिजे. पण अद्वितीय व्यक्ति वारंवार उत्पन्न होत नाहींत ही गोष्ट मनांत आली म्हणजे कांहींशी निराशा उत्पन्न होते. तथापि देव व भट या भक्तांच्या प्रोत्साहनानें या नवीन तयार होणाऱ्या संशोधनमंदिरांत ही कै. राजवाड्यांनीं जमविलेली साधनसामुग्री ठेविली जाऊन निःस्वार्थी विद्यार्थी त्याचा योग्य उपयोग करतील. महाराष्ट्रांत विद्वत्ता, स्वार्थत्याग, चिकाटी इत्यादि गुण अद्याप व आहेत असा माझा विश्वास आहे.



# कोंकण व कोंकणस्थ

## ( आपटेकृत गोखले घराण्यांचा इतिहास– प्रस्तावना )



परशुरामानें क्षत्रियांच्या कोपानें निःक्षत्रिय पृथ्वी एकवीस वेळां करून शेवटीं अश्वमेध यज्ञ केला व ब्राह्मणांस सर्व पृथ्वी दान दिली; अशी कथा पुराणांतून प्रसिद्ध आहे. पृथ्वी दान दिल्या-वर आपल्यास राहावयास जागा पाहिजे म्हणून परशु-रामानें समुद्रापासून सह्याद्रीच्या पश्चिमेस जागा मागून घेतली तें हें परशुराम–क्षेत्र अगर कोंकण होय, अशी ही पौराणिक कथा आहे. सह्याद्रीपासून समुद्र हटलेला दिसतो या भौगोलिक परिस्थितीवर ही कथा रचली आहे, हें उघड आहे. या भूमीस कोंकण नांव असून तें मूळच्या द्रविड लोकांनीं दिलेलें आहे. या देशांत मूळ द्राविडी वंशाच्या लोकांची व विशेषतः कोळी ( कैवर्त ) वगैरे लोकांची वस्ती होती. येथें भारतीय आर्य लोकांची वसति कधीं झाली याचा आपण ऐतिहासिक दृष्ट्या विचार करूं.

कोकण.

महाभारतांत परान्त आणि अपरान्त असे दोन देश उत्तरेकडील आर्य देशांच्या यादींत आहेत ( भीष्म. अ. ९ ). यांचे दक्षिणेकडे जे द्राविड देश आहेत त्यांच्या यादींत कोंकण हें नांव आहे; यावरून महा-भारतकाळीं परान्त म्हणजे हल्लींचा सुरत जिल्हा आणि अपरान्त म्हणजे हल्लींचा ठाणें जिल्हा. यांत आर्यांची वस्ती झाली होती. अर्थात् इ. स. पू. ३०० च्या सुमारास अपरान्तांत आर्य लोक आले होते. बुद्धाच्या ( इ. स. पू. ५०० च्या सुमारास ते येथें नव्हते, किंवा फार थोडे होते. कारण, बुद्धानें आपला शिष्य पूर्ण यास अपरान्तांत आपला धर्म उपदेशिण्यास पाठविलें, त्या वेळीं तेथील लोकांच्या क्रूर स्वभावाचें अतिशय भयंकर वर्णन केलें आहे. असो; तर बुद्ध काळापासून म्हणजे इ. स. पू. ५०० पासून ३०० पर्यंत येथें आर्यवस्ती झाली आणि बौद्धधर्म व आर्यधर्म दोन्ही येथें प्रचलित झाले असें ऐतिहासिक दृष्ट्या मानतां येतें.

आर्यधर्मी ब्राह्मण अपरान्तांत येऊन राहिले तेच बहुधा हल्लींच्या कोकणस्थांचे पूर्वज असावेत असा माझा तर्क आहे. कोंकणस्थांत परशु-

राम हें दैवत नाहीं. इतर बहुतेक आर्यांप्रमाणें कोणी तरी महादेव व कोणी तरी देवी त्यांचें कुलदैवत असतें. परंतु कोंकणस्थांचा आणि परशुरामाचा संबंध प्राचीन दिसतो. येथें ही गोष्ट सांगणें जरूर आहे कीं, परशुरामाचें प्राचीनतम स्थान पूर्व समुद्राच्या किनाऱ्यावर आहे. तेथें वैतरणानदी आणि महेंद्रपर्वत असून परशुरामाची वेदी आहे. महाभारतांत वनवासांत पांडव तीर्थयात्रेसाठीं फिरले त्या वेळीं पूर्व समुद्रावर त्यांनीं परशुरामाचें दर्शन घेतलें, असें वर्णन आहे ( वन. अ. ११५ ) तें तेथेंच. रेणुकेचा वध व क्षत्रियांचा निःपात वगैरे परशुरामानें केलेल्या पराक्रमाची कथा महाभारतांत येथेंच दिली आहे. कश्यपास पृथ्वी दान केल्यावर परशुराम महेंद्र पर्वतावर वास करूं लागला असें त्यांत वर्णन आहे. अर्थात् सह्याद्रीपासून समुद्रास मागें सारून आपल्याकरितां परशुरामानें नवीन क्षेत्र निर्माण केलें ही कथा मागाहूनची आहे. हें पूर्वेकडचेंच परशुरामाचें क्षेत्र व ब्राह्मण पश्चिमेस शूर्पारक क्षेत्रांत आले असें दिसतें. ज्याप्रमाणें युधिष्ठिरहि पूर्व समुद्रावरून गोदावरीच्या दक्षिणेस द्राविडांतील नारीतीर्थ वगैरे तीर्थें पहात पहात अत्यंत पवित्र अशा शूर्पारक क्षेत्रांत आला, असें वर्णन वनपर्व अ० ११८ यांत आहे, तसेंच हे लोक आले असावे असा तर्क होतो. यांत पश्चिमेकडील अन्य तीर्थांचें नांव नाहीं. शूर्पारक क्षेत्र म्हणजेच अपरान्त. आणि शूर्पारक अथवा सोपारें हें पूर्वकाळीं मोठें व्यापाराचें बंदर होतें. तेथें युधिष्ठिरानें समुद्रकांठचा प्रदेश उल्लंघन केल्यानंतर तपस्वी लोकांच्या समुदायानीं भरलेली धनुर्धरश्रेष्ठ राम याची वेदी पाहिली. तेथें नंतर अनेक इंद्र, वरुण वगैरे वैदिक देवतांचीं मंदिरें अवलोकन केलीं. नंतर तो शूर्पारकास परत येऊन, प्रभास क्षेत्रास गेला असें वर्णन महाभारतांत आहे. ( भाषांतर पान २४३ पु. दोन—वनपर्व ). यावरून या काळीं शूर्पारक क्षेत्रांतच ब्राह्मण वस्ती असून तेथेंच परशुराम क्षेत्र होतें आणि तें अद्यापि आहे, ही गोष्ट वाचकांस सांगितली पाहिजे. सोपाऱ्याच्या पूर्वेस डोंगरांत वज्रेश्वरीच्या बाजूला अजून वैतरणी नदी आणि परशुराम—क्षेत्र आहे. महाभारतांत अन्य ठिकाणीं सुद्धां ' परशुरामानें समुद्रापासून जमीन घेतली तें शूर्पारक क्षेत्र होय; आणि तेंच अपरांत महीतल ' असें वर्णन आहे. स्कंदपुराण सह्याद्रि खंडांतहि असेंच सांगितलें आहे. आणि येथें कोंकणस्थ ब्राह्मण परशुरामानें उत्पन्न केले असें वर्णन आहे. ते श्लोक असे—

रामेण निहताः क्षत्रा एकविंशतिवारतः ।
ब्राह्मणानां ततः पृथ्वी दानं दत्त्वा यथाविधि ॥
नवीनं निर्मितं क्षेत्रं शूर्पारकमनुत्तमम् ।
वैतरण्या दक्षिणेन सुब्रह्मण्यास्तथोत्तरे ॥
सह्यात्सागरपर्यंतं शूर्पाकारं व्यवस्थितम् ॥

असो तर, कोंकणस्थांची वस्ती शूर्पारक क्षेत्रांत असून तेथून पूर्वेस डोंगरांत परशुरामाचें स्थान होतें. वैतरणा नदी येथें प्रसिद्ध आहे. तिच्या दक्षिणेस शूर्पारक क्षेत्र बरोबर आहे. पण सुब्रह्मणी नदी येथें कोणती हें सांगतां येत नाहीं. या ठिकाणाहून कोंकणस्थ चिपळून शहरास केव्हां गेले हें सांगणें कठीण आहे. शकांनीं अपरान्त देश जिंकला तेव्हां म्हणजे इ. स. १०० राच्या सुमारास ते तेथें गेले असावेत आणि तेथें आतांपर्यंत त्यांची वस्ती आहे. परशुरामाचें स्थानहि त्यांनीं आपल्याबरोबर चिपळूणाजवळ नेलें हें साहजिक आहे. पुढें ज्यावेळीं ब्राह्मणभेद देशभेदानें झाले त्या वेळीं त्यांस चिपळोणे किंवा चित्तपोलन असे म्हणूं लागले. सर्व हिंदुस्थानांत हा प्रकार इ. स. दहाव्या शतकांच्या नंतर घडला असें निश्चित म्हणतां येतें. कारण तोंपर्यंत कोणत्याहि शिलालेखांत किंवा ताम्रलेखांत ब्राह्मणांत देशभेदावरून निरनिराळीं नांवें पडलेलीं दिसत नाहींत. सर्वत्र नुसता गोत्रभेदाचा उल्लेख अशा लेखांत सांपडतो. याच्यानंतर कनोजे ( कनोज ), नागर ( नगर ), दसोरे ( दशपूर ), श्रीमाली ( श्रीमाल ), गौड ( गुड ), बंगाली ( बंगाल ) वगैरे उत्तरेकडील नांवें व गोवर्धन ( नाशिक ), चित्तपावन ( चिपळूण ), देवरुखे ( देवरुख ), कऱ्हाडे ( करहाटक ), देशस्थ ( देश ), तेलंगी ( तेलंग ) इत्यादि शहरांवरून व देशांवरून ब्राह्मणांचे भेद होऊन त्यांचा आपसांत विवाह बंद पडून फक्त स्वतःच्या संकुचित प्रांतांतच प्रचलित राहिले. तात्पर्य, ऐतिहासिक साधनांवरून असें म्हणतां येतें कीं, इ. स. १०० च्या सुमारास कोंकणस्थ हल्लींच्या कोंकणांत आले, व त्यांची एक विशिष्ट ब्राह्मण जात इ. स. १००० राच्या नंतर कायम बनली ती अद्यापपर्यंत आहे.

इ. स. १०० राच्या सुमारास कोंकणस्थ हल्लींच्या कोंकणांत आले, याजबद्दल आणखी पुरावा हरिवंशांत मिळतो. हरिवंश हें पुराण सर्वांत जुनें असून इ. स. १०० सुमारचें आहे. श्रीकृष्ण जरासंधभयानें दक्षिणेंत आला

तेव्हां कोल्हापुराच्या दक्षिणेस श्रीकृष्णाची आणि परशुरामाची गांठ पडली. आणि परशुरामानें गोमांचल पर्वत तुम्हास रहावयास सुरक्षित आहे असें रामकृष्णांस सांगितलें, असें त्यांत वर्णन आहे. यावरून शूर्पारक क्षेत्राहून परशुरामाचें क्षेत्र या काळीं आणखी खालीं दक्षिणेस आलें होतें असें स्पष्ट दिसतें. येथेंच कोंकणस्थ ब्राह्मण आज सुमारें १८०० शें वर्षे राहात आहेत. त्यांस येथोन हालावें लागलें नाहीं याचें कारण त्या ठिकाणची सुरक्षितता होय. रत्नागिरी जिल्हा बहुतेक डोंगरांनीं व्याप्त असून उत्पन्नालाहि कमी आहे, यामुळें राजकीय घडामोडींत त्याजवर जेते लोकांचा फारसा डोळा नव्हता; अर्थात् राजकीय घडामोडी येथें फारशा झाल्या असें दिसत नाहीं.

माझ्या मतें मूळ कोंकण हें नांव रत्नागिरी जिल्ह्यासच महाभारत-काळीं होतें. ह्या जिल्ह्यांत सह्याद्रीपासून तों थेट समुद्रापर्यंत लहान लहान टेकड्या पसरल्या असून हवा उत्कृष्ट आणि पाणीहि उत्कृष्ट आहे. त्यामुळें रहावयास हें क्षेत्र चांगलें असून ज्यांस फार श्रीमंत होण्याची महत्त्वाकांक्षा नाहीं, त्यांस हें क्षेत्र बरें आहे. येथें उत्पन्न शेतकीचें थोडें होतें; तथापि नारळ, सुपारी, काजू वगैरेचें उत्पन्न बरेंच आहे. येथील डोंगरांत दक्षिणे-कडील कारवाराप्रमाणें जंगल फार नसल्यानें येथील हवा चांगली आहे. पूर्वकाळीं ठाणे जिल्ह्यांत जंगल अतिशय असून अपरान्तांत हत्ती पुष्कळ होते. किंबहुना तेथील हत्तींची उत्तम म्हणून ख्याती होती, असें महाभार-तांतील एका वर्णनावरून दिसतें. याशिवाय या जिल्ह्यांत सखल प्रदेश असण्यानेंहि अपरांताची हवा चांगली नाहीं. परंतु भातशेतीचें उत्पन्न मोठें असल्यानें व उत्तरेस लागून हा प्रदेश असल्यानें येथें राज्यक्रांत्या फार झाल्या. कुलाबा जिल्ह्याचीहि स्थिति थोडीफार अशीच आहे. शेतीचें उत्पन्न मोठें असलें तरी हवा तितकी निरोगी नाहीं, आणि राजकीय घडा मोडी फार! तात्पर्य, कोंकणस्थ ब्राह्मणांनीं स्वस्थ बसून वैदिक आचार कायम ठेवण्याकरितां जो प्रांत पाहिला तो उत्तम होता, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

कोंकण हें नांव मूळ या प्रांताला असून प्राचीन काळींच म्हणजे इ. स. १००० च्या सुमारास त्याची व्याप्ति जास्त वाढली हें खरें आहे. प्राचीन लेखांत सप्त कोंकणाचा उल्लेख येतो. म्हणजे मला वाटतें अपरांतापासून थेट केरळापर्यंत निरनिराळीं सात कोंकणें होतीं. ह्युएनसंगच्या काळीं हल्लींप्र-

माणें धारवाडच्या दक्षिणेस घाटावर कांहीं कोंकणस्थ लोकांची वस्ती असून त्या प्रांताचें कोंकणपूर असें नांव दिलें आहे. पण ऐतिहासिक मूळ कोंकण म्हणजे हल्लींचा रत्नागिरी जिल्हाच होय आणि याच जिल्ह्यांत राहणारे मूळचे कोंकणस्थ ब्राह्मण होत. ठाणे जिल्ह्यांत तर व कुलाबा जिल्ह्यांतहि कोंकणस्थांचीं हल्लीं पुष्कळ घरें आहेत. पण ते सर्व पेशवाईचे काळांत इकडे आलेले असून प्रत्येक कुटुंबास आपण मूळ कोंकणांतून कोठून व केव्हां आलों याचें चांगलें स्मरण आहे. ते बहुधा दोनशें वर्षांतले असून त्यांचें मूळ ठिकाण रत्नागिरी जिल्ह्यांतच आहे. रत्नागिरी जिल्ह्यांतील कोंकणस्थ ब्राह्मणांस मात्र आपण बाहेरून कोठून केव्हां आलों याचें निश्चित स्मरण नाहीं. यावरून व एकंदर ऐतिहासिक समालोचनावरून कोंकणस्थ ब्राह्मण कोंकणांत फार प्राचीन काळीं इ. स. १०० च्या सुमारास आले असें अनुमान निघतें.

**कोंकणस्थांची उत्पत्ति.**

आतां आपण कोंकणस्थांच्या वंशाचा अर्थात् उत्पत्तीचा विचार करूं. इ. स. १००० नंतर प्रत्येक प्रांतांत राहणाऱ्या निरनिराळया पोटजाती तुटक झाल्या आणि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र चारी मुख्य जातींत हजारों पोटजाति उत्पन्न झाल्या असें आपल्यास प्राचीन ऐतिहासिक लेखांवरून म्हणतां येतें. त्यांत विशेषतः प्रांत व नगर यांच्या भेदानें या जाति उत्पन्न होऊन त्यांस त्यावरून नांवेंहि पडलीं. कोंकणांत राहणारे कोंकणस्थ किंवा मुख्य शहरावरून चिपळोणे असें त्यांस नांव पडलें. चित्तपावन हेंहि नांव याच शहरावरून पडलें असें राजवाडे म्हणतात तें बरोबर आहे. या पोटभेदाच्या संकुचितपणांत प्रांतभेद तर आहेच, पण कांहीं खाण्यापिण्याचे भेदहि आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. कोंकणस्थ पहिल्यापासून निवृत्तमांस दिसतात. अर्थात् मांस खाणारे किंवा नुसते मासे खाणारे अशा इतर ब्राह्मणांपासून ते विलग पडले हें उघड आहे. पर प्रांतांतला ब्राह्मण कशा तऱ्हेचा आहे आणि तो ब्राह्मण आहे कीं नाहीं या शंकांमुळें आपल्याच प्रांतांत आपल्याच जातींत मुलगी देण्याचा प्रघात रूढ झाला व दृढ झाला. नागरांच्या इतिहासांत अशी कथा आहे कीं, एक मांग परदेशस्थ ब्राह्मण समजला जाऊन पुढें तो एकाचा जांवई झाला. गोष्ट उघडकीस आल्यानंतर अर्थात् लग्नाचे कडक नियम नागरांनीं अमलांत आणिले.

तात्पर्य हें कीं, खानपानादि-भिन्नतेमुळें आणि प्रांताप्रांतांत दळणवळण कमी असल्यानें हे पोटजातीचे भेद दृढ झाले. याचा काळ इ. स. १००० च्या सुमाराचा आहे.

पण ह्याबरोबर एकमेकांच्या विषयीं क्षुद्र भावना व आमची जात श्रेष्ठ अशा अहंमन्यतेच्या कल्पना सुरू झाल्या. यामुळें या काळीं जातींच्या उत्पत्तीच्या मत्सरयुक्त भ्रांत कल्पना सुरू होऊन कथाहि बनल्या; त्या निरनिराळ्या पुराणांत विशेषतः स्कंदपुराणांत घुसडल्या गेल्या. कोंकण-स्थांची जेव्हां पोटजात बनली तेव्हां १४ गोत्रें त्यांत होतीं. हें मूळ धरून ब्राह्मणोत्पत्तिमार्तंड या नूतन ग्रंथांत अशी एक कथा दिली आहे कीं परशु-रामास यज्ञ करावयास जेव्हां आपल्या नूतन भूमींत ब्राह्मण मिळेनात तेव्हां त्यानें १४ कैवर्त अथवा कोळी यांस ब्राह्मण करून घेतलें, आणि त्यांस चौदा गोत्रें दिलीं. पण मग या ब्राह्मणांना बायका कोठून मिळाल्या आणि त्यांचा वंश कसा चालला हें या कथेंतून निघत नाहीं. शिवाय परशु-रामानें ( सर्वे च गौरवर्णाश्च सुनेत्राश्च सुदर्शनाः । सर्वविद्यानुकूलाश्च भार्ग-वस्य प्रसादतः ॥ ) आपल्या प्रसादानें गोरे, सुस्वरूप आणि विद्यावान् केले हें वर्णन बरोबर आहे. पण कोळ्यांचे झालेले ब्राह्मण असे होऊं शकत नाहींत. असो, या वर्णनावरून व खऱ्या वर्णनावरून हे मूळचे आर्य आहेत हेंच निश्चित दिसतें. पण या वर्णनानुकूल एक दुसरी कथा बनविली आहे व ती अशी कीं, चौदा प्रेतें वाहून आलीं होतीं, तीं शुद्ध करून परशुरा-मानें जिवंत केलीं. याप्रमाणें हे ब्राह्मण मूळचे इजिप्शन, ज्यू वा पारशी असावे असा तर्क कित्येक बांधतात. पण ही चित्तपावन ( चितापावन ) या नांवावर बसविलेली कोटी आहे. अशा कोट्या नेहमींच त्याज्य अस-तात. शिवाय यांना बायका कोठून मिळाल्या ? बरें, परकी लोकांचा भारती आर्यांत सहज प्रवेश होऊं शकतो, ही समजूत अत्यंत चुकीची आहे. वर्ण-संकराच्या भयंकर पातकाची हिंदुस्थानांत हजारों वर्षांपासून भीति मानली गेली आहे. तेव्हां समुद्राच्या तुफानांतून वांचलेलीं चौदा परकीय कुळें ब्राह्मण बनलीं आणि त्यांनीं वाटेल तीं चौदा गोत्रें मिळविलीं आणि वेद-विद्याहि जागृत ठेविली ह्या गोष्टी असंभाव्य होत. परकी लोकांचें अगोदर वेदावर प्रेम बसावाचें नाहीं आणि त्यांच्या जिव्हेंतून वेदाक्षर स्पष्ट व शुद्ध निघावयाचें नाहीं. कोंकणस्थांत वेदविद्या प्राचीन काळापासून जागृत आहे.

ती त्यांनीं पेशवाईत संपादन केलेली नाहीं. येवढीच गोष्ट त्यांच्या भारतीय आर्यत्वाची साक्ष पुरेशी देत आहे असें आम्हांस वाटतें.

प्राचीन काळीं सर्व ब्राह्मण एक होते. त्यांच्यांतले हल्लींचे देशस्थ, कोंकणस्थ, बंगाली, द्राविडी इत्यादि भेद इ. स. १००० (हा आंकडा ठोकळ आहे ) नंतरचे आहेत. अर्थात् सर्व ब्राह्मणांत गोत्रें आहेत व प्रवरहि एकच आहेत. सर्व वेदांच्या सूत्रांतून प्रवराध्याय आहेत. त्या सर्वांतील गोत्रप्रवर एकच आहेत. अर्थात् बंगाली ब्राह्मण काश्यप गोत्री आहेत, आणि कोंकणस्थहि आहेत आणि तेलंगीहि आहेत. आणि या सर्वांत काश्यप गोत्राचे प्रवरहि एकच आहेत. किंबहुना पूर्वकाळीं ब्राह्मणांस देशभेदहि नव्हता आणि आडनांवेंहि नव्हतीं. इ.स. १००० च्या पूर्वींचे जे शिलालेख, ताम्रलेख वगैरे आढळतात त्यांत ब्राह्मणांचें वर्णन फक्त गोत्रानें केलेलें असतें. गुजराती, कनोजिया, देशस्थ असें नसतें किंवा पटवर्धन, तिवारी, त्रिपाठी असेंहि नसतें. अर्थात् आडनांवें अलीकडचींच आहेत. ज्या वेळेस कोंकणस्थ ही पोटजात निराळी ठरली त्या वेळीं त्यांच्यांत १४ गोत्रें आणि सुमारें ६० आडनांवें म्हणजे कुटुंब-नांवें होतीं असें दिसतें. आडनांवांस उत्तरेकडे नुख म्हणतात. अलीकडच्या ताम्रादि लेखांत अन्वय शब्द आडनांवार्थी वापरलेला दिसतो. हीं साठ कोंकणस्थांतील आडनांवें कशावरून पडलीं हा एक मनोरंजक पण कठीण प्रश्न आहे. राजवाड्यांचे मतें आडनांवें गोत्रांवरूनच उत्पन्न झालीं असावीं. अशीं आडनांवें बरींच आहेत. कांहीं आडनांवें गांवांवरून 'कर' प्रत्ययानें उत्पन्न झालीं तीं तर सहज ओळखण्यासारखीं आहेत. कांहीं आडनांवें धंद्यावरून पडलेलीं आहेत; कांहीं अधिकारावरून. हीं हि ओळखूं येतील, पण येवढे सर्व प्रकार वजा करूनहि कित्येक आडनांवांचें निर्वचन अद्याप कठीण आहे. पटवर्धन हें आडनांव अधिकारवाचक असून तें प्राचीन ( इ. स. १००० च्या पूर्वींच्या ) लेखांत मराठ्यांचें किंबहुना तेलंगी लोकांचें आहे. मूळ साठांतील गोखले, दामले, आपटे, परांजपे, रानडे, लेले, मेहेंदळे, लवाटे वगैरे आडनांवांचा अर्थ लावणें कठीण आहे. हे शब्द अनेकवचनी आहेत यांत शंका नाहीं एकवचनी गोखला हा शब्द मूळांत गोखल असा असावा, आणि तो शब्द कोणातरी पवित्र आचरणी सन्मान्य पुरुषावरून त्याच्या कुलाला पडला असावा. एका ऋषीचें नांव गोखल: एके ठिकाणीं पाहिल्याचें मला स्मरतें.

परंतु या वेळीं ठिकाण पत्ता दाखवूं शकत नाहीं. गोखलः गोत्रऋषि नव्हे हें उघड आहे. गोत्रऋषीच्या कुळांत पुढें कोणी नामांकित पुरुष झाला त्यावरून तें नांव पुढें चालू झालें.

असो; आतां शेवटीं एका प्रश्नाचा विचार करणें अवश्य आहे. कोंकणस्थ ब्राह्मण जर बुद्धिमान, विद्यासंपन्न प्रथमपासून आहेत आणि ते कोंकणांत हजार अकराशें वर्षांपासून आहेत तर त्यांचें नांव इतिहासांत पेशवाई-पूर्वीं कां दिसत नाहीं, असा प्रश्न उपस्थित होतो व कित्येकदां विचारलाहि जातो. कोंकणांतच नव्हे तर इतर प्रांतांत ते कां प्रसृत झाले नाहींत ? प्राचीन इतिहासांत शिलाहार, राष्ट्रकूट, चालुक्य वगैरे राजकुलांच्या अमदानींत कोंकणांतून ठाण्यांत, घाटावर, देवगिरीस कोंकणस्थ ब्राह्मणांचे दिवाण अधिकारी वगैरे कोठें दिसून येत नाहींत याचें कारण काय? याचें उत्तर असें दिसतें कीं, पूर्वीं ब्राह्मण राजकारणांत पडत नव्हते असें नाहीं, पण ते थोडे असत; शिवाय कोणत्याहि राज्याचें मुख्य ठिकाण कोंकणांत कधींच नव्हतें, आणि कोंकणस्थांत वेदाध्ययन करून स्नानसंध्येंत काल घालविणारे व चरितार्थाकरितां उत्तम शेती करणारेच लोक पुष्कळ होते. व्यापार आणि राजकारण यांत मन घालणारे लोक थोडे होते. ज्यावेळेस जातीजातींच्या निंदात्मक कथा उत्पन्न झाल्या त्या वेळेस (इ. स. १००० च्या नंतर) कोंकणस्थांची स्थिति कशी होती हें पुढील श्लोकावरून दिसून येतें. परशुरामानें 'माझें स्मरण केव्हांहि करा, मी तुम्हांस मदत करीन' असें कोंकणस्थांस सांगितलें होतें. तेव्हां एकदां त्यांनीं उगीच परशुरामाची परीक्षा पाहण्यासाठीं त्याचें स्मरण केलें, तेव्हां तो तात्काळ येऊन संकट विचारूं लागला; तेव्हां कांहीं नाहीं म्हणोन म्हणतांच त्यानें शाप दिलाः---

शापप्रभावान्मे सर्वे कुत्सिताश्च दरिद्रिणः
सेवां सर्वत्र कर्तारः इदं निश्चयभाषणम् ॥

या कल्पित कथेवरून पूर्वकाळीं कोंकणस्थांची स्थिति सुखसंपन्न होती. कोणत्याहि गोष्टीची त्यांस ददात नव्हती. किंबहुना मराठ्यांच्या इतिहासांत असें लोक समजत असल्याचें दाखविलेंहि आहे. तथापि, काशीस फार प्राचीन काळीं गेलेलीं कोंकणस्थकुळें आहेत असें मला वाटतें, त्यांचा इतिहास रा. गोविंदराव आपटे हे हळुहळु जगतापुढें ठेवितील. हीं कुळें वैदिक ब्राह्मणांचीं असून नामांकित आहेत.

वैदिक विद्या व आचारीपणा किंवा सेवा याचसाठीं कधीं कधीं बाहेर जाणारे कोंकणस्थ पूर्वकाळीं असत. पण त्यांची बुद्धिमत्ता व त्यांचें धोरण, शौर्य, साहस इत्यादि राजकीय गुण त्यांच्या ठिकाणीं हजारों वर्षें झाकलेले होते. ते पुढें अनेक पुरुषांनीं व कुटुंबांनीं जगाच्या पुढें आणले. सबंध जातीचा उत्कर्ष व तिचे ठिकाणीं अनेक गुण एका पुरुषाच्या कर्तृत्वानें, वैभवानें व भाग्यानें कसे येतात याचेंहि प्रत्यक्ष ऐतिहासिक उदाहरण कोंकणस्थांचें होय. बाळाजी विश्वनाथानें योग्य संधि पाहून शाहूचा पक्ष धरला आणि तो मराठी राज्याचा दिवाण झाला. बाजीरावानें शौर्यानें हिंदुस्थानास दिपविलें व शाहूस खूष केलें. बाळाजी बाजीराव उर्फ नानासाहेबानें तर आपल्या मुत्सद्देगिरीनें शाहूस प्रसन्न ठेवलें आणि महाराजांनीं राज्य चालविण्यास हाच समर्थ आहे असें पाहून त्याच्या स्वाधीन राज्य केलें. याप्रमाणें हिंदुस्थानचें साम्राज्य भट, फडके, भानू, पटवर्धन इ. घराण्यांनीं शंभर वर्षें भोगलें आणि आपल्या कोंकणस्थ जातीस पुढें आणलें. कोंकणस्थांच्या ठिकाणीं बुद्धिमत्ता होतीच; पण शौर्य, धैर्य परदेशीं वाटेल त्या ठिकाणीं जाण्याची हिम्मत, वगैरे गुण नवीन उत्पन्न झाले किंवा अंगभूत असलेले योग्य संधि मिळतांच बाहेर पडले. आज हे लोक बहुतेक सर्व हिंदुस्थानभर पसरले आहेत. किंबहुना परदेशींहि गेले आहेत. तुरळक कां होईना ते काश्मीरपासून रामेश्वरापर्यंत सर्वत्र दिसतात. मुख्य वस्ती पुणें, सातारा येथें आहे यांत नवल नाहीं. पण कोंकण हें त्यांचें मूळ वसतिस्थान असून अद्याप येथोन लोकमान्य टिळकांसारखे अद्वितीय पुरुष बाहेर पडतात आणि पुढेंहि पडतील.

असो, भट घराण्याच्या उत्कर्षाबरोबर ज्या कोंकणस्थ घराण्यांचा उत्कर्ष झाला त्यांपैकीं गोखले व रास्ते हे प्रमुख होत. रास्ते हे साताऱ्याचे साहुकार, पण पेशवे बाजीराव व्याही आणि नानासाहेब मेहुणे यांच्या अनुकूलतेनें शिपाई व सरदार कसे झाले वगैरे इतिहास रा. गोविंदराव आपटे यांनीं जमा केला आहे तो वाचनीय आहे. गोखले घराणें कोंकणस्थांत फारच मोठें असून त्यांच्या इतकी लोकसंख्या इतर घराण्यांची नसावी. एकंदर कोंकणस्थांची लोकसंख्या सुमारें ८२००० आहे. त्यांत गोखले सर्वांत अधिक–संख्याक आहेत. ते बहुतेक सर्व बुद्धिवान् आहेत.

व ते काश्यप-गोत्री हिरण्यकेशी आहेत. त्यांचा सर्वांचा इतिहास मनोरंजक असून तो रा. गोविंदराव आपटे यांनीं मोठ्या प्रयासानें एकत्र केला आहे व सध्यां हयात असलेल्या पुरुषांची एक जंत्रीहि त्यांनीं बनविली आहे ही एक नवीन गोष्ट होय. गोखले-रास्ते घराण्याशिवाय शिपाईगिरींत व स्वदेशनिष्ठेंत आणि स्वदेशप्रीतींत ज्या कांहीं गोखल्यांनीं मुर्दुमकी गाजविली त्या सर्वांत बापू गोखले हे प्रख्यात होत. बापू गोखल्यानंतर शिपाईगिरींत नांव कमविण्याची संधि कोंकणस्थांना मिळाली नाहीं, पण बुद्धिमत्तेच्या कामांत नांव मिळविण्याचें क्षेत्र इंग्रजींत मोठें आहे त्यांत गोखले हे मागें नाहींत किंबहुना अग्रेसर आहेत. मुंबईचे नारायण विष्णु गोखले हायकोर्ट वकील यांचें घराणें या बाबतींत उल्लेख करण्यासारखें व माझ्या परिचयाचें आहे. सर्वांत वडील बंधू रामभाऊ गोखले हे माझ्या पाहण्यांत असून फारच बुद्धिवान् आणि शरिरानें उंच व भव्य असे होते. ते पहिले ॲडव्होकेट झाले होते; पण दुर्दैवानें अल्पवयी झाले. त्यांच्या बंधूंपैकीं माधवराव गोखले हे माझे समकालीन असून मोठे तेजस्वी आणि तडफदार होते. प्रिन्सिपाल वर्डस्वर्थ यांची त्यांवर मोठी कृपा होती. ते एम. ए. होऊन डेक्कन कालेजांत इतिहासाचे प्रोफेसर झाले होते. दुर्दैवानें तेहि अल्पवयी निघाले. ते जिवंत राहते तर मवाळपक्षाला जसे ऑनरेबल गोखले ललामभूत झाले होते ( हे त्यांचे वेळींच कॉलेजांत असून आरंभीं विशेष चमकत नव्हते ) त्याप्रमाणें माधवराव गोखले हे राष्ट्रीयपक्षाला ललामभूत झाले असते.



# राव रामचंद्रराव भाऊसाहेब रेशिमवाले यांचें इंग्रजी चरित्र.

( रा. ब. विष्णु केशव कुंटे, बी. ए. कृत. )

सन १८५७ सालच्या शिपायांच्या बंडांत, इंग्रजांचें राज्य बुडणार नाहीं, उलट जीं संस्थानें यावेळीं इंग्रजांच्या विरुद्ध जातील तीं मात्र बुडतील, अशी दूरदर्शित्वाची अटकळ ज्या मुत्सद्द्यांनीं त्यावेळीं केली, त्यांपैकीं राव रामचंद्रराव भाऊसाहेब रेशिमवाले, इंदूरचे कारभारी, हे एक होते. या मुत्सद्दी पुरुषानें आपल्या शहाणपणानें, धैर्यानें व नेटानें इंदुर संस्थानास त्या प्रसंगीं वांचविलें. इतकेंच नव्हे, तर, धारचें संस्थान बहुतेक बुडालें होतें त्यास हि आपल्या दीर्घोद्योगानें व युक्तीनें समुद्राच्या रसातळापासून वर काढून पवारांच्या हवालीं केलें. अशा पुरुषाचें चरित्र हिंदुस्थानच्या इतिहासांत लेखनीय व संग्रहणीय होय. महाराष्ट्राच्या इतिहासांत तर तें स्मरणीय आहे यांत शंका नाहीं. या चरित्राची उणीव रावबहादुर विष्णु केशव कुंटे, माजी कारभारी देवास, यांनी अंशतः आपल्या त्रोटक इंग्रजी पुस्तकानें भरून काढली, हे त्यांचे हिंदुस्तानाच्या व विशेषतः महाराष्ट्राच्या इतिहासावर उपकार आहेत. स्वदेशाच्या इतिहासांतील पूर्वकालीन कर्त्या पुरुषांविषयीं माहिती असणें हें लोकांच्या शीलवर्धनाच्या दृष्टीनें श्रेयस्कर आहे, हें विस्तारानें सांगण्याची जरूरी नाहीं. महाराष्ट्राच्या इतिहासांत राजकारणी असूनहि निःस्वार्थी, स्वामिभक्त असूनहि निस्पृह, अशा सत्पुरुषांची जी मालिका आहे, तींत राव रामचंद्रराव भाऊसाहेब या नररत्नाची गणना केली पाहिजे, हें त्यांच्या या त्रोटक लिहिलेल्या इंग्रजी चरित्रावरून वाचकांच्या चांगलें ध्यानांत येईल.

मराठी संस्थानांची त्यावेळची परिस्थिति लक्षांत आणिली तर, इंदूरची परिस्थिति विशेष नाजुक होती. अशा बिकट प्रसंगीं राव भाऊसाहेब रेशिमवाले यांनी बंडाच्या भयंकर वावटळींतून इंदूर संस्थानास शाबूत ठेवून, उलट त्यांनीं आपली इभ्रत व इंदुरच्या अधिपतींची इभ्रत अधिक वाढविली; या कामागिरीनें त्यांनीं त्या संस्थानास कायमचें ऋणी केलें. याशिवाय महाराजा तुकोजीराव होळकर यांचें शिक्षण पुष्कळ अंशीं

राव भाऊसाहेबांच्या देखरेखीखालीं व मदतीनें झालें असल्यामुळें महाराजा तुकोजीराव होळकर यांच्या अंगीं जे तेजस्विता, स्वजनाभिनिवेश, स्वधर्मनिष्ठा, कार्यक्षमता, निरालस्य इत्यादि अनेक सद्गुण दिसून आले, त्यांचें पुष्कळ अंशीं श्रेय राव भाऊसाहेब रेशिमवाले यांजला आहे. आणि शेवटली गोष्ट ही कीं, संस्थानांत प्रथम इंग्रेजी शिकलेले गृहस्थ म्हटले म्हणजे राव भाऊसाहेबच असून इंग्रजांच्या राजसत्तेचें धोरण काय आहे, त्यांच्याशीं राजकारणी कामांत कसें वागलें पाहिजे, लार्ड कॉनिंगसारख्या सर्वमान्य गव्हर्नर जनरलानेंहि धार संस्थान खालसा म्हणून म्हटलें तें इंग्लंडांतील प्रजाप्रमुख राज्यांत कोणत्या राजकीय चळवळीनें उलटतां येईल याची बरोबर कल्पना इतक्या पूर्वकाळीं राव भाऊसाहेब यांनीं बांधली. याजवरून त्यांची मुत्सद्देगिरी एकदेशीय नव्हती हें चांगलें लक्षांत येतें. अशा पुरुषाचें चरित्र आपल्या लोकांस तरी माहीत असलें पाहिजे, या दृष्टीनें या लहान ग्रंथाची उपयुक्तता मोठी आहे. हें चरित्र मराठींत असतें तर फारच बरें झालें असतें. तथापि इंग्रजींत प्रसिद्ध झालें आहे हें एकपरी योग्यच आहे. कारण, राव भाऊसाहेब केवळ महाराष्ट्राचेच मुत्सद्दी नसून सर्व हिंदुस्थानचे होते. तेव्हां हिंदुस्थानांतील सर्व लोकांस समजण्यास सुलभ होण्यास इंग्रेजीच चरित्र पाहिजे हें उघड आहे.

सुदैवाची आणखी गोष्ट अशी कीं, हें चरित्र रावबहादुर विष्णु केशव कुंटे यांनीं लिहिलें आहे. कुंटेसाहेबांची इंदूर संस्थानाविषयींची माहिती फार जुनी आहे. ते इंदुरच्या शाळेंत लहानपणापासून शिकले असून त्याच शाळेचे राव भाऊसाहेब रेशिमवाले हे पहिले विद्यार्थी होते. याशिवाय राव भाऊसाहेब यांस त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलेलें असून त्यांजविषयीं त्यांची पूज्यबुद्धि आहे, व त्यांजविषयीं त्यांस स्वतःची बरीच माहिती आहे. जनरल बापूसाहेब रेशिमवाले व त्यांचे बंधु यांनीं त्यांस लेखनसामग्रीहि दिलेली आहे. अशा संयोगामुळें राव भाऊसाहेब रेशिमवाले यांचें चरित्र लिहिण्यास कुंटेसाहेबच सर्वतोपरी योग्य आहेत हें उघड आहे. कुंटेसाहेबांस डोळ्याचें व्यंग असूनहि त्यांनीं ही कामगिरी आपल्या अंगावर घेतली व रावसाहेबांविषयींची ऐतिहासिक माहिती लिहून जगापुढें ठेविली, हे त्यांचे खरोखरच हिंदुस्थानच्या इतिहासाचा अभ्यास करणाऱ्यांवर उपकार आहेत. चरित्र या दृष्टीनें या ग्रंथाची मनोरंजकता कांहींशी कमी भासते; पण मुद्देसूद,

साधार, गैरलागू गोष्टी किंवा विधान येणार नाहीं अशा प्रकारचे, सरकारी कामाचे लेख ज्या लेखणीस लिहिण्याची संवय, त्या लेखणींतून यापेक्षां जास्त अलंकारयुक्त भाषा किंवा मनोरंजक गोष्ट निघणें कठिण आहे. हें जरी खरें आहे तरी याच कारणांनीं या पुस्तकाची इतिहास या दृष्टीनें किंमत फार मोठी आहे. कारण, या पुस्तकांत निर्मूल निराधार अशी एकहि गोष्ट मिळणार नाहीं, व जी हकीकत यांत दिलेली आहे ती तंतोतंत तशीच झाली असली पाहिजे, याविषयीं वाचकांस कधीं शंका येणार नाहीं. 'Paint me as I am' हें तत्त्व यांत पूर्णपणें भरलें आहे, आणि इतिवृत्त मजबूत पुराव्यानिशीं रास्त रीतीनें सांगितलें आहे. अर्थात् इतिहास या दृष्टीनें हें पुस्तक इतिहासग्रंथांत मोजलें जाण्यास सर्वतोपरी योग्य आहे. आणि हेंहि नमूद केलें पाहिजे कीं, कधीं कधीं सरळ सांगितलेलें इतिवृत्तहि अत्यंत मनोवेधक असतें. राव भाऊसाहेब यांच्या मृत्यूची जी हकीगत या पुस्तकांत सांगितली आहे ती वाचतांना प्रत्येकाच्या डोळ्यांत पाणी येईल असें मला वाटतें. कारण मोठ्यांचें निधनही मोठेंच असतें. 'उदेति सविता ताम्रस्ताम्र एवास्तमेतिच' या न्यायानें भाऊसाहेबांच्या मरणाची हकीकत सरळ व मोजक्या शब्दांनीं या ग्रंथांत सांगितली आहे तरी, ती अत्यंत मनोवेधक झाली आहे. असो, याप्रमाणें या पुस्तकाचें ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्व मोठें असून या चरित्रानें रावबहादुर कुंटे यांनीं इतिहासभक्तांस ऋणी केलें आहे. त्याची उत्तीर्णता त्यांनीं या इंग्रजी पुस्तकांत दिलेली हकीकत थोडक्यांत निव्वळ मराठी जाणणाऱ्या वाचकांपुढें ठेविल्यानेंच होणार आहे असें वाटून, मराठी वाचकांकरितां राव रामचंद्रराव भाऊसाहेब रेशिमवाले यांचें चरित्र मी थोडक्यांत त्यांच्या ग्रंथाच्या आधारें यापुढें देतों.

## पूर्वपीठिका.

राव रामचंद्रराव भाऊसाहेब रेशिमवाले यांचें मूळ गांव जिल्हा अहमदनगर, तालुका पारनेर, यांतील निघोजा हें होय. यांचें घराणें कुळकर्ण्यांचें व जोशाचें. घांटावरील कुळकर्णी व जोशी हीं घराणीं म्हणजे शहाण्या कर्तृत्ववान् मुत्सद्दी पुरुषांची खाण होय, हें मराठ्यांच्या इतिहासावरून जागोजाग स्पष्ट झालें आहे. यांचें मूळ आडनांव धोंगडे. चिमणाजीपंत धोंगडे नांवाचे गृहस्थ प्रथम मूळ गांव सोडून निजामाच्या राज्यांत आपली स्थिति सुधारण्यास गेले. तेथें त्यांस बरेंच यश आलें. त्यांस संतान नव्हतें.

म्हणून त्यांनीं दुसरें लग्न केलें; पण योग असा झाला कीं, त्यांच्या पहिल्या बायकोसच उतार वयांत मुलगा झाला. चिमणाजीपंत वारले तेव्हां त्यांची दुसरी बायको सती गेली. त्यांची पहिली स्त्री व मुलगा सखाराम हीं कांहीं दिवस हैद्राबादेंतच राहिलीं. इतक्यांत दुर्दैवाचा आणखी तडाखा बसून त्यांच्या घरावर दरोडा पडला व बहुतेक द्रव्य गेलें. अशा निराश स्थितींत सखारामाच्या आईस तेथें दिवस काढवेनात. त्यावेळीं हिंदुस्थानांत परम भगवद्भक्त व राजकारणपटु **देवी अहल्याबाई** हिची कीर्ति चोहोंकडे दुमदुमत होती; अशा साध्वीच्या आश्रयास क्षेत्र महेश्वर येथें जाऊन राहावें असें सखारामाच्या मातोश्रीच्या मनांत येऊन ती आपली चीजवस्त घेऊन मुलांसह महेश्वरास गेली, व तेथें एकांतांत राहून देवधर्म करण्यांत ती आपला वेळ घालवूं लागली. सखाराम कधीं कधीं दरबारांत अहल्याबाई-कडे जाऊं लागला, तेव्हां तिला त्याजविषयीं प्रेम उत्पन्न होऊन त्या माउलीचाच तूं मुलगा काय असें तिनें विचारलें. हो म्हणतांच अहल्याबाईनें सखारामास हातीं धरलें व त्यास एका कारकुनाच्या हाताखालीं शिकावयास ठेविलें. सखाराम हुशारच होता, तो लिहिण्यापुसण्यांत व हिशोबांत लवकरच तरबेज झाला. महेश्वरास लुगडीं, धोतरजोडे वगैरे बारीक उंची कापड पूर्वीपासून निघत असे, व अद्यापहि निघतें. पेशव्यांना नेसण्यास धोतरजोडे येथूनच जात असत हें प्रसिद्ध आहे. चीनाहून चांगलें रेशिम सरकारमार्फत आणून तें कोष्ट्यांस पुरविल्यास कोष्ट्याचा धंदा चांगला चालेल असें वाटून अहल्याबाईनें महेश्वरास एक रेशमाचें सरकारी दुकान काढलें. त्या दुकानावर प्रथम सखाराम काम करूं लागला व पुढें तो तेथील मुख्य अधिकारी झाला. कित्येक वर्षांनीं सरकारी दुकान बंद झालें, तेव्हां सखारामपंतानें स्वतः रेशमाचें दुकान चालविलें. याजवरून सखारामपंतास लोक ‘ रेशिमवाले ’ म्हणूं लागले, व हेंच नांव यापुढें सखारामपंताच्या वंशाचें आडनांव झालें.

## जन्म.

सखाराम चिमणाजी रेशिमवाले यांस मार्तंड नांवाचा एक मुलगा झाला, व तो मोठा झाला तेव्हां तो त्यांच्या दुकानाचें काम पाहूं लागला. हें पाहून सखारामपंतांनीं देपाळपुर परगण्याच्या दप्तरदारीची नौकरी पत्क-

रली. अहल्याबाई वारल्यावर महेश्वरचें महत्व कमी झालें, तेव्हां मार्तंड सखाराम यानें रेशमाचें दुकान बंद केलें व तोहि बापाजवळ देपाळपुरास राहूं लागला. महेश्वरचें महत्व कमी होऊन इंदूर राजधानी पुढें सरसावल्यानें इंदूरचें महत्व वाढलें. तेव्हां रेशिमवाले इंदुरास गौतमपुऱ्यांत घर विकत घेऊन तेथें राहूं लागले. तेथें मार्तंड सखाराम यास आषाढ व॥ ३ संवत १८८३, अथवा ८ जुलै सन १८२६ रोजीं मुलगा झाला. तोच आपल्या या चरित्राचा विषय होय. त्याचें नांव रामचंद्र ठेविलें. दुर्दैवानें त्याची आई लहानपणीं वारली, तेव्हां मार्तंडरावानें दुसरें लग्न केलें. या दुसऱ्या कुटुंबास पुढें दोन मुलगे झाले. त्यांचीं नांवें सखाराम आणि गोविंद ठेविलीं. हे अर्थात् रामचंद्र याचे सावत्र भाऊ. रामचंद्र हेच पुढें 'राव रामचंद्रराव रेशिमवाले' या नांवानें प्रसिद्ध झाले, आणि त्यांचे हे सावत्र भाऊ सखाराम मार्तंड ऊर्फ जनरल बापूसाहेब रेशिमवाले आणि गोविंदराव मार्तंड हे होत. जनरल बापूसाहेब नुकतेच म्हणजे ता. २८ जून १९१४ रोजीं वारले. त्यांस पुत्रसंतान नाहीं.‡ गोविंदराव मार्तंड अजून हयात असून त्यांस तीन* मुलगे आहेत व ते तिघेहि इंदूर संस्थानांत मोठमोठ्या हुद्द्याचीं कामें करीत आहेत. अशी या घराण्याची आजपर्यंतची संक्षिप्त हकीकत आहे. या घराण्यापैकीं राव रामचंद्रराव मार्तंड ऊर्फ भाऊसाहेब रेशिमवाले हे आपल्या चरित्राचे नायक असून त्यांनींच या घराण्यास उदयास आणलें. तें कसें हें आपण आतां पाहूं.

## शिक्षण.

मार्तंडराव सखाराम, रामचंद्राचे वडील, हे प्रथम इंदुरांत राहत होते, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यांनी इंदुरास नोकरी केली नाहीं. ते आपल्या वृद्ध वडिलांच्या सेवेंत असत. रामचंद्राचें लहानपणचें शिक्षण बापाच्या देखरेखीखालीं घरींच झालें. तो दहा वर्षांचा झाला तेव्हां त्यास पंतोजीच्या शाळेंत घातलें. पूर्वकाळचे पंतोजी म्हणजे पोरांचे केवळ कर्दनकाळ असत, हें प्रसिद्धच आहे. शिकवणें थोडें आणि मारणें फार अशी स्थिति असे.

‡ हे सन १९१७ च्या आगष्ट महिन्यांत देवलोक झाले.

* १ कृष्णराव २ गोपाळराव ३ केशवराव; पैकीं मधले गोपाळराव विलायतेस मे १९१३ पासून सप्टेंबर १९१६ पर्यंत राहून ब्यारिस्टर होऊन आले व ह्यास राव रामचंद्रराव भाऊसाहेबांच्या कुटुंबानें तारीख ५।३।१७ रोजीं दत्तक घेतलें.

रामचंद्राचे पंतोजी माधवराव गुरुजी याच पद्धतीपैकीं होते. त्यांचें पुष्कळसें लहान मुलांस शिकवण्याचें काम, रामचंद्र सर्वांत मोठा व बुद्धिमान् असल्यानें, त्याजकडे त्यांनीं सोपविलें आणि आपणांकडे शिक्षा करण्याचें काम ठेविलें. रामचंद्रास पोरांस शिकवण्याची व न मारतां दाबांत ठेवण्याची हातोटी यामुळें सहज साधली. ह्याच त्यांच्या गुणानें त्यांचा पुढें उदय झाला हें आपल्यास पुढें दिसून येईल.

## राजपरिचय.

याप्रमाणें रामचंद्राचीं चार पांच वर्षे तात्या पंतोजीच्या शाळेंत गेलीं. इ. स. १८४१ त एजंट सर चार्लस वेड यांनीं रेसिडेन्सी–बाजारांत एक इंग्रेजी वर्ग काढला; व तेथें छावणींतील व शहरांतील मुलें इंग्रेजी शिकूं लागलीं. त्यांत रामचंद्रहि मराठी शाळा सोडून इंग्रेजी शिकूं लागला. १८४३ त हा क्लास बंद केला जाऊन, शहरांत मदरसा अथवा शाळा सुरू झाली. त्यांत इंग्रेजी, मराठी, संस्कृत, फारशी शिकण्याचे क्लास सुरू झाले. यांपैकीं इंग्रजी क्लासांत रामचंद्रानें आपला अभ्यास पुढें चालविला. याच सुमारास तुकोजीराव महाराजांस शिकविण्यासाठीं मुनशी उमेदसिंग नांवाचे दिल्ली कालेजांत शिकलेले एक गृहस्थ नेमिले जाऊन त्यांच्या स्वाधीन शहरांतील शाळाहि झाली. अर्थात् मुनशीसाहेबांची व रामचंद्राची ओळख पडून त्याच्या अंगची हुशारी व त्याची मॉनिटरचें काम करण्याची हातोटी त्यांच्या नजरेस आली. त्यांनीं त्यास ज्यूनियर इंग्लिश क्लास शिकवावयास सांगितलें, तें काम त्यानें उत्तम केलें. थोड्याच दिवसांनीं तुकोजीरावांच्या शिक्षणावर मुनशीसाहेबांच्या हाताखालीं कोणा मदतनिसाची जरूर भासूं लागली, तेव्हां मुनशीसाहेबांनीं एजन्टाचा हुकूम घेऊन रामचंद्रास या कामावर नेमिलें. याप्रमाणें रामचंद्राला प्रत्यक्ष राजाजवळ जाण्याची संधि मिळून त्याच्या भावी उत्कर्षाच्या पायाचा दगड मुनशीसाहेबांनीं बसविला असें म्हणण्यास हरकत नाहीं; व त्यांतच त्यांनीं आपल्या पायावरहि थोडासा दगड मारून घेतला, असें म्हटलें असतां चालेल.

## राजशिक्षण.

संस्थानाच्या इतिहासांत किंबहुना सर्व राजांच्या इतिहासांत असें दिसून येतें कीं, जो मनुष्य लहानपणीं शिक्षक म्हणून राजाच्या सहवासांत

रहातो, तो, पुढें त्याचा दिवाण होतो. अशा रीतीनें राजाजवळ जाण्याची संधि मिळणें याचेंच नांव राजयोग. पण हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, अशी संधि मिळूनहि पुष्कळ लोक अभागी राहतात. परिसांत सोनें बनविण्याची शक्ति आहे; पण ती लोखंडास. परिसाजवळ दगड ठेविले तर ते सोनें बनणार नाहींत, दगडच राहतील हें उघड आहे. रामचंद्ररावासारखे गुणवान् आणि भाग्यवान् लोकच लोखंडाप्रमाणें सोनें होण्यास योग्य असून तेच राजरूपी परिसाच्या संपर्कानें सुवर्ण बनतात व भाग्यास चढतात. रामचंद्ररावाच्या अंगचें शिकवण्याचें कसब लवकरच त्याच्या कामास पडलें व महाराजा तुकोजीरावाचें रामचंद्रावर प्रेम जडलें. त्याचें सरकारवाड्यांत नेहमीं जाणेंयेणें घडून मासाहेबांशींहि त्याची ओळख झाली व त्यांसहि तो आवडूं लागला. रामचंद्रानें महाराजांस मराठी शिकविलें व हिशोबठिशोब समजावून दिले. मुनशीसाहेब त्यांस इंग्रेजी शिकवीत, त्यांचेहि धडे रामचंद्र करून घेत असे. यापुढें हळूहळू रामचंद्र ह्याचा शिक्षणाशिवाय तुकोजीराव महाराजांच्या राजकारणांतहि शिरकाव झाला. तोच पुढें वृद्धिंगत होऊन रामचंद्रराव शेवटीं तुकोजी महाराजांचे पहिले कारभारी कसे झाले, हें आतां आपण पाहूं.

## राजास राजसूत्रें हातीं घेण्यास मदत.

येथें प्रथम थोडासा होळकर दरबारचा इतिहास सांगूं. इतिहासप्रसिद्ध शूर यशवंतराव होळकर वारल्यावर इंदूरचे अधिपति हरिराव होळकर झाले, ते सन १८४१ त वारले. त्यांचे जामात राजाभाऊ फणशे हे त्यांचे कारभारी होते. हरिरावाच्या मागें दत्तक खंडेराव होळकर हे गादीवर बसले, पण ते दोन वर्षांतच वारले. त्यांच्या पश्चात् गादीवर कोणास बसवावें हें ठरविण्याच्या कामांत मासाहेब आणि कारभारी फणशे यांत लढा पडला. कारभाऱ्यानें एकाचा पक्ष घेतला आणि मासाहेबांनीं दुसऱ्याचा. याचा निकाल सर क्लॉड वेड नंतर आलेले एजंट मिस्तर ह्यामिल्टन यांनीं दिलेल्या सल्ल्याप्रमाणें इंडिया गव्हर्मेंटनें केल्यामुळें तुकोजीराव होळकर ( भाऊ होळकराचा लहान पुत्र मल्हारराव ) हे गादीवर आले. अर्थात् रीजंट व कारभारी राजाभाऊ फणशे आणि तुकोजीराव होळकर यांच्यामध्यें प्रारंभापासूनच वेमनात उत्पन्न झाला.

तुकोजीराव हुशार व बुद्धिवान असल्यानें जसजसे मोठे झाले, तसतसे ते कारभारांत मन घालूं लागले व राजाभाऊ फणशे यांस कारभारासंबंधीं प्रश्न विचारूं लागले. राजाभाऊ अगोदर तापट, त्यांत त्यांचें व महाराजांचें मुळापासून वितुष्ट, त्यास हें न आवडून त्यानें एजंटापाशीं तक्रार केली. ह्यावेळीं महाराजांचे मुख्य व दुय्यम शिक्षक मुनशी उमेदसिंग व रामचंद्र-भाऊ यांचेंहि जाणें एजंटाकडे असे. त्यांनीं महाराजांची बाजू एजंटास समजावून सांगितली. तेव्हां एजंटांनीं राजाभाऊंस महाराज विचारतील ती माहिती देण्याविषयीं सांगितलें. राजाभाऊंचा यामुळें संताप अधिकच वाढला व त्यांनीं लागलेंच काम सोडून आपल्या जहागिरी गांवाची वाट धरली. अर्थातच मुनशी उमेदसिंग व रामचंद्रराव भाऊ यांच्या राजयोगाच्या बढतीचा मार्ग मोकळा झाला. महाराज स्वतः रीजन्सी कौन्सिलांत बसून काम समजून घेऊं लागले. या कामीं त्यांस रामचंद्रावभाऊंच्या बुद्धिमत्तेचा व शहाणपणाचा फार उपयोग पडूं लागला. कुशाग्रबुद्धि तुकोजीराव लवकरच या सहाय्यानें व कौन्सिलांतील प्रत्यक्ष कामाच्या अनुभवानें राज्याधिकार हातीं घेण्यास लायक झाले. वयाचीं १८ वर्षें पुरीं होतांच ह्यामिल्टनसाहेबांच्या शिफारसीप्रमाणें त्यांस राज्याधिकार देण्याचा ठराव इंडिया सरकारनें केला.

## सहकारितेचा परस्पर निश्चय.

राज्याधिकार मिळण्याच्या उत्सवप्रसंगीं महाराजा तुकोजीराव व रामचंद्रराव भाऊ यांजमध्यें जें संभाषण झालें तें या इंग्रजी चरित्रांत समग्र दिलें आहे. त्याजवरून महाराजांचा रामचंद्रभाऊंच्या कर्तृत्वाविषयीं किती अनुकूल ग्रह होता व रामचंद्रभाऊंची त्यांचे ठिकाणीं निष्ठा कशी होती, हें व्यक्त होतें. राज्याधिकाराची जबाबदारी शिरावर पडल्यावर मी तुझ्या मदतीची अपेक्षा धरतों, असें महाराज रामचंद्रभाऊंस एकान्तीं म्हणाले. तेव्हां त्यांनीं निर्भीडपणानें सांगितलें कीं, मी यथाशक्ति मदत देण्यास तयार आहें, पण ती आपण घेतली पाहिजे. तेव्हां महाराजांनीं प्रांजलपणें उत्तर दिलें: "आम्ही राजेलोक कधीं कधीं हत्तीप्रमाणें मस्त होतों, तेव्हां आम्हांस तुम्ही ताळ्यावर आणलें पाहिजे. भाऊ मी तुमचा शिष्य आहें. यासाठीं तुम्हीं मला बोलला तरी मला त्याचा राग येणार

नाहीं. माझ्या संपत्तीचे व भाग्याचे वांटेकरी तुम्ही न झालां तर मला कसें गोड वाटेल? माझ्या हातावर हात द्या आणि वेळोवेळीं योग्य सल्ला देत जाईन असें वचन द्या." याप्रमाणें त्या दोघां बुद्धिवान् व कर्तृत्ववान् पुरुषांचा करारमदार होऊन त्यांनीं एकामेकांच्या हातांत हात घातला. हा करार कसोटीस लागण्याची वेळ दैवयोगानें लवकरच आली.

## जहागीर व सन्मानप्राप्ति.

महाराजा तुकोजीराव होळकर यांस अधिकार देण्याचा दरबार ८ मार्च सन १८५२ रोजीं मोठ्या थाटानें होऊन ह्यामिल्टनसाहेबांनीं त्यांस सरकारचा खलिता वाचून दाखविला, व त्या दिवसापासून कौन्सिल उठवून महाराजांस पूर्ण अधिकारी केलें. दुसरे दिवशीं महाराजांनीं कौन्सिलांतील तिघां कौन्सिलदारांस इनामें दिलीं. आपले शिक्षक मुनशी उमेदसिंग यांस दोन गांव जहागीर दिले, व मुशीरुद्दौला रायबहादुर हा किताब दिला. दुय्यम शिक्षक रामचंद्रराव यांस १४०० रुपये उत्पन्नाचे दोन गांव जहागीर व 'राव' ही पदवी दिली. महाराजांचे दोस्त व सहाध्यायी खुमानसिंग यांस एक गांव ७०० रुपयांचा देऊन बक्षी अथवा रिसाल्याचे अधिपति केलें. दुसरे मित्र भवानीसिंग दुबे यांस एक गांव व सरनोबतची जागा दिली. आणि तिसरे सहाध्यायी भिमगिरबावा यांस एक गांव देऊन पोलिसचा मुख्य अधिकार दिला. हे तिघे गृहस्थ महाराजांच्या आयुष्यक्रमांत त्यांचे सामन्त होते, हें प्रसिद्ध आहे. याप्रमाणें महाराजा तुकोजीराव यांस अधिकार मिळून त्यांच्या कृपेनें रामचंद्रभाऊ यांस मान व संपत्ति प्राप्त झाली. यापुढें त्यांस राव रामचंद्रराव भाऊसाहेब असें लोक म्हणूं लागले. तेंच त्यांचें नांव यापुढें आपण वापरूं.

## कामगिरी.

मुनशी उमेदसिंग हे मशीरुद्दौला म्हणजे सल्ला देणारे झाले. पण भाऊसाहेब हेच महाराजांचे खरे सल्लागार असून त्यांचे हुकूम जारी करण्याचें सेक्रेटरीचें काम करूं लागून कारभार चालूं लागला. या कारभारांतील अनेक गोष्टी येथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. पण योग्य सल्ला देण्याचें वचन पुरें करण्याची वेळ लौकर ज्या प्रसंगानें आली, त्या प्रसंगाचें आपणांस विस्तारानें वर्णन करणें जरूर आहे.

## बंडास सुरुवात.

हा प्रसंग म्हटला म्हणजे इ. स. १८५७ सालचें बंड होय. कलकत्त्याच्या डमडम छावणींत या धडाक्याची प्रथम ठिणगी पडून शिपायांच्या व कित्येक जहागिरदारांच्या पोटांत जमा होत असलेल्या असंतोषरूपी दारूनें पेट घेतला. व ही आग थोड्या वेळांतच कलकत्त्यापासून मीरतच्या छावणीपर्यंत पसरली. शिपायांनीं बंड केलें, त्यांत मोगलसत्तेचे अवशेष व कानपूर येथील पेशव्यांच्या सत्तेचे अवशेष हे मुख्यतः सामिल झाले. कॉंटिंजंट फौजाहि ठिकठिकाणीं होत्या त्या बदलल्या, त्यांत ग्वालेरची कॉंटिंजंट बंडवाल्यास जाऊन मिळाली. नीमच येथील फौज उठली. इंदुराजवळ महूची छावणी होती तेथील शिपाईहि बिथरतील असा रंग दिसूं लागला.

## कारभार हातीं घेतला.

या प्रसंगीं इंदूरास काय काय झालें याची हकीगत सविस्तर, मुद्देसूद व साधार या चरित्रांत दिली आहे. ती इतिहासजिज्ञासूनें अवश्य वाचून पहावी. मुख्य गोष्ट ही कीं, तुकोजीराव महाराजांनीं छावणीचे संरक्षणाकरितां पाठविलेली फौज बदलल्यानें कर्नल ड्यूरंड जे त्यावेळीं ॲक्टिंग एजंट होते त्यांनीं महाराजांविषयीं संशय धरून छावणी व खजिना सोडून सिहोरकडे कूच केलें. हा संशय सर्वथैव निष्कारण होता हें खरें, पण ड्यूरंडसाहेबांच्या या कृत्यानें आणीबाणीचा प्रसंग उपस्थित झाला. महाराजांनीं प्रसंगाचें महत्व ओळखून यापुढें काय करावें हें ठरविण्याकरितां सर्व सल्लागारांस बोलाविलें. आबासाहेब पळशीकर दिवाण,* रायबहादूर मुनशी उमेद्रसिंग, राव भाऊसाहेब, खुमानसिंग बक्षी आणि भावनीसिंग सरनोबत हे हजर होते. या प्रसंगाचा निर्गम करण्याचें काम तुम्हीं आंगावर घेतां काय, ह्मणून महाराजांनीं मुनशीसाहेबांस विचारलें, परंतु त्यांनीं आपली ताकत नाहीं असें सांगितलें. पळशीकरांस विचारतां त्यांनीं भाऊसाहेबांशिवाय हें काम दुसरे कोणास शक्य नाहीं असें सांगितलें. तेव्हां भाऊसाहेबांस विचारतां त्यांनीं, मी आपली आज्ञा संपादीन, अशी

---

* या ठिकाणीं इंग्रेजी पुस्तकांत एका स्वल्पविरामाची चूक आहे असें वाटतें. दिवाण याजपुढें हें चिन्ह पाहिजे असून त्याचा संबंध पाळशीकरांकडे लागला पाहिजे.

कबूली दिली. महाराजांनीं लागलीच त्यांस कारभारी नेमून त्यांस पूर्ण अधिकारहि दिला. राव भाऊसाहेब यांनीं तात्काल एकान्तांत बसून पुढें काय करावयाचें तें ठरविलें. रामजी ( पुढें वकील झाले ) त्यांचे हाताखालीं काम करीतच होते. वासुदेवपंत मुळे यांस त्यांनीं इंग्रेजी ऑफिसांत घेतलें. मिस्तर फेन्‌विक ( हा इंग्रेजी गृहस्थ कष्टम कमिशनरींच्या कामावर पूर्वींच लागला होता ) यास आपला सेक्रेटरी नेमिलें, आणि बळवंत विठ्ठल यास शिरस्तेदार नेमिलें.

## कामास सुरवात.

राव भाऊसाहेब ते दिवशीं घरीं गेले नाहींत. तुम्हीं इंग्रेजांचे मदतगार आहां, तुम्हांस बंडवाले शिपाई ठार मारतील, तरी तुम्ही या भानगडींत पडूं नका, असा भाऊसाहेबांच्या वडिलांनीं काकुळतीचा निरोप त्यांस पाठविला. पण त्यांनीं आपल्या निश्चयास व पितृभक्तीस साजेल असाच जबाब दिला. " मी संस्थानचें हित करतांना मरण पावलों तरी हरकत नाहीं. आपल्यास आणखी दोन पुत्र आहेत. प्रसंग निवळल्याशिवाय मी घरीं येणार नाहीं," असें त्यांनीं सांगून पाठविलें. असो, राव भाऊसाहेबांनीं प्रथम इंदूर दरबारचा या शिपायांच्या कृत्यांत कांहीं संबंध नाहीं याची खातरी पटविण्याकरितां मह्रू येथील इंग्रेजी फौजेच्या अधिकाऱ्यास खबर देण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें ते स्वतः व गणेशशास्त्री वकील व खुमानसिंग बक्षी मह्रूकडे जाण्यास निघाले. मह्रूकडे जातांना सहजच त्यांस इंग्रेजी फौजेच्या चौकीकडून मज्जाव झाला. तथापि निराश न होतां त्यांनीं चौकीच्या इंग्रेजी अमलदारास सर्व हकीकत सांगितली व कर्नल प्लैट, मह्रूचा मुख्य जनरल, यास एक पेन्सिलीनें लिहिलेली जरूरी-चिठ्ठी पाठवून त्यांत सर्व हकीकत कळवून, महाराजांच्या एकनिष्ठेबद्दल त्यांची खात्री केली. भाऊसाहेब पुढें न जातां परत आले हें एका अर्थी बरेंच झालें. कारण, त्याच रात्रीं मह्रू येथील शिपयांनीं बंड केलें, कर्नल प्लैट वगैरे आफिसर मारले, व तेथून कूच करून इंदुराच्या बंडवाल्यांशीं मिलाफ केला. इंदूरची व इंग्रेजांची बंडवाली फौज इंदुरास एकत्र होऊन त्यांनीं महाराजांची मदत मागितली. परन्तु महाराजांनीं साफ नाहीं म्हटलें; किंबहुना हें कृत्य तुम्हीं वाईट केलें असेंहि त्यांस निक्षून सांगितलें. बंडवा-

त्यांनीं राव भाऊसाहेब व खुमानसिंग बक्षी व कांहीं इंग्रेजी ऑफिसर सरकारी वाड्यांत महाराजांच्या आश्रयास होते त्यांस आपले स्वाधीन करण्याविषयीं आग्रह धरला, पण तोहि महाराजांनीं मानला नाहीं. इंदूरच्या वाड्यावर इंदूरच्या न बिघडलेल्या फौजेचा जमाव होतांच, वाड्यावर हल्ला करण्यांत आपणांस यश येणार नाहीं असें वाटून बंडवाले निरुपायानें इंदूर सोडून उत्तरेस दिल्लीकडे इतर बंडवाल्यांशीं मिलाफ करण्यासाठीं निघून गेले. जाण्यापूर्वी त्यांनीं इंदूरचे छावणींतील खजिना व बाजार लुटला होता व सुमारें नऊ लाख रुपये कमविले होते.

## होळकरावरील संशयाची निवृत्ति.

याप्रमाणें हा भयंकर प्रकार तारीख १ जुलै सन १८५७ रोजीं सुरु होऊन तारीख ४ जुलै रोजीं संपला, व इंदूरची व महूची संस्थानी व सरकारी बंडवाली फौज तेथून निघून गेली. महू येथें इंग्रेजी तोफखाना व इंग्रेजी फौज शिल्लक होती, तिचा आफिसर कॅप्टन हंगरफर्ड होता. त्यानें मयत कर्नल प्लॅटच्या ऐवजीं फौजेचा चार्ज घेतला. तसाच एजंट कर्नल ड्यूरंड सिहोरकडे निघून गेला होता त्याच्या एजंटीचाहि चार्ज घेतला. त्यानें प्रथम महाराजांस पत्र पाठवून महाराजांच्या विरुद्ध जाणाऱ्या कित्येक अफवांविषयीं चौकशी केली. या पत्राचा समाधानकारक जबाब राव भाऊसाहेब व बक्षी यांनीं स्वतः महूस जाऊन कॅप्टन हंगरफर्ड यांस दिला व त्यांचें तोंडींहि सामाधान केलें. यापूर्वीं भाऊसाहेबांच्या सल्ल्यानें महाराजांनीं मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड एल्फिस्टन साहेब यांस ही हकीकत कळविली होती, व त्यांस बंडवाल्यांच्या पारिपत्याकरितां फौज पाठविण्याविषयीं विनंति केली होती. या दोन पत्रांनीं महाराजा तुकोजीराव होळकर यांजवर कर्नल ड्यूरंड यांनीं घेतलेला संशय अखेरीस नाहींसा झाला, व लॉर्ड एल्फिस्टन व कॅप्टन हंगरफर्ड या दोघां इंग्रेजी अमलदारांची या संशयनिवृत्तीच्या कामीं मोठी मदत झाली. या पुढील इंदूरची हकिकत देण्याची जरूरी नाहीं. महाराजांनीं राव भाऊसाहेब यांजवर या कठिण प्रसंगीं जो संपूर्ण विश्वास टाकला, त्याचें भाऊसाहेबांनीं चीज करून आपल्या सावधगिरीनें व शहाणपणानें तो प्रसंग निभावून नेला. हीच त्यांच्या

आयुष्यांतील मुख्य महत्त्वाची कामगिरी होय, व याच कामगिरीमुळें त्यांचें नांव हिंदुस्थानच्या इतिहासांत प्रसिद्ध झालें.

## बंडाची व्यवस्था लावून कारभार सोडला.

राज्याच्या कठिण प्रसंगांत ब्राह्मणांनीं राजास योग्य सल्ला देऊन मदत करावी ही ब्राह्मणांच्या कर्तव्याची एक दिशा अनेक प्रसंगीं आपण विसरतों. ब्राह्मण म्हणजे केवळ स्नानसंध्या करून यजनयाजन अध्ययन-अध्यापन करणारा एक वर्ग असें आपण समजतों. पण अशी राजकीय कामगिरी प्राचीनकाळापासून ब्राह्मण बजावीत आले आहेत. वसिष्ठव्यामादिकांनीं याच न्यायानें अनेक राजांस मदत दिल्याचे दाखले पुराणांतून वर्णिले आहेत. प्राचीन इतिहासांतहि चाणक्यादिकांनीं अशाच प्रकारची कामगिरी केल्याचीं उदाहरणें दिसतात. या प्रकारची मदत देण्यास ब्राह्मण आपल्या बुद्धीमत्तेनें योग्य असतातच. पण त्यांची विशेष पात्रता त्यांच्या निरपेक्षतेमुळें असते हें लक्षांत ठेवलें पाहिजे. राज्यावर आलेल्या प्रसंगांत अविश्रांत दक्षतेनें काम करून प्रसंग निवळला म्हणजे आपल्या शिरावर घेतलेलें ओझें खालीं ठेवून आपण निरपेक्ष रहावें, हा मार्ग ब्राह्मणांनीं स्वीकारला असतां त्यांचें कार्य अत्यंत प्रशंसनीय होतें. कारण, स्वहित-निरपेक्ष बुद्धिवान् मनुष्यांकडूनच राजांस योग्य सल्ला—मसलत मिळणें शक्य आहे. मनुस्मृतींतहि हें काम ब्राह्मणाकडून राजानें घ्यावें असें स्पष्ट सांगितलें आहे. "सर्वेषां तु विशिष्टेन ब्राह्मणेन विपश्चिता । मंत्रयेत्परमं मंत्रं राजा षाड्गुण्यसंयुतम् ॥ नित्यं तस्मिन् समाश्वस्तः सर्वकार्याणि निक्षिपेत् । तेन सार्धं विनिश्चित्य ततः कर्म समारभेत् ॥" ( म. ७, ५८–५९ ). राजाच्या अमात्यांत असा निरपेक्ष विद्वान् ब्राह्मण असावा व त्याच्यावर विश्वासून राजानें कठिण कार्य आरंभावें, या नियमाप्रमाणेंच महाराजा तुकोजीराव होळकर यांनीं राव भाऊसाहेब यांजवर १८५७ सालच्या प्रसंगीं विश्वास टाकला; आणि त्यांनींहि अंगीकृत कार्य आपल्या दक्षतेनें सिद्धीस नेलें. पण याच नियमाच्या आशयाप्रमाणें राव भाऊसाहेबांनीं ही कामगिरी केवळ निरपेक्षतेनें बजावली व ती सिद्धीस जातांच त्यांनीं आपले अधिकार खालीं ठेवले. एजंट सर रॉबर्ट ह्यामील्टन साहेब तुकोजी महाराजांच्या ठिकाणीं पुत्रवत् प्रेम करीत होते; कारण त्यांनींच त्यांस गादीवर

बसविलें होतें. त्यांस विलायतेस रजेवर गेले असतां कर्नल ड्यूरंड साहेबांच्या नाराजीबद्दल राव भाऊसाहेबांनीं खबर कळविली होती व या प्रसंगीं आपण हिंदुस्थानांत परत यावें अशी विनंतीहि केली होती. तेहि रजा सोडून पुन्हां कामावर रुजू झाले हा मोठा सुयोग झाला. यामुळें या बाबतींत त्यांच्या शिफारशीनें एक खलिता गव्हर्नमेंट ऑफ इंडियानें महाराजांस पाठविला. त्यांत इंदूर दरबारची व्यवस्था बंडाच्या धामधुमींत उत्तम रीतीची होती अशाबद्दल स्पष्ट उल्लेख केलेला होता. हा खलिता ह्यामिल्टन साहेबांनीं महाराजांस ३१ मार्च सन १८५९ रोजीं दरबारांत दिला त्याच दिवशीं राव भाऊसाहेब यांनीं जुलै सन १८५७ रोजीं घेतलेला राज्याचा अधिकार महाराजांच्या हवालीं केला. राव भाऊसाहेबांनीं कारभाऱ्याचेंसुद्धां काम करण्याची महत्त्वाकांक्षा न ठेवतां महाराजांचे पूर्ववत् सल्लागार व हुकुम सोडणारे अर्थात् सेक्रेटरीचें काम आमरणान्त केलें, ही गोष्ट भाऊसाहेबांच्या निरपेक्षतेची साक्ष देत आहे. त्यांस पुढें कारभारी म्हणत, पण ते कारभारी नव्हते. केवळ फॉरेन मिनिस्टरचें काम त्यांजकडे होतें व ते महाराजांस प्रसंगानुसार योग्य मदत देत होते. त्यांच्या निरपेक्षतेची आणखी साक्ष म्हटली तर त्यांस बंडाच्या वेळच्या त्यांच्या महत्त्वाच्या कामगिरीबद्दल इंग्रेजांकडून किंवा होळकरांकडून कांहीं पारितोषिक मिळालें नाहीं किंवा मिळण्याची त्यांनी खटपट केली नाहीं.

## धारची कामगिरी.

सन १८५७ च्या बंडांत धार संस्थान रसातळास गेलें तेंहि राव भाऊसाहेब यांनीं आपल्या उद्योगानें व मुत्सद्देगिरीनें वर आणलें हें पूर्वी सांगितलेंच आहे. त्या संबंधाची थोडीशी सविस्तर हकीकत वाचकांस देणें जरूर आहे. धारचे अधिपति यशवंतराव पवार सन १८५७ च्या २२ मे रोजीं, म्हणजे बंडापूर्वी दीड महिनाच, एकाएकीं कालऱ्यानें आजारी झाले. यावेळीं आनंदराव बाळासाहेब १३ वर्षांच्या वयाचे होते, त्यांस त्यांनीं तात्काळ दत्तक घेऊन भोपावरच्या एजंटास खबर दिली. दुसरे दिवशींच ते वारल्यावर दत्तकास कायम करण्याविषयीं कर्नल ड्यूरंड यांनीं शिफारस केली. राणी द्रौपदीबाईचा बन्धु भिवराव व माजी कारभारी रामचंद्र बापूजी हे काम पाहूं लागले. दरबारच्या पदरीं कांहीं विलायती म्हणजे काबुली

लोकांची फौज होती. विदेशी विधर्मी फौज राज्यरक्षणास ठेवूं लागलें म्हणजे राज्याला षंढत्व आलें असें समजावें. हें षंढत्व मराठी राज्याच्या उतरत्या काळांत मराठेशाहीस यापूर्वींच येऊन चुकलें होतें, व आरब, विलायती वगैरे लोक भरती झाले होते. असो, ह्या विलायत्यांनीं चोहोंकडचे भाऊबंद विलायती एकत्र करून धारचा किल्ला बळकावून बंड केलें, व तेथील तोफखाना दारूगोळा हस्तगत करून दरबाराशींहि लढण्यास प्रारंभ केला. पण थोड्याच दिवसांत इंग्रजांनीं तो किल्ला वेढून घेतला. तेव्हां विलायती लोकांस हत्यारें खालीं ठेवून जाण्याची परवानगी मिळाली. याप्रमाणें विलायत्यांच्या बंडाचा लवकरच बींमोड होऊन किल्ला हस्तगत झाला, तेव्हां अल्पवयी राजे ड्यूरंड साहेबांस भेटण्यास आले असतां धारच्या फौजेनें धारच्या अधिकाऱ्यांच्या फुसलतीनें बंड केलें याबद्दल धार संस्थानास जबाबदार धरलें जाईल, असें एजंटांनीं रामचंद्र बापूजी दिवाण यांस बजावलें. या धमकीप्रमाणें थोड्याच दिवसांत धार येथें इंग्रेजांतर्फे अम्मल सुरू झाला. बिचाऱ्या महाराणी द्रौपदीबाईस अत्यंत दुःख झालें, हें सांगणें नकोच. अल्पवयी महाराजांचा व आपला कांहीं अपराध नसतां संस्थान गेलें हें समक्ष पाहत असतां तिला कां वाईट वाटणार नाहीं ? जप्तीचा हुकुम न्यायप्रिय धीर–गंभीर असे त्यावेळचे गव्हर्नर जनरल लॉर्ड कॅनिंग यांनी कसा केला याचें मोठें आश्चर्य वाटतें. अशा कठिण प्रसंगीं द्रौपदीबाईनें राव रामचंद्र राव भाऊसाहेब यांजकडे धांव घेतली यांत नवल काय ? यांच्या वडिलांनीं धारची नोकरी केली होती. शिवाय इंदूर दरबारास त्यांनीं शर्थीनें सांभाळलें होतें. राव भाऊसाहेबांनींहि यावेळीं धार दरबारास मदत देण्याचें कबूल केलें. वाघानें घेतलेला बळी सिंहाकडून सुटेल असें जाणून ब्रिटिश पार्लमेंटपुढें दाद मागितल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें ठरवून, त्याप्रमाणें त्यांनीं खटपट सुरू केली. इंग्लंदांत राजकीय चळवळ कशी चालते हें त्यांस माहीत होतें. इंग्लंदांतील व तेथील इंग्रेजी वर्तमानपत्रें ते घेत असत. १८५३ त इंग्लंदांत एक ‘ इंडिया रिफार्म सोसायटी ’ स्थापन झाली होती हें त्यांस माहित होतें. जॉन ब्राइटसारखे महात्मे तिचे सभासद ( मेंबर ) होते. लॉर्ड डालहौसीनें चालविलेला नेटिव्ह संस्थानांचा स्वाहाकार ब्रिटिश लोकांस अत्यंत अप्रिय झालाच होता. अशा वेळीं राव भाऊसाहेबांनीं तुकोजी महाराजांची परवानगी घेऊन मिस्तर फेनविक यांच्या मार्फत डिकिन्सन नांवाच्या सदर संस्थेच्या एका मेंबरच्या हातीं हा प्रश्न दिला.

त्यानेंहि धारचा जप्तीचा प्रश्न हातीं घेऊन निरनिराळीं पत्रकें काढून, या कामांत कसा अन्याय झाला हें ब्रिटिश जनतेपुढें मांडलें. सर शेवटीं हा प्रश्न पार्लमेंटपुढें निघाला. कोर्ट ऑफ डायरेक्टर्स व ईस्ट इंडिया कंपनी यांची इतिश्री करून हिंदुस्थानचा राज्यकारभार बादशाहानें स्वतःकडे, अर्थात् पार्लमेंटकडे ठेवावा, हा ठराव नुकताच झाला होता. त्यामुळें धार संस्थान अल्पवयी राजास परत द्यावें असा ठरावहि पार्लमेंटनें ११ जून सन १८५८ रोजीं केला. ह्या ठरावाच्या अमलबजावणीस बराच अडथळा झाला, तथापि डिकिन्सन व राव भाऊसाहेब यांच्या सतत उद्योगानें सरतेशेवटीं धारचे राजे वयांत आल्यावर हा ठराव अमलांत येऊन धार संस्थान त्यांस परत मिळालें. या कामगिरीबद्दल आनंदरावसाहेब पवार यांनीं भाऊसाहेबांस दोन गांव जहागीर दिले, व तसेंच गोविंदराव विश्वास वकील यांस एक गांव इनाम देऊन त्यांचे कनिष्ठ बन्धु गोपाळराव विश्वास यांस कारभारी नेमलें. हे दोघे बन्धु अत्यंत स्वामिनिष्ठ असून त्यांची धार संस्थानावरील जप्ती उठवण्याच्या कामांत मदत झाली होती. करारी, इभ्रतदार, अत्यंत स्वच्छतेनें व टापटिपीनें रहाणारे, पाणीदार, जुन्या पिढीचे ब्राह्मण मुत्सद्दी कसे असत याची साक्ष पटवीत, अद्याप हे दोघे गृहस्थ धारेस पुष्कळ वर्षें स्नानसंध्येंत काळ घालवीत जिवंत होते.

## इंदूर संस्थानांत सुधारणा.

इंदूर व धार या दोन संस्थानांचा बचाव करण्याच्या कामीं राव भाऊसाहेब यांनीं जे अश्रान्त मानसिक व शारीरिक श्रम केले त्यामुळें त्यांची हयात बरींच वर्षें कमी होईल असें त्यांसहि वाटूं लागलें, ही गोष्ट त्यांनीं डिकिन्सन साहेबांस एका पत्रांत केलेल्या उल्लेखावरून दिसते. तथापि ते १८५७ नंतर बरींच वर्षें, म्हणजे सन १८७० पर्यंत वांचले; व जर त्यांच्या मृत्यूच्या हकीकतीसंबंधें झालेला प्रसंग न होता तर कदाचित् याहीपुढें ते आणखीहि कांहीं वर्षें वांचते. स. १८५९ नंतर सन १८७० पर्यंत त्यांनीं इंदूरच्या कारभारांत काय काय मदत दिली याची सविस्तर हकीकत या इंग्रेजी पुस्तकांत दिली आहे. सायर ( जकात ) खात्याची व्यवस्था, महिद्‌पुरच्या कांटिंजंटच्या खर्चाचा प्रश्न, दत्तकाची परवानगी, सन १८६१ सालीं झालेला जबलपुर येथील गव्हर्नर जनरल कॅनिंगचा दरबार, मुलुखाची अदलाबदल, शिक्षणखात्याची व सल्लागार कौन्सिलची

रचना, वगैरे कामांत राव भाऊसाहेबांची महत्त्वाची मदत तुकोजीराव महाराजांस झाली. सन १८६५ त ते एकाएकीं आजारी पडून बेशुद्ध झाले, परंतु त्या दुखण्यांतून ते बरे झाले. तेव्हांपासून ते राज्यव्यवस्थेंत कमी पडूं लागले. फक्त रेसिडेन्सीकडील काम व सायरचें काम ते पाहत असत आणि कौन्सिलमध्यें थोडेच जात असत. सन १८६७ त ते दक्षिणेंत यात्रेकरितां आले होते. धुळें, नगर वगैरे ठिकाणें पाहत ते जेजुरीस कुळदैवत खंडोबाच्या दर्शनास गेले. तेथें देवळाचा चढाव बिकट असल्यामुळें त्यांनीं देवळास जाण्याकरितां टेकडीस पायऱ्या बांधविल्या. पंढरपूर, तुळजापूर पाहून पुण्यास आले. येथेंच कुटुंबाचीं मनुष्यें ठेवून ते मुंबईस गेले. मुंबईस अफूचे इंदूरकडील व्यापारी मोठमोठे असल्यानें त्यांचें तेथें मोठं थाटाचें स्वागत झालें. पुण्यास परत येऊन सर्व सरदारांच्या भेटी घेऊन ते भोर येथें सचिवांच्या भेटीस गेले. नंतर नाशिक, दौलताबाद, वेरूळ वगैरे ठिकाणें पाहत व यात्रा करीत ते सन १८६८ च्या मार्च महिन्यांत इंदुरास परत आले.

## मृत्यूची हकीकत.

यानंतर दोन वर्षांनीं राव भाऊसाहेबांचा मृत्यु झाला. तो कसा झाला याची सरळ हकीकत या इंग्रेजी चरित्रांत दिली आहे. पण ती सरळ असूनहि हृदयद्रावक आहे. महतांचें धन मान हेंच होय, असें जें कवीनें म्हटलें आहे त्याचें प्रत्यक्ष उदाहरण ही हकीकत होय. तुकोजी महाराजांस फारशी शिकवणारा एक मौलवी, मौलवी महंमदहुसेन, दिवाणी अदालती जज्ज होता. त्याच्या लांचलुचपती घेण्याविषयीं साहुकार लोकांकडून पुष्कळ तक्रारी आल्यावरून तें प्रकरण महाराजांनीं भाऊसाहेबांकडे चौकशीसाठीं दिलें. मौलवी साहेबांविषयीं महाराजांस शिष्य या नात्यानें अत्यंत पूज्यभाव वाटत असल्यानें या प्रकरणाची चौकशी न करतां मौलवी साहेबांची बदली करावी असें भाऊसाहेबांनीं सुचविलें; परंतु न्यायप्रियतेच्या भरांत महाराजांनीं चौकशी कराच म्हणून हुकुम दिला. तें प्रकरण चौकशी होऊन कौन्सिलसमोर महाराजांच्या समक्ष निघालें, तेव्हां मौलवी साहेबांस जबाब विचारतां मौलवी साहेबांनीं जबाब देणें सोडून राव भाऊसाहेब यांजवर तोंडसुख घेण्यास प्रारंभ केला. यावेळीं महाराजांनीं त्यांस दाबलें पाहिजे

होतें, पण तसें झालें नाहीं. सर्व कौन्सिलमक्ष झालेली ही मानहानि भाऊसाहेबांस सहन झाली नाहीं. ते लागलीच प्रकृाते बिघडून घरीं आले. जेवणानंतर अधिकच बेफाम होऊन बरळूं लागले. ही खबर ऐकतांच महाराज स्वत: सरनोबत व बक्षी यांस बरोबर घेऊन त्यांचे भेटीस आले व त्यांशीं बोलण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. पण भाऊसाहेबांनीं तोंड फिरवून घेतलें व एक चकार शब्द काढला नाहीं. थोडयाच दिवसांत भाऊसाहेबांची प्रकृति जास्त बिघडून ते अगदीं वेडे झाले, व शेवटीं ४ जुलै सन १८७० रोजीं मृत्यु पावले. महाराजांसह सर्व शहर भाऊसाहेबांविषयीं हळहळलें हें सांगावयास नकोच.

## स्वरूप व स्वभाव.

राव रामचंद्रराव भाऊसाहेब स्वरूपानें व स्वभावानें सरदार होते. त्यांचा वर्ण गौर असून त्यांच्या चेहेऱ्यावर व डोळयांत बुद्धीचें तेज दिसून येत असे. त्यांची धर्मावर निष्ठा चांगली असून ते रोज गीतेचा अध्याय वाचीत. शास्त्री व विद्वान् लोकांची त्यांस चहा होती. त्यांचा स्वभाव मानी असून ते लोकांत फार मिसळत नसत. पण त्यांचें वर्तन अत्यंत सभ्य व लीनतेचें असे. ते न्यायी असून जेव्हां न्यायाची बाजू लुब्रे, तोंडपुजे लोकांच्या कारस्थानानें लंगडी पडे, तेव्हां ते महाराज तुकोजीरावांस स्पष्ट व योग्य सल्ला देत असत. त्यांस घोडयावर बसण्याचा शोक असून त्यांजपाशीं नेहमीं उमदे घोडे असत. त्यांस गाण्याचा नाद असे. बहुधा त्यांच्या घरीं रोज अकरा वाजेतों गाणें व्हावयाचें. या त्यांच्या करमणुकीच्या मजलसींतील माणसें त्यांच्यासारखींच निवडक रत्नें होतीं असें म्हटलें असतां चालेल. हीं नांवें मराठीं वाचकांकरितां येथें नमुद करणें गुणिजन-भक्तीचें कर्तव्य आहे. नाना पानसे, बाळुभैया, तातुभैया, देवजी टप्पा गाणारे व कमलाकरपंत ही मंडळी म्हणजे आपआपल्या कामांत अप्रतिम असून ती भाऊसाहेबांच्या येथें नेहमीं जमायाची, व ऐकणाऱ्या मंडळींत गणेशशास्त्री केळकर, वासुदेवपंत मुळे व रामजी वकील हे बहुधा असावयाचे.

याप्रमाणें माळव्यांतील गत पिढींतील लोकोत्तर गुणांच्या अनेक मनुष्यांचें स्मरण येऊन एक प्रकारचें चित्तास समाधान मिळालें, याबद्दल मला आनंद वाटतो. शेवटीं राव भाऊसाहेबांच्या राजकीय मतांचा उल्लेख करणें जरूर आहे. त्यांस इंग्रेजी, देशी व विलायती वर्तमानपत्रें वाचण्या-

चा नाद असून इतिहास व राजकारण यांचा व्यासंग त्यांचा चांगला होता. हिंदुस्थानांत व विशेषतः संस्थानांत राज्यव्यवस्था इंग्लंडसारखी कॉन्स्टिट्यूशनल अथवा कायदेशीर असावी, अनियंत्रित एकछत्री नसावी, असें त्यांचें मत असल्याचें कुंटेसाहेबांनीं नमुद केलें आहे. यावरून ते आपल्या पिढीच्या किती तरी पुढें होते हे लक्षांत येईल. त्यांच्या मुत्सद्दीपणाविषयीं तर कोणास शंका नाहींच. मोठमोठे मार्टिंडेल वगैरे साहेबसुद्धां त्यांस माळव्याचा टालीरँड ( फ्रेंच मुत्सद्दी ) म्हणत. असो, ब्राह्मणांत बापू गोखल्यांच्या खालोखाल मुत्सद्दीपणांत नांवाजलेल्या व त्याजपेक्षांहि यशस्वीपणांत श्रेष्ठ असलेल्या राव रामचंद्रराव भाऊसाहेब रेशिमवाल्यांचें चरित्र रावबहादुर विष्णुपंत कुंटे, देवासचे माजी कारभारी, यांनीं साधार लिहून इतिहासाध्यायी लोकांवर उपकार केल्याबद्दल त्यांचे पुन्हा एकवार आभार मानून मी वाचकांची रजा घेतों.



# अर्वाचीन काळांतील राष्ट्रांचे उदयास्त

यात्येकतोऽस्तशिखरं पतिरोषधीना-
माविष्कृतारुणपुरःसर एकतोऽर्कः ।
तेजोद्वयस्य युगपद्व्यसनोदयाभ्यां
लोको नियम्यत इवैष दशान्तरेषु ॥

कण्व-महामुनी शिष्यांसह शकुंतलेस नवऱ्याच्या घरीं पोंचविण्यासाठीं वद्य प्रतिपदेस पहांटेस आश्रमाबाहेर पडले, त्यावेळचा चित्तावर ठसा उमटविणारा सृष्टीचा देखावा कवि-कुलगुरु कालिदास यांनीं वरील श्लोकांत वर्णिला आहेः---पश्चिमेस फटफटीत होणारा चंद्र अस्तास जात आहे तर पूर्वेस उदयोन्मुख सूर्याच्या अरुणप्रकाशाची वाढती लाली फुटत आहे, अशा प्रकारचा सृष्टींतील भव्य व मनोहर देखावा पाहून कालीदासाच्या मनांत वरील विचार उद्भवला. दोन तेजस्वी गोलांचा एकाच समयीं होणारा अस्त व उदय यांनीं हा लोक भिन्न भिन्न देशांतून नियमित केला आहे, असा सृष्टीचा सिद्धांत कालिदासानें येथें सांगितला. हा सिद्धान्त अचेतन व सचेतन सृष्टीच्या सर्व घडामोडींस लागू आहे आणि व्यक्तिशः काय, समाजशः काय, तो उन्नत स्थितींत व अवनत स्थितींत सर्वांस धर्माचा उपदेश करीत आहे. इ. स. १९१३ च्या ऐतिहासिक घडामोडीनें हा सिद्धांत आपल्या प्रचितीस येतो. पूर्वेस आपणांस सूर्याचे वंशज मानणाऱ्या चिन्यांच्या राष्ट्राचा अरुणोदय होऊन त्याचा उदय होऊं पाहत आहे तर पश्चिमेस निशाणावर चंद्रकोर बाळगणाऱ्या तुर्कीराज्याचा मार्ग अस्ताचलाकडे निघत आहे. तुर्कांच्या राज्याचा युरोपांत अस्त होईल किंवा चिन्यांचा पूर्वेस उदय होईल या गोष्टी अद्याप कालाच्या गुलदस्तांत आहेत. चित्रमयजगताचा जो पट कालपुरुष हळुहळु उघडीत आहे त्यांत या राष्ट्रांना पुढें कसा रंग दिलेला दिसेल हें अनंत कालासच ठाऊक ! १९१३ च्या जुलई महिन्यांत असें कोणालाहि वाटलें नव्हतें कीं तुर्कीराष्ट्राचें अड्रीयनोपाल दुय्यम राजधानीचें शहर गेलेलें या राष्ट्रास पुन्हां परत मिळेल. उलटपक्षीं चिन्यांच्या डोक्यांत हजारों वर्षांपासून खिळलेल्या राजसत्तेच्या आवडीची जणूं काय दर्शक अशी त्यांची लांब शेंडी एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत एकदम नाहींशी

होऊन तिच्या ऐवजीं प्रजासत्ताभिनिवेश त्यांच्या डोक्यांत घुसेल, आणि मांचु राजा नुसत्या फुंकीची जरूर न पडतां खालीं पडेल. ती कल्पना १९०७ अखेरपर्यंत चीनचा इतिहास देणाऱ्या 'इतिहासकारांचा जगताचा इतिहास' या अत्युत्तम ग्रंथ–कर्त्यांस शक्य वाटली नाहीं. किंबहुना या पुस्तकांतील भाग २४ मधील चिन्यांच्या इतिहासाच्या समारोपाचीं वाक्यें इ. स. १९०७ मध्यें लिहिलेलीं वाचतांना आतां आपणांस मौज वाटते. "That there will be any immediate deep reactionary change in the underlying character of Chinese civilization is not probable. The attempt to force the civilization of Europe is not necessarily productive of the happiest results" बहुतेक इतिहासकारांच्या मनोवृत्तीचा रंग त्यांच्या लेखावर कसा पडत असतो, याचें हें एक मनोरंजक उदाहरण आहे. असो, तुर्कांचें युरोपांतील राष्ट्र सध्यां इतकें संकुचित झालें आहे कीं, १४५३ मध्यें तुर्कांनीं रोमन राष्ट्र उलथून कॉंस्टान्टिनोपल शहर घेतलें, त्यावेळेस रोमन राज्य जितकें संकुचित झालें होतें, तितकेंच हल्लींचे तुर्कांचें झालें आहे. इकडे चिन्यांच्या प्रजासत्ताक राज्यपद्धतीनें जगतास दिपवून सोडलेलें आहे, व दहा वर्षांपूर्वींच्या युरोपियनांच्या 'Policy of benevolent assimilation' कल्याण बुद्धीनें स्वतांत समावेश करून घेण्याच्या राजनीतीस आळा पडला आहे. तात्पर्य १९१३ सालांत एकीकडे तुर्कांच्या राष्ट्रचंद्राचा अस्त होत आहे, तर दुसरीकडे चिन्यांच्या राष्ट्रसूर्याचा उदय होऊं पहात आहे. असा चमत्कार दृष्टीस पडतो.

हा चमत्कार जगताच्या एकंदर इतिहासांत दिसून येतो. चित्रमय–जगताचा जो पडदा अनंतकालानें आजवर उघडला आहे, त्यांत राष्ट्रांचे उदयास्त अशाच नियमांनीं बांधले आहेत. "History is a record of human actions", अशी एक लहान समर्पक व्याख्या एका ग्रंथकारानें केली आहे. हें मानवी कृत्यांच्या समष्टिरूपाचें चित्र कांहीं तरी भरकटलेलें आहे कीं काय हा एक वादग्रस्त प्रश्न आहे.

चित्रमय–जगताच्या पटावर काल कांहीं तरी, कोठें तरी, कसे तरी, हिरवे, तांबडे रंग भरीत आहे किंवा ह्यांत कांहीं सुरम्य, सुबद्ध, आकृति आहेत ? मानवी कृत्यांच्या प्रवाहास कांहीं नियम आहे, त्यांना कांहीं

दिशा आहे, त्यांत कांहीं उद्देश आहे काय? काळाच्या भावी गुलदस्तांत काय आहे, हें मागील प्रवाहावरून व हकीकतीवरून तुम्हांस पुढें सांगतां येईल काय? माझ्या मतें कालाच्या चित्रपटावर कांहीं नियमबद्ध आकृति आहेत. तो नियम म्हणजे कालिदासानें वर्णिलेला उदयास्ताचा होय! राष्ट्रें स्वाभाविक गतीनें अस्तास जातात व त्याच गतीनें कांहीं कालानें उदयास येतात. सूर्याच्या ग्रह–मालिकेंत जशा कांहीं उल्का किंवा धूमकेतू आहेत कीं जे उदय पावून, प्रकाश पाडून, अस्तास जातात, पुन्हां दिसत नाहींत, तशीं कांहीं राष्ट्रें इतिहासांतहि उदय पावून स्वतेजानें चमकून अस्तास गेलीं. तीं पुन्हां दिसणार नाहींं, हें खरें. तरी साधारणपणें मुख्य ग्रहाप्रमाणें बहुतेक राष्ट्रें कालनियमानें उदय व अस्त पावतात. हल्लींच्या काळांत कानाकोपऱ्यांतहि कांहीं घडून आलें तर रूटरचा बातमीदार सर्व हकीकत जगताला कळवितो. हल्लीं सर्व पृथ्वी संकुचित झाली असून एका कुटुंबांत आली आहे. तेव्हां समष्टिरूपानें मानवी कृत्यांचें निरीक्षण करणें हल्लीं सोपें झालें आहे. "Historians' History of the World" ह्या ग्रंथाच्या आधारानें राष्ट्रांचे उदयास्त कसे झाले व होत आहेत हें आपण पाहूं.

प्रथम आपल्या देशापासूनच सुरुवात करूं. इ. स. १८५७ सालच्या शिपायांच्या बंडाच्या वणव्यांत मोंगल व मराठी साम्राज्यांचे क्षुद्र अवशेष जळून गेले. इ. स. १८५८ त हेंच राष्ट्र नव्या स्वरूपानें, मुसलमानी किंवा हिंदु नव्हे तर हिंदी स्वरूपानें, ब्रिटिश साम्राज्याच्या छत्राखालीं गर्भावस्थेंत आलें. १८५८ चा जाहीरनामा म्हणजे हिंदी राष्ट्राच्या सनदशीर राज्य-पद्धतीचा पायाच होय. यानंतर एकाच वर्षानें म्हणजे १८५९ मध्यें स्वतंत्र इटलीच्या राष्ट्राचा उदय झाला. इटालीचें राष्ट्र चौदाशें वर्षेपर्यंत अस्तदशेंत होतें. इ. स. ४०० च्या सुमारें रोमचें साम्राज्य ॲटिलानें रसातळास नलें, तेव्हांपासून ग्रॉथ, व्हँडल, लॉंबर्ड, फ्रँक, नॉर्मन, जर्मन, स्पॅनिश, फ्रेंच व ऑस्ट्रियन या लोकांची सत्ता क्रमानें इटलीवर गाजत राहून शेवटीं इ. स. १८५९ त पीडमॉंटचा राजा व्हिक्टर इम्यान्युएल व त्याचा मुत्सद्दी प्रधान कौंट काव्हूर यांच्या प्रयत्नानें गॅरिबॉल्डी–मॉझेनी इत्यादि स्वदेशभक्तांच्या चळवळीस यश आलें; व शेवटची ऑस्ट्रियाची सत्ता नष्ट होऊन इटलीस स्वातंत्र्य मिळालें. स्वतंत्रतेकरितां धडपड करणाऱ्या लोकांविषयीं सहानु-

भूति दाखविणाऱ्या नवीन फ्रान्सच्या राष्ट्रानें इटालियानांस फौजी मदत केली. फ्रेंच व इटालियन फौजांनीं ऑस्ट्रियाच्या फौजेचा पराभव सॉल्फेरीनोच्या प्रसिद्ध लढाईत केला ( जुलै १८५९ ). यावेळीं सर्व युरोपियन राष्ट्रांची सहानुभूति इटालियन लोकांकडे होती यामुळें इटालीचें नवीन स्वतंत्र राष्ट्र उदयास येऊन युरोपच्या प्रमुख राष्ट्रांत मोडूं लागलें. हें राष्ट्र चौदाशें वर्षेपर्यंत अस्तंगत होतें, या गोष्टीचें आश्चर्य प्रत्येक इतिहासकारास वाटतें. ज्या रोमन राष्ट्रानें आपल्या शौर्यानें, शिस्तीनें व स्वदेशप्रीतीनें त्यावेळच्या ज्ञात जगास पादाक्रांत केलें होतें, त्या रोमन राष्ट्राचें हें इटलीचें राष्ट्र वंशज व वारस होते. इटालियन लोक बडे बापके नादान बेटे नव्हते. बुद्धिमत्ता, शौर्य, युद्धविशारदता, स्वातंत्र्यप्रीति, स्वदेशाभिमान हे गुण रोमन लोकांप्रमाणेंच त्यांच्या वंशजांच्या अंगीं होते. मायकेल अंजेलोसारखे अद्वितीय चित्रकार, डँटीसारखे नामांकित कवि, गॅलीलियोसारखे विलक्षण बुद्धीचे ज्योतिषी, मॅकियाव्हेलीसारखे कुटिल—राजनीतिनिपुण इटली देशांत, याच पारतंत्र्याच्या काळांत उत्पन्न झाले आणि अर्वाचीन युद्धपद्धतीचा उगमहि इटालींत याच काळांत झाला. तेव्हां हा देश पारतंत्र्यांत इतकीं वर्षे कां लोळत राहिला हा इतिहासज्ञांसमोर खोल विचाराचा प्रश्न आहे. आपसांतील वैमनस्यें व पोपचें रोम येथें अस्तित्त्व या दोन कारणांनीं इटालीची प्रगति झाली नाहीं. व्हिक्टर इम्यान्युएल याच्या अमलाखालीं इटाली देश स. १८५९ त स्वतंत्र झाला तरी पोपांची ऐहिक राजसत्तेची तृष्णा रोम येथें इटालीचा प्रवेश करूं देत नव्हती. शेवटीं स. १८७० मध्यें फ्रान्सचें सैन्य रोम येथून निघून गेल्यावर रोमच्या सर्व लोकांच्या संमतीनें पोपची ऐहिक राजसत्ता नाहींशी झाली; आणि रोम शहरांत व्हिक्टर इम्यान्युएल राजाचा थाटानें प्रवेश झाला. १२ जानेवारी १८७८ रोजीं हा इटालीचा पहिला राजा मरण पावला, व नंतर थोड्याच दिवसांनीं ‘ पायस ९ वा ’ इटालींतील शेवटचा पोपचा राजा मरण पावला. “ In these two men is personified one of the greatest epochs in history, the epoch of a free state and risen nation ” या दोन व्यक्तींत इतिहासाचा अत्यंत महत्त्वाचा काल स्पष्ट झाला आहे. हा काल म्हणजे स्वतंत्र होणाऱ्या देशाचा व उत्थित झालेल्या राष्ट्राचा काल होय. व्हिक्टर इम्यान्युएल यांस “ The father of his country अशी सन्मान्य पदवी लोकांनीं एकमतानें दिली.

इ. स. १८५९ त साल्फेरिनोच्या लढाईत इटाली स्वतंत्र झाल्याची हकीकत युरोपभर पसरली तेव्हां परतंत्र असलेल्या इतर लोकांत साहजिकच चळवळ सुरू झाली. या बातमीचा विशेष परिणाम पोल्स लोकांवर झाला. या लोकांचा इतिहास इतालीच्या इतिहासापेक्षांहि अधिक गूढ महत्त्वाचा आहे. पोल्स लोकांचें शूरत्व युरोपाच्या इतिहासांत गाजलेलें आहे. जसे इंग्रज समुद्रावर शूर, तसे पोल्स जमिनीवर शूर अशी त्यांची ख्याति आहे. या लोकांच्याच शौर्यशिलांवर तुर्कांची पूर्वेकडून पश्चिमेकडे जाणारी लाट व्हिएन्ना येथें स. १६८३ त आपटून फुटून गेली. त्या वर्षी पोल्स लोकांचा राजा सोबिएस्की यानें कारामुस्ताफा, तुर्की ग्रँडवजिर, याच्या व्हिएन्नास वेढा घालून बसलेल्या तीन लाख फौजेचा पराभव करून केवळ जर्मनीचेंच नव्हे तर सर्व ख्रिस्ती युरोपाचे आभार संपादन केले. पोल्स जसे शूर होते, तसे स्वातंत्र्यप्रिय होते. देशासाठीं अनेक दुःखें भोगल्याचीं उत्साहवर्धक उदाहरणें त्यांच्या इतिहासांत अनेक आहेत. असें असूनहि पोलंडचें राज्य प्राशिया, रशिया व ऑस्ट्रिया या तीन राष्ट्रांनीं तीनदां विभागून नाहींसें केलें. १८५९ त इतालीनें स्वातंत्र्य मिळविल्यावर पोल्स लोकांनीं स्वातंत्र्य मिळविण्याची खटपट करून रशियाच्या विरुद्ध बंड केलें. तें रशियानें पक्कें मोडून पोल्सच्या राज्याची इतिश्री केली. १८६४ मे मध्यें पोलंडचा रशियामध्यें पराभव होऊन त्याचें अस्तित्व नष्ट झालें. सरकारी कागदपत्रांत पोलिश भाषा जाऊन रशियन भाषा सुरू झाली. वार्सोच्या विद्यापीठांतहि रशियन भाषा व्याख्यानांत सुरू झाली. याप्रमाणें पोलंडचें राज्य सुमारें एक हजार वर्षे चमकून १८६४ त अस्तास गेलें. पोलंडचा इतिहास राज्यकारभाराच्या दृष्टीनें फारच महत्त्वाचा आहे. गादीवर येणारा प्रत्येक राजा निवडणें, एका विरुद्ध मतानें सर्व क्षत्रिय–सभेस उधळून देणें अशा अनेक वाईट चाली उत्पन्न होऊन हें राष्ट्र धुळीस मिळालें. पोलिश लोकांत स्वदेशघातकीपणाहि त्यांच्या उतरत्या काळांत व्यक्त होत होता, हें सांगितलें पाहिजे. सारांश, सर्व प्रकारचे राष्ट्रीय सद्गुण आणि दुर्गुण त्यांच्या इतिहासांत दिसून येतात. ह्यामुळेंच हें राज्य अस्तास गेलें. (हें अस्तास गेलेलें राष्ट्र पुन्हां उदयास येणार नाहीं असें वाटलें होतें; पण युरोपीय महायुद्धानंतर स. १९२० मध्यें पुन्हां उगवलें.)

यानंतर राष्ट्रांच्या उदय-अस्तांचा चमत्कार म्हटला म्हणजे इ. स. १८६६ त ऑस्ट्रियाचें जर्मनीच्या संयुक्त राष्ट्रांतील वर्चस्व नाहींसें होणें व इ. स. १८७० मध्यें प्रशियास तें मिळणें हा होय. हा इतिहास फारच बोधप्रद आहे. जर्मन लोक सर्व जगतांत बुद्धिमान्, शूर व युद्धकलानिपुण आहेत. रोमन बादशाही उलथून पडल्यानंतर ( ४५० इ. ) बरींच वर्षे अस्तंगत होती. पण इ. स. ८०० मध्यें ती बादशाही जर्मन लोकांनीं चार्लमेन या प्रख्यात राजाच्या वेळीं पुन्हां कायम केली. ही बादशाही रोमन बादशाहीप्रमाणेंच् इलेक्टिव्ह म्हणजे निवडणुकीची असे व जर्मनीचे मांडलिक राजे एके ठिकाणीं जमून आपल्यापैकीं कोणा एकास बादशहा नेमीत असत. इ. स. १४०० च्या सुमारापासून ती ऑस्ट्रियाच्या हाफ्सबर्ग घराण्यांतच चालू राहिली. तिचा अंत नेपोलियननें जर्मन लोकांचा, विशेषतः ऑस्ट्रियाचा, दोन तीन भयंकर लढायांत पराभव करून जबरदस्तीनें १८०९ सालांत केला. ऑस्ट्रियाच्या राजानें जर्मन बादशाहीचा जो राजीनामा दिला तो पुढें नेपोलियनचा पराभव झाला तरी परत घेतला नाहीं. याप्रमाणें बादशाहीचा अंत झाला, तथापि जर्मनीच्या राष्ट्राचें अध्यक्षस्थान ऑस्ट्रियाच्या राजानें आपल्याकडे ठेविलें, या गोष्टीमुळें जर्मन राष्ट्राची एकी व प्रगति होण्यास फारच अडचण पडूं लागली. पण राजे लोकांतील आपसांतल्या वैमनस्यामुळें व प्रत्येकास महत्त्वाकांक्षा असल्यामुळें उपाय चालेना. प्रशियाचा राजा हा जर्मन राजांपैकीं असून, बलवान् होता. ज्या राष्ट्राचा उदय व्हावयाचा असतो त्यांत ईशकृपेनें कर्तृत्ववान् माणसें निपजूं लागतात. प्रशियाची फौज सर्व जर्मन राजांच्या फौजांत फ्रेडरिक धी ग्रेट याच्या बापाच्या वेळेपासून अग्रणी झाली होती, व या होएनझोलर्न राजघराण्यांत फ्रेड्रिक धी ग्रेटनंतरहि कर्तृत्ववान् राजे निपजले. यावेळीं ( इ. स. १८६६ ) प्रशियाचा राजा वुइल्यम् महान् योद्धा होता. व त्यास कौंट बिस्मार्क हा एक विलक्षण मुत्सद्दी प्रधान मिळाला. वीर व मुत्सद्दी एक झाले म्हणजे तेथें उत्कर्ष ठेवलेलाच. 'ब्रह्म क्षत्रं च संपृक्तं वर्धते ' ( मनु ) किंवा "यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः" तेथें श्री विजय आणि शाश्वत नीति आहेच. वुइल्यम् व बिस्मार्क या जोडीनें जर्मन राष्ट्राचा पुढारी ऑस्ट्रिया यास १८६६ त कानिग्जग्रर्गच्या लढाईंत जिंकून जर्मन बादशाही मिळविली. हें युद्ध सात आठवड्यांचेंच झालें.

ऑस्ट्रियाच्या राजानें जर्मन संयुक्त राष्ट्राच्या प्रमुखत्वाचाच नव्हे तर त्यांत सामील राहण्याचा हक्कहि सोडून दिला. याप्रमाणें ऑस्ट्रियाचें राज्य विलग झालें आणि त्याचें बादशाहीपण लयास गेलें.

प्रशियाच्या राजास मात्र तें याच वेळीं मिळालें नाहीं. योद्धा वुइल्यम् व मुत्सद्दी बिस्मार्क यांना यांसाठीं थोडी वाट पाहावी लागली. जर्मनीच्या राज्यामध्यें फ्रान्सचा बादशहा नेपोलियन धी थर्ड फूट पाडीत होता. व जर्मनीचे राजे, आपसांतली चुरस, नेपोलीयनची मदत व प्रत्येकाची महत्त्वाकांक्षा, यामुळें प्रशियास पुढारीपणा देण्यास कबूल नव्हते. यासाठीं फ्रान्सच्या नेपोलियनाची खोड मोडणें जरूर होतें. हा प्रसंग बिस्मार्कनें १८७० त युक्तीनें घडवून आणला. नेपोलियनच्या आरेरावीनें तो आपोआप आला असेंहि म्हणतां येतें. फ्रान्सवर झडप घालावयाची प्रशियाची तयारी इतकी कडेकोट होती कीं, योद्धा राजा वुईल्यम् व त्याचा सेनापति व्हॉन–मोल्ट्क यांनीं सर्व गोष्टी आंखून ठेवल्या होत्या. यामुळें फ्रान्सनें युद्धाचें प्रथम आव्हान केलें असून फ्रान्सला जर्मनीवर स्वारी करतां आली नाहीं, इतकेंच नव्हे तर जर्मनीची फौज फ्रान्सवर चढून तिनें एखाद्या कुशल पहिलवानाप्रमाणें फ्रान्सला थोड्याच वेळांत चारीमुंडे चीत केलें. इ. स. १८७० तील फ्रॅंको–जर्मन युद्ध म्हणजे जर्मनीच्या युद्धशास्त्रांतील विलक्षण नैपुण्याचें प्रदर्शनच होय. सर्व गोष्टी मंत्रानें घडून आणल्याप्रमाणें ठराविक रीतीनें घडत होत्या. नेपोलियन हाहि योद्धा असून साल्फेरिनोच्या युद्धांत हजर होता, त्याचप्रमाणें याही युद्धांत हजर होता. वुइल्यम् व नेपोलियन यांची लढाई सिडान येथें झाली. या लढाईत जर्मनीच्या युद्धकौशल्यानें कमाल केली, व त्या कौशल्यास यश येऊन नेपोलियन दुर्भाग्याच्या रसातळास पोंचला. फ्रेंचांचें सर्व सैन्य चारी बाजूनें वेष्टिलें जाऊन बादशाहासह जर्मन फौजेस शरण आलें व तिच्या हस्तगत झालें. एक लाख फौजेनें हत्यारें खालीं ठेविलीं. नेपोलियन कैद होऊन फ्रान्सच्या गादीपासून च्युत झाला. किंग वुइल्यम्चा मोठेपणा व ईश्वरावरचा भरंवसा हे गुण त्याच्या एका पत्रांत व्यक्त होतात. ‘What I felt who had seen Napolean at the height of his power three years before, but now cast down though dignified in bearing!’ सिडनच्या पराभवानंतर पारिस शहरानें प्रजासत्ताक राज्याची द्वाही

फिरवून जर्मनीचा प्रतिकार करण्याचा निश्चय केला. विजयी जर्मन फौजेनें पुढें चाल करून पारिसला वेढा दिला. एवढें बलाढ्य पारिस शहर पण त्यास जर्मन फौजेनें चार महिन्यांत शरण आणलें. ज्या ठिकाणीं हजार वर्षांपूर्वी चार्लमेन राजानें जर्मन बादशाही कायम केली त्याच व्हर्सेलूस येथें पुराण्या राजवाड्यांतील ऐनेमहालांत जर्मन फौजेचे सर्व सेनापति व जर्मनींतील सर्व राजे यांनीं जमा होऊन एकमतानें प्रशियाच्या होएन्झोलर्न वंशांतील सेडानचा व पारिसचा जेता किंग वुइल्यम् यास जर्मनीचा बादशाह वंशपरंपरेचा पसंत करून केसर ही पदवी १८ जानेवारी सन १८७१ रोजीं अर्पण केली. याप्रमाणें जर्मनीच्या बादशाहीचा उदय १८७१ च्या प्रारंभीं झाला. यावेळीं केसरनें आपल्या फौजेस जो जाहीरनामा जाहिर केला तो असाः—
" Always remember that the sentiment of honour, faithfulness, comradeship, courage and obedience make an army great and victorious. " ' अभिमान, इमानदारी, सख्य, शौर्य आणि आज्ञाधारकपणा हे गुण सैन्यास बलाढ्य आणि यशस्वी करतात.' जर्मनीचें राष्ट्र होएनझोलर्न वंशाखालीं एकवटल्यानंतर प्रिन्स बिस्मार्क यानें त्या राष्ट्रांत reichstag अथवा निवडणुकीचें पार्लमेंट देऊन राष्ट्र सुबद्ध केलें, आणि त्याची आरमारी शक्ति व व्यापार वाढवण्याचा प्रयत्न केला. जर्मन राष्ट्र हल्लीं तरुण आहे आणि तारुण्यांत त्याची याहीपेक्षां भरभराट होईल, असा अंदाज केल्यास तो चुकीचा ठरणार नाहीं. ( हा १९१४ त केलेला अंदाज कालगतीनें चुकीचा ठरला आहे. जर्मनीची केसरशाही गेल्या महायुद्धांत स्थापनेनंतर पन्नास वर्षांच्या आंतच बुडाली. )

१८७१ तील फ्रॅंको—जर्मन युद्धानंतर लौकरच दुसरें एक मोठें युद्ध होऊन दोन तीन लहान पण होतकरू राष्ट्रें उदयास आलीं. हीं राष्ट्रें तुर्कांच्या प्रचंड लाटेखालीं सांपडून अस्तास गेलीं होतीं. तुर्कांच्या करड्या अंमलाखालीं हीं राष्ट्रें पांचशें वर्षे अस्तंगत होतीं, पण त्यांचा जीव धर्माच्या ऐक्यामुळें कायम राहिला होता. यांतील लोक ग्रीक—चर्चचे ख्रिस्ती असून त्यांच्याकरितां स्वतंत्र बिशप अथवा धर्माधिकारी तुर्कांनीं राहूं दिले होते. यामुळें एकराष्ट्रीयत्वाची जाणीव धर्माच्या बाबतींत या राष्ट्रांत तगून राहिली होती. फ्रेंच रेव्होल्युशननंतर युरोपांत सर्वत्र

स्वातंत्र्याचे व प्रजेच्या हक्काचे विचार खेळूं लागले, तेव्हां याहि लोकांत ते वावरूं लागले; व हळूहळू या तीन संस्थानांत असंतोष पसरून तंटेबखेडे व बंडें होऊं लागलीं. सरशेवटीं तुर्कांनीं एक जालिम उपाय योजण्याचें मनांत आणलें. बलगेरियांत कित्येक मुसलमान झाले होते. त्यांच्या मदतीनें ख्रिस्ती लोकांची सरसहा कत्तल करून किंवा त्यांस बाटवून सर्व प्रांत मुसलमानमय करावा, असा हा क्रूर उपाय होता. तो अमलांत आणण्यास १८७६ त सुरुवात होऊन बेलगेरियांत भयंकर कत्तली झाल्या. सुमारें पंधरा हजार लोक ठार झाले! " Bulgarian Atrocities " म्हणजे 'बलगेरियांतील क्रूर कृत्यें' यामुळें सर्व युरोपांत खळबळ होऊन ख्रिस्ती राष्ट्रांच्या मनोवृत्ति क्षुब्ध झाल्या. यावेळचा ग्लॅडस्टनचा एक लेख व त्यानें दिलेला तुर्कांस एक इषारा इतिहासप्रसिद्ध आहे. बल्गेरियास व रूमानियास योग्य हक्क देण्याकडे तुर्कांनीं दुर्लक्ष्य केल्यामुळें सरशेवटीं रशिया आणि टर्की यांमध्यें सन १८७७ त रणसंग्राम सुरू झाला. दोघेहि शूर असल्यानें हें युद्ध फारच जबरदस्त झालें. प्लेवना येथील तुर्कांचे पराक्रम वाचकांच्या अद्याप स्मरणांत असतील. प्लेवना हें लहान खेडें बल्गेरियांत असून तेथें उस्मान पाशा चाळीस हजार तुर्की फौजेनिशीं होता. तुर्कांच्या शौर्यानें व युरोपियन शस्त्रांच्या साहाय्यानें तात्पुरत्या उभ्या केलेल्या तटबंदीवर रशियन फौजेचे हल्लेचे हल्ले फुकट गेले व रशियनांची भयंकर प्राणहानि झाली. उस्माननें रशियन फौजेचा तीनदां पराभवहि केला. तेव्हां रशियन फौजेनें शेवटीं प्लेवनास चारी बाजूनें वेढा देऊन केवळ उपासमारीनें तें ठिकाण हस्तगत केलें. त्यानंतर रशियन फौजेनें पुढें चाल करून अॅड्रियानोपल शहर घेतलें. कॉंस्तान्तिनोपलहि जाऊन याचवेळीं युरोपांत तुर्कांचा अस्त झाला असता, पण इंग्लंड वगैरे देशांस रशियाच्या वाढत्या बळाची भीति वाटून तिनें ही वाढ तेथेंच बंद केली. प्लेवनाच्या लढाईत बल्गेरियन व रुमानियन लोकांनीं रशियास चांगलीच मदत केली; आणि १८७८ त जो तह रुसो-टर्किश युद्धानंतर बर्लिन येथें झाला, त्या तहानें युरोपानें बल्गेरिया, रुमानिया व सार्व्हिया यांस स्वातंत्र्य दिलें. या तिन्ही प्रांतांतील लोक शूर असून त्यांनीं रोमन बादशाहीस सुद्धां जेरीस आणलें होतें. असें असून हीं राष्ट्रें तुर्कांनीं जमीनदोस्त केलीं, याचें कारण त्यांचीं आपसांतील वैमनस्यें होत. हीं वैमनस्यें अजूनहि त्यांस कशीं घातकारक होत

आहेत, याचें प्रदर्शन नुकत्याच १९१३ त झालेल्या घालमेलींत झालें. असो, हीं शूर राष्ट्रें १८७८ त उदयास येऊन हळूहळू बलवान् होत आहेत, हें नुकतेंच अनुभवास आलें आहे.

स. १८७८ त बल्गेरिया वगैरे तीन राष्ट्रें उदयास आलीं, तर पुढच्या दशकांत तीन राष्ट्रें लयास गेलीं. प्रथम १८८२ त इजिप्त अस्तास गेलें; आणि आश्चर्य हें कीं, ज्या ग्लॅडस्टनच्या लेखानें बालकन संस्थानांस स्वातंत्र्य मिळालें त्याच ग्लाडस्टनच्या हातानें इजिप्तास समाधि मिळाली ! इजिप्त देशाचा इतिहास ख्रिस्ती सनापूर्वी ४००० वर्षापर्यंत जात आहे. ज्या लोकांनीं हजारों वर्षांपूर्वी बांधलेले पिरामिड जसेच्या तसेच आहेत, त्यांचेच वंशज हल्लीं इजिप्तांत फेलाहीन नांवानें हल्लीं शिल्लक आहेत. इजिप्त देशांत त्यांच्या एकंदर इतिहासांत अनेक राज्यें परकीयांचीं व स्वकीयांचीं झालीं. शेवटलें बहुतेक स्वतंत्र राज्य महमदअल्लीच्या वंशाचें असून तें तुर्कांच्या नामधारी सत्तेखालीं होतें. टर्की डबघाईस आल्यानें इंग्लंड व फ्रान्स या दोघांचाहि इजिप्तवर डोळा होता, व सुएज कालवा बांधण्यांत दोघांचें पुष्कळ द्रव्य गुंतलें होतें. इजिप्तचा खेदिव्ह-संज्ञेचा राजा यावेळीं युरोपियनांच्या हातांत बाहुल्यासारखा होता. अशा स्थितींत अरबी पाशानें राष्ट्रीय-पक्षाचा पुढाकार घेऊन इजिप्शियनांकरितां इजिप्त-युरोपियनांकरितां नव्हे-असा झेंडा रोंविला; व फौजेचा जमाव करून खेदिव्हास ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला. त्यानें प्रथम आलेक्झांड्रियाची तटबंदी सुरू केली; तेव्हां इंग्लंद व फ्रान्स यांनीं त्याजवर आरमार पाठविलें, व आरबी पाशास काढून टाकण्याविषयीं खेदिव्हास ताकीद केली. यावेळीं पाश्चात्यांच्या व पौर्वात्यांच्या चकमकींचा नेहमींचा पहिला प्रवेश सुरू होऊन कोणा युरोपियनानें एका नेटिव्हास ठार मारल्यानें आलेक्झांड्रियांतील लोक युरोपियनांच्या वसाहतीवर जाऊन पडले. या धामधुमींत कित्येक युरोपियन मारले गेले. बाकीचे इजिप्त सोडून निघून गेले. अशा स्थितींत इंग्लद-फ्रान्सनें तटबंदी बंद करण्यास सांगितलेलें अरबीनें ऐकिलें नाहीं. तेव्हां इजिप्तवर बलाचा प्रयोग करावा कीं काय हा प्रश्न यांच्या समोर उभा राहिला. फ्रान्सनें असें करण्यास संमति दिली नाहीं; व फ्रान्सचें आरमार अलेक्झान्ड्रिया सोडून निघून गेलें. अव्वल दर्जाचा मुत्सद्दी ग्लाडस्टन यानें या संधीचा फायदा घेऊन एकट्या इंग्लडाचें घोडें

इजिप्तमध्यें बेधडक शिरकविलें. १८८२ जुलै ११ या रोजीं अॅडमिरल् सेमूरनें ग्लाडस्टनच्या हुकुमावरून अलेक्झांड्रियावर आपल्या लढाऊ जाहजांतून गोळे टाकून क्षणभरांत शहर खालसा केलें. यानंतर लवकरच जनरल वूलसूलीनें टेलएल-कबीरच्या जमिनींवरच्या लढाईंत १३ सपटेंबर १८८२ रोजीं आरबीचा पराभव केला, व त्यास कैद करून सीलोन येथें पाठविलें. तेव्हांपासून इजिप्तांत इंग्लंडचें राज्य आहे असेंच म्हटलें पाहिजे. त्यांच्या ठराविक राजनीतीस अनुसरून खेदिव्ह हा नामधारी राजा इजिप्तांत कायम आहे. याप्रमाणें वस्तुस्थितींत इजिप्तचें स्वतंत्र राज्य अस्तास गेलें. आजमितीस इंग्रजी अंमलाखालीं शांतता व सुराज्य नांदत असल्यानें इजिप्शियन लोकांची सांपत्तिक स्थिति सुधारत आहे. (इ. स. १९१४ सालीं हें लिहिलें गेल्यानंतर आज १६ वर्षें इजिप्त इंग्रजांची मगरमिठी सोडविण्याचा प्रयत्न करीत आहे. तो बहुतेक सिद्धीस गेला असला तरी सुदानचा प्रश्न बाकी आहे, आणि इंग्लंडचें सैन्य सुएज कालव्यावर स्थित आहे.

पाश्चात्यांच्या भौतिक शास्त्रांच्या परागतीनें अधिक बलाढ्य झालेल्या फौजेपुढें जीं आणखी दोन पौर्वात्य राष्ट्रें याच सुमारास लयास गेलीं तीं अनाम-कोचीन व ब्रह्मदेश हीं होत. या राष्ट्रांच्या लोकांच्या इतिहासांत कांहीं रमणीयविशेष दिसत नाहीं. शारीरिक किंवा मानसिक सामर्थ्य यांनीं आपल्या धडपडींत प्रगट केलें नाहीं. सन १८८४ त फ्रान्सनें अनाम व कोचीन जिंकून खालसा केले. इकडे इंग्लंडनेंहि ब्रह्मदेशाचा उत्तरभाग जो बाजूला राहिला होता आणि जो चीनच्या किंवा फ्रान्सच्या तावडींत सांपडण्याचा संभव होता तो सन १८८६ त जिंकून आपल्या राज्यास जोडला. ब्रह्मदेशाचा राजा थीबा यानें युद्धापूर्वी ज्या वल्गना केल्या होत्या त्या विसरून, मंडाले राजधानीच सर हेन्री प्रेंडरगास्ट यानें सर केली, तेव्हां केवळ रुदन केलें व मला व माझ्या बायकोला वांचवा अशी त्यानें विनवणी केली; तेव्हां त्यास रत्नागिरी येथें आणून ठेविलें. ब्रह्मी लोकांनीं स्वातंत्र्यासाठीं यानंतर थोडी फार धडपड केली, पण इंग्लंडच्या तोफी सामर्थ्यापुढें ती टिकली नाहीं. हल्लीं उत्तर व दक्षिण ब्रह्मदेश मिळून ब्रिटिश इंडियाचा एक मोठा प्रांत झाला आहे व ब्रह्मी लोकांसहि ब्रिटनच्या अमलाखालीं शांतता व सुराज्य यांचा फायदा मिळून त्यांची सांपत्तिक स्थिति सुधारत आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या शेवटल्या दशकांत दोन महत्त्वाचीं राष्ट्रें इतिहासकारांच्या समोर येतात. प्रारंभीं दिलेल्या कालिदासोक्तीप्रमाणें पूर्वेस ज्या राष्ट्राचा उदय झाला त्याचा इतिहास फारच बोधप्रद व महत्त्वाचा आहे. पाश्चात्य संस्कृतीपुढें पौर्वात्य राष्ट्रें एकामागून एक बळी पडणार व पडत आहेत, ही गोष्ट चांगल्या रीतीनें एकट्या जपानच्या लक्षांत आली. इ. स. १८५४ त कमांडर पेरीनें अमेरिकन् लढाऊ जहाजांनिशीं जपानच्या किनाऱ्यावर येऊन तोफांचीं नुसतीं तोंडें दाखवून जपान्यांस नाक घासावयास लाविलें, ही गोष्ट स्वातंत्र्यप्रिय, बुद्धिवान् आणि उद्योगी जपान्यांच्या मनास सहजच लागली. आपल्यांत व पाश्चात्यांत काय अन्तर आहे, आपली संस्कृति त्यांच्याहून कशांत कमी आहे, हें त्यांनीं तात्काळ ध्यानांत घेतलें आणि ती न्यूनता काढून टाकण्याचा जीवापाड प्रयत्न केला.

सारांश, समजतें पण उमजत नाहीं, अशी पुष्कळ शाहाण्यांची स्थिति होते, तशी जपानाची झाली नाहीं. स. १८५४ पासून ४० वर्षांच्या आंत जपानचें राष्ट्र पाश्चात्य राष्ट्रांच्या तोडीचें झालें. भौतिक शास्त्रांची पूर्ण माहिती, पाश्चात्य धर्तीवर फौजेची तयारी व शस्त्रसामुग्री आणि पाश्चात्य तऱ्हेची राज्यव्यवस्था या गोष्टी त्यांनीं अवघ्या चाळीस वर्षांत पाश्चत्यांच्याच साहाय्यानें साध्य केल्या. असुरांची संजीवनी विद्या असुरांच्या पोटांत शिरून जशी कचानें हस्तगत केली, त्याचप्रमाणें पाश्चात्यांची भौतिक संस्कृति जपान्यांनीं पाश्चात्यांच्याच पोटांत शिरून संपादन केली. जपान्यांनीं पाश्चात्यांस झोंपेंत वश केलें असें म्हटलें पाहिजे. कारण आपला शिष्य इतका तयार होईल हें पाश्चात्यांच्या ध्यानांत आलें असतें, तर त्यांस त्यांनीं आपली विद्या खचित दिली नसती. या झपाट्यानें घडवून आणलेल्या प्रगतीचें श्रेय जसें एकंदर जपानी लोकांच्या स्वदेशप्रीतीस व स्वार्थत्यागास दिलें पाहिजे, त्याचप्रमाणें तें त्यांचा मिकाडो अथवा बादशाह मुत्सुहितो व त्याचा प्रधान मार्किस इतो यांस दिलें पाहिजे. किंग व्हिक्टर इमान्युएल व कौंट कव्हूर, पहिला केसर विल्यम व प्रिन्स बिस्मार्क, आणि मिकडो मुत्सहितो व मार्किस इतो ह्या राज-प्रधानांच्या जोड्या आपापल्या देशाच्या इतिहासांत चिरस्मरणीय होत. या राजप्रधानांच्या सहानुभूतीनें जपान्यांनीं चाळीस वर्षांत काय काय केलें हें थोडक्यांत सांगण्यासारखें आहे. प्रथम बादशहानें आपली सत्ता कमी करून प्रजेस सनदशीर

राज्यव्यवस्था दिली. सामुरी अथवा क्षत्रिय लोकांनीं आपले हक्क सरकारच्या स्वाधीन केले. सर्व सरदारांनीं आपलीं संस्थानेंहि राजाच्या स्वाधीन केलीं व आपल्या उत्पन्नाबद्दल प्रथम नगदी नेमणुक न मागून त्याबद्दल एकदम रक्कम घेतली. नंतर सर्व लोकांस सारखे हक्क मिळून हत्यारें बाळगण्याची परवानगी दिली गेली. राज्यांत शिक्षणाचा प्रसार सुरू केला. पाश्चात्यांपासून हरएक बाबतींत मदत घेतली. इंग्लिश लोकांच्या मदतीनें रेल्वे, तार व आरमार तयार केलें. कायदे तयार करण्याच्या कामांत व फौजी हालचालींचें शास्त्र शिकण्यांत फ्रेंच लोकांची मदत घेतली. शिक्षण, पोस्ट, शेतकीची सुधारणा आणि वसाहतीचें काम यांत अमेरिकन लोकांच्या ज्ञानाचा व सहानुभूतीचा फायदा घेतला. वैद्यकी, शिक्षण, व्यापार, स्थानिक स्वराज्याची व्यवस्था आणि मुख्यतः फौजी ऑफिसरांचें शिक्षण जर्मन लोकांपासून घेतलें. मूर्तिकला व चित्रकला शिकविण्यासाठीं इटालियन लोकांचें साहाय्य घेतलें. याप्रमाणें निरनिराळया तज्ज्ञ पाश्चात्यांकडून निरनिराळया विषयांत मदत घेऊन जपाननें जी प्रगति केली, तिचें प्रथम प्रदर्शन इ. स. १८९४ त झालें; म्हणजे त्या सालीं उदयोन्मुख जपानी राष्ट्राचा अरुणोदय झाला असें म्हटलें पाहिजे. इ. स. १८९४ त चीन व जपान यांचें युद्ध कोरिया देशाच्या स्वातंत्र्याच्या प्रश्नावरून लागलें, त्यांत जपाननें हां हां म्हणतां चीन राष्ट्रास वाकविलें. त्यावेळचा चीनचा मुत्सद्दी लायहंग—चांग याच्या मध्यस्तीनें जपान व चीन यांचा तह होऊन कोरियाची स्वतंत्रता चीननें कबूल केली. जपानास फोर्मोसा बेट, पोर्ट आर्थर व म्यांच्युरियाचा कांहीं भाग दिला आणि लढाईच्या खर्चासाठीं एक मोठी रक्कम म्हणजे २० कोट टेल देऊं केले. याप्रमाणें जपानचा उत्कर्ष यावेळीं झाला, पण तो अरुणोदयच समजला पाहिजे. कारण या प्रसंगीं पाश्चात्य राष्ट्रें जपानच्या सामर्थ्यानें जागीं झालीं. विशेषतः रशियास जपानाबद्दल मत्सर उत्पन्न झाला, व जपानास रशियाच्या किनाऱ्यावर पाय ठेवूं दिले तर त्याचें प्रस्थ फार वाढेल, अशा कल्पनेनें रशिया, जर्मनी व फ्रान्स यांनीं नुसत्या धमकीनें जपानास पोटआर्थरसुद्धां मॉंचूरियाचा मिळालेला तुकडा सोडावयास भाग पाडलें. या वेळीं जपाननें मोठा शहाणपणा दाखवून एकवटलेल्या तिन्ही राष्ट्रांशीं तंटा न करतां आपला पाय मागें घेतला; व केव्हां तरी रशियाशीं दोन हात झाल्याशिवाय आपला उदय होणार नाहीं, ही आपल्या मनाशीं

पक्की गांठ बांधली. रशियानें चीनच्या पोटांत घुसून पोर्ट आर्थर येथें आपले पाय बाह्यात्कारीं ' लीज ' नें म्हणजे भाडेपट्टयानें लागलीच पसरले, हें सांगावयास नकोच.

असो; याप्रमाणें सन १८९४ त जपानचा अरुणोदय झाला, तर याच दशकांत म्हणजे इ. स. १८९८ त स्पेनच्या साम्राज्यसत्तेचा अंत झाला. स्पेनचें राष्ट्र पंधराव्या व सोळाव्या शतकांत अत्यंत बलाढ्य होतें. स्पेनचा राजा पांचवा चार्लस याच्या वेळीं अर्धा युरोप व अर्धी अमेरिका त्याच्या ताब्यांत होती. मेक्सिको व पेरू येथील अमूप सोनें त्याच्या खजिन्यांत येऊन पडत होतें, व स्पॅनिश व जर्मन शूर वीर त्याच्या फौजेंत लढत होते. यामुळें पांचवा चार्लस याजपुढें युरोपांत कोणाचेंहि चाललें नाहीं. पांचव्या चार्लसनंतर स्पेन देशास उतरती कळा लागली. ती इतकी कीं ज्या देशाच्या दर्यावर्दी लोकांनीं कोलंबसाच्या नेतृत्वाखालीं अमेरिका शोधून काढली, त्या देशाच्या आरमाराचा अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांच्या आरमारानें एक दोन तासांतच फडशा उडविला. अमेरिकेंतील व युरोपांतील स्पेनच्या बाहेरचा बहुतेक सर्व मुलूख यापूर्वीच स्पेनच्या साम्राज्यसत्तेखालून निघून गेला होता. फक्त क्युबा व फिलिपाईन वगैरे कांहीं बेटें यावेळीं स्पेनकडे राहिलीं होतीं. स्पेनचे लोक धर्मवेडे असून अत्यंत जुलमी असल्यानें त्यांचें साम्राज्य नष्ट झालें असेंच म्हटलें पाहिजे. क्युबा बेटांतील लोकांवरहि स्पेनचा अतिशय जुलूम होऊं लागला, तेव्हां मनुष्याच्या नैसर्गिक स्वातंत्र्याच्या हक्कासाठीं भांडणाऱ्या युनायटेड स्टेट्सनें स्पेनास इषारा दिला; पण तो स्पेननें मानला नाहीं. आपल्या आरमारापुढें अमेरिकन आरमाराचें कांहीं चालणार नाहीं, अशी त्यास घमेंड होती; व युरोपासहि तसेंच वाटत होतें. पण भौतिक शास्त्राच्या प्रगतींत स्पेन वस्तुतः मागें पडलें होतें. ॲडमिरल ड्युए यानें इ. स. १८९८ च्या मेच्या पहिल्या तारखेस स्पेनचें एक आरमार मानिला आखात येथें बुडविलें, व जुलै ३ रोजीं सॅन्शियागो येथें ॲडमिरल सॅपशननें दुसरें बुडविलें. स्पेनचा शूर ॲडमिरल सर वेरा या वेळीं एकदम बुडविला गेल्याची हकीकत तारेनें वाचल्याचें वाचकांस स्मरत असेल. सारांश, भौतिक शास्त्रांच्या मदतीनें तीक्ष्ण झालेल्या शस्त्रांपुढें केवळ शौर्याचा टिकाव लागला नाहीं; आणि स्पेननें तह करून क्यूबा व फिलिपाईन वगैरे बेटें अमेरिकेच्या स्वाधीन केलीं.

स्वदेशाच्या बाहेरची स्पेनची साम्राज्यसत्ता या प्रमाणें अस्तास गेली; तसेंच यावेळीं दुसरें एक लहान पण शूर युरोपियन राष्ट्र अस्तास गेलें. स. १८९९–१९०० तील बोअर युद्धाची हकीकत बहुतेक ताजी आहे. लॉर्ड राबर्ट्स व लॉर्ड किचनेर या प्रसिद्ध शूर योद्ध्यांजवळ जय्यत तोफखाना व मुबलक फौज असल्यानें थोड्याशा स्वातंत्र्यप्रिय व शूर बोअरांचें कांहीं चाललें नाहीं; व क्रांजी, डीवेट, बोथा इत्यादि वीर सेनापतींचें युद्धकौशल्यहि कामास आलें नाहीं. इ. स. १९०० मध्यें बोअरांचें स्वतंत्र राज्य नष्ट झालें; व इंग्रजी साम्राज्यानें त्या शूर लोकांस मुत्सद्दीपणानें आपल्यांत सामील करून घेतलें.

विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकांत इकडे जपानचा पूर्ण उदय झाला, तर तिकडे पश्चिमेस मोरोक्कोचें स्वातंत्र्य नाहींसें झालें. इ. स. १९०४–१९०५ मधील रूसो-जपानी-युद्ध जगताच्या इतिहासांत नेहमींच प्रसिद्ध राहील. पोर्ट आर्थर येथून केवळ दपटशाहीनें जपानास इ. स. १८९४ त रशियानें हाकून लावून तेथें आपला तळ दिला तेव्हांपासून दोन्हीं राष्ट्रें या भावी युद्धाची तयारी करीत होतीं. चीनपासून मिळालेल्या वीस कोटी टेलच्या मदतीनें जपान आपलें फौजी समर्थ्य वाढवीत होतें, तर पोर्ट आर्थर येथें अजिंक्य किल्ले बांधण्यांत रशिया आपलें बौद्धिक सामर्थ्य खर्चीत होता. दहाच वर्षांत दोघांची तयारी होऊन युद्ध जुंपलें व जपाननें सर्व जगास आपल्या संस्कृतीनें आश्चर्यचकित करून सोडलें. जपान म्हणजे पौर्वात्य राष्ट्र, जपानचे शिपाई ठेंगणे, रशियाचे कोसाक केवळ राक्षस, त्यांपुढें या माकडांचें काय चालणार? असें रशियास व बहुतेक जगास वाटत होतें. पण जपाननें फ्रँकोजर्मन युद्धाप्रमाणेंच सर्व युद्धक्रम जणूं काय आंखून ठेविला होता; व त्याप्रमाणें तो इत्थंभूत पारहि पाडला! या युद्धांतील तीन लढाया सर्वांत भयंकर व वाखाणण्यासारख्या झाल्या; पोर्टआर्थर, मुकडेन व सुशिमा. शेवटली सुशिमाची लढाई पाण्यावरची असून ॲडमिरल टोगो यानें, आपण इंग्रजांपासून मिळविलेलें आरमारी शिक्षण किती तयारीचें आहे, याची या लढाईत परीक्षा दिली. पण त्याशीं लढणारें रशियन आरमार जुनेंपुराणें व दर्यावर्दी नवशिके, या कारणांनीं ॲडमिरल टोगो यानें दोन तासांत रशियन आरमाराचा फडशा उडविला. यांत कदाचित् आश्चर्य नसेल, पण जमिनीवरच्या लढाईत

रशिया जपानास दाद देणार नाहीं, अशी बहुतेकांची खातरी होती; जमिनीवरचीं शस्त्रास्त्रें रशियाजवळ उत्तम असून पोर्टआर्थरची तटबंदी अगदीं अलीकडच्या भौतिक शास्त्रांच्या ज्ञानाच्या साधनानें विलक्षण मजबूत केलेली होती. असें असून पोर्ट आर्थर व मुकडेन या दोन्ही लढायांत जपाननें रशियास चीत केलें, तें आश्चर्य होय!!! या दोन लढाया म्हणजे अर्वाचीन काळचें रामायण व महाभारत होय. पोर्ट आर्थरचा वेढा व लंकेचा वेढा सारखाच. दोन्ही पक्षांकडील वीरांचें शौर्य व निश्चय अप्रतिम असल्यानें व दोन्हींकडे बौद्धिक सामर्थ्य उपयोगांत येत असल्यानें, पोर्ट आर्थरच्या वेढ्याचें वर्णन रामायणाप्रमाणें चित्ताकर्षक आहे. जनरल नोगीनें हजारों जपानी वीर बळी देऊन हा किल्ला शेवटीं सर केला, व रशियन जनरल स्टासेल यांस शरण येण्यास लाविलें! यशस्वी नोगीची फौज तात्काळ मुकडेनकडे निघाली; व तेथील जपानी फौजेशीं मिळून क्यूरोपॉटकिन या रशियाच्या सेनापतीबरोबर एकंदर जपान्यांचा मुकडेन येथें शेवटचा संग्राम झाला. हा संग्राम म्हणजे भारतीय युद्धच होय. रशियाकडे चार लाख फौज असून जपानकडे पांच लाख होती. दोन्ही सैन्यांचा मोहरा कित्येक कोसभर पसरला होता; एक दिवस नव्हे, तर कित्येक दिवस हें युद्ध चाललें होतें; व तेंहि अविश्रान्त, बहुतेक रात्रंदिवस; दूर दूर चाललेल्या युद्धाची बातमी क्यूरोपाटकिन याजला तारेनें कळत होती; व रेल्वेच्या डब्यांत बसून तो सर्व रशियन सैन्यें हालवीत होता. पण प्रत्यहीं Nogi still flanking "नोगी अजून वळसा घालीत आहे" हीच तार येई! शेवटीं सिडानची पुनरावृत्ति होते कीं काय, असें जगतास वाटूं लागलें. पण क्यूरोपॉटकिन यानें कुशलतेनें आपलें पराजय पावलेलें सैन्य सुरक्षित काढून घेतलें; आणि जसा पेचांत येऊन खालीं गेलेला कुशल पैलवान चाट मारून निसटून पुन्हां हौद्यांत दंड थोपटून उभा राहतो, तसा हार्बिन येथें तो उभा राहिला. असो, जनरल नोगी, मार्शल ओयामा व अॅडमिरल टोगो हीं नांवें जपनच्याच नव्हे, तर जगताच्या इतिहासांत सदैव प्रसिद्ध राहतील. जपानचा या युद्धानें पूर्ण उदय झाला. त्यास पाश्चात्य राष्ट्रें आपल्या बरोबरीचा समजूं लागलीं. जपानची संस्कृति आपल्या तोडीची आहे, हें पाश्चात्य राष्ट्रांनीं या पूर्वींच, कान्सुलर ज्युरिस्डिक्शन—आपल्या लोकांकरितां आपली स्वतंत्र कोर्टांची व्यवस्था—काढून

टाकून कबूल केलें होतें. आतां युद्धशास्त्रांतहि त्यांनीं जपानचें प्रावीण्य कबूल केलें; व जपानच्या कित्येक नवीन युक्त्या या युद्धावरून पाश्चात्यांनीं ग्रहण केल्या. सारांश 'शिष्यादिच्छेत्पराजयम्' या न्यायानें जपाननें पाश्चात्यांचा पराभव केलेला त्यांस मान्य करावा लागला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. असो, जपाननें राजनीतींतहि पाश्चात्त्यांवर ताण करून कोरिया देश यानंतर लवकरच म्हणजे १९०७ मध्यें खाल्ला; व मॉंचूरियावर त्याचें वर्चस्व आहेच, हें सांगितल्यावांचून येथें राहवत नाहीं. कोरियानंतर मोरोक्को देश फ्रान्सनें आपल्या पंखाखालीं घेतला. या दोन्हीं देशांच्या अस्ताच्या इतिहासांत फारसा मनोरंजकपणा नाहीं. यासाठीं या गोष्टींचा केवळ निर्देश करून या लेखांतील विवेचनाच्या समारोपाकडे आपण वळूं.

एकीकडे एका राष्ट्राचा उदय तर दुसरीकडे दुसऱ्या राष्ट्राचा अस्त, ही घडामोड जगताच्या प्रारंभापासून चालली आहे. ती आजवरहि कशी चालली आहे, हें वर दिलेल्या साठ वर्षांतील घडामोडींच्या त्रोटक हकीकतीवरून वाचकांच्या ध्यानांत येईल. या विवेचनावरून ज्या गोष्टी लक्षांत घेण्यासारख्या आहेत, त्या अशाः—पहिली, 'पृथ्वी बलवानाची आहे.' हा जो आमच्या आर्यांचा प्राचीन सिद्धांत आहे, तोच सर्व जगतास, पश्चिमेस आणि पूर्वेस, पूर्व कालास आणि अर्वाचीन कालास सारखा लागू आहे. हें बल तीन प्रकारचें असतें, हें मात्र ध्यानांत ठेविलें पाहिजे; शारीरिक, मानसिक व बौद्धिक. बाहु, हृदय व मस्तक हींही बलाचीं तीन स्थानें आहेत व तीं उत्तरोत्तर महत्त्वाचीं आहेत. सर्वांत श्रेष्ठ डोक्याचें म्हणजे शास्त्रीय बल होय. "धिग्बलं क्षत्रियबलं ब्रह्मतेजोबलम्" हा आपलाहि सिद्धांत आहेच. क्षत्रिय कितीहि शूर व सामर्थ्यवान् असला तरी त्याचें मॅक्सिमगन पुढें कांहीं चालत नाहीं. याचमुळें स्पेनचे लोक व बोअर लोक जेरीस आले, व हल्लीं तुर्कहि येत आहेत. तुर्कांनीं ज्या वेळेस कॉंस्टांटिनोपल घेतलें, त्यावेळेस त्यांचें ज्ञानबल पाश्चात्यांहून कमी नव्हतें ही गोष्ट पुष्कळ लोक विसरतात. त्यावेळेस तुर्कांजवळ आरमार व तोफखाना पाश्चात्यांहून अधिक चांगला होता. असो; हीं तिन्हीं बलें जेथें सारखीं आहेत, तेथें एक चौथें बल संख्येचें आहे. जपाननें जमिनीवर रशियास याच बलानें जिंकिलें. दुसरी गोष्ट, बलवानांनीं दुर्बलांस खावें, हा

जो सृष्टीचा नियम आहे, तो सकृद्दर्शनीं आपणांस अन्यायाचा दिसतो; पण तो तसा नाहीं. जसा माळी बागेंत उगवलेल्या झाडांतून जीं अशक्त व रोगट रोपें असतात तीं उपटून टाकतो, तसा परमेश्वर या नियमाच्या द्वारें जगतांतून अशक्त लोक नाहींसे करतो; म्हणजे बलहीन राष्ट्रें पोलंदप्रमाणें अगदीं नाहींशीं होतात किंवा बलिष्ठाशीं मिळून बोअराप्रमाणें तद्रूप होतात; किंवा बलिष्ठाशीं प्रसंग आल्यानें चढाओढीनें इतली-जपानाप्रमाणें स्वतः बलवान् होतात. तात्पर्य, हा सृष्टिनियम अन्यायाचा नाहीं असें म्हटलें पाहिजे. तिसरी गोष्ट, जपान-इतलीसारखीं राष्ट्रें कांहीं दिवस अवनत, तर कांहीं दिवस उन्नत स्थितींत येतात याचें कारण असें दिसतें कीं, संपत्ति व सुख यांनीं शारीरिक व मानसिक सद्गुणांस आवरण पडतें, व विपत्ति व दुःख यांनीं तेच गुण पुन्हां चरकावर चढून दीप्त होतात; व यामुळें अशीं राष्ट्रें ग्रहाप्रमाणें आपल्याच गतीनें अवनतीस जातात व त्याच गतीच्या जोरानें पुन्हां उदयास येतात. चवथी गोष्ट, हा जो राष्ट्रांच्या अस्तोदयाचा क्रम सूर्याच्या ग्रहमालिके-प्रमाणें चालू आहे, तो निरर्थक नसून एकंदर जगताची तात्त्विकदृष्ट्या उत्क्रांति होत आहे असें वाटतें. जसा सूर्य सर्व ग्रहमालिकेसह एका विवक्षित बिंदूकडे जात आहे, त्याप्रमाणें या राष्ट्रांच्या घडामोडींत एकंदर 'मानुष्यक' उन्नत स्थितीकडे जात आहे; असें सध्यां तरी दिसतें. हल्लीं कोणत्याहि राष्ट्रांत जुलूम, अत्याचार व बेबंदपाच्छाही चालू राहणें शक्य नाहीं. स्पेनला अमेरिकेकडून जसा इषारा मिळाला, तसा इतर राष्ट्रांकडून अशा राष्ट्रांस इषारा मिळाल्यावांचून राहावयाचा नाहीं; आणि या धामधुमींत जे युद्धप्रसंग होतात, त्यांतहि कत्तली, लुटी, स्त्रियांच्या बेइज्जती इत्यादि अनन्वित क्रूर कृत्यें पूर्वीं होत, तीं होण्याचें बहुतेक बंद पडत चाललें आहे. किंबहुना, शरण आलेल्या शिपायांचें संरक्षण व जखमी झालेल्यांची वैद्यकीय जोपासना इत्यादि माणुसकीचे प्रकार अधिकाधिक वाढत आहेत, ही समाधानाची गोष्ट होय.



# शिवपुरी येथील जिजामहाराजांची छत्री.



श्री. कै. माधव महाराज शिंदे आलिजा बहाद्दर यांचा अस्थिदाह-विधि राजकीय सन्मानासहित सोमवार ता. ६ जुलै (१९२५) रोजीं शिवपुरीं येथें झाला. त्याप्रसंगानें श्री. मा. जिजा महाराजांची छत्री मीं पाहिली. त्या वेळेस माधव महाराजांचे जे अनेक लोकोत्तर गुण, लष्करी कौशल्य वगैरे, मी पुणें येथील माझ्या भाषणांत प्रत्यक्ष माहितीनें वर्णन केलें त्याशिवाय महाराजांच्या अंगीं अलौकिक आणखी दोन गुण असलेले माझ्या प्रत्ययास आले. (१) महाराजांची निस्सीम मातृभक्ति आणि (२) महाराजांचें विलक्षण शिल्प-शास्त्रवैदग्ध्य. श्री. मातुश्री जिजा महाराज ऊर्फ सख्या राजा या माधव महाराजांच्या माता होत्या. त्या शिप्री येथें ज्यावेळीं कैलासवासी झाल्या त्या वेळेस महारजांना अलोट दुःख झालें. पण अशा दुःखमय स्थितींतहि जिजामहाराजांची छत्री कशी व कोठें बांधावी आणि तिला चिरंतन स्वरूप कसें द्यावें याचा माधव महाराजांनीं एक अत्युदात्तकल्पनायुक्त निश्चय केला आणि त्याप्रमाणें एका वर्षाच्या आंत ही अतिशय सुंदर बाग व त्यांतील फारच शोभिवंत संगमरवरी सभामंडपाची छत्री उठवून आपल्या मातोश्रींचें नांव चिरस्मरणीय केलें. ही हकीकत रा. रावजी जनार्दन भिडे कौन्सिल मेंबर ग्वालेर यांनीं मला सांगितली, ती विस्तारानें प्रत्यक्ष छत्रीच्या वर्णनासह मी वाचकांपुढें मांडतों.

शिवपुरी हें मूळचें लहान गांव असून त्याच्या भोंवतीं बहुतेक जंगल आहे. पण हें ठिकाण उंचावर असून येथील हवापाणी चांगलें असल्यानें येथें पूर्वीं इंग्रजांची छावणी होती. लार्ड कर्झनच्या वेळेस कित्येक छावण्या कमी झाल्या त्यांत शिवपुरीची छावणी कमी होऊन तेथील कँटोन्मेंटचे बंगले वगैरे माधव महाराजांच्या स्वाधीन झाले. त्या वेळीं महाराजांनीं आपल्या राज्याची थंड हवेंतील ही उन्हाळ्याची राजधानी बनवावी असा संकल्प करून या स्थानास कित्येक लक्ष रुपये खर्च करून त्यांनीं शोभिवंत केलें आहे. बहुधा प्रत्येक कर्तृत्वशाली पराक्रमी राजा आपली नवी राजधानी इतिहासांत बनवीत आला आहे; त्या प्रमाणेंच ही नवी राजधानी माधव महाराजांनीं बनवावी यांत आश्चर्य नाहीं. पण तीस इतर राजाप्रमाणें

आपलें नांव माधवपुरी असें न देतां जुनें शिप्री हें नांव थोडेसें बदलून शिवपुरी असें नांव दिलें. येथें त्यांचा मोठा विस्तीर्ण व रम्य राजवाडा बनला असून शिवाय अनेक कचेऱ्या व ऑफिसर लोकांचे राहण्याचे बंगले तयार झाले आहेत. शिवपुरीच्या भोंवतालची निसर्ग शोभा फारच वर्णनीय असून पूर्व काळचे राजेहि विश्रांतीसाठीं येथें येत असत असें दिसतें. हा प्रांत म्हणजे महाभारतांतील नलाचा निषध देश होय. मध्ययुगीन भारत-कालांत या प्रांतांत कछवाह रजपुतांचें राज्य असून त्यांची राजधानी नरवर हें शहर व तेथील प्रचंड किल्ला हें होतें. याच प्रांतांत भवभूतीनें मालती-माधवांत वर्णिलेला अघोरघंटाचा सिंधुपारासंगम आहे.

अशा या प्राचीन परंपरेनें युक्त असलेल्या निसर्गमणीय प्रदेशांत शिवपुरीजवळ अरण्यांत मोहन-कुंड नांवाचें पूर्वीच्या कोणी राजानें बांध-लेलें एक कुंड आहे. त्याच्या भोंवतालीं संगमरवरी दगडाचे आठ सुंदर लहान मनोरे असून ते त्यास फारच शोभा देत आहेत. जवळच एक जुनी धर्मशाळा आहे आणि मैलभराच्या आंतच बाणगंगा नदीच्या कांठीं एक पवित्र तीर्थ आहे. अशा जुन्या पवित्र ठिकाणीं माधव महाराज आपल्या फिरतींत कित्येक वेळां गेले असावे. त्या ठिकाणीं आपल्या प्रिय व पूज्य मातुश्रींची छत्री बांधावी अशी महाराजांनीं एकदम मनांत कल्पना ठरवून के. मातुश्री जिजा महाराजांचें देहदहन त्या कुंडाच्या पलीकडे दहा पंधरा हातांवर करविलें आणि तेथें एक चिरस्मरणीय सुंदर छत्री एका वर्षाच्या आंत बांधविली.

या छत्रीच्या भोंवतालची दोनतीन मैलांपर्यंतची जागा छत्रीच्या आवा-रांत सामील करून महाराजांनीं हें एक सुंदर रमणीय स्थान ताजमहाला-सारखें बनविलें आहे. विलायतच्या प्रवासांत त्यांनीं अनेक रम्य स्थळें जीं पाहिलीं त्यांतील शोभांचें मुख्य इंगित लक्षांत घेऊन प्रथम दरवाजाच्या बाहे-रील एक विशाल सरळ समोर रस्ता बनविला. या रस्त्याच्या तोंडाशीं आलें म्हणजे एकदम ( ग्रँड ) विशालोदात्त अशा दृश्याची कल्पना येते. हा रस्ता सरासरी पाव मैल थेट समोर असून सुमारें १०० फूट रुंद आहे, व दोन्ही बाजूला पक्का दगडी पायरस्ता बांधलेला असून त्याच्यामागें निस-र्गानें उगवलेल्या जंगली वृक्षांची रांग लागली आहे. अशा रस्त्यांतून उंच मनोरेदार प्रचंड चौघड्याच्या महादरवाज्यांत आपण शिरलों म्हणजे

तेथून दूर अंतरावर समोर छत्री दिसूं लागते व तेथपर्यंतचा रस्ताहि ताजमहालाच्या दरवाजाच्या आंतील रस्त्याप्रमाणें सारखा समोर जागजागीं निरनिराळीं पाण्याचीं उथळ कुंडें केलेला व मधून मधून एक नाला आडवा फिरतो आहे त्याजवर लहान लहान दगडांचे पूल बांधलेला व चारी बाजूंस नजर पोंहचते तेथपर्यंत निसर्गोत्पन्न वृक्षांची दाटी असलेला देखावा पाहून मन शांत व प्रसन्न होतें.

पूर्वोक्त मोहन–कुंडावर मधोमध माधव महाराजांनीं पुलासारखा एक रस्ता बांधविला आहे; व तेथून पुढें ही छत्री उंच शिखरासह आपल्या सौंदर्यानें पहाणारास संतुष्ट करते. छत्रींत शिरल्यावर संगमरवरी सभामंडप असून त्याजवर सोन्याचें काम केलेलें आहे. यामुळें तर विलक्षणच शोभा आलेली आहे. आंतील गाभाऱ्यांत पूर्ण उजेड असून तेथें श्रीमन्मातोश्री जिजामहाराज यांची शुभ्र संगमरवरी दगडाची शांत व प्रेमळ मूर्ति फारच कसबानें तयार केलेली व बहुतेक त्यांच्या नेहमींच्या आकाराएवढीच बसवलेली आहे. चारी बाजूंस शिंदे घराण्यांतील महाराजांच्या तसबिरा लावल्या आहेत. पण प्रत्येक मनुष्यास आंत जातां यावें व शिवलिंगास विटाळ होऊं नये म्हणून शिवलिंग बाहेर स्थापिलें आहे.

या मुख्य मंदिराशिवाय दोन बाजूला दोन मंदिरें गोपाळकृष्ण व श्रीरामचंद्र यांचीं बांधलेलीं आहेत. याशिवाय आणखीहि मंदिरें व धर्मस्थानें या कित्येक मैल विस्तीर्ण असलेल्या छत्रीच्या आवारांत बांधलेलीं असून पाहिजेल त्या धर्माच्या मनुष्यास आंत पूज्यस्थान मिळण्यासारखें आहे. छत्रीच्या जवळच आपल्या लोकांस रहाण्याकरितां महाराजांनीं एक दुमजली मोठा वाडा बांधलेला आहे. सर्वांत अत्यंत मौज ही कीं संध्याकाळ झाली म्हणजे चौघड्याच्या दरवाजापासून तों छत्रीपर्यंत शेंकडों किंबहुना हजारों विजेचे दिवे एकदम लागतात. आणि नव्या व जुन्या उत्तमोत्तम वस्तू या रम्य ठिकाणीं कशा एकत्र झाल्या आहेत हें पाहून मनुष्य आश्चर्यचकित होतो.

याप्रमाणें या छत्रीबागेची विशाल व उदात्त कल्पना महाराजांनीं मातोश्रींच्या मरणाच्या दिवशीं आपल्या अंतःश्चक्षूंपुढें उभी केली, यांतच त्यांच्या शिल्पशास्त्रवैदग्ध्याची आपल्यास प्रतीति येते. लाखों रुपये जवळ असले तरी ते उत्तम रीतीनें कसे खर्च करावे याची विशाल व उदात्त

कल्पना असणें महाबुद्धीचें लक्षण आहे आणि या बुद्धिमत्तेचें व त्याचप्रमाणें महाराजांच्या निश्चयाचें आपल्यास कौतुक वाटतें. ही छत्री हिंदुस्थानांतील रम्य व प्रेक्षणीय स्थळांपैकीं एक नामांकित स्थळ झाली आहे आणि ताजमहालाप्रमाणें ती हिंदुस्थानामध्यें चिरकालपर्यंत बांधणाऱ्याची व जिच्या स्मरणार्थ बांधली तिची कीर्ति कायम ठेवील. ताजमहालाप्रमाणें जरी ही इमारत अतिशय मोठ्या प्रमाणावर नसली तरी बहुतेक तितकीच सुंदर आहे आणि तिच्या मुळाशीं ताजमहालापेक्षांहि जास्त उदात्त असा मानसिक भाव आहे. आपल्या प्रियपत्नीच्या स्मरणार्थ दिल्लीपतीनें ताजमहाल बांधला पण आपल्या प्रिय व पूज्य मातोश्रींच्या स्मरणार्थ उच्चतर मातृप्रेमानें ही छत्री बांधलेली आहे. आणि मला वाटतें इतिहासांत बायकोच्या प्रेमाचीं उदाहरणें कित्येक सांपडतील; पण मातोश्रींचे स्मरणार्थ निस्सीम मातृप्रेमानें बांधलेल्या स्मारकाचें हें पहिलेंच उदाहरण आहे.

या छत्रीच्या आणि येथील आवाराच्या व एकंदर सर्व जरुरी बंदोबस्ताच्या साठीं जो खर्च सालवार लागेल तो नेहमीं चालत रहावा व त्याचा संबंध संस्थानाच्या खर्चाशीं राहूं नये आणि त्यांत पुढें कोणत्याहि प्रकारचा व्यत्यय येऊं नये याचीहि खबरदारी महाराजांनीं घेतली आहे. मला असें कळलें कीं, हा खर्च सुमारें सालाचा पन्नास साठ हजार असून तितकें व्याज उत्पन्न होणारा एक कायमनिधि महाराजांनीं आपल्या खाजगी मिळकतींतून काढून ठेवून त्याचा स्वतंत्र ट्रस्ट केला आहे. यामुळें या संस्थेची सुव्यवस्था नेहमींच राहील असें निश्चयानें वाटतें.

यास आणखी एक कारण असें आहे कीं, श्रीमंत कैलासवासी माधवमहाराज यांचीहि छत्री येथंच व्हावयाची आहे. माधव महाराजांनीं आपल्यास मातोश्रींच्या छत्रीच्या समोर कुंडाच्या उत्तरबाजूस ठेवावें अशी इच्छा मरणापूर्वी प्रगट केली व आपली छत्री लहानच मातोश्रीकडे तोंड करून बनवावी असेंहि त्यांनीं सांगितलें. त्याप्रमाणें एका जवळच्याच जागेवर त्यांचें अस्थिदहन झालें, आणि त्या ठिकाणीं त्यांच्या इच्छेप्रमाणें लहानशी एक छत्री बनणार आहे. पण ती लहान झाली तरी माधवमहाराजांच्या मोठेपणास, वैभवास व राज्याच्या कीर्तीस व ऐश्वर्यास साजेल अशींच बनेल हें सांगावयास नको. अर्थात् श्रीमंत माधवमहाराज व त्यांच्या पूज्य मातोश्री जिजामहाराज या दोघां विलक्षण माता-पुत्रांची

छत्री या आवारांत बनल्यानें हें अत्यंत रमणीय ठिकाण नेहमीं सुस्थितींत राहील याबद्दल शंका नको.

हा लेख संपविण्यापूर्वीं शिवपुरींतील दुसरी विलक्षण संस्मरणीय महाराजांची शिल्पकृति सांगितली पाहिजे. छत्रीच्या ठिकाणापासून दोनतीन मैलांवर एक योग्य ठिकाण पाहून तेथें एक प्रचंड तलाव महाराजांनीं बनविला आहे. सुमारें दीड मैल लांबीची भिंत बांधून एक लहानशी नदी आडवून हा तलाव करविला आहे. यास महाराजांनीं आपल्या मातोश्रींचेंच नांव म्हणजे सख्यासागर असें दिलें आहे. याच्या कांठीं दोन बंगले बांधून पुरुषांचा व स्त्रियांचा क्लब तेथें ठेविला आहे व राहण्याची व उपाहाराची व्यवस्था तेथें केली असून तलावावर फिरण्यासाठीं हातानें वल्हविण्याच्या व इतर होड्या ठेविल्या आहेत. अशा रीतीनें ही शिवपुरी राजधानी माधव महाराजांनीं सुरम्य केली असून तेथें जिजामहाराजांची छत्री आणि सख्यासागर हीं दोन स्थलें आपल्या मातोश्रींच्या स्मरणार्थ केलेलीं त्यांची कीर्ति हजारों वर्षें हिंदुस्थानांत कायम ठेवतील.

